श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचित

# व्याकरणमहाभाष्य

## मूळ आणि
## मराठी भाषांतर

भाग सहावा. ( अध्याय ७ व ८ )

भाषांतरकार

महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर

संपादक

प्राध्यापक काशीनाथ वासुदेव अभ्यंकर.

पुणें

पौष शके १८७२ जान्युआरी सन १९५१

# प्रास्ताविक निवेदन

सुमारे नऊ वर्षांपूर्वी व्याकरण महाभाष्याचे १ व २ भाग प्रसिद्ध झाल्यानंतर महायुद्ध-जन्य परिस्थितीमुळें व इतर अडचणींमुळें पुढील भाग प्रकाशित करण्याचें काम स्थगित झालें होतें. गेल्या वर्षांपासून पुनः कामास सुरवात झाली व आज सात व आठ या अध्यायांचा शेवटचा भाग (पूर्वसंकल्पित ५ वा भाग) प्रसिद्ध करीत आहों. प्रकाशनाचे सोयीसाठीं संकल्पित ५ भागांचे ऐवजीं एकंदर ६ भाग करण्याचें ठरवून तिसऱ्या भागामध्यें संपूर्ण तिसरा अध्याय, चौथ्या भागांत ४ व ५ अध्याय, पांचव्या भागामध्यें ६ वा अध्याय, व प्रस्तुत ६ व्या भागामध्यें ७ व ८ अध्याय देण्याचें योजिलें आहे.

दुर्दैवानें या भागाचें काम शास्त्रीबुवांचे द्रष्टृत्वाखालीं होऊं शकलें नाहीं, तरी त्यांचे चिरंजीव सेवानिवृत्त प्रोफेसर काशिनाथराव अभ्यंकर यांनीं तें काम आपले अंगावर घेऊन संस्थेस उपकृत केलें हें नमूद करण्यांत मला आनंद वाटतो. राहिलेल्या भागांचें काम त्यांचेच द्रष्टृत्वाखालीं चालू असून लवकरच तिसरा भाग प्रसिद्ध होईल अशी आशा आहे.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें.
ता. १४ जानेवारी १९५१

चिंतामण रामचंद्र देवधर
सेक्रेटरी, डे. ए. सोसायटी



श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचितम्

# व्याकरणमहाभाष्यम्

## [1]युवोरनाकौ ॥ ७ । १ । १ ॥

युवोरनाकावित्युच्यते कयोर्युवोरनाकौ भवतः । प्रत्यययोः । कथं पुनरङ्गस्येत्यनुवर्तमाने प्रत्यययोः स्याताम् । युशब्दवुशब्दान्तमेतद्विभक्तावङ्गं भवति । यदि युशब्दवुशब्दान्तस्याङ्गस्यानाकौ भवतः सर्वादेशौ प्राप्नुतः । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवं न भविष्यतः । यत्र तर्हि विभक्तिर्नास्ति । नन्दना कारिकेति । अत्रापि

---

यु आणि वु यांचे स्थानीं अन आणि अक हे आदेश होतात असें म्हटलें आहे. तरी कोणत्या यु आणि वु याचे ठिकाणीं अन आणि अक होतात ?

यु आणि वु जे प्रत्यय आहेत त्यांचे ठिकाणीं.

बरें पण, ‘अङ्गस्य’ हें अधिकारसूत्र येथें अनुवृत्त असल्यामुळें प्रत्ययाचे ठिकाणीं हे ‘अन’ व ‘अक’ आदेश कसे होतील ?

होतील; कारण यु शब्द शेवटीं असलेलें किंवा वु शब्द शेवटीं असलेलें असें अंग विभक्तिप्रत्यय पुढें ठेवला असतांना शक्य [2]होतें, पण युशब्दान्त व वुशब्दान्त अंगाला अन आणि अक आदेश होतात असें म्हटलें म्हणजे विभक्तिप्रत्यय पुढें असताना मागें असलेलें जें संपूर्ण अंग त्याचे स्थानीं अन व अक हे आदेश होऊं लागतील.

‘निर्दिश्यमानाचे ठिकाणीं आदेश होतात’ या परि[4]भाषेमुळें संपूर्ण अंगाचे ठिकाणीं आदेश होणार नाहींत.

बरें तर, ज्या ठिकाणीं विभक्तिप्रत्यय [5]नसतो त्या ठिकाणीं, उदा० नन्दना, कारिका, इत्यादि ठिकाणीं, काय वाट ?

---

१. (सू. १) यु व वु यांना क्रमानें अन व अक असे आदेश होतात. प्रस्तुत सूत्रांत यु व वु हे प्रत्यय घ्यावयाचे आहेत; व त्यांमध्यें उकार हे सानुनासिक समजावयाचे आहेत. सूत्राचा समग्र अर्थ खालीलप्रमाणें:—ज्या यु व वु या प्रत्ययांमुळें अंगसंज्ञा होते असे जे अंगसंज्ञेशीं संबद्ध व उकार अनुनासिक असलेले यु व वु हे प्रत्यय त्यांना अन व अक असे अनुक्रमें आदेश होतात. युवोः हें युवु शब्दाचें षष्ठीचें द्विवचनाचें रूप सौत्र समजावें. उदा० करणं, कारकः.

२. त्या अङ्गाचा अवयव जो यु किंवा वु त्याला अन किंवा अक हा आदेश केला म्हणजे अर्थात् प्रत्यय असलेले यु व वु यांनाच अन व अक हे आदेश होतात.

३. केवळ यु व वु यांनाच होणार नाहींत.

४ पूर्वौ पादः पत् ( ६।४।१३० ) या सूत्रावरील भाष्य पहा

५. विभक्तिपत्यय मुळींच नसणें शक्य नाहीं. नसतो म्हणजे असून लुप्त झालेला असतो. तेव्हां तेथें त्या प्रत्ययामुळें मागील भागाला अङ्गसंज्ञा नसल्यामुळें त्यांतील यु व वु यांना हे आदेश होणार नाहींत.

प्रत्ययलक्षणेन विभक्तिः । यत्र तर्हि प्रत्ययलक्षणं नास्ति । नन्दनप्रियः कारकप्रिय इति । मा भूतां यासौ सामासिकी विभक्तिस्तस्यां यासौ समासाद्विभक्तिस्तस्यां भविष्यतः । न वै तस्यां युशब्दवुशब्दान्तमङ्गं भवति । भवेद्यो युशब्दवुशब्दाभ्यामङ्गं विशेषयेत्तस्यानन्त्ययोर्न स्याताम् वयं खल्वङ्गेन युशब्दवुशब्दौ विशेषयिष्यामः । अङ्गस्य युवोरनाकौ भवतो यत्रतत्रस्थयोरिति । यत्र तर्हि समासाद्विभक्तिर्नास्ति । नन्दनदधि कारकदधि ॥ एवं तर्हि

न चापरं निमित्तं संज्ञा च प्रत्ययलक्षणेन । न चेह परं निमित्तमाश्रीयते । अस्मिन्परतो युवोरनाकौ भवत इति । किं तर्हि । अङ्गस्य युवोरनाकौ भवत इति । अङ्गसंज्ञा च भवति प्रत्ययलक्षणेन ॥ अथवा तयोरेव

---

त्याही ठिकाणीं प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) विभक्तीचें अस्तित्व समजण्यात येईल.

पण ज्या ठिकाणीं प्रत्ययलक्षण होत नाहीं त्या ठिकाणीं, उदा० नन्दनप्रियः, कारकप्रियः, इत्यादि ठिकाणीं काय वाटे[६] ?

त्याही ठिकाणीं समासाचे आतील विभक्ति घेतली असतांना ती पुढे असलेल्या अंगाला मानून अन व अक आदेश न होतील, परंतु समासाचे पुढे लावलेल्या विभक्तीचे मागील जें अंग त्यातील 'यु' व 'वु' याना अन व अक आदेश होतील.

पण, समासाचे पुढें लावलेल्या विभक्तीचे मागें असलेलें अंग 'यु' शब्द शेवटीं असलेलें अथवा 'वु' शब्द शेवटीं असलेले असे येथें मिळत नाहीं. सबब यु व वु याना ते अंगाचे शेवटीं नसल्यामुळें जरी प्रत्यय पुढे असला तरी अन व अक हे आदेश होणार नाहींत.

तुम्ही म्हणतां असें होईल; पण कोणाच्या मतीं ? जो वैयाकरण वाक्यार्थ करतांना यु शब्द व वु शब्द हें अंगाचें विशेषण मानून वाक्यार्थ करील त्याचे मतीं कारण त्याचे मतीं यु व वु शेवटीं नसल्यामुळें त्यांना अन व अक हे आदेश होणार नाहींत पण आम्ही वाक्यार्थ करतांना अङ्गपद यु शब्द व वु शब्द यांना विशेषण लावतों; व ' अंगाचे जे यु व वु त्यांना अन व अक हे आदेश होतात; ते यु व वु अंगामध्यें कोठेही असोत ' असा अर्थ करतों.

बरें तर ज्या ठिकाणीं समासाचे पुढें विभक्ति दिसत नाहीं त्या ठिकाणीं कसें ? उदा० नन्दनदधि, कारकदधि, इत्यादि ठिकाणीं.

तर मग आम्ही असें म्हणतों की प्रस्तुत नन्दनदधि वगैरे उदाहरणांमध्यें पहा, अमुक पुढें असता यु व वु यांना अन व अक हे आदेश होतात अशा तऱ्हेचे पुढें असणारें निमित्त[९] येथें कांहीं गृहीत धरलें नाहीं.

तर मग वाक्यार्थ कसा होतो ?

अर्थात अंगाचे जे यु व वु त्यांना अन व अक हे आदेश होतात असा; अङ्गसंज्ञा प्रत्ययलक्षणानें प्रत्ययाचे अस्तित्व मानून[१०] होते.

---

६. सुपो धातु० ( २।४।७१ ) यानें समासाचे आंतील म्हणजे नन्दनप्रियः येथील नन्दनशब्दाचे पुढील विभक्तीचा लुक् होतो. लुक् झाल्यावर 'न लुमताऽङ्गस्य' ( १।१।६३ ) हा प्रत्ययलक्षणाचा निषेध होतो.

७ युशब्दान्त व वुशब्दान्त जें अङ्ग असा अर्थ करून येथें वाक्यार्थ करतेवेळीं विशेषणविशेष्यभाव दोन प्रकारांनीं संभवतो. यु व वु जें अङ्ग म्हणजे यु व वु अंतीं असलेलें अंग हा एक प्रकार, व अंग जे यु व वु म्हणजे अंगाचे अवयव जे यु व वु हा दुसरा प्रकार. या दुसऱ्या प्रकारांत यु व वु हे प्रत्यय अंगाचें विशेष्य होत असल्यामुळें तदन्तविधि होत नाहीं.

८. येथें विभक्तिलुक् ( ७।१।२३ ) नित्य असल्यामुळे तो अगोदर होतो व तो झाल्यावर 'न लुमताऽङ्गस्य' ( १।१।६३ ) या सूत्रानें प्रत्ययलक्षणाचा निषेध झाल्यामुळें विभक्ति पुढें आहे असें मानतां येत नाहीं, व विभक्ति पुढें नसल्यानें हे आदेश होणार नाहींत.

९. विभक्तिरूपीं परनिमित्त.

१०. लुक् झाला असला तरी अंगसंज्ञा प्रत्ययलक्षणानें होण्यास हरकत नाहीं. कारण अंगसंज्ञा झाली तरच प्रत्ययलक्षणाच्या निषेधाची प्रवृत्ति होणारी आहे.

यदङ्गं तन्निमित्तत्वेनाश्रयिष्यामः । कथम् । अङ्गस्येति संबन्धसामान्ये षष्ठी विज्ञास्यते । अङ्गस्य यौ युवू । किं चाङ्गस्य युवू । निमित्तम् । ययोर्युवोरङ्गमित्येतद्भवति । कयोश्चैतद्भवति । प्रत्यययोः ॥

**युवोरनाकाविति चेद्धातुप्रतिषेधः ॥ १ ॥**

युवोरनाकाविति चेद्धातुप्रतिषेधो वक्तव्यः । युत्वा युत. युतवान् युतिः ॥

**भुज्य्वादीनां च ॥ २ ॥**

भुज्य्वादीनां च प्रतिषेधो वक्तव्यः । भुज्युः । कंयुः शंयुरिति ॥

**अनुनासिकपरत्वात्सिद्धम् ॥ ३ ॥**

अनुनासिकपरयोर्युवोर्ग्रहणं न चैतावनुनासिकपरौ ॥ यद्यनुनासिकपरयोर्ग्रहणं नन्दनः कारकः अत्र न प्राप्नुतो न ह्येताभ्यां युशब्दवुशब्दाभ्यामनुनासिकं परं पश्यामः । अनुनासिकपरत्वादिति नैवं विज्ञायते अनुनासिकः पर आभ्यां ताविमावनुनासिकपरौ अनुनासिकपरत्वादिति । कथं तर्हि । अनुनासिकः परोऽनयोस्ताविमावनुनासिकपरौ अनुनासिकपरत्वादिति ॥ यद्यनुनासिकपरयोर्ग्रहणमित्संज्ञा प्राप्नोति । तत्र को दोषः ।

---

अथवा यु व वु या प्रत्ययांसबधीं जें अग तेंच अन व अक हे आदेश होण्याकरितां निमित्त होतें असें आम्ही म्हणू.

असें कसें म्हणतां ?

‘अङ्गस्य’ या ठिकाणची षष्ठी ‘सामान्यसंबन्ध’ या अर्थाची समजली जाईल. ‘अङ्गस्य युवू’ याचा अर्थ अंगसबंधीं जे यु व वु असा होईल. अगासंबधीं यु व वु कसे ? तर अगाला म्हणजे अंगसंज्ञेला निमित्तभूत असणारे. थोडक्यांत म्हणावयाचे म्हणजे ज्या यु व वु शब्दांमुळें अंगसंज्ञा होते अशा यु व वु यांना अन व अक आदेश होतात.

कोणत्या प्रकारचे यु व वु पुढें असतांना अंगसंज्ञा होत असते ?

प्रत्यय जे यु व वु ते पुढें असतांना.

(वा. १) यु व वु याना अन व अक हे आदेश होतात असें म्हटलें असतां धातु असलेले जे यु व वु त्यांचा प्रतिषेध करावा लागेल; उदा० युत्वा, युतः, युतवान् युतिः वगैरे ठिकाणीं.

(वा. २) तसेच भुज्यु वगैरे ठिकाणींही प्रतिषेध करणें भाग पडेल. भुज्यु वगैरे ठिकाणें म्हणजे भुज्यु[11], कयु, शंयु.

ही अडचण येत नाहीं. कारण—

(वा. ३) अनुनासिकपर यु व वु यांचेंच प्रस्तुत सूत्रांत ग्रहण करावयाचें आहे. यु धातु व भुज्यु, शयु, वगैरे जे शब्द त्यांचे ठिकाणीं यु हा अनुनासिकपर नाहीं.

जर अनुनासिकपर यु व वु यांचेंच ग्रहण केलें तर नन्दनः, कारकः, या मूळ उदाहरणामध्येंच अन व अक हे आदेश होणार नाहींत. कारण या ठिकाणीं यु शब्द अथवा वु शब्द याच्यापुढें अनुनासिक दिसत नाहीं[12].

‘अनुनासिकपरत्वात्’ येथें अनुनासिकपर म्हणजे ज्यांच्या पुढें अनुनासिक आहे असा अर्थ करावयाचा नाहीं; तर ज्या यु व वु यांमध्यें पुढील वर्ण म्हणजे उकार हा अनुनासिक आहे असे यु व वु असा अर्थ करावयाचा.

अशा तऱ्हेनें अनुनासिकपर यु व वु घेतले असतां उकार अनुनासिक झाल्यामुळें त्याला इत्संज्ञा होऊं लागेल[13].

---

११. भुज् धातूहून युक् प्रत्यय (उणा. ३।२१) आणि कम् व शम् या धातूंहून युस् प्रत्यय (५।२।१३८) झाला आहे.

१२. युतः वगैरे ठिकाणीं जसा यु व वु यांच्या पुढें अनुनासिक नाहीं तसा नन्दनः वगैरे उदाहरणांमध्येंही दिसत नाहीं.

१३. यु व वु या प्रत्ययांतील उकार पाणिनीनें अनुनासिक उच्चारला आहे असें गृहीत धरलें तर उकाराला इत्संज्ञा (१।३।२) होऊं लागेल.

**तत्र ङीब्नुमोः प्रतिषेधः ॥ ४ ॥**

ङीब्नुमोः प्रतिषेधो वक्तव्यः । नन्दनः कारकः । नन्दना कारिका । उगिल्लक्षणौ ङीब्नुमौ प्राप्नुतः ॥

**धात्वन्तस्य च ॥ ५ ॥**

धात्वन्तस्य च प्रतिषेधो वक्तव्यः । दिवु सिवु ॥

**षिट्टित्करणं तु ज्ञापकमुगित्कार्याभावस्य ॥ ६ ॥**

यदयं युशब्दवुशब्दौ षिट्टितौ करोति शिल्पिनि ष्वुन् [ ३. १. १४५ ] टयुट्ट्युलौ तुट्च इति तज्ज्ञापयत्याचार्यो न युवोरुगित्कार्यं भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् । षिट्टित्करण एतत्प्रयोजनं षिट्टित इतीकारो यथा स्यात् । यदि चात्रोगित्कार्यं स्यात्षिट्टित्करणमनर्थकं स्यात् । पश्यति त्वाचार्यो न युवोरुगित्कार्यं भवतीति ततो युशब्दवुशब्दौ षिट्टितौ करोति ॥

**न वा षित्करणं ङीष्विधानार्थम् ॥७॥**

नैतदस्ति ज्ञापकम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । षित्करणं क्रियते

---

मग इत् संज्ञा झाली असता काय दोष येईल ?

(वा. ४) तसें झालें असतां ङीप् व नुम् यांचा प्रतिषेध करावा लागेल; उदा० नन्दन: कारक:, नन्दना कारिका, हीं रूपें पहा. या ठिकाणीं 'उ' इत्संज्ञक असल्यास उगिन्निमित्तक ङीप्[१४] व नुम् प्राप्त होतील.

(वा. ५) तसेंच अनुनासिकपर यु व वु यांना अन व अक आदेश होतात असें म्हटलें असतां आणखीही एक दोष येईल. तो दोष म्हणजे धातूंच्या शेवटीं असणारे यु व वु यांनाही[१५] अन व अक आदेश होऊं लागतील. या दोषाचाही परिहार करावा लागेल; उदा० दिवु, षिवु वगैरे.

(वा.६) अनुनासिकपर यु व वु यांमधील अनुनासिक उकारामुळें उगित्कार्य प्राप्त झालें तरी तें होत नाहीं असे सुचविलें जातें. कारण, कांहीं ठिकाणीं यु व वु याना षकार किंवा टकार इत्संज्ञक जोडलेला दृष्टीस पडतो. खुलासा करावयाचा म्हणजे–'शिल्पिनि ष्वुन्' (३।१।१४५) 'टयुट्ट्युलौ तुट् च' (४।३।२३) या सूत्रामध्यें ज्या अर्थी आचार्य पाणिनि यु व वु हे शब्द षकार आणि टकार या इत्संज्ञकांसह उच्चारतात त्या अर्थी ते स्पष्ट सुचवितात कीं यु व वु यामधील जो अनुनासिक व म्हणूनच इत्संज्ञक उकार त्याचे निमित्तानें कोणतेंही उगिन्निमित्तक कार्य करावयाचे नाहीं.

कशा रीतीनें हें ज्ञापक समजावयाचें ?

षकार किंवा टकार इत्संज्ञक करण्याचा हेतु हा असतो कीं ज्या शब्दामध्यें षकार किंवा टकार इत्संज्ञक असतो त्या शब्दाला स्त्रीलिंगद्योतक ईकार[१६] शेवटीं लावला जातो. जर उगित्कार्य या ठिकाणीं होऊ लागेल तर ईकार उगिताच्या निमित्तानेंच लागल्यामुळें षकार किंवा टकार इत् करण्याचें कांहीं कारणच उरणार नाहीं. सबब असे म्हणावे लागतें की आचार्य पाणिनि हे असें सुचवितात कीं यु व वु यामधील जो इत्संज्ञक उकार त्याचे निमित्तानें उगित्कार्यें होत नाहींत; व असें असल्यामुळें ते यु व वु या शब्दांना जरूर पडेल त्या ठिकाणीं षकार किंवा टकार अनुबन्ध जोडतात.

(वा. ७) वर दिलेलें ज्ञापक जुळत नाहीं. कारण षकार किंवा टकार जोडण्याचें निराळें प्रयोजन आहे.

ते निराळें प्रयोजन कोणतें ?

---

१४. उगितश्च ( ४।१।६ ) या सूत्रानें ङीप् व उगिदचाम्० ( ७।१।७० ) यानें नुमागम.

१५. दिवु वगैरे धातूंमध्यें शेवटचा उकार हा अनुनासिक असल्यामुळें तेथें यु य वु हे अनुनासिकपर मिळतात.

१६. ङीप् व ङीष् वगैरे. षिद्गौरादिभ्यश्च (४।१।४१), टिड्ढाणञ्० (४।१।१५), हीं सूत्रें पहा.

ङीष्विधानार्थम् । षित इति ङीष्यथा स्यात्॥

**टित्करणमनुपसर्जनार्थम् ॥ ८ ॥**

टित्करणेऽप्यन्यत्प्रयोजनमस्ति । किम् । अनुपसर्जनाट्टित इतीकारो यथा स्यात् । टितोऽनुपसर्जनाद्भवत्युगित उपसर्जनाच्चानुपसर्जनाच्च ॥ एवं तर्हि

**विप्रतिषेधात्तु टापो बलीयस्त्वम् ॥९॥**

विप्रतिषेधात्तु टापो बलीयस्त्वं भविष्यति । टापोऽवकाशः । खट्वा माला । ङीपोऽवकाशः । गोमती यवमती । इहोभयं प्राप्नोति । नन्दना कारिका । टाब्भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । विप्रतिषेधे परमित्युच्यते पूर्वश्च टाप्परो ङीप् । ङीपः परष्टाप्करिष्यते । सूत्रविपर्यासः कृतो भवति ॥ एवं तर्ह्युगितो ङीब्भवतीत्यत्राप्यतष्टाबित्यनुवर्तिष्यते । एवमप्यकारान्तादुगित

---

षकार इत् जोडण्याचें कारण ङीष्[१७] हा स्त्रीप्रत्यय व्हावा हें आहे षिद्गौरादिभ्यश्च (४।१।४१) या सूत्रानें 'ष्वुन्' प्रत्ययान्ताहून ङीष् स्त्रीप्रत्यय झाला पाहिजे.

(वा.८) तसेच टकार इत् करण्याचेंही प्रयोजन आहेच. ज्या ठिकाणीं स्त्रीप्रत्यय शेवटीं असलेला शब्द दुसऱ्या शब्दाला उपसर्जन म्हणजे विशेषण नाहीं त्या ठिकाणींच ई हा स्त्रीप्रत्यय व्हावा हें प्रयोजन आहे. 'टिड्ढाणञ्०' (४।१।१५) या सूत्रानें सांगितलेला ई हा स्त्रीप्रत्यय उपसर्जन नसलेल्या शब्दालाच लागतो. 'उगितश्च' (४।१।६) या सूत्रानें सांगितलेला ई हा स्त्रीप्रत्यय उपसर्जन असलेल्या शब्दालाही लागतो व उपसर्जन नसलेल्यालाही लागतो. बरें तर,

(वा. ९) टाप् व ङीप् यांचा या ठिकाणीं विरोध आहे. त्या विरोधांत टाप् हा ज्यास्ती प्रबल होऊन ङीप् प्रत्ययाचा बाध करील. विप्रतिषेधाचें स्पष्टीकरण पुढें देतों:-- खट्वा, माला, वगैरे ठिकाणीं ङीप् प्रत्ययाची प्राप्तीही नाहीं. तेथें टाप् प्रत्ययच होतो. तसेंच गोमती, यवमती, वगैरे ठिकाणीं फक्त ङीप प्रत्ययालाच जागा आहे. नन्दना, कारिका, या उदाहरणांत मात्र दोनही प्रत्यय प्राप्त होतात. तेथें दोहोंच्या विरोधांत टाप् प्रबल होतो.

वरील लिहिलेला विरोध व त्या ठिकाणीं सांगितलेलें प्राबल्य हीं बरोबर नाहींत. कारण विरोध असतांना पर कार्य प्रबल होतें असें आचार्य पाणिनीनें (१।४।२) सांगितलें आहे. प्रस्तुत स्थलीं टाप् हें पूर्व (४।१।४) कार्य आहे. व ङीप् हें पर (४।१।५) कार्य आहे.

ङीपाच्या पुढें टाप् प्रत्ययाचें सूत्र करण्यांत येईल.

तसें करण्यांत अष्टाध्यायींत दिलेला सूत्रांचा क्रम बदलेल.

तसें असेल तर उगिताला ङीप् होतो, या सूत्रामध्येंही 'अतष्टाप्' (अकारान्त शब्दाला टाप् होतो) हीं पदें अनुवृत्त केलीं जातील[२०].

असें केलें तरी भागत नाहीं; कारण मग उक्

---

१७. ङीष् हा स्त्रीप्रत्यय केला असतां स्वरामध्यें फरक होतो. उगितश्च यानें ङीप् होईल व ईकार अनुदात्त होईल. पण षिद्गौरादिभ्यश्च यानें ङीष् झाला असतां ईकार उदात्त होईल.

१८. ल्यु, टयु, वगैरे प्रत्यय अंतीं असलेले जे नन्दन, सायंतन, वगैरे शब्द त्याना उगितश्च यानें ङीप् झाला असतां तो ते शब्द उपसर्जन असतांही होईल, व ते उपसर्जन नसतांही होईल. परंतु तोच जर ङीप् टिड्ढाणञ्० या सूत्रानें झाला तर ते शब्द अनुपसर्जन असतांनाच होईल. उगित्करणामुळें सर्वच ठिकाणीं ङीप् होत असतां मुद्दाम टकार जास्ती जोडण्यांत आचार्यांचा हा हेतु दिसतो कीं अनुपसर्जन असेल तेथेंच ङीप् व्हावा.

१९. तेव्हां टित्करण व्यर्थ होऊन पूर्वींचें ज्ञापक जमतें असा अभिप्राय आहे.

२०. उगितश्च या सूत्रामध्यें अतः टाप् हीं दोन पदें अनुवृत्त आणून दोन वाक्यार्थ केले म्हणजे दोष येणार नाहीं. ते वाक्यार्थ असेः-- उगिदन्त प्रातिपदिका-

इहैव स्यात् नन्दना कारिका गोमती यवमतीत्यत्र न स्यात् ॥ एवं तर्हि संबन्धानुवृत्तिः करिष्यते । अजाद्यतष्टाप् ( ४. १. ४ ) । ऋन्नेभ्यो ङीप् ( ५ ) अतष्टाप् । उगितश्च ( ६ ) ङीब्भवति अतष्टाप् । वनो र च ( ७ ) । वनो ङीब्भवति उगितोऽतष्टाप् । पादोऽन्यतरस्याम ( ८ ) ङीब्भवति उगितोऽतष्टाप् । तत ऋचि । ऋचि च टाब्भवति । उगितोऽत इति निवृत्तम् । तत्रायमप्यर्थो द्विष्टाब्ग्रहणं न कर्तव्यं भवति । प्रकृतमनुवर्तते ॥ सिध्यत्येवं यत्त्विदं वार्त्तिककारः पठति विप्रतिषेधात्तु टापो बलीयस्त्वमित्येतदसंगृहीतं भवति । एतच्च संगृहीतं भवति । कथम् । इष्टवाची परशब्दः । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

**धात्वन्तस्य चार्थवद्ग्रहणात् ॥ १० ॥**

अर्थवतोर्युवोर्ग्रहणं न च धात्वन्तोऽर्थवान् ॥

---

इत असलेल्या अकारान्तापुढे नन्दना, कारिका वगैरे प्रस्तुत ठिकाणींच ङीप् होईल व एकदा टापही होईल[२१], गोमती, यवमती, या ठिकाणीं कांहींच होणार नाहीं.

तर मग फक्त संबन्धानुवृत्ति करण्यांत[२२] येईल. ती खाली लिहिल्याप्रमाणे: 'अजाद्यतष्टाप्' हें सूत्र प्रथम आहे; त्यानतर ' ऋन्नेभ्यो ङीप् ' येथें 'अतष्टाप्' याचा संबध आहे. त्यानतर ' उगितश्च' उगित् शब्दाहून ङीप् प्रत्यय होतो; 'अतः टाप्' याचा संबंध आहे: उगित् शब्द जर अकारान्त असेल तर त्याहून टाप् प्रत्यय होतो. पुढें ' वनो र च ' वन्नन्तशब्दाहून ङीप् होतो; ' उगितः अतः टाप् ' याचा संबंध आहे. पुढे 'पादोऽन्यतरस्याम् ': पाद् अंतीं असलेल्या शब्दाहून ङीप् होतो; उगितः अतः टाप् ' याचा संबंध आहे. तदनतर 'ऋचि' येवढेंच फक्त सूत्र करावे. ऋचा वाच्य असतांना पाद् अंतीं असलेल्या शब्दाहून टाप् होतो; या सूत्रात 'उगितः अतः ' या पदांची अनुवृत्ति करावयाची नाहीं. फक्त 'टाप्' पदाची अनुवृत्ति करावयाची. असें करण्यांत आणखी एक फायदा होतो. तो असा कीं 'टावृचि' या सूत्रामध्यें जो दुसऱ्यादा टाप् शब्द उच्चारला आहे तो उच्चारण्याचें कारण नाहीं. कारण मागून टाप् पदाची अनुवृत्ति येत आहे.

अशा रीतीनें इच्छिनार्थ साधतो खरा; पण वर लिहिलेलें 'विप्रतिषेधात्तु टापो बलीयस्त्वम्' हें जें वार्तिककारांनीं वार्तिक केलेलें आहे, तें जमत नाहीं.

तेंही जमतें.

कसें ?

' विप्रतिषेधे परं कार्यम् ' या ठिकाणच्या पर शब्दाचा इष्ट म्हणजे आपणास अनुकूल असा अर्थ घेऊन सूत्राचा अर्थ " दोन सूत्रांच्या कार्यांच्या विरोधाचे वेळीं आपणांस जें इष्ट असेल तें करावे" असा करावा.

(वा[२३] १०) धातूच्या शेवटीं असलेले जे यु व वु हे शब्द त्याना अन व अक आदेश होत नाहींत. कारण प्रस्तुत 'युवोरनाकौ' या सत्रांत अर्थ असलेल्या यु व वु ह्या शब्दाचें ग्रहण करावयाचे आहे.

---

हून ङीप् प्रत्यय होतो, व तें प्रातिपदिक अकारान्त असेल तर टाप् प्रत्यय होतो

२१. एकवाक्यता केली असतां अकार शेवटीं असलेलें जे उगिच्छब्दरूप त्याहून ङीप् व टाप् हे प्रत्यय होतात असा अर्थ होईल.

२२. ज्या पदांची संबन्धानुवृत्ति केली जाते त्यांचा फक्त त्या सूत्राशीं संबंध म्हणजे स्पर्श होतो. त्या पदांचा त्या सूत्राच्या मूळ वाक्यार्थामध्यें अन्वय होत नाही. उपयोग असेल त्या ठिकाणीं निराळा वाक्यार्थही होतो. ऋन्नेभ्यो ङीप्, वनो र च, या ठिकाणीं जरी अतः टाप् या पदांची संबंधानुवृत्ति असली तरी ती कुचकामाची समजावी. उगितश्च या सूत्रांत पूर्वी दाखविल्याप्रमाणें दोन वाक्यार्थ होतात.

२३. अनुनासिक स्वर ज्यामध्यें पर आहे असे जे यु व वु त्यांना अन व अक होतात, असा अर्थ केला असतां १ ङीप् होणें, २ नुम् होणें, आणि ३ धातूच्या

## नुम्विधौ झल्ग्रहणम् ॥ ११ ॥

नुम्विधौ झल्ग्रहणं कर्तव्यम् । झलन्तस्योगित इष्यते । उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोर्झल इति ॥ तच्चावश्यं कर्तव्यम्

## लिङ्गविशिष्टप्रतिषेधार्थम् ॥ १२ ॥

प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीति यथेह भवति गोमान् यवमानेवं गोमती यवमतीत्यत्रापि स्यात् ॥

## न वा विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणात् ॥ १३ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । विभक्तौ लिङ्गविशिष्टग्रहण नेत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ कः पुनरत्र विशेष एषा वा परिभाषा क्रियेत झल्ग्रहणं वेति । अवश्यमेषा परिभाषा कर्तव्या । बहून्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि । कानि ।

## प्रयोजनं शुनः स्वरे ॥ १४ ॥

---

आणि धातूंच्या शेवटीं असलेले 'दिवु' वगैरे ठिकाणचे जे यु व वु त्यांना अर्थ नसतो.

(वा. ११) तसेंच प्रस्तुत सूत्रात अनुनासिकपर यु व वु घेतले असता उगिन्निमित्तक नुमागम प्रवृत्त होईल, हा जो वर दोष दाखविण्यांत आला आहे तो घालविण्याकरिता ज्या सूत्रानें नुम् सांगितला आहे त्या सूत्रात झल् पद घालावें. कारण झल् शेवटीं असलेले जे उगिदन्त शब्द त्यांना नुमागम होतो असा अर्थ इष्ट आहे. नुमागम सांगणारें सूत्र ''उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोर्झलः'' ( ७।१।७० ) असें वाचावें. आणि असें करणें जरूरीचेंच आहे.

(वा. १२) आणि तसें केलें तरच लिंगप्रत्यय जोडलेल्या गोमती वगैरे उगित् अंगाला नुमागम होण्याचें टळेल. तें असें की ' प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवति ' म्हणजे प्रातिपदिकाचें ज्या सूत्रात ग्रहण केलें आहे त्या सूत्रांत लिंगप्रत्ययानें युक्त अशाही प्रातिपदिकाचें प्रातिपदिकपदानें ग्रहण होतें या परिभाषेमुळे स्त्रीलिंगांतही नुमागम होऊ लागेल. म्हणजे जसा 'गोमान्', 'यवमान्' या ठिकाणीं नुमागम होतो, तसाच गोमती, यवमती, या ठिकाणींही तो होऊं लागेल व तो झाला असतां रूपें बिघडतील. ही आपत्ति टाळण्याकरितां नुमागम सांगणाऱ्या सूत्रांत झल् पद घालणें अवश्य आहे अथवा

( वा. १३) झल् पद घालण्याची जरूर नाहीं. काय कारण ?

'विभक्तौ लिङ्गविशिष्टग्रहणं न' म्हणजे 'विभक्तिनिमित्तक कार्य कर्तव्य असताना लिङ्गविशिष्टपरिभाषेची प्रवृत्ति होत नाहीं ' अशी लिङ्गविशिष्टपरिभाषेची अपवादक परिभाषा करावयास लागतेच, व तिनें प्रस्तुत अडचण दूर होते.

ही अपवादक परिभाषा तरी घ्यावी लागते किंवा ती न घेतल्यास नुम् सांगणाऱ्या सूत्रांत झल् पद तरी घालावें लागतें. या दोहोंपैकीं कोणता तरी मार्ग स्वीकारावाच लागतो. मग परिभाषा घेतली काय किंवा झल् पद घातलें काय, दोन्ही सारखींच. दोहोंत फरक काय ?

फरक आहे तर: गोमती, यवमती, वगैरे प्रस्तुत उदाहरणें सोडून द्या; इतर उदाहरणांकरितां ही परिभाषा अवश्य स्वीकारावी लागतेच. कारण तिच्या उपयोगाचीं अनेक उदाहरणें आहेत. तीं कोणतीं कोणतीं ?

(वा. १४) उपयोग पहिला:-श्वन् शब्दाला स्वर करतेवेळीं. ज्याप्रमाणे 'शुना', 'शुने', वगैरे ठिकाणीं स्वर होतो त्याचप्रमाणें शुन्या व शुन्यै या ठिकाणींहि तोच स्वर लिङ्गविशिष्टपरिभाषेने होईल[२४].

---

शेवटीं असलेले जे यु व वु त्यांना अन व अक होणे, हे तीन दोष येतात असें वर सांगितलें आहे. या तीन दोषांपैकीं पहिल्या दोषाचा परिहार आतांपर्यंत केला; तिसऱ्या दोषाचा परिहार या वार्तिकानें भाष्यकार करीत आहेत, व नंतर दुसऱ्या दोषाचा परिहार पुढील वार्तिकांत हातांत घेतील.

२४. 'विकाचस्तृतीयादिर्विभक्तिः ( ६।१।१६८ ) या सूत्रानें आलेल्या विभक्तीच्या उदात्तस्वराचा

यथेह भवति शुना शुन एवं शुन्या शुन्या इत्यत्रापि स्यात् ॥

यूनः संप्रसारणे ॥ १५ ॥

यूनः संप्रसारणे प्रयोजनम्। यथेह भवति यूनः पश्येत्येवं युवतीः पश्येत्यत्रापि स्यात् ॥

उगिदचां नुम्विधौ ॥ १६ ॥

उगिदचां नुम्विधौ प्रयोजनम्। यथेह भवति गोमान् यवमानेवं गोमती यवमतीत्यत्रापि स्यात् ॥

अनडुहश्चाम्विधौ ॥ १७ ॥

अनडुहश्चाम्विधौ प्रयोजनम्। यथेह भवति अनड्वानित्येवमनडुहीत्यत्रापि स्यात्। न वा भवत्यनड्वाहीति। भवत्यन्येन यत्नेन। आमनडुहः स्त्रियां वेति। लिङ्गविशिष्टग्रहणादीकारान्तस्य प्राप्नोति ॥

पथिमथोरात्त्वे ॥ १८ ॥

पथिमथोरात्त्वे प्रयोजनम्। यथेह भवति पन्थाः मन्था एवं पथी मथीत्यत्रापि प्राप्नोति। न केवलः पथिशब्दः स्त्रियां वर्तते। उपसमस्तस्तर्हि वर्तते। सुपथीति ॥

पुंसोऽसुङ्विधौ ॥ १९ ॥

पुंसोऽसुङ्विधौ प्रयोजनम्। यथेह भवति पुमानेवं पुंसीत्यत्रापि स्यात्। न केवलः

---

तो न होण्याकरिता ही अपवादक परिभाषा स्वीकारावी लागतेच.

(वा. १५) तसेंच दुसरा उपयोग युवन् शब्दाच्या सप्रसारणाविषयीं आहे. ही अपवादक परिभाषा न घेतल्यास ज्याप्रमाणें ' यूनः पश्य ' येथें संप्रसारण ( ६।४।१३३ ) होतें त्याप्रमाणें युवतीः पश्य येथेही होऊं लागेल.

(वा. १६) तसेच तिसरा उपयोगः— उगित् शब्द व अञ्च् धातु याना नुमागम करतेवेळीं. ज्याप्रमाणें गोमान्, यवमान्, या ठिकाणीं नुमागम (७।१।७०) होतो त्याप्रमाणें गोमती, यवमती, याही ठिकाणीं ही अपवादक परिभाषा न घेतल्यास नुमागम होऊं लागेल.

(वा. १७) तसेंच अनडुह् शब्दाला आम् आगम करण्याविषयीं हिचा उपयोग आहे. ही परिभाषा न घेतल्यास ज्याप्रमाणें 'अनड्वान्' येथें आम् आगम ( ७।१।९८ ) होतो त्याचप्रमाणें अनडुही येथेंही आम् आगम होऊं लागेल.

तर मग अनड्वाही असें रूप होत नाहीं कां?

होतें. परंतु त्याकरितां स्वतंत्र निराळा यत्न केला आहे, व स्त्रीलिंगविवक्षा असतांना अनडुह् शब्दाला विकल्पानें आम् होतो असें निराळें वचन केलें आहे. लिङ्गविशिष्टपरिभाषेचा स्वीकार केला असतां व ही अपवादक परिभाषा घेतली नसतां ईकारान्तशब्दस्वरूप जे अनडुही त्याला आम् होईल[२५].

(वा. १८) तसेंच पथिन् शब्द व मथिन् शब्द यांना आत्व करतेवेळीं प्रस्तुत अपवादक परिभाषेचा उपयोग आहे. अपवादक परिभाषा न घेतल्यास ज्याप्रमाणें पन्थाः, मन्थाः, येथें आत्व होतें त्याप्रप्राणें पथी, मथी, या ठिकाणींही आत्व ( ७।१।८५ ) होऊं लागेल.

पण केवळ पथी, मथी, हे स्त्रीलिंगी शब्द भाषेत नाहींतच.

नसले तरी समासांत 'सुपथी,' 'सुमथी' हे शब्द भाषेंत आहेत ते उदाहरण म्हणून देतां येतील.

(वा. १९) त्याचप्रमाणें पुंस् शब्दाला असुङ् आदेश करतेवेळींही अपवादक परिभाषेचा उपयोग आहे. ज्याप्रमाणें पुमान् या उदाहरणांत असुङ् आदेश (७।१।८९) झाला आहे त्याप्रमाणें पुंसी वगैरे ठिकाणींहि ही अपवादक परिभाषा नसल्यास असुङ् आदेश होऊं लागेल.

पण नुसता पुंस् शब्द स्त्रीलिंगी नाहीं.

---

न गोश्वन् साववर्ण० (६।१।१८२) या सूत्रानें शुना येथें जसा निषेध होतो तसा शुन्या येथेंही उदात्तयणो० ( ६।१।१७४ ) या सूत्रानें आलेल्या विभक्तीच्या उदात्त स्वराचा निषेध होऊं लागेल.

२५. आणि अनडुही + आ = अनुडुह्या असें भलतेंच रूप होईल.

पुंशब्दः स्त्रियां वर्तते । उपसमस्तस्तर्हि वर्तते । सुपुंसीति ॥

**सख्युर्णित्त्वानङौ ॥ २० ॥**

सख्युर्णित्त्वानङौ प्रयोजनम् । यथेह भवति सखा सखायौ सखाय एवं सखी सख्यौ सख्य इत्यत्रापि प्राप्नोति ॥

**भवद्भगवदघवतामोद्भावे ॥ २१ ॥**

भवद्भगवदघवतामोद्भावे प्रयोजनम् । यथेह भवति भोः भगोः अघोः इत्येवं भवति भगवति अघवतीत्यत्रापि स्यात् ॥

एतान्यस्याः परिभाषायाः प्रयोजनानि यदर्थमेषा परिभाषा कर्तव्या । एतस्यां च सत्यां नार्थो झल्ग्रहणेन ॥

तदेतदनन्यार्थं झल्ग्रहणं कर्तव्यं नुम्प्रतिषेधो वा वक्तव्यः ॥ उभयं न वक्तव्यम् । उपरिष्टाज्झल्ग्रहणं क्रियते तत्पुरस्तादपकृष्यते। एवमपि सूत्रविपर्यासः कृतो भवति ॥ एवं तर्हि योगविभागः करिष्यते । उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः [ ७ १. ७० ] । युजेरसमासे [ ७१ ] । ततो नपुंसकस्य । नपुंसकस्य नुम्भवति । झल इत्युभयोः शेषः । ततोऽचः । अजन्तस्य च नपुंसकलिङ्गस्य नुम्भवति ॥

यद्यपि तावदेतदुगित्कार्यं परिहृतमिदमपरं प्राप्नोति । शातनितरा पातनितरा ।

---

नसला तरी समासाचें शेवटीं, उदा० सपुंसी वगैरे ठिकाणीं, स्त्रीलिंगी पुंस् शब्द सापडतो.

(वा. २० ) त्याचप्रमाणें सखिशब्दासंबधानें णित्व ( ७।१।९२ ) व अनङ् ( ७।१।९३ ) आदेश होण्याचे बाबतींतही ह्या परिभाषेचा उपयोग आहे. सखायौ, सखायः, या ठिकाणीं जसे णित्त्व व अनङ् आदेश होतात त्याचप्रमाणें ही परिभाषा नसल्यास सखी सख्यौ सख्यः या ठिकाणींही होऊं लागतील.

(वा. २१)तसेंच भवत्, भगवत्, अघवत् या शब्दांना ओकार होण्याचे बाबतींतही ही परिभाषा उपयोगाची आहे. भोः, भगोः, अघोः, या ठिकाणीं जसें ओत्व ( ८।३।१ वा. २ ) झालें आहे त्याचप्रमाणें ही परिभाषा नसली तर भवति, भगवति, अघवति, या ठिकाणींही ओत्व होऊं लागेल.

हे वर दिलेले या परिभाषेचे उपयोग आहेत व यांकरितां ही परिभाषा अवश्य करावी लागते. अशा रीतीनें ही परिभाषा स्वीकारली असता नुम् सांगणाऱ्या सूत्रांत 'झल्' शब्द घालण्याची जरूर नाहीं.

तेव्हां एकंदरींत दुसऱ्या उदाहरणांकरितां जरी नाहीं तरी फक्त या नन्दना, कारिका, वगैरे उदाहरणांकरितां 'उगिदचाम्०' येथें झल् शब्द घालावा लागेल, किंवा नुमागमाचा निषेध तरी बोलावा लागेल.

दोन्हींचीही जरूर नाही. पुढें ( ७।१।७२ ) झल् शब्द सूत्रांत घातला आहे तोच मागें उगिदचाम्० या नुम्विधायक सूत्रांत घातला म्हणजे झालें !

पण असें केलें असता सूत्रांची फिरवाफिरव केली असें होते.

तर मग योगविभाग केला जाईल व सूत्रें खालीं लिहिल्याप्रमाणे समजण्यात येतील:- उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः, युजेरसमासे, नंतर नपुंसकस्यः नपुंसकलिंगी शब्दाला सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतां नुमागम होतो. नंतर 'झलः'. 'उगिदचां' आणि 'नपुंसकस्य' या दोन्हींही सूत्रांत[२५] झल् शब्द हा परिपूरणार्थ घ्यावयाचा. नंतर 'अचः': अजन्त नपुंसकाला नुमागम होतो.

जरी या उगित्संबंधीं कार्याची विल्हेवाट लागली तरी 'शातनितरा', 'पातनितरा', वगैरे ठिकाणीं दुसरें उगित्कार्य उपस्थित होतें. शातनितरा, पातनितरा, या ठिकाणीं यु म्ह० अन उगित् सम-

---

२५. युजेरसमासे या सूत्रांत झल्ग्रहणाचा संबंध करण्यांत कांहींच उपयोग नाहीं. म्हणून तें मधलें सूत्र वगळून त्याच्या मागचें व पुढचें अशीं दोन सूत्रें येथें घेतलीं आहेत.

उगितो नद्या घादिषु ह्रस्वो भवतीत्यन्यतरस्यां ह्रस्वत्वं प्रसज्येत नित्यं चेष्यते । उगितो या नद्येवमेतद्विज्ञायते । उगित एषा नदी । उगितो या परा । अत्र चैव दोषो भवत्युगितो ह्येषा परा नद्यैषुमतितरायां च प्राप्नोति । उगितः परा या विहिता । उगित एषा विहिता । उगित इत्येवं या विहिता । एवमपि भोगवतितरायां दोषो भवति । भोगवतितरा भोगवतीतरा । तस्मादुगितो या नद्युगितो या विहितेत्येवमेतद्विज्ञास्यते । एवं विज्ञायमाने शातनितरायां दोष एव ॥

सिद्धं तु युवोरनुनासिकत्वात् ॥२२॥

सिद्धमेतत् । कथम् । यकारवकारयोरेवेदमनुनासिकयोर्ग्रहणम् । सन्ति हि यणः सानुनासिका निरनुनासिकाश्च ॥

**आयनेयीनीयियः फढखछघां प्रत्ययादीनाम् ॥७।१।२ ॥**

**आयनादिषूपदेशिवद्वचनं स्वरसिद्ध्यर्थम् ॥ १ ॥**

---

जला असतां 'उगित् शब्दाच्या पुढील जी नदी, म्हणज ईकार[२६] तिला घ वगैरे प्रत्यय पुढें असतां विकल्पानें ऱ्हस्व होतो' (६।३।४५) असा सागितलेला ऱ्हस्व विकल्पानें होऊ लागेल; व खरें पाहिलें असतां ऱ्हस्व नित्य व्हावयास पाहिजे.

पण उगित् शब्दासंबंधी जी नदी असा अर्थ आहे ना ?

मग हरकत काय; उगित् शब्दाहून पर जी आहे ती उगित्शब्दासंबंधी आहेच. तेव्हां शातनितरा या प्रस्तुत उदाहरणांत तर दोष आहेच. कारण ई ही नदी उगित् शब्दाहून पर आहे. पण एवढेंच नव्हे तर 'ऐषुमतितरा'[२७] वगैरे ठिकाणींही दोष उपस्थित होईल. कारण तेथें उगिताहून पर म्ह० उगिताच्या पुढें नदी आहे.

उगित् शब्दाहून विहित जी नदी ती 'उगित् शब्दाहून पर' असें समजावें. आणि उगित् असा शब्द उच्चारून जी सांगितली आहे ती 'उगित् शब्दाहून विहित' असें समजावें.

तस केलें तरी भोगवतितरा[२८] या उदाहरणांत दोष येईलच, व भोगवतितरा, भोगवतीतरा, अशीं दोन रूपें होणार नाहींत. मग एकदरींत काय झालें ? उगित् शब्दाहून केलेली जी नदी ती 'उगित् शब्दासंबंधी नदी' असें समजलें पाहिजे. आणि असें समजल्यास 'शातनितरा' या उदाहरणांत दोष राहीलच.

(वा[२९]. २२) वरील सर्व गोष्टींचा विचार केला असतां असं निष्पन्न होतें की यु व वु यांतील यकार आणि वकार हे अनुनासिक समजण्यानें सर्व इष्ट कार्य सिद्ध होतें. अर्थात् उ अनुनासिक न समजता यकार व वकार हे येथें अनुनासिक घ्यावयाचे; आणि तसें घेतां येण्यास कांहीं हरकत नाहीं; कारण य व र आणि ल हे सानुनासिकही आहेत व निरनुनासिकही आहेत.

---

२६. 'आच्छीनद्योर्नुम्' ( ७।१।८० ) या सूत्रांतील 'नदी' या पदावरून 'नदी शब्दानें स्त्रीलिंगद्योतक केवळ प्रत्ययरूप ई व ऊ हे सुद्धां घेतले जातात' असें ज्ञापित होतें.

२७ इषुमतः इयम् ऐषुमती. इषुमत् शब्दाहून तस्येदम् ( ४।३।१२० ) यानें अण् प्रत्यय करून त्याच्या पुढें टिड्ढाणञ्० ( ४।१।१५) या सूत्रानें ऐषुमत या अण्प्रत्ययान्ताहून ङीप् प्रत्यय झालेला आहे. अण् प्रत्ययाच्या अकाराचा यस्येति च ( ६।४।१४८ ) या सूत्रानें लोप झाल्यामुळें 'ऐषुमत्' या उगित् शब्दाहून पर ई ही नदी आहे, म्हणून येथें ऱ्हस्वाचा विकल्प होऊं लागेल.

२८. भोगवत् हा शब्द उगित् आहे. परंतु त्याहून जो स्त्रीप्रत्यय ई हा झाला आहे, तो उगित् या दृष्टीनें झालेला नाहीं. शार्ङ्गरवादिगणामध्यें भोगवत् शब्दाचा पाठ असल्यामुळें शार्ङ्गरवाद्य० ( ४।१।६८ ) या सूत्रानें ङीन् प्रत्यय झालेला आहे. तेव्हां हा ईप्रत्यय उगित् शब्दाहून केलेला आहे. उगित् शब्द उच्चारून उगितश्च ( ४।१।६ ) या सूत्राने सांगितलेला जो ङीप् प्रत्यय तो हा नव्हे.

२९. 'हें वचन भाष्यकारांचें आहे' असें कैयटानें लिहिलें आहे, म्ह० वार्तिककारांचें नव्हे.

१. ( सू २ ) प्रत्ययाचे आरंभींच्या फ, ढ, ख, छ, व घ या वर्णांना क्रमानें आयन्, एय्, ईन्, ईय्, व इय् असे आदेश होतात; उदा. नाडायनः, वगैरे.

आयनादिषूपदेशिवद्भावो वक्तव्यः। उपदेशावस्थायामायनादयो भवन्तीति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। स्वरसिद्ध्यर्थम्। उपदेशावस्थायामायनादिष्विष्टः स्वरो यथा स्यादिति। शिलेयम् तैत्तिरीयः। अक्रियमाणे ह्युपदेशिवद्भावे प्रत्ययसंज्ञासंनियोगेनाद्युदात्तत्वे कृत आन्तर्यत आदेशा अस्वरकाणामस्वरकाः स्युः॥

न वा क्वचिच्चित्करणादुपदेशिवद्वचनानर्थक्यम्॥ २॥

न वा वक्तव्यम्। किं कारणम्। क्वचिच्चित्करणात्। यदयं क्वचिड्ढादींश्चितः करोत्यग्राद्यद्घच्छौ च [ ४. ४. ११६; ११७ ] तज्ज्ञापयत्याचार्य उपदेशावस्थायामायनादयो भवन्तीति। कथं कृत्वा ज्ञापकम्। चित्करण एतत्प्रयोजनं चितः [ ६. १. १६३ ] इत्यन्तोदात्तत्वं यथा स्यादिति। यदि चोपदेशावस्थायामायनादयो भवन्ति ततश्चित्करणमर्थवद्भवति॥

तत्रोणादिप्रतिषेधः॥ ३॥

---

(सू. २ वा. १ ) प्रस्तुत सूत्रांतील आयन् प्रत्ययांविषयीं उपदेशिवद्भाव बोलावा म्हणजे इष्ट तो स्वर त्या आयन् वगैरेंना मिळेल. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे आयन् वगैरे आदेश फ, ढ, ख, वगैरे वर्णांना त्यांच्या उपदेशाचे वेळींच[२] करावे.

असें करण्यांत उद्देश काय ?

उद्देश एवढाच कीं असें करण्यानें आयन् वगैरे आदेशांचे ठिकाणीं आपणांस जो स्वर इष्ट आहे तोच मिळेल; उदा०-शिलेयम्[३], तैत्तिरीयः, या ठिकाणीं जर प्रस्तुत सूत्रात उपदेशिवद्भाव घेतला नाहीं तर ढ व छ या प्रत्ययांचे बरोबरच आद्युदात्तत्व होईल. म्हणजे ढ व छ हे प्रत्यय शिला व तित्तिरि याना जोडतेवेळींच ते आद्युदात्त होतील व नंतर त्यांतील ढकार व छकार या व्यंजनांना जे आयन्, एय्, असें आदेश होतील ते त्यांच्याच सारखे होतील. म्हणजे फ, ढ, हीं व्यंजनें स्वररहित असल्यामुळें आयन् व एय हे आदेश स्वररहितच होतील.

(वा. २ ) अथवा उपदेशिवद्भाव सांगण्याचें कांहीं कारण नाहीं.

काय म्हणून ?

कांहीं ठिकाणीं चित्करण केलें आहे म्हणून. फ, ढ, वगैरे प्रत्ययांना कांहीं ठिकाणीं आचार्य पाणिनि हे चकार इत्संज्ञक जोडतात; उदा० अग्राद्यत्, घच्छौ च ( ४।४।११६।११७ ). त्यावरून ते स्पष्ट सुचवितात की उपदेशाचे वेळींच फ,ढ, वगैरे प्रत्ययांना आयन् वगैरे आदेश होतात.

हें ज्ञापक कसे जमतें ?

चकार इत्संज्ञक जोडण्याचें हें प्रयोजन आहे कीं चितः ( ६।१।१६३ ) या सूत्रानें ज्याचा चकार इत् आहे अशा प्रत्ययाचा अंत्य स्वर उदात्त व्हावा. जर उपदेशाचे वेळीं आयन्, एय, वगैरे आदेश झाले तरच चकार इत् करण्याचा उपयोग होतो, एरव्हीं होत नाहीं.

(वा. ३) हे आयन्, एय, वगैरे आदेश करण्यासंबंधीं उणादि प्रत्ययाचे जे आरंभी असलेले फ

---

२. फ, ढ, ख, वगैरे प्रत्यय करतांनाच.

३. शिला शब्दाहून 'इव' या अर्थी 'शिलाया ढः' (५।३।१०२ ) या सूत्रानें ढ प्रत्यय केला असता शैलेयम् रूप साधतें. तित्तिरि शब्दाहून 'तित्तिरिवरतन्तुखण्डिकोखाच्छण्' ( ४।३।१०२ ) या सूत्रानें 'प्रोक्तम्' या अर्थी छण् प्रत्यय केला असतां तैत्तिरीय रूप साधतें. उपदेशिवद्भाव घेतला नाहीं तर ढ व छ प्रत्यय करतांनाच त्यांना एय् व ईय् हे आदेश होणार नाहींत. आणि त्याच वेळीं आद्युदात्तश्च या सूत्रानें प्रत्ययांना सांगितलेला आद्युदात्त स्वर होईल.

४. कारण घच् जोडला की लगेच 'चितः' यानें अकार उदात्त होईल, परंतु त्याचा कांहीं उपयोग नाहीं. कारण 'आद्युदात्तश्च' ( ३।१।३ ) या सूत्रानें तो उदात्त सिद्धच आहे. आणि उपदेशाचे वेळीं हे आदेश झाले म्हणजे मात्र अग्रशब्दाला प्रत्यय जोडतांना तो 'इय्' असाच जोडला जातो, त्यामध्यें आद्युदात्तश्च ( ३।१।३ ) यानें इ हा आद्युदात्त होईल; तो न व्हावा आणि शेवटचा अकार 'चितः' (६।१।१६३) या

तत्रोणादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । शङ्खः शण्ढ इति ॥

**धातोर्वेङ्कुवचनात् ॥ ४ ॥**

अथवा यदयमृतेरीयङ् [ ३. १. २९ ] इति धातोरीयङं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न धातुप्रत्ययानामायनादयो भवन्तीति । यदि हि स्युर्ऋतेश्छङित्येव ब्रूयात् ॥ सिद्धे विधिरारभ्यमाणो ज्ञापकार्थो भवति न चर्तेश्छङा सिध्यति । छङि सति वलादिलक्षण इट् प्रसज्येत । इटि कृतेऽनादित्वादादेशो न स्यात् ॥ इदमिह संप्रधार्यम् । इट् क्रियतामादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादिडागमः । नित्य आदेशः । कृतेऽपीटि प्राप्नोत्यकृतेऽपि । अनित्य आदेशो न हि कृत इटि प्राप्नोति । किं कारणम् । अनादित्वात् । अन्तरङ्गस्तर्ह्यादेशः । कान्तरङ्गता । इदानीमेव ह्युक्तमायनादिषूपदेशिवद्वचनं स्वरसिद्ध्यर्थमिति । तदेतदृतेरीयङ्वचनं ज्ञापकमेव न धातुप्रत्ययानामायनादयो भवन्तीति ॥

---

ढ, वगैरे त्यांचेविषयीं निषेध बोलावा; उदा० शङ्खः, शण्ढः, वगैरे ठिकाणीं.

( वा. ४ ) अथवा निषेध बोलण्याचें कांहीं कारण नाहीं. ज्या अर्थी 'ऋतेरीयङ्' (३।१।२९) या सूत्रानें ऋति या सौत्र धातूहून आचार्य पाणिनी ईयङ्प्रत्यय सांगतात त्या अर्थी ते सुचवितात कीं धातूहून पुढें केलेल्या प्रत्ययांमधील फ, ढ, वगैरे वर्णांना आयन्, एय्, वगैरे आदेश होत नाहींत. जर होत असते तर 'ऋतेश्छङ्' असेंच थोडक्यांत सूत्र ते बोलले असते.

कांहीं एखादी गोष्ट सहजच सिद्ध होत असतांना देखील जर तिजविषयीं विधि सांगण्यांत आला तर तो विधि कांहींतरी विशिष्ट हेतु सुचविण्याकरिता समजला जातो. प्रस्तुत 'ऋतीयते' या उदाहरणांत 'छङ्' असा लहानसा प्रत्यय सांगून काम भागत नाहीं; कारण छङ् प्रत्यय केला तर तो वलादि असल्यामुळें त्याला इडागम( ७।२।३५ ) होऊं लागेल, व इडागम झाल्यावर इछ प्रत्यय झाल्यामुळें छ हा प्रत्ययाचे आरंभीं नसल्याकारणानें छ याला ईय् आदेश होणार नाहीं.

छ ला ईय आदेश होईल; कारण या ठिकाणीं पुढील प्रमाणें विचार करावाः— छङ् प्रत्ययाला आधीं इडागम करावा कां ईयादेश करावा ? आधीं काय करावें ?

इडागम सांगणारें सूत्र पर असल्यामुळें अर्थात् परत्वास्तव इडागम अगोदर करावा.

पण ईय् हा आदेश नित्य आहे, कारण इडागम केला असतानाही ईयादेश होऊं शकतो, तसेंच इडागम केला नसतांनाही तो होऊं शकतो.

ईयादेश अनित्य आहे, कारण इडागम केला असतांना तो होऊ शकत नाहीं.

काय म्हणून होऊ शकत नाहीं ?

कारण छकार हा प्रत्ययाचे आरंभीं नाहीं म्हणून.

बरें, असें असेल तर आम्ही म्हणूं कीं ईयादेश अतरंग आहे.

कशा तऱ्हेनें अंतरगत्व सांगतां ?

आताच नाहीं कां वर सांगितलें कीं आयन् वगैरे आदेशांविषयीं इष्ट स्वर व्हावा याकरितां उपदेशिवद्भाव सांगावा म्हणून ? तेव्हां उपदेशिवद्भाव असल्यामुळें ईयादेश अंतरंग होतो व तो अंतरग झाल्यामुळें छङ् प्रत्यय जरी केला तरी त्या छङ् प्रत्ययाला इडागम लागण्याचे अगोदरच ईय् आदेश होतो व काम भागतें. एकंदरींत ऋतिधातूला ईयङ् प्रत्यय सांगण्यानें सुचविलें जातें कीं धातूहून केलेल्या फ, ढ, वगैरे प्रत्ययांचे आरंभीचे जे वर्ण त्यांना आयन् वगैरे आदेश होत नाहींत.

---

सूत्रानें उदात्त झाला पाहिजे. असा चकार इत् करण्याचा उपयोग होतो.

५. हे ख प्रत्यय ( उणा. १।१०२ ) व ढ प्रत्यय ( उणा. १।९९ ) उणादिक आहेत.

**प्रातिपदिकविज्ञानाच्च पाणिनेः सिद्धम् ॥ ५ ॥**

प्रातिपदिकविज्ञानाच्च भगवतः पाणिनेराचार्यस्य सिद्धम् । उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि ॥

**झोऽन्तः ॥ ७ । १ । ३ ॥**

**झादेशे धात्वन्तप्रतिषेधः ॥ १ ॥**

झादेशे धात्वन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । उज्झिता उज्झितुमिति ॥ प्रत्ययाधिकारात्सिद्धम् । प्रत्ययग्रहणं प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । आयनेयीनीयियः फढखछघां प्रत्ययादीनाम् [ ७. १. २. ] इति ॥

**प्रत्ययाधिकारात्सिद्धमिति चेदनादेरादेशवचनम् ॥ २ ॥**

प्रत्ययाधिकारात्सिद्धमिति चेदनादेरादेशो वक्तव्यः । अपि नः श्वो विजनिष्यमाणाः पतिभिः सह शयान्तै ॥ एवं तर्हि प्रत्ययग्रहणमनुवर्तते आदिग्रहण निवृत्तम् । कथं पुनः समासनिर्दिष्टानामेकदेशोऽनुवर्तेत एकदेशो वा निवर्तते ।

**असमासनिर्देशात्सिद्धम् । ३ ॥**

असमासनिर्देशः करिष्यते । प्रत्ययस्यादीनामिति ॥ स तर्ह्यसमासनिर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । क्रियते न्यास एव । कथम् ।

---

(वा. ५) अथवा उणादि फ, ढ, वगैरे प्रत्ययांना आयन्, एय्, वगैरे आदेश न व्हावे ही इष्ट गोष्ट आचार्य भगवान् पाणिनीनें प्रातिपदिक व त्याचें स्वरूप या विषयींचें मत लक्षांत घेतलें असतां आपोआपच कळून येतें. त्यांचे मतानें उण् वगैरे प्रत्यय शेवटीं असलेलीं जीं प्रातिपदिकें आहेत त्यांची व्युत्पत्तिच करावयाची नाहीं.

(सू. ३ वा. १) झकाराला जो अन्त् आदेश सांगितला आहे त्याचा धातूचे शेवटीं असलेल्या झकाराविषयीं प्रतिषेध सांगितला पाहिजे; उदा० उज्झिता, उज्झितुम् ,वगैरे ठिकाणीं.

प्रतिषेध सांगण्यास नको. कारण 'प्रत्यय' हे पद हें प्रस्तुत आहे व त्याची ह्या सूत्रांत अनुवृत्ति आहे.

प्रत्यय पद कोठें प्रस्तुत आहे ?

'आयनेयीनीयियः फढखछघां प्रत्ययादीनाम्' या सूत्रामध्यें.

(वा. २) 'आयनेयीनी०' या सूत्रांतील प्रत्यय पदाच्या अनुवृत्तीनें भागेल असें म्हटलें तर प्रत्ययाच्या आरंभीं नसलेल्या झकाराला अन्त् आदेश सांगावा लागेल; उदा० 'अपि नः श्वो विजनिष्यमाणाः पतिभिः सह शयान्तै' या मन्त्रातील शयान्तै हें रूप साधण्याकरितां.

असें होईल तर नुसत्या प्रत्यय पदाची अनुवृत्ति करतां येईल, आदि पदाची अनुवृत्ति करण्याचें कारण नाहीं.

पण प्रत्ययादीनाम् या समस्त पदांतील एका भागाची पुढील सूत्रांत अनुवृत्ति होते व एका भागाची निवृत्ति होते, असें कसें होईल ?

(वा. ३) समासाशिवाय प्रत्यय व आदि हीं पदें उच्चारलीं म्हणजे भागेल. समास केल्याशिवाय 'प्रत्ययस्य' 'आदीनाम्' अशीं पदें करतां येतील.

तर मग समास केल्याशिवाय तीं दोन निराळीं पदें सूत्रांत घालावीं लागतील.

तशीं निराळीं घालावयास नको कारण

---

१. (सू. ३) प्रत्ययाचे आरंभीं असणाऱ्या झकाराला अन्त् हा आदेश होतो; उदा० भवन्ति.

२. प्रत्ययादीनाम् हें सामासिक पद असल्यामुळें त्यांतील प्रत्यय ह्या एकच भागाची अनुवृत्ति होणार नाहीं. प्रत्ययादीनाम् एवढ्या सामासिक पदाचीच अनुवृत्ति होईल. व तसें झालें असतां शयान्तै येथें झकार आरंभीं नसल्यामुळें त्याला अन्त् हा आदेश होणार नाहीं, असा शंकाकाराचा अभिप्राय आहे. शयान्तै हे लेट्च्या प्रथमपुरुषी बहुवचनाचें रूप आहे. शी धातूहून लेट् ( ३।४।८ ), लेटाला झ आदेश व त्याला आडागम ( ३।४।९४ ) केला असतां आझ असा प्रत्यय झाल्यामुळें झकार प्रत्ययाच्या आरंभीं नाहीं.

अविभक्तिको निर्देशः । प्रत्यय आदीनामिति ॥

**तत्र शयान्ता इत्यनकारान्तत्वादङ्गस्याद्भावप्रतिषेधः ॥ ४ ॥**

तत्रैतस्मिन्प्रत्ययग्रहणेऽनुवर्तमान आदिग्रहणे निवृत्ते शयान्ता इत्यनकारान्तत्वादङ्गस्याद्भावः प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्यः ॥

**सिद्धमनानन्तर्यादनकारान्तेनाद्भावनिवृत्तिः ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अनानन्तर्यादनकारान्तेनाद्भावो न भविष्यति ॥

कथं कृत्वा चोदितं कथं कृत्वा परिहारः । अनकारान्तग्रहणं प्रत्ययविशेषणमिति कृत्वा चोदितं झकारविशेषणमिति कृत्वा परिहारः । यद्यनकारान्तग्रहणं झकारविशेषणं शेरते अत्र न प्राप्नोति ।

**तत्र रुटि संनियोगवचनात्सिद्धम् ॥६॥**

तत्र रुटि संनियोगः करिष्यते । क एष

---

तर्शी ती घातलींच आहेत.

तें कसें ?

'प्रत्यय आदीनाम्' अशी विभक्ति न जोडतां समासाशिवाय तथें तीं पदें आहेत असें समजावें.

(वा. ४) पण अशा[3] रीतीनें फक्त 'प्रत्यय' शब्दाची अनुवृत्ति केली असता व आदि-शब्दाची अनुवृत्ति केली नसतां शयान्तै या ठिकाणीं अकारान्त अङ्ग नसल्यामुळें 'आत्मनेपदेष्वनतः' ( ७।१।५ ) या सूत्रानें झकाराला अत् हा आदेश होऊं लागेल व त्याचा प्रतिषेध करावा लागेल.

( वा. ५ ) प्रतिषेध सांगण्यास नको. प्रतिषेध सांगितल्याशिवाय काम भागेल.

तें कसें ?

अकारान्त नसलेलें अङ्ग हें जवळ नसल्यामुळें अकारान्त नसलेल्या अंगाचे निमित्तानें होणारा जो अदादेश तो होणार नाहीं.

ही शंका कशा रीतीनें आणली व तिचें निराकरण कसें केलें ?

'अकार शेवटीं नसलेलें अंग' हे शब्द प्रत्ययाला विशेषण घेऊन शंका पुढें मांडली आणि तेच शब्द झकाराला विशेषण घेऊन शंकेचें निराकरण केलें.

पण 'अकार शेवटीं नसलेलें अंग' हे शब्द झकाराला विशेषण म्हणून घेतले म्हणजे 'शेरते' या ठिकाणीं अत् हा आदेश होणार नाहीं.

( वा. ६ ) तर मग रुट् सांगणाऱ्या 'शीङो रुट्' या सूत्रांत संनियोगानें विधान करूं, म्हणजे झकाराला अदादेश व रुडागम बरोबर होतात अशी व्यवस्था करूं.

हें संनियोगानें विधान करणें म्हणजे कोणत्या प्रकारचा प्रयत्न करणें होतें ?

---

३. शयान्तै येथें झकार हा प्रत्ययाचा आदि नाहीं म्हणून अदादेश होत नसतो. पण आदिग्रहणाची निवृत्ति केली तर आझ या प्रत्ययाच्या मागें शी हें अकार शेवटीं नसलेलें अंग आहे, म्हणून आत्मनेपदेष्वनतः ( ७।१।५ ) या सूत्रानें झकाराला अत् आदेश होऊं लागेल, अन्त् होणार नाहीं.

४. 'आत्मनेपदेष्वनतः' या सूत्राचे दोन वाक्यार्थ करतां येतातः (१) अनकारान्त ( अकारान्ताहून भिन्न ) अंगाहून पुढें असणारा जो प्रत्यय त्या प्रत्ययाच्या ( आझ प्रत्ययाच्या ) झकाराला अत् होतो; ( २ ) अनकारान्त अंगाहून पुढें असणारा जो प्रत्ययाचा झकार त्याला अत् होतो; पहिल्या वाक्यार्थपक्षीं शंका येते, व दुसऱ्या वाक्यार्थपक्षीं शंकेचें निराकरण होतें, असें म्हटलें आहे.

५. वर दिलेला दुसरा वाक्यार्थ घेतला म्हणजे, हा वाक्यार्थ घेतला म्हणजे 'शयान्तै' हें रूप साधतें, पण 'शेरते' रूप बिघडतें. कारण 'शेरते' येथें 'शी–झ' अशी स्थिति असतां 'शीङो रुट्' या सूत्रानें शीङ् धातूलाच, विशेषतः त्याच्या पुढील प्रत्ययाला, रुट् आगम सांगितला असल्यामुळें झ प्रत्ययाला प्रथम रुट् होतो व रुट् झाला असतां शी धातु व झकार यांमध्यें व्यवधान येतें.

६. आणि ते बरोबर झाल्यानें रुडागमाचें व्यवधान होण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं.

सन्नश्चोद्यते संनियोगो नाम। चकारः कर्तव्यः। रुट्च। किं च। यच्चान्यत्प्राप्नोति। किं चान्यत्प्राप्नोति। अद्भावः॥ स तर्हि चकारः कर्तव्यः। न कर्तव्यः। योगविभागः करिष्यते। शीङः। शीङ उत्तरस्य झस्याद्भवति। ततो रुट्। रुट्च भवति शीङ इति॥ एवमपि पर्यायः प्रसज्येत। एवं तर्ह्यच्छब्दस्य रुटं वक्ष्यामि। तदच्छब्दग्रहणं कर्तव्यम्। न कर्तव्यम्। प्रकृतमनुवर्तते। क्व प्रकृतम्। अदभ्यस्तात् [७. १. ४] इति। तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः। शीङ इत्येषा पञ्चम्यदिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [१. १. ६७] इति॥

[ अदभ्यस्तात्[१] ॥७।१।४॥

आत्मनेपदेष्वनतः[१] ॥७।१।५॥ ]

शीङो रुट्[१] ॥७।१।६॥

रुटि दृशिगुणप्रतिषेधः ॥ १ ॥

रुटि दृशिगुणः प्राप्नोति। अदृश्रमस्य केतव इति। तस्य प्रतिषेधो वक्तव्यः॥ न वक्तव्यः। परस्मिन्निति क्ङिति च [१. १. ५] इति

'रुट्' शब्दानंतर च शब्द उच्चारावा म्हणजे 'रुट् च' असें सूत्रामध्यें उच्चारण करावें. च शब्दानें काय सांगावयाचें? जें दुसरें कांहीं प्राप्त होतें तें. दुसरे काय प्राप्त होते? अत् आदेश.

तर मग तो चकार उच्चारावा.

च शब्द उच्चारण्याची जरूर नाहीं. सूत्रांचा विभाग असा करतां येईल: 'शीङः' व 'रुट्.' 'शीङः' हें एक सूत्र. त्याचा अर्थ शी धातूच्या पुढें असलेल्या झकाराला अत् आदेश होतो. नंतर 'रुट्' हें दुसरें सूत्र. त्याचा अर्थः— शीङ् धातूच्या प्रत्ययाच्या झकाराला रुट् आगम करावा.

असें केलें तरी काम भागत नाहीं. एकदां रुट्[७] होईल व एकदां अत् आदेश होईल असा विकल्प प्रस्तुत उदाहरणात होईल.

बर, तर अत् या आदेशाला रुट् आगम सांगूं. पण त्याकरितां अत् शब्द सूत्रात घालावा लागेल. लागणार नाहीं. प्रकृत अत् शब्दच येथें अनुवृत्त होईल.

कोठें प्रकृत आहे?

अदभ्यस्तात् या सूत्रांत.

त्या सूत्रांत अत् हे प्रथमा विभक्तींत उच्चारलें आहे. प्रस्तुत रुट् या सूत्रांत षष्ठी विभक्तींत उच्चारलेल्या अत् पदाची जरूर आहे.

शीङः हें पञ्चम्यन्त पद आहे. त्यामुळें 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेच्या जोरावर अत् या प्रथमची षष्ठी करतां येईल.

(सू.६ वा.१) रुडागम केल्यावर दृश् धातूला 'अदृश्रन्नस्य केतवः' या मन्त्रामधील अदृश्रन् या स्थळीं 'ऋदृशोऽङि गुणः' या सूत्रानें गुण प्राप्त होतो, तो न व्हावा याकरितां त्याचा प्रतिषेध करावा लागेल.

प्रतिषेध करण्याची जरूर नाहीं. कारण पुढें

७. 'शीङः' आणि 'रुट्' अशीं दोन निरनिराळीं सूत्रें केलीं असतां शेरते हें उदाहरण साधतेवेळीं शी+झ अशी स्थिति असतां प्रथम 'शीङः' या सूत्रानें झकाराला अ आदेश केला तर अदादेश झाल्यानंतर तो अल्विधि असल्यामुळें स्थानिवद्भाव होत नाहीं व रुट् या सूत्रानें झकाराला सांगितलेला रुडागम झकारच नाहींसा झाल्यामुळें होत नाहीं. तसेंच प्रथम 'रुट्' या सूत्रानें झ याला रुट् आगम केला तर रुटाचें व्यवधान आल्यामुळें 'शीङः' या सूत्रानें अत् आदेश होत नाहीं. एकंदरींत दोन सूत्रें केलीं तर दोहोंपैकीं कोणतें तरी एक सूत्रच लागू पडतें. त्यामुळें दोन्ही सूत्रांना जागा देण्याकरितां विकल्पच घ्यावा लागेल.

१. (सू. ४) अभ्यस्तसंज्ञकाच्या पुढें असणाऱ्या प्रत्ययांतील झकाराला अत् आदेश होतो: उदा० धत्ते दधाते दधते.

१. (सू. ५) याचा अर्थ मागें सूत्र ७।१।३, टीप४ मध्यें आहे तो पहा.

१. (सू.५) शीङ् धातूहून पुढें असलेल्या (झकाराला झालेल्या) अत् आदेशाला रुट् आगम होतो; उदा० शेरते.

प्रतिषेधो भविष्यति । एवमप्यदृश्रमस्य केतव इत्यत्र प्राप्नोति । एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते।

## पूर्वान्ते शीङो गुणविधिः ॥ २ ॥

पूर्वान्ते शीङो गुणो विधेयः। शेरते। सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं रुटि दृशिगुणप्रतिषेध इति। पूर्वान्तेऽप्येष दोषः। कथम्। अयं दृशिगुणः प्रतिषेधविषय आरभ्यते स यथैव क्ङिति चेत्येतं प्रतिषेधं बाधत एवमनुपधाया अपि प्रसज्येत। तस्मादुभाभ्यामेव दृशेरक्प्रत्ययान्तरं वक्तव्य पितरं च दृशेयं मातरं च दृशेयमित्येवमर्थम् ॥

## झादेशादाडुटि ॥ ३ ॥

---

असलेल्या निमित्ताला[२] मानून क्ङिति च (१।१।५) हा निषेध होईल.

जर क्ङिति च हा निषेध येथें लागू पडून गुण झाला नाहीं तर 'अदृश्रमस्य केतवः' येथील अदृश्रम् या रूपामध्यें गुण होईल[३] व रूप बिघडेल.

असें असेल तर रुट् आगमाच्या पूर्वीचा जो शब्द त्यालाच शेवटीं रुक् हा आगम सांगितला[४] जाईल.

( वा. २ ) पूर्वीच्या शब्दाला रुक् आगम सांगितल्यास शीङ् धातूला शेरते हें उदाहरण साधण्याकरितां गुण सांगावा लागेल, व शीङो रुट् हें सूत्र बदलावें लागेल.

सूत्र असेच्या तसेच राहूं दे.

पण आतांच वर दोष सांगितला ना कीं रुट् आगम केल्यावर दृश् धातूला गुणाचा प्रतिषेध करावा लागेल ?

हा दोष पूर्वीच्या शब्दाच्या अंतीं रुगागम सांगितला असतांही राहतोच.

तो कसा ?

हा 'ऋदृशोऽङि गुणः' या सूत्रानें दृश् धातुला सांगितलेला गुण मुद्दाम निषेधाच्या ठिकाणीं सांगितल्यामुळें जसा 'क्ङिति च' या गुणनिषेधाचा बाध करतो तसाच तो उपधेला नसणाऱ्या स्वराविषयींही प्रवृत्त होईल. तेव्हां एकंदरीत दोष टाळण्याकरिता तुम्हांला काय किंवा आम्हांला काय दोघांनाही 'पितरं च दृशेयं मातरं च दृशेयम्' इत्यादि उदाहरणातील दृशेयं वगैरे रूपें साधण्याकरितां दृश् धातूहून अक् प्रत्यय सांगावा लागेल;[६]

( वा. ३ ) झकाराला होणाऱ्या आदेशाचे पूर्वी लेटामध्यें विप्रतिषेधानें आडागम होतो स्पष्टी-

---

२ अदृश्रन् येथें दृश् धातूहून लुङाचें बहुवचन केलें असतां धातूला अट् आगम, लुङाला झि आदेश, अङ्, झिला अन्ति, अङाचा व 'अन्ति' चा अ यांचा पररूप एकादेश व 'बहुलं छन्दसि' यानें रुट् आगम. इचा लोप केल्यावर अदृश्+रन् अशी स्थिति असता 'ऋदृशोऽङि गुणः' यानें रन् यामधील अ हा अङ् समजून अङ्निमित्त गुण प्राप्त होतो. ही येथें शंका आहे. तिचें उत्तर:-रन् हा प्रत्यय सार्वधातुकमपित् या सूत्रानें ङित् आहे व त्यामुळें 'क्ङिति च' हा गुणनिषेध येतो असें दिलें आहे. येथें अङाला मानून गुण, व अन् प्रत्ययाला मानून निषेध, अशी स्थिति आहे; त्यामुळें क्ङिति च सूत्राचा वाक्यार्थ परसप्तमीपक्ष घेऊन केला असतांनाच गुणनिषेध शक्य होतो; निमित्तसप्तमीपक्ष घेतला तर शक्य होत नाहीं. ( क्ङिति च १।१।५ पहा. )

३. अदृश्रम् येथें अम् हा पित्सार्वधातुक प्रत्यय असल्यामुळें तो ङित् होत नाहीं व त्यामुळें अदृश्रम् येथें गुणनिषेध होत नाहीं.

४. दृश् या अंगालाच शेवटीं रुक् हा आगम सांगितला म्हणजे रम् हा प्रत्यय न राहतां अम् हा प्रत्यय होतो व दृश्र् हें अंग झालें असतां उपधेला लघु स्वर नाहीं म्हणून गुणाची प्राप्तिच येत नाहीं.

५. कारण वरील टीपेंत दिल्याप्रमाणें शेरते येथें 'शीर् अते' अशी स्थिति असतां उपधास्वर ई हा लघु नाहीं म्हणून गुण होणार नाहीं.

६. 'दृशेरग्वक्तव्यः' ( ३।१।८६, वा. २ ) असें विधान करावें लागेल.

७. आट् आगम पूर्वी सांगण्याचें प्रयोजन झकाराला अन्त आदेश होण्याला कांहीं अडचण न यावी हें होय.

झादेशादाड्भवति विप्रतिषेधेन। झादेशस्यावकाशः। लुनते लुनताम् अलुनत। आटोऽवकाशः। पताति दिद्युत्। उदधिं च्यावयाति। इहोभयं प्राप्नोति। अपि नः श्वो विजनिष्यमाणाः पतिभिः सह शयान्तै। आड्भवति विप्रतिषेधेन॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः।

## न वा नित्यत्वादाटः ॥ ४ ॥

न वा वक्तव्यः। किं कारणम्। नित्यत्वादाटः। नित्य आडागमः। स कथं नित्यः। यद्यनकारान्तग्रहणं झकारविशेषणम्। अथ हि प्रत्ययविशेषण झादेशोऽपि नित्यः॥

## अन्तरङ्गलक्षणत्वाच्च ॥ ५ ॥

अन्तरङ्गः खल्वप्याडागमः। कथमन्तरङ्गः। यदि प्राग्लादेशाद्धात्वधिकारः। अथ हि लादेशे धात्वधिकारोऽनुवर्तेत उभयं समाना

---

करण करावयाचें म्हणजे झकाराच्या आदेशांचीं स्थलें लुनते, लुनताम्, अलुनत वगैरे आहेत; आडागमाचीं स्थलें 'पताति दिद्युत्' येथील पताति, 'उदधिं च्यावयाति' येथील च्यावयाति वगैरे. 'अपि नः श्वो वा विजनिष्यमाणाः पतिभिः सह शयान्तै' या मन्त्रांतील शयान्तै रूपामध्यें दोन्ही कार्यें प्रवृत्त होतात. त्यांमध्यें विप्रतिषेधानें आट् पूर्वी होतो.

मग हा पूर्वविप्रतिषेध असेल तर तो सांगावयास पाहिजे.

(वा. ४) अथवा सांगण्याची जरूर नाहीं.

काय म्हणून ?

कारण आट् आगम नित्य आहे म्हणून तो झकाराला होणाऱ्या आदेशाना बाजूला सारून होईलच.

आट् आगम नित्य कसा ?

'अकार शेवटीं नव्हलेलें शब्दस्वरूप' हें झकाराला विशेषण केलें म्हणजे आट् आगम नित्य होतो.

तेच विशेषण प्रत्ययाला केलें म्हणजे झकाराचा आदेशही नित्य होतो.

(वा. ५) अंतरंगत्वामुळेंही आडागम अगोदर होईल.

आडागम अन्तरंग कसा होतो ?

जर लादेशाचे पूर्वी धातोः हा अधिकार संपतो असे म्हटले तर आट् आगम अंतरंग होतो. जर लकाराला आदेश ज्या सूत्रांत सांगितले आहेत त्या सूत्रात धातोः हें पद अनुवृत्त होतें असें म्हटलें तर आट् आगम व झकाराचे आदेश दोहोनाही सारखींच निमित्तें लागतात, व त्यामुळे अंतरंगबहिरंगभाव बोलताच यावयाचा नाही.

---

आगम करावयाचे अगोदर अकार शेवटी नसलेलें अंग आहे म्हणून 'आत्मनेपदेष्वनतः' यानें अत् आदेश प्राप्त होतो व अन्तादेशाचा बाध होतो. आट् आगम केल्यावर अकारान्त अंगाच्या पुढें लागूनच झकार नाहीं, म्हणून 'आत्मनेपदेष्वनतः' यानें अत् होत नाही व झोऽन्तः यानें अन्त् होतो.

८. अकार शेवटीं नसलेल्या शब्दस्वरूपाहून पर झकाराला अत् होतो असें म्हटलें म्हणजे आट् केल्यावर झला अत् प्राप्त होत नाही; परंतु आट् आगम हा झकाराला अत् केल्यावरही प्राप्त होतो व न करतांही प्राप्त होतो. म्हणून आट् आगम हा नित्य आहे.

९. अकार शेवटीं नसलेल्या शब्दस्वरूपाहून पर जो प्रत्यय त्याच्या झकाराला अत् होतो असें म्हटलें म्हणजे आडागम केल्यावरही अत् प्राप्त होतो व न करताही होतो, म्हणून तोही नित्य झाल्यामुळें नित्यत्व हें कारण आट् पूर्वी होण्याकरिता मुळीच देतां येत नाहीं.

१०. झकाराच्या आदेशांना अंग हें निमित्त लागतें; आडागमाला (३।४।९४) धातोः हा अधिकार अगोदरच (३।४।७७) संपत असल्यामुळें धातोः हें निमित्त नाही. तेव्हां आट् आगम अंतरंग होईल व तो अंतरंग असल्यामुळें झकारादेशाच्या आधीं झाला तर त्याचें व्यवधान मध्यें आल्यामुळें झकाराला आत्मनेपदेष्वनतः या सूत्रानें अत् आदेश न होतां 'झोऽन्तः' यानें अन्त् आदेशच होईल.

श्रयम् ॥ यद्येवानकारान्तग्रहणं प्रत्ययविशेषणमथापि लादेशे धात्वधिकारोऽनुवर्तत उभयथापि पूर्वविप्रतिषेधेन नार्थः । कथम् । बहुलं छन्दसि [ २. ४. ७३ ] इत्येवमत्र शपो लुग्न भविष्यति । तत्रानत इति प्रतिषेधो भविष्यति ॥

**वेत्तेर्विभाषा ॥ ७।१।७ ॥**

**बहुलं छन्दसि ॥ ७।१।८ ॥**

**अतो भिस ऐस् ॥ ७।१।९ ॥**

**बहुलं छन्दसि ॥ ७।१।१० ॥**

इदं बहुलं छन्दसीति द्विः क्रियते । एकं शक्यमकर्तुम् । कथम् । यदि तावत्पूर्वं क्रियते परं न करिष्यते । अतो भिस ऐसित्यत्र बहुलं छन्दसीत्येतदनुवर्तिष्यते । अथ परं

---

तर मग 'अकार शेवटीं नसलेलें शब्दस्वरूप' हे शब्द प्रत्ययाला विशेषण लावले असतांना, तसेंच लकारांना आदेश सांगणाऱ्या सूत्रांत धातोः हा अधिकार आहे असेंही म्हटलें असतांना, दोन्ही वेळीं पूर्वविप्रतिषेध घेण्याचें कांहीं कारण[११] नाहीं.

**असें कसें होईल ?**

'बहुलं छन्दसि' या सूत्रानें शयान्तै या ठिकाणीं शब् या विकरणाचा लुक् होणार नाहीं व लुक् झाला नाहीं तर अकार शेवटीं असल्यामुळें 'अनतः' ( अकार शेवटीं नसलेलें जें शब्दस्वरूप त्याला ) यामधील अकारान्ताला अदादेश होत नाहीं हा जो अदादेशाचा निषेध तो येथें लागू पडेल.

( सू. ७-१० ) 'बहुलं छन्दसि' हें सूत्र येथें दोनदां केलें आहे. त्यांपैकीं एक सूत्र केलें नसतां चालेल.

तें कसें ?

जर प्रथम पढलेलें बहुलं छन्दसि हें सूत्र ठेवलें व दुसरें ( ७।१।१० ) काढून टाकलें तर पुढील अतो भिस ऐस् या सूत्रांत बहुलं छन्दसि हे शब्द अनुवृत्त होतील. बरें, पुढील बहुलं छन्दसि सूत्र म्हणजे ७।१।१० हें कायम ठेवलें व हें काढून टाकलें तर पुढील बहुलं छन्दसि

---

११. या ठिकाणच्या भाष्याचा आशय पुढे लिहिल्याप्रमाणें आहे. झकारादेश पूर्वीं होतो कीं आट् आगम पूर्वीं होतो हा विचार करतेवेळीं चार गोष्टी विचारांत घ्याव्या लागतात: ( १ ) अनकारान्त अंग हें झकाराला विशेषण घ्यावयाचें; ( २ ) अनकारान्त अंग हें प्रत्ययाला विशेषण घ्यावयाचें; ( ३ ) धातोः हा अधिकार लादेश सांगणाऱ्या सूत्रांत येत नाहीं; ( ४ ) धातोः हा अधिकार लादेश सांगणाऱ्या सूत्रांत येतो. पहिल्या व तिसऱ्या प्रकारांत अनुक्रमें नित्यत्वामुळें व अंतरंगत्वामुळें आट् आगम आधीं होतो, व नंतर अत् आदेश व्यवधानामुळें होत नाहीं; तर अन्त् आदेशच होतो, व रूप साधतें. दुसऱ्या व चवथ्या प्रकारांत नित्यत्व किंवा अंतरंगत्व बोलतां येत नाहीं; तेव्हां त्या ठिकाणीं आट् आगम पूर्वीं होण्याकरितां पूर्वविप्रतिषेध घ्यावा लागणारच; परंतु भाष्यकार म्हणतात कीं या दुसऱ्या व चवथ्या प्रकारांत सुद्धां पूर्वविप्रतिषेध घेण्याचें कारण नाहीं; कारण शब्विकरणाचा लुक् 'बहुलं छन्दसि' (२।४।७३) या सूत्राचे जोरावर केला नाही म्हणजे अकारान्त अंग असल्यामुळें अत् आदेश होणारच नाहीं, तर अन्त् आदेशच होईल.

१. (सू. ७) विद् धातूहून केलेल्या झ प्रत्ययाच्या अद् या आदेशाला रुट् आगम भाषेमध्यें विकल्पानें होतो.

१. ( सू. ८ ) वेदामध्यें बाहुल्यानें म्हणजे ज्या ठिकाणीं दृष्टीस पडेल त्या ठिकाणीं झ प्रत्ययाच्या अत् आदेशाला रुट् आगम करावा.

१. ( सू. ९. ) ऱ्हस्व अकार शेवटीं असलेल्या अंगाच्या पुढील भिस् प्रत्ययाला ऐस् असा आदेश होतो; उदा. रामैः, वृक्षैः, लक्षैः.

१. ( सू. १० ) भिस् प्रत्ययाला ऐस् आदेश वेदामध्यें अकारान्त अंग नसतांही होतो व कांहीं ठिकाणीं अकारान्त अंग असूनही ऐस् आदेश होत नाहीं; उदा. भद्रं कर्णेभिः.

२. रुट् व ऐस् हे दोन्ही वेदामध्यें बाहुल्यानें सांगावयाचे आहेत. रुट् सांगणारें सूत्र व ऐस् सांगणारें सूत्र ह्या दोन्ही सूत्रांच्या पुढें 'बहुलं छन्दसि' अशीं दोन सूत्रें केलेलीं आहेत.

क्रियते पूर्वं न करिष्यते। बहुलं छन्दसीत्यत्र रुडप्यनुवर्तिष्यते ॥

अपर आह। उभे बहुलग्रहणे एकं छन्दोग्रहणं शक्यमकर्तुम्। कथम्। इदमस्ति। वेत्तेर्विभाषा। ततश्छन्दसि। छन्दसि च विभाषा। ततोऽतो भिस ऐस्भवति। छन्दसि विभाषेति ॥

इह वृक्षैः प्लक्षैरिति परत्वादेत्त्वं प्राप्नोति। ऐस्भाव इदानीं क्व भविष्यति।

**कृत एत्त्वे भौतपूर्व्यात्**

कृत एत्त्वे भूतपूर्वमकारान्तमित्यैस्भविष्यति ॥

**ऐस्तु नित्यस्तथा सति ॥**

एवं सति नित्य ऐस्भावः। कृतेऽप्येत्त्वे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति। नित्यत्वादैस्त्वे कृते विहतनिमित्तत्वादेत्त्वं न भविष्यति ॥

एत्त्वं भिसि परत्वाच्चेदत ऐस्क भविष्यति कृत एत्त्वे भौतपूर्व्यादैस्तु नित्यस्तथा सति

**नेदमदसोरकोः ॥ ७।१।११ ॥**

इमौ द्वौ प्रतिषेधावुच्येते। उभौ शक्यावक्तुम्। कथम्। एवं वक्ष्यामि। इद-

---

सूत्रांत रुट् पदाचीही अनुवृत्ति केली जाईल.

कोणी पुढे लिहिल्याप्रमाणेंही म्हणतात: दोन्ही बहुलं शब्द व एक छन्दसि शब्द गाळले तरी चालतील.

तें कसें?

तर हें 'वेत्तेर्विभाषा' सूत्र आहेच. त्यानंतर 'छन्दसि' येवढेंच सूत्र करून वेदामध्येंही विकल्पानें सर्व धातूंहून रुट् सांगावा. त्यानंतर 'अतो भिस ऐस्' सूत्र करावें आणि त्याच सूत्रांत छन्दसि व विभाषा हीं पदें अनुवृत्त असल्यामुळें वेदामध्यें ऐस् विकल्पानें होईल.

आतां वृक्षैः, प्लक्षैः, या उदाहरणांमध्यें ऐस् आदेश होण्याच्या अगोदर परत्वास्तव अंगाच्या शेवटच्या अकाराला बहुवचने झल्येत् (७।३।१०३) या सूत्रानें एकार प्राप्त होतो, आणि एकार केला असताना ऐस् आदेशाचें निमित्त नाहींसें झाल्यामुळें ऐस् आदेश होणार नाहीं.

मग असे झाले तर ऐस् आदेश कोणत्या ठिकाणीं होईल?

अंगाचे शेवटच्या अकाराला एकार केला असतांना सुद्धां पूर्वी अकारान्त अंग होतें, म्हणून भिस् प्रत्ययाला ऐस् आदेश होईल.

तर मग ऐस् नित्य होईल; कारण अंगाला एकार केला असतांनाही तो प्राप्त होतो व केला नसतांनाही तो प्राप्त होतो. एकंदरींत अशा रीतीनें ऐस् आदेश नित्य असल्यामुळें तो [6] अगोदर केला असतांना एत्त्वाचें निमित्त नाहींसें झाल्यामुळें एत्व होणार नाहीं.

(सू. ११) या सूत्रामध्यें 'न' व 'अकोः' यांतील 'अ' या दोन शब्दांनीं दोन निषेध सांगितले आहेत. दोन्ही गाळून टाकतां येतील.

ते कसें?

दोन्ही निषेध गाळून 'इदमदसोः कात्' असे सूत्र बोलूं व तसं बोलणें नियमार्थ होईल. इदं व

---

३. रुट् व ऐस् या दोहोंच्या मध्यें एकदां 'बहुलं छन्दसि' म्हटलें म्हणजे बहुलं छन्दसि या सूत्रांत रुट् अनुवृत्त होईल व तो बाहुल्यानें होईल व ऐस् सांगणाऱ्या सूत्रांत 'बहुलं छन्दसि' हीं पदें जातील, व ऐस्ही बाहुल्यानें होईल.

४. येथें युक्तिवाद वर लिहिलेलाच घ्यावयाचा. फक्त विभाषा शब्द बहुलं या अर्थी घेतल्याने बहुलं शब्दाचीही जरूर नाहीं असें येथे ज्यास्त सांगितलें आहे.

५. वृक्ष शब्दाहून भिस् प्रत्यय करून एकार केल्यानंतर वृक्षेभिस् अशी स्थिति असतां जरी त्या वेळीं ऱ्हस्व अकार नाहीं तरी तेथें पूर्वी ऱ्हस्व अकार होता तो गृहीत धरून पुढील भिस् प्रत्ययाला ऐस् आदेश करतां येतो. यालाच भूतपूर्वगति असें म्हणतात.

६. परापेक्षां नित्य प्रबल असल्यामुळे ऐस् आदेश अगोदर होईल.

१. (सू. ११) इदम् किंवा अदस् या शब्दांच्या पुढील भिस् प्रत्ययाला ऐस् आदेश होत नाहीं; परंतु त्या इदम् किंवा अदस् या शब्दांमध्यें ककार आला नसेल तर. सर्वनाम शब्दामध्यें अकच् प्रत्यय केला असतां मध्यें ककार येत असतो; उदा०—इमकैः.

मदसोः कादिति । तन्नियमार्थं भविष्यति । इदमदसोः कादेव नान्यत इति ॥

टाङसिङसामिनात्स्याः ॥७।१।१२॥[1]

किमर्थमिनादेश उच्यते न नादेश एवोच्येत । का रूपसिद्धिः वृक्षेण प्लक्षेण । एत्त्वे योगविभागः करिष्यते । कथम् । इदमस्ति । बहुवचने झल्येत् [ ७. ३. १०३ ] ओसि च [१०४] । तत आङि च । आङि च परतोऽत एत्त्वं भवति । वृक्षेण प्लक्षेण । तत आपः संबुद्धौ च [१०६] । आप आङि चौसि चेति॥ नैवं शक्यम् । इह हि अनेनेतीद्रूपलोपः प्रसज्येत । झलि लोपः करिष्यते । न शक्यो झलि लोपः कर्तुम् । इह हि दोषः स्यात् । अया विष्ठेति ॥ एवं तर्ह्यन्लोपापवादो विज्ञास्यते । कथम् । एवं वक्ष्यामि । अन् ने चापि चेति । तन्नकारग्रहणं कर्तव्यम् । न

---

अदस् या शब्दांहून पुढें असणाऱ्या भिस् प्रत्ययाला जर ऐस् आदेश होईल तर तो 'क' या अक्षराच्या पुढें असणाऱ्याच भिस् प्रत्ययाला होईल; अन्य ठिकाणीं होणार नाहीं.

( सू. १२ ) या सूत्रात 'इन' आदेश कां सांगितला आहे? तसा सांगू नये. 'इन'च्या ऐवजीं 'न' असाच सांगावा.

न असा उच्चारला असतां वृक्षेण, प्लक्षेण हीं रूपें कशीं साधतील ?

एत्त्व सांगणाऱ्या सूत्राचे[2] दोन भाग करूं.

ते कसे ?

एत्त्व सांगणारें सूत्र 'बहुवचने झल्येत्' हें आहे; नंतर 'ओसि च' आहे. त्यानंतर 'आङि चाऽऽपः' या सूत्रातील 'आङि च ' एवढ्याच भागाचें स्वतन्त्र सूत्र करूं व त्याचा अर्थ आङ् प्रत्यय पुढें असतांना अकाराला एकार होतो असा करूं, व वृक्षेण प्लक्षेण हीं उदाहरणें साधूं. नंतर 'आपः संबुद्धौ च' असें सूत्र वाचूं. त्याचा अर्थ आबन्त अंगाला शेवटीं सबुद्धि आङ् व ओस् हे प्रत्यय पुढें असतांना एकार होतो असा होईल.

असें करणें शक्य नाहीं. कारण असें केलें असतां अनेन हें रूप साधतेवेळीं न प्रत्यय पुढें असल्यामुळें 'हलि लोपः' ( ७।२।११३ )[3] या सूत्राने इद् या भागाचा लोप होऊं लागेल.

बरें तर, 'हलि लोपः' याच्या ऐवजीं 'झलि लोपः' असें सूत्र करतां येईल, व इदम् शब्दाच्या इद् भागाचा लोप झलादि प्रत्यय पुढें असतांना करण्यांत येईल.

झल् पुढें असतांनाच इद्भागाचा लोप करणें शक्य नाहीं, कारण तसें केलें असतां 'अया[5] त्रिष्ठा' येथील अया हें रूप साधतांना दोष येईल.

बरें तर, 'अनाप्यकः' या सूत्रानें मुद्दाम निराळा सांगितलेला अन् 'हलि लोपः' या सूत्रानें सांगितलेल्या लोपाचा बाध करतो असें समजूं.

तें कसें समजतां येईल ?

'अनाप्यकः' या सूत्राचा अर्थ नकार पुढें असतांना, तसेच आप् म्ह० तृतीयैकवचनापासून सप्तमीबहुवचनापर्यंतचा कोणताही प्रत्यय पुढें

---

१. ( सू. १२ ) ऱ्हस्व अकार शेवटीं असलेल्या अंगाच्या पुढील टा, ङसि आणि ङस् या तीन प्रत्ययांना क्रमानें इन, आत् आणि स्य असे आदेश होतात; उदा०-रामेण, रामात्, रामस्य.

२. आङि चाऽऽपः ( ७।३।१०५ ) या सूत्राचे.

३. अनेन या उदाहरणामध्यें इन आदेश होत असल्यामुळें 'हलि लोपः' ( ७।२।११३ ) या सूत्राची प्राप्ति येत नाहीं, म्हणून तेथें 'अनाप्यकः' ( ७।२।११२ ) या सूत्रानें इदम् शब्दापैकीं इद् या भागाला अन् असा आदेश होत असतो. आतां जर 'न' आदेश केला तर अन् या आदेशाचा बाध करून 'हलि लोपः' या सूत्रानें लोप होऊं लागेल.

४. नकार हा झल् प्रत्याहारामध्यें नसल्यामुळें लोप होणार नाहीं.

५. अया हें वैदिक रूप आहे. इदम् शब्दाच्या पुढील चतुर्थीच्या एकवचनाच्या प्रत्ययाला 'सुपां सुलुक्०' ( ७।१।३९ ) या सूत्रानें या असा आदेश होऊन इद् भागाचा हलि लोपः ( ७।२।११३ ) या

कर्तव्यम् । क्रियते न्यास एव । लुप्तनिर्दिष्टो नकारः । यद्येवं नोपधाया इति दीर्घत्वं प्राप्नोति । सौत्रो निर्देशः । अथवा नपुंसकनिर्देशः करिष्यते ॥

अथ किमर्थमादुच्यते न अदेवोच्येत । का रूपसिद्धिः वृक्षात् प्लक्षात् । सवर्णदीर्घत्वेन सिद्धम् । न सिध्यति । अतो गुणे पररूपमिति पररूपत्वं प्राप्नोति । अकारोच्चारणसामर्थ्यान्न भविष्यति ॥ यदि प्राप्नुवन्विधिरुच्चारणसामर्थ्याद्बाध्यते सवर्णदीर्घत्वमपि न प्राप्नोति । नैष दोषः । यं विधिं प्रत्युपदेशोऽनर्थकः स विधिर्बाध्यते यस्य तु विधेर्निमित्तमेव नासौ बाध्यते। पररूपं प्रत्यकारोच्चारणमनर्थकं सवर्णदीर्घत्वस्य पुनर्निमित्तमेव ॥

---

असतांना, इदम् शब्दाच्या इद् भागाला अन् होतो, असा करूं.

तर मग 'अनाप्यकः' या सूत्रांत नकार घालावा.

नकार घालण्याची जरूर नाहीं. आहे तें सूत्र नकार घालूनच आहे. अन् या शब्दाचे शेवटीं असलेल्या नकाराचा लोप करून सूत्र उच्चारलेलें आहे.

असें म्हटले तर अ या रूपामध्यें अन् या नकारान्ताच्या उपधेला 'सर्वनामस्थाने चासंबुद्धौ' (६।४।८) या सूत्रानें दीर्घ होऊं लागेल.

सूत्रांतील उच्चारण असल्यामुळें दीर्घ होणार नाहीं. अथवा 'अ' हें अन् शब्दाचें नपुंसकलिंगीं प्रथमेचें एकवचन केलें आहे, असें म्हणूं.

बरें तर या सूत्रात 'आत्' असें दीर्घ स्वराचें उच्चारण कां केले आहे ? तसें करूं नये. अत् असें ऱ्हस्व स्वराचेंच उच्चारण करावें.

वृक्षात्, प्लक्षात्, हीं रूपें कशीं साधतील ?

वृक्ष–अत्, प्लक्ष–अत्, असे असतां सवर्णदीर्घ होऊन रूपें साधतील.

साधणार नाहींत. कारण या ठिकाणीं 'अतो गुणे' (६।१।९७) या सूत्रानें पररूप होऊन वृक्षत्, प्लक्षत्, अशीं रूपें होतील.

ज्या अर्थी अत् असें आदेशामध्यें अकाराचें उच्चारण केलें आहे त्या अर्थी येथें पररूप होत नाहीं, असें म्हणूं.

अशा रीतीनें एकादा प्राप्त झालेला विधि उच्चारण केल्याचे जोरावर जर दूर सारला जाईल तर सवर्णदीर्घ सुद्धां दूर सारला जाईल, व तोही होणार नाहीं.

असें कसें होईल ? जो विधि केला असतां अकाराचें केलेले उच्चारण व्यर्थ होईल तोच विधि दूर सारला जातो. परंतु जो विधि केला असतां अकाराचें केलेलें उच्चारण व्यर्थ होत नाहीं, तर उलट निमित्तच होतें, तो विधि दूर सारला जात नाहीं. प्रस्तुत उदाहरणांत पररूप केले असतां अत् येथील अकाराचे उच्चारण करणें निरुपयोगीं होतें; पण सवर्णदीर्घ करण्याला अकार हा निमित्तच होतो.

---

सूत्रानें लोप होऊन अया असें रूप झालें आहे. येथें यकार हा झल् प्रत्याहारामध्यें नसल्यामुळें लोप होणार नाहीं.

६. कारण त्याशिवाय नकार पुढें असतांना अन् आदेश सांगतां येणार नाहीं.

७. सूत्रामध्यें अ, नापि, अकः, अशीं पदें समजावीं.

८. अन् या शब्दाचें पुंल्लिंगी प्रथमेचें एकवचन आ असें होईल. उदाहरणार्थ– राजन् शब्दाचें राजा असें प्रथमेचेंच एकवचन होतें. एकंदरींत 'अ' असें होणार नाहीं.

९. पाणिनीनेंच ज्या अर्थी 'अ' असें दीर्घ न करतां उच्चारिलें आहे त्या अर्थी तेवढ्या उदाहरणापुरता दीर्घ करतां येत नाहीं अशी कल्पना करतां येईल.

१० जर पररूप होऊन वृक्षत् असेंच रूप होणार असेल तर नुसता तकारादेश सांगूनही काम भागेल. तेव्हां अत् असा जो आदेश सांगितला आहे तो दीर्घ होण्याकरितांच सांगितला आहे. म्हणून पररूप होणार नाहीं.

## ङेर्यः[1] ॥ ७।१।१३ ॥

किमिदं चतुर्थ्येकवचनस्य ग्रहणमाहोस्वित्सप्तम्येकवचनस्य ग्रहणम् । कुतः संदेहः । समानो निर्देशः ॥ चतुर्थ्येकवचनस्य ग्रहणम् । कथं ज्ञायते । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति । इहापि तर्हि चतुर्थ्येकवचनस्य ग्रहणं स्यात् । ङेराम्नद्याम्नीभ्यः [७.३.११६] ॥ एवं तर्हि व्याख्यानतो विशेषप्रतिपत्तिर्न हि संदेहादलक्षणमितीह चतुर्थ्येकवचनस्य ग्रहणं व्याख्यास्यामस्तत्र सप्तम्येकवचनस्येति ॥

## सर्वनाम्नः स्मै[1] ॥ ७।१।१४ ॥

### अश एकादिष्टात्स्मायादीनामुपसंख्यानम् ॥ १ ॥

अश एकादिष्टात्स्मायादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । अथो अत्रास्मै । अथो अत्रा-

---

( सू. १३ ) काय येथील ' ङेः ' हें चतुर्थीच्या एकवचनाचा जो ङे प्रत्यय त्याच्या षष्ठीचें रूप म्हणून उच्चारलें आहे, कीं सप्तमीचा एकवचनाचा जो ङि प्रत्यय त्याच्या षष्ठीचें रूप म्हणून उच्चारलें आहे ?

असा संशय काय म्हणून येतो ?

संशय येण्याचें कारण हें कीं ङि व ङे या दोन्ही शब्दांचें षष्ठीच्या एकवचनाचे 'ङेः' असें सारखेंच रूप होते.

तर मग चतुर्थीच्या एकवचनाचा जो ङे हा प्रत्यय त्याच्या षष्ठीच्या एकवचनाचें हे रूप आहे.

हें कशावरून समजते ?

ज्या ठिकाणी लाक्षणिक व प्रतिपदोक्त अशीं दोन्ही रूपें संभवतात, व कोणते घ्यावे हा संशय येतो, त्या ठिकाणीं प्रतिपदोक्त जें रूप त्याचेंच ग्रहण करावें, अशा नियमाच्या स्वरूपाची परिभाषा[2] आहे.

असें म्हणाल तर 'ङेराम्नद्याम्नीभ्यः' (७।३।११५ ) या ठिकाणीं देखील ङेः हें चतुर्थीच्या एकवचनाचें म्हणजे ङे या शब्दाचें षष्ठीचें रूप आहे असेंच म्हणावे लागेल.

तर मग व्याकरणशास्त्रांत ज्या ठिकाणीं एकादी गोष्ट या तऱ्हेनें समजावी कीं त्या तऱ्हेनें असा संशय येतो त्या ठिकाणीं पूर्वाचार्यांनीं केलेल्या व्याख्यानाला अनुसरूनच विशिष्ट तऱ्हा समजावयाची; केवळ संशय येतो या कारणास्तव व्याकरणशास्त्रातलें ते ठिकाण निर्णयात्मक नाहीं असें समजावयाचें नाहीं. प्रस्तुत स्थलीं ङेः हें चतुर्थीच्या एकवचनाचें षष्ठीचें रूप आहे असें व्याख्यान करूं; व 'ङेराम्नद्याम्नीभ्यः' येथें ङेः हें सप्तमीच्या एकवचनाच्या 'ङि' शब्दाचें रूप आहे असें व्याख्यान[3] करूं.

( सू. १४ वा. १. ) इदम् शब्दाला सांगितलेला जो अश् आदेश (२।४।३२) त्याला जेव्हां पूर्वीच्या शब्दाच्या शेवटीं असलेल्या स्वराशीं एकादेश होतो तेव्हां एकादेश झाल्यानतर ऱ्हस्व अकार नसल्यामुळें त्या ठिकाणीं स्मै वगैरे आदेशाचें निराळें विधान करावें; उदा०—

---

१. ( सू. १३ ) ऱ्हस्व अकार शेवटीं असलेल्या अंगाच्या पुढील चतुर्थीच्या एकवचनाच्या ङे प्रत्ययाला य असा आदेश होतो; उदा०—रामाय, कृष्णाय.

२. ङि या शब्दामध्यें इकाराला गुणानें एकार करून जें ङे असें रूप तयार होतें, तें लाक्षणिक होय. लक्षणानें म्हणजे सूत्रानें केलें जातें तें लाक्षणिक. आणि चतुर्थ्येकवचनाच्या ङे या प्रत्ययाचें ङे असें स्वरूप मूळचेंच आहे. तेव्हां तें प्रतिपदोक्त होय.

३. तस्मै प्रभवति ( ५।१।१०१ ) हें सूत्र उच्चारतांना पाणिनीनें चतुर्थीच्या एकवचनाला स्मै आदेश ' सर्वनाम्नः स्मै' या पुढील सूत्रानें केला आहे, आणि 'तदस्यां प्रहरणम्' (४।२।५७) या सूत्रामध्यें अस्याम् येथें सप्तमीच्या एकवचनाला ङेराम् ( ७।३।११६ ) या सूत्रानें आम् आदेश केला आहे. तेव्हां पाणिनीच्या या उच्चारणावरून 'ङे' शब्दाचें रूप कोठें घ्यावें तें समजावें.

१. ( सू. १४ ) ऱ्हस्व अकार शेवटी असलेल्या सर्वनामशब्दाच्या पुढील ङे या प्रत्ययाला स्मै असा आदेश होतो, उदा० सर्वस्मै, विश्वस्मै.

स्मात्। अथो अत्रास्मिन्निति। एकादेशे कृतेऽत इति स्मायादयो न प्राप्नुवन्ति। किं पुनः कारणमेकादेशस्तावद्भवति न पुनः स्मायादयः। न परत्वात्स्मायादिभिर्भवितव्यम्। न भवितव्यम्। किं कारणम्। नित्यत्वादेकादेशः। नित्य एकादेशः। कृतेष्वपि स्मायादिषु प्राप्नोत्यकृतेष्वपि। नित्यत्वादेकादेशे कृतेऽत इति स्मायादयो न प्राप्नुवन्ति॥ किमुच्यतेऽश इति नेहापि कर्तव्यम्। अत्रास्मै। अत्रास्मात्। अत्रास्मिन्निति। एकादेशे कृतेऽत इति स्मायादयो न प्राप्नुवन्ति। आनुपूर्व्या सिद्धमेतत्। नात्राकृतेषु स्मायादिषु हलादिर्विभक्तिरस्ति हलादौ चेद्रूपलोपो न चाकृत इद्रूपलोप एकादेशः प्राप्नोति। तदानुपूर्व्या सिद्धम्॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम्।

न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ २ ॥

न वा कर्तव्यम्। किं कारणम्। बहि-

---

अथो अत्रास्मै, अथो अत्रास्मात्, अथो अत्रास्मिन्, येथें आकार एकादेश केला असतां 'ऱ्हस्व अकाराहून पर ङे वगैरे प्रत्ययांना स्मै वगैरे आदेश होतात' असे म्हटल्यामुळे स्मै वगैरे आदेश होणार नाहींत.

पण या ठिकाणीं अगोदर एकादेशच होईल आणि त्यानंतर स्मै वगैरे होणार नाहीत, असे होण्याचें काय कारण? मी म्हणतों, तसें नाहीं, तर परत्वास्तव स्मै वगैरे आदेशच संधि करण्यापूर्वी होतील.

स्मै वगैरे आदेश अगोदर होणार नाहींत.

काय म्हणून?

नित्यत्वास्तव एकादेश अगोदर होईल. एकादेश नित्य आहे. कारण स्मै वगैरे आदेश केल्यावरही एकादेश प्राप्त होतो व न केले असतांही प्राप्त होतो, तेव्हां एकादेश नित्य असल्यामुळे तो केला असतां ऱ्हस्व अकाराच्या पुढील ङे वगैरे प्रत्ययांना सांगितलेले स्मै वगैरे आदेश होणार नाहींत.

बरें पण, अश् आदेशाशीं झालेल्या एकादेशाबद्दलच काय म्हणून ही अडचण, म्हणजे निराळे स्मै वगैरे आदेशांचें विधान करण्याची आवश्यकता, उपस्थित व्हावी? मी म्हणतों, तसें नाहीं, तर अश् आदेश नसलेल्या अन्वादेशविरहित अशा 'अत्रास्मै', 'अत्रास्मात्' 'अत्रास्मिन्' या स्थळींही स्मै वगैरे आदेश सांगावे लागतील. कारण या ठिकाणींही 'आ' हा एकादेश केल्यावर ऱ्हस्व अकारान्ताच्या पुढील ङे वगैरे प्रत्ययांना सांगितलेले स्मै वगैरे आदेश होणार नाहींत.

'अत्रास्मै', 'अत्रास्मात्', 'अत्रास्मिन्', वगैरे उदाहरणांत ज्या क्रमानें कार्यें प्राप्त होतात त्या क्रमानें तीं केलीं असतां आपोआपच स्मै वगैरे आदेश सिद्ध होतात. कारण या ठिकाणीं स्मै वगैरे आदेश केल्याशिवाय व्यंजनानें आरंभ होणारा विभक्तिप्रत्ययच मिळत नाहीं; आणि व्यंजनानें आरंभ होणारा विभक्तिप्रत्यय पुढें असतानाच इदम् याच्या 'इद्' भागाचा लोप होत असतो; आणि इद् भागाचा लोप झाल्याशिवाय एकादेशाची प्राप्तीच नाहीं. तेव्हां 'अत्रास्मै', 'अत्रास्मात्', 'अत्रास्मिन्', हीं अन्वादेशाशिवाय असलेलीं जीं स्थळें त्या ठिकाणीं अगोदर एकादेशाची प्राप्तीच नसल्यानें वरील अडचण येत नाहीं, व स्मै वगैरे आदेश योग्य क्रमानें कार्यें केलीं असतां आपोआप घडून येतात. एकंदरींत अश् आदेशाला झालेल्या एकादेशाच्या स्थळीं स्मै वगैरे आदेशांचें निराळें विधान केलें पाहिजे.

(वा. २) अथवा निराळें विधान करण्याचें कारण नाहीं.

काय म्हणून?

---

२. इदम् शब्दापुढें ङे प्रत्यय करून इदम् शब्दाला 'इदमोऽन्वादेशे०' (२।४।३२) या सूत्रानें अन्वादेश असतांना अश् आदेश होतो. त्या अकाराचा त्याच्या पूर्वी अत्र या पदांतील शेवटच्या अकाराबरोबर संधी होऊन अत्रास्मै असें होतें. या वाक्यांत अथो शब्दानें अन्वादेश दाखविला आहे.

रङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गलक्षण एकादेशः । अन्तरङ्गाः स्मायादयः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**[ङसिङ्योः[1] स्मात्स्मिनौ॥७।१।१५॥**

**पूर्वादिभ्यो[1] नवभ्यो वा॥७।१।१६॥]**

**जसः शी ॥ ७।१।१७ ॥**

**जश्शसोः शिः ॥ ७।१।२० ॥**

किमर्थं शीभावः शिभावश्चोच्यते न शिभाव एवोच्येत । का रूपसिद्धिः ते ये के । आद्गुणेन सिद्धम् । नैवं शक्यम् । इह हि त्रपुणी जतुनी दीर्घश्रवणं न स्यात् ॥ एवं तर्हि शीभाव एवोच्यताम् । नैवं शक्यम् । इह हि कुण्डानि वनानीति ह्रस्वस्य श्रवणं न स्यात् ॥ तस्माच्छीभावः शिभावश्च वक्तव्यः॥

**औङ आपः ॥७।१।१८॥**

किमर्थो ङकारः । सामान्यग्रहणार्थः । औ इत्युच्यमाने प्रथमाद्विवचनस्यैव स्यात् ।अथा-

---

बहिरंगत्वामुळे दोन अकारांचे ठिकाणीं झालेला जो आकाररूपी एकादेश तो बहिरंग आहे, व स्मै वगैरे आदेश अन्तरंग आहेत. व ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' म्हणजे ' अंतरंगकार्य करावयाचें असले म्हणजे बहिरंग कार्य असिद्ध होतें' या परिभाषेमुळें अथो अत्रास्मै, वगैरे अन्वादेशांचे ठिकाणींही अगोदर स्मै वगैरे आदेश होतील व नंतर एकादेश होईल.

( सू. १७, २० ) या दोन सूत्रामध्यें 'शी' व 'शि' असे फक्त दीर्घ व ऱ्हस्व इतकाच भेद करून दोन निरनिराळे आदेश काय म्हणून सांगितले आहेत ? तसे सांगू नयेत; तर या चार सूत्रांमध्यें फक्त एकच 'शि' आदेश सांगावा.

ते, ये, के, हीं रूपें कशीं साधतील ?

त–इ, य–इ, क–इ, अशी स्थिति असता 'आद् गुणः' (६।१।८७) या सूत्रानें गुण होऊन रूपें सिद्ध होतील.

असें करणें शक्य नाहीं. जरी ते, ये, के, हीं रूपें 'इ' आदेशानें साधलीं तरी 'त्रपुणी', 'जतुनी', या उदाहरणांमध्यें ऱ्हस्व इ आदेश केला असतांना 'त्रपुणी', 'जतुनी', असा जो दीर्घ स्वर शेवटीं दिसतो तो दिसणार नाहीं.

तर मग दीर्घ स्वर शेवटीं असलेला ' शी ' आदेशच या चारही सूत्रामध्यें सांगावा.

तसेंही शक्य नाहीं. कारण दीर्घ शी आदेशच सर्व ठिकाणीं घेतला तर 'कुण्डानि', 'वनानि', या ठिकाणीं ऱ्हस्व स्वर ऐकूं येणार नाहीं; तर कुण्डानी, वनानी, अशीं भलतीं रूपें होतील. तेव्हां एकंदरींत काय निष्पन्न होतें ? दीर्घ शी आदेशही पाहिजे व ऱ्हस्व शि आदेशही पाहिजे.

( सू. १८ ) औङ् या ठिकाणीं ङकार कशाकरिता उच्चारला आहे ?

प्रथमेच्या द्विवचनाचा औ प्रत्यय व द्वितीयेच्या द्विवचनाचा औ प्रत्यय या दोन्ही प्रत्ययांचे

---

३. एकादेश हा येथें दोन पदांना होत असल्यामुळे बहिरंग आहे, आणि स्मै वगैरे आदेशांना अत्र या पदाची जरूर नसल्यामुळे त्यांना अंतरंग असें म्हणतां येतें.

१. ( सू. १५ ) ऱ्हस्व अकार शेवटी असलेल्या सर्वनाम शब्दाच्या पुढील ङसि आणि ङि या प्रत्ययांना क्रमानें स्मात् आणि स्मिन् असे आदेश होतात; उदा० सर्वस्मात्, विश्वस्मात्; सर्वस्मिन्, विश्वस्मिन् .

१ ( सू. १६ ) पूर्वपरावर० ( १।१।३४,३५, ३६ ) या तीन सूत्रांमध्यें उच्चारलेल्या पूर्व वगैरे नऊ सर्वनाम शब्दांच्या पुढील ङसि आणि ङि या प्रत्ययांना स्मात् आणि स्मिन् हे आदेश विकल्पानें होतात; उदा० पूर्वस्मात्, पूर्वात्, पूर्वस्मिन्, पूर्वे.

१. ( सू. १७ ) ऱ्हस्व अकार शेवटीं असलेल्या सर्वनाम शब्दाच्या पुढील जस् प्रत्ययाला शी आदेश होतो; उदा० सर्वे, विश्वे.

१. ( सू. २० ) नपुंसकलिंगामध्यें जस् आणि शस् या प्रत्ययांना ऱ्हस्व शि असा आदेश होतो; उदा०— वनानि सन्ति, वनानि पश्य.

१. ( सू. १८ ) आबन्त अंगाच्या पुढील औङ् म्हणजे प्रथमाद्विवचन व द्वितीयाद्विवचन या प्रत्ययांना शी असा आदेश होतो; उदा० रमे स्तः, रमे पश्य.

प्यौङित्युच्यत एवमपि द्वितीयाद्विवचनस्यैव स्यात् ॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति। ङित्कार्यं तु प्राप्नोति। खट्वे माले। याडापः [७.३.११३] इति याट् प्राप्नोति। नैष दोषः। नैवं विज्ञायते ङकार इदस्य सोऽयं ङित् ङितीति। कथं तर्हि। ङ एवेन्ङित् ङितीति। एवं सति वर्णग्रहणमिदं भवति वर्णग्रहणेषु चैतद्भवति यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहण इति। न दोषो भवति ॥ अथवा वर्णग्रहणमिदं भवति न चैतद्वर्णग्रहणेषु भवत्यननुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्येति ॥ अथवा पूर्वसूत्रनिर्देशोऽयं पूर्वसूत्रेषु च येऽनुबन्धा न तैरिहेत्कार्याणि क्रियन्ते ॥

---

सारखेंच ग्रहण व्हावें म्हणून.[२]

औङ्च्या ऐवजीं नुसतेंच 'औ' असें म्हटलें तर फक्त प्रथमेच्या द्विवचनाचा जो औ प्रत्यय त्याचेंच ग्रहण होईलें. बरें औट् असें येथें म्हटलें तर फक्त द्वितीयेच्या वचनाचा जो औ प्रत्यय त्याचेंच ग्रहण होईल. तेव्हां दोन्हींचेंही ग्रहण व्हावें म्हणून औङ् म्हटलें आहे.

हा उपयोग आहेच.

मग पुढें काय म्हणणें आहे ?

औङ् यांतील ङकार इत्संज्ञक समजल्यामुळें औ व औट् या प्रत्ययांना ङकार इत् असतांना सांगितलेलीं कार्यें प्राप्त होतात; उदा० खट्वे, माले. या उदाहरणांमध्यें 'याडापः' (७।३।११३) या सूत्रानें याड् आगम प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. कारण 'याडापः' या सूत्रांत अनुवृत्त असलेल्या 'ङिति' या पदांतील ङित् या शब्दाचा अर्थ ज्याचा ङकार इत् आहे तो असा घ्यावयाचा नाहीं.

तर कसा घ्यावयाचा ?

ङित् म्हणजे ङकार हाच जो इत् तो ङित् असा घ्यावयाचा.

असा अर्थ घेतला असतां ङित् या शब्दानें वर्ण समजला जातो ( म्हणजे प्रत्यय समजला जात नाहीं. ) तरी पण, वर्णग्रहण ज्या ठिकाणीं असतें त्या ठिकाणीं 'अल् म्हणजे वर्ण पुढें असतांना अशा रीतीनें जें कार्य सांगितलेलें असतें, तें कार्य त्या वर्णानें आरंभ झालेलें शब्दस्वरूप पुढें असतांना करावें' ही परिभाषा लागू होत असल्यामुळें येथें कांहीं दोष येत नाहीं.

अथवा या ठिकाणीं औ हें वर्णग्रहण आहे असेंच समजावें; आणि वर्णग्रहणाचे ठिकाणीं 'अननुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य' ही परिभाषा येत नाहीं.[६]

अथवा औङ् या पदांत आचार्य पाणिनींनीं त्यांच्या पूर्वींच्या वैयाकरणांनीं केलेल्या शब्दांचा उल्लेख केला आहे, आणि पूर्वींच्या वैयाकरणांच्या शब्दांत जे इत्संज्ञक वर्ण सांगितले आहेत, त्या इत्संज्ञकाच्या निमित्तानें या पाणिनीच्या व्याकरणशास्त्रांत इत्संज्ञकाला उद्देशून सांगितलेलीं जीं कार्यें आहेत तीं करावयाचीं नाहींत.

---

२. कारण पूर्वींच्या व्याकरणकारांनीं प्रथमाद्विवचन आणि द्वितीयाद्विवचन या दोघांनाही सारखेंच औङ् असें म्हटलें आहे.

३. कारण 'अननुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य' म्ह० इत्संज्ञकरहिताचें ग्रहण संभवत असतांना इत्संज्ञकसहिताचें ग्रहण करूं नये, अशी परिभाषा आहे.

४. आणि त्यामुळें इत्संज्ञक ङकाराला याडागम होतो, असा भलताच अर्थ होईल.

५. सूत्रामध्यें औङः येथील ङकार हा औ या वर्णाचा निर्देश स्पष्ट व्हावा याकरितांच फक्त उच्चारला आहे. जर ङकार लावला नाहीं तर औ या वर्णाची षष्ठी आवः अशी होऊन हा शी आदेश कोणाला सांगितला तें समजणार नाहीं. एकंदरींत, उच्चारलेल्या ङकाराकडे लक्ष न देतां औङः याचा अर्थ 'औ' इतकाच समजावा.

६. असें मानलें नाहीं तर 'भूभृति अत्र' या उदाहरणामध्यें सप्तमीच्या एकवचनाच्या ङि प्रत्ययांतील इकाराला 'इको यणचि' ( ६।१।७७ ) या सूत्रानें यण् होणार नाहीं.

औकारोऽयं शीविधौ ङिद् गृहीतो
ङिन्नास्माकं नास्ति कोऽयं प्रकारः ।
सामान्यार्थस्तस्य चासञ्जनेऽस्मि-
न्ङित्कार्ये ते श्यां प्रसक्तं स दोषः ॥१॥
ङित्त्वे विद्याद्वर्णनिर्देशमात्रं
वर्णे यत्स्यात्तच्च विद्यात्तदादौ ।
वर्णश्चायं तेन ङित्त्वेऽप्यदोषो
निर्देशोऽयं पूर्वसूत्रेण वा स्यात् ॥२॥

## [ नपुंसकाच्च ॥ ७ । १ । १९ ॥

## जश्शसोः शिः ॥ ७ । १ । २० ॥ ]

## अष्टाभ्य औश् ॥ ७ । १ । २१ ॥

**औशघौ**

औशघाविति वक्तव्यम् । किमिदमघाविति । अनुत्तरपद इति । किं प्रयोजनम् । इह मा भूत । अष्टपुत्रः अष्टभार्य इति ॥

**अस्तु लुकत्र**

अस्त्वत्रौश्त्वं लुग्भविष्यति ॥

**षड्भ्योऽप्येवं प्रसज्यते ।**

इहापि तर्हि प्राप्नोति । अष्टौ तिष्ठन्ति । अष्टौ पश्येति ॥

**अपवादः**

अपवादत्वादत्रौश्त्वं लुकं बाधिष्यते ॥ इहापि तर्हि बाधेत । अष्टपुत्रः अष्टभार्यः ।

**यस्य विषये**

यस्य लुको विषय औश्त्वं तस्यापवादः ॥

---

(श्लो. १)शी आदेश करण्याकरितां औ प्रत्ययाला येथें ङकार इत्संज्ञक जोडला आहे. ङकार इत्संज्ञक जोडलेला औ प्रत्यय तर आमचेकडे नाहीं, तेव्हां हा काय प्रकार आहे ? जर ङकार इत्संज्ञक जोडण्याचें कारण औ व औट् या दोन्ही प्रत्ययांचें ग्रहण व्हावें असेंच असेल तर औ व औट् या दोन्ही प्रत्ययांना होणाऱ्या शी आदेशाला इत्संज्ञक असल्यामुळें जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं होऊं लागतील, असा दोष येईल.

(श्लो. २) या दोषाचें निराकरणः येथील ङित्त्वाविषयीं 'ङ् जो इत्' अशा तऱ्हेनें वर्णाचा निर्देश केला आहे असें समजावें; आणि वर्णाचा निर्देश समजला म्हणजे वर्णाला सांगितलेलें कार्य त्या वर्णानें आरंभ होणाऱ्या शब्दस्वरूपाला होईल. अथवा, औङ् हाच वर्णनिर्देश समजावा; म्हणजे ङित्वामुळें दोष येणार नाहींत. अथवा औङ् हा पूर्वाचार्यांच्या सूत्रांतील जो प्रत्यय त्याचाच निर्देश घेऊं.

(सू. २१ वा. १) हा आदेश घु पुढें नसतांना होतो असें सांगावें.

येथें हें 'अघौ' पद कोणत्या अर्थानें घातलें आहे ?

अघौ म्हणजे घु पुढें नसतांना म्हणजे उत्तरपद पुढें नसतांना या अर्थानें घातलें आहे.

हें अघौ पद घालण्याचें कारण काय ?

कारण हेंच कीं अष्टपुत्रः, अष्टभार्यः, या ठिकाणीं औश् होऊं नये.

होईना औश् झाला तर ? त्याचा लुक् ( २।४।७१ ) होईल.

तर मग षड्भ्यो लुक् या सूत्रानें सांगितलेलाही लुक् होऊं लागेल; आणि तसें झालें तर अष्टौ तिष्ठन्ति, अष्टौ पश्य, या ठिकाणींही औश् आदेशाचा लुक् होईल.

लुक् होणार नाहीं. औश् हा लुकाचा अपवाद असल्यामुळें तो लुकाचा बाध करील.

तर मग अष्टपुत्रः, अष्टभार्यः, याही ठिकाणीं 'सुपो धातु०' ( २।४।७ ) यानें सांगितलेल्या लुकाचा तो बाध करील.

असें होणार नाहीं; कारण ज्या लुकाच्या विषयामध्यें औश् आदेश सांगितला आहे त्या

---

१. ( सू. १९ ) नपुंसकलिंगी शब्दाच्या पुढील प्रथमा द्विवचन आणि द्वितीया द्विवचन या प्रत्ययांना शी असा आदेश होतो; उदा० शाने स्तः, वने पश्य.

१. ( सू. २० ) या सूत्राचें भाषांतर पान २४ वर टीपेंत दिलें आहे.

१. ( सू. २१ ) अष्टन् शब्दाच्या नकाराला अकार केल्यानंतर त्या अष्ट याच्या पुढील जस् आणि शस् या प्रत्ययांना औश् असा आदेश होतो; उदा० अष्टौ, परमाष्टौ.

२. अष्टपुत्रः या समासामध्यें अष्टन् शब्दाच्या पुढील जस् प्रत्ययाला औशघौ हें वचन नसल्यास औश् आदेश होईल.

यो वा तस्मादनन्तरः ॥ १ ॥

अथवानन्तरस्य लुको बाधकं भविष्यति । कुत एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति ॥ अथेह कस्मान्न भवत्यौश्त्वम् । अष्ट तिष्ठन्ति । अष्ट पश्येति ॥

आत्वं यत्र तु तत्रौश्त्वम्

यत्रैवात्वं तत्रैवौश्त्वेन भवितव्यम् । कुत एतत् ।

तथा ह्यस्य ग्रहः कृतः ।

तथा ह्यस्यात्वभूतस्य ग्रहणं क्रियते । अष्टाभ्य इति । ननु च नित्यमात्वम् । एतदेव ज्ञापयत्याचार्यो विभाषात्वमिति यदयमात्वभूतस्य ग्रहणं करोति । अष्टाभ्य इति । इतरथा ह्यष्टन इत्येव ब्रूयात् ॥

औश्भावस्तु लुकत्र
षड्भ्योऽप्येवं प्रसज्यते ।
अपवादो यस्य विषये
यो वा तस्मादनन्तरः ॥ १ ॥
आत्वं यत्र तु तत्रौश्त्वं
तथा ह्यस्य ग्रहः कृतः ।
[6]स्वमोर्लुक्च त्यदादीनां
कृते ह्यत्वे न लुग्भवेत् ॥ २ ॥

[ षड्भ्यो लुक्[1] ॥ ७।१।२२ ॥ ]

[1]स्वमोर्नपुंसकात् ॥ ७।१।२३ ॥

स्वमोर्लुक्त्यदादिभ्यश्च ॥ १ ॥

स्वमोर्लुक्त्यदादिभ्यश्चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । तद्ब्राह्मणकुलमिति । किं

---

लुकाचाच औश् आदेश बाध करतो.[3]

अथवा दोन्हींपैकीं जो जवळचा लुक् त्या लुकाचाच औश् आदेश बाध करील.

असें काय म्हणून ?

कारण 'विधि काय किंवा निषेध काय, याचा होतो कीं त्याचा होतो असा संशय आला असतां जें जवळचें शास्त्र असते त्याचाच होतो' अशी परिभाषा आहे म्हणून.

बरें तर, 'अष्ट तिष्ठन्ति' 'अष्ट पश्य', असे जे प्रयोग दृष्टीस पडतात त्या ठिकाणीं औश् आदेश कां होत नाहीं ?

(वा. २) ज्या ठिकाणीं नकाराला आ होतो त्या ठिकाणीं औश् आदेश होतो, असें आहे म्हणून.

असें कसें म्हणतां येतें ?

तशा रीतीने म्हणजे आकारान्त 'अष्टाभ्यः' असा अष्टा शब्द उच्चारला[4] आहे म्हणूनें.

बरें पण, आत्व नित्य आहे त्याची वाट काय ?

तसें नाहीं. या प्रस्तुत ठिकाणींच आचार्य पाणिनींनीं 'अष्टाभ्यः' असें आकार केलेल्या अष्ट शब्दाचें उच्चारण केलें आहे यावरून ते असें सुचवितात की आकारादेश विकल्पानें होतो. जर विकल्पानें व्हावा असें नसतें तर ते 'अष्टन:' असेच बोलले असते.[5]

(सू. २३ वा १) हा जो सु आणि अम् या प्रत्ययांचा लुक् सांगितला आहे हा त्यद् वगैरे सर्वनामांहून पुढें असलेल्या सु आणि अम् या प्रत्ययाचा मुद्दाम निराळा सांगावा. म्हणजे तद् ब्राह्मणकुलम् वगैरे उदाहरणें साधतील.

---

३. 'अष्टाभ्य औश्' या सूत्रानें सांगितलेला औश् आदेश ज्या ज्या ठिकाणीं प्राप्त होतो त्या त्या सर्व ठिकाणीं 'षड्भ्यो लुक्' (७।२।२२) या सूत्राची जशी प्राप्ति येते तशी 'सुपो धातु०' ( २।४।७१) याची सर्व ठिकाणीं प्राप्ति येत नाहीं.

४. सूत्रामध्यें अष्टाभ्यः हें जें पाणिनीनें उच्चारिलें आहे तें अष्टन् शब्दाला पंचमी लावून केलें आहे असें समजूं नये. तर अष्टा या शब्दस्वरूपाला पंचमी लावून अष्टाभ्यः असें उच्चारिलें आहे, असें समजावें.

५. म्हणजे वैकल्पिक नाहीं. तेव्हां 'अष्ट तिष्ठन्ति' वगैरे प्रयोगांची उपपत्ति होत नाहीं.

६. ही ओळ येथें प्रसंगानें दिली आहे. वास्तविक हा विचार पुढील 'स्वमोर्नपुंसकात्' या सूत्रासंबंधीं आहे.

१. (सू. २२) षट्संज्ञक शब्दांच्या पुढील प्रथमाबहुवचनाचा जस् आणि द्वितीयाबहुवचनाचा शस् या प्रत्ययांचा लुक् होतो; उदा० पञ्च, सप्त, अष्ट.

१. ( सू. २३ ) नपुंसकलिंगी शब्दांच्या पुढील प्रथमैकवचनाचा सु, आणि द्वितीयैकवचनाचा अम् या प्रत्ययांचा लुक् होतो; उदा०-वारि, मधु, अस्ति, पश्य.

पुनः कारणं न सिध्यति ।

कृते ह्यत्वे न लुग्भवेत् ।

अत्वे कृते लुग्न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । अत्वं क्रियतां लुगिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादत्वम् । नित्यो लुक् । कृतेऽप्यत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि । अनित्यो लुग्न हि कृतेऽत्वे प्राप्नोति । अतोऽम् [७. १. २४] इत्यम्भावेन भवितव्यम् । तस्मात्त्यदादिभ्यश्चेति वक्तव्यम् ॥

इदं विचार्यते शिशीलुग्नुम्विधिषु नपुंसकग्रहणं शब्दग्रहणं वा स्यादर्थग्रहणं वेति । कश्चात्र विशेषः ।

**शिशीलुग्नुम्विधिषु नपुंसकग्रहणं शब्दग्रहणं चेदन्यपदार्थे प्रतिषेधः ॥ २ ॥**

शिशीलुग्नुम्विधिषु नपुंसकग्रहणं शब्दग्रहणं चेदन्यपदार्थे प्रतिषेधो वक्तव्यः । बहुत्रपुः बहुत्रपू बहुत्रपव इति । अस्तु तर्ह्यर्थग्रहणम् ॥ यद्यर्थग्रहणं प्रियसक्थ्ना ब्राह्मणेनेत्यनङ् न प्राप्नोति । अस्तु तर्हि शब्दग्रहणमेव । ननु चोक्तं शिशीलुग्नुम्विधिषु नपुंसकग्रहणं शब्दग्रहणं चेदन्यपदार्थे प्रतिषेध इति ।

---

पण एवढीं काय म्हणून हीं उदाहरणें साधत नाहींत ?

कारण, आधीं त्यद् वगैरे सर्वनामांच्या शेवटीं 'त्यदादीनामः' ( ७।२।१०१ ) या सूत्रानें अकार केला म्हणजे मागाहून लुक् होणार नाहीं. ( कारण, 'अतोऽम्' ( ७।२।२४ ) यानें लुकाचा बाध होईल. ) या ठिकाणीं हें पहावें लागतें कीं प्रथम शेवटच्या वर्णाला अकार करावा कीं प्रथम प्रत्ययाचा लुक् करावा ?

मग येथें काय बरें करावे ?

परत्वामुळें अगोदर अकार करावा असें दिसतें.

पण लुक् नित्य आहे. कारण अकार केल्यावरही तो प्राप्त होतो, तसाच अकार केला नसतांही तो प्राप्त होतो.

लुक् अनित्य आहे. कारण अकार केल्यावर लुक् प्राप्त होत नाहीं. तेथें 'अतोऽम्' ( ७।१।२४ ) या सूत्रानें लुकाचा बाध करून 'सु' ला अमादेश होईल. म्हणून, एकंदरींत 'स्वमोर्नपुंसकात्' या सूत्रांत 'त्यदादिभ्यश्च' असें म्हटलें पाहिजे.

या ठिकाणीं पुढील विचार करावाः– 'शि' आदेश, 'शी'आदेश, लुक् आणि नुम्[२] सांगणाऱ्या सूत्रांत उच्चारलेला नपुंसक हा शब्द शब्दाला उद्देशून वापरला आहे कीं अर्थाला उद्देशून वापरला आहे ?

दोन्ही तऱ्हांमध्यें फरक काय ?

( वा. २ ) शि, शी, लुक् आणि नुम् सांगणाऱ्या सूत्रांत नपुंसक हा शब्द शब्दाला उद्देशून वापरला असेल तर ज्या ठिकाणीं नपुंसकलिंगी शब्दाचा ( बहुव्रीहिसमासानें ) दुसरा कोणता तरी पदार्थ हा अर्थ होतो त्या ठिकाणीं या शि आदेश, शी आदेश वगैरे विधींचा प्रतिषेध करावा लागेल; उदाहरणार्थ [३]बहुत्रपुः बहुत्रपू बहुत्रपवः.

तर मग अर्थाला उद्देशून वापरला आहे असें समजावें.

जर अर्थाला उद्देशून वापरला आहे असें समजलें तर 'प्रियसक्थ्ना ब्राह्मणेन' या उदाहरणांत 'अस्थिदधि०' ( ७।१।७५ ) या सूत्रानें अनङ् आदेश होणार नाहीं.

तर मग शब्दाला उद्देशून नपुंसकशब्द वापरला आहे असें होऊं द्या.

पण वरतींच नाहीं का दोष दिला कीं शि, शी, लुक् आणि नुम् सांगणाऱ्या सूत्रांत नपुंसक

---

२ नपुंसकस्य झलचः ( ७।१।७२ ) या सूत्रानें नुम् सांगितला आहे.

३. कारण, या ठिकाणीं त्रपु हा शब्द नपुंसकलिंगी आहे. अर्थ मात्र नपुंसकलिंगी नाहीं. बहुव्रीहिसमास केल्यामुळें समासांतील त्रपुशब्दाला अर्थ नाहीं, आणि बहुव्रीहीचा जो अर्थ आहे तो पुंलिंगी आहे.

**सिद्धं तु प्रकृतार्थविशेषणत्वात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रकृतस्यार्थो विशेष्यते । किं च प्रकृतम् । अङ्गम् । अङ्गस्य शिशीलुग्नुमो भवन्ति नपुंसके वर्तमानस्य ॥ कथं प्रियसक्थ्ना ब्राह्मणेन ।

**अस्थ्यादिषु शब्दग्रहणम् ॥ ४ ॥**

अस्थ्यादिषु नपुंसकग्रहणं शब्दग्रहणं द्रष्टव्यम् ॥

युक्तं पुनरिदं विचारयितुम् । नन्वनेनासंदिग्धेनार्थग्रहणेन भवितव्यं न हि नपुंसकं नाम शब्दोऽस्ति । किं तर्ह्युच्यतेऽस्थ्यादिषु शब्दग्रहणमिति । अत्राप्यर्थग्रहणमेव ॥ अत्रैतावान्संदेहः क्व प्रकृतस्यार्थो विशेष्यते क्व गृह्यमाणस्येति । शिशीलुग्नुम्विधिषु प्रकृतस्यार्थो विशेष्यतेऽस्थ्यादिषु गृह्यमाणस्य ॥

**[ अतोऽम् ॥ ७।१।२४ ]**

---

हा शब्द शब्दाला उद्देशून वापरला असेल तर ज्या ठिकाणीं नपुंसकलिंगी शब्दाचा अर्थ दुसरा पदार्थ असतो, त्या ठिकाणीं या 'शि'आदेश,'शी' आदेश, वगैरे विधींचा प्रतिषेध करावा लागेल ?

(वा. ३ ) असा दोष न येतां इष्ट रूप सिद्ध होतें.

तें कसें ?

प्रकृत जो शब्द त्याच्या अर्थाला नपुंसक हें विशेषण केलें जाईल.

प्रकृत शब्द कोणता ?

अङ्ग शब्द प्रकृत आहे. अंग जर नपुंसकलिंगी असेल तर त्या ठिकाणीं 'शि', 'शी', 'लुक्' आणि 'नुम्' होतात, असा अर्थ करावयाचा.[४]

तर मग ' प्रियसक्थ्ना ब्राह्मणेन ' याची उपपत्ति कशी लावावयाची ?

( वा. ४ ) अस्थि, दधि वगैरे शब्दांना सांगितलेल्या अनङ् वगैरे विधींविषयीं ' नपुंसकस्य ' हा शब्द सूत्रोच्चारित शब्दाला उद्देशून वापरला आहे,[५] असें म्हणावें म्हणजे झालें.

पण खरें पाहिलें असतां खालीं लिहिल्या प्रमाणें विचार करावा:—निःसंशय, येथील 'नपुंसक' शब्द अर्थाला उद्देशूनच वापरला आहे; कारण नपुंसकलिंगी असा कोणताही शब्द नसतो.[६]

तर मग वर, अस्थि, दधि, वगैरे शब्दांना सांगितलेल्या अनङ् वगैरे विधींविषयीं ' नपुंसकस्य ' हा शब्द शब्दाला उद्देशून वापरला आहे असें कसें बोलतां येईल ?

तसें नाहींच बोलावयाचें. 'अस्थिदधि० ' येथेंही अर्थाला उद्देशूनच ' नपुंसकस्य ' शब्द वापरला आहे. संशयाची बाबत कोठें ' नपुंसकस्य ' हें प्रस्तुत शब्दाच्या अर्थाला विशेषण होतें, आणि कोठें सूत्रामध्यें उच्चारलेल्या शब्दाच्या अर्थाला[७] विशेषण होतें, येवढीच. 'शि'आदेश, 'शी'आदेश, लुक्, नुम् या विधींविषयीं 'नपुंसकस्य' हें प्रस्तुत ' अङ्गस्य' याच्या अर्थाचें विशेषण आहे. ' अस्थिदधि० ' सूत्रात उच्चारलेले जे अस्थि, दधि वगैरे शब्द त्यांच्या अर्थाचें नपुंसकस्य हें विशेषण आहे.

---

४. तेव्हां येथें बहुपुत्र हें अंग नपुंसकलिंगी नसल्यामुळें दोष येत नाहीं.

५. म्हणजे तेथें अंग नपुंसकलिंगीं पाहिजे असा अर्थ करूं नये. फक्त अस्थि वगैरे शब्द नपुंसकलिंगी पाहिजेत असा अर्थ करावा.

६. अमुक शब्द पुंल्लिंगी आहे व अमुक शब्द स्त्रीलिंगी आहे असें जें लोकांमध्यें म्हटलें जातें तें केवळ औपचारिक होय. कारण वास्तविक विचार केला असतां लिंग हें सर्व ठिकाणीं अर्थालाच असतें.

७. मागून चालू असलेल्या अङ्गस्य या शब्दाच्या अर्थाला.

१. (सू. २४) नपुंसकलिंगामध्यें ऱ्हस्व अकार शेवटीं असलेल्या अंगाच्या पुढील प्रथमैकवचनाचा सु आणि द्वितीयैकवचनाचा अम् या प्रत्ययांना अम् असा आदेश होतो; उदा० ज्ञानम् , वनम्. हा लुकाचा अपवाद आहे.

**अद्ड्डतरादिभ्यः पञ्चभ्यः ॥ ७।१।२५ ॥**

**अद्भावे पूर्वसवर्णप्रतिषेधः ॥ १ ॥**

अद्भावे पूर्वसवर्णस्य प्रतिषेधो वक्तव्यः । कतरत्तिष्ठति । कतरत्पश्य ॥

**सिद्धमनुनासिकोपधत्वात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अनुनासिकोपधोऽच्छब्दः करिष्यते ॥

**दुक्करणाद्वा ॥ ३ ॥**

अथवा दुग्डतरादीनामिति वक्ष्यामि ॥

**डित्करणाद्वा ॥ ४ ॥**

अथवा डिदच्छब्दः करिष्यते ॥ स तर्हि डकारः कर्तव्यः । न कर्तव्यः । क्रियते न्यास एव । द्विडकारको निर्देशः । अद्ड्डतरादिभ्य इति ॥

**नेतराच्छन्दसि ॥ ७ । १ । २६ ॥**

**इतराच्छन्दसि प्रतिषेध एकतरात्सर्वत्र ॥ १ ॥**

इतराच्छन्दसि प्रतिषेध एकतरात्सर्वत्रेति वक्तव्यम् । एकतरं तिष्ठति । एकतरं पश्य ॥

**नपुंसकादेशेभ्यो युष्मदस्मदोर्विभक्त्यादेशा विप्रतिषेधेन ॥ २ ॥**

नपुंसकादेशेभ्यो युष्मदस्मदोर्विभक्त्यादेशा भवन्ति विप्रतिषेधेन। नपुंसकादेशा-

---

(सू. २५ वा. १) या सूत्रानें सांगितलेल्या अद् आदेशाविषयीं पूर्वसवर्णदीर्घाचा[1] प्रतिषेध बोलावा; उदाहरणार्थ कतरत् तिष्ठति, कतरत्पश्यति.

(वा. २) प्रतिषेधाशिवाय रूप सिद्ध होतें.

तें कसे ?

हा अदादेश ज्याची अनुनासिक उपधा असा म्हणजे अकार अनुनासिक आहे असा उच्चारिला जाईल.[3]

( वा. ३ ) अथवा डतर, डतम, वगैरेंना दुक् असा आगम होतो असें म्हणूं.[4]

( वा. ४ ) अथवा येथील अद् आदेशाला इत्संज्ञक डकार जोडला म्हणजे झालें.

तर मग जोडा तो डकार.

जोडण्याचें कारण नाहीं. डकार जोडूनच अद् शब्द उच्चारलेला आहे. येथें 'अद्ड्डतरादिभ्यः०' असे दोन डकार असलेलेंच सूत्र उच्चारलेलें आहे.

( सू. २६, वा. १) इतर या शब्दाहून पुढें असलेल्या सु व अम् या प्रत्ययांना होणाऱ्या अद्ड् आदेशाचा वेदामध्यें प्रतिषेध बोलावा असें ज्या सूत्रांत सांगितलें आहे त्याच या सूत्रांत 'एकतर' शब्दाहून पुढें असलेल्या सु व अम् या प्रत्ययाना सर्व ठिकाणीं अद्ड् आदेश होत नाहीं, असेंही बोलावें; उदा०–एकतरं तिष्ठति, एकतरं पश्य.

(वा. २) नपुंसकलिंगी शब्दांहून पुढें असलेल्या प्रत्ययांना होणारे जे आदेश त्यांच्यापेक्षां अगोदर युष्मद् व अस्मद् या शब्दांच्या पुढें विभक्तिप्रत्ययांना सांगितलेले जे आदेश ते विप्रतिषेधानें (१।४।२) होतात. स्पष्टीकरण करावयाचें म्हणजे–नपुंसकलिंगी शब्दाहून पुढें असलेल्या

---

१. (सू. २५ ) डतर, डतम, हे प्रत्यय शेवटीं असलेले जे शब्द तसेंच अन्य, अन्यतर आणि इतर हे जे शब्द, या पांच शब्दांच्या पुढील सु आणि अम् या प्रत्ययांना अद्ड् असा आदेश नपुंसकलिंगामध्यें होतो; उदा० कतरत्, कतमत्, इतरत्.

२. या सूत्रामध्यें अद्ड् असा जो आदेश सांगितला आहे त्यामध्यें शेवटचा डकार नाहीं, नुसता अद् असाच आदेश आहे, असें मनांत घेऊन वार्तिककार येथें पूर्वसवर्णदीर्घाचा ( ६।१।१०२ ) प्रतिषेध करीत आहेत.

३. म्हणजे त्या अकाराला 'उपदेशे०'(१।३।२) या सूत्रानें इत्संज्ञा होऊन 'तस्य लोपः' ( १।३।९ ) यानें लोप होईल, तेव्हां अद् या आदेशापैकीं फक्त दकारच अवशिष्ट राहत असल्यामुळें पूर्वसवर्णदीर्घाची प्राप्ति न येतां कतरत् हें रूप सिद्ध होईल.

४. म्हणजे 'अद्ड् डतरादिभ्यः' असें सूत्र न करतां 'डुक् डतरादिभ्यः' असें सूत्र करावें.

१. (सू. २६ ) वेदामध्यें इतर या शब्दाच्या पुढील सु आणि अम् या प्रत्ययांना अद्ड् आदेश होत नाहीं.

नामवकाशः। त्रपु त्रपुणी त्रपूणि। युष्मदस्मदोर्विभक्त्यादेशानामवकाशः। त्वं ब्राह्मणः अहं ब्राह्मणः। युवां ब्राह्मणौ आवां ब्राह्मणौ। यूयं ब्राह्मणाः वयं ब्राह्मणाः। इहोभयं प्राप्नोति। त्वं ब्राह्मणकुलम् अहं ब्राह्मणकुलम्। युवां ब्राह्मणकुले आवां ब्राह्मणकुले। यूयं ब्राह्मणकुलानि वयं ब्राह्मणकुलानि। युष्मदस्मदोर्विभक्त्यादेशा भवन्ति विप्रतिषेधेन॥ अथेदानीं युष्मदस्मदोर्विभक्त्यादेशेषु कृतेषु पुनःप्रसङ्गाच्छिशीलुङ्नुम्विधयः कस्मान्न भवन्ति। सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति॥

## युष्मदस्मद्भ्यां ङसोऽश् ॥७।१।२७॥

किमर्थः शकारः। सर्वादेशार्थः। शित्सर्वस्येति सर्वादेशो यथा स्यात्। नैतदस्ति प्रयोजनम्। अक्रियमाणेऽपि शकारेऽलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्याकारे कृते त्रयाणामकाराणामतो गुणे पररूपत्वे सिद्धं

---

प्रत्ययांना होणाऱ्या आदेशांचीं उदाहरणें त्रपु[2] त्रपुणी त्रपूणि वगैरे आहेत; तसेंच युष्मद् व अस्मद् या शब्दांहून पुढें असलेल्या विभक्तींना होणाऱ्या आदेशांचीं उदाहरणें त्वं ब्राह्मणः अहं[3] ब्राह्मणः, युवां ब्राह्मणौ, आवां ब्राह्मणौ, यूयं ब्राह्मणाः, वयं ब्राह्मणाः वगैरे; तसेंच, त्वं ब्राह्मणकुलं, अहं ब्राह्मणकुलम्[4], युवां ब्राह्मणकुले, आवां ब्राह्मणकुले, यूयं ब्राह्मणकुलानि, वयं ब्राह्मणकुलानि या ठिकाणीं दोन्ही तऱ्हेचे आदेश एकदम प्राप्त होतात; त्यांमध्यें युष्मद् व अस्मद् शब्दाहून पुढील विभक्तींना सांगितलेले जे आदेश ते विप्रतिषेधानें होतात.

बरें पण, हे युष्मद्, अस्मद्, इत्यादि शब्दांहून पुढें असणाऱ्या विभक्तींना सांगितलेले जे आदेश ते झाल्यानंतर शि, शी, लुक् आणि नुम् हे विधी होऊं शकतात; तेव्हां ते कां होऊं नयेत? न होण्याचें कारण कीं एकदां प्राप्त होऊन विप्रतिषेधानें बाधित झालेलें जे कार्य तें बाधित झालेलेंच समजावें, असा नियम आहे म्हणून.[5]

(सू. २७) अश्[1] आदेशांतील शकाराचें काय कारण?

उच्चारलेल्या समग्र स्थानीला आदेश व्हावा म्हणून 'ज्यांचा शकार इत् आहे' असा आदेश संपूर्ण स्थानीचे ठिकाणीं होतो या नियमाला (१।१।५) अनुसरून सर्वादेश होतो.

हा उपयोग देतां येत नाहीं. कारण जरी येथें शकार जोडला नाहीं तरी[2] 'अमक्याला अमुक होतें असें सांगितलेलें कार्य ज्या शब्दाला सांगितलेलें असतें त्याच्या शेवटचा वर्णाला होतें' (१।१।५२) या नियमाप्रमाणें शेवटच्या स् या वर्णाला अकार होईल, व तीनही अकारांना[3]

---

२. त्रपु या ठिकाणीं प्रत्ययाला आदेश 'स्वमोर्नपुंसकात्' (७।१।२३) या सूत्रानें लुक् झाला आहे. तसेंच त्रपुणी येथें 'नपुंसकाच्च' (७।१।१९) या सूत्रानें औ प्रत्ययाला दीर्घ शी आदेश झाला आहे. तसेंच त्रपूणि येथें जस् आणि शस् प्रत्ययांना 'जश्शसोः०' (७।१।२०) या सूत्रानें शि आदेश झाला आहे. येथें युष्मद् किंवा अस्मद् हे शब्द नसल्यामुळें त्यांच्या पुढील प्रत्ययांना सांगितलेले आदेश प्राप्त होत नाहींत.

३. येथें ङेप्रथमयोरम् (७।१।२८) या सूत्रानें युष्मद् व अस्मद् या शब्दांच्या पुढील एकवचनाच्या द्विवचनाच्या व बहुवचनाच्या प्रत्ययांना अम् आदेश झालेला आहे; व नपुंसकलिंग नसल्यामुळें नपुंसकलिंगामध्यें होणाऱ्या आदेशांची प्राप्ति नाहीं.

४. या ठिकाणीं युष्मद् व अस्मद्, हे शब्दही आहेत आणि नपुंसकलिंगही आहे, म्हणून येथें दोन्ही प्रकारचे आदेश प्राप्त होतात.

५. म्हणजे बाधक कार्य झाल्यानंतर बाधित कार्य पुनः प्राप्त झालें तरी होत नाहीं.

१. (सू. २७) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांच्या पुढील षष्ठीच्या एकवचनाच्या ङस् या प्रत्ययाला अस् असा आदेश होतो; या आदेशामध्यें शकार इत्संज्ञक आहे; उदा० तव, मम.

२. म्हणजे नुसता अकारादेश सांगितला तरी.

३. तव, मम, या उदाहरणामध्यें तव, मम, हे आदेश झाल्यानंतर त्यांतील शेवटचा अकार, पुढील ङस् प्रत्ययाचा पहिला अकार आणि ङस् प्रत्ययांतील

रूपं स्यात् तव स्वम् मम स्वम्। यद्येतल्लभ्येत कृतं स्यात्। तत्तु न लभ्यम्। किं कारणम्। अत्र हि तस्मादित्युत्तरस्यादेः परस्य [ १. १. ६७; ५४ ] इत्यकारस्य प्रसज्येत ॥ अत उत्तरं पठति।

**ङस आदेशे शित्करणानर्थक्यमकारस्याकारवचनानर्थक्यात् ॥ १ ॥**

ङस आदेशे शित्करणमनर्थकम्। किं कारणम्। अकारस्याकारवचनानर्थक्यात्। अकारस्याकारवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वान्तरेण शकारं सर्वादेशो भविष्यति ॥

**अर्थवत्त्वादेशे लोपार्थम् ॥ २ ॥**

अर्थवत्त्वकारस्याकारवचनम्। कोऽर्थः। आदेशे लोपार्थम्। यः स शेषे लोपः [ ७. २. ९० ] आदेशे स विज्ञायते। ननु चादेशो या विभक्तिरित्येवमेतद्विज्ञायते। आदेश एषा विभक्तिः। कथम्।

सर्वे सर्वपदादेशा दाक्षीपुत्रस्य पाणिनेः।
एकदेशविकारे हि नित्यत्वं नोपपद्यते ॥

---

'अतो गुणे' ( ६।१।९७ ) या सूत्रानें पररूप होऊन काम भागेल, व 'तव स्वम्' 'मम स्वम्' ( तव मम ) हीं रूपें साधतील.

असें होणें शक्य असतें तर पाणिनीनें तसें केलेंच असतें पण तसें घडून येणें शक्य नाहीं.

काय म्हणून ?

कारण कीं प्रस्तुत ठिकाणीं 'तस्मादित्युत्तरस्य' ( १।१।६७ ), 'आदेः परस्य' ( १।१।५४ ) या दोन नियमांमुळें अस् प्रत्ययाचा आदि जो अकार त्यालाच अ आदेश होऊं लागेल.

हें सर्व मनांत घेऊनच पुढील वार्तिक पढलें आहे व शकार इत् केला नसताही अस् या संपूर्ण प्रत्ययाला अ आदेश होईल असें दाखविलें आहे.

( वा. १ ) 'ङस्' प्रत्ययाला सांगितलेल्या 'अश्' आदेशांतील शकार हा इत्संज्ञक करण्याचें कांहीं कारण नाहीं. तें कसें तर सर्वादेश न केल्यास आरंभींच्या केवळ अकाराला अकारादेश करण्यांत कांहीं अर्थ नाहीं म्हणून. तेव्हां अकाराला अकारादेश करण्यांत कांहीं अर्थ नाहीं या कारणानेंच शकार इत् केला नसतांही संपूर्ण अस् प्रत्ययाला अ आदेश होईल.

( वा. २ ) या ठिकाणीं अकारालाच अकार झाला तरी त्याचा उपयोग आहे.

तो उपयोग कोणता ?

आदेश केल्यावर 'शेषे लोपः' या सूत्रानें लोप होण्याकरितां. 'शेषे लोपः' या सूत्रानें जो लोप सांगितला आहे तो आदेश पुढें असतांनाच सांगितला आहे.

बरें पण, 'शेषे लोपः' या सूत्रांत आदेश जी विभक्ति असा अर्थ करावयाचा आहे.

येथें विभक्ति ही आदेशविभक्ती आहे.

तें कसें ?

सर्व आदेश संपूर्ण शब्दालाच होतात असें दाक्षीपुत्र पाणिनीचें मत आहे. कारण, शब्दाच्या एका भागालाच विकार होतो असें म्हटल्यास शब्दाच्या नित्यत्वाचें समर्थन करतां येत नाहीं.

---

सकाराला ह्या प्रकृत सूत्रानें झालेला अकार, असे तीन अकार होतात.

४. शेषे लोपः ( ७।२।९० ) या सूत्राच्या मागें युष्मदस्मदोरनादेशे (७।२।८६ ) या सूत्रामध्यें 'अनादेशे' असें म्हटलें आहे. त्या अनादेशापेक्षां शेष म्हणजे आदेश असा अर्थ शेषे या पदापासून बोधित होतो.

५. अकाराला अकार केला असतां अस् या विभक्तीपैकीं अ हा एक भाग आदेश होतो. अस् ह्या सबंध विभक्तीला आदेश म्हणतां येत नाहीं.

६. ज्या ठिकाणीं पाणिनीनें अनर्थक अशा एक वर्णाला किंवा वर्णसमुदायाला आदेश सांगितला असेल त्या ठिकाणीं बाकींचे इतर वर्ण त्या स्थानी आणि आदेश या दोहोंमध्यें जमा धरून अर्थवान् स्थानी आणि अर्थवान् आदेश अशी कल्पना करावी; जसें: 'एरुः' ( ३। ४।८६ ) या सूत्रानें भवतु या उदाहरणामध्यें ति या प्रत्ययाच्या इकाराला उकार होतो. म्हणजे तेथें इकाराचा

## तस्माच्छित्करणम् ॥ ३ ॥

तस्माच्छकारः कर्तव्यः ॥ न कर्तव्यः । क्रियते न्यास एव । कथम् । प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । अ अ अ इति । सोऽनेकाल्शित्सर्वस्य [ १. १. ५५ ] इति सर्वस्य भविष्यति ॥

## ङे प्रथमयोरम् ॥७।१।२८॥

प्रथमयोरित्युच्यते कयोरिदं प्रथमयोर्ग्रहणं किं विभक्त्योराहोस्वित्प्रत्यययोः । विभक्त्योरित्याह । कथं ज्ञायते । अन्यत्रापि हि प्रथमयोर्ग्रहणे विभक्त्योर्ग्रहणं विज्ञायते न प्रत्यययोः । क्वान्यत्र । प्रथमयोः पूर्वसवर्णः [ ६. १. १०२ ] इति ॥ अस्ति कारणं येन तत्र विभक्त्योर्ग्रहणं विज्ञायते । किं कारणम् । अचीति तत्र वर्तते न चाजादी प्रथमौ प्रत्ययौ स्तः । ननु चैवं विज्ञायतेऽजादी यौ

---

(वा. ३) तेव्हां एकंदरींत काय? शकाराची जरूर असल्यांमुळें शकार जोडावा.

जोडण्याची जरूर नाहीं. कारण शकार जोडल्याशिवायच अनेक अल् असलेला आदेश उच्चारला आहे.

तो कसा?

येथें अ हा दोन अकारांचा संधि करूनच उच्चारला आहे. व तो 'अ अ' हा आदेश दोन अलांचा असल्यामुळें तो 'अनेकाल्शित्सर्वस्य' ( १।१।५५ ) या सूत्रानें संपूर्ण ङस् प्रत्ययाला होईल.

(सू. २८) सूत्रामध्यें 'प्रथमयोः' असा शब्द घातला आहे. तेव्हां प्रारभींचे दोन या ठिकाणीं कोण घ्यावयाचे? दोन विभक्ती कां दोन प्रत्यये[२]? प्रारंभींच्या दोन विभक्ती असें म्हणूं.

असेंच कशावरून समजतें?

कारण, इतर ठिकाणींही 'प्रथमयोः' असा शब्द जेव्हां उच्चारला आहे तेव्हां प्रारंभींच्या दोन विभक्तींचेंच ग्रहण केलें आहे, प्रत्ययांचें केलें नाहीं.

इतर ठिकाणीं म्हणजे कोठें?

उदाहरणार्थ, प्रथमयोः पूर्वसवर्णः ( ६।१।१०२ ) येथें.

पण तेथें पहिल्या दोन विभक्तीच घेण्याला कारण आहे.

काय कारण आहे?

तेथें 'अचि' या शब्दाची अनुवृत्ति येत आहे. 'प्रथमयोः या शब्दानें जर पहिले दोन प्रत्यय

---

नाश होतो आणि उकाराची उत्पत्ति होते असें गृहीत धरलें तर अर्थातच शब्द अनित्य आहे असें मानावें लागेल. आतां येथें पूर्वी सांगितल्याप्रमाणें ति याला तु हा आदेश होतो अशी आनुमानिक कल्पना केली तर शब्द अनित्य आहेत हा दोष येत नाहीं. कारण, ति हा अर्थवान् असल्यामुळें नि याच्या उच्चारणाची प्राप्ति आली असतां तेथें तु असें उच्चारण करावें असें 'एरुः' या सूत्राचें तात्पर्य मानतां येतें. एकंदरींत, भवतु वगैरे उदाहरणांमध्यें शब्द नित्य असल्यामुळें तु हा मूळचाच आहे; तो या सूत्रानें नवीन झालेला नाहीं. फक्त कोणी चुकून आज्ञार्थी भवति असा प्रयोग करतील तर तो त्याचा भ्रम दूर व्हावा एवढ्याकरितांच पाणिनीनें हें शास्त्र रचिलें आहे. उच्चारणाचा प्रसंग हा अनर्थक शब्दाला संभवत नाहीं. कारण वक्ता हा अर्थाचा बोध व्हावा म्हणून शब्द उच्चारीत असतो.

७. अकाराला अकारादेश प्राप्त झाला तरी वर दाखविल्याप्रमाणें आनुमानिक कल्पनेनें अस् याला अस् आदेश होतो असें गृहीत धरतां येईल. आणि त्यामुळें आदेश विभक्ति होत असल्यामुळें 'शेषे लोपः' यानें लोप होणें हा अकाराला अकार सांगण्याचा उपयोग संभवतो. तेव्हां तो व्यर्थ होत नसल्यामुळें त्याच्या जोरावर 'आदेः परस्य' ही परिभाषा दूर सारतां येत नाहीं. तेव्हां अर्थातच अकार हा आदेश सर्व अस् प्रत्ययांना झाला पाहिजे; म्हणून शकाराची जरूर आहे.

१. (सू. २८ ) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांच्या पुढील चतुर्थीच्या एकवचनाचा ङे प्रत्यय आणि प्रथमा व द्वितीया या विभक्तींचे प्रत्यय यांना अम् असा आदेश होतो.

२. म्हणजे फक्त सु आणि औ हे दोन प्रत्यय.

प्रथमावजादीनां वा यौ प्रथमाविति । यत्तर्हि तस्माच्छसो नः पुंसि [ ६. १. १०३ ] इत्यनुक्रान्तं पूर्वसवर्णं प्रतिनिर्दिशति तज्ज्ञापयत्याचार्यो विभक्त्योर्ग्रहणमिति ॥ इहाप्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति विभक्त्योर्ग्रहणमिति यदयं शसो न [ ७. १. २९ ] इति प्रतिषेधं शास्ति । नैष प्रतिषेधः । नत्वमेतद्विधीयते । सिद्धमत्र नत्वं तस्माच्छसो नः पुंसीति । यत्र तेन न सिध्यति तदर्थम् । क्व च तेन न सिध्यति । स्त्रियां नपुंसके च । युष्मान्ब्राह्मणीः पश्य अस्मान्ब्राह्मणीः पश्य । युष्मान्ब्राह्मणकुलानि पश्य अस्मान्ब्राह्मणकुलानि पश्येति ॥ यत्तर्हि युष्मदस्मदोरनादेशे द्वितीयायां च [ ७. २. ८६; ८७ ] इत्याह तज्ज्ञापयत्याचार्यो विभक्त्योर्ग्रहणमिति ॥

[ शसो न ॥ ७ । १ । २९ ॥ ]

भ्यसोऽभ्यम् ॥ ७ । १ । ३० ॥

किमयं भ्यम्शब्द आहोस्विदभ्यम्शब्दः ।

---

घेतले तर त्यांना अचि हें विशेषण संभवत नाहीं.[३]

स्वरानें आरंभ होणारे असे जे पहिले दोन प्रत्यय[४], किंवा स्वरानें आरंभ होणाऱ्या प्रत्ययांपैकीं जे पहिले दोन असा अर्थ घेण्यांत येईल.

बरें तर, 'तस्माच्छसो नः पुंसि' (६।१।१०३) या सूत्रांत तस्मात् या पदानें मागील सूत्रांतील पूर्वसवर्णदीर्घाचा ज्या अर्थी परामर्श केला आहे, त्या अर्थी आचार्य सुचवितात की प्रथमयोः या शब्दानें तेथें पहिल्या दोन विभक्तीच घ्यावयाच्या[५]. प्रस्तुत स्थलीं सुद्धां आचार्यांची लिहिण्याची पद्धत सुचविते कीं पहिल्या दोन विभक्तींचेंच ग्रहण करावयाचें; कारण त्यांनीं पुढें 'शसो न' या सूत्रानें 'ङे प्रथमयोरम्' या सूत्रानें सांगितलल्या अमादेशाचा प्रतिषेध केला आहे.[६]

'शसो न' या सूत्रांत निषेध सांगितला नाहीं तर या सूत्रांत नकारादेशाचें विधान केलें आहे.

पण येथें नकारादेश सांगण्याचा उपयोग नाहीं; कारण 'तस्माच्छसो नः पुंसि' या सूत्रानें नकारादेश होतच आहे.

पण ज्या ठिकाणीं 'तस्माच्छसो नः पुंसि' यानें नकारादेश होत नाहीं, त्या ठिकाणीं 'शसो न' या सूत्रानें नकारादेश व्हावयास पाहिजे.

असें कोणतें ठिकाण कीं ज्या ठिकाणीं 'तस्माच्छसो०' यानें नकारादेश होणार नाहीं ?

स्त्रीलिंग किंवा नपुंसकलिंग विवक्षित असतां. उदाहरणार्थ युष्मान् ब्राह्मणीः पश्य, अस्मान् ब्राह्मणीः पश्य, युष्मान् ब्राह्मणकुलानि पश्य, अस्मान् ब्राह्मणकुलानि पश्य, वगैरे वाक्यांतील युष्मान् व अस्मान् रूपें घ्या.

तर मग ज्या अर्थी 'युष्मदस्मदोरनादेशे' या सूत्रानंतर 'द्वितीयायां च' असें आचार्य सूत्र करतात त्या अर्थी ते असें सुचवितात कीं येथें पहिल्या दोन विभक्तींचेंच ग्रहण करावयाचें.[७]

(सू. ३०) काय, या ठिकाणीं 'भ्यम्' हा शब्द घ्यावयाचा कीं 'अभ्यम्' शब्द घ्यावयाचा ?

---

३. कारण दोन प्रत्ययांपैकीं पहिला सु हा प्रत्यय अजादि म्हणजे स्वरानें आरंभिलेला नाहीं.

४. म्हणजे औ आणि जस् हे दोन प्रत्यय.

५. स्वरानें आरंभ होणारे पहिले दोन प्रत्यय म्हणजे औ किंवा जस् हे घेतले तर द्वितीयाबहुवचनाचा शस् हा प्रत्यय त्या दोहोंपैकीं नाहीं. तेव्हां तेथें पूर्वसवर्ण दीर्घाची प्राप्तिच येत नाहीं. तेव्हां तस्मात् यानें केलेला परामर्श संभवणार नाहीं.

६. तेव्हां अर्थातच द्वितीयाबहुवचनाच्या शस् या प्रत्ययाला अम् या आदेशाची प्राप्ति दाखविली पाहिजे. म्हणून प्रथमयोः या पदानें प्रथमा आणि द्वितीया या दोन विभक्ती घेतल्या जातात.

७ जर प्रथमयोः या पदानें औ आणि जस् हेच दोन प्रत्यय घेतले तर द्वितीया विभक्तीला अ हा आदेश होत नसल्यामुळें 'युष्मदस्मदोरनादेशे' (७।२।८६) या सूत्रानेंच आत्व सिद्ध होईल; आणि त्याकरितां मुद्दाम केलेलें 'द्वितीयायां च' (७।२।८७) हें सूत्र व्यर्थ होईल.

१ (सू. २९) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांच्या पुढील शस् प्रत्ययाच्या अकाराला नकार होतो; उदा० युष्मान्, अस्मान्.

१. (सू. ३०) युष्मद् आणि अस्मद् यांच्या

कुतः संदेहः। समानो निर्देशः। किं चातः। यदि तावद् भ्यम्शब्दः शेषे लोपश्चान्त्यस्यैत्त्वं प्राप्नोति। अथाभ्यम्शब्दः शेषे लोपश्च टिलोप उदात्तनिवृत्तिस्वरः प्राप्नोति ॥ यथेच्छसि तथास्तु। अस्तु तावद् भ्यम्शब्दः शेषे लोपश्चान्त्यस्य। ननु चोक्तमेत्त्वं प्राप्नोतीति। नैष दोषः। अङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिर्निष्ठितस्येति न भविष्यति॥ अथवा पुनरस्त्वभ्यम्शब्दः शेषे लोपश्च टिलोपः। ननु चोक्तमुदात्तनिवृत्तिस्वरः प्राप्नोतीति। नैष दोषः। उक्तमेतदादौ सिद्धमिति॥

**[ पञ्चम्या अत् ॥ ७।१।३१ ॥**

**एकवचनस्य च ॥ ७।१।३२ ॥ ]**

**साम आकम् ॥ ७।१।३३ ॥**

किमर्थमामःससकारस्य ग्रहणं क्रियते न आम आकमित्येवोच्येत। केनेदानीं ससका-

---

हा संशय काय म्हणून?

कारण दोन्ही शब्द घेतले तरी संधि झाल्यावर भ्यसोभ्यम् असेच सूत्र होतें.

बरें तर भ्यम् व अभ्यम् या दोन्हींत फरक काय?

जर येथें भ्यम् शब्द घेतला आणि पूर्वीच्या युष्मद् किंवा अस्मद् या शब्दांच्या शेवटचा जो दकार त्याचा लोप होतो असा शेषे लोपः(७।२।९०) या सूत्राचा अर्थ होतो हा येथें पक्ष घेतला तर शेवटच्या अकाराला एकार (७।३।१०३) प्राप्त होतो; बरें जर 'अभ्यम्' शब्द घेतला आणि 'शेषे लोपः' या सूत्रानें टि म्हणजे शेवटचा जो अद् भाग त्याचा लोप होतो असा पक्ष घेतला तर 'अनुदात्तस्य च यत्रोदात्तलोपः' (६।१।१६१) या सूत्रानें उदात्ताची निवृत्ति झाल्यानें होणारा जो अंतोदात्त स्वर तो होईल.

बरें तर, जसें पाहिजे असेल तसें होऊं दे. 'भ्यम्' आदेश होऊं दे आणि 'शेषे लोपः' यानें शेवटच्या दकाराचा लोपही होऊं दे; रूप साधेल.

पण आतांच सांगितलें ना कीं दकाराचा लोप केल्यावर मागील अकाराला एकार होऊं लागेल?

एत्व होणें हा दोष येणार नाहीं. कारण, 'एक अंगकार्य होऊन रूप बनलें म्हणजे नंतर पुनः जरी अंगकार्य प्रवृत्त झालें तरी तें होत नाहीं.'

अथवा अभ्यम् आदेश असूं दे व 'शेषे लोपः' या सूत्रानें शेवटच्या अद् भागाचा लोप होऊं दे.

पण तसें झालें तर वरच दोष दाखविला ना कीं उदात्ताची निवृत्ती झाल्यामुळें होणारा अंतोदात्त स्वर होईल?

हा दोष येत नाहीं. कारण 'आदौ सिद्धम्' (६।१।१६१ वा. ४) म्हणजे आदिस्वरालों उदात्त केला म्हणजे रूप साधतें हें सांगितलेंच आहे.

(सू. ३३.) या सूत्रांत 'सामः' असें सकार जोडून आम् प्रत्ययाचें उच्चारण काय म्हणून

---

पुढील भ्यस् प्रत्ययाला भ्यम् किंवा अभ्यम् असा आदेश होतो; उदा० युष्मभ्यम्, अस्मभ्यम्.

२. 'शेषे लोपः' या सूत्रामध्यें दोन पक्ष आहेत; युष्मद् व अस्मद् या शब्दांतील शेवटच्या दकाराचा लोप होतो हा एक पक्ष, आणि त्या शब्दांतील अद् याचा लोप होतो हा दुसरा पक्ष.

३. तेव्हां एत्व हें अंगाधिकारांत सांगितलें असल्यामुळें तें होत नाहीं. कारण त्याच्या पूर्वी 'शेषे लोपः' हें एक अंगाधिकारांत सांगितलेलें कार्य होऊन युष्मभ्यम् असें रूप बनलें आहे.

४. अनुदात्तस्य च० (६।१।१६१) या सूत्रानें जरी उदात्त झाला तरी तो अभ्यम् यांतील आरंभींच्या अकाराला होईल; तेव्हां कोणताही दोष येत नाहीं.

१. (सू. ३१) युष्मद् आणि अस्मद् यांच्या पुढील पञ्चमीच्या भ्यस् प्रत्ययाला अत् आदेश होतो; उदा० युष्मत्, अस्मत्.

१. (सू. ३२) युष्मद् आणि अस्मद् यांच्या पुढील पंचमीच्या एकवचनाच्या ङसि प्रत्ययालाही अत् आदेश होतो; उदा० त्वत्, मत्.

१. (सू. ३३) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांच्या पुढील षष्ठीबहुवचनाच्या साम् याला आकम् असा आदेश होतो.

रस्य भविष्यति । आमः सुडयं भक्त आम्ग्रहणेन ग्राहिष्यते ॥ अत उत्तरं पठति ।

**साम्ग्रहणं यथागृहीतस्यादेशवचनात् ॥ १ ॥**

साम्ग्रहणं क्रियते । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवं ससकारस्य न प्राप्नोति । इष्यते च स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति साम आकम् । एवमर्थमिदमुच्यते ॥

**न वा द्विपर्यन्तानामकारवचनादामि सकाराभावः ॥ २ ॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति । किं कारणम् । द्विपर्यन्तानामकारवचनात् । द्विपर्यन्तानां द्वि त्यदादीनामत्वमुच्यते तेनामि सकारो न भविष्यति ॥

**सुट्प्रतिषेधस्त्वादेशे लोपविज्ञानात् ॥ ३ ॥**

सुट्प्रतिषेधस्तु वक्तव्यः । किं कारणम् । आदेशे लोपविज्ञानात् । यः स शेषे लोपः [ ७. २. ९० ] आदेशे स विज्ञायते ॥

**न वा टिलोपवचनादादेशे टाप्प्रतिषेधार्थम् ॥ ४ ॥**

न वा सुट्प्रतिषेधो वक्तव्यः । किं कारणम् । टिलोपवचनात् । आदेशे यः स शेषे

---

केलें आहे ? तसें उच्चारण करूं नये. 'आम आकम्' असेंच सूत्र असूं दे.

तसें केलें तर सकारसहित आम् प्रत्ययाला कसा आकम् आदेश होईल ?

कां बरें ? सकार हा आम् प्रत्ययाचा अवयव असल्यामुळें आम् जेथें घ्यावयाचा तेथें सकारसहितही आम् घेतला जाईल.

ही शंका मनांत घेऊन पुढील उत्तर वार्तिककारांनीं दिलें आहेः——

( वा. १ ) येथें 'साम्' असें उच्चारण केलें आहे. कारण तसें उच्चारण केलें नाहीं तर 'जेवढया भागाचें स्थानी म्हणून स्पष्ट उच्चारण केलें आहे तेवढयालाच आदेश होतात' असा नियम असल्यामुळें सकारसहित आम् प्रत्ययाला आकम् आदेश होणार नाहीं. आपणाला तर 'साम्' यालाच व्हावयास पाहिजे, आणि तें होणें प्रयत्न केल्याशिवाय शक्य नाहीं; म्हणन 'साम आकम्' असें मुद्दाम सकारसहित उच्चारण केलें आहे.

( वा २. ) अथवा हें प्रयोजन देतां येत नाहीं.

काय म्हणून ?

द्वि शब्दापर्यंतच्याच सर्वनाम शब्दांना 'त्यदादीनामः' ( ७।२।१०२ ) यानें अत्व होतें. तेव्हां युष्मद् व अस्मद् या शब्दाना अत्व होत नसल्यामुळें त्याच्या पुढील आम् प्रत्ययाला सुट् आगम होणार नाहीं.

( वा. ३ ) पण जरी 'त्यदादीनामः' या सूत्रानें युष्मद् व अस्मद् या शब्दांच्या शेवटीं अकार झाला नाहीं तरीसुद्धां सुट् आगमाचा प्रतिषेध बोलावाच लागेल.

काय म्हणून ?

आकम् आदेश केला असतां 'शेषे लोपः' या सूत्रानें युष्मद् व अस्मद् येथील शेवटच्या दकाराचा लोप होईल. 'शेषे लोपः' या सूत्रानें जो लोप सांगितला आहे तो आदेश पुढें असतांना सांगितला आहे.[6]

( वा. ४ ) अथवा सुट् आगमाचा प्रतिषेध सांगण्याची जरूर नाहीं.

काय म्हणून ?

---

२. 'आमि सर्वनाम्नः सुट्' ( ७।१।५२ ) या सूत्रानें सुट् आगम सांगितला आहे त्याचाच हा सकार असल्यामुळें हा आम् प्रत्ययाचा अवयव आहे असें म्हणतां येतें.

३. 'यदागमास्तद्गुणीभूताः०' या परिभाषेनें.

४. 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' (६।४।१३०)

या परिभाषेनें.

५. कारण तेथें अवर्णान्त अंगाच्या पुढील आम् प्रत्ययाला सुट् सांगितला आहे.

६. म्हणजे आकम् आदेश केल्यानंतर लोपाची प्राप्ति येत आहे.

लोपष्टिलोपः स वक्तव्यः । किं प्रयोजनम् । टाप्प्रतिषेधार्थम् । टाब्मा भूदिति ॥ स तर्हि टिलोपो वक्तव्यः ।

## न वा लिङ्गाभावाट्टिलोपवचनानर्थक्यम् ॥ ५ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । लिङ्गाभावात् । अलिङ्गे युष्मदस्मदी । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । न ह्यस्ति विशेषो युष्मदस्मदोः स्त्रियां पुंसि नपुंसके वा ॥ अस्ति कारणं येनैतदेवं भवति । किं कारणम् । योऽसौ विशेषवाची शब्दस्तद्सांनिध्यात् । अत्र हि भवांस्तमुच्चारयतु गंस्यते स विशेषः ॥ ननु च नैतेनैवं भवितव्यम् । न हि शब्दनिमित्तकेन नामार्थेन भवितव्यम् । किं तर्हि । अर्थनिमित्तकेन नाम शब्देन भवितव्यम् । तदेतदेवं दृश्यतामर्थरूपमेवैतदेवंजातीयकं येनात्र विशेषो न गम्यत इति । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । यो हि मन्यते योऽसौ विशेषवाची शब्दस्तद्सांनिध्यादत्र विशेषो न गम्यत इतीहापि तस्य विशेषो न गम्येत दृषत् समिदिति ॥

---

टिलोप सांगितला आहे म्हणूनं. 'शेषे लोपः' या सूत्रानें आदेश पुढें असतांना जो लोप सांगितला आहे तो तर टि भागाचा म्हणजे शेवटच्या अद् भागाचा सांगितलाच पाहिजे.

कशाकरितां ?

टापाचा प्रतिषेध होण्याकरितां; म्हणजे टाप् न व्हावा याकरितां.

तर मग तो टि भागाचा लोप होतो असें सांगा.

(वा. ५) टि भागाचा लोप होतो असें म्हणावयास नको.

काय म्हणून ?

लिंग नाहीं म्हणून. युष्मद् व अस्मद् ह्या शब्दांना लिंग नाहीं.

कसें बरें असें बोलावें ? असें बोलूं नये. कारण आचार्यांनीं जें सांगितलें नाहीं तें कसें बोलता येईल ?

युष्मद् व अस्मद् शब्द यांना लिंग नाहीं असें बोलण्याचें कारण असें आहे कीं युष्मद् व अस्मद् या शब्दांचा प्रयोग करतांना स्त्रीलिंगाची, पुंलिंगाची किंवा नपुंसकलिंगाची, कोणत्याही लिंगाची, विवक्षा असतांनाही रूपांमध्यें फरक दिसत नाहीं.

फरक दिसत नाहीं याला कारण निराळेंच आहे.

तें कोणतें कारण ?

लिंगामध्यें फरक दाखविणारा जो स्त्रीप्रत्यय टाप् किंवा त्यासारखा दुसरा शब्द तेथें नाहीं म्हणून. तसा शब्द येथें उच्चारून पहा बरें. स्त्रीलिंगाचा बोध होईलच.

पण ही गोष्ट अशी नसते. कारण शब्दावर अर्थ अवलंबून नसतो.

मग कोण कशावर अवलंबून असतो ?

अर्थावर अवलंबून शब्द असतो. आणि या दृष्टीनें विचार करून ध्यानांत घ्या कीं युष्मद् व अस्मद् या शब्दांमध्यें असाच कांहीं अर्थ आहे कीं ज्या अर्थामध्यें लिंगामुळें कांहींच फरक दिसावयाचा नाहीं. आणि अशा तऱ्हेचें स्पष्टीकरण येथें अवश्यच स्वीकारलें पाहिजे. कारण कीं 'लिंगामधील फरक दाखविणारा जो स्त्रीप्रत्यय टाप् किंवा त्यासारखा दुसरा शब्द तो तेथें नाहीं म्हणून कोणत्याही लिंगाची विवक्षा असो, युष्मद् व अस्मद् ह्या शब्दांच्या रूपामध्यें फरक दिसत नाहीं' असें जो मानतो त्याचे मतीं दृषत्, समिध्, वगैरे उदाहरणांमध्येंही लिंगविवक्षेमुळें

---

७. 'शेषे लोपः' या सूत्रामध्यें शेषे हें पद 'शेषस्य' अशा अर्थाचें आहे. आणि मकारापर्यंतच्या भागाच्या पुढील जो शेष भाग अद् त्याचा लोप होतो. अद् याला 'अचोऽन्त्यादि टि' ( १।१।६४ ) या सूत्रानें टि संज्ञा असल्यामुळें तेथें टिलोप असें म्हटलें आहे.

८. तेव्हां जरी अद् याचा लोप न होतांना नुसत्या दकाराचा झाला तरी स्त्रीलिंगच नाहीं, म्हणून टाप् प्रत्यय होणार नाहीं.

## तस्मात्सुट्प्रतिषेधः ॥ ६ ॥

तस्मात्सुट्प्रतिषेधो वक्तव्यः ससकारग्रहणं वा कर्तव्यम् ॥ अथ क्रियमाणेपि ससकारग्रहणे कस्मादेवात्र सुड् न भवति । ससकारग्रहणसामर्थ्याद्भाविनः सुट आदेशो विज्ञायते ॥

## आत औ णलः ॥ ७।१।३४ ॥

इह पपौ तस्थाविति त्रीणि कार्याणि युगपत्प्राप्नुवन्ति द्विर्वचनमेकादेश औत्वमिति। तद्यदि सर्वत औत्वं लभ्येत कृतं स्यात् । अथापि द्विर्वचनं लभ्येतैवमपि कृतं स्यात् । तत्तु न लभ्यम् । किं कारणम् । अत्र हि परत्वादेकादेशो द्विर्वचनं बाधते। परत्वादौत्वम्। नित्य एकादेश औत्वं बाधेत ॥ कं पुनर्भवानौत्वस्यावकाशं मत्वाह नित्य एकादेश इति । अनवकाशमौत्वमेकादेशं बाधिष्यते ।

---

फरक दिसणार नाहीं; व दृषद् व समिध् हे शब्द युष्मद् व अस्मद् शब्दांसारखेच लिंगरहित आहेत असें मानावें लागेल.

( वा. ६ ) एकंदरीत युष्मद् व अस्मद् या शब्दांहून पुढें असणाऱ्या आम् प्रत्ययाला सुडागम होत नाहीं असें बोललें पाहिजे, अथवा सकारयुक्त आम् प्रत्ययाला आकम् होतो अशा अर्थाचें 'साम आकम्' असेंच शब्द सूत्रांत घातले पाहिजेत.

बरें तर, सकारसहित 'सामः' असें उच्चारण केलें तरी प्रस्तुत उदाहरणांत आम् प्रत्ययाला आकम् केल्यानंतर युष्म+आकम् असें असतां सुट् आगम कां होत नाहीं ?

सूत्रामध्यें 'साम आकम्' असें सकारसहित उच्चारण केलें आहे तें व्यर्थ होईल म्हणून त्याचे जोरावर, म्हणजे तें व्यर्थ न व्हावें याकरितां, पुढे होणारा जो सुडागम त्याचेसहित आम् प्रत्ययाला आकम् आदेश होतो असें येथें मानावें लागतें.

(सू. ३४) पपौ, तस्थौ, या ठिकाणीं पा+अ ( णल् ) अशी स्थिति असतांना द्वित्व ( ६।१।८), आ व अ यांचे जागीं सवर्णदीर्घ एकादेश ( ६।१।१०१ ) व अचे ठिकाणीं औ आदेश ( ७।१।३४ ), हीं तीन कार्यें एकदम उपस्थित होतात. त्यांमध्यें औकारादेश हा जर इतर सर्वांपेक्षां अगोदर करता आला असता तरी काम झालें असतें; तसेंच द्वित्व घ्या, तें सुद्धा जर अगोदर करतां आलें असतें तरी काम झालें असतें, परंतु तसें करतां येत नाहीं.

काय म्हणून ?

कारण, या ठिकाणीं बोलावयाचें म्हणजे सवर्णदीर्घ एकादेश हा परत्वास्तव द्वित्वाचा बाधक आहे.

तर मग बरेंच झालें. त्या एकादेशाचाही परत्वास्तव बाध करून अगोदर औत्व होईल.

पण एकादेश हा नित्य असल्यामुळें औकारादेशाचा बाध करील ना ?

पण औत्वाला कोणतें स्वतंत्र स्थळ देऊन आपण एकादेश नित्य असल्यामुळें त्या औत्वाचा बाध करून त्याच्या अगोदर होईल असें म्हणतां ? खरें पाहिल्यास औत्वाला कोणत्याही

---

९. तेव्हां लिंग नसल्यामुळेंच टाप् होत नाहीं. म्हणून दकाराचा लोप होतो असें मानलें असतां हरकत नाहीं. तेव्हां दकाराचा लोप झाला असतां मागें अकारान्त भाग राहत असल्यामुळें सुडागम होऊं लागेल, त्याचा निषेध केला पाहिजे.

१०. तात्पर्य, आकम् आदेश केल्यानंतर जो सुडागमानें सकार होतो त्याची निवृत्ति सामः असें सकारसहित उच्चारण केल्यानें होतें.

१. (सू. ३४ ) आकारान्त धातूच्या पुढील णल् प्रत्ययाला औकारादेश होतो, उदा० दधौ, पपौ.

२. लिट् प्रत्यय करून त्याला परस्मैपदी प्रथमपुरुषी एकवचनाचा जो तिप् प्रत्यय होतो त्याला 'परस्मैपदानां णल०' (३।४।८२) या सूत्रानें णल् आदेश होत असतो. त्यांतील णकार आणि लकार इत्संज्ञक आहेत.

३. पा+अ असें असतांना सवर्णदीर्घ हा एकादेश प्राप्त होतो; आणि औकार केल्यानंतर पा+औ अशी स्थिति असतां वृद्धि हा एकादेश प्राप्त होतो. तेव्हां पा+औ येथें सवर्णदीर्घ जरी प्राप्त होत नाहीं तरी

औत्वे कृते द्विर्वचनमेकादेश इति यद्यपि परत्वादेकादेशः स्थानिवद्भावाद् द्विर्वचनं भविष्यति ॥

[ तुह्योस्तातङ्ङाशिष्यन्यतरस्याम् ॥ ७।१।३५॥ ]

विदेः शतुर्वसुः ॥ ७।१।३६ ॥

विदेर्वसोः कित्त्वम् ॥ १ ॥

विदेर्वसोः कित्त्वं वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । वसुग्रहणेषु लिडादेशस्यापि ग्रहणं यथा स्यात् । किं च कारणं न स्यात् । अननुबन्धकग्रहणे हि सानुबन्धकस्य ग्रहणं नेत्येवं लिडादेशस्य न प्राप्नोति सानुबन्धको हि स क्रियते ॥ किं पुनः कारणं स सानुबन्धकः क्रियते । अयमृकारान्तानां लिटि गुणः प्रतिषेधविषय आरभ्यते स पुनः कित्करणाद्बाध्यते । आतिस्तीर्वान् निपुपूर्वानिति ॥ स तर्ह्यस्यैवमर्थोऽनुबन्धः कर्तव्यः ।

---

उदाहरणांत स्वतंत्र जागा मिळत नाहीं म्हणून औत्व हें एकादेशाचा बाध करील. आणि औकारादेश झाल्यावर द्वित्व व एकादेश हे दोन्ही प्राप्त होतात त्यांमध्यें जरी परत्वास्तव एकादेश झाला तरी स्थानिवद्भावानें द्वित्व होईल.

( सू. ३६, वा. १ ) विद् धातूहून केलेल्या शतृ प्रत्ययाचे जागीं झालेला वस् आदेश कित् समजावा, असें बोलावें; म्हणजे केवळ 'वसु' असें ज्या ठिकाणीं उच्चारण केलें असेल त्या ठिकाणीं प्रस्तुत वसु आदेशच केवळ नव्हे तर लिटाचे ठिकाणीं झालेला क्वसु आदेशही वसुशब्दानें समजला जाईल.

पण प्रस्तुत 'वसु' आदेश कित् केला नाहीं तर 'वसु'उच्चारानें 'क्वसु'चें का नाहीं ग्रहण होणार ?

कारण कीं 'इत्संज्ञक वर्ण न जोडतां एकाद्या शब्दाचें उच्चारण केलें असतां इत्संज्ञकरहित जर शब्द मिळाला तर तोच घ्यावा, इत्संज्ञक वर्ण जोडलेला शब्द घेऊं नये' अशी परिभाषा आहे; म्हणून लिटाला झालेल्या क्वसु आदेशाचे 'वसु'शब्दानें ग्रहण होणार नाहीं; कारण लिटाला सांगितलेल्या 'वसु'आदेशाला ककार इत्संज्ञक जोडला आहे.

क्वसु या आदेशांत ककार इत्संज्ञक जोडण्याचें कारण काय ?

कारण हेंच की 'आतिस्तीर्वान्,' 'निपुपूर्वान्' वगैरे रूपें साधतेवेळीं लिटामध्यें सर्वसाधारण गुणाचा निषेध असता त्या निषेधाचा बाध करून 'ऋच्छत्यृताम्' ( ७।४।११ ) या सूत्रानें ऋकारान्त धातूंना जो गुण सांगितला आहे त्याचा बाध क्वसु प्रत्ययाचा ककार इत्संज्ञक करण्यानें व्हावा. एकंदरींत प्रकृत सूत्रामध्यें 'वसु' या आदेशाला इत्संज्ञक वर्ण लाविला पाहिजे.

---

कोणता तरी एकादेश प्राप्त होतो या दृष्टीनें एकादेशाला येथें नित्य असें म्हटलें आहे.

४. 'द्विर्वचनेऽचि' (१।१।५९) या सूत्रानें स्थानिवद्भाव सांगितला आहे. तेथें आदेश झाल्यानंतर पुनः स्थानीसारखें रूप प्राप्त होत असतें.

१. ( सू. ३५ ) आशीर्वाद या अर्थी लोट् प्रत्यय केला असता तेथें प्रथमपुरुषी एकवचनाचा तु आणि मध्यमपुरुषी एकवचनाचा हि ह्या दोन प्रत्ययांना तातङ् असा आदेश विकल्पानें होतो. तातङ् यांतील ङकार इत्संज्ञक आहे; अकार उच्चारणार्थ आहे; तात् एवढाच भाग अवशिष्ट राहतो. उदा० भवतु, भवतात्; भव, भवतात्.

१. ( सू. ३६ ) विद् धातूच्या पुढील शतृ प्रत्ययाला वसु असा आदेश होतो. वसु यांतील उकार इत्संज्ञक आहे. उदा० विद्वान् विद्वांसौ विद्वांसः.

२. म्हणजे तो क्वसु असा प्रत्यय आहे असें मानावें.

३. वसोः संप्रसारणम् (६।४।१३१) वगैरे सूत्रांमध्यें.

४. 'क्वसुश्च' (३।२।१०७)वगैरे सूत्रांनीं सांगितलेल्या.

५. क्वसु प्रत्ययाला मुद्दाम ककार लावण्याचें कारण असें कीं 'क्ङिति च' (१।१।५) हा निषेध 'ऋच्छत्यृताम्' (७।४।११) या मुद्दाम सांगितलेल्या गुणापेक्षांही प्रबळ होतो.

न कर्तव्यः । क्रियते न्यास एव । द्विसकारको निर्देशः । विदेः शतुर्वसुस्समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप् ॥

## समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप् ॥ ७।१।३७ ॥

### ल्यबादेश उपदेशिवद्वचनम् ॥ १ ॥

ल्यबादेश उपदेशिवद्भावो वक्तव्यः । उपदेशावस्थायां ल्यब्भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

### अनादिष्टार्थम् ॥ २ ॥

अकृतेष्वादेशेषु ल्यब्यथा स्यात् । के पुनरादेशा उपदेशिवद्वचनं प्रयोजयन्ति । हित्वदत्त्वात्त्वेत्त्वेत्त्वदीर्घत्वशूडिटः । हित्वम् । हित्वा प्रधाय । हित्वम् । दत्त्वम् । दत्त्वा प्रदाय । दत्त्वम् । आत्त्वम् । खात्वा प्रखन्य । आत्त्वम् । इत्वम् । स्थित्वा प्रस्थाय । इत्वम् । ईत्त्वम् । पीत्वा प्रपाय । ईत्त्वम् । दीर्घत्वम् । शान्त्वा प्रशम्य । दीर्घत्वम् । शत्वम् । पृष्ट्वा

निराळा इत्संज्ञक जोडावयास नको. पाणिनीने तसें सूत्रामध्यें उच्चारलेंच आहे. पुढील सूत्र जोडतांना या सूत्राच्या शेवटीं पाणिनीनें 'विदेः शतुर्वसुस्समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' असे दोन सकार उच्चारले आहेत.[६]

(सू. ३७, वा. १) हा ल्यप् आदेश करतेवेळीं उपदेशिवद्भाव बोलावा. स्पष्टीकरण करावयाचें म्हणजे धातूच्या पुढें क्त्वा प्रत्यय ठेवला कीं लेंगेच त्या क्त्वा प्रत्ययाला ल्यप् आदेश करावा.

असें करावयाचे कारण काय ?

(वा. २) धातूंना जे आदेश सांगितले आहेत ते व्हावयाचे पूर्वींच ल्यप् व्हावा हें.

असे कोणते आदेश आहेत कीं जे होण्याकरितां येथें उपदेशिवद्भाव समजावा लागेल ?

असे आदेश सांगावयाचे म्हणजे हि, दथ्, आकार, इकार, ईकार, दीर्घ, शकार व ऊठ् हे आदेश आणि इट् आगम. उदाहरणें द्यावयाचीं म्हटल्यास हि आदेशाकरितां हित्वा, प्रधाय, हीं उदाहरणें पहा. प्रधाय येथें उपदेशावस्थेमध्यें सांगितलेला ल्यप् आदेश अगोदर होतो, आणि तो केल्यानंतर धा धातूला 'दधातेर्हिः' (७।४।४२) या सूत्रानें हि आदेश होऊं शकत नाहीं, व प्रधाय हें रूप साधतें. दथ् आदेशाचें उदाहरणः- दत्त्वा, प्रदाय. प्रदाय येथें अगोदर ल्यप् केला असतां 'दो दद् घोः' (७।४।४६) या सूत्रानें सांगितलेला दथ् आदेश होत नाहीं, व प्रदाय रूप साधतें. आत्वाकरितां खात्वा, प्रखन्य, हीं उदाहरणें पहा. प्रखन्य येथें ल्यप् केल्यानंतर 'जनसनखनां सञ्झलोः' (६।४।४२) या सूत्राने सांगितलेलें आत्व होत नाहीं, व प्रखन्य रूप साधतें. इत्वाच्या उदाहरणाकरितां स्थित्वा, प्रस्थाय, हीं रूपें पहा. प्रस्थाय येथें ल्यप् आदेश केल्यानंतर आकाराला 'द्यतिस्यतिमास्था०' (७।४।४०) या सूत्रानें इकारादेश होत नाहीं. ईत्वाकरितां पीत्वा, प्रपाय, हीं रूपें पहा. प्रपाय येथें ल्यप् केल्यानंतर 'घुमास्था०' (६।४।६६) या सूत्रानें ईकारादेश होत नाहीं. दीर्घाकरिता शान्त्वा, प्रशम्य, हीं रूपें पहा. प्रशम्य येथें ल्यप् केल्यानंतर 'अनुनासिकस्य क्वि०' (६।४।१५) या सूत्रानें दीर्घ होऊं शकत नाहीं.

६. म्हणजे हा वसुस् असा प्रत्यय आहे; येथें उकार आणि सकार दोन इत्संज्ञक आहेत. तेव्हा कसु आणि वसुस् या दोहोंनाही दोन इत्संज्ञक असल्यामुळें 'वसोः संप्रसारणम्' वगैरे सूत्रांमध्यें दोघांचेंही ग्रहण होऊं शकतें.

१. (सू. ३७) समासाच्या शेवटीं असलेल्या क्त्वा प्रत्ययाला ल्यप् असा आदेश होतो, परंतु त्या समासांतील पूर्वपद नञाशिवाय दुसरें असलें पाहिजे. ल्यप् या आदेशांतील लकार व पकार यांना इत्संज्ञा व लोप होऊन य एवढा भाग अवशिष्ट राहतो; उदा० प्रपठ्य, प्रदीव्य.

२. म्हणजे समास करण्याच्या अगोदरच.

३. हि वगैरे आदेशांची ल्यप् आदेश करण्याच्या पूर्वी प्राप्ति येते; ल्यप् आदेश केल्यानंतर प्राप्ति येत नाहीं. कारण, त्या आदेशांचें निमित्त ल्यप् आदेश झाल्यामुळें नष्ट होतें.

आपृच्छ्य । शत्वम् । ऊठ् । द्यूत्वा प्रदीव्य । ऊठ् । इट् । देवित्वा प्रदीव्य ॥ किं पुनः कारणमादेशास्तावद्भवन्ति न पुनर्ल्यप् । न परत्वाल्ल्यपा भवितव्यम् । सन्ति चैवात्र केचित्पर आदेशा अपि च

बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ३ ॥

बहिरङ्गो ल्यप् । अन्तरङ्गा आदेशाः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ स तर्ह्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । न वक्तव्यः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयत्यन्तरङ्गानपि विधीन्बहिरङ्गो ल्यब्बाधत इति यदयमदो जग्धिर्ल्यप्ति किति [ २. ४. ३६ ] इति ति कितीत्येव सिद्धे ल्यब्ग्रहणं करोति ॥

स्नात्वाकालकादिषु च प्रतिषेधः ॥ ४ ॥

स्नात्वाकालकादिषु च प्रतिषेधो वक्तव्यः । स्नात्वाकालकः पीत्वास्थिरकः भुक्त्वासुहितक इति ॥

तदन्तनिर्देशात्सिद्धम् ॥ ५ ॥

तदन्तनिर्देशात्सिद्धमेतत् । कथम् ।

---

शकारादेशाकरितां पृष्ट्वा आपृच्छय हीं रूपें पहा. आपृच्छ्य येथे ल्यप् झाल्यावर 'व्रश्च-भ्रस्ज०' ( ८।२।३६ ) या सूत्रानें शकारादेश होत नाहीं. ऊठ् आदेशाकरिता द्यूत्वा, प्रदीव्य, हीं रूपें पहा. प्रदीव्य येथे ल्यप् केल्यानंतर 'च्छ्वोः शूड०' ( ६।४।१९ ) या सूत्रानें ऊट् आदेश होत नाहीं, आणि इडागमाकरितां देवित्वा, प्रदीव्य, हीं रूपें पहा. प्रदीव्य येथें ल्यप् केल्यानंतर 'आर्धधातुकस्येड्०' (७।२।३५) या सूत्रानें इट् होत नाहीं.

पण काय म्हणून वरील ठिकाणीं ल्यप् व हे आदेश यांपैकीं आदेशच प्रथम होतील व ल्यप् प्रथम होणार नाहीं ? परत्वामुळें ल्यप् हाच अगोदर नाहीं का होणार ?

पण या आदेशांपैकीं कांहीं आदेश ल्यपापेक्षां पर आहेत. तेव्हां तेथें ल्यप् अगोदर होणार नाहीं. शिवाय—

( वा. ३ ) ल्यप् हा बहिरंग आहे व आदेश अंतरंग आहेत, आणि अन्तरंग व बहिरंग हीं दोन्ही कार्यें एकदम उपस्थित झालीं असतां बहिरंगकार्य असिद्ध समजावें, या परिभाषेमुळें वरील सर्व उदाहरणांमध्यें ल्यप् अगोदर होणार नाहीं.

तर मग आदेश होण्यापूर्वी ल्यप् व्हावा याकरितां प्रस्तुत सूत्रात उपदेशिवद्भाव बोलावा.

उपदेशिवद्भाव बोलण्याची कांहीं जरूर नाहीं. कारण, ज्याअर्थी 'अदो जग्धिर्ल्यप् ति किति' ( २।४।३६ ) या सूत्रांत ति किति ( म्हणजे तकारानें आरंभ होणारा ककार इत् असलेला प्रत्यय पुढें असतांना ) या शब्दांनीं काम भागत असतां ल्यप् असा शब्द ज्यास्ती घातला आहे त्याअर्थी आचार्य पाणिनींना हेंच सुचवावयाचें आहे कीं इतर कार्यें जरी अंतरंग असलीं व ल्यबादेश जरी बहिरंग असला तरी दोघांची एके ठिकाणीं प्रवृत्ति झाली असतां बहिरंग असूनही ल्यप् अगोदर होतो.

( वा. ४. ) स्नात्वाकालक: वगैरे ठिकाणीं ल्यबादेशाचा प्रतिषेध सांगावा; उदाहरणार्थ—स्नात्वाकालकः, पीत्वास्थिरकः, भुक्त्वासुहितकः.

( वा. ५. ) प्रतिषेध सांगण्याची जरूर नाहीं. कारण तदन्तनिर्देशानें काम भागतें.

---

४. कारण, ल्यबादेश होण्याला समासाची जरूर लागते आणि हि वगैरे आदेशांना समासाची जरूर लागत नाहीं; म्हणून हे आदेश अंतरंग आहेत. प्र वगैरे उपसर्गांचा क्त्वाप्रत्ययान्ताबरोबर 'कुगतिप्रादयः' ( २।२।१८ ) या सूत्रानें समास होत असतो.

५. कारण, ल्यबादेश करण्याच्या पूर्वी क्त्वा हा प्रत्यय तकारादि कित् आहे म्हणून जग्धि आदेश होऊन नंतर 'प्र'बरोबर समास करून ल्यबादेश होईल आणि प्रजग्ध्य हें रूप साधेल. तेव्हां त्याकरितां 'अदो-जग्धिर्ल्यप्०' ( २।४।३६ ) या सूत्रामध्यें पाणिनीनें जें मुद्दाम ल्यब्ग्रहण केलें आहे तें करावयास नको. त्याशिवायच काम भागतें.

क्त्वान्तस्य ल्यपा भवितव्यं न चैतत्क्त्वान्तम्॥

**समासनिपातनाद्वा ॥ ६ ॥**

अथवावश्यमत्र समासार्थं निपातनं कर्तव्यं तेनैव यत्नेन ल्यबपि न भविष्यति॥

**अनञो वा परस्य ॥ ७ ॥**

अथवानञः परस्य ल्यपा भवितव्यं न चात्रानञं पश्यामः। ननु च धातुरेवानञ्। न धातोः परस्य भवितव्यम्। किं कारणम्। नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः। नञ्युक्तमिवयुक्तं वान्यस्मिंस्तत्सदृशे कार्यं विज्ञास्यते। कुत एतत्। तथा ह्यर्थो गम्यते। तद्यथा। अब्राह्मणमानयेत्युक्ते ब्राह्मणसदृशं पुरुषमानयति नासौ लोष्टमानीय कृती भवति। एवमिहाप्यनञिति नञ्प्रतिषेधादन्यस्मादनञो नञ्सदृशात्कार्यं विज्ञास्यते। किं चान्यदनञ्नञ्सदृशम्। पदमित्याह॥

---

तें कसें ?

क्त्वा प्रत्यय शेवटीं असलेल्या समासाला म्हणजे निर्दिश्यमानपरिभाषेच्या[६] जोरावर समासांतील क्त्वा प्रत्ययाला ल्यप् व्हावयाचा असा अर्थ होतो. स्नात्वाकालकः वगैरे ठिकाणीं स्नात्वा वगैरे क्त्वाप्रत्ययान्त जे शब्द ते समास नाहींत.

(वा. ६.) अथवा स्नात्वाकालकः पीत्वासुहितकः वगैरे समास व्याकरणानें सिद्ध होण्याकरितां स्नात्वाकालक पीत्वासुहितक इत्यादि शब्द मयूरव्यंसकादिगणामध्यें (२।१।७२) उच्चारून हे शब्द जसे उच्चारले आहेत तसेच व्याकरणशुद्ध आहेत असें म्हटलेंच आहे. तसें म्हणतांनाच जसा समासही त्या ठिकाणीं दाखविला आहे त्याचप्रमाणें तेथें त्वा प्रत्ययाला ल्यप् होत नाहीं असेंही दाखविलेंच आहे, असें म्हणतां येईल.

(वा. ७.) अथवा प्रस्तुत सूत्रांत नञ्भिन्न शब्दाच्या पुढें असलेल्या त्वाप्रत्ययाला ल्यप् सांगितला आहे; स्नात्वाकालकः इत्यादि ठिकाणीं नञ्भिन्न शब्द दृष्टीस पडत नाहीं, म्हणून ल्यप् होणार नाहीं.

स्ना हा धातूच नञ्भिन्न शब्द नव्हे का ?

केवळ धातूहून पुढें असलेल्या क्त्वाप्रत्ययाला ल्यप् होत नाहीं.

असें काय म्हणून ?

कारण कीं नञ् किंवा इव या निपातानें युक्त असें म्हणजे अमक्यापेक्षां निराळा किंवा अमक्यासारखा अशा शब्दाला उद्देशून सांगितलेलें कार्य हें ज्यापेक्षां निराळ्याला किंवा ज्याच्या सारख्याला सांगितलें असेल त्याला तर नव्हेच पण त्यासारख्या अशाच दुसऱ्या शब्दाला करावयाचें असें समजलें जातें.

कशावरून असें म्हणतां ?

तशा तऱ्हेचा अर्थ त्या पदावरून समजला जातो म्हणून. उदाहरणार्थ, जेव्हां लोकामध्ये 'ब्राह्मणभिन्नाला कोणाला तरी आण' असें वाक्य उच्चारलें जातें तेव्हां ब्राह्मण नाहीं पण ब्राह्मणासारखा दुसरा मनुष्यच आणला जातो; जर मातीचें एखादें ढेकूळ कोणीं आणलें तर काम भागत नाहीं; त्याप्रमाणें येथेंही 'अनञ्' या शब्दानें नञ्भिन्न असा नञाचा प्रतिषेध केला असल्यामुळें नञाशिवाय दुसऱ्या एखाद्या पण नञासारख्या अशाच शब्दाच्या पुढें असलेला जो समासांतील क्त्वा प्रत्यय त्याला ल्यबादेश हें कार्य होतें, असाच अर्थ समजला जातो. नञाशिवाय पण नञासारखा दुसरा एकादा शब्द म्हणजे कशा प्रकारचा शब्द, असें विचारल्यास 'दुसरें एकादें पद' असेंच[८] कोणीही वैयाकरण म्हणेल.

---

६. मागें (६।४।१३०) 'निर्दिश्यमान' परिभाषेचा अर्थ दिला आहे.

७. स्नात्वाकालकः वगैरे शब्द सबंध जसे उच्चारिले आहेत तसेच ते साधू आहेत, असा मयूरव्यंसकादिगणामध्यें निपातन करण्याचा हेतु आहे.

८. तेव्हां स्ना हा धातु नञासारखा पदसंज्ञक नव्हे; म्हणून त्या ठिकाणीं ल्यप् होत नाहीं.

अथवा प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीत्येवं धातुरपि क्त्वाग्रहणेन ग्राहिष्यते॥ ननु चेयमपि परिभाषास्ति कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणं भवतीति सापीहोपतिष्ठते। तत्र को दोषः। इह न स्यात्। प्रकृत्य प्रहृत्य। क तर्हि स्यात्। परमकृत्वा उत्तमकृत्वा। न वा अत्रेष्यते॥ अनिष्टं च प्राप्नोतीष्टं च न सिध्यति॥ गतिकारकपूर्वस्यैवेष्यते। कुतो नु खल्वेतद् द्वयोः परिभाषयोः सावकाशयोः समवस्थितयोः प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवति कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्येति चेयमिह परिभाषा भवति प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीतीयं न भवति कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापीति। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयतीयमिह परिभाषा भवति प्रत्ययग्रहण इतीयं न भवति कृद्ग्रहण इति यदयमनञिति प्रतिषेधं शास्ति। कथं कृत्वा ज्ञापकम्। अयं हि नञ् न गतिर्न च कारकं तत्र कः प्रसङ्गो यन्नञ्पूर्वस्य स्यात्। पश्यति त्वाचार्य इयमिह परिभाषा भवति प्रत्ययग्रहण इतीयं न भवति कृद्ग्रहण इति ततोऽनञिति प्रतिषेधं शास्ति॥

---

अथवा 'प्रत्यय उच्चारला असतांना त्या सूत्रांत ज्याहून प्रत्यय केला असतो त्याला आरंभ करून प्रत्यय संपेपर्यंत जेवढें शब्दस्वरूप तेवढें घ्यावें' या परिभाषेमुळे क्त्वा या प्रत्ययाच्या उच्चारणानें स्नात्वा एवढा समुदाय घेतला जाईल.[९]

खरें; पण 'कृत्प्रत्यय उच्चारला असतां त्या प्रत्ययानें ज्याहून कृत्प्रत्यय केला आहे असा फक्त धातूच नव्हे तर त्याचे पूर्वीचा गतिशब्द (उपसर्ग वगैरे) व कारकशब्दही घेतला जातो' अशीही परिभाषा आहे; तीही परिभाषा प्रस्तुत सूत्रात दाखल होईल.

मग दाखल झाली तर काय बिघडतें?

ती दाखल झाली तर प्रकृत्य, प्रहृत्य, या ठिकाणीं ल्यप् होणार नाहीं.[१०]

मग कोणत्या ठिकाणीं होईल?

परमकृत्वा,[११] उत्तमकृत्वा, येथें होईल आणि या ठिकाणीं तर व्हावयास नको. एकंदरीत जें व्हावयास नको तें होऊं लागतें आणि जें व्हावयास पाहिजे तें होत नाहीं. गतिशब्द किंवा कारकशब्द हेच पूर्वी असतां ल्यप् होणें इष्ट आहे.

पण 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवति' आणि 'कृद्ग्रहणे गतिपूर्वस्य' या परस्परनिरपेक्ष चारितार्थ्य[१२] असलेल्या दोन परिभाषा एका ठिकाणीं एकदम दाखल झाल्या असताना 'प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवति' हीच परिभाषा लागू करावी, आणि 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि' ही लागू करू नये, असेंच काय म्हणून समजावें?

आचार्य पाणिनींचे लिहिणेंच सुचवितें कीं अशा ठिकाणीं 'प्रत्ययग्रहणे' हीच परिभाषा लागू होते, 'कृद्ग्रहणे' ही लागू होत नाहीं. कारण प्रस्तुत सूत्रात 'अनञ्' या पदानें ते नञाचा निषेध करतात.

हें कसें सुचविलें जातें बरें?

हें सुचविलें जाण्याचें कारण प्रस्तुत सूत्रांत अनञ् या पदानें नञाचा प्रतिषेध सांगितला आहे.

---

९. तेव्हां स्नात्वा हा जो धातूसह त्वाप्रत्ययान्त शब्द त्याच्या मागें नञासारखें दुसरें कोणीतरी पाहिजे, तें नाहीं म्हणून ल्यप् होत नाहीं.

१०. 'कृद्ग्रहणे' या परिभाषेनें गतीसह प्रकृत्वा एवढ्या समुदायाला त्वाप्रत्ययान्त म्हणतां येतें, तेव्हां अर्थातच त्याच्या पाठीमागें नञासारखें दुसरें कोणी नाहीं, म्हणून ल्यप् होणार नाहीं.

११. येथें परम हा शब्द गति किंवा कारक नसल्यामुळें 'कृद्ग्रहणे' ही परिभाषा येत नाहीं. त्यामुळें कृत्वा एवढेंच त्वाप्रत्ययान्त होतें. त्याच्या पाठीमागें नञासारखा परम किंवा उत्तम हा शब्द असल्यामुळें येथें ल्यबादेश होऊं लागेल.

१२. कृत्प्रत्ययांशिवाय इतर ठिकाणीं म्ह. 'सनाद्यन्ता धातवः' (३।१।३२) वगैरे ठिकाणीं 'प्रत्ययग्रहणे' या परिभाषेला चारितार्थ्य आहे. 'णचः स्त्रियामञ्' (५।४।१४) या सूत्रामध्यें 'कृद्ग्रहणे' या परि-

किं नञः प्रतिषेधेन न गतिर्न च कारकम् ।
यावता नञि पूर्वे तु ल्यब्भावो न भविष्यति ॥
प्रतिषेधात्तु जानीमस्तत्पूर्वं नेह गृह्यते ।
प्रत्ययग्रहणे यावत्तावद्भवितुमर्हति ॥ २ ॥

## [क्त्वापि च्छन्दसि ॥७।१।३८॥]

## सुपां सुलुक्पूर्वसवर्णाच्छेयाडाड्यायाजालः ॥७।१।३९॥

सुपां च सुपो भवन्तीति वक्तव्यम् । युक्ता मातासीद्धुरि दक्षिणायाः । दक्षिणायामिति प्राप्ते ॥ तिङां च तिङो भवन्तीति वक्तव्यम् । चषालं ये अश्वयूपाय तक्षति । तक्षन्तीति प्राप्ते ॥

लुकि किमुदाहरणम् । आर्द्रे चर्मन् । लोहिते चर्मन् । नैतदस्ति । पूर्वसवर्णेनाप्येतत्सिद्धम् ॥ इदं तर्हि । यत्स्थवीयस आव सनुत सप्तऋषयः सप्त साकम् । ननु चैतदपि पूर्वसवर्णेनैव सिद्धम् । न सिध्यति । यद्यत्र पूर्वसवर्णः स्यात्त्यदाद्यत्वं प्रसज्येत ॥ इदं चाप्युदाहरणम् । आर्द्रे चर्मन् । लोहिते

---

नञ् हा गतिसंज्ञकही नाहीं व तो कारकही नाहीं, तेव्हां 'कृद्ग्रहणे' ही परिभाषाच जर लागू केली तर नञाचे स्थलीं क्त्वाप्रत्ययान्त समास नसल्यामुळें ल्यप् प्राप्तच होत नाहीं. तेव्हां यावरून आचार्यांचा आशय असा दिसतो कीं या ठिकाणीं 'प्रत्ययग्रहणे' ही परिभाषाच घ्यावयाची, 'कृद्ग्रहणे' ही घ्यावयाची नाहीं; आणि असा आशय असल्यामुळेंच अनञ् या पदानें त्यांनीं नञाचा प्रतिषेध केला आहे.

( सू. ३९ ) प्रस्तुत सूत्रांत कोणत्याही सुप् प्रत्ययाचे जागीं दुसरा कोणताही सुप् प्रत्यय होतो असेंही सांगणें जरूर आहे; उदाहरणार्थ -- 'युक्ता मातासीद्धुरि दक्षिणायाः' या उदाहरणांत 'दक्षिणायाम्' असें पाहिजे असतांना 'दक्षिणायाः' असें उच्चारलें आहे. त्याचप्रमाणें कोणत्याही तिङ् प्रत्ययाचे ठिकाणीं दुसरा कोणताहि तिङ् प्रत्यय होतो असेंही सांगावें; उदाहरणार्थ-- 'चषालं ये अश्वयूपाय तक्षति' या ठिकाणीं तक्षन्ति असें पाहिजे असताना तक्षति असें उच्चारलें आहे.

प्रस्तुत सूत्राच्या उदाहरणांपैकीं विभक्तिप्रत्ययाच्या लुकाचें उदाहरण कोणतें ?

कां बरें ?

आर्द्रे चर्मन्, लोहिते चर्मन्, हीं नाहींत कां उदाहरणें ?

हीं उदाहरणें नव्हेत. कारण येथें सुप् प्रत्ययांना पूर्णसवर्ण केला असतांनाही काम भागतें.

बरें तर, ' यत् स्थवीयस आव सनुत सप्तऋषयः सप्त साकम्' हें उदाहरण घ्या.

पण येथेंही पूर्वसवर्णानें काम भागतच आहे.

भागत नाहीं. कारण जर येथें यत्+सु याठिकाणीं 'सु' चे जागीं 'द्' हा पूर्वसवर्ण केला तर द् ही विभक्ति पुढें आहे म्हणून यत् येथील तकाराला 'त्यदादीनामः'(७।२।१०२) या सूत्रानें अत्व होऊं लागेल. तेव्हां यत् हें उदाहरण लुकाचेंच आहे येवढेंच नव्हे तर आर्द्रे चर्मन्, लोहिते चर्मन्, हींही लुकाचींच उदाहरणें आहेत.

---

भाषेला चारितार्थ्य आहे. तेथें ' प्रत्ययग्रहणे ' ही परिभाषा येत नाहीं, असा तेथें निषेध आहे.

१. (सू. ३८ ) नञाशिवाय इतर पदाचा क्त्वाप्रत्ययान्ताबरोबर समास केला असतां तेथें क्त्वा प्रत्ययाला वेदामध्यें कांहीं ठिकाणीं क्त्वा असाच आदेश होतो.

१. ( सू. ३९ ) वेदामध्यें प्रथमा, द्वितीया, वगैरे सुप् प्रत्ययांना सु, लुक्, पूर्वसवर्ण, आकार, शे, या, डा, ड्या, याच् आणि आल् असे आदेश होतात.

२. तेव्हां येथें सप्तमीच्या एकवचनाला षष्ठीच्या एकवचनाचा ङस् आदेश झाला आहे.

३. येथें बहुवचनाला एकवचन झालें आहे.

४. पूर्वीच्याचा म्हणजे नकाराचा सवर्ण दकार हा ङि प्रत्ययाला केला असतां त्याचा ' संयोगान्तस्य लोपः ' (८।२।२३) या सूत्रानें लोप करून चर्मन् असें साधेल.

५. येथें यत् शब्दाच्या पुढील सप्तमीबहुवचनाच्या सु प्रत्ययाचा लोप झाला आहे.

चर्मन् । ननु चोक्तं पूर्वसवर्णेनाप्येतत्सिद्धमिति । न सिध्यति । यद्यत्र पूर्वसवर्णः स्यादान्तर्यतो दकारः प्रसज्येत । अस्तु । संयोगान्तलोपेन सिद्धम् ॥

**इयाडियाजीकाराणामुपसंख्यानम् ॥ १ ॥**

इयाडियाजीकाराणामुपसंख्यानं कर्तव्यम् । दार्विया परिज्मन् । इया । डियाच् । सुक्षेत्रिया सुगातुया । डियाच् । ईकार । दृतिं न शुष्कं सरसी शयानम् ॥

आङ्याजयारां चोपसंख्यानं कर्तव्यम् । आङ् । प्र बाहवा । अयाच् । स्वप्रया सचसे जनम् । अयाच् । अयार् । स नः सिन्धुमिव नावया ॥

**अमो मश् ॥ ७ । १ । ४० ॥**

किमर्थः शकारः । शित्सर्वस्येति सर्वादेशो यथा स्यात् । अक्रियमाणे हि शकारेऽलोन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य प्रसज्येत ॥ अत उत्तरं पठति ।

---

पण आतांच वर नाहीं का प्रतिपादिलें कीं पूर्वसवर्ण केला असतांनाही येथें काम भागेल म्हणून ?

काम भागणार नाहीं. कारण, या ठिकाणीं 'ड्' या प्रत्ययाला जर पूर्वसवर्ण झाला तर दकारच जवळचा असल्यामुळें दकार होईल.

तरी चालेल. चर्मन्+द् असे असतां संयोगाच्या शेवटच्या दकाराचा लोप होऊन रूप साधेल.

(वा. १.) प्रस्तुत सूत्रांत इया, डियाच्[६] आणि दीर्घ ईकार हेही आदेश सांगावे. इया आदेशाचें उदाहरणः–दार्वियाँ[७] परिज्मन्; डियाच् आदेशाचें उदाहरणः–सुक्षेत्रिया[८], सुगातुया; आणि ईकाराचें उदाहरण:–'दृतिं न शुष्कं सरसी[९] शयानम्' या पादांतील 'सरसी'.

आङ्[१०], अयाच् आणि अयार् याही तीन आदेशांचा निर्देश करावा. आङाचें उदाहरण 'प्र बाहवा[११]'; अयाच् याचें उदाहरण 'स्वप्रया सचसे जनम्'; अयार् याचें उदाहरण 'स नः सिन्धुमिव नावया'.

(सू. ४०) मश्[१] येथें शकार इत्संज्ञक करण्याचा काय उपयोग आहे ?

ज्याला शकार इत् जोडलेला आहे असा आदेश सबंध स्थानीचें ठिकाणीं होतो या नियमास[२] अनुसरून अश् हा आदेश सबंध अम् प्रत्ययाचे जागीं व्हावा म्हणून शकार जोडला आहे. जर शकार जोडलेला नसता तर 'अलोऽन्त्यस्य' (१।१।५२) या परिभाषेच्या जोरावर अम् यांतील फक्त 'म्' चे जागींच म झाला असता. एकंदरींत 'श'चा उपयोग आहे. वरील सर्व विचारसरणी लक्षांत घेऊन तिला उत्तरादाखल वार्तिककार लिहितातः–

---

६. डियाच् या प्रत्ययांतील डकार आणि चकार हे इत्संज्ञक आहेत.

७. दारुणा याच्या ऐवजीं वेदामध्यें दार्विया असा तृतीयैकवचनाला इया आदेश करून प्रयोग केला आहे.

८. सुक्षेत्रेण या अर्थी सुक्षेत्रिया हा प्रयोग आहे. येथें तृतीयैकवचनाला डियाच् आदेश करून तो डित् असल्यामुळें सुक्षेत्र यांतील अकाराचा लोप होऊन सुक्षेत्रिया हा प्रयोग सिद्ध होतो.

९. सरस् शब्दाच्या पुढील सप्तमीच्या एकवचनाच्या ङि प्रत्ययाला दीर्घ ईकार आदेश झाला आहे.

१०. या तीन प्रत्ययांतील ङ, च आणि र हे वर्ण इत्संज्ञक आहेत.

११. प्रबाहु शब्दाच्या पुढील तृतीयेच्या एकवचनाला आङ् आदेश होऊन 'घेर्ङिति' (७।३।१११) या सूत्रानें गुण झाला आहे.

१. (सू. ४०) वेदामध्यें द्वितीयैकवचनाच्या अम् आणि मिप् या प्रत्ययांना झालेला अम् याला मश् असा आदेश होतो. मश् यांतील शकार इत्संज्ञक आहे.

२. अनेकाल् (१।१।५५) हें सूत्र पहा.

**अमो मश्र मकारस्य**

**मकारस्य मकारवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वा तत्रान्तरेण शकारं सर्वादेशो भविष्यति ॥**

**वचनादन्यबाधनम् ।**

**अस्त्यन्यन्मकारस्य मकारवचने प्रयोजनम् । येऽन्ये मकारादेशाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थम् । तद्यथा । मो राजि समः क्वौ [ ८ ३. २५ ] इति मकारस्य मकारवचनसामर्थ्यादनुस्वारादयो बाध्यन्ते ॥ एवं तर्हि द्विमकारको निर्देशः करिष्यते ।**

**द्विमकार ईडपृक्ते**

**यदि द्विमकारकोऽपृक्ताश्रय ईड् न प्राप्नोति । वधीं वृत्रं मरुत इन्द्रियेण ॥**

**यकारादौ न दुष्यति ॥१॥**

**किं यकारो न श्रूयते । लुप्तनिर्दिष्टो यकारः ॥**

**अमो मश्र मकारस्य वचनादन्यबाधनम् । द्विमकार ईडपृक्ते यकारादौ न दुष्यति ॥१॥**

## [लोपस्त आत्मनेपदेषु ॥ ७।१।४१ ॥

## ध्वमो ध्वात् ॥ ७।१।४२ ॥

---

(श्लो. वा. १) शकार न जोडतां अम् प्रत्ययाला केवळ 'म'च आदेश सांगितला, आणि 'अलोऽन्त्यस्य' या सूत्रानें मकाराचे जागींच जर मकार होऊं लागला तर म आदेश अगदीं निरर्थक सांगितला असें होईल. तो निरर्थक न व्हावा याकरितां जरी शकार जोडून मश् आदेश उच्चारला नाहीं, व केवळ 'म'च उच्चारला तरी सबंध 'अम्' प्रत्ययाचे जागीं 'म' होतो, असेंच मानणें भाग पडते. तेव्हां शकार जोडण्याचा उपयोग नाहीं.

मकाराला मकार सांगणें निरर्थक नाहीं. मकाराला मकारादेशच सागण्यांत दुसरा उद्देश आहे तो हा कीं मकाराला दुसरे जे कांहीं आदेश होऊं लागतील त्यांचा बाध व्हावा. अशा तऱ्हेचा उपयोग 'मो राजि समः क्वौ' ( ८।३।२५ ) या सूत्रानें जो मकाराला मकारादेश सांगितला आहे त्याचेविषयीं दृष्टीं पडतो. तेथें मकारादेश अनुस्वार वगैरे आदेशांचा बाध करतो, कारण बाध न केल्यास तो व्यर्थ होतो.

असें असेल तर दोन मकाररूपी 'म्म्' असा आदेश[४] सांगू.

जर 'म्म्' असा दोन मकारांचा आदेश सांगितला तर अपृक्ताला म्हणजे एक वर्ण असलेल्या प्रत्ययाला उद्देशून सांगितलेला जो ईट् आगम[५] तो होणार नाहीं; उदाहरणार्थ 'वधीँ वृत्रं मरुत इन्द्रियेण' या पादांतील वधीँ येथे.

यकार जर मकाराच्या आरंभीं घालून 'य्म्' असा आदेश सांगितला तर कांहींएक दोष येत नाहीं[६].

मग सूत्रामध्यें यकार कां ऐकूं येत नाहीं.

ऐकूं येत नाहीं याचें कारण त्याचा लोप होतो. मकाराचें पूर्वी आचार्योनीं यकार घालून त्याचा लोप केला आहे.

---

३. वधीँ वृत्रम् या उदाहरणांमध्यें वधीँ येथें जो मकाराला अनुस्वार झालेला आहे त्याचा बाध होईल आणि वधीम् वृत्रम् असा प्रयोग होईल.

४. म्हणजे दोन म मिळून हा आदेश अनेक अलांचा होत असल्यामुळें तो अम् या सर्वाला होईल व एका मकाराचा लोप ( ८।२।२३ ) होईल. तेव्हां शकार लावण्याचें कारण नाहीं.

५. अस्तिसिचोऽपृक्ते ( ७।३।९६ ) या सूत्रानें अपृक्ताला म्हणजे एकवर्णाच्या प्रत्ययाला ईट् आगम सांगितला आहे, वधीम् हें अवधिषम् या अर्थी क्रियापद आहे.

६. यकाराचा 'लोपो व्योर्वलि' ( ६।१।६६ ) या सूत्रानें लोप केल्यानंतर एकटाच वर्ण मकार उरत असल्यामुळें त्याला ईडागम होईल.

७. तेव्हां सूत्रामध्यें मूळचा यकार घालून आणि त्याचा 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानेंच लोप करून पाणिनीनें उच्चार केला आहे.

१. ( सू. ४१ ) वेदामध्यें आत्मनेपदामधील तकाराचा कांहीं ठिकाणीं लोप होतो.

१. ( सू. ४२ ) वेदामध्यें मध्यमपुरुषाच्या ध्वम् प्रत्ययाला ध्वात् असा आदेश होतो.

यजध्वैनमिति च ॥ ७।१।४३ ॥
तस्य तात् ॥ ७।१।४४ ॥
तप्तनप्तनथनाश्च ॥ ७।१।४५ ॥
इदन्तो मसि ॥ ७।१।४६ ॥
क्त्वो यक् ॥ ७।१।४७ ॥
इष्ट्वीनमिति च ॥ ७।१।४८ ॥
स्नात्व्यादयश्च ॥ ७।१।४९ ॥ ]
आज्जसेरसुक् ॥ ७।१।५० ॥

इह ये पूर्वासो य उपरासः आज्जसेरसुगित्यसुकि कृते जसो ग्रहणेन ग्रहणाच्छीभावः प्राप्नोति । एवं तर्हि जसि पूर्वान्तः करिष्यते ॥ यदि पूर्वान्तः क्रियते का रूपसिद्धिः ब्राह्मणासः पितरः सोम्यासः । सवर्णदीर्घत्वेन सिद्धम् । न सिध्यति । अतो गुणे [६. १. ९७] इति पररूपत्वं प्राप्नोति । अकारोच्चारणसामर्थ्यान्न भविष्यति । यदि तर्हि प्राप्नुवन्विधिरुच्चारणसामर्थ्याद्बाध्यते सवर्णदीर्घत्वमपि न प्राप्नोति । नैष दोषः ।

(सू. ५०) 'ये पूर्वासो य उपरास:' या ठिकाणीं प्रस्तुत 'आज्जसेरसुक्' या सूत्रानें जस् प्रत्ययाला असुगागम केल्यानंतर पूर्व+जस्+असुक् अशी अवस्था असतांना जस्+असुक् ह्या समुदायाला यदागमन्यायानें जस् म्हणतां येत असल्यामुळें 'जसः शी' (७।१।१७) या सूत्रानें शी आदेश होऊं लागेल.

असें जर होईल तर जस् प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला शेवटीं असुक् आगम जोडण्यांत येईल.[2]

जर मागील शब्दाच्या शेवटीं असुगागम जोडला तर ब्राह्मणास: पितर: सोम्यास: हीं रूपें कशीं साधतील ?

पूर्व+असुक्, सोम्य+असुक्, या ठिकाणीं दोन्ही अकारांचे जागीं सवर्णदीर्घ करूं म्हणजे झालें.

सवर्णदीर्घानें होणार नाहीं. कारण 'अतो गुणे' (६।१।९७) या सूत्राने दोन्ही अकारांचे जागीं पररूप म्हणजे अकारच होईल.

असुक् या आगमांत अकार उच्चारला आहे. त्याचे जोरावर पररूप न होतां दीर्घच होईल. (कारण जर पररूप होईल तर अकार व्यर्थ होईल, व सुगागम केला तरी चालेल.)

तर मग अशा रीतीनें उच्चारणाच्या जोरावर उपस्थित झालेल्या विधीचा (पररूपाचा) बाध करतां आला तर सवर्णदीर्घ देखील होणार नाहीं, त्याचाही बाध कां करूं नये ?

---

१. (सू. ४३) वेदामध्यें यजध्वम् या क्रियापदापुढें एनम् शब्द आला असतां क्रियापदांतील शेवटच्या मकाराचा लोप होतो.

१. (सू. ४४) वेदामध्यें मध्यमपुरुषाच्या त प्रत्ययाला तात् असा आदेश होतो.

१. (सू. ४५) वेदामध्यें मध्यमपुरुषी बहुवचनाला तप्, तनप्, तन व थन असेही आदेश होतात. तप् आणि तनप् या प्रत्ययांमध्यें पकार इत्संज्ञक आहे.

१. (सू. ४६) परस्मैपदी उत्तमपुरुषाचा बहुवचनी मस् हा प्रत्यय वेदामध्यें 'मसि' असा इकारान्त होतो.

१. (सू. ४७) वेदामध्यें कांहीं ठिकाणीं क्त्वा प्रत्ययाला यक् असा आगम होतो. यक् यांतील ककार इत्संज्ञक आहे. हा आगम केल्यानंतर 'त्वाय' एवढा प्रत्यय बनतो.

१. (सू. ४८) वेदामध्यें इष्ट्वा यामधील आकाराला ईनम् असा आदेश होऊन इष्ट्वीनम् असें रूप होतें.

१. (सू. ४९) वेदामध्यें स्नात्वा वगैरे क्त्वाप्रत्यान्त शब्दांना कांहीं ठिकाणीं आकाराला ईकार होऊन स्नात्वी वगैरे प्रयोग होतात.

१. (सू. ५०) अकारान्त अंगाच्या पुढील प्रथमाबहुवचनाच्या जस् प्रत्ययाला असुक् असा आगम होतो. असुक् यांतील ककार इत्संज्ञक आहे; उकार उच्चारणार्थ आहे. जस् प्रत्ययाला हा आगम केल्यानंतर असस् असा प्रत्यय बनतो.

२. मागील शब्दाला असुगागम केला म्हणजे पूर्वीचा शब्द सकारान्त होत असल्यामुळें जसः शी (७।१।१७) या सूत्राची प्राप्ति येत नाहीं.

३. ज्या वेळीं प्रत्ययाला असुक् आगम सांगितला जातो त्या वेळीं हा दोष येत नाहीं. कारण 'अतो गुणे' (६।१।९७) या पररूपाचा बाधक प्रथमयोः पूर्वसवर्णः (६।१।१०२) यानें सांगितलेला पूर्वसवर्ण

यं विधिं प्रत्युपदेशोऽनर्थकः स विधिर्बाध्यते यस्य तु विधेर्निमित्तं नासौ बाध्यते । पररूपं च प्रत्यकारोच्चारणमनर्थकं सवर्णदीर्घत्वस्य पुनर्निमित्तमेव ॥ अथवासुट् करिष्यते । एवमपि ये पूर्वासो य उपरास इत्यसुटि कृते जसो ग्रहणेन ग्रहणाच्छीभावः प्राप्नोति । नैष दोषः । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवमस्य न भविष्यति । यस्तर्हि निर्दिश्यते तस्य कस्मान्न भवति । असुटा व्यवहितत्वात् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं ये पूर्वासो य उपरासः असुकि कृते जसो ग्रहणेन ग्रहणाच्छीभावः प्राप्नोतीति । नैष दोषः । इदमिह संप्रधार्यम् । शीभावः क्रियतामसुगिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादसुक् । अथेदानीमसुकि कृते पुनःप्रसङ्गविज्ञानाच्छीभावः कस्मान्न भवति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति ॥

---

हा दोष देतां येत नाहीं. कारण, जो विधि केला असतांना एकादें उच्चारण अगदींच व्यर्थ होतें तो विधि त्या उच्चारणानें बाधित होतो. पण एकाद्या प्रत्ययाचें, आदेशाचें किंवा आगमाचें उच्चारण हें ज्या विधीचें निमित्तच असतें तो विधि त्या उच्चारणानें कधींही बाधित होत नाहीं. पररूप जर केले तर असुक् या आगमांतील अकार व्यर्थ होतो. पण सवर्णदीर्घ करण्याला तर असुगागमाचा अकार निमित्त म्हणून उपयोगींच पडतो. अथवा असुक्चे ऐवजीं 'असुट्' असा आगम करूं.

असुट् केला, तरी देखील 'ये पूर्वासो य उपरासः' या उदाहरणांत असुट् केल्यानंतर पूर्व+असुट्+जस् अशी अवस्था असतांना 'असुट्+जस्' या समुदायाला शी आदेश होऊं लागेलच.

होणार नाहीं. कारण, 'जेवढ्या शब्दस्वरूपाचें उच्चारण करून आदेश सांगितला असतो तेवढ्या शब्दस्वरूपाचे जागींच तो आदेश होतो' अशी परिभाषा असल्यामुळें 'असुट्+जस्' एवढ्या शब्दस्वरूपाला शी आदेश होणार नाहीं.

असुट्+जस् येवढ्या सबंध प्रत्ययाला न होऊं दे, पण त्यांतील जो असुटाच्या पुढील जस्-भाग त्याला शी आदेश कां होऊं नये ?

होणार नाहीं; कारण, जस् प्रत्यय व अकारान्त अंग यांमध्यें असुडागम आड येतो; व त्यामुळें अकारान्त अंगाच्या पुढें जस् प्रत्यय मिळत नाहीं.

बरें तर, असुडागमानें काम भागतें, पण सूत्र 'आज्जसेरसुट्' असें बदलून उच्चारावें लागतें.

तर मग जसें सूत्र उच्चारलें आहे तसेंच राहूं द्या.

पण वरतींच दोष दिला ना कीं 'ये पूर्वासो य उपरासः' येथें जस् प्रत्ययाला असुक् आगम केल्यानतर शी आदेश होऊं लागेल म्हणून ?

हा दोष येत नाहीं. कारण येथें प्रथमच असा विचार करावा लागतो कीं अगोदर शी आदेश करावयाचा कीं अगोदर असुक् आगम करावयाचा ?

मग आतां येथें अगोदर काय बरें करावें ?

विचार केला असतांना अर्थात् परसूत्रानें सांगितला असल्यामुळें असुक् आगमच अगोदर करावयाचा असेच निष्पन्न होतें.

बरें असुकाच्या अगोदर शी आदेश न होईल, पण असुक् आगम जोडल्यानंतर त्याची पुनः प्राप्ति येते, म्हणून पुनः शी आदेश कां होऊ नये?

पण एकदां एकादें सूत्र दुसऱ्या सूत्राबरोबर उपस्थित होऊन त्याचा 'विप्रतिषेधे परं कार्यम्'

---

दीर्घ होतो.

४. असुट् आगम हा प्रत्ययालाच होतो. परतु असुक् जसा कित् असल्यामुळें प्रत्ययाच्या शेवटीं होतो तसा हा प्रत्ययाच्या शेवटीं न होतां टित् असल्यामुळें प्रत्ययाचा आद्यावयव होतो.

५. जसाला पुढें किंवा मागें आगम झाल्यानंतर त्या आगमासहित समुदायाला यदागमन्यायानें जस् म्हणतां येतें.

**[1]अश्वक्षीरवृषलवणानामात्मप्रीतौ क्यचि ॥ ७।१।५१ ॥**

**अश्ववृषयोर्मैथुनेच्छायाम् ॥ १ ॥**

अश्ववृषयोर्मैथुनेच्छायामिति वक्तव्यम् । अश्वस्यति वडवा । वृषस्यति गौः । मैथुनेच्छायामिति किमर्थम् । अश्वीयति वृषीयति ॥

**क्षीरलवणयोर्लालसायाम् ॥ २ ॥**

क्षीरलवणयोर्लालसायामिति वक्तव्यम् । क्षीरस्यति माणवकः । लवणस्यत्युष्ट्र इति ॥

अपर आह । सर्वप्रातिपदिकेभ्यो लालसायामिति वक्तव्यं दध्यस्यति मध्वस्यतीत्येवमर्थम् ॥

अपर आह । सुग्वक्तव्यो दधिस्यति मधुस्यतीत्येवमर्थम् ॥

**[1]आमि सर्वनाम्नः सुट् ॥ ७।१।५२ ॥**

**[1]त्रेस्त्रयः ॥ ७।१।५३ ॥**

**[1]ह्रस्वनद्यापो नुट् ॥ ७।१।५४ ॥**

इमे बहव आम्शब्दाः । कास्प्रत्ययादाममन्त्रे लिटि [ ३. १. ३५. ] । ङसोसाम् । किमेत्तिङव्ययघादाम्वद्रव्यप्रकर्षे [५.४.११]। ङेराम्नद्याम्नीभ्यः [७.३.११६] इति । कस्येदं ग्रहणम । षष्ठीबहुवचनस्य ग्रहणम् ॥

---

(१।४।२) या सूत्रानें बाध झाला म्हणजे पुनः तें सूत्र जरी उपस्थित होत असलें तरी ‘एकदां जो बाध झाला तो कायमचाच समजावयाचा’ अशी परिभाषा असल्यामुळें पुन्हां शी आदेश होणार नाहीं.

(सू. ५१ वा. १) अश्व आणि वृष या शब्दांना ‘मैथुनाची इच्छा’ हा अर्थ असतांनाच असुग् आगम होतो असें म्हणावें; उदाहरणार्थ अश्वस्यति वडवा[2], वृषस्यति गौः.

‘मैथुनाची इच्छा असताना’ या अर्थीच असुक् सांगण्याचें काय प्रयोजन ?

अश्वीयति, वृषीयति, या उदाहरणात साधी इच्छा[3] असा अर्थ असतांना असुक् होत नाहीं.

(वा. २) क्षीर आणि लवण या शब्दांना खाण्याची अतिशय इच्छा, या अर्थींच असुक् होतो असें म्हणावें; उदाहरणार्थ क्षीरस्यति माणवकः, लवणस्यति उष्ट्रः.

दुसरा एक वैयाकरण म्हणतो : सर्वच प्रातिपदिकांना ‘खाण्याची अतिशय इच्छा’ हा अर्थ असतांना क्यच् प्रत्यय पुढें असतांना असुक् आगम लागतो असें म्हणावें. म्हणजे दध्यस्यति, मध्वस्यति, वगैरे उदाहरणें साधतील.

आणखी एक वैयाकरण म्हणतो : सुक् आगम करावा म्हणजे दधिस्यति, मधुस्यति, हीं उदाहरणें साधतील.

(सू. ५२–५४) या व्याकरणशास्त्रांत पुष्कळ ठिकाणीं निरनिराळे आम् शब्द आढळतात. उदाहरणार्थ– ‘कास्प्रत्ययादाममन्त्रे०’ (३।१।३५), ‘स्वौजसमौट्० ङस्ओस्आम्’ (४।१।२), ‘किमेत्तिङव्ययघादामु०’ (५।४।११), ‘ङेराम्०’ (७।३।११६). प्रस्तुत सूत्रांत यांपैकीं कोणता आम् घ्यावयाचा ?

---

१. (सू. ५१) अश्व, क्षीर, वृष, आणि लवण या चार शब्दांना क्यच् प्रत्यय पुढें असतांना आणि स्वतःचा संतोष गम्यमान असतांना असुक् आगम होतो.

२. वडवा म्हणजे घोडी.

३. ‘देवदत्तः अश्वीयति’ या प्रयोगामध्यें देवदत्ताला ग्रामान्तरगमनाकरितां घोड्याची इच्छा प्रतीत होते.

१. (सू. ५२) अवर्णान्त अंगाहून पर आणि सर्वनाम अशा शब्दाहून केलेला जो षष्ठीबहुवचनाचा आम् प्रत्यय त्याला सुट् असा आगम होतो; उदा० सर्वेषाम्, सर्वासाम्.

१. (सू. ५३) त्रि शब्दाला त्रय असा आदेश होतो आम् प्रत्यय पुढें असतांना.

१. (सू. ५४) ऱ्हस्व शेवटीं असलेलें, नदीसंज्ञक वर्ण शेवटीं असलेलें आणि आप् प्रत्यय शेवटीं असलेलें जें अंग त्याच्या पुढील आम् प्रत्ययाला नुट् असा आगम होतो.

अथास्य कस्मान्न भवति कास्प्रत्ययादाममन्त्रे लिटीति । अननुबन्धकग्रहणे हि न सानुबन्धकस्येति । स तर्ह्यस्यैवमर्थोऽनुबन्धः कर्तव्य इहास्य ग्रहणं मा भूदिति । ननु चावश्यं मकारस्येत्संज्ञापरित्राणार्थोऽनुबन्धः कर्तव्यः । नार्थ इत्संज्ञापरित्राणार्थेन । इत्कार्याभावादत्रेत्संज्ञा न भविष्यति ॥ इदमस्तीत्कार्यं मिदचोऽन्त्यात्परः [ १. १. ४७ ] इत्यचामन्त्यात्परो यथा स्यात् । प्रत्ययान्तादयं विधीयते तत्र नास्ति विशेषो मिदचोऽन्त्यात्पर इति वा परत्वे प्रत्ययः पर इति वा । यस्तर्हि न प्रत्ययान्तादिजादेश्च गुरुमतोऽनृच्छः [ ३. १. ३६ ] इति । अत्राप्यास्कासोराम्वचनं ज्ञापकं नायमचामन्त्यन्त्यापरो भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् ।

---

षष्ठीबहुवचनाचा जो आम् प्रत्यय तोच घ्यावयाचा.[४]

बरें पण, 'कास्प्रत्ययात्०' या सूत्रानें सांगितलेला जो आम् तो कां घेऊं नये ?

तो घेतां येत नाहीं. कारण 'ज्या ठिकाणीं सारख्या दोन शब्दांपैकीं कोणता घ्यावा असा संशय येतो तेथें दोहोंपैकीं एक इत् न जोडलेला जर मिळत असेल तर तोच घ्यावा, इत् जोडलेला घेऊ नये' अशी परिभाषा आहे.[५]

तर मग 'कास्प्रत्ययात्' येथील जो आम् त्याचें येथें ग्रहण होऊं नये म्हणून त्याला एखादा इद्वर्ण जोडला जाऊं द्या. फार काय, हा उपयोग सोडून दिला तरी एरवीं सुद्धां 'कास्प्रत्ययात्' येथील जो आम् त्याला शेवटीं एकादा वर्ण इत् म्हणून जोडावयालाच हवा, म्हणजे आम् येथील मकाराला इत्संज्ञा संभाळली जाईल;[६] म्हणजे होणार नाहीं.

मकाराला इत्संज्ञा न होण्याकरितां म्हणून मकाराच्या पुढें एकादा वर्ण इत् जोडण्याची जरूर नाहीं. कारण मकाराला इत्संज्ञा केली असता तेथें कांहीं इत्संज्ञेचें कार्य होण्यासारखें नाहीं. सबब इत्संज्ञाच होणार नाहीं.

इत्संज्ञेचें कार्य नसावयाला काय झालें ? 'मिदचोऽन्त्यात्परः' (१।१।४७) हें म् इत् असल्याचें कार्य आहे. म् इत् केला तर ज्या शब्दाला आम् सांगितला आहे त्या शब्दाच्या शेवटींच्या स्वरानंतर तो केला जाईल.

प्रत्यय शेवटीं असलेल्या अशा धातूंच्या पुढें हा आम् सांगितला आहे, व सर्व प्रत्ययान्त धातूंच्या शेवटीं स्वरच असल्यामुळें 'मिदचोऽन्त्यात्परः' या सूत्राने शेवटल्या स्वराच्या पुढें आम् लावला काय किंवा 'प्रत्यय पुढें जोडला जातो' (३।१।२) या साधारण नियमास अनुसरून प्रत्ययान्त धातूच्या पुढें आम् जोडला काय, दोन्ही तऱ्हांमध्यें फरक कांहीं पडत नाहीं.

बरें पण, 'इजादेश्च०' (३।१।३६) या सूत्रानें प्रत्ययान्त धातूंशिवाय इतर ठिकाणीं सांगितलेला जो आम् त्याची वाट काय ? तो नाहीं का होणार शेवटच्या स्वरापुढें ?

'इजादेश्च०' या सूत्रानें सांगितलेला आम् सुद्धां शेवटच्या स्वरानंतर जोडला जात नाहीं, सबंध धातूच्या पुढेंच जोडला जातो;[७] आस् धातु व कास् धातु यांना आम् सांगितला आहे यावरून ही गोष्ट कळली जाते.

कशा रीतीनें कळते ?

---

४. म्हणजे बाकीचे तीन आम् प्रत्यय येथें घ्यावयाचे नाहींत.

५. षष्ठीबहुवचनाच्या आम् प्रत्ययाला कोणताही वर्ण इत् म्हणून जोडलेला नाहीं.

६. इत्संज्ञा संभाळली जाईल, याचा अर्थ इत्संज्ञेपासून मकार संभाळला जाईल. ज्याप्रमाणें लोकामध्यें जेवावयास कोणीही बसला असतां 'माश्या संभाळ' असें आपण त्याला म्हणतों तेथें त्या वाक्याचा माशांचें संरक्षण कर असा अर्थ नव्हे, तर माशांपासून अन्नाचें संरक्षण कर असा अर्थ असतो, त्याप्रमाणेंच येथें समजावें.

७. उदाहरणार्थ—एध् धातूला आम् करतांना मकार या इत्संज्ञकामुळें तो आम् एकाराच्या पुढें करावा लागेल, आणि सामान्य नियमानें केला तर तो एध् याच्या पुढें होईल.

न ह्यस्ति विशेष आम्यचामन्त्यात्परे सत्यसति वा । अयमस्ति विशेषः । असत्यामि द्विर्वचनेन भवितव्यं सति न भवितव्यम् । सत्यपि भवितव्यम् । कथम् । आमस्तन्मध्यपतितत्वाद्धातुग्रहणेन ग्रहणात् । तदेतत्कासासोराम्वचनं ज्ञापकमेव नायमचामन्त्यात्परो भवतीति ॥ अथापि कथंचिदित्कार्यं स्यादेवमपि न दोषः । क्रियते न्यास एव । आम अमन्त्र इति । यद्येवमामामन्त्र इति प्राप्नोति । शकन्धुन्यायेन निर्देशः ॥ अथवास्त्वस्य ग्रहणं को दोषः । इह कारयांचकार हारयांचकार चिकीर्षांचकार जिहीर्षांचकार ह्रस्वनद्यापो नुडिति नुट् प्रसज्येत । लोपायादेशयोः कृतयोर्न भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । लोपायादेशौ क्रियेतां नुडिति किमत्र कर्त-

---

शेवटच्या स्वरापुढें आम् जोडला तर आम् जोडला काय व न जोडला काय, सारखेंच; फरक कांहींही पडत नाहीं. आम् जोडूनही सवर्णदीर्घानें 'कास्' असेंच निष्पन्न होतें. तेव्हां असेंच सिद्ध होतें की आम् हा आस् व कास् या धातूंच्या पुढेंच म्हणजे आस् व कास् यांच्या पुढें जोडावा.

पण फरक पडतो; आम् जोडला नाहीं तर धातूला द्वित्व व्हावयास पाहिजे; आम् जोडल्यास द्वित्व व्हावयाचें नाहीं.

आम् जोडल्यासही द्वित्व व्हावयास पाहिजे.

तें काय म्हणून ?

आम् हा धातूच्या मध्यें घुसल्यामुळें मध्यें असलेला जो आम् त्याच्यासहित जो शब्द तोही धातूच म्हणून समजला जाईल, व त्याला द्वित्व होऊं लागेल. तेव्हां, एकंदरींत आम् येथील मकार इत्संज्ञक मानिल्यास आस् व कास् या धातूंना आम् जोडणें निष्फळ होईल; असें असतांना सुद्धां ज्याअर्थी आस् व कास् या धातूंना आम् सांगितला आहे त्याअर्थी असें निष्पन्न होतें कीं शेवटच्या स्वरानंतर आम् जोडला जात नाहीं; तर सबंध धातूच्या पुढेंच म्हणजे आस् व कास् यांच्या पुढेंच जोडला जातो.

आतां, काहीं ठिकाणीं मकार इत्संज्ञक करण्याचें कार्य दाखवण्यांत आले तरी हरकत नाहीं. कारण, सूत्रात मकार इत् न होईल अशाच रीतीनें 'आम अमन्त्रे' अशीं पदे घातलीं आहेत.

पण 'आम अमन्त्रे' अशीं पदें असलीं तर 'आमामन्त्रे' असें नाहीं का होणार ?

'आममन्त्रे' असेंच सूत्र होईल. 'शकन्धु'[११]शब्दांत जसा संधि आहे तसाच येथें घेतला जाईल.

अथवा येथें 'कास्प्रत्ययादाममन्त्रे' येथील आम् घेतला जाऊं दे. काय हरकत आहे ?

कां बरें ? कारयांचकार, हारयांचकार, चिकीर्षांचकार, जिहीर्षांचकार, या ठिकाणीं ऱ्हस्व स्वर जो कारि व हारि येथील इकार अथवा चिकीर्ष व जिहीर्ष येथील अकार त्यांचे पुढें आम् आहे म्हणून त्या आमाला नुडागम होऊं लागेल.

'अयामन्ता०' ( ६।४।५५ ) या सूत्रानें इकाराला अय् आदेश व अकाराचा 'अतो लोपः' (६।४।४८) या सूत्रानें लोप केल्यानंतर नुडागम होणार नाहीं. या ठिकाणीं पुढीलप्रमाणें विचार करावाः-प्रथम लोप व अयादेश करावे, अथवा नुडागम प्रथम करावा.

मग काय बरें येथें करावें ?

---

८. कास् धातूला मध्यें आम् आगम केल्यानंतर का+आस् असें होतें. हा धातु नव्हे असें शंकाकार समजत आहे.

९. एध् वगैरे धातूंचे ठिकाणीं.

१०. आम् यांतील मकाराच्यापुढें ऱ्हस्व अकार इत् जोडून आम असा अकारान्त प्रत्यय सूत्रांत जोडला आहे.

११. शक+अन्धु या पदांचा संधि 'शकन्ध्वादिषु०' ( ६।१।९४ वार्तिक ४ ) या वार्तिकानें पररूप होऊन शकन्धु असा शब्द सिद्ध होतो. त्याप्रमाणें आम अमन्त्रे या ठिकाणींही पररूप होऊन आममन्त्रे असें होईल. शकन्ध्वादिगण हा आकृतिगण असल्यामुळें त्या गणामध्यें आममन्त्रे या शब्दाची योजना करतां येईल.

व्यम् । परत्वान्नुट् । नित्यौ लोपायादेशौ । कृतेऽपि नुटि प्राप्नुतोऽकृतेऽपि । तत्र नित्यत्वाल्लोपायादेशयोः कृतयोर्विहतनिमित्तत्वान्नुड् न भविष्यति ॥

अथास्य कस्मान्न भवति किमेत्तिङव्ययघादाम्वद्रव्यप्रकर्ष इति । अननुबन्धकग्रहणे हि न सानुबन्धकस्येति । स तर्ह्येवमर्थोऽनुबन्धः कर्तव्यः । ननु चावश्यमुगित्कार्यार्थोऽनुबन्धः कर्तव्यः । नार्थ उगित्कार्यार्थेनानुबन्धेन । लिङ्गविभक्तिप्रकरणे सर्वमुगित्कार्यं न चामो लिङ्गविभक्ती स्तः । अव्ययमेषः ॥ मकारस्य तर्हीत्संज्ञापरित्राणार्थोऽनुबन्धः कर्तव्यः । इत्कार्याभावादत्रेत्संज्ञा न भविष्यति ॥ इदमस्तीत्कार्यं मिदचोऽन्त्यात्पर इत्यचामन्त्यात्परो यथा स्यात् । नैतदस्ति । घान्तादयं विधीयते तत्र नास्ति

---

परसूत्रानें सांगितला असल्यामुळें नुट् करावा असें म्हणावें, तर लोप व अयादेश हे नित्य आहेत असें आढळून येतें; कारण नुट् करण्याचे अगोदरही ते प्रवृत्त होतात, तसेच नुट् केल्यानंतरही प्रवृत्त होतात. एकंदरींत लोप व अयादेश हे नित्य असल्यामुळें ते प्रथम केले पाहिजेत, व ते केल्यावर ऱ्हस्वस्वररूपीं जें नुडागमाचें निमित्त तें नाहींसें झाल्यामुळें नुट् होणारच नाहीं.

बरें पण, 'किमेत्तिङव्ययघादाम्वद्रव्यप्रकर्षे' ( ५।४।११ ) या सूत्रानें किम् वगैरे शब्दांपुढें तरप् किंवा तमप् प्रत्यय केल्यानंतर त्याच्या पुढें सांगितलेला जो आम् त्याचें प्रस्तुत 'ऱ्हस्वनद्यापो नुट्' या सूत्रांत ग्रहण कां करूं नये ?

वरीलच उत्तर. 'अननुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्य ग्रहणम्' या परिभाषेमुळें इत् जोडलेला जो 'किमेत्तिङव्ययघादामु०' या सूत्रांतील आमु तो घेतां येत नाहीं.

तर मग वर दाखविलेल्या कारणास्तव इत्संज्ञक वर्ण जोडा.[12]

असें कां ?

उगित्संज्ञकाला उद्देशून जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं होण्याकरितां उकार इत्संज्ञक येथें जोडावयासच पाहिजे.

उगित्संज्ञकाच्या निमित्तानें होणाऱ्या ङीप् (४।१।६), नुम् (७।१।७०), वगैरे कार्यांकरितां येथें उकार इत्संज्ञक जोडण्याची मुळींच जरूर नाहीं. कारण, लिंग व विभक्ति यांच्या प्रकरणामध्यें उकार इत्संज्ञकाच्या निमित्तानें होणारीं कार्यें सांगितलीं[13] आहेत, आणि 'किमेत्तिङव्यय०' या सूत्रानें सांगितलेल्या आम् प्रत्ययाच्या पुढें लिंगप्रत्ययही लागत नाहींत व विभक्तिप्रत्ययही लागत नाहींत. कारण, या सूत्रानें सांगितलेला आम् प्रत्यय शेवटीं लागून तयार झालेला शब्द अव्यय[14] होतो.

पण आमु येथील मकार शेवटीं आल्यास त्याला इत्संज्ञा होऊन त्याचा लोप होईल तेव्हां त्याला इत्संज्ञा न होण्याकरितां तरी मकारानंतर एकादा इद्वर्ण जोडलाच पाहिजे.

मकाराला इत्संज्ञा केली तरी कांहींएक उपयोग नाहीं, म्हणून मकाराला इत्संज्ञा होणारच नाहीं.

असें काय म्हणून ? 'मिदचोऽन्त्यात्परः' (१।१।४७) या सूत्रानें सांगितलेलें मकारेत्संज्ञक असल्याचें कार्य आहे. मकार इत्संज्ञक केला तर 'आ' हा आगम शेवटच्या स्वराच्या पुढें जोडला जाईल.

असें म्हणतां येत नाहीं. कारण 'किमेत्तिङव्यय०' या सूत्रानें सांगितलेला हा आम् घ

---

१२. पाणिनीनें मूळचा उकार जोडला आहे तो कायम ठेवा.

१३. 'उगितश्च' ( ४।१।६ ) या सूत्रानें सांगितलेला ङीप् प्रत्यय स्त्रीलिंगाची विवक्षा असतांना सांगितला आहे. तसाच 'उगिदचां०' (७।१।७०) या सूत्रानें सांगितलेला नुम् आगम सर्वनामस्थानसंज्ञक विभक्ति पुढें असतांना सांगितला आहे.

१४. पचतितराम् असें आम् प्रत्यय शेवटीं लागून अव्यय तयार होतें. त्याला 'तद्धितश्चा०' ( १।१।३८ ) या सूत्रानें अव्यय संज्ञा होते.

विशेषो मिदचोऽन्त्यात्पर इति वा परत्वे प्रत्ययः पर इति वा परत्वे ॥ अथापि कथंचिदित्कार्यं स्यादेवमपि न दोषः । क्रियते न्यास एव ॥ अथवास्त्वस्य ग्रहणं को दोषः । इह पचतितराम् जल्पतितराम् ह्रस्वनद्यापो नुडिति नुट् प्रसज्येत । लोपे कृते न भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । लोपः क्रियतां नुडिति किमत्र कर्तव्यम् । परत्वान्नुट् । एवं तर्हि ह्रस्वनद्यापो नुडित्यत्र यस्येति लोपोऽनुवर्तिष्यते ॥

अथास्य कस्मान्न भवति ङेराम्नद्याम्नीभ्य इति । किं च स्यात् । कुमार्याम् किशोर्याम् खट्वायाम् मालायाम् तस्याम् यस्यामिति ह्रस्वनद्यापो नुडिति नुट् प्रसज्येत । आड्याट्स्याटोऽत्र बाधका भविष्यन्ति । इदमिह संप्रधार्यम् । आड्याट्स्याटः क्रियन्तां नुडिति

---

म्हणजे तर व तम हे प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दांनाच सांगितला आहे. तेव्हां मकार इत्संज्ञक असल्यामुळें शेवटच्या स्वरापुढें जोडला काय किंवा प्रत्यय म्हणून सबंध शब्दाच्या पुढें जोडला काय, दोन्हींमध्यें कांहीं फरक पडत नाहीं.[१५]

आतां कांहीं तरी करून[१६] दुसरे एकादे ठिकाणीं मकार इत् असल्यामुळें कार्य जरी उपस्थित झालें तरी हरकत नाहीं; कारण उकार इत्संज्ञक वर्ण जोडूनच सूत्र लिहिलें आहे.

अथवा, हा आम् 'ह्रस्वनद्यापो नुट्' या सूत्रानें सांगितलेल्या नुटाविषयीं घ्यावा. त्याला काय हरकत आहे ?

का बरें ? पचतितराम् व जल्पतितराम् या उदाहरणांत 'ह्रस्वनद्यापो०' या सूत्रानें 'तर' यांतील शेवटचा जो ह्रस्व अकार त्याचे पुढील 'आम्' प्रत्ययाला नुट् होऊं लागेल ना ?

पण, तर व तम येथील अकाराचा प्रथम लोप केला म्हणजे नुट् आगमाची प्राप्तीच येत नाहीं. या ठिकाणीं पुढें लिहिल्याप्रमाणें विचार करावाः—पचतितराम् व जल्पतितराम् या उदाहरणांमध्यें प्रथमतः अकाराचा 'यस्येति च' (६।४।१४८) यानें लोप करावा किंवा 'ह्रस्वनद्यापो०' (७।१।५४) यानें आम् प्रत्ययाला नुट् आगम करावा; मग त्यांमध्यें काय बरें करावें ?

परसूत्रानें सांगितला असल्यामुळें नुट् आगम करावा असें दिसतें. तसें होऊं लागल्यास 'ह्रस्वनद्यापो०' या सूत्रांत 'यस्येति च' या सूत्रानें सांगितलेल्या लोपाची अनुवृत्ति[१७] करूं म्हणजे 'पचतितराम्' वगैरे उदाहरणांमध्यें 'ह्रस्वनद्यापो०' याच सूत्रानें 'तर' येथील शेवटच्या अकाराचा लोप होईल व कांहीं अडचण येणार नाहीं.

बरें पण, 'ङेराम्नद्याम्नीभ्यः' या सूत्रानें सांगितलेला जो ङि या प्रत्ययाला होणारा आम् त्याचें प्रस्तुत 'ह्रस्वनद्यापो०' या सूत्रांत ग्रहण का होऊं नये ?

ग्रहण झाल्यानें काय होईल ?

कुमार्याम्, किशोर्याम्, खट्वायाम्, मालायाम्, तस्याम्, यस्याम्, या उदाहरणामध्यें 'ह्रस्वनद्यापो०' यानें आम् प्रत्ययाला नुट् होऊं लागेल.

नुट् होणार नाहीं. कारण आट्, याट् आणि स्याट् हे आगम[१८] नुट् या आगमाचा बाध करतील.

येथें असें ठरवावयाचें आहे कीं आट्, याट् आणि स्याट् हे आगम प्रथम करावयाचे किंवा

---

१५. कारण कसेंही केलें तरी आ हा तर आणि तम, यांतील शेवटच्या अकारांच्या पुढेंच होणार आहे.

१६ आम् प्रत्ययांतील इत्संज्ञक मकाराचा उपयोग व्हावा म्हणून त्याच्या जोरावर हा आम् प्रत्यय तर आणि तम यांशिवाय देखील अन्य ठिकाणीं कचित् होतो अशी कल्पना करून एकाद्या हलन्त शब्दामध्यें शेवटच्या स्वरापुढें आ हा मित् प्रत्यय केला असतां मित् करण्याचा उपयोग होत आहे.

१७. म्हणजे तद्धित प्रत्यय पुढें असतांना अकाराचा लोप होतो असा एक स्वतन्त्र लोप सांगून त्यानें नुटाचा बाध करतां येईल.

१८. 'आण् नद्याः' (७।३।११२), 'याडापः' (७।३।११३), 'सर्वनाम्नः स्याट्०' (७।३।११४), या तीन सूत्रांनीं हे आगम सांगितले आहेत.

किमत्र कर्तव्यम् । परत्वादाड्याट्स्याटः । अथेदानीमाड्याट्स्याट्सु कृतेषु पुनःप्रसङ्गान्नुट् कस्मान्न भवति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति ॥

**[ षट्चतुर्भ्यश्च ॥ ७।१।५५ ॥ ]**

**श्रीग्रामण्योश्छन्दसि ॥ ७।१।५६ ॥**

अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथं श्रीणामुदारो धरुणो रयीणाम् अपि तत्र सूतग्रामणीनाम् । इह तावच्छ्रीणामुदारो धरुणो रयीणाम् विभाषामि नदीसंज्ञा सा छन्दसि व्यवस्थितविभाषा भविष्यति । अपि तत्र सूतग्रामणीनामिति सूताश्च ग्रामण्यश्च सूतग्रामणि तत्र ह्रस्वनद्यापो नुडित्येव सिद्धम् ॥

**[ गोः पादान्ते ॥ ७।१।५७ ॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये सप्तमस्याध्यायस्य प्रथमे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

नुडागम प्रथम करावयाचा ? मग त्यांमध्यें काय बरें अगोदर करावें ?

परसूत्रांनीं सांगितलें असल्यामुळें आट्, याट् आणि स्याट् हे आगम प्रथम करावे लागतील, असेंच म्हटलें पाहिजे.

बरें पण, आट्, याट् किंवा स्याट् हे आगम जोडल्यानंतर पुन्हा नुटाची प्राप्ति आल्यामुळें नुट् का होऊं नये ?

एकदा एकादे सूत्र दुसऱ्या सूत्राबरोबर उपस्थित होऊन त्याचा दुसऱ्या सूत्राने 'विप्रतिषेधे०' ( १।४।२ ) या शास्त्राला अनुसरून बाध झाला म्हणजे दुसऱ्या सूत्रानें सांगितलेलें कार्य झाल्यानंतर जरी तें सूत्र पुन्हां उपस्थित झालें तरी त्यानें कार्य होत नाहीं, त्याचा एकदां जो बाध झाला तो कायमचाच समजावयाचा, अशी परिभाषा आहे. (५४)

(सू. ५६ ) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल. न केल्यास 'श्रीणामुदारो धरुणो रयीणाम्' 'अपि तत्र सूतग्रामणीनाम्' हे प्रयोग कसे साधावयाचे ?

'श्रीणामुदारो धरुणो रयीणाम्' येथल्या संबंधानें बोलावयाचें म्हणजे लोकामध्यें आम् प्रत्यय पुढें असतांना 'वामि' ( १।४।५ ) या सूत्रानें जी विकल्पानें नदी संज्ञा सांगितली आहे, ती वेदामध्यें व्यवस्थितविकल्पानें समजली जाईल, म्हणजे कार्दी ( आपणांस दिसतील त्या ) उदाहरणांमध्यें नित्य केली जाईल. तसेंच 'अपि तत्र सूतग्रामणीनाम्' येथील ग्रामणीनाम् या पदाविषयीं बोलावयाचें म्हणजे सूत आणि ग्रामणी या अर्थीं समाहारद्वंद्व समास करून 'सूतग्रामणि' असा शब्द साधावा आणि त्याच्या षष्ठीबहुवचनाचें सूतग्रामणीनाम् हें रूप समजावें, म्हणजे 'ह्रस्वनद्यापो०' याच सूत्रानें नुट् आगम होऊन रूप सिद्ध होईल.

---

१. ( सू. ५५ ) षट्संज्ञक शब्द आणि चतुर् शब्द यांच्या पुढील आम् प्रत्ययाला नुट् असा आगम होतो; उदा० षण्णाम्, चतुर्णाम्.

१. ( सू. ५६ ) वेदामध्यें श्री आणि ग्रामणी या शब्दांच्या पुढील आम् प्रत्ययाला नुडागम होतो. लोकामध्यें श्री शब्दाला 'वामि' ( १।४।५ ) या सूत्रानें नदी संज्ञा विकल्पानें होते. नदी संज्ञा केली असतां 'ह्रस्वनद्यापो नुट्' ( ७।१।५४ ) या सूत्रानें नुडागम होतो; नदी संज्ञा केली नाहीं म्हणजे होत नाहीं. त्यामुळें श्रीणाम्, श्रियाम् अशीं दोन रूपें होतात. परंतु वेदामध्यें तर श्रीणाम् असें एकच रूप दृष्टीस पडतें; तेव्हां नदी संज्ञा नसतांनाही नुडागम झाला पाहिजे, याकरितां या सूत्रामध्यें श्री शब्द उच्चारला आहे; आणि ग्रामणी शब्दाला नदी संज्ञा मुळींच नाहीं, म्हणून वेदामध्यें नुट् आगम होण्याकरतां ग्रामणी शब्द उच्चारला आहे.

२. सूत आणि ग्रामणी यांचा समाहारद्वंद्व केला असतां 'ह्रस्वो नपुंसके०' ( १।२।४७ ) या सूत्रानें ह्रस्व होऊन सूतग्रामणि असा ह्रस्वइकारान्त शब्द सिद्ध होतो. तसे तीन शब्द घेऊन एकशेष करून एक सूतग्रामणि शब्द अवशिष्ट राहतो व त्याहून बहुवचन करतां येतें.

१. ( सू. ५७ ) वेदामध्यें पादाच्या शेवटीं असलेल्या गो शब्दाच्या पुढील आम् प्रत्ययाला नुट् आगम होतो.

**इदितो नुम् धातोः ॥ ७।१।५८ ॥**

अथ धातोरिति किमर्थम् । अभैत्सीत् अच्छैत्सीत् ॥

**नुम्विधावुपदेशिवद्वचनं प्रत्ययविध्यर्थम् ॥ १ ॥**

नुम्विधावुपदेशिवद्भावो वक्तव्यः । उपदेशावस्थायां नुम्भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । प्रत्ययविध्यर्थम् । उपदेशावस्थायां नुमि कृत इष्टः प्रत्ययविधिर्यथा स्यात् । कुण्डा हुण्डेति ॥

**इतरथा ह्यनकारे प्रत्ययः ॥ २ ॥**

अक्रियमाणे ह्युपदेशिवद्भावेऽनकारे यः प्रत्ययः प्राप्नोति स तावत्स्यात्तस्मिन्नवस्थिते नुम् ॥ तत्र को दोषः ।

**तत्रायथेष्टप्रसङ्गः ॥ ३ ॥**

तत्रायथेष्टं प्रसज्येत । अनिष्टे प्रत्ययेऽवस्थिते नुम् । अनिष्टस्य प्रत्ययस्य श्रवणं प्रसज्येत ॥

**धातुग्रहणसामर्थ्याद्वा तदुपदेशे नुम्विधानम् ॥ ४ ॥**

धातुग्रहणसामर्थ्याद्वा तदुपदेशे धातूपदेशे नुम्भविष्यति ॥ ननु चान्यद्धातुग्रह-

---

येथें धातोः हें पद कशाकरितां घातलें आहे ?

अभैत्सीत्, अच्छैत्सीत्, वगैरे रूपांकरितां येथें सिच् (३।१।४४) प्रत्ययाचा जो इकार इत् त्याच्या निमित्तानें सिच् प्रत्ययाला नुम् होऊं नये म्हणून.

( वा. १ ) हा नुमागम सांगताना उपदेशिवद्भाव सांगावयास पाहिजे; थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे धातूच्या उपदेशाच्या अवस्थेंतच धातूचा इकार इत् असल्यास धातूला नुम् होतो असें म्हणावयास पाहिजे.

तें कशाकरितां ?

योग्य प्रत्यय होण्याकरितां उपदेशाच्या अवस्थेंतच नुम् केला म्हणजे आपणांस जो प्रत्यय पाहिजे तो होईल. कुण्डा[2], हुण्डा, हीं उदाहरणें पहा.

(वा. २) उपदेशिवद्भाव केला नाहीं तर नकाररहित धातु असताना जो प्रत्यय होण्याजोगा असेल तो होईल, व तो झाल्यावर नतर नुम् होईल.

मग तसें झालें तरी काय बिघडलें ?

( वा. ३ ) तसें झाल्यास जें रूप व्हावयास नको तें होऊं लागेल. जो प्रत्यय व्हावयास नको तो प्रत्यय धातूपुढें लागेल व तो प्रत्यय लागल्यानंतर नुम् होईल; आणि जो प्रत्यय नको तो ऐकण्यांत येईल.

(वा. ४) अथवा उपदेशिवद्भाव केला पाहिजे असें विशेष रीतीनें बोलावयास नको. कारण येथें 'धातु' या पदाची वास्तविक पाहतां कांहीं जरूर नाहीं. तरीसुद्धा सूत्रांत तें घातलेंच आहे, तेव्हां

---

१. (सू. ५८) ज्या धातूचा ऱ्हस्व इकार इत्संज्ञक आहे त्याला नुम् असा आगम होतो. नुम् यांतील मकार इत्संज्ञक आहे. हा आगम मित् असल्यामुळें धातूमध्यें शेवटच्या स्वरापुढें होतो; उदा० इदि परमैश्वर्ये इन्दति.

२. कुडि धातूचा ऱ्हस्व इकार इत्संज्ञक आहे. या धातूचें भावे प्रत्यय करून स्त्रीलिंगीं भाववाचक नाम कुण्डा असें होतें. कुड् धातूच्या उपदेशावस्थेंतच प्रत्यय करण्याच्या पूर्वी नुमागम होऊन कुन्ड् असें झालें म्हणजे उकाराला गुरुसंज्ञा होते आणि त्यामुळें 'गुरोश्च हलः' (३।३।१०३) या सूत्रानें 'अ' हा प्रत्यय होतो. हा प्रत्यय 'स्त्रियां क्तिन्' ( ३।३।९४ ) या सूत्रानें सांगितलेल्या क्तिन् प्रत्ययाचा बाधक आहे. अप्रत्ययान्ताला स्त्रीलिंगी टाप् प्रत्यय लागून कुण्डा असें नाम होतें. जर उपदेशावस्थेमध्यें नुमागम झाला नाहीं तर कुड् या धातूमध्यें गुरु वर्ण नसल्यामुळें 'गुरोश्च हलः' या सूत्राची प्राप्ति येणार नाहीं. आणि क्तिन् प्रत्यय लागून भलतेंच रूप होईल.

१. क्तिन् प्रत्यय.

णस्य प्रयोजनमुक्तम् । किम् । अभैत्सीत् अच्छैत्सीदिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । प्रयोजनं नाम तद्वक्तव्यं यन्नियोगतः स्यात् । यच्चात्रेकारेण क्रियतेऽकारेणापि तच्छक्यं कर्तुम् ॥

## शे मुचादीनाम् ॥ ७।१।५९ ॥

## शे तृम्पादीनाम् ॥ १ ॥

शे तृम्पादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । तृम्पति तृम्फति ॥ किमर्थमिदम् । न नुमनुषक्ता एवैते पठ्यन्ते ।

## लुप्तनकारत्वात् ॥ २ ॥

लुप्यतेऽत्र नकारोऽनिदितां हल उपधायाः क्ङिति [ ६. ४. २४ ] इति ॥ यदि पुनरिम इदितः पठ्येरन् । नैवं शक्यम् । इह हि लोपो न स्यात् । तृपितः दृपित इति ॥ यदि पुनरिमे मुचादिषु पठ्येरन् । न दोषः स्यात् ॥ अथवा नैवं विज्ञायत इदितो नुम्धातोरिति । कथं तर्हि । इदितो नुम् । ततो

---

त्याचें जोरावर त्याचे उपदेशाचे वेळीं म्हणजे धातूचा उपदेश करतेवेळींच धातूला नुम् होईल.

पण वर धातु शब्द सूत्रांत घालण्याचा उपयोग सांगितला आहे ना ?

कोणता ?

अभैत्सीत्, अच्छैत्सीत्, वगैरे उदाहरणांमध्यें सिचाला नुमागम न व्हावा हा.

हा उपयोग देतां येत नाहीं. कारण केव्हांही असा उपयोग द्यावयास पाहिजे कीं तो कोणत्याही अन्य रीतीनें सिद्ध न होणारा पाहिजे. आतां या ठिकाणीं स् आणि च् या दोन वर्णांची जरूरीच आहे. त्यांच्या स्पष्ट उच्चारणाकरितां एकादा स्वर मध्यें घालणें आवश्यकच आहे; तो स्वर कोणता तरी घालावयाचा तो येथें इकार घातला आहे; इकारच पाहिजे म्हणून इकार घातला नाहीं. या ठिकाणीं इकारानें जें काम व्हावयाचें तें अकारानेंही होऊं शकेल.

( सू. ५९ वा. १) तृम्प् धातूसारख्या धातूंना श प्रत्यय पुढें असतांना नुमागम होतो असें म्हणावें, म्हणजे तृम्पति, तृम्फति, इत्यादि उदाहरणें साधतील.

पण असें कशाकरितां करावयास पाहिजे ? तृम्प्, तृम्फ्, असे नुमागमासहितच हे धातु उच्चारले आहेत ना ?

( वा. २ ) उच्चारले आहेत; परंतु नकाराचा 'श' विकरण पुढें असतांना ' अनिदितां हलः०' ( ६।४।२४ ) या सूत्रानें लोप होतो.

बरें तर हे धातू उच्चारतानाच तृपि, तृफि, असे इकार इत् जोडून उच्चारले तर ?

तसें करून चालणार नाहीं. कारण, तसें केल्यास तृपितः, दृपितः, या ठिकाणीं नकाराचा लोप होणार नाहीं. आतां, जर हे मुचादि गणामध्यें उच्चारले तर कांहीं दोष येत नाहीं. तेव्हां 'शे तृम्पादीनाम्' असें वार्तिक करावयास नको. अथवा ' इदितो नुम् धातोः ' एवढें सबंध सूत्र एकदम वाचूं नये.

तर मग कसें वाचावें ?

---

४. येथें धातोः याचा धातु संज्ञा केल्याबरोबर त्या धातूला असा अर्थ घेतां येईल.

५. तेव्हां सिच् प्रत्ययाच्या ऐवजीं सच् प्रत्यय केला असतां सकार आणि चकार यांचें स्पष्ट उच्चारणही होईल आणि इकार इत्संज्ञक नसल्यामुळें नुमागम होईल असा दोषही येणार नाहीं.

१. ( सू. ५९ ) मुच् वगैरे धातूंना श प्रत्यय पुढें असतांना नुमागम होतो; उदा० मुञ्चति.

२. नकारासहित.

३. इकार जोडल्यामुळे 'अनिदितां हलः०' ( ६।४।२४) या सूत्राची प्राप्ति येणार नाहीं. मूळचाच नकार राहून त्याला अनुस्वार आणि परसवर्ण होऊन तृम्पति वगैरे रूपें साधतील.

४. हे तृम्प् वगैरे धातू धातुपाठामध्यें मुच् धातूच्या पुढें उच्चारिले असतां ' शे मुचादीनाम् ' या प्रकृत सूत्रानेंच नुमागम होईल.

धातोरिति ॥

**[ मस्जिनशोर्झलि ॥ ७।१।६० ॥**
**रधिजभोरचि ॥ ७।१।६१ ॥ ]**
**नेट्यलिटि रधेः ॥ ७।१।६२ ॥**

इमौ द्वौ प्रतिषेधावुच्येते । उभौ शक्यावक्तुम् । कथम् । एवं वक्ष्यामि । इटि लिटि रधेर्नुम्भवतीति । तन्नियमार्थं भविष्यति । लिटयेवेडादौ नान्यस्मिन्निडादाविति ॥

**[ रभेरशब्लिटोः ॥७।१।६३ ॥**
**लभेश्च ॥ ७।१।६४ ॥ ]**
**आङो यि ॥ ७।१।६५ ॥**

इह कस्मान्न भवति । आलभ्यते । अस्तु । अनिदितां हल उपधायाः क्ङिति [६.४.२४.] इति लोपो भविष्यति ॥ इह तर्हि आलम्भ्या गौः पोरदुपधात् [३. १. ९८. ] इति यत्प्र-

---

'इदितो नुम्' असें एक सूत्र वाचावें; व नंतर 'धातोः' असें दुसरें सूत्र वाचावें; म्हणजे सर्व साधेल.

(सू. ६२) या सूत्रामध्यें न आणि अलिटि यांतील अ असे हे दोन निषेधवाचक शब्द उच्चारले आहेत. दोन्ही शब्द काढून टाकल्यास चालेल.

तें कसें ?

'इटि लिटि रधेः' इट् पुढें असतांना लिटाच्या रूपात रध् धातूला नुडागम होतो, असा त्याचा अर्थ होईल; व असें सूत्र करण्याचा उपयोग 'रधिजभोरचि' हे सूत्र असल्यामुळे कांहींही राहत नाहीं, म्हणून 'इटि लिटि रधेः' हें सूत्र नियम म्हणून घेण्यांत येईल, व 'लिटाच्या रूपांमध्येंच इट् पुढें असतांना नुम् होतो, दुसरीकडे कोठेंही इट् पुढें असतांना नुम् होत नाहीं' असा अर्थ करण्यात येईल.

(सू. ६५) आलभ्यते, या उदाहरणांत कां बरें नुम् होत नाहीं ?

होऊं द्या; झाला तरी हरकत नाहीं. 'अनिदितां हलः' (६।४।२४) या सूत्रानें त्याचा लोप होईल.

बरें पण, आलम्भ्या गौः, येथें 'पोरदुपधात् ' (३।१।९८)या सूत्रानें उपधेला अकार असल्यामुळे यत् प्रत्यय होईल, व नतर नुम् आगम होईल.

मग झाला म्हणून काय बिघडलें ? आलम्भ्या रूप पाहिजे; तेंच होईल ना ?

---

५. 'धातोः' या सूत्रामध्यें ' शे मुचादीनाम् ' या सूत्रांतील 'शे' याचा संबंध करावा, आणि श प्रत्यय पुढें असतांना धातूला नुमागम होतो असा अर्थ करावा. या सूत्राचा उपयोग मात्र सर्व ठिकाणीं करूं नये. फक्त तृम्पतिसारखे नुमागम झालेले प्रयोग ज्या धातूंचे दृष्टीस पडतील तेथेंच उपयोग करावा. असें मानलें म्हणजे तुदति वगैरे ठिकाणीं दोष येणार नाहीं, आणि शे तृम्पादीनाम् हें वार्तिक करण्याचीही जरूर नाहीं.

१. (सू ६०) मस्ज् आणि नश् या धातूंना झलादि प्रत्यय पुढें असतांना नुमागम होतो. हा नुमागम मस्ज् धातूला सकार आणि जकार यांमध्यें होतो (१।१।४७ वा. २) त्यामुळें मग्नः या उदाहरणामध्यें नकाराचा लोप करतां येतो.

१. (सू. ६१) रध् आणि जभ् या धातूंना अजादि प्रत्यय पुढें असतांना नुमागम होतो; उदा० रन्धकः, जम्भकः.

१. (सू. ६२) लिटाशिवाय इतर इडागम झालेला प्रत्यय पुढें असतांना रध् धातूला नुमागम होत नाहीं; उदा० रधिता.

१. (सू. ६३) शप् प्रत्यय आणि लिट् प्रत्यय हे दोन प्रत्यय सोडून इतर ठिकाणीं रभ् धातूला अजादि प्रत्यय पुढें असता नुम् होतो; उदा० आरम्भकः.

१. (सू. ६४) लभ् धातूलाही शप् व लिट् हे दोन प्रत्यय सोडून इतर अजादि प्रत्यय पुढें असतांना नुमागम होतो; उदा० लम्भकः, लम्भयति.

१. (सू. ६५) आङ् या उपसर्गानें युक्त लभ् धातूला यकारादि प्रत्यय पुढें कर्तव्य असेल तर तो प्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वीच नुमागम होतो; उदा० आलम्भ्यो गौः.

२. आ उपसर्गपूर्वक लभ् धातूचा कर्मणिप्रयोग आहे. येथें मध्यें ' सार्वधातुके यक् ' (३।१।६७) यानें यक् प्रत्यय झाला आहे

३. सूत्रामध्यें ' यादि प्रत्यय पुढें असतांना ' असा अर्थ मनांत घेऊन ही शंका केली आहे.

वस्थिते नुम् । तत्र को दोषः । आलम्भ्या एष स्वरः प्रसज्येत आलम्भ्या इति चेष्यते । नैष दोषः । उक्तमेतद्धातुग्रहणसामर्थ्यादुपदेशे नुम्विधानमिति ॥

[ उपात्प्रशंसायाम् ॥ ७।१।६६ ॥
उपसर्गात्खल्घञोः ॥ ७।१।६७ ॥ ]
न सुदुर्भ्यां केवलाभ्याम् ॥७।१।६८॥

अथ केवलग्रहणं किमर्थं न न सुदुर्भ्यामित्येवोच्येत ।

सुदुरोः केवलग्रहणमन्योपसर्गप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥

सुदुरोः केवलग्रहणं क्रियतेऽन्योपसृष्टाम्मा भूदिति । प्रसुलम्भम् । नैषोऽस्ति प्रयोगः । इदं तर्हि । सुप्रलम्भम् । प्रेण व्यवहितत्वान्न भविष्यति । इदं तर्हि । अतिसुलम्भम् । कर्मप्रवचनीयसंज्ञात्र बाधिका भविष्यति सुः

---

रूप 'आलम्भ्या'च होईल, पण आलम्भ्या (गौः) असें मध्योदात्त होईल. वास्तविक पाहतां आलम्भ्या (गौः) असें स्वरितान्त रूप व्हावयास पाहिजे[४].

हा दोष येत नाहीं. कारण वर एकदा सांगितलेंच आहे की 'इदितो नुम् धातोः' या सूत्रांतील 'धातोः' या पदाच्या जोरावर उपदेशावस्थेतच धातूला नुम् आगम लागतो. तेव्हां यकारादि प्रत्यय पुढें व्हावयाचा असल्यास 'लम्भ्' हाच धातु उपदेशीं नुमागम जोडलेलाच समजावयाचा; व तसा समजल्यामुळें 'पोरदुपधात्' (३।१।९८) हें सूत्र लागू न पडतां 'ऋहलोर्ण्यत्' (३।१।१२४) हें सूत्र लागू पडेल व ण्यत् प्रत्यय होऊन आलम्भ्या असेंच स्वरितान्त रूप होईल.

(सू. ६८) या सूत्रांत केवल हा शब्द कशाकरितां घातला आहे ? 'न सुदुर्भ्याम्' येवढेंच सूत्र कां उच्चारूं नये ?

(वा. १ ) सु आणि दुर् यांजविषयीं 'केवल' शब्द घातला आहे; सु अथवा दुर् याला जोडून दुसरा एकादा उपसर्ग घातला असतांना नुमागमाचा निषेध सांगणारें हें सूत्र लागूं पडूं नये म्हणून; उदाहरणार्थ-प्रसुलम्भम्, येथें नुमागमाचा निषेध होतां कामा नये.

पण प्रसुलम्भम् असा प्रयोगच दृष्टीं पडत नाहीं, तेव्हां तेथें नुम् झाला काय किंवा न झाला काय, कांहीं प्रश्नच उद्भवत नाहीं.

बरें तर, सुप्रलम्भम् रूप घ्या, येथें नुमागमाचा निषेध होणें इष्ट नाहीं.

येथें नुमागमाचा निषेध होणारच नाहीं. कारण प्रस्तुत सूत्रांत सु किंवा दुर् यांचे पुढें असलेला लभ् धातु असें म्हटलें आहे, व 'सुप्रलम्भम्' या उदाहरणांत सु व लभ् यांचेमध्यें प्र या उपसर्गानें व्यवधान येत असल्यामुळें येथें प्रस्तुत सूत्रानें नुमाचा निषेध होणारच नाहीं.

बरें तर, 'अतिसुलम्भम्' रूप घ्या. सूत्रांत केवल शब्द घातला नाहीं तर अतिसुलभम्

---

४. यकारादि प्रत्यय उत्पन्न होण्याच्या पूर्वी नुमागम झाला असता लम्भ् हा धातु ऱ्हस्वाकारोपध नसल्यामुळें 'पोरदुपधात्' या सूत्रानें सांगितलेला यत् प्रत्यय होत नाहीं; म्हणून 'ऋहलोर्ण्यत्' या सूत्रानें ण्यत् प्रत्यय होतो. त्यामुळें 'यतोऽनावः' (६।१।२१३) या सूत्रानें ल यांतील अकार उदात्त होत नाहीं, आणि 'तित्स्वरितम्' (६।१।१८५) या सूत्रानें ण्यत् प्रत्ययांतील अकार स्वरित होऊन मागील दोन्ही वर्ण अनुदात्त होतात.

१. (सू. ६६ ) उप या उपसर्गापुढील लभ् धातूला यकारादि प्रत्यय कर्तव्य असतांना नुमागम होतो, प्रशंसा हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० उपलम्भ्या विद्या.

१. (सू. ६७ ) कोणत्याही उपसर्गाहून पर लभ् धातूला खल् किंवा घञ् प्रत्यय पुढें असतांना नुम् आगम होतो; उदा० सुप्रलम्भः, प्रलम्भः, विप्रलम्भः.

१. (सू. ६८ ) सु किंवा दुर् या दोन उपसर्गांपैकीं कोणताही उपसर्ग एकटाच मागें असेल तर लभ् धातूला खल् किंवा घञ् प्रत्यय पुढें असतांना नुम् आगम होत नाहीं; उदा० सुलभम्, सुलाभः.

२. येथें सु या उपसर्गाच्या जोडीला दुसरा उपसर्ग अति हा असल्यामुळें सु हा एकटाच नाहीं; त्यामुळें

पूजायामतिरतिक्रमणे च [१. ४. ९४; ९५] इति । यदा तर्हि नातिक्रमणं न पूजा ॥ इदं चाप्युदाहरणम् । सुप्रलम्भम् । ननु चोक्तं प्रेण व्यवहितत्वान्न भविष्यतीति । नैष दोषः । सुदुर्भ्यामिति नैषा पञ्चमी । का तर्हि । तृतीया । सुदुर्भ्यामुपसृष्टस्येति । व्यवहितश्चाप्युपसृष्टो भवति ॥

**विभाषा चिण्णमुलोः ॥ ७।१।६९ ॥**

**चिण्णमुलोरनुपसर्गस्य ॥ १ ॥**

चिण्णमुलोरनुपसर्गस्येति वक्तव्यम् । इह मा भूत् । प्रालम्भि । प्रलम्भं प्रलम्भम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इहोपसर्गादित्यपि प्रकृतं नेत्यपि तत्राभिसंबन्धमात्रं कर्तव्यम् । विभाषा चिण्णमुलोरुपसर्गान्नेति ॥

---

असें रूप होईल.

अतिसुलभम् असें रूप होणारच. कारण या ठिकाणीं 'सुः पूजायाम्' (१।४।९४) या सूत्राच्या पुढील 'अतिरतिक्रमणे च' या सूत्रानें अति याला कर्मप्रवचनीयसंज्ञा होईल, व ती उपसर्गसंज्ञेचा बाध करील. उपसर्गसंज्ञेचा बाध झाल्यावर 'सु' हा येथें एकटाच उपसर्ग असल्यानें नुमागमाचा निषेध होऊन अतिसुलभम् असें रूप होईल.

पण जेव्हां अतिक्रम किंवा पूजा हे अर्थ नसतील तेव्हां काय? अर्थात् तेव्हां 'अति' हा उपसर्गच असल्यामुळें 'केवल' शब्द न उच्चारल्यास 'अतिसुलभम्' असें अनिष्ट रूप होईल. तेव्हां 'केवलाभ्याम्' हा शब्द काढून टाकतां येत नाहीं. तसेंच सुप्रलम्भम् हेंही उदाहरण 'केवल' या शब्दामुळेंच साधत आहे.

पण आतांच नाहीं का वर सांगितलें की 'सु' व 'लभ्' धातु यांच्यामध्यें प्र आल्यामुळें प्रस्तुत 'न सुदुर्भ्याम्' हें सूत्र तेथें लागूं पडणार नाहीं म्हणून?

हा दोष येत नाहीं. कारण प्रस्तुत सूत्रांत 'सुदुर्भ्याम्' येथें पञ्चमी विभक्ति नाहीं.

तर मग कोणती विभक्ति आहे?

तृतीया विभक्ति आहे. 'सु अथवा दुर् या उपसर्गांनें युक्त अशा लभ् धातूला ...' असा प्रस्तुत सूत्राचा अर्थ आहे. आणि जरी सु किंवा दुर् हा उपसर्ग व लभ् धातु यांच्यामध्यें दुसरा एकादा उपसर्ग घातला तरी सु किंवा दुर् या उपसर्गांनें युक्त लभ् धातु आहे असें म्हणतां येतेंच.

(सू. ६९, वा. १) चिण् पुढें असतांना किंवा णमुल् पुढें असतांना लभ् धातूला येथें जो विकल्पानें नुम् सांगितला आहे तो लभ् धातूला उपसर्ग जोडला नसतांना व्हावा असें सांगावें. म्हणजे प्रालम्भि व प्रलम्भंप्रलम्भम् या ठिकाणीं तो विकल्पानें होणार नाहीं; येथें नुम् नित्य व्हावयास पाहिजे.

बरें तर मग, त्याकरितां तसें विधान करा.

तसें विधान करावयास नको. कारण, प्रस्तुत सूत्रांत 'उपसर्गात्' हेंही पद मागाहून येतें, व 'न' हेंही पद मागाहून येतें; तेव्हां न आणि उपसर्गात् या दोहोंचा येथें फक्त स्वतंत्र संबंध जोडावा म्हणजे चिण् अथवा णमुल् पुढें असताना विकल्प होईल; व उपसर्ग मागें लागला असताना विकल्प होणार नाहीं; अर्थातच तेथें नुमागम नित्य होईल.

---

प्रकृत सूत्रानें निषेध होत नाहीं.

३. अति हा जरी दुसरा शब्द येथें आहे, तरी त्याला उपसर्गसंज्ञा नसल्यामुळें येथें उपसर्ग असा एकटाच सु हा आहे.

४. तेव्हां सुप्रलम्भम् येथें सु या उपसर्गानें युक्त लभ् धातु असल्यामुळें 'न सुदुर्भ्याम्' या सूत्रानें नुमागमाचा निषेध होऊं लागेल. तो 'केवल' हा शब्द घातल्यानें होत नाहीं.

१. (सू. ६९) चिण् आणि णमुल् हे प्रत्यय पुढें असतांना लभ् धातूला नुमागम विकल्पानें होतो; उदा० अलम्भि, अलाभि, लम्भंलम्भम्, लाभंलाभम्.

२. म्हणजे अनुवृत्त झालेल्या पदांचा स्वतन्त्र निराळा वाक्यार्थ करावा. या दुसऱ्या वाक्यार्थामध्यें 'विभाषा चिण्णमुलोः' या सूत्रांतील पदांचा संबंध होत आहेच.

## उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः ॥ ७।१।७० ॥

अधातोरिति किमर्थम् । उखास्रत् पर्णध्वत् ॥ अधातोरिति शक्यमवक्तुम् । कस्मान्न भवति उखास्रत् पर्णध्वदिति ।

### उगित्यञ्चतिग्रहणात्सिद्धमधातोः ॥१॥

उगित्यञ्चतिग्रहणादधातोः सिद्धम् । अञ्चतिग्रहणं नियमार्थं भविष्यति । अञ्चतेरेवोगितो धातोर्नान्यस्योगितो धातोरिति ॥ इदं तर्हि प्रयोजनमधातुभूतपूर्वस्यापि यथा स्यात् । गोमन्तमिच्छति गोमत्यति गोमत्यतेरप्रत्ययो गोमानिति ॥

## [ युजेरसमासे ॥ ७।१।७१ ॥ ]

## नपुंसकस्य झलचः ॥ ७।१।७२ ॥

### झलचो नुम्विधावुगित्प्रतिषेधः ॥ १ ॥

झलचो नुम्विधावुगिल्लक्षणस्य प्रतिषेधो वक्तव्यः । गोमन्ति ब्राह्मणकुलानि । श्रेयांसि भूयांसि ॥ ननु च झल्लक्षण उगिल्लक्षणं बाधिष्यते । कथमन्यस्योच्यमानमन्यस्य बाधकं स्यात् । असति खल्वपि संभवे बाधनं

---

( सू. ७० ) या सूत्रात 'अधातोः' हें पद कशाकरिता घातलें आहे ?

उखास्रत् व पर्णध्वत् या ठिकाणीं स्रंसु आणि ध्वंसु ह्या धातूंचा उकार इत् आहे; तेव्हां धातु उगित् म्हणून नुम् होऊं नये याकरितां.

'अधातोः' हें पद न उच्चारलें असतां चालेल.

उखास्रत् व पर्णध्वत् येथें नुम् का होऊं नये ?

(वा. १) उगित् शब्दांना नुमागम सांगतांना 'अञ्च्' हा धातु उगित् असल्यामुळें निराळा उच्चारण्याची जरूर नाहीं; तरी उच्चारला आहे, तेव्हा 'अञ्च्'धातूशिवाय इतर धातूंना नुम् लागत नाहीं असें सिद्ध होतें. अञ्च् धातूचें उच्चारण हे 'उक् इत् असणाऱ्या कोणत्याही धातूला प्रस्तुत सूत्रानें नुम् होत असेल तर अञ्च् या धातूलाच करावा' असा नियम करण्याकरितां समजलें जाईल.

तर मग, 'अधातोः' हें पद सूत्रांत घालण्याचा उपयोग असा सांगण्यांत येईल कीं पूर्वीं धातु नसून जो नामधातु वगैरे झाला असेल त्यालाही नुमागम व्हावा; उदाहरणार्थ– गोमान्. येथें गोमन्तमिच्छति या अर्थीं गोमत्य असा नामधातु करून त्याचें पुढें क्विप् प्रत्यय लावून गोमत् असें नाम केलें आहे.

( सू. ७२, वा. १ ) येथें जो झल् किंवा अच् शेवटीं असलेल्या शब्दाना नुम् सांगितला आहे तो होतांना उगिताला मानून जर 'उगिदचाम्' ( ७।१।७० ) या सूत्रानें सांगितलेला नुम्ही कांहीं ठिकाणीं होऊं लागला तर तो 'उगिदचाम्' हा नुम् होत नाहीं असें म्हणावें; उदाहरणार्थ– गोमन्ति ब्राह्मणकुलानि, श्रेयांसि, भूयांसि, वगैरे.

पण झलाला उद्देशून प्रस्तुत सूत्रांत सांगितलेला नुम् हा उगिताला उद्देशून 'उगिदचाम्०' या सूत्रानें सांगितलेल्या नुमाचा बाध करील.

पण एका विशिष्ट शब्दस्वरूपाला उद्देशून

---

१. ( सू. ७० ) उक् इत्संज्ञक ज्याचा आहे असा धातूशिवाय कोणताही शब्द आणि नकाराचा लोप झालेला अञ्च् धातु यांना सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना नुमागम होतो; उदा० भवन्तौ भवन्तः, प्राञ्चौ प्राञ्चः.

२. गोमत् हा मूळचा धातु नव्हे; मतुप्प्रत्ययान्त प्रातिपदिक आहे. त्याच्या पुढें क्यच् प्रत्यय लागून नामधातु झाला तरी तेथें तो मूळचा धातु नव्हे; या गोष्टीकडे लक्ष देऊन नुमागम करतां यावा याकरितां सूत्रामध्यें 'अधातोः' असें पाणिनीनें मुद्दाम म्हटलें आहे.

१. ( सू. ७१ ) युज् याला सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना नुमागम होतो, परंतु त्या युज् याच्याबरोबर कोणत्याही इतर पदाचा समास झाला नसेल तर; उदा० युङ्, युञ्जौ, युञ्जः.

१. ( सू. ७२ ) नपुंसकलिंगामध्यें झलन्त किंवा अजन्त अशा अंगाला सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना नुमागम होतो; उदा० वनानि, यशांसि.

२. गोमन्ति यामध्यें गो याशब्दाहून केलेला मतुप् हा प्रत्यय उगित् आहे. श्रेयांसि व भूयांसि येथें ईयसुन् हा प्रत्यय उगित् आहे.

भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यात् । किं च स्याद्यद्यत्रोगिल्लक्षणोऽपि स्यात् । द्वयोर्नकारयोः श्रवणं प्रसज्येत । न व्यञ्जनपरस्यैकस्य वानेकस्य वा श्रवणं प्रति विशेषोऽस्ति । ननु च प्रतिज्ञाभेदो भवति । श्रुतिभेदेऽसति किं प्रतिज्ञाभेदः करिष्यति । ननु च श्रुतिकृतोऽपि भेदोऽस्ति । इह तावच्छ्रेयांसि भूयांसीति परस्यानुस्वारे कृते पूर्वस्य श्रवणं प्राप्नोति । तथा कुर्वन्ति कृषन्तीति परस्यानुस्वारपरसवर्णयोः कृतयोः पूर्वस्य णत्वं प्राप्नोति । अथैकस्मिन्नपि नुमि णत्वं कस्मान्न भवति । अनुस्वारीभूतो णत्वमतिक्रामति ।

---

सांगितलेलें कार्य ('नपुंसकस्य झलचः' हा नुमागम) दुसऱ्या प्रकारच्या शब्दस्वरूपाला उद्देशून सांगितलेल्या कार्याचा ('उगिदचाम्' या नुमागमाचा) कसा बाध करील[3] ? शिवाय येथें खरोखर पाहिलें तर जेथें दोन्ही कार्यें होण्याचा संभव नसेल तेथेंच एका कार्यानें दुसऱ्या कार्याचा बाध व्हावा. प्रस्तुत ठिकाणीं तर दोन्ही कार्यांचा संभव आहे. तेव्हां एक कार्य झाल्यानंतर दुसरें, अशीं दोन्हींही कार्यें होतील.

मग काय होईल ? जर या ठिकाणीं 'नपुंसकस्य०' या प्रकृत सूत्रानें नुमागम झाल्यानंतर 'उगिदचाम्०' या सूत्रानें पुन्हां आणखी नुम् झाला तर ?

दोन नकार ऐकूं येऊं लागतील.

आले म्हणून काय बिघडलें ? व्यंजन पुढें असतांना मागें एक नकार काय किंवा दोन नकार काय, ऐकूं येण्यांत शब्दांत फरक[4] पडत नाहीं.

पण प्रतिज्ञाभेद होतो ना ?

रूप ऐकूं येण्यांत जोंवर फरक पडत नाहीं तोंवर प्रतिज्ञाभेद झाला म्हणून काय हरकत आहे ?

तसें का ? ऐकूं येण्यांत सुद्धां फरक[5] पडतो. कारण असें पहा की श्रेयांसि व भूयांसि या उदाहरणांमध्यें दोन्ही नुमागम करून पुढच्या नुमागमाला अनुस्वार केल्यावर पूर्व नुमागम निराळा ऐकूं येईल[6]. तसेंच कुर्वन्ति व कृषन्ति या उदाहरणामध्यें दोन्ही नुमागम केल्यास पुढील नुमागमाला अनुस्वार व परसवर्ण केल्यावर मागील नुमागमाला णकार होऊं लागेल[7].

एकच नुमागम केला असतां त्या नुमाला णकार का होत नाहीं ?

तो नकार अनुस्वाररूप होऊन णत्वाच्या सपाट्यांतून सुटतो (णत्वाला टाळतो); अनुस्वार (८।३।२४) व णत्व (८।४।२) यांची एकदम प्राप्ति येते; णत्व असिद्ध असल्यामुळें त्याचे अगोदर अनुस्वार होतो (व अनुस्वार झाल्यावर णत्व ज्याला होईल असा 'न' च रहात नाहीं.)

बरें पण, अनुस्वाराला पुन्हां परसवर्ण नकार केल्यावर त्याला णकार कां होत नाहीं ?

---

३. कारण, झलन्त अंग या दृष्टीनें 'नपुंसकस्य झलचः' याची प्राप्ति येते. आणि उगित्प्रत्ययान्त अंग या दृष्टीनें 'उगिदचाम्०' या सूत्राची प्राप्ति येते. तेव्हां एकाच निमित्तानें हीं दोन सूत्रें आलेलीं नाहींत. तेव्हां तीं दोन्ही करण्याला हरकत दिसत नाहीं.

४. जसें पुत्र या शब्दामध्यें र हें व्यंजन पुढें असतांना त्याच्या मागील तकार एक उच्चारला काय किंवा दोन उच्चारले काय, त्यांत फारसा फरक दृष्टोत्पत्तीस येत नाहीं.

५. गोमन्ति वगैरे उदाहरणांमध्यें किती नकार आहेत या प्रश्नाचें उत्तर दोन नुमागम झाले तर दोन नकार आहेत असें द्यावें लागेल, आणि एकच नुमागम झाला तर एक नकार आहे असें द्यावें लागेल.

६. कारण, पूर्वीच्या नुमागमाला झल् पुढें नसल्यामुळें 'नश्चापदान्तस्य०' (८।३।२४) यानें अनुस्वार होणार नाहीं. तेव्हां एक नकार आणि एक अनुस्वार असे हे तकाराच्या मागील दोन वर्ण विजातीय झाल्यामुळें रूप ऐकण्यांत सुद्धां फरक स्पष्ट दिसून येईल.

७. येथेंही पूर्वनकाराला झल् पुढें नसल्यामुळें अनुस्वार होणार नाहीं; तेव्हां अर्थातच त्याला मागें रेफ व षकार असल्यामुळें णत्व होऊं लागेल.

कृते तर्हि परसवर्णे कस्मान्न भवति। असिद्धे च परसवर्णः ॥

**विप्रतिषेधात्सिद्धम् ॥ २ ॥**

विप्रतिषेधात्सिद्धमेतत्। झल्लक्षणः क्रियतामुगिल्लक्षण इति झल्लक्षणो भविष्यति विप्रतिषेधेन । झल्लक्षणस्यावकाशः । सर्पींषि धनूंषि । उगिल्लक्षणस्यावकाशः । गोमान् यवमान्। इहोभयं प्राप्नोति। गोमन्ति ब्राह्मणकुलानि। यवमन्ति ब्राह्मणकुलानि। श्रेयांसि भूयांसीति। झल्लक्षणो भविष्यति विप्रतिषेधेन ॥ ननु च पुनःप्रसङ्गविज्ञानादुगिल्लक्षणः प्राप्नोति ।

**पुनःप्रसङ्ग इति चेदमादिभिस्तुल्यम्॥३॥**

पुनःप्रसङ्ग इति चेदमादिभिस्तुल्यमेतद्भवति। तद्यथा। युष्मदस्मदोरमादिषु कृतेषु पुनःप्रसङ्गाच्छिशीलुग्नुमो न भवन्ति । एवं झल्लक्षणे कृते पुनःप्रसङ्गादुगिल्लक्षणो न भविष्यति ॥ यदप्युच्यतेऽसति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यादिति सत्यपि संभवे बाधनं भवति।

---

परसवर्ण हा असिद्ध आहे ( णत्व सांगणाऱ्या सूत्राला तो दिसत नाहीं, म्हणून णत्व होत नाहीं ).

( वा. २ ) या सर्व अडचणी दूर होऊन विप्रतिषेधाच्या नियमांनींच इष्ट रूप साधतें. कारण, या ठिकाणीं झलाला उद्देशून सांगितलेला नुम् करावयाचा किंवा उगिताला उद्देशून सांगितलेला नुम् करावयाचा, असा प्रश्न आला असतां विप्रतिषेधाच्या नियमांना ( १।४।२ ) अनुसरून पुढील सूत्रानें सांगितला असल्यामुळें झलाला उद्देशून सांगितलेलाच नुम् होईल. ज्यास्ती स्पष्ट मांडावयाचें म्हणजे झलाला उद्देशून सांगितलेल्याच नुमाचीं उदाहरणें सर्पींषि व धनूंषि हीं होत[8]. उगिताला उद्देशून सांगितलेल्याच नुमाचीं उदाहरणें गोमान्[9], यवमान्, हीं आहेत. गोमन्ति ब्राह्मणकुलानि, श्रेयांसि, भूयांसि, या उदाहरणांमध्यें दोन्ही सूत्रांची प्राप्ति[10] येते. तेव्हां विप्रतिषेधाच्या ठरावाप्रमाणें म्हणजे 'जेव्हां दोन्ही कार्यांना पृथक् उदाहरणें मिळत असून एकादे वेळीं एकदम एकाच उदाहरणांत तीं कार्यें प्राप्त होतात तेव्हां पर सूत्रानें सांगितलेलें कार्यच करावयाचें' या ठरावाप्रमाणें झलाला मानून सांगितलेलाच नुम् होईल.

होऊं द्या; पण तो होऊन गेल्यावरही पुन्हां उगिताला मानून सांगितलेला नुम् प्राप्त होतो.

( वा. ३ ) पुन्हां नुम् प्राप्त होतो असें म्हटलें तर वर सांगितलेल्या ( ७।१।२६ ) अम् आदेशाच्या तऱ्हेसारखीच हीही तऱ्हा होते. ती अशीः— युष्मद् व अस्मद् या शब्दांच्या पुढील प्रथमा आणि द्वितीया या विभक्तींना अम् आदेश केल्यावर पुन्हा प्राप्त झालेले शि, शी, लुक् आणि नुम् हे होत नाहींत[11]; त्याचप्रमाणे येथें झलाला उद्देशून सांगितलेला नुम् होऊन गेल्यावर उगिताला उद्देशून सांगितलेला नुम् जरी प्राप्त झाला तरी होणार नाहीं. आतां, 'जेव्हा दोन कार्यें एकदम येतात व दोन्ही होणे शक्य नसतें तेव्हां एक कार्य दुसऱ्या कार्याचा बाध करतें; उदा० गिरीशः येथें इको यणचि याचा अकः सवर्णे दीर्घः बाध करतें असा नियम आहे' असें जें म्हणण्यांत येतें त्याविषयीं येवढेंच म्हणावयाचें की कांहीं ठिकाणीं दोन्ही कार्यें होणें संभवनीय असतें, व जरी संभवनीय असलें तरीसुद्धा एक कार्य दुसऱ्याचा बाध करतें; उदा० ब्राह्मणांना दहीं देण्यांत यावें,

---

८. येथें उगित् प्रत्यय नसल्यामुळें 'उगिदचाम्०' (७।१।७०) या सूत्राची प्राप्ति येत नाहीं. तेव्हां 'नपुंसकस्य०' (७।१।७२) या सूत्राला हें स्वतन्त्र उदाहरण मिळतें.

९. या ठिकाणीं पुंलिंग असल्यामुळें 'नपुंसकस्य०' या सूत्राची प्राप्ति येत नाहीं. तेव्हां हें 'उगिदचाम्०' या सूत्राला स्वतन्त्र उदाहरण मिळतें

१०. कारण, येथें उगित् प्रत्ययही आहे, आणि नपुंसकलिंगही आहे.

११. पूर्वी ७।१।२६ हें सूत्र पहा.

तद्यथा । दधि ब्राह्मणेभ्यो दीयतां तक्रं कौण्डिन्यायेति सत्यपि संभवे दधिदानस्य तक्रदानं निवर्तकं भवति । एवमिहापि सत्यपि संभवे झल्लक्षणं उगिल्लक्षणं बाधिष्यते ॥ अथवास्त्वत्रोगिल्लक्षणोऽपि । ननु चोक्तं द्वयोर्नकारयोः श्रवणं प्रसज्येतेति । परिहृतमेतन्न व्यञ्जनपरस्यैकस्य वानेकस्य वा श्रवणं प्रति विशेषोऽस्ति । ननु चोक्तं प्रतिज्ञाभेदो भवतीति । श्रुतिभेदेऽसति प्रतिज्ञाभेदः किं करिष्यति । ननु च श्रुतिकृतोऽपि भेद उक्त इह तावच्छ्रेयांसि भूयांसीति परस्यानुस्वारे कृते पूर्वस्य श्रवणं प्रसज्येत कुर्वन्ति कृषन्तीति परस्यानुस्वारपरसवर्णयोः कृतयोः पूर्वस्य णत्वं प्राप्नोतीति । नैष दोषः । अयोगवाहानामविशेषेणोपदेशश्चोदितः । तत्रेह तावच्छ्रेयांसि भूयांसीति परस्यानुस्वारे कृते तस्य झल्ग्रहणेन ग्रहणात्पूर्वस्यानुस्वारो भविष्यति कुर्वन्ति कृषन्तीति परस्यानुस्वारपरसवर्णयोः कृतयोस्तस्य झल्ग्रहणेन ग्रहणात्पूर्वस्यानुस्वारपरसवर्णौ भविष्यतः ॥

---

कौण्डिन्य या ब्राह्मणाला ताक देण्यांत यावें ' या ठिकाणीं जरी कौण्डिन्याला ताक देऊन दहींही देणें शक्य असलें तरी ताक देण्यानें दहीं देणें बाधित होतें; याच रीतीनें येथें दोन्ही नुम् होणें जरी शक्य असलें तरी झलाला उद्देशून सांगितलेला नुम् हा उगिताला उद्देशून सांगितलेल्या नुमाचा बाध करील.

अथवा, येथें उगिताला उद्देशून सांगितलेला नुम् पण होऊं दे; कांहीं हरकत नाहीं.

पण वरतींच नाहीं का दोष दाखविला कीं तसें झाल्यास रूपामध्ये दोन नकार ऐकूं येतील ?

त्याला उत्तर दिलेंच आहे कीं पुढें व्यंजन असल्यास मागें एक नकार असला काय किंवा दोन नकार असले काय, ऐकण्यामध्यें कांहीं फरक पडत नाहीं.

पण त्यावरही वरतीं पुन्हां दोष दिला ना कीं जरी ऐकण्यांत फरक नसला तरी प्रतिज्ञाभेद होतो म्हणून ?

ऐकण्यांत जोंवर फरक नाहीं तोंवर प्रतिज्ञाभेद काय करणार ?

पण कांहीं ठिकाणीं ऐकण्यांत देखील फरक पडतो; उदाहरणार्थ श्रेयांसि व भूयांसि या ठिकाणीं दोन नुम् झाले असतां पुढच्या नुमाला अनुस्वार केला असता मागचा नुम् ऐकूं येईल; तसेंच कुर्वन्ति व कृषन्ति येथें पुढच्या नुमाला अनुस्वार व परसवर्ण केले असतां मागच्या नुमाला णकार होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण मागेंच सांगितलें आहे (भाग १, पृ० ७२-७३) की अयोगवाहांचा[12] उपदेश 'अइउण्' 'ऋऌक्' वगैरे शिवसूत्रांमध्यें अटांमध्येंही समजला आहे व पुढें झलांमध्येंही समजला आहे. तेव्हां श्रेयांसि व भूयांसि या उदाहरणांत पुढच्या नुमाला अनुस्वार केल्यावर अनुस्वार झलांत मोडतो असें धरून मागच्या नुमालाही झल् पुढें आहे म्हणून अनुस्वार होईल व ऐकण्यांत कांहींही फरक पडणार नाहीं.[13] तसेंच कुर्वन्ति, कृषन्ति, येथें पुढच्या नुमाला अनुस्वार व परसवर्ण होतात; त्यांतील परसवर्ण असिद्धच आहे; परतु अनुस्वार सिद्ध आहे; तो अनुस्वारच झल् असल्यामुळें मागच्या नुमालाही अनुस्वार व परसवर्ण होतील[14], व ऐकण्यांत कांहींही फरक पडणार नाहीं.

अथवा वास्तविक पाहतां उगिताला मानून सांगितलेला नुम् येथें प्रवृत्तच होत नाहीं.

---

१२. अनुस्वार, विसर्ग, जिव्हामूलीय, उपध्मानीय आणि यम हे अयोगवाह होत. मागें शि. सू. ५ 'हयवरट्' येथें वा. ६।७।८, भा. १, पृ. ७१ पहा.

१३. कारण, एक नकार व एक अनुस्वार असे हे विजातीय नाहींत. दोन्ही अनुस्वार असल्यामुळें सजातीयच आहेत.

१४. येथेंही परसवर्णानें झालेले दोन्ही नकार सजातीयच असल्यामुळें ऐकण्यांत फरक पडत नाहीं.

नैव वा पुनरत्रोगिल्लक्षणः प्राप्नोति । किं कारणम् । मिदचोऽन्त्यात्परः (१. १. ४७.) इत्युच्यते न च द्वयोर्मितोरचामन्त्यात्परत्वे संभवोऽस्ति । कथं तर्हीमौ द्वौ मितावचामन्त्यात्परौ स्तः । बह्वनड्वांहि ब्राह्मणकुलानीति । विनिमित्तावेतौ ॥

**तत्र बहूर्जि प्रतिषेधः ॥ ४ ॥**

तत्र बहूर्जि प्रतिषेधो वक्तव्यः । बहूर्जि ब्राह्मणकुलानीति ॥

**अन्त्यात्पूर्वं नुममेके ॥ ५ ॥**

अन्त्यात्पूर्वं नुममेक इच्छन्ति । किमविशेषेणाहोस्विद्बहूर्जावेव । किं चातः । यद्यविशेषेण काष्ठतक्षींति भवितव्यम् । अथ बहूर्जावेव काष्ठतक्ष्णीति भवितव्यम् । एवं तर्हि बहूर्जावेव । बहूर्न्जि ॥

स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । अच इत्येषा पञ्चमी । अच उत्तरो यो झल्तदन्तस्य नपुंसकस्य नुमा भवितव्यं यश्चाऽत्राच उत्तरो नासौ झल्नापि तदन्तं नपुंसकं यदन्तं च नपुंसकं नासावच उत्तरः । इहापि

---

तो कां म्हणून ?

कारण, नुम् या आगमांत म् हा वर्ण इत् असल्यामुळें ' मिदचोऽन्त्यात्परः ' या सूत्रानुसारें तो शेवटच्या स्वराच्या पुढें जोडला जावयाचा; आणि म् हा वर्ण इत् असलेल्या दोन आगमांना एकाच शेवटच्या स्वरापुढे जोडणें हें संभवत नाहीं.[१५]

असें म्हटलें तर 'बह्वनड्वांहि ब्राह्मणकुलानि' या ठिकाणीं अनड्वांहि येथें एकाच शेवटच्या स्वरापुढे म् हा वर्ण इत् असलेले आम् व नुम् असे दोन्ही आगम होतात ते कसे होतात ?

निरनिराळ्या निमित्ताला उद्देशून हे आगम सांगितले आहेत म्हणून.[१६]

(वा. ४) या नुमाचा बहूर्ज् या शब्दाविषयीं प्रतिषेध बोलावा; उदा० बहूर्जि ब्राह्मणकुलानि.

(वा. ५) कांहीं वैयाकरणांच्या मतें शेवटच्या व्यंजनापूर्वी नुम् होतो असें आहे.

सर्व ठिकाणीं शेवटच्या व्यंजनापूर्वी, कां बहूर्ज् शब्दाविषयींच ?

दोन्हींमध्यें फरक काय पडतो ?

सर्व ठिकाणीं असें म्हटलें तर काष्ठतक्ष् शब्दाचें रूप काष्ठतक्षिं[१७] असें होऊं लागेल; आणि 'बहूर्ज् या शब्दाविषयींच' असें म्हटलें तर काष्ठतक्ष् शब्दाचें 'काष्ठतक्ष्णि'[१८] असें रूप होईल.

असा फरक जर पडत असेल तर ' बहूर्ज् ' शब्दाबद्दलच त्यांचें मत असें आहे असेंच म्हणावें; उदा० बहूर्न्जि.

बरें तर मग, बहूर्ज् शब्दामध्यें ऊकाराच्या पुढें नुमागम[१९] नकोच. तेव्हा तसा प्रतिषेध सांगण्याची जरूर नाहीं. प्रस्तुत सूत्रांत ' अचः '[२०] ही पञ्चमी विभक्ति घ्यावी. आणि 'अचाच्या म्ह० स्वराच्या पुढें असणारा जो झल् तो शेवटीं असलेलें जें नपुसकलिंगी शब्दस्वरूप त्याला नुमागम होतो ' असा अर्थ करावा; म्हणजे बहूर्ज् या शब्दांत स्वराच्या पुढें असणारा वर्ण म्हणजे रेफ हा झल्ही नाहीं, व तो शेवटीं असलेलें असें

---

१५. गोमत् शब्दांतील अकाराच्या पुढे एक नुमागम केला असतांना नंतर दुसरा नुमागम अकाराच्या पुढें केला तर पहिला नुमागम अकाराच्या पुढें अव्यवहित राहत नाहीं.

१६. येथें 'चतुरनडुहोः०' (७।१।९८) या सूत्रानें आमागम उकाराच्या पुढें होतो, आणि त्या आकाराच्या पुढे 'नपुंसकस्य०'(७।१।७२) या सूत्रानें नुमागम होतो. आमागमाला अनडुह् शब्द हें निमित्त आहे, आणि 'नपुंसकस्य' या नुमागमाला झलन्त अंग हें निमित्त आहे.

१७. काष्ठतक्ष् या शब्दांतील शेवटच्या षकाराच्या मागें म्हणजे ककाराच्या पुढें नुमागम होईल, आणि भलतेंच रूप होईल.

१८. येथें त या अकारच्या पुढें नुमागम झालेला आहे.

१९. 'नपुंसकस्य०' या प्रकृत सूत्रानें प्राप्त झालेला.

२०. या सूत्रामध्यें झलचः हें एक पद मानूं नये. झल् व अचः अशीं हीं निरनिराळीं दोन पदें येथें भाष्यकारांनी मानलेलीं आहेत.

तर्हि न प्राप्नोति । काष्ठतक्ष्णीति । अत्र योऽच उत्तरो झल्न तदन्तं नपुंसकं यदन्तं च नपुंसकं नासावच उत्तरः । नैतदस्ति । झल्जातिः प्रतिनिर्दिश्यते । अच उत्तरा या झल्जातिरिति ॥ यदि पञ्चमी कुण्डानि वनानीत्यत्र न प्राप्नोति ॥ एवं तर्हीकोऽचि विभक्तौ ( ७. १. ७३ ) इत्यत्राचः सर्वनामस्थान इत्येतदनुवर्तिष्यते । एवमपि षष्ठ्यभावान्न प्राप्नोति । सर्वनामस्थान इत्येषा सप्तम्यच इति पञ्चम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य ( १. १. ६६ ) इति ॥

## [१] इकोऽचि विभक्तौ ॥ ७।१।७३ ॥

अज्ग्रहणं किमर्थम् ।

इकोऽचि व्यञ्जने मा भूत्

इकोऽचीत्युच्यते व्यञ्जनादौ मा भूत । त्रपुभ्याम् त्रपुभिः ॥

अस्तु लोपः

---

नपुंसकलिंगीं शब्दस्वरूपही नाहीं. जो वर्ण शेवटीं असलेलें नपुंसकलिंगीं शब्दस्वरूप येथें मिळतें तो जकाररूपी वर्ण अचाच्या म्हणजे स्वराच्या पुढचा होत नाहीं. तेव्हा 'नपुंसकस्य झलचः' हे सूत्रच बहूर्जि येथे लागू पडत नाहीं, व नुम् होत नाहीं.

पण असा सूत्राचा अर्थ केल्यास 'काष्ठतक्षि' येथेंही नुम् होणार नाहीं. कारण, याही ठिकाणीं अचाच्या पुढें असणारा जो झल् ककार तो शेवटीं असलेला असा नपुंसकलिंगी शब्द येथें मिळत नाहीं, आणि जो षकार शेवटीं असलेला नपुंसकलिंगी शब्द मिळतो तो षकार वर्ण अचाच्या लगत पुढे नाहीं.

असें होत नाहीं. कारण या ठिकाणीं झल् या शब्दाचा झल् वर्ण असा अर्थ नाहीं; झल् जाति असा अर्थ आहे; आणि स्वराच्या पुढे असणारे जे झल् जातीचे एक किंवा अनेक वर्ण ते शेवटीं असणारें जें नपुंसकलिंगीं शब्दस्वरूप त्याला नुम् होतो असा येथें अर्थ आहे[२१].

पण जर येथें 'अचः ही पंचमी विभक्ति घेतली तर कुण्डानि व वनानि या ठिकाणीं नुम् होणार नाहीं[२२].

कांहीं हरकत नाहीं; तसें झाल्यास 'इकोऽचि विभक्तौ' या पुढील सूत्रात 'अचः' व 'सर्वनामस्थाने' अशीं दोन पदें अनुवृत्त करण्यांत येतील[२३].

तसें केलें तरी काय ? अचाहून पर अशाच अर्थाचें 'अचः' हें पञ्चम्यन्त पद अनुवृत्त होईल, व ज्याला नुमागम सांगावयाचा असा एकादा षष्ठ्यन्त शब्द सूत्रांत नसल्यामुळें अनुवृत्तीचा उपयोग होणार नाहीं, व कुण्डानि, वनानि येथें नुम् होणार नाहीं.

'सर्वनामस्थाने' हें पद सप्तम्यन्त आहे; त्याच्या जोरावर 'अचः' हें जरी मागील सूत्रात पञ्चम्यन्त आहे तरी येथे तें षष्ठ्यन्त समजलें जाईल व तसें करण्यास 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य'(१।१।६६) हें परिभाषासूत्रच भाग पाडील.

( सू. ७३) या सूत्रामध्यें 'अच्' शब्द कशाकरिता घातला आहे ?

'इकोऽचि' असें अच् शब्द उच्चारून सूत्र केलें आहे, कारण व्यंजनादिविभक्तिप्रत्यय पुढे असताना, उदाहरणार्थ -- त्रपुभ्याम् येथें, नुमागम न व्हावा.

---

२१. काष्ठतक्ष् या शब्दामध्यें क् आणि ष् हे दोन्ही वर्ण झल् असल्यामुळें तेथें नुमागम होण्याला कांहीं अडचण पडणार नाहीं. बहूर्ज् शब्दामध्यें मात्र र् हा वर्ण झल् नसल्यामुळे तेथें सूत्राची प्राप्ति येत नाहीं.

२२. कारण, अचः ही पंचमी मानून झलाला विशेषण केल्यामुळें 'नपुंसकस्य०' या सूत्रानें फक्त झलन्ताचाच नुम् आगम सांगतां येतो; अजन्ताला स्वतन्त्र रीतीनें नुम् आगम होतो असा आतां त्या सूत्राचा वाक्यार्थ होणार नाहीं.

२३. आणि तेथें अजन्त अंगाला सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना नुम् आगम होतो असा निराळा दुसरा वाक्यार्थ करण्यांत येईल.

१. ( सू. ७३ ) नपुंसकलिंगामध्यें इगन्त अंगाला अजादि विभक्तिप्रत्यय पुढें असतांना नुम् आगम होतो; उदा० वारीणि, मधुनी.

अस्त्वत्र नुम्। नलोपः प्रातिपदिकान्तस्य (८. २. ७) इति नलोपो भविष्यति ॥

स्वरः कथम्।

पञ्चत्रपुभ्याम् पञ्चत्रपुभ्यः। इगन्ते द्विगाविखेष स्वरो न प्राप्नोति ॥

**स्वरो वै श्रूयमाणेऽपि**

श्रूयमाणेऽपि नुमि स्वरो भवति। पञ्चत्रपुणा पञ्चत्रपुण इति ॥

लुप्ते किं न भविष्यति ॥

लुप्त इदानीं किं न भविष्यति ॥ किं पुनः कारणं श्रूयमाणेऽपि नुमि स्वरो भवति। संघातभक्तोऽसौ नोत्सहतेऽवयवस्येगन्ततां विहन्तुमिति कृत्वा ततः श्रूयमाणेऽपि नुमि स्वरो भवति ॥ इदं तर्हि। अतिराभ्याम् अतिराभिः। नुमि कृते रायो हलि (७.२.८५) इत्यात्वं न प्राप्नोति। इदमिह संप्रधार्यम्। नुम्क्रियतामात्वमिति किमत्र कर्तव्यम्। परत्वादात्वम् ॥ इह तर्हि प्रियतिसृभ्याम् प्रिय-

---

मग नुमागम झाला तरी कांहीं बिघडत नाहीं; नुम् होऊं द्या. 'नलोपः प्रातिपदिकान्तस्य' (८।२।७) यानें नकाराचा लोप होईल.

पण स्वराचें काय करावयाचें? नुमागम केल्यास पञ्चत्रपुभ्याम् व पञ्चत्रपुभ्यः या उदाहरणांमध्ये द्विगु समासामध्ये इगन्त उत्तरपद पुढें असतांना 'इगन्तकालकपाल०' (६।२।२९) या सूत्रानें सांगितलेला पूर्वपदाचा प्रकृतिस्वर इगन्तत्व नाहींसें झाल्यामुळें होणार नाहीं.

नुम् आगम जरी रूपांमध्यें दिसला तरीसुद्धां पञ्चत्रपुणा, पञ्चत्रपुणे वगैरे उदाहरणांमध्यें 'इगन्तकाल०' या सूत्रानें स्वर होतो.

तर--

नुम् आगम लुप्त झाल्यावर कां नाहीं होणार? अलबत झालाच पाहिजे.

पण नुम् आगम रूपांमध्यें दिसत असतांनासुद्धां स्वर होतो तो काय म्हणून? नुम् आगम असतांना इगन्तत्व नसतें, आणि इगन्तत्व नसल्यामुळें वास्तविक पाहतां 'इगन्तकाल'० (६।२।२९) या सूत्रानें स्वर होऊं नये. नुम् आगम हा सबंध शब्द जो पञ्चत्रपु त्याचा अवयव होतो[3], त्रपु या उत्तरपदाचा अवयव होत नाहीं, म्हणून त्रपु या उत्तरपदाचा इगन्तत्व वगैरे जो धर्म त्या धर्माला नुमागम नाहींसा करूं शकत नाहीं. म्हणून जरी नुमागम दिसला तरी उत्तरपदाचें इगन्तत्व कायम राहिल्यामुळें 'इगन्तकाल०' या सूत्रानें सांगितलेला स्वर होतो.

बरें तर, अतिराभ्याम् व अतिराभिः हीं उदाहरणें घ्या. येथें नुम् केला तर 'रायो हलि' (७।२।८५) या सूत्रानें सांगितलेला 'आ' हा आदेश होणार नाहीं.

येथें असा विचार करावा कीं अतिराभ्याम् वगैरे उदाहरणांत अतिरि+भ्याम् अशी स्थिति असतांना नुमागम व आकारादेश एकदम प्राप्त होतात, तेव्हां दोहोंपैकीं काय करावें?

परसूत्रानें सांगितला असल्यामुळें आकारादेशच अर्थात् अगोदर करावा; आकारादेश झाल्यावर इगन्त अंग नसल्यामुळें नुम् होणारच नाहीं.

---

२. पञ्चन् हा शब्द मूळचा आद्युदात्त आहे. प्रकृतिस्वर म्हणजे मूळचा स्वर. पञ्चत्रपु या द्विगूमध्यें पञ्चन् याचाच आद्युदात्त स्वर 'इगन्तकाल०' (६।२।२९) या सूत्रानें कायम राहत असतो. जर येथें नुमागम झाला तर त्रपुन् असें नकारान्त होत नसल्यामुळें तें इगन्त नाहीं असें होऊन पञ्चन् या शब्दाचा मूळचा स्वर कायम राहणार नाहीं. आणि 'समासस्य' (६।१।१२३) या सूत्रानें अन्तोदात्त होऊन पञ्चत्रपु असे स्वर होतील.

३. कारण, हा नुम् आगम अंगाला सांगितला आहे. त्यामुळें पञ्चत्रपुन् हें अंग नकारान्त झाल्यामुळे इगन्त नाहीं असें म्हणतां येईल. परंतु त्यांतील उत्तरपद कोणतें असें विचारिलें असतां नकाराच्या मागील त्रपु एवढेंच सांगावें लागतें आणि तें तर इगन्त आहेच.

४. अतिरि या शब्दाहून भ्याम् प्रत्यय केला असतां नुम् आगम होऊन अतिरिन् असें होतें. तेथें शेवटीं नकार असल्यामुळें इकाराला आत्व होणार नाहीं.

तिसृभिः नुमि कृते तिसृभावो न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । नुम्क्रियतां तिसृभाव इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्तिसृभावः । अथेदानीं तिसृभावे कृते पुनःप्रसङ्गान्नुम्कस्मान्न भवति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति ॥ अत उत्तरं पठति ।

**इकोऽचि विभक्तावज्ग्रहणं नुम्नुटोर्विप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

इकोऽचि विभक्तावज्ग्रहणं क्रियते नुमो नुड् विप्रतिषेधेन यथा स्यात् । त्रपूणाम् जतूनाम् ॥

**इतरथा हि नुमो नित्यनिमित्तत्वान्नुडभावः ॥ २ ॥**

अक्रियमाणे ह्यज्ग्रहणे नित्यनिमितो नुम् । कृतेऽपि नुटि प्राप्नोत्यकृतेऽपि । नित्यनिमित्तत्वान्नुमि कृते नुटोऽभावः स्यात् ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । क्रियमाणेऽपि वा अज्ग्रहणेऽवश्यमत्र नुडर्थो यत्नः कर्तव्यः। पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः ॥ इदं तर्हि प्रयोजनं नुटि कृते नुम्मा भूदिति । किं च स्यात् । त्रपूणाम् जतूनाम् । नामि [ ६. ४. ३ ] इति दीर्घत्वं न स्यात् । मा भूदे-

---

बरें तर, प्रियतिसृभ्याम् व प्रियतिसृभिः, हीं रूपें घ्या. नुम् आगम केल्यावर तिसृ आदेश ( ७।२।९९ ) होऊं शकत नाहीं.

येथेंही असा विचार करावा कीं पहिल्यानें नुम् करावा कीं तिसृ आदेश करावा ? काय करावें ? अर्थात् परसूत्रानें सांगितला आहे म्हणून तिसृ आदेश अगोदर करावा.

बरें पण, येथें तिसृ आदेश केल्यावर पुन्हां प्राप्ति असल्यामुळे नुम् आगम कां होत नाहीं ?

कारण कीं, एकदा विरोध येऊन दोन कार्यांपैकीं एकाचा बाध झाला म्हणजे बाध झालेल्या कार्याची पुन्हां प्राप्ति जरी आली तरी एकदां जो बाध झाला तो कायमचाच समजावयाचा असा नियम आहे म्हणून.

ही सर्व शंका मनांत घेऊन उत्तरादाखल लिहितातः

( वा. १ ) 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्रांत अच् शब्द घातला आहे; हेतु हा कीं नुमापेक्षा पूर्वी पूर्वविप्रतिषेधाने नुट् व्हावा; उदाहरणार्थ— त्रपूणाम्, जतूनाम्.

( वा. २ ) जर प्रस्तुत सूत्रांत अच् शब्द घातला नाहीं तर नुमाचें निमित्त कायमच राहतें, व नुट् केला असतांनाही नुम् प्राप्त होतो, आणि केला नसतांनाही प्राप्त होतो. तेव्हां नुम् नित्य आहे, सबब नुम् होईल व नुम् झाल्यावर नुट् होणार नाहीं.

हेंही प्रयोजन होऊं शकत नाहीं. कारण अच् शब्द सूत्रात घातला तरी विशेषतः कांहीं तरी प्रयत्न केल्याशिवाय नुट् व्हावयाची पंचाईतच; कारण दोघेही अनित्य झाले तरी परत्वास्तव नुम् होणार. तेव्हां नुट् होण्याकरितां विशेष प्रयत्न केला पाहिजे, म्हणजे पूर्वविप्रतिषेधानें नुट् होतो असें म्हटलें पाहिजे. एकंदरींत, पूर्वविप्रतिषेध कांहीं झालें तरी सांगावाच लागणार. मग आणखी अचि हा शब्द कशाला पाहिजे ? अचि न घातल्यामुळें नुमागम नित्य झाला तरी पूर्वविप्रतिषेधानें त्याच्या अगोदर नुट् होईल.

बरें तर, नुट् केल्यानंतर नुम् होऊं नये म्हणून अचि या शब्दाची जरूर आहे.

मग काय होईल नुम् झाला तर ? ( नुमाच्या नकाराचा लोप होईल व रूप साधेलच ).

नुम् झाला तर ( जरी नुमाच्या नकाराचा लोप झाला तरी ) 'नामि' या सूत्रानें त्रपु ( न् )

---

५. सिद्धांतीं येथें नुट् आगम झाल्यानंतर अजादि प्रत्यय नसल्यामुळें नुम् आगमाची प्राप्ति येत नाहीं; त्यामुळें नुम् आगम अनित्य होतो. नुट् आगम हा तर अनित्य आहेच कारण, नुम् आगम झाल्यानंतर न्हस्वान्त अंग नसल्यामुळें नुट् आगमाची प्राप्ति येत नाहीं तेव्हां दोन्हीही विधी अनित्य असल्यामुळें पूर्वविप्रतिषेधानें नुम् आगमाच्या अगोदर नुट् आगम करतां येतो. परंतु, प्रकृत सूत्रामध्यें 'अचि' हें पद जर नसेल तर अर्थातच नुम् आगम नित्य होणार आणि तोच अगोदर होऊन त्रपुणाम् असें भलतेंच रूप होईल.

वम् । नोपधायाः [ ६. ४. ७. ] इत्येवं भविष्यति । इह तर्हि शुचीनाम् इन्हन्पूषार्यम्णां शौ सौ च [ ६. ४. १२, १३ ] इत्यस्मान्नियमान्न प्राप्नोति दीर्घत्वम् । अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्येवं न भविष्यति । नैषा परिभाषेह शक्या विज्ञातुम् । इह हि दोषः स्यात् । वाग्मीति । एवं तर्हि लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥

## उत्तरार्थं च ॥ ३ ॥

उत्तरार्थं तर्ह्यज्ग्रहणं कर्तव्यम् । अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः [ ७. १. ७५ ] अजादौ यथा स्यात् । इह मा भूत् । अस्थि-

---

+नाम्, जतु ( न् )+नाम् या ठिकाणीं दीर्घ होणार नाहीं. कारण जरी नकाराचा लोप झाला असला तरी 'नामि' या दीर्घ सांगणाऱ्या सूत्राच्या दृष्टीनें नकार आहेच.

'नामि' या ( ६।४।३ ) सूत्रानें दीर्घ नाहीं झाला तरी न होऊं द्या. 'नोपधायाः' (६।४।७) या सूत्रानें दीर्घ होईल.

त्रपूणाम्, जतूनाम्, येथें 'नोपधायाः' या सूत्रानें दीर्घ झालेला चालेल. पण शुचीनाम् या उदाहरणाची काय वाट ? या ठिकाणीं 'नोपधायाः' या सूत्रानें दीर्घ होणार नाहीं. 'इन्हन्' पूषार्यम्णां शौ' आणि 'सौ च' या सूत्रांमध्यें इन्नन्त अंगाला दीर्घ होण्याबद्दल नियम केला आहे. त्या नियमामुळें येथें 'नोपधायाः' यानें दीर्घ होणार नाहीं.

पण, 'ज्या ठिकाणीं अर्थयुक्त शब्दस्वरूप मिळत असेल त्या ठिकाणीं त्याच कामाकरितां त्याच तऱ्हेचें अर्थरहित शब्दस्वरूप घेऊं नये' या परिभाषेमुळें शुचीनाम् या ठिकाणीं 'इन्-इन्पूषार्यम्णां शौ', 'सौ च' हा नियम लागू पडणार नाहीं.

ही 'अर्थवत्०'परिभाषा या ठिकाणीं घेतां येत नाहीं. कारण ती घेतल्यास वाग्मी येथें दोष येईल.

तर मग 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव' ही परिभाषा घ्या. म्हणजे प्रतिपदोक्त इन् हा करिन्, हस्तिन् वगैरे ठिकाणीं मिळत असल्यामुळें शुचीनाम् येथील लाक्षणिक इन् घेतला जाणार नाहीं व नियम लागू पडणार नाहीं. एकंदरींत सूत्रांतील अचि या पदाचा कांहीं उपयोग नाहीं.

( वा. ३ ) या सूत्रांत जरी उपयोग नाहीं तरी पुढील सूत्रांत हें पद नेण्याकरितां येथें तें उच्चारावें लागतें. 'अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः' या सूत्रानें सांगितलेला अनङ् हा अच् आरंभीं असलेला प्रत्ययच पुढें असताना व्हावा, अस्थिभ्याम्,

---

६. कारण 'नामि' या सूत्राच्या दृष्टीने नलोपशास्त्र असिद्ध आहे. कारण तें त्रिपादीमध्यें सांगितलें आहे.

७. कारण, शुचि या शब्दाला नुम् आगम होऊन जें इन् असें शब्दस्वरूप तयार होतें त्याला येथें कांहीच अर्थ नाहीं. दण्डिन् शब्दामध्यें इन् प्रत्यय असल्यामुळें तेथें इन् याला अर्थ आहे. तेव्हां तशा ठिकाणींच तो नियम लागू पडेल. शुचीनाम् येथें लागू पडणार नाहीं.

८. येथें 'वाचो ग्मिनिः' (५।२।१२४) या सूत्रानें ग्मिन् प्रत्यय होत असल्यामुळें त्यांतील इन् याला अर्थ नाहीं. तेव्हां तेथेंही 'इन्हन्०' या सूत्रानें सांगितलेला नियम लागू पडत नसल्यामुळें वाग्मिनौ या ठिकाणीं दीर्घ होऊं लागेल म्हणून त्याकरितां 'अन्, इन्, अस्, मन्, हे अनर्थकही चालतात' अशी स्वतन्त्र परिभाषा केलीच आहे.

९. 'लक्षणानें तयार झालेला आणि साक्षात् तोच शब्द उच्चारून सांगितलेला ह्या दोहोंमध्यें साक्षात् तोच शब्द उच्चारून सांगितलेला घ्यावा, लक्षणानें तयार झालेला घेऊ नये' असा या परिभाषेचा अर्थ आहे.

१०. कर व हस्त या शब्दाहून 'अत इनिठनौ' (५।२।११५) या सूत्रानें इन् प्रत्यय होऊन करिन् व हस्तिन् हे शब्द सिद्ध होतात. या शब्दांमध्यें इन् हा इन् शब्दानें झाला असल्यामुळे प्रतिपदोक्त आहे. शुचीनाम् येथें शुचि या शब्दांतील इकार आणि नुमागमानें झालेला नकार हे दोन वर्ण मिळून इन् होत असल्यामुळें तेथें इन् हा लाक्षणिक आहे.

११. अनङ् झाला तर त्याच्या नकाराचा लोप

भ्याम् अस्थिभिरिति ॥ यद्युत्तरार्थं स्यात्तत्रैवायमज्ग्रहणं कुर्वीत । इह क्रियमाणे यदि किंचित्प्रयोजनमस्ति तदुच्यताम् । इहापि क्रियमाणे प्रयोजनमस्ति । किम् । अजादौ यथा स्यात् । इह मा भूत् । त्रपु जतु ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । विभक्तावित्युच्यते न चात्र विभक्तिं पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । न लुमताङ्गस्य [ १. १. ६३ ] इति प्रत्ययलक्षणस्य प्रतिषेधः ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदज्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवतीह कश्चिदन्योऽपि प्रकारः प्रत्ययलक्षणं नामेति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । हे त्रपु । हे त्रपो । अत्र गुणः सिद्धो भवतीति ॥

इकोऽचि व्यञ्जने मा भूद्
अस्तु लोपः स्वरः कथम् ।
स्वरो वै श्रूयमाणेऽपि
लुप्ते किं न भविष्यति ॥ १ ॥
रायात्वं तिसृभावश्च
व्यवधानान्नुमा अपि ।
नुड्वाच्य उत्तरार्थं तु
इह किंचित् त्रपो इति ॥ २ ॥

## तृतीयादिषु भाषितपुंस्कं पुंवद्गालवस्य ॥ ७।१।७४ ॥

अस्थिभिः, या ठिकाणीं तो होऊ नये. जर पुढील सूत्रांत अच् या पदाची अनुवृत्ति व्हावी येवढ्याचकरितां येथे अच् पद उच्चारावें असें असेल तर आचार्य पाणिनींनीं पुढल्याच सूत्रांत अच् हें पद घातलें असतें. तेव्हां येथें 'अचि' पद घालण्याचा कांहीं उपयोग असेल तर तो सांगा.

येथें अचि हें पद घालण्याचाही उपयोग आहे.

तो कोणता ?

अच् आरंभीं असलेला प्रत्यय पुढें असतांनाच नुम् व्हावा; त्रपु[१२], जतु, येथें नुम् होऊं नये.

हाही कांहीं उपयोग देतां येत नाहीं. कारण, प्रस्तुत सूत्रांत 'विभक्तौ' (विभक्ति पुढें असतांना) असें पद घातलें आहे. त्रपु व जतु या उदाहरणांत तर विभक्ति दृष्टीस पडत नाहीं.

प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) विभक्ति पुढें आहे असें मानण्यांत येईल.

पण या ठिकाणीं विभक्तीचा लुक् झाला असल्यामुळें 'न लुमताङ्गस्य' (१।१।६३) यानें प्रत्ययलक्षणाचा निषेध होईल.

तर मग 'अचि' हें पद न घालतां सर्व भागत असूनही आचार्य पाणिनि ज्या अर्थी येथें 'अचि' हें पद घालतात त्या अर्थी ते सुचवितात कीं 'न लुमताऽङ्गस्य' या निषेधाशिवाय दुसराही कांहीं तरी निराळा प्रकार प्रत्ययलक्षण म्हणून घेतां येतो.

असें सुचविण्याचा फायदा काय ?

हे त्रपु, हे त्रपो, या ठिकाणीं गुण घडून येतो हा.

'इकोचि विभक्तौ' या सूत्रात 'अचि' हें पद घातलें आहे; कारण, व्यंजन आरंभीं असलेला प्रत्यय पुढें असतांना नुम् न व्हावा. नुम् होऊं द्या; त्याचा लोप होईल. पण स्वर कसा होणार ? जरी नुमाचा लोप झाला नाहीं तरीसुद्धां स्वर होतो, मग नुमाचा लोप झाल्यावर स्वर कां होऊं नये ?

रै या शब्दाला सांगितलेला आकारादेश आणि त्रि शब्दाचा तिसृ हे नुम् मध्यें असला तरी होतात; शिवाय नुमाचें पूर्वी नुट् होतो असें विधान करावें लागतेंच. एकंदरींत पुढच्या सूत्राकरितां 'अचि' हें पद आहे. येथें त्रपो[१३] येथें गुण व्हावा हा थोडका उपयोग आहे.

होऊन अस्थभ्याम् असें भलतेंच रूप होऊं लागेल.

१२. त्रपु शब्दाहून प्रथमा, द्वितीया आणि संबोधन यांचें एकवचन केलें असतां त्यांचा 'स्वमोर्नपुंसकात्' (७।१।२३) या सूत्रानें येथें लुक् झालेला आहे.

१३. म्हणजे एखाद्या उदाहरणांत 'न लुमताऽङ्गस्य' (१।१।६३) या निषेधाची प्राप्ति येत असूनही त्या निषेधाला एकदा दूर सारून प्रत्ययलक्षण करता येतें; म्हणूनच हे त्रपो या उदाहरणामध्यें प्रत्ययलक्षणानें संबुद्धिप्रत्यय पुढें आहे असें मानून 'ह्रस्वस्य गुणः (७।३।१०८) या सूत्रानें एकदां गुण करतां येतो.

१. (सू. ७४) जो शब्द एकाच अर्थी पुंलिंगी आणि नपुंसकलिंगी चालतो त्या शब्दानें नपुंसकलिंगामध्यें तृतीयेपासून अजादि विभक्ति पुढें असतांना एकदां

किमिह पुंवद्भावेनातिदिश्यते । नुम्प्रतिषेधः । कथं पुनः पुंवदित्यनेन नुम्प्रतिषेधः शक्यो विज्ञातुम् । वतिनिर्देशोऽयं कामचारश्च वतिनिर्देशे वाक्यशेषं समर्थयितुम् । तद्यथा । उशीनरवन्मद्रेषु यवाः । सन्ति न सन्तीति । मातृवदस्याः कलाः । सन्ति न सन्तीति । एवमिहापि पुंवद्भवति पुंवन्न भवतीति वाक्यशेषं समर्थयिष्यामहे । यथा पुंसो न नुम्भवत्येवं तृतीयादिषु भाषितपुंस्कस्यापि न भवतीति ॥ किमुच्यते नुम्प्रतिषेध इति न पुनरन्यदपि पुंसः प्रतिपदं कार्यमुच्यते यत्तृतीयादिषु विभक्तिष्वजादिषु भाषितपुंस्कस्यातिदिश्येत । अनारम्भात्पुंसि । न हि किंचित्पुंसः प्रतिपदं कार्यमुच्यते यत्तृतीयादिष्वजादिषु भाषितपुंस्कस्यातिदिश्येत । नुम्प्रकृतस्तत्र किमन्यच्छक्यं विज्ञातुमन्यदतो नुम्प्रतिषेधात् ॥

---

(सू. ७४) या ठिकाणीं पुंवद्भावानें कशाचा अतिदेश करावयाचा ?

नुमागमाच्या निषेधाचा.

पण 'पुंलिंगी शब्दासारखा तो शब्द समजावयाचा' असें म्हणण्यानें नुमाचा निषेध होतो अशी विवक्षित गोष्ट समजणे कसे शक्य आहे ?

का बरें ? 'वत्' म्हणजे 'सारखें' असा शब्द येथें घातला आहे; आणि अमक्यासारखें समजावें अशा रीतीनें एकादी गोष्ट सांगितली म्हणजे काय समजावे हें सांगणे आपल्या इच्छेवर अवलंबून राहतें. उदाहरणार्थ, 'जव हे उशीनर देशाप्रमाणेंच मद्र देशात असतात' असें म्हटले म्हणजे होतात किंवा न होतात असा दोन्ही तऱ्हेनें वाक्यार्थ होऊ शकतो. उशीनर देशामध्यें होत असले तर मद्र देशात होतात असें समजावयाचे; उशीनरांत होत नसले म्हणजे मद्रात होत नाहींत असे समजावयाचें. त्याचप्रमाणे कलांच्या बाबतींत ही आईसारखीच आहे असें म्हटलें म्हणजे हिच्या अंगीं कला आहेत असाही अर्थ होऊं शकेल, नाहींत असाही अर्थ होऊं शकेल. अशाच रीतीनें पुंलिंगाप्रमाणें कार्यें होतात किंवा पुंलिंगाप्रमाणें कार्यें होत नाहींत अशा दोन्ही रीतींनीं वाक्य पुरें करतां येतें; व ज्याप्रमाणें पुंलिंगामध्ये नुमागम होत नाहीं त्याप्रमाणें तृतीया, चतुर्थी, इत्यादि विभक्तींचे स्वरादि प्रत्यय पुढें असतांना ज्या नपुंसकलिंगी शब्दाला पुंलिंगी शब्दाप्रमाणें समजावयाचें असें सांगितलें आहे त्याला नुमागम होत नाहीं असा अर्थ होतो.

पण नुमाचा प्रतिषेध होतो हेंच तेवढें कसें बोलतां ? आणखी एकादें पुंलिंगी शब्दाला तृतीया, चतुर्थी, इत्यादि विभक्तींचे स्वरादि प्रत्यय पुढे असतांना कार्य नाहीं का सांगितलें कीं जें या ठिकाणीं पुंलिंगी शब्दाप्रमाणें समजला जावा म्हणून सांगितलेल्या नपुंसकलिंगी शब्दाला होईल ?

पुंलिंगी शब्दालाच उद्देशून विशिष्ट कार्य कांहींच सांगितलेलें नाहीं. 'पुंलिंगी शब्दाला' अशा विवक्षित तऱ्हेनें असें एकादें कार्य सांगितलें नाहीं की जें तृतीया, चतुर्थी इत्यादि विभक्तींचे स्वरादि प्रत्यय पुढें असतांना पुंलिंगी शब्दाप्रमाणें समजल्या जाणाऱ्या शब्दाला होतें म्हणून समजतां येईल. शिवाय, नुमाचें प्रकरण चालूं आहे, तेव्हां नुमाच्या निषेधाशिवाय दुसरें काय असणार की जें या ठिकाणीं होतें म्हणून घेतां येईल ?

---

पुंलिंगासारखें रूप होतें. त्यामुळें ग्रामणि शब्दाला एकदां नुमागम होत नाहीं. कारण, तो नुमागम नपुंसकलिंगीच शब्दाला सांगितला असल्यामुळें पुंलिंगामध्यें होत नसतो.

२. कारण पुंल्लिंगामध्यें नुमागम होत नाहीं असें पाणिनीनें विशेषतः सांगितलें नाहीं.

१. जरी 'तस्माच्छसो नः पुंसि' (६।१।१०३) या सूत्रानें विशेषतः पुंलिंगी शब्दाला धरून नकार सांगितला आहे तरी तो द्वितीयेच्या बहुवचनामध्यें सांगितला आहे. म्हणून तो येथें घेतां येत नाहीं; कारण हा पुंवद्भाव तृतीयेपासून पुढें सांगितला आहे.

**पुंवदिति नुम्प्रतिषेधश्चेद् गुणनाभावनुडौ-त्वप्रतिषेधः ॥ १ ॥**

पुंवदिति नुम्प्रतिषेधश्चेद् गुणनाभावनुडौत्त्वानां प्रतिषेधो वक्तव्यः । गुण । ग्रामण्ये ब्राह्मणकुलाय । गुण । नाभाव । ग्रामण्या ब्राह्मणकुलेन । नाभाव । नुट् । ग्रामण्यां ब्राह्मणकुलानाम् । नुट् । औत्त्वम् । ग्रामण्यां ब्राह्मणकुले । ह्रस्वत्वमप्रतिषिद्धं ह्रस्वाश्रयाश्चैते विधयः प्राप्नुवन्ति ॥

**ह्रस्वाभावार्थं च ॥ २ ॥**

किं च । नुम्प्रतिषेधार्थं च । कथं पुनरप्रकृतस्यासंशब्दितस्य ह्रस्वत्वस्य प्रतिषेधः शक्यो विज्ञातुम् ।

**अर्थातिदेशात्सिद्धम् ॥ ३ ॥**

नैवं विज्ञायते भाष्यते पुमाननेन शब्देन सोऽयं भाषितपुंस्कः भाषितपुंस्कस्य शब्दस्य पुंशब्दो भवतीति । कथं तर्हि । भाष्यते पुमानस्मिन्नर्थे सोऽयं भषितपुंस्कः भाषित-

---

(वा. १) 'पुंलिंगी शब्दासारखा समजावा' यावरून नुमाचा निषेध होतो असें जर समजलें तर पुंलिंगी शब्दांना होणारे जे गुण, नुडागम, ना आदेश, व औकार आदेश, त्यांचा प्रतिषेध बोलावा लागेल; 'ग्रामण्ये ब्राह्मणकुलाय' येथील ग्रामणि शब्दांत इकाराला हरि शब्दाप्रमाणें गुण होत नाहीं असें म्हणावें लागेलें. तसेंच ग्रामण्या ब्राह्मणकुलेन या ठिकाणीं तृतीयेच्या एकवचनाच्या प्रत्ययाला 'ना' आदेश होत नाहीं असें म्हणावें लागेल; ग्रामण्या ब्राह्मणकुलानाम् या ठिकाणीं षष्ठीच्या बहुवचनाच्या आम् प्रत्ययाला नुट् होत नाहीं असें म्हणावें लागेल; व ग्रामण्यां ब्राह्मणकुले या ठिकाणीं सप्तमीच्या एकवचनाच्या इ प्रत्ययाला औ आदेश होत नाहीं असें म्हणावें लागेल. गुण वगैरे हे सर्व विधी ह्रस्व स्वराला उद्देशून सांगितले आहेत; आणि पुंवद्भाव झाला तर ह्रस्व व्हावयाचा थांबतो असें कोठें सांगितलें नाहीं.

(वा. २) प्रस्तुत सूत्रांत पुंवद्भाव सांगितला आहे तो दीर्घ स्वर असेल तर त्याला नपुंसकलिंगी शब्दाला होणारा ह्रस्व न व्हावा याकरितां सांगितला आहे, आणि—

आणि काय ?

नुमागम न व्हावा याकरितांही सांगितला आहे.

पण ज्याचें प्रकरण चालू नाहीं व ज्याचा प्रस्तुत सूत्रांत उच्चारही केला नाहीं अशा ह्रस्वाचा प्रस्तुत सूत्रानें निषेध केला आहे हें समजणें शक्य कसें ?

(वा. ३) पुंवद्भाव होतो असें म्हणणें हा अर्थातिदेश समजावयाचा. प्रस्तुत सूत्रानें 'भाषितपुंस्काला पुंवद्भाव होतो' असें सांगितलें आहे. येथें 'भाषितपुंस्काला' ह्या शब्दाचा अर्थ 'ज्यानें पुंलिंगी अर्थ दाखविला जातो असा शब्द' असा समजावयाचा नाहीं.

तर मग कसा समजावयाचा ?

'जो अर्थ घेतला असतां तो शब्द पुंलिंगीही चालतो असा अर्थ' अशी भाषितपुंस्क शब्दाची

---

४. ह्रस्वइकारान्त शब्दाला चतुर्थीचें एकवचन पुढें असतांना 'घेर्ङिति' (७।१।१११) या सूत्रानें गुण होत असतो; उदा० हरये. तसेंच तृतीयेच्या एकवचनाला 'आङो नाऽस्त्रियाम्' (७।३।१२०) या सूत्रानें ना हा आदेश होत असतो; उदा० हरिणा. तसेंच षष्ठीबहुवचन आम् प्रत्ययाला 'ह्रस्वनद्यापो नुट्' (७।१।५४) या सूत्रानें नुडागम होत असतो; उदा० हरीणाम्. तसेंच सप्तम्येकवचनाला 'अच्च घेः' (७।३।११९) या सूत्रानें औकार होत असतो; उदा० हरौ. ही सर्व कार्ये पुंवद्भावानें ग्रामणि या ह्रस्वइकारान्त शब्दाला नपुंसकलिंगामध्यें होऊं लागतील म्हणून त्यांचा निषेध करावा लागेल.

५. पुंल्लिंगी जसा नुमागम होत नाहीं तसा 'ह्रस्वो नपुंसके०' (१।२।४७) यानें सांगितलेला ह्रस्वही पुंल्लिंगामध्यें होत नसतो. परंतु या पुंवद्भावाच्या मागें नुमागमाचें प्रकरण चालू असल्यामुळें पुंवद्भावानें नुमागम दूर करतां येतो एवढेंच म्हणतां येईल; ह्रस्व दूर करता येतो असें म्हणतां येणार नाहीं.

पुंस्कस्यार्थस्य पुंवदर्थो भवतीति ॥

**तद्धितलुक्प्रतिषेधश्च ॥ ४ ॥**

तद्धितलुकश्च प्रतिषेधो वक्तव्यः । पीलुर्वृक्षः । पीलु फलम् । पीलुना पीलुन इति ॥

**न वा समानायामाकृतौ भाषितपुंस्कविज्ञानात् ॥ ५ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । समानायामाकृतौ भाषितपुंस्कविज्ञानात् । समानायामाकृतौ यद्भाषितपुंस्कमाकृत्यन्तरे चेतद्भाषितपुंस्कम् । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । एतदप्यर्थनिर्देशात्सिद्धम् ॥

---

व्याख्या घ्यावयाची; आणि भाषितपुंस्क म्हणजे जो अर्थ पुंलिंगामध्येही शब्दानें दाखविला जातो असा जो नपुंसकलिंगी अर्थ ( शुचि, गुरु वगैरे ) तो अर्थ पुंलिंगी असलेल्या अर्थासारखा समजावा असा सूत्रार्थ करावयाचा. तेव्हां पुंवद्भाव होऊन ग्रामणी शब्दाला ह्रस्व[६] होत नाहीं. शिवाय हा अर्थातिदेश घेतला नाहीं तर—

( वा. ४ ) ज्या शब्दांना कांहीं विवक्षित अर्थीं तद्धितप्रत्ययाचा लुक् सांगितला आहे अशा शब्दांना प्रस्तुत सूत्रानें पुंवद्भाव होऊं लागेल व त्याचा प्रतिषेध बोलावा लागेल; उदाहरणार्थ पीलु हा पुंलिंगी शब्द पीलु वृक्ष या अर्थीं आहे, व त्याहून त्याचें फल या अर्थीं तद्धितप्रत्यय करून त्याचा लुक् केला म्हणजे पीलु हाच नपुंसकलिंगी शब्द होतो, व त्याचा अर्थ पीलु फल हा होतो. या ठिकाणीं अर्थातिदेशपक्ष न घेतल्यास पीलु फल या अर्थीं नपुंसकलिंगी पीलु शब्दाला पुंवद्भाव होऊन पीलुना, पीलुने, या रूपांबरोबर पीलुना, पीलवे, अशींही रूपें होतील.

( वा. ५ ) अथवा तद्धितलुकाच्या उदाहरणाविषयीं पुंवद्भावाचा निषेध सांगण्याची जरूर नाहीं.

तें काय म्हणून ?

शब्दानें नपुंसकलिंगामध्ये जो अर्थ दाखविला जातो त्याच जातीच्या अर्थी तो शब्द जर पुंलिंगांत चालेल तर तो शब्द भाषितपुंस्क समजला जातो. तेव्हां सारख्याच अर्थी जो भाषितपुंस्क शब्द त्याला पुंवद्भाव होतो. फळ या अर्थाचा वाचक नपुंसकलिंगी पीलु शब्द हा जरी पुंलिंगीं चालतो तरी त्यानें त्याच जातीचा अर्थ म्हणजे फल हा अर्थ दाखविला जात नाहीं. पुंलिंगीं वृक्ष हा त्याचा अर्थ आहे.

हें असें कसें बरें म्हणतां ? असें म्हणूं नये. कारण स्पष्ट सांगितल्याशिवाय असा मथितार्थ ध्यानात कसा येईल ?

वर अर्थनिर्देशपक्ष या सूत्रांत घ्यावयाचा असें सांगितलें आहे; त्यावरूनच ही गोष्ट सिद्ध होते.

---

६. नपुंसकलिंगी शब्द हा पुंल्लिंगी शब्दासारखा समजावा असा शब्दाचा अतिदेश केला तर पुंल्लिंगी शब्दासारखा म्हणण्यानें पुंलिंगी शब्दाला काय काय होत असतें तिकडे लक्ष गेलें असतां प्रस्तुत नुमागमाचें प्रकरण चालू असल्यामुळें पुंल्लिंगी शब्दाला नुमागम होत नसतो येवढेंच मनामध्यें येईल. पुंल्लिंगीं ऱ्हस्व होत नसतो ही गोष्ट दूरची असल्यामुळें ती येथें उपस्थित होणार नाहीं. आतां नपुंसकलिंगी अर्थ हा पुंलिंगी अर्थासारखा समजावा असा अर्थातिदेश घेतला म्हणजे अर्थासारखा म्हणजे काय करावें ही आकांक्षा उपस्थितच होत नाही कारण व्याकरणामध्यें अर्थाला कार्य कोणतेंच सांगितलें नाहीं. आतां नपुंसकलिंगी अर्थ हा पुंलिंगासारखा समजल्यामुळें तेथें तो शब्द नपुंसकलिंगी अर्थाला दाखविणारा नव्हे असें समजून जसा नुमागम होत नाहीं तसा 'ह्रस्वो नपुंसके०' ( १।२। ४७ ) हा ऱ्हस्वही करतां येत नाहीं.

७. कारण पीलु हा शब्द फळ या अर्थीं नपुंसकलिंगी आहे व तोच शब्द पेरूचें झाड या अर्थीं पुंल्लिंगीहि आहे. तेव्हां येथें शब्दातिदेश घेतला असतां पुंवद्भाव होतो. एकाच अर्थीं पुलिंगी आणि नपुंसकलिंगी शब्द चालला पाहिजे असा आग्रह या पक्षीं धरतां येत नाहीं. आतां अर्थातिदेश घेतला म्हणजे फळ या अर्थीं पीलु हा शब्द पुंलिंगीं चालत नसल्यामुळें येथें पुंवद्भावाची प्राप्तीच येत नाहीं.

**[ अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः ॥ ७।१।७५ ॥**

**छन्दस्यपि दृश्यते ॥ ७।१।७६ ॥ ]**

**[१]ई च द्विवचने ॥ ७।१।७७ ॥**

किमुदाहरणम्। अक्षी ते इन्द्र पिङ्गले। नैतदस्ति। पूर्वसवर्णेनाप्येतत्सिद्धम्। इदं तर्हि। अक्षीभ्यां ते नासिकाभ्याम्। इदं चाप्युदाहरणम्। अक्षी ते इन्द्र पिङ्गले। ननु चोक्तं पूर्वसवर्णेनाप्येतत्सिद्धमिति। न सिध्यति। नुमा व्यवहितत्वात्पूर्वसवर्णो न प्राप्नोति ॥ छन्दसि नपुंसकस्य पुंवद्भावो वक्तव्यो मधोर्गृभ्णामि मधोस्तृप्ता इवासत इत्येवमर्थम्। पुंवद्भावेन नुमो निवृत्तिर्नुमि निवृत्ते पूर्वसवर्णेनैव सिद्धम् ॥ स्वरार्थस्तर्हीकारो वक्तव्यः। उदात्तस्वरो यथा स्यान्नपुंसकस्वरो मा भूदिति। ननु च पुंवद्भावाति-

(सू. ७७) या सूत्राचें उदाहरण कोणतें? 'अक्षी ते इन्द्र पिङ्गले' हें उदाहरण आहे.

हें उदाहरण घेतां येतेंच असें नाहीं. कारण अक्षि+औ अशी स्थिति असताना पूर्वसवर्णदीर्घ होऊनही हें उदाहरण साधतें.

बरें तर, 'अक्षीभ्यां ते नासिकाभ्याम्' येथील अक्षीभ्याम् हे घ्या, आणि 'अक्षी ते इन्द्र पिङ्गले' हेंही उदाहरण होऊं शकतें.

पण वर नाहीं कां सांगितलें की पूर्वसवर्णदीर्घ होऊनही हें उदाहरण साधतें?

नाहीं साधत. अक्षि+औ अशी स्थिति असतां 'इकोचि विभक्तौ' (७।१।७३) या सूत्रानें नुमागम होईल, व नुमागम झाल्यामुळें पूर्वसवर्णदीर्घ होणार नाहीं.

पण, वेदामध्यें नपुंसकलिंगी शब्दाला सर्वसाधारण पुंवद्भाव मधोर्गृभ्णामि, मधोस्तृप्ता इवासते इत्यादि रूपें साधण्याकरितां सांगावयास पाहिजेच. तो पुंवद्भाव अक्षी येथें केला म्हणजे नुम् आगम होणार नाहीं, आणि नुम् आगम परत फिरल्यावर पूर्वसवर्णदीर्घानें काम भागेल.

पण कांहीं झालें तरी अक्षीभ्यां या ठिकाणीं क्षी येथील ईकाराला उदात्त स्वर व्हावा याकरितां ईकार सांगावयास पाहिजेच. उदात्त ईकार हा आदेश होतो असें म्हटलें म्हणजे ईकार उदात्त होईल. नाहीं तर, 'नब्विषयस्यानिसन्तस्य' या फिट्सूत्रानें नपुसकलिंगी शब्दाला सांगितलेला आद्युदात्त होऊन येथें अ हा उदात्त होईल.

पण वर उल्लेख केलेला सर्वसाधारण पुंवद्भाव केला म्हणजे नपुंसक स्वर न होतां जो इष्ट तोच स्वर होईल म्हणजे प्रातिपदिकाचा अन्त उदात्त होतो

१. (सू. ७५) नपुंसकलिंगामध्यें अस्थि, दधि, सक्थि आणि अक्षि या चार शब्दाना, व हे चार शब्द शेवटीं असलेल्या अंगाला अजादि तृतीयादि विभक्ति पुढें असतांना अनङ् असा आदेश होतो; आणि अनङ् यांतील अकार उदात्त होतो. अनङ् यांतील ङकार इत्संज्ञक आहे. नकाराच्या पुढील अकार उच्चारणार्थ आहे. अनङ् आदेश ङित् असल्यामुळें 'ङिच्च' (१।१।५३) या परिभाषेनें तो अस्थि वगैरे शब्दांतील शेवटच्या इकाराला होतो; उदा० अस्थ्ना, परमास्थ्ना.

१. (सू. ७६) वेदामध्यें अस्थि, दधि, वगैरे शब्दांना अजादि तृतीयादि विभक्तींशिवाय इतर ठिकाणींही उदात्त अनङ् आदेश झालेला दृष्टीस पडतो.

१. (सू. ७७) वेदामध्यें अस्थि वगैरे शब्दांना दीर्घ ईकार अन्तादेश होतो, आणि तो ईकार उदात्त होतो; परंतु द्विवचन पुढें असलें पाहिजे; उदा० 'अक्षीभ्यां ते'.

२. आणि 'नपुंसकाच्च' (७।१।१९) या सूत्रानें औ प्रत्ययाला शी असा आदेश होऊन अक्षिणी असें रूप होईल.

३. येथें मधु शब्दाला पुंवद्भाव झाल्यामुळें नुमागम होत नाहीं; आणि गुण होऊन मधोः असें रूप होतें.

४. ज्याप्रमाणें पुंवद्भाव केल्यामुळें नपुंसकलिंगामध्यें सांगितलेलीं नुमागम, ह्रस्व, हीं कार्यें होत नाहींत त्याप्रमाणें नपुंसकलिंगामध्यें 'नब्विषयस्य०' या फिट्सूत्रानें सांगितलेला आद्युदात्तही होणार नाहीं.

देशादेव स्वरो भविष्यति। अशक्यः पुंवद्भावातिदेशः स्वरे तन्त्रमाश्रयितुम्। इह हि दोषः स्यात्। मध्वस्मिन्नस्ति मधुर्मास इति॥ स तर्हि पुंवद्भावो वक्तव्यः। न वक्तव्यः। प्रकृतं पुंवदिति वर्तते॥

**नाभ्यस्ताच्छतुः ॥७।१।७८॥**

कस्यायं प्रतिषेधः। नुम इत्याह। तन्नुमो ग्रहणं कर्तव्यम्। न कर्तव्यम्। प्रकृतमनुवर्तते। क्व प्रकृतम्। इदितो नुम्धातोः [ ७. १. ५८ ] इति। तद्वा अनेकग्रहणेन व्यवच्छिन्नमशक्यमनुवर्तयितुम्॥ एवं तर्हि सर्वनामस्थान इति वर्तते सर्वनामस्थाने यत्प्राप्नोति तस्य प्रतिषेधः। तद्वै बहुतरकेण ग्रहणेन व्यवच्छिन्नमशक्यमनु-

---

या सर्वसाधारण नियमास अनुसरून अक्षि येथील 'इ' हा उदात्त होईल[५].

पुंवद्भावातिदेश केला म्हणजे पुंलिंगी शब्दाप्रमाणें जशीं इतर सर्व कार्यें होतात तसा स्वरही होतो असें म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण, तसें म्हटल्यास 'मधुः मासः' येथील, ज्यामध्यें मधु आहे असा महिना या अर्थी योजलेला, जो मधुशब्द तेथें 'उ' उदात्त न होतां दोष येईल[६].

मग काय ? एकंदरींत नपुंसकलिंगी शब्दांना वेदामध्यें सर्वसाधारण पुंवद्भाव होतो असें म्हणण्याची जरूर दिसते; तेव्हां तसें स्वतन्त्र विधान करावें.

स्वतन्त्र विधान करावयास नको. कारण 'तृतीयादिषु०' या सूत्रांतून 'पुंवत्' हा शब्द प्रस्तुत सूत्रांत येईल व त्यामुळें काम भागेल[७].

( सू. ७८ ) या सूत्रानें कशाचा निषेध सांगितला आहे ?

नुम् या आगमाचा असें म्हणतों.

तर मग नुम् शब्द सूत्रांत उच्चारावयास पाहिजे.

उच्चारण्याची जरूर नाही. नुम् हा शब्द मागून चालूच आहे. तेव्हां याही सूत्रांत नुम् हा शब्द अनुवृत्त होईल.

कोणत्या सूत्रांत नुम् हे पद उच्चारलें आहे व पुढें चालूं आहे ?

'इदितो नुम् धातोः' या सूत्रांत नुम् पद घातलें आहे व तें पुढें चालूं आहे. पण त्यानंतर मध्यें पुंवत्, अनङ्, ई, अशा अनेक शब्दांनीं निरनिराळीं विधानें केलीं आहेत, तेव्हां त्यामुळें त्या मधल्या चार सूत्रांत नुम् शब्दाचा संबंध होत नाहीं, व म्हणून मध्यें खंड पडल्यामुळें प्रस्तुत सूत्रांत 'इदितो नुम् धातोः' या सूत्रांतून नुम् शब्द आणणें अशक्य आहे.

तर मग, 'उगिदचाम्०'(७।१।७०) या सूत्रांतील सर्वनामस्थाने या पदाचा येथें संबंध करतों. तेव्हा सर्वनामस्थान प्रत्यय पुढे असतांना जें कार्य प्राप्त होतें त्याचा या सूत्रानें निषेध केला जातो.

त्या सर्वनामस्थाने या पदाचा तर मधल्या बऱ्याच सूत्रांमध्यें म्ह० 'इकोचि०' (७।१।७३)

---

५. आणि त्या अक्षि शब्दांतील इकाराबरोबर पुढील औ प्रत्ययाला पूर्वसवर्णदीर्घ एकादेश झाल्यामुळें तो 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) यानें उदात्त होऊन अक्षी हें अन्तोदात्त रूप सिद्ध होईल.

६. मधु शब्दाच्या पुढे यत् प्रत्यय होऊन त्याचा लुक् होऊन महिना या अर्थी हा मधु शब्द साधलेला आहे. पुंवद्भाव झाल्यानें 'नब्विषयस्य०' या फिट्सूत्रानें सांगितलेल्या आद्युदात्त स्वराची निवृत्ति होत नाहीं; कारण, वर सांगितलेल्या मास या अर्थी प्रत्यक्ष पुंलिंगी असलेल्या मधुः या शब्दामध्यें 'नब्विषयस्य०' यानें आद्युदात्त स्वर झाला पाहिजे याकरितां त्या सूत्रामध्यें जो कोठें तरी नपुंसकलिंगामध्यें दृष्टीस पडतो त्याला आद्युदात्त होतो असा त्या सूत्राचा अर्थ करावा लागतो आणि त्यामुळें मधुः मासः या ठिकाणीं मधु हा आद्युदात्त सिद्ध होतो. तेव्हां मधोः या ठिकाणीं पुंवद्भाव झाला तरी 'नब्विषयस्य०' या सूत्राची निवृत्ति होत नाहीं.

७. 'ई च द्विवचने' या प्रकृत सूत्रामध्यें पुंवत् अशी अनुवृत्ति घ्यावी आणि त्याचा स्वतंत्र निराळा वाक्यार्थ 'वेदामध्यें नपुंसकलिंगाला पुंवद्भाव होतो' असा करावा. त्यामुळें मधोः हें उदाहरण साधेल.

१. ( सू. ७८ ) अभ्यस्तसंज्ञकाहून पर जो शतृ प्रत्यय त्याला नुम् आगम होत नाहीं. उगिदचाम्० (७।१।७०) या सूत्रानें प्राप्त झालेल्या नुम् आगमाचा हा प्रतिषेध आहे. उदा० ददत्, ददतौ, ददतः.

२. म्हणजे अर्थात् नुम् आगमाचा हा निषेध होईल.

वर्तयितुम् ॥ अथेदानीं व्यवहितमपि शक्यतेऽनुवर्तयितुं नुमेवानुवर्त्यं इहार्थमुत्तरार्थं च । इह चैव प्रतिषेधः सिद्धो भवतीह चाच्छीनद्योर्नुम् [ ८० ] इति नुम्ग्रहणं न कर्तव्यं भवति ॥

**[वा नपुंसकस्य ॥ ७।१।७९ ॥]**

**आच्छीनद्योर्नुम् ॥ ७।१।८० ॥**

इह कस्मान्न भवति । अदती घ्नती लुनती पुनती । लोपे कृतेऽवर्णाभावात् । किं तर्ह्यस्मिन्योग उदाहरणम् । याती यान्ती । अत्राप्येकादेशे कृते व्यपवर्गाभावान्न प्राप्नोति । अन्तादिवद्भावेन व्यपवर्गः । उभयत आश्रये

---

यासुद्धां पांच सूत्रामध्यें संबंध नसल्यामुळें खंड पडत आहे; तेव्हां त्याचाही येथें संबंध करणें अशक्य आहे.

आतां, जरी मध्यें खंड पडला असला तरी सुद्धां अनुवृत्ति करणें शक्य असतें असें गृहीत धरलें तर नुमाचीच अनुवृत्ति करावी; म्हणजे याही सूत्रांत उपयोग होईल व पुढीलही सूत्रांत उपयोग होईल. स्पष्ट म्हणावयाचें म्हणजे प्रस्तुत सूत्रांत नुम् या पदाची अनुवृत्ति केल्यानें नुमागमाचा निषेध साधला जातो आणि 'आच्छीनद्योर्नुम्' या पुढील सूत्रांत नुम् शब्द न उच्चारला तरी चालतो.

( सू. ८० ) अदती, घ्नती, लुनती, पुनती, या ठिकाणीं नुमागम का होत नाहीं ?

शप् विकरणाचा व श्ना प्रत्ययाच्या 'आ'-काराचा लोप केल्यावर अकार राहत नाहीं म्हणून.

तर मग या सूत्राला उदाहरण कोणतें ?

कां बरें ? याती, यान्ती, हें उदाहरण आहे.

पण याही ठिकाणीं या+अत्+ई अशी स्थिति असता आ व अ यांचे जागीं आकार हा एकादेश केल्यावर पूर्वी 'अ' वर्ण व पुढें अत् प्रत्यय अशी निरनिराळी स्थिति दिसत नाहीं, म्हणून नुम् आगम होणार नाहीं.

असें काय म्हणून ? 'ज्या ठिकाणीं दोन वर्णांचे ठिकाणीं एकवर्णरूप एकादेश केला जातो त्या ठिकाणीं तो एकादेश पूर्वीच्या शब्दस्वरूपाच्या शेवटच्या वर्णासारखा व पुढील शब्दस्वरूपाच्या प्रथमवर्णासारखा समजला जातो' (६।१।८५) असा नियम आहे. त्या नियमाला अनुसरून येथें ते निरनिराळे समजले जातील.

तसें शक्य नाहीं. कारण वरील नियमाला अपवादक नियम आहे: 'ज्या ठिकाणीं एकादेश हा पूर्वीच्या शब्दाचा शेवटला वर्ण व पुढील शब्दाचा पहिला वर्ण अशा दोन्ही प्रकारच्या कल्पनांचा विषय एकदम झाला पाहिजे अशी जरूर असेल त्या ठिकाणीं वर सांगितलेला अन्तादिवद्भाव लागू करावयचा नाहीं.' तेव्हां येथें यान्ती या उदाहरणांत या हा जो 'आ'कार त्याहून पुढें असणारा जो शतृ प्रत्यय त्याला

---

३. अशा तऱ्हेच्या अनुवृत्तीला मण्डूकप्लुति म्हणतात. मण्डूक जसा चालत न जातां उड्या मारत जातो तसें सूत्रांतील कोणतेंही पद मध्यें प्रत्येक सूत्रात संबद्ध न होतांना एकदम उडी मारून व्यवहित अशा सूत्रामध्यें अनुवृत्तीनें जातें.

४. कारण, येथें नुम् या पदाची अनुवृत्ति केली म्हणजे अर्थातच पुढील सूत्रामध्यें त्याचा संबंध होईल.

१. (सू. ७९) नपुंसकलिंगामध्यें अभ्यस्त-संज्ञकाच्या पुढील शतृ प्रत्ययाला 'उगिदचाम्०' यानें प्राप्त झालेला नुम् आगम विकल्पानें होतो; उदा० ददति, ददन्ति.

१. (सू. ८०.) शी किंवा नदी प्रत्यय पुढें असतांना अकारान्त अंगाच्या पुढील 'शतृ' या प्रत्ययाला नुम् आगम विकल्पानें होतो; उदा० तुदती, तुदन्ती; याती, यान्ती.

२. अदती आणि घ्नती, या ठिकाणीं अद् आणि हन्, या धातूंहून शतृ प्रत्यय केला आहे हे धातू अदादि गणामधील असल्यामुळें शप् प्रत्ययाचा 'अदिप्रभृतिभ्यः शपः' (२।४।७२) या सूत्रानें लुक् झालेला आहे. लुनती व पुनती या ठिकाणीं लू आणि पू या धातूंहून शतृ प्रत्यय, मध्यें श्ना विकरण, आणि धातूला 'प्वादीनां ह्रस्वः' ( ७।३।८० ) या सूत्रानें ह्रस्व आणि 'श्नाभ्यस्तयोरातः' (६।४।११२)या सूत्रानें 'आ'-काराचा लोप झाला आहे. येथें शतृ प्रत्ययाचा 'अ'-कार जरी आहे तरी तो अंगाच्या शेवटीं नसल्यामुळें त्या अकाराला धरून प्रकृत सूत्रानें नुमागम होत नाहीं.

३. 'अवर्णाच्या पुढें जो शतृ प्रत्यय' असा अर्थ मनांत घेतला आहे.

नान्तादिवत् ॥ नोभयत आश्रयः करिष्यते । नैवं विज्ञायतेऽवर्णान्ताच्छतुर्नुम्भवतीति । कथं तर्हि । अवर्णान्नुम्भवति तच्चेदवर्णं शतुरनन्तरमिति ॥

## शप्श्यनोर्नित्यम् ॥ ७।१।८१ ॥

नित्यग्रहणं किमर्थम् । विभाषा मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धोऽत्र पूर्वेणैव तत्रारम्भसामर्थ्यान्नित्यो विधिर्भविष्यति ॥ तदेतन्नित्यग्रहणं सांन्यासिकं तिष्ठतु तावत् ॥

## सावनडुहः ॥ ७।१।८२ ॥

### अनडुहः सावाम्प्रतिषेधो नुमोऽनवकाशत्वात् ॥ १ ॥

अनडुहः सावाम्प्रतिषेधः प्राप्नोति । किं कारणम् । नुमोऽनवकाशत्वात् । अनवकाशो नुमामं बाधते ॥

### न वाऽवर्णोपधस्य नुम्वचनात् ॥ २ ॥

न वैष दोषः । किं कारणम् । अवर्णोप-

---

विकल्पानें नुम् होतो असें म्हणतां यावयाचें नाहीं.

आम्ही येथें दोन प्रकारची कल्पना करणार नाहीं; एक प्रकारचीच करतों. आतां प्रकृत सूत्राचा अर्थ मात्र 'अ' वर्ण शेवटीं असलेल्या शब्दाहून पुढें असलेल्या 'शतृ' प्रत्ययाला नुम् विकल्पानें होतो असा येथें घ्यावयाचा नाहीं.

तर मग कसा घ्यावयाचा ?

'अ'वर्णाहून पुढें नुमागम होतो; पण केव्हां ? जेव्हां तो 'अ' वर्ण शतृ या प्रत्ययांतील एकाद्या अवयवालगत असेल तेव्हां.

( सू. ८१ ) या सूत्रात नित्य शब्द कशाकरितां घातला आहे ?

विकल्पानें नुम् होऊं नये म्हणून.

हा उपयोग देतां येत नाहीं. कारण कीं विकल्पानें पूर्वीच्या सूत्रानें नुम् आगम होतच आहे. तेव्हां या सूत्रानें नुम् आगम वास्तविक रीतीनें सांगण्यासच नको. असें असून ज्या अर्थी सांगितला आहे त्या अर्थी विधानाचे जोरावर तो विकल्पानें न होतां नित्यच होईल.

बरें, एकंदरींत हा नुम् आगम जर नित्यच होणार, तर सूत्रांतील 'नित्य' शब्द असेना कां ? तो ठेवा, म्हणजे ठेवल्यासारखा राहूं द्या.

( सू. ८२, वा. १ ) अनडुह् शब्दाला प्रस्तुत सूत्रानें सु पुढें असतांना नुम् सांगितला आहे, तेव्हां सु पुढें असतांना आम् या आगमाचा नुम् या आगमानें बाध होऊं लागेल, व अनडुन् असें भलतेंच रूप होईल.

बाध काय म्हणून होईल ?

आम् आगमाशिवाय इतर ठिकाणीं नुम् आगमाला जागा नाहीं म्हणून. आम् आगमाला औ, जस्, वगैरे प्रत्यय पुढें असतांना स्वतन्त्र जागा आहे. सु पुढें असताना आमूही उपस्थित होतो व प्रस्तुत सूत्रानें नुमही उपस्थित होतो. तेव्हां नुम् हा अपवाद होऊन आम् याला बाजूला सारील.

( वा. २ ) अथवा हा दोष येत नाहीं.

तो काय म्हणून ?

---

४. कारण, यान्ती या ठिकाणीं एकच 'आ'कार हा अंगाच्या शेवटींही तोच आहे आणि त्याच्या पुढें असणारा असा प्रत्ययांतीलही तोच आहे असा एकदम त्या 'आ'काराचा दोन्हीकडे संबंध गृहीत धरावा लागतो; त्याशिवाय प्रकृत सूत्राची प्राप्ति येणार नाहीं.

१. ( सू. ८१ ) शप् किंवा श्यन् या प्रत्ययांतील 'अ'कारापुढें जो शतृ प्रत्ययाचा अवयव तदन्त अंगाला शी किंवा नदीप्रत्यय पुढें असतांना नुमागम नित्य होतो; उदा० पचन्ती, दीव्यन्ती.

१. ( सू. ८२ ) अनडुह् शब्दाला प्रथमेच्या एकवचनाचा सु हा प्रत्यय पुढें असतांना नुम् आगम होतो; उदा०–अनड्वान्.

२. 'चतुरनडुहोरा०' ( ७।१।९८ ) या सूत्रानें सांगितलेल्या.

३. वास्तविक पाहतां येथें आम् आगम आणि नुम् आगम हे दोन्ही होऊन हकाराचा 'संयोगान्तस्य०' (८।२।२३) या सूत्रानें लोप होऊन अनड्वान् असें रूप होत असतें.

४. कारण आम् हा आगम सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना सांगितला आहे.

धस्य नुम्वचनात् । अवर्णोपधस्य नुमं वक्ष्यामि ॥ तदवर्णग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमवनुवर्तते । क प्रकृतम् । आच्छीनद्योर्नुम् [ ७. १. ८० ] इति । यदि तदनुवर्ततेऽनडुहि यावन्त्यवर्णानि सर्वेभ्यः परो नुम्प्राप्नोति । नैष दोषः । मिदचोऽन्त्यात्परः [ १. १. ४७ ] इत्यनेन यत्सर्वान्त्यमवर्णं तस्मात्परो भविष्यति ॥

**पुनः प्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धम्**

अथवा पुनःप्रसङ्गान्नुमि कृत आम्भविष्यति ।

**यथात्त्वादिषु द्विर्वचनम् ॥ ३ ॥**

तद्यथा जग्ले मम्ले ईजतुः ईजुरित्यात्त्वादिषु कृतेषु पुनः प्रसङ्गाद् द्विर्वचनं भवत्येवमत्रापि नुमि कृत आम्भविष्यति ॥ नैष युक्तः परिहारः । विप्रतिषेधे पुनःप्रसङ्गो विप्रतिषेधश्च द्वयोः सावकाशयोर्भवति । इह पुनरनवकाशो नुमामं बाधते ॥ एवं तर्हि

---

कारण कीं, 'अ'वर्ण हा ज्याची उपधा आहे म्हणजे उपान्त्य आहे अशा अनडुह् शब्दाला नुम् होतो म्हणून. तेव्हां ज्याचा उपान्त्य 'अ'कार आहे त्याला आम्ही नुम् सांगू.

तर मग अवर्ण असा शब्द येथें घालावयास पाहिजे.

जरूर नाहीं. कारण, अवर्ण हा शब्द मागून चालू आहेच तो याही सूत्रांत उपस्थित होईल.

तो मागे कोठें उच्चारला आहे ?

'आच्छीनद्योर्नुम्' या सूत्रांत आत् असा शब्द घातलेला आहे.

जर तेथील 'अ या वर्णाचे पुढे' या अर्थाचा 'आत्' शब्द येथें उपस्थित होतो असें म्हटलें तर तो अ वर्ण उपान्त्य पाहिजे असा अर्थ होणार नाहीं. तेव्हां अनड्वान् हें रूप साधतांना अनडुह् शब्दांत जेवढे अ असे वर्ण मिळतील तेवढया सगळ्यांचे पुढें नुम् आगम जोडला जाईल.[६]

हा दोष येत नाहीं. कारण 'मिदचोन्त्यात्परः' ( १।१।४७ ) या परिभाषासूत्राला अनुसरून सर्वांत शेवटीं जो अकार असेल त्यानंतर नुम् जोडला जाईल.[७]

(वा. ३) अथवा, अगोदर जरी आम् आगमाचा नुम् या आगमानें बाध केला तरी प्रथम नुम् केल्यावर व अनडुन्ह् असें रूप सिद्ध झाल्यावर पुन्हां आम् आगमाची प्राप्ति येत असल्यामुळें उकारानंतर आम् आगम होईल व काम भागेल.

ज्याप्रमाणें जग्ले, मम्ले, ईजतुः, ईजुः इत्यादि ठिकाणीं 'आ' कार आदेश (६।१।४५) व संप्रसारण (६।१।१५) हीं कार्यें केल्यानंतर पुन्हा द्वित्वाची ( ६।१।८ ) प्राप्ति येते व द्वित्व होतें, त्याचप्रमाणे प्रस्तुत ठिकाणीं देखील नुम् आगम केल्यानंतर आम् आगमाची पुन्हां प्राप्ति आल्यामुळें आम् आगम होईल.

अशा रीतीनें वर दाखविलेल्या अडचणीचें निवारण करणें बरोबर नाहीं. कारण, ज्या ठिकाणीं दोन कार्यांमध्यें विरोध येतो व परत्वामुळें एक कार्य अगोदर होतें व तें झाल्यावर दुसरें कार्य पुन्हां प्रवृत्त होतें त्याच ठिकाणीं पुनःप्रसङ्ग म्हणजे पुन्हां प्रवृत्ति स्वीकारली जाते. आणि विरोधाविषयीं विचार करावयाचा म्हणजे ज्या दोन कार्यांना परस्परस्वतन्त्र अशीं उदाहरणें मिळतात, त्या दोन कार्यांमध्यें शास्त्रीय रीत्या विरोध मानण्यांत येतो. प्रस्तुत ठिकाणीं नुम् आगमाला ज्या ठिकाणीं आम् आगम नाहीं असे उदाहरणच मिळत नाहीं. म्हणून तो आम् या

---

५. म्हणजे अर्थातच आम् आगम केल्याशिवाय नुम् आगमाची प्राप्तीच येत नाहीं. आम् आगम झाल्यानंतरच अनड्वाह् असें उपान्त्य 'अ'वर्ण असलेलें स्वरूप बनतें.

६. म्हणजे अनडुह् शब्दांतील आरंभींच्या अकारापुढें, तसाच न यांतील अकारापुढेंही.

७. अचां-(स्वरां-)मध्यें शेवटचा अच् जो अवर्ण त्याच्या पुढें नुमागम होतो, असें 'मिदचोऽन्त्यात्परः' या परिभाषेच्या साहाय्यानें सिद्ध होत असल्यानें आम् केल्यानंतरच नुम् आगमाची प्राप्ति येते आणि मागील अकारापुढें नुम् आगम होत नाहीं. तेव्हां अनड्वान् हें रूप सिद्ध होतें.

वृत्तान्तादेष परिहारः प्रस्थितः। कस्माद् वृत्तान्तात्। इदमयं चोद्यो भवत्यनडुहः सावाम्प्रतिषेधो नुमोऽनवकाशत्वादिति। तस्य परिहारो न वावर्णोपधस्य नुम्वचनादिति। ततोऽयं चोद्यो भवति यत्र तर्ह्यवर्णप्रकरणं नास्ति तत्र त आमा नुमो बाधनं प्राप्नोति बहुनड्वांहि ब्राह्मणकुलानीति। तत उत्तरकालमिदं पठितं पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धमिति॥

**[दृक्स्ववःस्वतवसां छन्दसि ८३॥]**

---

आगमाचा अपवाद होतो, व त्याचा बाध करतो. अपवादस्थलीं पुनःप्रसंगप्रवृत्ति होत नसते. एकंदरींत 'पुनःप्रसंगविज्ञानाद्वा सिद्धम्' हें वार्तिक येथें लागू पडत नाहीं.

तर मग, येथें असें समजावें की वार्तिककारांनीं 'पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धम्'[९] या वाक्यानें केलेले जें शंकेचें निवारण तें शंकासमाधानरूपानें ग्रंथ लिहीत असतां प्रसंगानें उपस्थित झालेली निराळीच एक शका मनात घेऊन त्या शकेचें निवारण केलें आहे.

कोणत्या प्रकारच्या प्रसंगानें येथें निराळीच शंका उपस्थित होते ?

पुढें लिहिल्याप्रमाणें ग्रंथसंदर्भ समजावा म्हणजे कोणता प्रसंग तो ध्यानांत येईल. प्रथम शकाकार वार्तिककाराना शंका विचारतो:– अनडुह् शब्दाला 'सु' पुढें असताना आम् आगमाचा निषेध करावा; कारण, न केल्यास त्याला दुसरी स्वतन्त्र जागा न मिळाल्यामुळें नुम् हा आगम प्रथमेचें एकवचन साधतेवेळीं आम् या आगमाचा मुळींच बाध करील, व बाध झाला म्हणजे आम् होणार नाहीं. या शंकेचें निवारण वार्तिककार करतातः– असें होणार नाहीं, कारण नुम् हा उपान्त्य अवर्णाला उद्देशून सांगितला आहे, व तसा अवर्ण हा आम् आगम झाल्यावरच मिळत असल्यामुळें आम् आगम अगोदर होईलच व नंतर नुम् आगमाची प्राप्ति येऊन नुम् आगम होईल. याच प्रसंगानें येथें वार्तिककारांच्या मनांत निराळी एक शंका उपस्थित होते, ती अशीः– ज्या ठिकाणीं 'अ' वर्णाचें प्रकरण नाहीं त्या ठिकाणीं म्हणजे ज्या ठिकाणीं नुम् आगम अ या वर्णाला उद्देशून सागतां येत नाहीं[१०] त्या ठिकाणीं परत्वामुळे आम् आगम नुम् आगमाचा बाध करून होईल व त्यानंतर तेथें नुम् आगम होणार नाहीं, उदाहरणार्थ, बहुनड्वांहि ब्राह्मणकुलानि, येथील बहुनड्वांहि हें रूप साधतेवेळीं. या शंकेला उत्तर देण्याकरितां ही शंका मनांत घेऊन नतर वार्तिककार म्हणतातः–पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धम्; पुन्हां म्हणजे आम् आगम झाल्यावर नुम् आगमाची प्राप्ति येते तेव्हां आम् आगम झाल्यावर नुम् आगम करावा म्हणजे झाले. (नुम् आगमाचा बाध प्रस्तुत ठिकाणीं परत्वास्तव होतो, अपवादत्वास्तव होत[११] नाहीं. म्हणून

---

८. तेव्हां येथें समान बलाच्या अशा दोन शास्त्रांमध्यें विरोध नाहीं. तेव्हां हें अनड्वान् उदाहरण ईजतुः, जग्ले, यांसारखें नव्हे.

९. 'पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा०' या वार्तिकांतील वा शब्द 'अथवा' या अर्थाचा नव्हे. तेव्हां अनड्वान् या उदाहरणासंबंधानें वार्तिककारांनीं 'अथवा' म्हणून दुसऱ्या रीतीनें उत्तर दिलें आहे असें समजूं नये. तेथें आत् या पदाच्या अनुवृत्तीनेंच अनड्वान् हें उदाहरण साधावें.

१०. उदा० 'नपुंसकस्य झलचः' (७।१।७२) या सूत्रानें सांगितलेला नुम् आगम अ या वर्णालाच उद्देशून सांगता येत नाहीं. सर्पींषि, धनूंषि, या उदाहरणामध्यें इकार व उकार, यांच्या पुढेंही त्या सूत्रानें नुम् आगम होत असतो.

११. कारण, नपुंसकस्य० (७।१।७२) या सूत्राला पयांसि वगैरे उदाहरणांमध्यें चारितार्थ्य आहे. तेथें 'चतुरनडुहो०' (७।१।९८) या सूत्राची प्राप्ति नाहीं. तसेंच, पुंल्लिंगामध्यें अनड्वान् वगैरे उदाहरणांमध्यें 'चतुरनडुहो०' या सूत्राला चारितार्थ्य आहे, तेथें नपुंसकलिंग नसल्यामुळें 'नपुंसकस्य०' या सूत्राची प्राप्ति येत नाहीं. तेव्हां 'बहुनड्वांहि' हे उदाहरण ईजतुः, जग्ले, यांसारखें परत्वानेंच आहे.

१. (सू. ८३) वेदामध्यें दृक्, स्ववस् आणि स्वतवस्

## दिव औत् ॥ ७।१।८४ ॥

### दिव औत्वे धातुप्रतिषेधः ॥ १ ॥

दिव औत्त्वे धातोः प्रतिषेधो वक्तव्यः। अक्षद्यूरिति ॥ अधात्वधिकारात्सिद्धम् । आधातोरिति वर्तते । क्व प्रकृतम् । उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः (७. १ ७०) इति ।

### अधात्वधिकारात्सिद्धमिति

### चेन्नपुंसके दोषः ॥ २ ॥

अधात्वधिकारात्सिद्धमिति चेन्नपुंसके दोषो भवति । काष्ठतक्षि कूटतक्षि । नपुंसकस्य झलचः (७२) अधातोरिति प्रतिषेधः प्राप्नोति ॥

### उक्तं वा ॥ ३ ॥

किमुक्तम् । अननुबन्धकग्रहणे हि न सानुबन्धकस्येति ॥ अथवा संबन्धमनुवर्तिष्यते ॥

---

आम् झाल्यावर सुद्धां नुम् होईल.)

(सू. ८४, वा. १) दिव् शब्दाला 'औ'कार सांगतेवेळीं दिव् धातूविषयीं औकार होण्याचा निषेध बोलावा; उदाहरणार्थ अक्षद्यूः[२] येथें..

'अधातोः' असा अधिकार चालू असल्यामुळें काम भागतच आहे. अधातोः हा शब्द मागील सूत्रांत उच्चारला असल्यामुळें तो प्रस्तुत सूत्रात अनुवृत्त होतोच.

कोणत्या सूत्रात ?

'उगिदचां सर्वनामस्थानेऽधातोः' (७।१। ७०) या सूत्रात.

(वा. २) 'अधातोः' या अधिकारामुळें काम भागत आहे असें म्हटलें तर नपुंसकलिंगीं काष्ठतक्षि, कूटतक्षि, वगैरे रूपें साधताना अडचण येईल. कारण त्या ठिकाणीं 'नपुंसकस्य झलचः' या सूत्रानें नुम् आगम होण्यास 'तक्ष्' हा धातू आहे म्हणून अधातोः या पदामुळें अडचण[३] येईल.

(वा. ३) अथवा, येथें दिव् धातूला औकार कां होत नाहीं याचें उत्तर मागें दिलेलेंच आहे.

काय उत्तर दिलें आहे ?

'ज्या ठिकाणीं इत्संज्ञक वर्ण न जोडता एकादा शब्द उच्चारून कार्य सांगितलें असतें त्या ठिकाणीं तें कार्य इत्संज्ञक नसलेल्या शब्दासंबंधानेंच समजावें; इत्संज्ञक जोडलेला तसा दुसरा शब्द मिळाला तरी त्याला तें कार्य करूं नये' आणि येथें दिवु या धातूला तर उकार इत्संज्ञक जोडला आहे. अथवा अधातोः या पदाची संबंधासहित[५] अनुवृत्ति केली जाईल.

---

ह्या शब्दाना सु प्रत्यय पुढें असताना नुम् आगम होतो; उदा० ईदृङ्, तादृङ्, स्ववान्, स्वतवान्.

१. (सू. ८४) दिव् या शब्दातील 'व'काराला सु प्रत्यय पुढें असतांना औकारादेश होतो; औत् यांतील तकार उच्चारणार्थ आहे; उदा० द्यौः.

२. अक्षद्यूः येथें अक्ष हें उपपद असतांना दिव् धातूहून क्विप् प्रत्यय होतो. नंतर 'च्छ्वोः शूडनुनासिके च' (६.४।१९) या सूत्रानें वकाराला ऊठ् आदेश होऊन मागील इकाराला इण् होऊन अक्षद्यू शब्द सिद्ध होतो. येथें यू हा दिव् धातूचाच विकार आहे. तेव्हां तो दिवच आहे असें समजून ऊकाराला प्रकृत सूत्रानें औकार होऊं लागेल.

३. 'उगिदचाम्०' (७।१।७०) या सूत्रांतून अधातोः या पदाची अनुवृत्ति प्रकृत 'दिव औत्' या सूत्रात केली तर त्या अधातोः या पदाचा मध्यें 'नपुंसकस्य झलचः' (७।१।७२) या सूत्रामध्यें संबंध होणारच, त्यामुळें तक्ष् या धातूला त्यानें नुम् आगम होणार नाहीं असा दोष येतो.

४. दिव् या शब्दाला मात्र एकही इत्संज्ञक नाहीं. कारण तो शब्द अव्युत्पन्न आहे.

५. 'उगिदचाम्' या सूत्रामध्यें अधातोः या पदाचा उगित्, सर्वनामस्थाने आणि नुम् या पदांशीं संबंध

[पथिमथ्यृभुक्षामात् ॥ ७।१।८५ ॥]

इतोऽत्सर्वनामस्थाने ॥ ७।१।८६ ॥

इतोऽद्वचनमनर्थकमाकारप्रकरणात् ॥ १॥

इतोऽद्वचनमनर्थकम् । किं कारणम् । आकारप्रकरणात् । आदिति वर्तते ॥

षपूर्वार्थं तु ॥ २ ॥

षपूर्वार्थं तर्ह्यद्वक्तव्यः । ऋभुक्षाणमिन्द्रम् ॥ ऋभुक्षणमिन्द्रम् ॥

[थो न्थः ॥ ७।१।८७ ॥

भस्य टेर्लोपः ॥ ७।१।८८ ॥

पुंसोऽसुङ् ॥ ७।१।८९ ॥

असुङ्युपदेशिवद्वचनं स्वरसिद्ध्यर्थं बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ १ ॥

---

( सू. ८६, वा. १ ) या ठिकाणीं इकाराला अकार सांगण्याचा कांहीं उपयोग नाहीं.

काय म्हणून ?

'आ'कारादेशाचें प्रकरण चालू आहे म्हणून. प्रस्तुत सूत्रांत 'आ'कार अनुवृत्त आहेच. तेव्हां 'इ'काराला 'आ'कार होईलच. 'अ'कार झाला तरी त्याला 'सर्वनामस्थाने चासंबुद्धौ' यानें दीर्घ करावयाचा असतोच.

(वा.२) जरी पथिन् आणि मथिन् या शब्दांचे विषयीं उपयोग दिसला नाहीं तरी ज्या इकाराचे पूर्वीं षकार आहे अशा इकाराला अकार सांगावाच लागेल; उदाहरणार्थ ऋभुक्षाणमिन्द्रम्, ऋभुक्षणमिन्द्रम्.

( सू. ८९, वा. १ ) या असुङ् आदेशाविषयीं उपदेशिवद्भाव सांगावा; म्हणजे पुंस् शब्दाचें उच्चारण करतांनाच सर्वनामस्थानप्रत्यय पुढें ठेवावयाचा असल्यास तो प्रत्यय करण्याच्या पूर्वीं पुंस् याच्या ऐवजीं पुमस् असें समजावें.

असें कशाकरितां ?

---

झालेला आहे. तशीच त्या संबंधासहितच त्या पदाची पुढें अनुवृत्ति होत आहे तेव्हां मधल्या सर्व सूत्रांमध्यें स्वतंत्र वाक्यार्थ होत आहे. या वाक्यार्थाचा कांहीं उपयोग मात्र होत नाहीं. उपयोग पवढाच की 'दिव औत्' या सूत्रामध्यें अधातोः या पदाची अनुवृत्ति होते. येथें मात्र अधातोः याशिवाय इतर पदांचा संबध करावयाचा नाहीं.

१. ( सू. ८५ ) पथिन्, मथिन् आणि ऋभुक्षिन् या शब्दाच्या नकाराला सु प्रत्यय पुढें असतांना 'आ'-कार आदेश होतो; उदा० पन्थाः, मन्थाः, ऋभुक्षाः.

१. ( सू. ८६ ) पथिन् मथिन् आणि ऋभुक्षिन् या शब्दांमधील 'इकाराला' सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना 'अ'कार आदेश होतो; उदा० पन्थानौ, मन्थानौ, ऋभुक्षाणौ.

२. मागील सूत्रांतून आत् या पदाची अनुवृत्ति करून या सूत्रानें 'इ'काराला 'आ'कारच सांगावा, असा अभिप्राय आहे.

३. पन्थानौ, मन्थानौ, या उदाहरणांमध्यें ऱ्हस्व अकार हा आदेश करून त्याला दीर्घ केला काय आणि मूळच्या इकारालाच दीर्घ आदेश झाला काय, यांत कांहीं फरक होत नाहीं.

४. येथें 'वा षपूर्वस्य निगमे' ( ६।४।९ ) या सूत्रानें वेदामध्यें दीर्घ विकल्पानें होतो. तेव्हां ज्या वेळीं दीर्घ केला नाही त्या वेळीं ऋभुक्षणम् असें रूप होतें. जर प्रकृत सूत्रानें दीर्घ 'आ'कारच आदेश सांगितला तर ऋभुक्षणम् हें रूप सिद्ध होणार नाहीं.

१. ( सू ८७ ) सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना पथिन् व मथिन् या शब्दांतील थकाराला न्थ असा आदेश होतो; न्थ या आदेशामध्यें अकार उच्चारणार्थ आहे; उदा० पन्थानः, मन्थानः.

१. ( सू. ८८ ) 'भ'संज्ञक जे पथिन्, मथिन् आणि ऋभुक्षिन् हे शब्द त्यांच्या 'टी'चा लोप होतो; उदा० पथः, मथः, ऋभुक्षः

१. ( सू. ८९ ) सर्वनामस्थानाची विवक्षा असतांना प्रत्यय करण्यापूर्वींच पुम्स् शब्दांतील सकाराला असुङ् असा आदेश होतो. असुङ् यांतील उकार उच्चारणार्थ आहे. ङकार इत्संज्ञक असल्यामुळें अस् असा आदेश 'ङिच्च' ( १।१।५३ ) या परिभाषेनें पुम्स् शब्दाच्या सकाराला होतो; उदा० पुमान् पुमांसौ पुमांसः.

२. पुंस् या शब्दांतील सकाराला अस् आदेश केला म्हणजे पुमस् असें होतें.

असुङ्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । उपदेशावस्थायामेवासुङ् भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । स्वरसिद्ध्यर्थम् । उपदेशावस्थायामसुङि कृत इष्टः स्वरो यथा स्यात् । परमपुमानिति । अक्रियमाणे ह्युपदेशिवद्भावे समासान्तोदात्तत्वेऽसुङान्तर्यतोऽस्वरकस्यास्वरकः स्यात् । किं पुनः कारणं समासान्तोदात्तत्वं तावद्भवति न पुनरसुङ् । न परत्वादसुङा भवितव्यम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गलक्षणोऽसुङ् । अन्तरङ्गः स्वरः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ।। स तर्ह्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । न वक्तव्यः । आद्युदात्तनिपातनं करिष्यते स निपातनस्वरः समासस्वरस्य बाधको भविष्यति ।। एवमप्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । स यथैव हि निपातनस्वरः समासस्वरं बाधत एवं प्रकृतिस्वरमपि बाधेत ।

---

इष्ट स्वर व्हावा म्हणून. शब्दोच्चारणाचे वेळींच जर असुङ् आदेश केला व पुमस् शब्द समजला तर परमपुमान् या ठिकाणीं जो स्वर व्हावयास पाहिजे तो होईल. जर उपदेशिवद्भाव सांगितला नाहीं तर परमपुंस् असें जें समस्तपद त्या ठिकाणीं उकाराला उदात्त स्वर होईल व नंतर उदात्त स्वरानें रहित किंवा अनुदात्तासारखा स्वर असलेलें जें सकार व्यंजन त्याला होणारा अस् ( असुङ् ) हा आदेश अनुदात्त होईल, अथवा उदात्तस्वररहित म्हणजे अनुदात्तासारखा झाला तरी तो शेषनिघातानें ( ६।१।१५८ ) अनुदात्त होईल.

पण समासान्तोदात्त व असुङादेश या दोहोंमध्यें समासान्तोदात्तच अगोदर व्हावा, असुङ् होऊं नये, असेंच काय म्हणून ? तसें म्हणतां येत नाहीं. उलट परसूत्रानें सांगितला असल्यामुळें असुङ् आदेशच प्रथम झाला पाहिजे.

असुङ् आदेश अगोदर व्हावयाचा नाहीं. कारण तो बहिरङ्ग आहे. त्याच्या निमित्तांचा विचार केला असतां तो बहिरङ्गनिमित्त ठरतो, व समासस्वर हा असुङाच्या निमित्तांशीं तुलना केली असतां अंतरंगनिमित्त ठरतो; आणि ' अंतरंग कार्य करावयाचें असतां बहिरंग कार्य असिद्ध समजलें जातें ' या परिभाषेमुळें बहिरंग असुङ् न होतां अगोदर अंतरंग अंतोदात्त स्वरच होईल.

बरें तर मग उपदेशिवद्भाव सांगावा.

सांगण्याची जरूर नाहीं. असुङ् आदेश उच्चारतांनाच तो आद्युदात्त म्हणजे अकार उदात्त असलेला असा उच्चारण्यांत येईल, आणि मुद्दाम उच्चारलेला असुङाचा आद्युदात्तस्वर समासान्तस्वराचा बाध करील, म्हणजे परमपुमान् येथें परमपुंस् अशी स्थिति असतांना ' उ ' उदात्त झाला तरी 'स्'व्यंजनाला आद्युदात्त अस् आदेश झाला कीं उकाराला झालेला उदात्त दूर होईल व परमपुमान् असें 'आ'कार उदात्त असलेलें रूप मिळेल.

पण परमपुमान् हें जरी रूप अशा रीतीनें साधलें तरी उपदेशिवद्भाव सांगावयास पाहिजेच. परमपुमान् यासाठीं जरूर नसली तरी पुमान् याच रूपासाठीं त्याची जरूर लागेल. कारण, निपातनस्वर उदात्त अकार सांगितला म्हणजे तो

---

३. परम शब्दाचा पुंस् शब्दाशीं समास केल्याबरोबर सकाराला असुङ् करून नंतर 'समासस्य' (६।१।२२३) या सूत्रानें अकाराला उदात्त होऊन परमपुमान् हा अन्तोदात्त शब्द सिद्ध होतो.

४. व्यंजनांना वास्तविक रीतीनें उदात्त, अनुदात्त, हे कांहींच स्वर संभवत नाहींत. तरी पण साहजिक रीतीनें व्यंजनांचा उच्चार तालु वगैरे स्थानांच्या अधोभागीं जिह्वाग्र वगैरेंचा स्पर्श झाल्यावर होतो, म्हणून व्यंजनें ही अनुदात्तासारखीं मानलीं जातात.

५. समासाच्या पुढें उत्पन्न होणाऱ्या सर्वनामस्थानप्रत्ययाची असुङ् आदेशाला जरूर असल्यामुळें असुङ् आदेश हा बहिरंग होतो.

६. तेव्हां असुङ् आदेश करण्याच्या पूर्वी 'समासस्य' या सूत्रानें उकाराला उदात्त झाला तरी मागून सकाराला असुङ् आदेश उदात्त झाला म्हणजे मागील उकाराला शेषनिघातानें अनुदात्त होऊन रूप साधेल.

पुमान् । तस्मात्सुष्ठूच्यतेऽसुङ्युपदेशिवद्वचनं स्वरसिद्ध्यर्थं बहिरङ्गलक्षणत्वादिति ॥

## गोतो णित् ॥ ७।१।९० ॥

किमिदं गोतः परस्य सर्वनामस्थानस्य णित्त्वमुच्यत आहोस्वित्सर्वनामस्थाने परतो णित्कार्यमतिदिश्यते । कश्चात्र विशेषः ।

### गोतः सर्वनामस्थाने णित्कार्यातिदेशः ॥ १ ॥

गोतः सर्वनामस्थाने णित्कार्यमतिदिश्यते॥

### सर्वनामस्थाने णित्त्ववचने ह्यसंप्रत्ययः षष्ठ्यनिर्देशात् ॥ २ ॥

सर्वनामस्थानस्य णिद्वचने ह्यसंप्रत्ययः स्यात् । किं कारणम् । षष्ठ्यभावात् । षष्ठीनिर्दिष्टस्यादेशा उच्यन्ते न चात्र षष्ठीं पश्यामः ॥ एवं तर्हि वतिनिर्देशोऽयम् । गोतो णिद्भवतीति । स तर्हि वतिनिर्देशः कर्तव्यो न ह्यन्तरेण वतिमतिदेशो गम्यते । अन्तरेणापि वतिमतिदेशो गम्यते । तद्यथा । एष ब्रह्मदत्तः । अब्रह्मदत्तं ब्रह्मदत्त इत्याह ते मन्यामहे ब्रह्मदत्तवदयं भवतीति । एवमिहा-

---

ज्याप्रमाणें समासस्वराला दूर करतो, त्याप्रमाणें पुंस् शब्दाचा मूळचा उकाराचा ' ञ्नित्यादिर्नित्यम् ' ( ६।१।९७ ) या सूत्रानें झालेला जो उदात्त स्वर त्यालाही तो दूर करील व पुमान् येथें 'आ'-कार उदात्त होईल. वास्तविकरीत्या येथें उकारच उदात्त पाहिजे. तेव्हां एकंदरींत 'असुङ्युपदेशिवद्वचनं स्वरसिद्ध्यर्थं बहिरङ्गलक्षणत्वात्' हे वार्तिककारानीं केलेलें वचन योग्यच आहे.

( सू. ९० ) प्रस्तुत सूत्रानें गो शब्दाच्या पुढें असलेल्या सर्वनामस्थान प्रत्ययाला णिदादेश सांगितला आहे ? किंवा सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना णित्कार्यांचा अतिदेश सांगितला आहे, म्हणजे प्रत्यय जरी णित् नाहीं, तरी तो णित् आहे असें समजून णिन्निमित्तक कार्यें करावीं असें सांगितलें आहे ?

दोहोंमध्यें फरक काय ?

( वा. १ ) गो शब्दाच्या पुढें सर्वनामस्थान प्रत्यय आला असतांना ( त्या प्रत्ययाला णित् समजून ) गो शब्दाला णिताच्या निमित्तानें होणारें कार्य करावें असेंच येथे समजलें पाहिजे.

( वा. २ ) सर्वनामस्थान प्रत्ययाला णकारेत्संज्ञक आदेश होतो असें म्हटले तर तसें व्हावयाचें नाहीं, कारण 'गोतो णित्' या सूत्रावरून तसा अर्थ होऊं शकत नाहीं.

तो काय म्हणून ?

कारण, सूत्रात षष्ठी विभक्तींत शब्द नाहीं म्हणून. नेहमीं आदेश हे षष्ठी विभक्तींत शब्द उच्चारून त्याला सांगितले असतात आणि प्रस्तुत सूत्रांत तर षष्ठी विभक्तींत उच्चारलेला शब्द दृष्टीं पडत नाहीं.

बरें, तर मग, णित् हें पद 'णिद्वत्' म्हणजे णितासारखें अशा अर्थी घातलें आहे हा दुसराच पक्ष घेऊं. गो शब्दाला सर्वनामस्थान-प्रत्यय पुढें असतांना णित्कार्यांचा अतिदेश सांगितला आहे असा अर्थ घेऊं.

तसें करणें झाल्यास 'वत्' शब्द सूत्रांत उच्चारावयास पाहिजे. कारण, वत् शब्द उच्चारल्याशिवाय अतिदेश म्हणजे एकासारखा दुसरा समजणें ही गोष्ट मनांत येत नाहीं.

असा कांहीं नियम नाहीं. वत् शब्द उच्चारल्याशिवायही केव्हां केव्हा अतिदेश मनांत येतो. उदाहरणार्थ, 'एष ब्रह्मदत्तः' हें वाक्य घ्या. या ठिकाणीं एषः या शब्दानें उल्लेख केलेला मनुष्य ब्रह्मदत्त नसून त्याला ज्या अर्थी ब्रह्मदत्त

---

१. (सू. ९०) गो शब्दाच्या पुढील सर्वनामस्थानसंज्ञक प्रत्यय णित् आहे असें समजावें. प्रत्यय णकारेत्संज्ञक समजला म्हणजे त्याच्या मागील गो या शब्दाला 'अचो ञ्णिति' ( ७।२।११५ ) या सूत्रानें वृद्धि होते आणि गौः, गावौ इत्यादि रूपें साधतात.

२. सूत्रांत गोतः ही पञ्चमी आहे असें गृहीत धरलें आहे.

३. या पक्षीं 'गोतः' ही षष्ठी विभक्ति गृहीत धरली आहे.

प्यणितं णिदित्याह णिद्वदिति गम्यते ॥ अथवा पुनरस्तु गोतः परस्य सर्वनामस्थानस्य णित्त्वम् । ननु चोक्तं सर्वनामस्थाने णित्त्ववचने ह्यसंप्रत्ययः षष्ठ्यनिर्देशादिति । नैष दोषः । गोत इत्येषा पञ्चमी सर्वनामस्थान इति सप्तम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य (१.१.६७) इति ॥

अथ तपरकरणं किमर्थम् । इह मा भूत् । चित्रगुः शबलगुरिति । नैतदस्ति । ह्रस्वत्वे कृते न भविष्यति । स्थानिवद्भावात्प्राप्नोति ॥ अत उत्तरं पठति ।

**तपरकरणमनर्थकं स्थानिवत्प्रतिषेधात्॥३॥**

तपरकरणमनर्थकम् । किं कारणम् । स्थानिवत्प्रतिषेधात् । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावो गोः पूर्वणित्त्वात्वस्वरेषु स्थानिवद्भावो न भवतीति । स चावश्यं प्रतिषेध आश्रयितव्यः ।

**इतरथा हि संबुद्धिजसोः प्रतिषेधः ॥४॥**

यो हि मन्यते तपरकरणसामर्थ्यादत्र न भविष्यतीति संबुद्धिजसोस्तेन प्रतिषेधो

---

म्हटलें आहे त्या अर्थी ब्रह्मदत्तासारखा तो मनुष्य आहे असें आपण समजतों, त्याप्रमाणेंच प्रस्तुत ठिकाणीं सर्वनामस्थानप्रत्यय णित् नसतांना त्याला आचार्य पाणिनि णित् म्हणतात; तेव्हां णित्प्रत्ययासारखा तो प्रत्यय होतो असाच त्यांच्या मनांत अर्थ आहे असें समजावयाचें.

अथवा पहिल्या पक्षांत सांगितल्याप्रमाणें गो शब्दाच्या पुढें असलेल्या सर्वनामस्थान प्रत्ययाला णकारेत्संज्ञक आदेश होऊं दे, कांहीं हरकत नाहीं.

परंतु, वरच नाहीं कां सांगितलें कीं सर्वनामस्थान प्रत्ययाचे ठिकाणीं णिदादेश करतां यावयाचा नाहीं, कारण, आदेश षष्ठी विभक्तींत उच्चारलेल्या शब्दांना होतात, आणि प्रस्तुत सूत्रांत तर षष्ठी विभक्तींत उच्चारलेला शब्द नाहीं ?

अशी अडचण येत नाहीं. कारण 'गोत:' येथें पञ्चमी विभक्ति आहे. म्हणून तिच्या जोरावर 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेनें 'सर्वनामस्थाने' येथील सप्तमी विभक्तीची षष्ठी करण्यांत येईल.

बरें पण, गोतः येथें गो शब्दाच्या पुढें तकार कशाकरितां जोडला आहे ? कां बरें ? चित्रगुः व शबलगुः या ठिकाणीं णित्कार्य होऊं नये म्हणून.[५]

असें कांहीं नाहीं. कारण या ठिकाणीं 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' (१।२।४८) या सूत्रानें 'ओ'काराला ऱ्हस्व केल्यावर गो शब्दच नसल्यामुळें प्रस्तुत सूत्राची प्राप्तीच येत नाहीं.

पण स्थानिवद्भावानें (१।१।५६) 'गु' हा 'गो' शब्द समजला म्हणजे प्रस्तुत सूत्राची प्राप्ति[६] येते. हाच विचार मनात घेऊन वार्तिककार पुढें दिलेलें वार्तिक उत्तरादाखल उच्चारतात.

(वा. ३) प्रस्तुत सूत्रात गो शब्दाच्या पुढील तकार व्यर्थ आहे; काय म्हणून म्हणाल तर येथें स्थानिवद्भाव होत नाहीं म्हणून. या ठिकाणीं स्थानिवद्भावाचा निषेध सांगितला आहे. 'स्थानिवदादेशो०' (१।१।५६) या सूत्रावर 'गोः पूर्वणित्वात्वस्वरेषु ॥२९॥' या वार्तिकानें स्थानिवद्भावाचा निषेध सांगितला आहे, आणि तो निषेध अवश्य स्वीकारावाच लागत आहे.

(वा. ४) कारण, जरी एकादा वैयाकरण प्रस्तुत चित्रगुः, शबलगुः, या रूपासबधानें

---

४. गो शब्दाच्या पुढील सु, औ, वगैरे प्रत्ययांना णकारेत्संज्ञक आदेश करावयाचे म्हणजे 'स्थानेऽन्तरम:' (१।१।५०) या परिभाषेनें अत्यन्तसदृश असे ज्याचे तेच होतात म्हणजे सु याचे स्थानीं णकारेत्संज्ञक सु असा आदेश होतो; तसेंच मूळच्या औ प्रत्ययाला णकारेत्संज्ञक औ आदेश होतो असें म्हटलें म्हणजे सर्व रूपें साधतात.

५. 'तपरस्तत्कालस्य' (१।१।७०) या सूत्रानें तकार ज्या वर्णाच्या पुढें लावला असेल तोच वर्ण उदाहरणामध्यें असतांना तें कार्य होतें असें सांगितलें आहे. 'गोत:' या सूत्रामध्यें ओकाराच्या पुढें तकार लावला आहे. तेव्हां चित्रगु वगैरे उदाहरणांमध्यें ओकार नसल्यामुळें णित्कार्य होत नाहीं.

६. तेव्हां याच उद्देशानें पाणिनीनें सूत्रामध्यें तकार उच्चारला आहे.

वक्तव्यः स्यात् । हे चित्रगो चित्रगव इति ॥ अथेदानीं सत्यपि स्थानिवद्भावप्रतिषेधे गुणे कृते कस्मादेवात्र न भवति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति । ननु चेदानीमसत्यपि स्थानिवद्भावप्रतिषेध एतया परिभाषया शक्यमुपस्थातुम् । नेत्याह न हीदानीं क्वचिदपि स्थानिवत्स्यात् ॥

**[ णलुत्तमो वा ॥ ७।१।९१ ॥**

**सख्युरसंबुद्धौ ॥ ७।१।९२ ॥**

**अनङ् सौ ॥ ७।१।९३ ॥**

---

'गोतः' येथील तपरकरणाच्या जोरावर 'ओकारान्त गोशब्द पाहिजे' असें म्हणून चित्रगुः व शबलगुः येथील अडचण दूर करूं शकला तरी त्याला 'चित्रगो' या संबोधनाचे रूपाविषयीं, तसेंच चित्रगवः या प्रथमेच्या बहुवचनाविषयीं, स्थानिवद्भावाचा निषेध सांगावाच लागेल; कारण, या ठिकाणीं गुण झाल्यावर चित्रगो+सु, चित्रगो+जस्, अशी स्थिति असतां जर स्थानिवद्भावानें गो शब्द समजला तर प्रस्तुत सूत्रानें णित्कार्य होऊं लागेल.

बरें पण, स्थानिवद्भावाचा निषेध केला तरी गुण केल्यावर चित्रगो+सु अथवा चित्रगो+जस् येथें गो असा शब्द स्थानिवद्भावावांचून आपोआपच मिळतो व गो शब्द मिळाल्यामुळें प्रस्तुत सूत्रानें णित्कार्य कां होऊं नये ?

णित्कार्य होणार नाहीं. कारण 'लाक्षणिक किंवा प्रतिपदोक्त अशा दोन्ही तऱ्हेचे शब्द ज्या ठिकाणीं मिळतात त्या ठिकाणीं प्रतिपदोक्त शब्दाचेंच कार्याकरितां ग्रहण करावें' अशी परिभाषा आहे.

मग अशी परिभाषा आहे तर चित्रगो, चित्रगवः, या ठिकाणीं स्थानिवद्भावाचा निषेध बोलला नाहीं तरी चालेल; प्रस्तुत परिभाषेनें काम भागेल.

काम भागणार नाहीं असें म्हणतों. स्थानिवद्भाव या परिभाषेला बाजूला सारतो. या परिभाषेला स्थानिवद्भावाच्या उदाहरणामध्यें जर वाव दिला तर स्थानिवद्भावाला कोठेंच जागा राहणार नाहीं. तेव्हां, प्रस्तुत स्थलीं जर स्थानिवद्भावाचा निषेध सांगितला नाहीं तर स्थानिवद्भाव होईल व 'लक्षणप्रतिपदोक्त॰' परिभाषा बाजूला सरून णित्कार्य होऊं लागेल.

---

७. कारण, येथें चित्रगु शब्दाच्या उकाराला 'ह्रस्वस्य गुणः' (७।३।१०८) आणि 'जसि च' (७।३।१०९) या सूत्रांनीं गुण होऊन पुन्हां ओकार झाला असल्यामुळें तपरकरणानें येथें णित्कार्याची व्यावृत्ति करतां येणार नाहीं.

८. मूळचा गो शब्द हा प्रतिपदोक्त होय, आणि त्याला ह्रस्व होऊन पुनः गुण होऊन जें गो हें शब्दस्वरूप तयार होतें तें लाक्षणिक होय.

९. कारण, जसा ह्रस्व व गुण होऊन तयार झालेला गो शब्द लाक्षणिक समजला जातो तसाच स्थानिवद्भावानें समजलेला गो शब्द हा देखील लाक्षणिकच होय. तेव्हां त्याचेंही या सूत्रामध्यें ग्रहण होणार नाहीं.

१०. कारण ज्या ज्या ठिकाणीं कांहीं कार्य करण्याकरितां स्थानिवद्भाव करावा त्या त्या सर्व ठिकाणीं जो स्थानीसारखा समजला जाईल तो लाक्षणिकच आहे असें समजून त्याचें त्या सूत्रामध्यें ग्रहण केलें जाणार नाहीं; व त्यामुळें तें कार्य स्थानिवद्भाव घेतला तरी होणार नाहीं. तेव्हा स्थानिवद्भाव व्यर्थ होईल.

१. ( सू. ९१ ) लिटामध्यें उत्तमपुरुषाच्या एकवचनाच्या मिप् प्रत्ययाला जो 'परस्मैपदानाम्॰' ( ३।४।८२ ) या सूत्रानें णल् आदेश सांगितला आहे तो जरी मूळचा णकारेत्संज्ञक आहे तरी येथें तो विकल्पानें णकारेत्संज्ञक समजावा; उदा॰ पपच, पपाच; पेचिव, पेचिम.

१. ( सू. ९२ ) सखि शब्दाच्या पुढें असणारा जो संबुद्धीखेरीज सर्वनामस्थान प्रत्यय तो णित् आहे असें समजावें; उदा॰ सखायौ, सखायः.

१. ( सू. ९३ ) संबुद्धिभिन्न सु प्रत्यय पुढें असतांना सखि शब्दाच्या इकाराला अनङ् असा आदेश होतो. अनङ् यांतील ङकार इत्संज्ञक आहे आणि त्याच्या मागील अकार उच्चारणार्थ आहे. ङित् असल्यामुळें हा अन् आदेश 'ङिच्च' ( १।१।५३ ) या

**ऋदुशनस्पुरुदंसोनेहसां च ॥ ७।१।९४ ॥ ]**[1]

**तृज्वत्क्रोष्टुः ७।१।९५ ॥**

**स्त्रियां च ॥ ७।१।९६ ॥**[2]

अथात्र विभक्तावित्यनुवर्तेत उताहो न । किं चातः ।

तृज्वत् स्त्रियां विभक्तौ चेत् क्रोष्टीभक्तिर्न सिध्यति ।

तृज्वत् स्त्रियां विभक्तौ चेत्क्रोष्टीभक्तिरिति न सिध्यति ॥ एवं तर्हीकार एव तृज्वद्भावं वक्ष्यामि । तदीकारग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । क्रियते न्यास एव । प्रश्लिष्टनिर्देशोयम् । स्त्री ई स्त्री स्त्रियमिति ।

ईकारे तन्निमित्तः सः

ईकारे चेत्तन्न । किं कारणम् । तन्निमित्तः सः । तृज्वद्भावनिमित्तः स ईकारः । नाकृते तृज्वद्भाव ईकारः प्राप्नोति । किं कारणम् । ऋन्नेभ्यो ङीप् [४. १. ५] इत्युच्यत ईकारे

---

( सू. ९५, ९६ ) प्रस्तुत सूत्रामध्यें विभक्तौ ( म्ह. विभक्तिप्रत्यय पुढें असतांना ) हें पद अनुवृत्तीनें येतें किंवा नाहीं ?

आलें किंवा न आलें, फरक काय ?

विभक्तौ पद अनुवृत्त झाल्यास ' स्त्रियां च ' या सूत्राचा अर्थ ' स्त्रीलिंगाचा बोध होत असतांना विभक्तिप्रत्यय पुढें असल्यास क्रोष्टु शब्द तृजन्त शब्दासारखा होतो ' असा होईल व क्रोष्टीभक्तिः[3] हें उदाहरण साधणार नाहीं.

असें होईल तर ईकार पुढें असतांना तृज्वद्भाव सांगू.

तसें म्हटलें तर ' ईकार पुढें असतांना' असें म्हणावें लागेल.

असें निराळें म्हणावयास नको. सूत्रांत ईकार घातलेलाच आहे. 'स्त्रियाम्' या शब्दांतच स्त्री आणि ई अशीं दोन पदें जोडलेलीं आहेत. स्त्री आणि ई यांचा संधि करून स्त्री शब्द घ्यावयाचा, व त्याच्या सप्तमीचें रूप 'स्त्रियाम्' घ्यावयाचें.[4]

ईकार पुढें असतांना असें म्हणणें जुळत नाहीं.

तें काय म्हणून ?

कारण ईकार हा तृज्वद्भाव झाल्यानंतर त्याच्या ( त्यांतील ऋकाराच्या ) निमित्तानें होणारा आहे. तृज्वद्भाव अगोदर केल्याशिवाय ईकार पुढें होणारच नाहीं.

असें काय म्हणून ?

कारण 'ऋन्नेभ्यो ङीप् ' या सूत्रानें[5] ऋका-

---

परिभाषेनें अन्त्याला म्हणजे सखि या शब्दाच्या इकाराला होतो; उदा० सखा.

१.( सू. ९४ ) संबुद्धिभिन्न सु प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्वऋकारान्त शब्दांना तसेंच उशनस्, पुरुदंसस् आणि अनेहस् या शब्दांना अनङ् आदेश होतो; हा आदेश ङित् असल्यामुळें ऋकारान्त शब्दांतील शेवटच्या ऋकाराला आणि उशनस् वगैरे शब्दांच्या शेवटच्या सकाराला होतो; उदा० कर्ता, उशना वगैरे.

१. ( सू. ९५ ) संबुद्धिभिन्न सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना क्रोष्टु हा तुन्-प्रत्ययान्त शब्द तृच्-प्रत्यान्त क्रोष्टृ यासारखा समजावा; म्हणजे क्रोष्टु या उकारान्ताला क्रोष्टृ असा ऋकारान्त आदेश होतो.

१ ( सू. ९६ ) स्त्रीलिंगामध्यें सर्व ठिकाणीं क्रोष्टु शब्दाला क्रोष्टृ असा तृजन्त आदेश होतो; उदा० क्रोष्ट्री, क्रोष्ट्र्यौ, क्रोष्ट्र्यः,

२. 'स्त्रियां च' या सूत्रामध्यें व 'तृज्वत्क्रोष्टुः' या मागील सूत्रामध्यें सर्वनामस्थाने याचा संबंध केला आहे. ' विभाषा तृतीयादिष्वचि ' या पुढील सूत्रामध्यें विभक्तौ याचा कांहीं उपयोग नाहीं.

३. क्रोष्टी शब्दाचा भक्ति शब्दाबरोबर बहुव्रीहि समास येथें केला आहे. समासामध्यें प्रत्येक शब्दापुढें केलेल्या विभक्तिप्रत्ययाचा 'सुपो धातु०' ( २।४।७१ ) या सूत्रानें लुक् होतो. तेव्हां विभक्ति पुढें नसल्यामुळें क्रोष्ट्री असें रूप होणार नाहीं; क्रोष्टुभक्तिः असें होईल.

४. म्हणजे याचा अर्थ 'स्त्रीलिंगामध्यें क्रोष्टु शब्दाला ईकार पुढें असतां क्रोष्टृ असा आदेश होतो' असा होईल.

५. 'ऋन्नेभ्यो ङीप्' यानें स्त्रीलिंगी ङीप् प्रत्यय ऋकारान्ताहून होतो असें सांगितलें आहे.

च तृज्वद्भावः । तदिदमितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते ॥ एवं तर्हि गौरादिषु पाठादीकारो भविष्यति ।

गौरादिषु न पठ्यते ॥

न हि किंचित्तुनन्तं गौरादिषु पठ्यते ॥ एवं तर्ह्येतज्ज्ञापयत्याचार्यो भवत्यत्रेकार इति यदयमीकारे तृज्वद्भावं शास्ति ।

तेनैव भावनं चेत्स्यादनिष्टोऽपि प्रसज्यते ।

यद्यपि नास्ति विशेषो ङीपो वा ङीषो वा ङीनपि तु प्राप्नोति । इह च न प्राप्नोति । पञ्चभिः क्रोष्ट्रीभिः क्रीतै रथैः पञ्चक्रोष्टृभी रथैरिति ॥ एवं तर्हि

न चापरं निमित्तं संज्ञा च प्रत्ययलक्षणेन ।

न चापरं निमित्तमाश्रीयते । अस्मिन्परतः क्रोष्टुस्तृज्वद्भवतीति । किं तर्हि । अङ्गस्य क्रोष्टुस्तृज्वद्भवति । अङ्गसंज्ञा च भवति प्रत्य-

---

राला निमित्त करून ईकार सांगितला आहे; आणि प्रस्तुत सूत्रांत तर तुम्ही आतां स्त्री आणि ई असे दोन शब्द घेऊन ईकाराला निमित्त धरून तृज्वद्भाव सांगत आहां. तेव्हां हीं दोन्ही कार्यें एकमेकांवर अवलंबून राहतात, आणि एकमेकावर अवलंबून असलेलीं दोन्हीं कार्यें होऊं शकत नाहींत.

बरें तर, गौर वगैरे जे शब्द दिले आहेत त्यांमध्यें क्रोष्टु शब्द असल्यामुळे 'षिद्गौरादिभ्यश्च' ( ४।१।४१ ) या सूत्रानें ऋकार निमित्त असल्याशिवायच ई होईल.

पण गौरादि गणामध्यें पाणिनीनें क्रोष्टु शब्द उच्चारला नाहीं. एवढेंच नव्हे, तर त्या गणामध्यें तुन् प्रत्यय शेवटीं असलेला कोणताच शब्द नाहीं.[६]

बरें तर मग, ज्या अर्थी आचार्य पाणिनि या ठिकाणीं प्रस्तुत सूत्रानें ईकार पुढे असतांना तृज्वद्भाव सांगतात त्या अर्थी ते असें सुचवितात कीं स्त्रीलिंगविवक्षा असताना क्रोष्टु शब्दाच्या पुढें स्त्रीप्रत्यय ई होतो[७].

जरी ङीप् आणि ङीष् यांमध्यें कांहीं फरक न पडला तरी ईकार स्त्रीप्रत्यय होतो असें ज्ञापन झाल्यास ङीन्सुद्धां व्हावयास लागेल, आणि ङीन् झाला तर स्वरांत फरक पडेल.[८] शिवाय, पञ्चभिः क्रोष्ट्रीभिः क्रीतैः रथैः म्हणजे 'पांच कोल्ह्या मोबदला देऊन खरेदी केलेले' या अर्थी 'पञ्चक्रोष्टृभिः' हें उदाहरण साधतांना ईकाराचा लुक् झाल्यामुळे तृज्वद्भाव होणार नाहीं, व पञ्चक्रोष्टुभिः असें भलतेंच रूप होईल.[९]

बरें तर, तृज्वद्भावाला 'अमुक पुढें असतांना क्रोष्टु शब्द तृजन्तासारखा होतो' अशा तऱ्हेचे निमित्त[१०] आम्ही सांगत नाहीं.

मग तृज्वद्भाव कशा रीतीनें सांगणार ?

अंग जो क्रोष्टु शब्द म्हणजे क्रोष्टु शब्द शेवटीं असलेलें जें अंग त्याला तृज्वद्भाव होतो,

---

६. तेव्हां क्रोष्टृ असा तृज्वद्भावानें ऋकारान्त शब्द झाल्याशिवाय त्याच्यापुढें स्त्रीप्रत्यय करतां येणार नाहीं.

७. तेव्हां हा आचार्यांनी सुचविलेला ई प्रत्यय अगोदर करून नंतर क्रोष्टु शब्दाला तृज्वद्भावाने क्रोष्टृ असा आदेश करून रूप साधतां येईल हा ईकार प्रत्यय 'स्त्रियां च' या सूत्रावरून सुचविला जात असल्यामुळें ङीप्, ङीष्, ङीन्, हे जे पाणिनीनें सांगितलेले स्त्री-प्रत्यय त्यापैकीच हा कोणीतरी आहे असें समजावें. कारण, स्वतन्त्र ई प्रत्ययाची कल्पना करण्यापेक्षां इतर ठिकाणीं सांगितलेल्या स्त्रीप्रत्ययाची कल्पना करणें बरें.

८. ङीन् प्रत्यय झाला असतां 'ञ्नित्यादि०' ( ६।१।१९७ ) या सूत्रानें नित्प्रत्ययान्त शब्दाचा आदि उदात्त होत असतो.

९. पञ्चक्रोष्टृभिः येथें पञ्चन् आणि क्रोष्ट्री या शब्दाचा 'तद्धितार्थो०' ( २।१।५१ ) या सूत्रानें द्विगु समास होतो. त्याच्या पुढें 'आर्हादगो०' ( ५।१।१९ ) या सूत्रानें 'खरेदी केलेले' या अर्थी झालेल्या ठक् प्रत्ययाचा 'अध्यर्धपूर्व०' ( ५।१।२८ ) यानें लुक्. नंतर 'लुक्तद्धित०' (१।२।५०) या सूत्रानें स्त्रीप्रत्ययाचा लुक् होतो. येथें 'प्रत्ययलोपे०' ( १।१।६२ ) या सूत्रानें प्रत्यय पुढें आहे असें समजतां येणार नाहीं, कारण 'न लुमता०' ( १।१।६३ ) हा त्याचा निषेध आहे.

१०. विभक्ति पुढे असतांना किंवा ईकार पुढें असतांना अशा तऱ्हेचें कोणतेंही निमित्त.

यलक्षणेन ॥

किं पुनरयं शास्त्रातिदेशः । तृचो यच्छास्त्रं तदतिदिश्यते । आहोस्विद्रूपातिदेशः । तृचो यद्रूपं तदतिदिश्यत इति । कश्चात्र विशेषः ।

**तृज्वदिति शास्त्रातिदेशश्चेद्यथा चिणि तद्वत् ॥ १ ॥**

तृज्वदिति शास्त्रातिदेशश्चेद्यथा चिणि तद्वत्प्राप्नोति । कथं च चिणि । उक्तमङ्गस्येति तु प्रकरणादाङ्गशास्त्रातिदेशात्सिद्धमिति । आङ्गं यत्कार्यं तदतिदिश्यते । एवमिहाप्यनङ्गुणदीर्घत्वान्यतिदिष्टानि रपरत्वमनतिदिष्टम् ॥ तत्र को दोषः ।

**तत्र रपरवचनम् ॥ २ ॥**

तत्र रपरत्वं न सिध्यति तद्वक्तव्यम् ॥ नैष दोषः । गुणेऽतिदिष्टे रपरत्वमप्यतिदिष्टं भवति । कथम् । कार्यकालं संज्ञापरिभाषं

---

असा अर्थ आम्ही करूं आणि जरी प्रत्ययाचा लुक् झाला तरी प्रत्ययलक्षणाने अंगसंज्ञा होऊं शकेल. 'न लुमताऽङ्गस्य' हा निषेध अंगसंज्ञा होण्याविषयीं येत नाहीं[11], अंगाला कार्य होण्याविषयीं येतो.

बरें, प्रस्तुत सूत्रांत 'तृज्वत्' शब्दाचा अर्थ करतांना शास्त्रातिदेश घ्यावयाचा म्हणजे तृच् प्रत्यय केला असतांना जीं जीं शास्त्रें ( सूत्रें ) प्रवृत्त होतात तीं तीं सर्व येथें येतात असें म्हणावयाचें ? अथवा रूपातिदेश घ्यावयाचा म्हणजे तृच् प्रत्ययाचें जे रूप तें येथें होतें, म्हणजे ' तु ' च्या ऐवजीं 'तृ' होतो, असें म्हणावयाचें ?

दोन्ही प्रकारांमध्यें फरक काय दृष्टीस पडतो ?

( वा. १ ) 'तृज्वत्' हा शास्त्रातिदेश मानिल्यास चिण्वद्भावाविषयीं जशीं चिण् प्रत्ययाच्या निमित्तानें प्राप्त होणारीं काहीं कार्यें केलीं जातात तशा तऱ्हेने तृच्प्रत्ययान्ताला होणारीं काहीं कार्यें तृज्वत् म्हणण्यानें होतील.

चिणाविषयीं कशी व्यवस्था होते ?

'स्यसिच्सीयुट्'० (६।४।६२) या सूत्रामध्यें सांगितलेच आहे कीं तेथें 'अङ्गस्य' हा अधिकार चालू आहे, तेव्हां अङ्गस्य या अधिकारामध्यें निर्दिष्ट केलेलीं जी शास्त्रें त्याचाच अतिदेश केल्यानें काम भागतें. थोडक्यांत म्हणावयाचें म्हटलें तर अङ्गस्य या अधिकारामध्यें सांगितलेलीं जीं कार्यें त्याचा अतिदेश होतो. त्याच विचारसरणीनें प्रस्तुत सूत्रात 'तृज्वद्भाव होतो' असें म्हणण्यानें अङ्गस्य या अधिकारामध्यें सांगितलेलीं अनङ्, गुण आणि दीर्घ हींच कार्यें घेतलीं जातील, व 'उरण् रपरः' या सूत्रानें होणारें गुणाचें रपरत्व घेतलें जाणार नाहीं; कारण तें 'अङ्गस्य' या अधिकारामध्यें सांगितलेलें नाहीं[12].

मग तसें झालें तरी काय बिघडलें ?

( वा. २ ) त्या ठिकाणीं रेफ शेवटीं असलेला 'अर्' असा गुण होणार नाहीं. तो सांगावा लागेल.

अशी अडचण येणार नाहीं. कारण, गुण होतो म्हटलें कीं रेफ शेवटीं असलेला असाच गुण होणार.

असें कसें म्हणतां ?

असें म्हणतों; कारण, संज्ञासूत्रें व परिभाषासूत्रें हीं कार्यानेंच आकर्षण केलेलीं समजावयाचीं,

---

११. कारण, 'न लुमताऽङ्गस्य' ( १।१।६३ ) या सूत्रामध्यें 'अङ्गस्य' असा शब्द पाणिनीनें घातला आहे. त्यामुळें अंगसंज्ञेनंतरच त्या सूत्राची प्रवृत्ति होते. अंगसंज्ञा करतांना किंवा अंगसंज्ञा करण्याच्या पूर्वी त्या निषेधाची प्रवृत्ति होत नाहीं.

१२. चिण्वत् येथ शास्त्राचा अतिदेश मानल्यामुळें तीं शास्त्रें कोणतीं अशी आकांक्षा सहजच उत्पन्न होते, व तो चिण्वद्भाव 'अङ्गस्य' या अधिकारामध्यें सांगितला असल्यामुळें 'अङ्गस्य' या अधिकारांतच निर्दिष्ट केलेल्या शास्त्रांचा अतिदेश होतो असें सहजच सिद्ध होतें. त्यामुळें तेथें हन् वगैरे धातूंना सांगितलेले जे वध वगैरे आदेश ते 'अङ्गस्य' या अधिकारांत नसल्यामुळें त्यांचा अतिदेश होत नाहीं. तसेंच येथेंही शास्त्रातिदेश मानला तर 'अङ्गस्य' या अधिकारांत असलेल्याच शास्त्राचा अतिदेश होईल; 'उरण् रपरः' याचा अतिदेश होणार नाहीं.

यत्र कार्यं तत्र द्रष्टव्यम् । ऋतो ङिसर्वनामस्थानयोर्गुणो भवति । उपस्थितमिदं भवत्युरण्रपरः [ १. १. ५१ ] इति ॥

एवं तर्ह्ययमन्यो दोषो जायते । आहत्य तृचो यच्छास्त्रं तदतिदिश्येतानाहत्य वेति । किं चातः । यद्याहत्य दीर्घत्वमतिदिष्टमनङ्गुणरपरत्वान्यनतिदिष्टानि । अथानाहत्यानङ्गुणरपरत्वान्यतिदिष्टानि दीर्घत्वमनतिदिष्टम् । अस्त्वाहत्य । ननु चोक्तं दीर्घत्वमतिदिष्टमनङ्गुणरपरत्वान्यनतिदिष्टानीति । नैष दोषः । दीर्घत्वेऽतिदिष्टे ऽनङ्गुणरपरत्वान्यप्यतिदिष्टानि भवन्ति । कथम् । उपधाया इति वर्तते न चाकृतेष्वेतेषु दीर्घभाविन्युपधा भवति । कुतो नु खल्वेतदेतेषु विधिषु कृतेषु योपधा तस्या दीर्घत्वं भविष्यति न पुनः क्रोष्टोर्योऽन्तरतमो गुणस्तस्मिन्कृतेऽवादेशे च योपधा

---

म्हणजे ज्या ठिकाणीं कार्य सांगणारें सूत्र आहे त्या ठिकाणींच संज्ञासूत्र किंवा परिभाषासूत्र नेऊन दोन्हींचा एकदम अर्थ करावयाचा असा नियम आहे. तेव्हां 'ऋकारान्त अंगाला ङिप्रत्यय किंवा सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना गुण होतो' अशा अर्थाच्या 'ऋतो ङिसर्वनामस्थानयोः' ( ७।३।११० ) या सूत्राबरोबरच ' तो ऋकाराला सांगितलेला गुण रेफ पुढें असलेला असा होतो' अशा अर्थाचें 'उरण् रपरः' हेंही सूत्र अर्थ करतांना उपस्थित होईलेंच.[१३]

बरें पण, शास्त्रातिदेश घेतला असता आणखी एक दोष येथें येतो. मुद्दाम तृचाला म्हणून सांगितलेलीं जीं कार्यें तीं येथें घ्यावयाचीं[१४] किंवा तृचाला होऊं शकणारीं जीं कार्यें तीं करावयाचीं ?

दोहोंमध्यें फरक काय ?

जर मुद्दाम तृचाला म्हणून सांगितलेलीं जीं कार्यें तीं येथें होतात असें म्हटले तर 'अप्तृन्तृच्०' या सूत्रांत तृच् शब्दाला उच्चारून सांगितलेला दीर्घ येथें घेतां येईल, पण अनङ्, गुण व रपरत्व हीं घेतां येणार नाहींत.[१५] बरें, जर 'मुद्दाम उच्चारून सांगितलेलीं जीं कार्यें नाहींत तीं होतात' असें म्हटले तर अनङ्, गुण व रपरत्व हीं अतिदिष्ट म्हणून प्रवृत्त होतील व दीर्घ होणार नाहीं.

बरें, मुद्दाम तृचाला म्हणून सांगितलेलींच घ्या.

पण वरतीं नाहीं कां दोष दिला कीं तसें केल्यास फक्त दीर्घच अतिदिष्ट म्हणावा लागेल व गुण, अनङ् व रपरत्व हीं अनतिदिष्ट होतील ?

हा दोष येत नाहीं. दीर्घाचा अतिदेश झाला कीं साहजिकच अनङ्, गुण व रपरत्व यांचाही अतिदेश झालाच असें म्हणावें लागतें.[१६]

तें कसें ?

उपधेला दीर्घ होतो असें म्हटलें आहे. आणि अनङ्, गुण व रपरत्व हीं कार्यें केल्याशिवाय दीर्घ व्हावयास उपधाच मिळूं शकत नाहीं.

पण, असें कोणीं सांगितलें आहे कीं हीं कार्यें केल्यानंतरची अन् व अर् यांतील 'अ' ही जी उपधा तिलाच दीर्घ करावयाचा, आणि क्रोष्टु शब्दाच्या उकाराला त्याचा अन्तरतम जो

---

१३. तेव्हां 'उरण् रपरः' ही जरी परिभाषा अङ्गस्य या अधिकारामध्यें निर्दिष्ट केलेली नाहीं तरी परिभाषा ही कार्याकरतां केली असल्यामुळें ती 'ऋतो ङि०' (७।३।११० ) या शास्त्रामध्यें उपस्थित होते. त्यामुळें गुणाबरोबर रपरत्वाचाही अतिदेश होईल.

१४. कारण, शास्त्रातिदेश मानला म्हणजे ' तीं शास्त्रें कोणतीं' ही आकांक्षा उपस्थित झाली असतां प्रत्यक्ष तृच् शब्द ज्यामध्यें उच्चारिला आहे अशींच शास्त्रें शीघ्र उपस्थित होतील; उदा०—अप्तृन्तृच्०' ( ६।४।११ ) हे दीर्घविधायक शास्त्र.

१५. कारण, अनङ्, गुण, वगैरे कार्यें जरी तृजन्त शब्दाला होतात तरी त्यांना तृजन्तच शब्द पाहिजे असा आग्रह नाहीं.

१६. कारण, अनङ् वगैरे केल्याशिवाय दीर्घ करतां येत नाहीं.

तस्या दीर्घत्वं भविष्यति । नैकमुदाहरणं योगारम्भं प्रयोजयतीति । तत्र तृज्वद्वचनसामर्थ्यादेतेषु विधिषु कृतेषु योपधा तस्या दीर्घत्वं भविष्यति॥ अथवा किं न एतेनाहृत्यानाहृत्य वेति । आहृत्यानाहृत्य च तृचो यच्छास्त्रं तदतिदिश्यते ।।

अथवा पुनरस्तु रूपातिदेशः । अथैतस्मिन्रूपातिदेशे सति किं प्रागादेशेभ्यो यद्रूपं तदतिदिश्यत आहोस्वित्कृतेष्वादेशेषु । किंचातः । यदि प्रागादेशेभ्यो यद्रूपं तदतिदिश्यत ऋकार एकोऽतिदिष्टोऽनङ्गुणरपरत्वदीर्घत्वान्यनतिदिष्टानि । अथ कृतेष्वादेशेष्वृकारोऽनतिदिष्टोऽनङ्गुणरपरत्वदीर्घत्वान्यतिदिष्टानि । उभयथा च स्वरोऽनतिदिष्टो न हि स्वरो रूपवान् ॥ अस्तु प्रागादेशेभ्यो यद् रूपं तदतिदिश्यते । ननु चोक्तमृकारोऽतिदिष्टोऽनङ्गुणरपरत्वदीर्घत्वान्यनतिदिष्टानीति । नैष दोषः । ऋकारेऽतिदिष्टे स्वाश्रया

---

ओकार गुण[18] तो करून त्याला अवादेश केल्यावर अव् यांतील 'अ' ही जी उपधा तिला दीर्घ करावयाचा नाही ?

असें कोणी सांगितलें नाहीं हें खरें, पण अव् यांतील अला दीर्घ होतो असें म्हटलें तर तृज्वद्भाव सांगितल्याचा उपयोग एकाच ठिकाणीं[19] होईल; व एकटें उदाहरण आचार्य पाणिनींना 'तृज्वत्क्रोष्टुः' असें स्वतंत्र सूत्र बोलावयास प्रवृत्त करणार नाहीं[20]. तेव्हां असें निष्पन्नच होतें कीं ज्याअर्थी तृज्वद्भाव सांगितला आहे त्याअर्थी त्याचे जोरावर अनङ्, गुण आणि रपरत्व हीं कार्यें केल्यावर जी उपधा मिळेल तिलाच दीर्घ करावयाचा.

अथवा, मुद्दाम तृच् उच्चारून सांगितलेलीं, किंवा मुद्दाम उच्चार न करता सांगितलेलीं, असा विचार कशाला ? मुद्दाम सांगितलेलें असो किंवा तसें नसो, तृचाला होणारे जे विधी ते येथें होतात असा अर्थ करावा[21] म्हणजे कांहींच दोष येणार नाहीं.

अथवा रूपातिदेश पक्ष घ्या. कांहीं हरकत नाहीं.

बरें पण, तृचाचें रूप होतें असा हा रूपातिदेशपक्ष घेतल्यास तृचाला आदेश होण्याच्या पूर्वीचें जे रूप ते घ्यावयाचें अथवा आदेश केल्यानंतरचें ?

दोहोंत काय फरक ?

जर आदेश होण्यापूर्वीचें रूप होतें असें म्हटलें तर उकाराला एकटा ऋकारच अतिदिष्ट होईल, व त्याचे आदेश जे अनङ्, गुण, रपरत्व व दीर्घ ते अतिदिष्ट म्हणून घेतले जाणार नाहींत, व ते होणार नाहींत. जर आदेश झाल्यानंतरचें रूप होतें असें म्हटलें तर ऋकार अतिदिष्ट होणार नाहीं; अनङ्, गुण, रपरत्व व दीर्घ हीं अतिदिष्ट होतील; आणि दोन्ही तऱ्हा घेतल्या तरी स्वराचा अतिदेश होणार नाहींच; कारण स्वराला रूप नाहीं.

बरें तर, आदेश होण्यापूर्वीचें जें रूप त्याचाच अतिदेश करा.

पण वरच नाहीं कां दोष दिला कीं तसें म्हटल्यास ऋकारच अतिदिष्ट म्हटला जाईल, व अनङ्, गुण, रपरत्व व दीर्घ हीं अनतिदिष्ट राहतील म्हणून ?

हा दोष येत नाहीं. कारण उकाराला ऋकाराचा अतिदेश करून ऋकार केला म्हणजे अनङ्, गुण वगैरे विधींचा अतिदेश नकोच; ऋकाराचे स्थानीं ऋकाराला मानूनच हीं सगळीं

---

१८. क्रोष्टु शब्दाला प्रथमाबहुवचनाचा जस् प्रत्यय पुढें केला असतांना ' जसि च ' ( ७।३।१०९ ) या सूत्रानें गुण प्राप्त होतो.

१९. फक्त प्रथमाबहुवचनामध्यें.

२०. जरी अधुना ( ५।३।१७ ) इत्यादि कांहीं सूत्रें एकाच उदाहरणाकरितां पाणिनीनें केलीं आहेत, तरी सामान्य सूत्र एकच उदाहरण साधण्याकरितां कोठेंही केलेलें नाहीं.

२१. जर तृच् शब्द उच्चारून सांगितलेलींच कार्यें घ्यावीं तर कार्यांचा संकोच होतो; आणि कार्यांची व्याप्ति जितकी जास्त होईल तितकी करणें बरें. कारण, तसें केल्यानें अनेक उदाहरणें साधतात.

अत्रैते विधयो भविष्यन्ति । यदप्युच्यत उभयथा च स्वरोऽनतिदिष्टो न हि स्वरो रूपवानिति स चकारग्रहणसामर्थ्यात्स्वरो भविष्यति ॥

**रूपातिदेश इति चेत्सर्वादेशप्रसङ्गः ॥३॥**

रूपातिदेश इति चेत्सर्वादेशः प्राप्नोति । सर्वस्य तुनन्तस्य तृशब्द आदेशः प्राप्नोति ॥

**सिद्धं तु रूपातिदेशात् ॥ ४ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । रूपातिदेशात् । रूपातिदेशोऽयम् ॥ ननु चैवमेव कृत्वा चोद्यते रूपातिदेश इति चेत्सर्वादेशप्रसङ्ग इति ।

**सिद्धं तु प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादितदन्तविज्ञानात् ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स विहितस्तदादेस्तदन्तस्य च ग्रहणं भवतीत्येवं तुनन्तस्य तृजन्त आदेशो भविष्यति ॥ एवमपि किंचिदेव तृजन्तं प्राप्नोति । इदमपि प्राप्नोति पक्तेति ।

**आन्तरतम्याच्च सिद्धम् ॥ ६ ॥**

क्रोष्टोर्यदन्तरतमं तद्भविष्यति । किं पुनस्तत् । क्रुशेर्यस्तृज्विहितस्तदन्तम् ॥

**तृज्वद्वचनमनर्थकं तृज्विषये तृचो मृगवाचित्वात् ॥ ७ ॥**

तृज्विषय एतत्तृजन्तं मृगवाचि ॥ तुनो

---

कार्यें आपोआपच होतील. आतां दोन्ही तऱ्हा घेतल्या तरी स्वराचा अतिदेश होणार नाहींच, कारण स्वराला रूप नाहीं, असें जें वर म्हटलें आहे त्याला उत्तर येवढेंच की 'तृज्वत्' येथील तृच् येथें इत्संज्ञक चकार घातला आहे त्याचे जोरावर अन्तोदात्त स्वर होणारच; स्वर न झाल्यास चकार व्यर्थ होईल[२२].

( वा. ३ ) पण रूपातिदेशपक्ष घेतल्यास सर्वादेश होऊं लागेल, म्हणजे तुन् शेवटीं असलेला जो क्रोष्टु शब्द त्या सर्व शब्दाला तृ असा आदेश होईल.

( वा. ४ ) कांहीं अडचण न येतां काम भागतें.

तें कसें ?

रूपातिदेश घेतल्यानें. तृच् हा रूपातिदेश आहे.

पण रूपातिदेश आहे म्हणूनच ना वर शंका घेतली कीं 'रूपातिदेशपक्ष घेतल्यास सर्वादेश होऊं लागेल' ? तेव्हां त्यामुळेंच शंका व त्यामुळेंच उत्तर असें कसें होईल ?

( वा. ५ ) आम्ही म्हणतों आमचें काम झालें. ते कसें तर 'प्रत्यय उच्चारला असतां प्रत्यय ज्याला सांगितला त्याला आरंभ करून प्रत्यय शेवटीं असलेलें असें शब्दस्वरूप घ्यावयाचें' अशी परिभाषा असल्यामुळें तुन् शेवटीं असलेला जो क्रोष्टु शब्द त्याला तृच् शेवटीं असलेला असा आदेश होईल.

असें म्हटलें तर वाटेल तो तृच् प्रत्यय शेवटीं असलेला असा आदेश होईल; फार कशाला ? पक्तृ शब्दही आदेश होऊं लागेल. कारण पक्तृ शब्द हा तृजन्त आहे.

( वा. ६ ) वरची शंका बरोबर नाहीं. कारण क्रोष्टु शब्दाला जवळचें जें तृजन्त तें होईल, आणि तें कोणतें म्हटलें तर क्रुश् धातूहून तृच् प्रत्यय करून साधलेला क्रोष्टृ शब्द[२३].

( वा. ७ ) या तृज्वद्भावाविषयीं वास्तविक पाहिल्यास तृज्वद्भाव सांगावयासच नको. कारण तृच् प्रत्यय शेवटीं असलेल्या क्रोष्टृ शब्दाचाही कोल्हा हाच अर्थ आहे[२४].

पण तुन् प्रत्यय शेवटीं असलेल्या क्रोष्टु

---

२२. कारण, चकार हा 'चितः' ( ६।१।१६३ ) या सूत्रानें अन्त उदात्त होण्याकरितां घातला आहे. जर स्वराचा अतिदेश होणार नाहीं तर ' तृज्वत् ' याच्या ऐवजीं तृवत् असेंच पाणिनीनें म्हटलें असतें.

२३. क्रोष्टु शब्दाला पक्तृ वगैरे तृजन्त शब्दांपेक्षां क्रोष्टृ हा तृजन्त शब्द पुष्कळच जवळचा आहे. कारण त्यांतील वर्णही बरेच सारखे आहेत आणि अर्थ देखील त्यापासून सारखाच प्रतीत होतो.

२४. तेव्हां क्रोष्टु शब्दालाच क्रोष्टृ आदेश करून जीं क्रोष्टा क्रोष्टारौ अशीं रूपें पाणिनीनें साधलीं आहेत

निवृत्त्यर्थं तर्हीदं वक्तव्यम् । तुनः सर्वनामस्थाने निवृत्तिर्यथा स्यात् ।

**तुनो निवृत्त्यर्थमिति चेत्सिद्धं यथान्यत्रापि ॥ ८ ॥**

तुनो निवृत्त्यर्थमिति चेत्तदन्तरेण वचनं सिद्धं यथान्यत्राप्यविशेषविहिताः शब्दा नियतविषया दृश्यन्ते । कान्यत्र । तद्यथा । घरतिरस्मा अविशेषेणोपदिष्टः स घृतम् घृणा घर्म इत्येवंविषयः । रशिरस्मा अविशेषेणोपदिष्टः स राशिः रश्मिः रशनेत्येवंविषयः । लुशिरस्मा अविशेषेणोपदिष्टः स लोष्ट इत्येवंविषयः ॥ इदं तर्हि प्रयोजनं विभाषां वक्ष्यामीति । विभाषा तृतीयादिष्वचि [ ७. १. ९७ ] इति ।

**वावचनानर्थक्यं च स्वभावसिद्धत्वात् ॥ ९ ॥**

वावचनं चानर्थकम् । किं कारणम् । स्वभावसिद्धत्वात् । स्वभावत एव तृतीयादिष्वजादिषु विभक्तिषु तृजन्तं च तुनन्तं च मृगवाचीति ॥

---

शब्दाचा प्रयोग होऊं नये म्हणून तरी तृज्वद्भाव सांगावाच लागेल नो?[२५] उदाहरणार्थ, सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना तृन् प्रत्यय शेवटीं असलेल्या क्रोष्टु शब्दाचा प्रयोग होतां उपयोगाचा नाहीं.

( वा. ८) कांहीं ठिकाणीं तुन्–प्रत्ययान्ताचा प्रयोग मुळींच होऊं नये येवढेंच जर म्हणावयाचें असेल तर त्याकरितां निराळें वचन केल्याशिवायच काम होईल. ज्याप्रमाणें भाषेत इतर ठिकाणीं अमक्याच प्रयोगाकरितां म्हणून विवक्षित रीतीनें जरी धातू गृहीत धरले नसले तरी कांहीं धातूंचे कांहीं मोजकेच प्रयोग दिसतात, त्याप्रमाणें तुन्प्रत्ययान्त क्रोष्टु शब्दाचे कांहीं मोजकेच प्रयोग होतील. इतर ठिकाणीं म्हणजे कोठें, तर घृ धातु घ्या. आचार्य पाणिनींनी त्याचा उपदेश जरी सार्वत्रिक म्हणून केला असला तरी घृत, घृणा, घर्म येवढेच प्रयोग दिसतात;[२६] त्याचप्रमाणें रश्[२७] धातूचा उपदेश जरी सार्वत्रिक म्हणून केला असला तरी राशि, रश्मि, रशना, येवढेच प्रयोग दिसतात; तसेंच लुश् धातूचा जरी लोकांना सार्वत्रिक म्हणून उपदेश केला असला तरी प्रयोग फक्त लोष्ट येवढाच लोकांमध्यें दिसतो.

बरें तर, कांहीं विभक्तिप्रत्यय पुढें असतां, उदाहरणार्थ, 'विभाषा तृतीयादिष्वचि' या सूत्रानें, विल्कप सांगावयाचा आहे, तेव्हां तो विकल्प कोणाचा हें समजण्याकरिता तृज्वद्भाव सांगितला पाहिजे,[२८] असा उपयोग आचार्य पाणिनींच्या मनात असेल असें म्हणावें तर—

( वा. ९ ) तो विकल्प सांगण्याचीही जरूर नाहीं. काय म्हणून, तर साहजिक विकल्प घडूनच येत आहे. मुद्दाम सांगितल्याशिवायच स्वर प्रारंभीं असणाऱ्या तृतीया वगैरे विभक्ती पुढें असतांना तृजन्त व तुन्नन्त शब्दांचीं प्रत्येकाचीं एक अशीं दोन दोन रूपें होतीलच; व दोन्ही

---

तीं तशीं साधली नाहींत तरी हरकत नाहीं. कारण स्वतंत्र क्रोष्टृ शब्दाचीं तशीं रूपें होतील.

२५. म्हणजे तुन्प्रत्ययान्त क्रोष्टु शब्दाचा सर्वनामस्थानप्रत्यय पुढे असतांना प्रयोग होत नाहीं, फक्त त्या ठिकाणीं क्रोष्टृ या ऋकारान्त शब्दाचाच प्रयोग होतो असा नियम दाखविण्याकरतां 'तृज्वत् क्रोष्टुः' हें सूत्र पाहिजे. तसेंच, स्त्रीलिंगी फक्त ऋकारान्ताचा प्रयोग होतो, उकारान्त क्रोष्टु शब्दाचा प्रयोग होत नाहीं हें दाखविण्याकरतां ' स्त्रियां च ' हें सूत्र पाहिजे. तसेंच क्रोष्टु आणि क्रोष्टृ या दोन्ही शब्दाचा प्रयोग करणें झाल्यास तो फक्त अजादि तृतीया वगैरे विभक्ती पुढें असतानाच करावा, इतर ठिकाणीं दोहोंचा प्रयोग करूं नये हे दाखविण्याकरितां ' विभाषा तृतीयादिष्वचि ' हें सूत्र पाहिजे.

२६. तेव्हा घृ या धातूची घरति घरतः अशीं क्रियापदें होत नाहींत.

२७. रश् आणि लुप् हे धातु जरी पाणिनीनें धातुपाठामध्यें दिलेले नाहींत तरी ते येथें घ्यावे असें याच भाष्यावरून समजावें.

२८. म्हणजे पुढें अनुवृत्ति होण्याकरितां ' तृज्वत्क्रोष्टुः' हें सूत्र अवश्यच उच्चारिलें पाहिजे.

गुणवृद्ध्यौत्त्वतृज्वद्भावेभ्यो नुम्पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ १० ॥

गुणवृद्ध्यौत्त्वतृज्वद्भावेभ्यो नुम्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ तत्र गुणस्यावकाशः । अग्नये वायवे । नुमोऽवकाशः । त्रपुणी जतुनी । इहोभयं प्राप्नोति । त्रपुणे जतुने ॥ वृद्धेरवकाशः । सखायौ सखायः । नुमः स एव । इहोभयं प्राप्नोति । अतिसखीनि ब्राह्मणकुलानीति ॥ औत्त्वस्यावकाशः । अग्नौ वायौ । नुमः स एव । इहोभयं प्राप्नोति । त्रपुणि जतुनीति ॥ तृज्वद्भावस्यावकाशः । क्रोष्ट्रा क्रोष्टुना । नुमः स एव । इहोभयं प्राप्नोति कृशक्रोष्टुनेऽरण्याय । हितक्रोष्टुने वृषलकुलाय । नुम्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । इष्टवाची परशब्दः । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

नुमचिरतृज्वद्भावेभ्यो नुट् ॥ ११ ॥

नुमचिरतृज्वद्भावेभ्यो नुट् पूर्वविप्रतिषेधेन वक्तव्यः ॥ नुमोऽवकाशः । त्रपुणि जतुनि । नुटोऽवकाशः । अग्नीनाम् वायूनाम् । इहोभयं प्राप्नोति । त्रपूणाम् जतूनाम् ॥ अचि

---

शब्दांचा अर्थ एकच आहे.

( वा. १० ) गुण[२९], वृद्धि, औकारादेश व तृज्वद्भाव या सर्वांपेक्षां पूर्वविप्रतिषेधानें नुम् अगोदर होतो. पूर्वविप्रतिषेध पुढें लिहिल्याप्रमाणें:—

गुणाला नुमाची मुळींच प्राप्ति नाहीं अशीं उदाहरणें अग्नये, वायवे, वगैरे आहेत. नुमाला गुणाची प्राप्ति जेथें नाहीं अशीं उदाहरणें, त्रपुणी, जतुनी, वगैरे. त्रपुणे, जतुने, वगैरे उदाहरणांत गुण व नुम् दोन्ही येतात. तसेंच वृद्धीचीं उदाहरणें, सखायौ, सखायः, वगैरे. नुमाचीं उदाहरणें वर दिलेलींच. अतिसखीनि ब्राह्मणकुलानि येथें दोन्हीं कार्यें एकदम प्राप्त होतात. त्याचप्रमाणें औत्वाला जागा अग्नौ, वायौ, येथें मिळते. नुमाला जागा वर दाखवलेलीच. त्रपुणि, जतुनि, या ठिकाणीं दोन्ही एकदम प्राप्त होतात. अशाच रीतीनें तृज्वद्भावाला जागा क्रोष्ट्रा, क्रोष्टुना, येथें आहे. नुमाला जागा वर दाखविलेलीच. कृशक्रोष्टुने अरण्याय, हितक्रोष्टुने वृषलकुलाय, येथें दोन्ही एकदम येतात. तेव्हा प्रत्येक कार्याला स्वतंत्र जागा मिळत असून व नुमाला स्वतन्त्र जागा असून जेव्हां यांपैकीं कोणतेंही कार्य व नुम् एकदम येतात तेव्हां पूर्वविप्रतिषेधानें नुमागम होतो.

असें असेल तर पूर्वविप्रतिषेध बोलावयास पाहिजे.

बोलण्याचें कारण नाहीं. विप्रतिषेधे परं कार्यम्' (१।४।२) या सूत्रांत पर हा शब्द 'आपणांस जे हवें ते' या अर्थी घातला आहे, व दोन्ही कार्यांना निरनिराळी जागा मिळून एकाच ठिकाणीं दोन कार्यें केव्हां आलीं तर इष्ट असेल तें कार्य करावें.

( वा. ११ ) नुम्[३०] स्वर पुढें असतांना ऋला होणारा रेफादेश आणि तृज्वद्भाव यांपेक्षां अगोदर पूर्वविप्रतिषेधानें नुट् होतो असें बोलावें. त्रपुणि, जतुनि, वगैरे फक्त[३१] नुमाचींच उदाहरणें; अग्नीनाम्, वायूनाम्, हीं फक्त नुटाचींच उदाहरणें. त्रपूणाम्, जतूनाम्, या ठिकाणीं नुम् व

---

२९. ' घेर्ङिति ' (७।३।१११), ' अचो ञ्णिति ' (७।२।११५), ' अच्च घेः (७।३।११९), या सूत्रांनीं गुण, वृद्धि आणि औकार सांगितले आहेत. तृज्वद्भाव प्रकृत सूत्रानें सांगितला आहे आणि नुमागम ' इकोऽचि विभक्तौ ' ( ७।१।७३ ) या सूत्रानें सांगितला आहे.

३०. ' नपुंसकस्य झलचः ' ( ७।१।७२ ) आणि 'इकोऽचि'० (७।१।७३) या सूत्रांनीं नुम् सांगितला आहे. ' अचि र ऋतः ' ( ७।२।१०० ) या सूत्रानें तिसृ आणि चतसृ या शब्दांतील ऋकाराला रेफ आदेश सांगितला आहे. ' ह्रस्वनद्यापो नुट् ' ( ७।१।५४ ) या सूत्रानें नुडागम सांगितला आहे.

३१. म्हणजे येथें नुडागमाची प्राप्ति नाहीं.

रादेशस्यावकाशः । तिस्रस्तिष्ठन्ति चतस्रस्तिष्ठन्ति । नुटः स एव । इहोभयं प्राप्नोति । तिसृणाम् चतसृणाम् ॥ तृज्वद्भावस्यावकाशः । क्रोष्टा क्रोष्टुना । नुटः स एव । इहोभयं प्राप्नोति । क्रोष्टूनाम् । नुड् भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः ।

**न वा नुड्विषये रप्रतिषेधात् ॥१२॥**

न वैतद्विप्रतिषेधेनापि सिध्यति तिसृणाम् चतसृणामिति । कथं तर्हि सिध्यति । नुड्विषये रप्रतिषेधात् । नुड्विषये रप्रतिषेधो वक्तव्यः ।

**इतरथा हि सर्वापवादः ॥ १३ ॥**

इतरथा हि सर्वापवादो रादेशः । स यथैव गुणपूर्वसवर्णौ बाधत एवं नुटमपि बाधेत ॥

**तस्मान्नुड्विषये रप्रतिषेधः ॥ १४ ॥**

तस्मान्नुड्विषये रादेशस्य प्रतिषेधो वक्तव्यः ॥ न वक्तव्यः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न रादेशो नुटं बाधत इति यदयं न तिसृचतसृ [ ६. ४. ४ ] इति प्रतिषेधं शास्ति नामि दीर्घत्वस्य ॥

---

नुट् या दोहोंचीही एकदम प्राप्ति येते. त्याप्रमाणेंच स्वर पुढें असतांना होणाऱ्या रेफादेशाच्या जागा [३२]तिस्रस्तिष्ठन्ति, चतस्रस्तिष्ठन्ति, वगैरे आहेत. नुडागमाच्या वर दिल्याच आहेत. पण तिसृणाम्, चतसृणाम्, या ठिकाणीं रेफादेश व नुट् या दोहोंची प्राप्ति एकदम येते. तसेंच क्रोष्टा, क्रोष्टुना, या ठिकाणीं फक्त तृज्वद्भावाचीच जागा आहे. नुडागमाची जागा वर दाखविलीच आहे. क्रोष्टूनाम् या ठिकाणीं दोन्ही कार्यें प्रवृत्त होतात. तिन्ही ठिकाणीं नुडागम पूर्वविप्रतिषेधानें होतो.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगावा.

( वा. १२ ) सांगण्याची जरूर नाहीं. कारण, वास्तविक पाहतां पूर्वविप्रतिषेध सांगूनही तिसृणाम्, चतसृणाम्, येथें काम भागत नाहीं.

मग काय केलें असतां काम भागतें ?

नुडागमाची प्राप्ति असतां जर रेफादेशाही तेथें आला तर रेफाचा प्रतिषेध केल्यामुळें काम भागतें. नुडागमाचे वेळीं रेफाचा प्रतिषेधच बोलावा लागेल; कारण--

( वा. १३ ) तसें न बोलल्यास रेफादेश हा विशिष्ट सांगितल्यामुळें सर्व कार्यांचा अपवाद झालेला आहे व अपवाद झाल्यामुळें तो जसा गुण व पूर्वसवर्णदीर्घ यांचा बाध करतो त्याप्रमाणेंच नुटाचाही बाध करीलच.

( वा. १४ ) तेव्हां, एकंदरीत नुट् प्राप्त झाला असताना जर रेफादेशही तेथें येत असेल तर रेफादेश होत नाहीं असें म्हणावयास पाहिजे.

म्हणण्याचें कारण नाहीं. कारण नाम् पुढें असतांना प्राप्त झालेल्या दीर्घाचा ' न तिसृचतसृ० ' या सूत्रानें ज्या अर्थी निषेध सांगितला आहे त्या अर्थी रेफादेश हा नुडागमाचा बाध करीत नाहीं असें पाणिन्याचार्य [३३]सुचवितात.

---

३२. तिस्रः या बहुवचनामध्यें 'ऋतो ङि०' (७।३।११०) या सूत्रानें आलेल्या गुणाचा बाध करून रेफादेश होतो. तसाच त्या ठिकाणीं आणि द्वितीयाबहुवचनामध्येंही 'प्रथमयोः पूर्व०' ( ६।१।१०२ ) या सूत्रानें प्राप्त झालेल्या पूर्वसवर्णदीर्घाचा बाध करून ऋकाराला रेफादेश होतो, आणि तिस्रः असें रूप होतें.

३३. स्त्रीलिंगी त्रि शब्दाहून षष्ठीबहुवचनाचा आम् प्रत्यय केला असतां जर नुडागमाचा बाध करून रेफादेश होईल तर अर्थातच ' नामि ' ( ६।४।३ ) या सूत्रानें सांगितलेल्या दीर्घाची प्राप्तीच येत नाहीं. तेव्हां ' न तिसृ० ' ( ६।४।४ ) हें सूत्र व्यर्थ होईल. याच ज्ञापकावरून जसा नुडागम रेफादेशाचा बाध करितो तसा आपल्या विषयामध्यें प्राप्त झालेल्या नुमागमाचा आणि तृज्वद्भावाचाही बाध करील. तेव्हां 'नुमचिर०' या पूर्वविप्रतिषेधाची जरूर नाहीं. अथवा नुम् आणि तृज्वद्भाव यांविषयीं 'विप्रतिषेधे परं कार्यम्' ( १।४।२ ) या सूत्रानें परशब्द इष्टवाची घेऊन त्याच्या पूर्वी नुडागम अगोदर होतो अशा तऱ्हेनेंही तीं रूपें साधतां येतील.

**[विभाषा तृतीयादिष्वचि ॥९७॥]**

**चतुरनडुहोरामुदात्तः ॥७।१।९८॥**

**आमनडुहः स्त्रियां वा ॥ १ ॥**

**आमनडुहः स्त्रियां वेति वक्तव्यम् । अनडुही अनड्वाही ॥**

**[ अम् संबुद्धौ ॥ ७ । १ । ९९ ॥ ]**

**ॠत इद्धातोः ॥ ७ । १ । १०० ॥**

**उपधायाश्च ॥ ७ । १ । १०१ ॥**

**उदोष्ठ्यपूर्वस्य ॥ ७ । १ । १०२ ॥**

इत्त्वोत्त्वाभ्यां गुणवृद्धी भवतो विप्रतिषेधेन । इत्त्वोत्त्वयोरवकाशः । आस्तीर्णम् निपूर्ताः पिण्डाः । गुणवृद्ध्योरवकाशः । चयनम् चायकः । लवनम् लावकः । इहोभयं प्राप्नोति । आस्तरणम् आस्तारकः । निपरणम् निपारकः । गुणवृद्धी भवतो विप्रतिषेधेन ॥ अयुक्तोऽयं विप्रतिषेधो योऽयं गुणस्येत्त्वो-

---

( सू. ९८, वा. १ ) अनडुह् शब्दाला स्त्रीलिंगाची विवक्षा असतांना आम् विकल्पानें होतो, असें बोलावें. उदा० अनडुही, अनड्वाही.

( सू. १००–१०२ ) इत्व आणि उत्व यांपेक्षां पूर्वविप्रतिषेधानें गुण व वृद्धि अगोदर होतात. आस्तीर्णम्, निपूर्ताः पिण्डाः, या ठिकाणीं इकारादेश व उकारादेश यांना जागा आहे; चयनं चायकः, लवनं लावकः, या ठिकाणीं गुण व वृद्धि यांना स्पष्ट जागा मिळते; आस्तारणम् आस्तारकः, निपरणम् निपारकः, या ठिकाणीं दोन्ही कार्यांची एकदम प्राप्ती येते, व तसें झालें असता गुण व वृद्धि हीं कार्यें विप्रतिषेधानें होतात.

हा गुण व इकारोकारादेश यांचा विप्रतिषेध सांगणें योग्य नाहीं.

---

१. ( सू. ९७ ) स्वराला आरंभ करून असलेली तृतीयादि विभक्ति पुढें असतांना क्रोष्टु शब्दाला क्रोष्टृ असा आदेश विकल्पानें होतो: उ० क्रोष्ट्रा, क्रोष्टुना.

१. ( सू. ९८ ) चतुर् आणि अनडुह् या शब्दांना सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांना आम् असा आगम होतो; आणि तो आम् याचा आकार उदात्त होतो. आम् यांतील मकार इत्संज्ञक आहे. त्यामुळें 'मिदचोऽन्त्यात्०' ( १।१।४७ ) या परिभाषेनें चतुर् आणि अनडुह् या शब्दांतील शेवटचा अच् जो उकार त्याच्या पुढें हा आमागम म्हणजे आ असा होतो; उदा० चत्वारः, अनड्वान्.

२. स्त्रीलिंगामध्यें अनडुह् शब्दाहून 'षिद्गौरादिभ्यश्च' ( ४।१।४१ ) या सूत्रानें ङीष् प्रत्यय होतो. तेथें या प्रकृत वार्तिकानें आमागम विकल्पानें होऊन अनडुही आणि अनड्वाही अशीं रूपें होतात.

१. (सू. ९९) चतुर् आणि अनडुह् या शब्दांना संबुद्धिप्रत्यय पुढें असतांना अम् असा आगम होतो. याचाही मकार इत्संज्ञक आहे. त्यामुळें उकाराच्या पुढेंच हा आगम होतो. हा आगम पूर्व सूत्रानें सांगितलेल्या आमागमाचा बाधक आहे; उदा० हे प्रियचत्वः, हे अनड्वन्.

१. (सू. १००) अङ्गसंज्ञक जो दीर्घॠकारान्त धातु त्यातील ॠकाराला ऱ्हस्व इकार आदेश होतो. हा इकार आदेश 'उरण् रपरः' ( १।१।५१ ) या सूत्रानें रपर होऊन इर् असा होतो; उदा०–किरति, गिरति.

१. ( सू. १०१ ) अङ्गसंज्ञक धातूच्या उपधेला असणारा जो दीर्घ ॠकार त्याला ऱ्हस्व इकार होतो. हाही पूर्वींप्रमाणें रपर होऊन इर् असा होतो; उदा०–कीर्तयति, कीर्तयनः, कीर्तयन्ति.

१. ( सू. १०२ ) अङ्गसंज्ञक धातूमध्यें असणाऱ्या अशा ज्या दीर्घ ॠकाराच्या पूर्वी प्, फ्, वगैरे ओष्ठस्थानचा वर्ण असेल त्या दीर्घ ॠकाराला ऱ्हस्व उकार आदेश होतो. हा उकारही रपर होऊन उर् असा होतो; उदा०–निपूर्ताः पिण्डाः, पुपूर्षति, मुमूर्षति.

२. आस्तीर्णः वगैरे उदाहरणांमध्यें स्तॄ वगैरे धातूंहून केलेला क्त हा प्रत्यय कित् असल्यामुळें तेथें 'क्ङिति च' (१।१।५) या सूत्रानें गुणाचा निषेध होत आहे, व ञित् किंवा णित् प्रत्यय नसल्यामुळें वृद्धीची प्राप्तीच येत नाहीं. म्हणून येथें इत्त्व आणि उत्त्व यांना गुणवृद्धींशिवाय जागा मिळते.

३. पॄ आणि स्तॄ या धातूंहून ल्युट् प्रत्यय, व त्याला अन आदेश केला आहे. येथें उत्त्व आणि इत्त्व यांचा 'सार्वधातुकार्ध०'(७।३।८४) या गुणानें परत्वास्तव बाध होतो. तसेंच पॄ आणि स्तॄ या धातूंहून ण्वुल् प्रत्यय

त्त्वयोश्च । कथम् । नित्यो गुणः ॥

[ बहुलं छन्दसि ॥ ७।१।१०३ ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये सप्तमस्याध्यायस्य प्रथमे पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

तो काय म्हणून ?

सारख्या दर्जाच्या कार्यांमध्यें विप्रतिषेधाचा विचार करावयाचा असतो. पण येथें दोन्ही कार्यांचा दर्जा सारखा नाहीं; गुण नित्य आहे.

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सातव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें; व पहिला पाद समाप्त झाला.

---

व त्याला अक हा आदेश केला असतां इत्त्व आणि उत्त्व यांचा बाध करून 'अचो ञ्णिति' या सूत्रानें वृद्धि होते.

४. तेव्हां इत्त्व आणि उत्त्व यांचा गुणानें आणि वृद्धीनें नित्यत्वास्तव बाध होतो, असेंच म्हणणें योग्य आहे. तेव्हां हें परत्वाचें उदाहरण आहे असें समजूं नये. आतां वरील उदाहरणांमध्यें इत्त्व व उत्त्व करण्याच्या पूर्वी 'सार्वधातुका०' (७।३।८४) या सूत्रानें गुण प्राप्त होतो; आणि इत्त्व किंवा उत्त्व केल्यानंतर 'पुगन्त०' (७।३।८६) या सूत्रानें सांगितलेला गुण प्राप्त होतो. तेव्हां जरी भिन्न सूत्रांनीं गुणाची प्राप्ति येते तरी गुणाची प्राप्ति आहे एवढ्याच गोष्टीकडे लक्ष देऊन येथें गुणाला नित्यत्व आहे असें म्हटलें आहे.

१. (सू. १०३) वेदामध्यें अंगसंज्ञक धातूमधील दीर्घ ॠकाराला प, फ, वगैरे ओष्ठस्थानचा वर्ण मागें नसतानाही ऱ्हस्व उकार आदेश होतो; तसेंच कांहीं ठिकाणीं प, फ, वगैरे ओष्ठस्थानचा वर्ण मागें असूनही उकार होत नाहीं; उ० 'मित्रावरुणौ ततुरिः,' 'पप्रितमम्.'

अ. ७ पा. १ समाप्त.

**सिचि वृद्धिः परस्मैपदेषु ॥७।२।१॥**

**सिचि वृद्धावोकारप्रतिषेधः ॥ १ ॥**

सिचि वृद्धावोकारस्य प्रतिषेधो वक्तव्यः । उदवोढाम् उदवोढम् उदवोढेति ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । ओकाराद् वृद्धिर्विप्रतिषेधेन । ओत्त्वं क्रियतां वृद्धिरिति वृद्धिर्भविष्यति विप्रतिषेधेन ॥

**ओकाराद् वृद्धिर्विप्रतिषेधेनेति चेदोत्त्वाभावः ॥ २ ॥**

ओकाराद् वृद्धिर्विप्रतिषेधेनेति चेदोत्त्वस्याभावः । उदवोढाम् उदवोढम् उदवोढेति ॥ नैष दोषः । उक्तं तत्र वर्णग्रहणस्य प्रयोजनं वृद्धावपि कृतायामोत्वं यथा स्यात् ॥

**पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धम्**

अथवा पुनःप्रसङ्गादत्र वृद्धौ कृतायामोत्त्वं भविष्यति ।

**यथा प्रसारणादिषु द्विर्वचनम् ॥ ३ ॥**

तद्यथा । जग्ले मम्ले ईजतुः ईजुरिति प्रसारणादिषु पुनःप्रसङ्गविज्ञानाद् द्विर्वचनं भवति ॥ इहापि तर्हि पुनःप्रसङ्गविज्ञानादोत्त्वं स्यात् सौढामित्रिरिति ।

**सौढामित्रौ बहिरङ्गलक्षणत्वात्सिद्धम् ॥४॥**

बहिरङ्गलक्षणा वृद्धिः । अन्तरङ्गमोत्त्वम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

---

( सू. १, वा. १ ) सिच् पुढें असतांना ही जी वृद्धि सांगितली आहे ती ओकाराला होत नाहीं असा निषेध सांगणें जरूर आहे; उदाहरणार्थ उदवोढाम्[2], उदवोढम्, उदवोढ, वगैरे ठिकाणीं.

तर मग तसा निषेध सांगावा.

सांगण्याची जरूर नाहीं. कारण ओकार करावा किंवा वृद्धि करावी असा विचार केला असतां ओकार व्हावयाचे पूर्वीच पूर्वविप्रतिषेधानें वृद्धि होईल.

( वा. २ ) पण ओकार व्हावयाचे पूर्वी पूर्वविप्रतिषेधानें वृद्धि होईल असें म्हटलें तर ओकार आदेश होण्यास पंचाईत पडेल. उदवोढाम् उदवोढम्, उदवोढ, या ठिकाणीं अजीबाद ओ आदेश होणारच नाहीं, व उदवाढाम्, उदवाढम्, उदवाढ, अशीं भलतींच रूपें होतील.

ही अडचण येत नाहीं. त्या सूत्राचें ( ६।३।११२ ) स्पष्टीकरण करतांना सांगितलें आहे कीं त्या सूत्रांत ‘ अवर्णस्य ’ येथें वर्णशब्द घातला आहे त्याचे विशेष कारण हें कीं वृद्धि केल्यावर सुद्धां ओकार व्हावा. अथवा—

( वा. ३ ) ‘ पुनःप्रसंगामुळें ’ म्हणजे वृद्धि केल्यानंतर सुद्धां पुन्हां ओकारादेशाची प्राप्ति आल्यामुळें ज्याप्रमाणें संप्रसारण वगैरे कार्यें झाल्यावर पुन्हां प्राप्ति आल्यामुळें द्वित्व होतें, त्याप्रमाणेंच येथे ओकारादेश होईलच. जग्ले, मम्ले, ईजतुः, ईजुः, या ठिकाणीं संप्रसारण वगैरे कार्यें झाल्यानंतर पुन्हा द्वित्वाची प्राप्ति येते व द्वित्व होतें.

पण असें म्हटलें तर ‘ सौढामित्रिः ’[3] या ठिकाणीं सुद्धां पुन्हां प्राप्ति येते म्हणून वृद्धि झाल्यावर ओकारादेश होईल, व सोढामित्रिः असें भलतेंच रूप होईल.

( वा. ४ ) सौढामित्रि या उदाहरणामध्यें दोष येत नाहीं. कारण, तेथें वृद्धि बहिरंग आहे; व ओकार अन्तरंग आहे. तेव्हां ‘ अतरंग कार्य करावयाचें असतां बहिरंग कार्य असिद्ध होतें ’ अशी परिभाषा असल्यामुळें पुनः ओकार होणार नाहीं.

---

१. (सू. १) ज्याच्या पुढे परस्मैपद आहे असा सिच् प्रत्यय पुढें असतांना मागील अंगाच्या शेवटी असलेल्या इकाला वृद्धि होते; उदाहरणार्थ– अचैषीत्, अजैषीत्.

२. वह् धातूहून लुङ्, तस्, ताम्, च्लि ( ३।१।४३ ), सिच् (३।१।४४), सिचाचा लोप (८।२।२६), ढत्व (८।२।३१), धत्व (८।२।४०), ष्टुत्व (८।४।४१), ढकाराचा लोप (८।३।१३) आणि ओत्त्व (६।३।११०) ही कार्यें झालीं आहेत. येथें ओकाराला ‘ वदव्रज० ’ या पुढील सूत्रानें वृद्धि प्राप्त झाली आहे.

३. सह् या धातूहून क्त प्रत्यय करून सोढ शब्द सिद्ध होतो. त्याचा अमित्र शब्दाबरोबर बहुव्रीहि समास करून त्याच्यापुढें इञ् प्रत्यय (४।१।९५) आणि आदि-

## अतो ल्रान्तस्य ॥ ७।२।२ ॥[1]

अन्तग्रहणं किमर्थं नातो ल्र इत्येवोच्येत। केनेदानीं तदन्तस्य भविष्यति। तदन्तविधिना॥ इदं तर्हि प्रयोजनम्। अयमन्तशब्दोऽस्त्येवावयववाची। तद्यथा। वस्त्रान्तः वसनान्तः। अस्ति सामीप्ये वर्तते। तद्यथा। उदकान्तं गतः। उदकसमीपं गत इति गम्यते। तद्यः सामीप्ये वर्तते तस्येदं ग्रहणं यथा विज्ञायेत। अङ्गान्तौ यौ रेफलकारौ तयोः समीपे योऽकारस्तस्य यथा स्यात्। इह मा भूत्। अश्वलीत् अवभ्रीत्॥

## वदव्रजहलन्तस्याचः ॥ ७।२।३ ॥[1]

हल्ग्रहणं किमर्थम्। समुच्चयो यथा विज्ञायेत। वदिव्रज्योश्च हलन्तस्य चाच इति। नैतदस्ति प्रयोजनम्। अज्ग्रहणादेवात्र समुच्चयो भविष्यति। वदिव्रज्योश्चाचश्चेति। अस्त्यन्यदज्ग्रहणे प्रयोजनं वदिव्रजिविशेषणं यथा विज्ञायेत। वदिव्रज्योरच इति। यद्येतावत्प्रयोजनम् स्याद्वदिव्रज्योरत इत्येवं ब्रूयात्। अथवैतदपि न ब्रूयात्। अत इति वर्तते॥ इदं तर्हि प्रयोजनं हलन्तस्य यथा

---

(सू. २) या ठिकाणीं अन्तशब्दाचा काय उपयोग आहे? 'अतो ल्रः' असें सूत्र करून नाहीं का भागावयाचें?

पण 'अतो ल्रः' असें सूत्र केल्यास लकार किंवा रेफ शेवटीं असलेल्या अंगाला वृद्धि कशी होईल?

वृद्धि होण्यास काहीं हरकत येणार नाहीं; तदन्तविधीनें (१।१।७२) अशा अंगाला वृद्धि होईलच.

बरें तर, पुढील उपयोग देण्यांत येईल. 'अन्त' हा शब्द अवयव या अर्थींही आहेच; उदाहरणार्थ वस्त्रान्तः[2], वसनान्तः. 'सामीप्य' या अर्थींही आहेच; उदाहरणार्थ 'उदकान्तं गतः' असें म्हटलें म्हणजे उदकाच्या जवळ गेला असा अर्थ मनांत येतो. तेव्हां 'जवळचा भाग' या अर्थी असलेला जो अन्तशब्द तो येथें घातला आहे असें समजावें म्हणजे अंगाच्या शेवटीं असणारा जो रेफ किंवा लकार त्याच्या जवळचा जो अकार त्यालाच वृद्धि होईल व अश्वलीत्, अवभ्रीत्, या ठिकाणचा जो अकार त्याला वृद्धि होणार नाही.

(सू. ३) या ठिकाणीं हल् शब्द कशाकरितां घातला आहे?

सगळ्यानाच वृद्धि व्हावी असें समजावें म्हणून. स्पष्ट म्हणावयाचें म्हणजे वद् धातु, व्रज धातु व हलन्त धातु या सर्वांच्या अचाला वृद्धि व्हावी याकरितां.

हा उपयोग देतां येत नाहीं. कारण अच् शब्द घातल्यानेंच सगळ्यांना वृद्धि होईल: वद्, व्रज्, यांचा अकार, व कोणत्याही धातूचा जो अच् यांना वृद्धि होते असा अर्थ होईल.

अच् शब्दाचा वरतीं दिलेला अर्थ करण्याकरिता उपयोग करावयाचा नाहीं. अच् शब्द येथें घालण्याचा दुसरा उपयोग आहे. अच् शब्दाचा 'वदव्रज' या शब्दाकडे संबंध होईल आणि वद् व व्रज् यांचा जो अच् त्याला वृद्धि होते असा अर्थ होईल.

जर एवढाच उपयोग असेल तर अचः हें पद कशाला घालावयास पाहिजे? अचः या पदाच्या ऐवजीं अर्थलाघव असलेलें 'अतः' पद घालून 'वदिव्रज्योरतः' असेंच सूत्र बोलावें. अथवा असेंही बोलण्याची जरूर नाहीं. कारण मागील सूत्रांतून 'अतः' हें पद या सूत्रांत येतच आहे.

बरें, तर मग, 'हल्' या पदाचा उपयोग हलन्त धातूच्याच अचाला वृद्धि व्हावी, अजन्त

---

वृद्धि (७।२।११७) झाली आहे.

१. (सू. २) ऱ्हस्व अकाराच्या जवळ असलेले जे लकार किंवा रेफ तदन्त अंगांतील ऱ्हस्व अकाराला परस्मैपदपरक सिच् प्रत्यय पुढें असतांना वृद्धि होते, उदा० अज्वालीत्, अक्षारीत्.

२. वस्त्राचा शेवटचा भाग (पदर).

१. (सू. ३) वद् आणि व्रज् हे दोन धातू आणि हलन्त अंग यांतील अचाला परस्मैपदपरक सिच् प्रत्यय पुढें असतांना वृद्धि होते; उदा० अवादीत्, अव्राजीत्, अपाक्षीत्.

स्यादजन्तस्य मा भूत्। कस्य पुनरजन्तस्य प्राप्नोति। अकारस्य। अचिकीर्षीत् अजिहीर्षीत्। लोपोऽत्र बाधको भविष्यति। आकारस्य तर्हि प्राप्नोति। अयासीत् अवासीत्। नास्त्यत्र विशेषः सत्यां वा वृद्धावसत्यां वा। संध्यक्षरस्य तर्हि प्राप्नोति। न वै संध्यक्षरमन्त्यमस्ति। ननु चेदमस्ति ढलोपे कृत उदवोढाम् उदवोढम् उदवोढेति। असिद्धो ढलोपस्तस्यासिद्धत्वान्नैतदन्त्यं भवति॥ अत उत्तरं पठति।

**हल्ग्रहणमिटि प्रतिषेधार्थम्॥ १॥**

हल्ग्रहणं क्रियत इटि प्रतिषेधार्थम्। नेटि [७. २. ४] इति प्रतिषेधं वक्ष्यति स हलन्तस्य यथा स्यादजन्तस्य मा भूत्। अलावीत् अपावीत्॥

**न वानन्तरस्य प्रतिषेधात्॥ २॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति। किं कारणम्। अनन्तरस्य प्रतिषेधात्। अनन्तरं यद् वृद्धिविधानं तत्प्रतिषिध्यते। कुत एतत्। अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति॥

**तच्चानन्त्यार्थम्॥ ३॥**

तच्चानन्तरं वृद्धिविधानमनन्त्यार्थं विज्ञायते॥ कथं पुनरनन्तरं वृद्धिविधानमनन्त्यार्थं शक्यं विज्ञातुम्।

---

धातूच्या अचाला होऊं नये, असा सांगू.

पण कोणत्या अजन्त अंगाला वृद्धि प्राप्त होते?

अकाराला; उदाहरणार्थ अचिकीर्षीत्[१] या ठिकाणीं.

पण येथें ' अतो लोपः ' ( ६।४।४८ ) या सूत्रानें सांगितलेला अकाराचा लोप वृद्धीचा बाध करील.

'आ'काराला वृद्धि होईल; उदाहरणार्थ—अयासीत्, अवासीत्.

कांहीं हरकत नाहीं. कारण येथें वृद्धि केली काय किंवा न केली काय, कांहीं फरक होत नाहीं.

बरें तर, संयुक्त स्वराला वृद्धि होऊं लागेल.

पण धातूच्या शेवटीं संध्यक्षर म्हणजे संयुक्त स्वर मिळत नाहीं.

कां बरें, ढकाराचा लोप केल्यावर उदवोढाम्, उदवोढम्, उदवोढ, या ठिकाणीं संयुक्त स्वर मिळतो.

असें म्हणतां येत नाहीं. कारण, ओकाराच्या पुढील ढकाराचा झालेला लोप वृद्धि सांगणाऱ्या सूत्राला दिसत नाहीं ( ८।२।१ ). त्यामुळें वृद्धि करूं लागल्यास ओकार शेवटीं मिळत नाहीं.

या सर्व गोष्टी विचारांत घेऊन उत्तरादाखल वार्तिककार वार्तिक लिहितात:

( वा. १ ) प्रस्तुत सूत्रांत हल् शब्द घातला आहे; कारण इडागम लावलेला सिच् पुढें असतांना प्रतिषेध व्हावा म्हणून. थोडक्यांत सांगावयाचें म्हटल्यास ' नेटि ' या सूत्रानें वृद्धीचा जो प्रतिषेध पुढें सांगण्यांत येणार आहे तो हलन्त अंगाविषयींच व्हावा, अजन्त अंगाविषयीं होऊं नये, व अलावीत्, अपावीत्, या ठिकाणीं प्रतिषेध न झाल्यामुळें वृद्धि व्हावी, हा उपयोग देण्यांत येईल.

( वा. २ ) अथवा, हा उपयोग देतां येणार नाहीं. कारण काय, तर जवळच्या सूत्राचा निषेध होतो म्हणून. वृद्धि सांगणारें सर्वांत जवळचें जे सूत्र त्याचा ' नेटि ' हें सूत्र निषेध करील.

असें काय म्हणून?

विधि काय किंवा निषेध काय, ज्यास्ती जवळचें जे सूत्र आहे त्याचाच विधि किंवा निषेध होतो, अशी परिभाषा आहे म्हणून.

( वा. ३ ) आणि जवळच्या सूत्रानें जी वृद्धि सांगितली आहे ती शेवटच्या वर्णाला सांगितलेली नव्हे, तर शेवटच्या वर्णाच्या अगोदर असलेल्या वर्णाला सांगितलेली आहे.

पण ती जवळच्या सूत्रानें सांगितलेली वृद्धि शेवटच्या वर्णाच्या अगोदर असलेल्या वर्णाला सांगितलेली आहे हें कशावरून समजतें?

---

१ कृ धातूहून सन् प्रत्यय करून चिकीर्ष हा सन्नन्त धातु तयार होतो; त्याहून लुङ् प्रत्यय येथें केला आहे.

**अन्त्यस्य वचनानर्थक्यात् ॥ ४ ॥**

अन्त्यस्य वृद्धिविधाने प्रयोजनं नास्तीति कृत्वानन्तरं वृद्धिविधानमनन्त्यार्थं विज्ञायते ॥

अतो विभाषार्थं तर्हीदं वक्तव्यम्। अतो हलादेर्लघोः [७. २. ७] इति विभाषा वृद्धिं वक्ष्यति सा हलन्तस्य यथा स्यादजन्तस्य मा भूत। अचिकीर्षीत् अजिहीर्षीत्।

**अतो विभाषार्थमिति चेत्सिद्धं वृद्धेर्लोपबलीयस्त्वात् ॥ ५ ॥**

अतो विभाषार्थमिति चेत्तदन्तरेणापि हल्ग्रहणं सिद्धम्। कथम्। वृद्धेर्लोपबलीयस्त्वात्। वृद्धेर्लोपो बलीयान्भवतीति। इदमिह संप्रधार्यम्। वृद्धिः क्रियतां लोप इति किमत्र कर्तव्यम्। परत्वाद् वृद्धिः। नित्यो लोपः। कृतायामपि वृद्धौ प्राप्नोत्यकृतायामपि। अनित्यो लोपो न हि कृतायां वृद्धौ प्राप्नोति। परत्वात्सगिड्भ्यां भवितव्यम्। नात्र सगिटौ प्राप्नुतः। किं कारणम्।

**एकाचस्तौ वलीति वा।**

एकाचः सगिटावुच्येते अथवा वलीति तत्रानुवर्तते। किं पुनः कारणमेकाचस्तौ वलीति वा। दरिद्रातेर्मा भूदिति। दरिद्रातेर्न सगिड्भ्यां भवितव्यम्। उक्तमेतद्दरिद्रातेरार्धधातुके लोपः सिद्धश्च प्रत्ययविधाविति।

---

( वा. ४ ) शेवटच्या वर्णाला वृद्धि सांगणें निरुपयोगी आहे म्हणून. शेवटच्या वर्णाला वृद्धि सांगणें निरर्थक आहे म्हणून नेटि निषेधाच्या जवळच्या सूत्रानें सांगितलेली जी वृद्धि ती शेवटच्या वर्णाच्या पूर्वीच्या वर्णाला होते असें समजतें.

तर मग, प्रस्तुत सूत्रांतील हल् शब्दाचा उपयोग ' अतो हलादेर्लघोः ' या सूत्रानें सांगितली जाणारी जी वैकल्पिक वृद्धि ती व्यंजनान्त धातूला व्हावी, स्वरान्त धातूला होऊं नये, असा आहे असें सांगण्यांत येईल; उदाहरणार्थ— अचिकीर्षीत्, अजिहीर्षीत्, हीं रूपें पहा.

( वा. ५ ) 'अतो हलादेर्लघोः' या वैकल्पिक वृद्धीविषयीं ' हल् ' पदाचा उपयोग होईल असें म्हणाल तर तसें नाहीं. कारण 'अतो हलादेः ०' या सूत्रांत हल् शब्द न घेतां सुद्धा हल् पदानें होणारें काम साधतेंच साधतें. तें कसें तर वृद्धीपेक्षां लोप हा ज्यास्ती प्रबळ आहे म्हणून. वृद्धीपेक्षां लोप ज्यास्ती प्रबळ आहे. कारण काय तर येथें पुढें दिल्याप्रमाणें विचार करावाः प्रथम येथें वृद्धि करावी किंवा लोप करावा, काय करावें? पर सूत्रानें सांगितली आहे म्हणून वृद्धि करावी असें म्हणाल तर तसें नाहीं. कारण लोप हा नित्य आहे, वृद्धि केल्यावरही त्याची प्राप्ति आहे तशीच करण्याचे पूर्वीही त्याची प्राप्ति आहे.

लोप नित्य नाहीं; कारण वृद्धी केल्यावर त्याची प्राप्ति येत नाहीं. वृद्धि केल्यावर लोप सांगणाऱ्या सूत्राचा परत्वास्तव बाध करून लोप न होतां सक् व इट् हे आगम ( ७।२।७३ ) होतील.

सक् व इट् हे आगम येथें प्राप्त होत नाहींत. तें काय म्हणून ?

कारण कीं ते सक् व इट् हे आगम एकच स्वर ज्या धातूंत आहे त्याच धातूंना सांगितले आहेत. किंवा वलि या पदाची येथें अनुवृत्ति येते. कोणतेंही कारण घ्या, अचिकीर्षीत् व अजिहीर्षीत्, या उदाहरणांमध्यें जरी वृद्धि केली तरी तेथें सक् व इट् हे आगम होणार नाहींत.

पण सक् व इट् हे आगम एक स्वर असलेल्या धातूंना होतात, किंवा वल् पुढें असतांना होतात, असें म्हणण्याचें काय कारण ?

दरिद्रा या धातूला सक् व इट् होऊं नयेत म्हणून.

पण मागें ( ६।४।११४ वा. १ ) सांगितलेंच आहे कीं आर्धधातुक पुढें असतांना दरिद्रा धातूच्या 'आ'काराचा लोप होतो व आर्धधातुके ही विषयसप्तमी असल्यामुळें आर्धधातुक प्रत्यय लागण्याचे पूर्वींच ' आ'काराचा लोप

---

१. आतो लोप इटि च ( ६।४।६४ ) या सूत्रानें लोप प्राप्त होतो.

यश्चेदानीं प्रत्ययविधौ सिद्धः सिद्धोऽसौ सगिड्विधौ । एवमर्थमेव तर्ह्येकाज्ग्रहणमनुवर्त्यमत्र सगिटौ मा भूतामिति । स एष नित्यो लोपो वृद्धिं बाधिष्यते ॥ कं पुनर्भवान्वृद्धेरवकाशं मत्वाह नित्यो लोप इति । अनवकाशा वृद्धिर्लोपं बाधिष्यते । सावकाशा वृद्धिः । कोऽवकाशः । अनन्त्यः । अकणीत् अकाणीत् । कथं पुनः सत्यन्त्येऽनन्त्यस्य वृद्धिः स्यात् । भवेद्योऽताङ्गं विशेषयेत्तस्यानन्त्यस्य न स्यात् । वयं तु खल्वङ्गेनाकारं विशेषयिष्यामः । तत्रानन्त्यो वृद्धेरवकाशोऽन्त्यस्य लोपो बाधको भविष्यति ॥ एवं वृद्धेर्लोपबलीयस्त्वात् । अथवारभ्यते पूर्वविप्रतिषेधो ण्यल्लोपावियङ्यण्गुणवृद्धिदीर्घत्वेभ्यः पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ सा तर्ह्येषानन्त्यार्था वृद्धिर्हलन्तस्य यथा स्यादजन्तस्य मा भूत् । अपिपठिषीत् । एतदपि नास्ति प्रयोजनम् । कथम् । हलादेरिति नैषा बहुव्रीहेः षष्ठी । हलादिर्यस्य सोऽयं हलादिः हलादेरिति । का तर्हि । कर्मधारयात्पञ्चमी । हलादिर्हलादिः हलादेः परस्येति । यदि कर्म-

---

होऊन जातो, व येथेंही तसाच होईल. तेव्हां दरिद्रा या धातूला सक् व इट् होऊं नयेत याबद्दल कोणतीही खटपट करण्याचें कारण नाहीं.

बरें तर, प्रस्तुत अचिकीर्षीत् व अजिहीर्षीत्, या उदाहरणाकरितांच म्हणजे या उदाहरणांत सक् व इट् होऊं नयेत म्हणून ' यमरमनमातां सक् च' या सूत्रांत 'एकाच्' या पदाची अनुवृत्ति करावयास पाहिजे. तेव्हां, एकदरींत लोप नित्य असल्यामुळें वृद्धीचा बाध करील.

पण लोप नित्य आहे असें जें आपण विधान करतां तें वृद्धीला कोणती जागा देऊन विधान करितां ? वृद्धीला स्वतन्त्र जागा देता येत नसल्यामुळें वृद्धि अनवकाश होऊन लोपाचा बाध करील.

वृद्धीला जागा आहे.

कोणती जागा आहे ?

शेवटच्या वर्णाच्या अलीकडील स्वराची; उदाहरणार्थ अकणीत्, अकाणीत्.

पण शेवटचा वर्ण स्वर मिळत असतां, त्याच्या अलीकडील स्वर घेऊन त्याला काय म्हणून वृद्धि करावी ?

जो व्याख्याकार ' अत: ' ( अकार शेवटीं असलेलें ) हा शब्द अंग या शब्दाला विशेषण लावील त्याचे मतानें शेवटच्या स्वराच्या अलीकडील स्वराला वृद्धि होणार नाहीं. आम्ही 'अङ्गस्य' हा शब्द अकाराला विशेषण लावतों, तेव्हां आमचे मतीं शेवटच्या स्वराच्या अलीकडील स्वर ही वृद्धीला जागा आहे.

पण शेवटच्या स्वराला लोप व वृद्धी एकदम प्राप्त झालीं असतां लोप वृद्धीचा बाध करील.

अशा रीतीनें वृद्धीपेक्षा लोप ज्यास्ती प्रबळ आहे. अथवा या ठिकाणीं पूर्वविप्रतिषेध सांगितलाच आहे ( ६।४।४८ वा. १ ). णिलोप आणि अकाराचा लोप हे इयङ्, यण्, गुण, वृद्धि व दीर्घ यांचे अगोदर पूर्वविप्रतिषेधानें होतात.

तर मग, आम्ही पुढील उपयोग देऊं: ' अतो हलादेर्लघो: ' या सूत्राने सांगितलेली ही जी शेवटच्या स्वराच्या अलीकडील स्वराला होणारी वृद्धि ती व्यंजनान्त धातूला व्हावी, स्वरान्त धातूला होऊं नये; उदाहरणार्थ अपिपठिषीत् या ठिकाणीं वृद्धि होऊं नये.

हाही उपयोग देतां येणार नाहीं.

तें कां ?

कारण ' हलादे:' ही ज्याच्या आरंभीं व्यंजन आहे या अर्थाचा जो बहुव्रीहिसमास केलेला ' हलादि ' हा शब्द त्याची षष्ठी नव्हे.

तर मग ही कोणती विभक्ति आहे ?

हल् म्हणजे व्यंजन हाच जो आदि अशा अर्थाचा कर्मधारय समास केलेला जो हलादि शब्द त्याची ही पंचमी आहे, व ' हलादे: ' या शब्दाचा अर्थ हल् जो आदि त्याच्या पुढील जो ह्रस्व अकारस्वर त्याला वृद्धि होते असा ' अतो हलादेर्लघो: ' या सूत्राचा अर्थ आहे.

धारयात्पञ्चमी अचकासीत् अत्र प्राप्नोति। सिचानन्तर्यं विशेषयिष्यामः हलादेः परस्य सिच्यनन्तरस्येति। यदि सिचानन्तर्यं विशेष्यते अकणीत् अकाणीत् अत्र न प्राप्नोति। वचनाद्भविष्यति। इहापि तर्हि वचनात्प्राप्नोति। अचकासीत्। येन नाव्यवधानं तेन व्यवहितेऽपि वचनप्रामाण्यात्। केन च नाव्यवधानम्। वर्णेनैकेन। संघातेन पुनर्व्यवधानं भवति न च भवति। यदि सिचानन्तर्यं विशेष्यतेऽस्तु बहुव्रीहेः षष्ठी। कस्मान्न भवति। अपिपठिषीत्। व्यवहितत्वात्॥

एवं तर्ह्येतिदूरमेवेदं हल्ग्रहणमनुसृतम्। हल्ग्रहणमनन्त्यार्थम्। अज्ग्रहणमनिगर्थम्॥

[ नेटि ॥ ७।२।४ ॥ ]

ह्म्यन्तक्षणश्वसजागृणिश्व्येदिताम् ॥ ७।२।५ ॥

किमर्थं जागर्तेर्वृद्धिप्रतिषेध उच्यते। सिचि वृद्धिर्मा भूदिति। नैतदस्ति प्रयोजनम्। जागर्तेर्गुण उच्यते वृद्धिविषये प्रति-

---

पण जर ही कर्मधारय समास केलेल्या हलादि या शब्दाची पंचमी समजावी तर 'अचकासीत्' या ठिकाणीं चकाराच्या पुढील अकाराला वृद्धि होऊं लागेल.

'सिचि' हे पद 'अतः' या पदाला विशेषण लावूं, व आरंभीं असलेलें जे व्यंजन त्याच्या पुढील जो सिच्प्रत्ययाजवळचा अकार त्याला वृद्धि होते असा अर्थ करूं.

जर सिचि हें पद अकाराला विशेषण घेतलें तर अकणीत्, अकाणीत्, या ठिकाणीं वृद्धि होणार नाहीं. कारण णकाराचें व्यवधान आहे.

वृद्धि झाली नाहीं तर 'अतो हलादेर्लघोः' हे सूत्र व्यर्थ होईल. तेव्हां ज्या अर्थी सूत्र केलें आहे त्या अर्थी वृद्धि होईल.

तर मग 'अचकासीत्' येथेही त्याच कारणानें वृद्धि होऊं लागेल.

तसें नाहीं; कारण ज्या वर्णाचें व्यवधान आल्याशिवाय चालतच नाहीं अशा वर्णाचें व्यवधान खपतें. तेव्हां अशा वर्णाचें व्यवधान असलें तरी अकणीत्, अकाणीत्, येथे सिच् प्रत्ययाचें सान्निध्य होऊं शकतें.

पण कोणाचें व्यवधान आल्याशिवाय चालतच नाहीं?

एका वर्णाचें व्यवधान आल्याशिवाय चालत नाहीं, म्हणून एक वर्ण मध्यें असला तर व्यवधान नाहीं असें समजावयाचें. पण अनेक वर्णांनीं व्यवधान मात्र सर्व ठिकाणीं असतेंच असा नियम नाहीं; कोठें असतें, कोठें नसतें. तेव्हां वर्णांचा समुदाय मध्यें आला म्हणजे व्यवधान होणारच. म्हणून सिच् प्रत्ययाच्या अवळचा असा अकार असें म्हटलें म्हणजे अचकासीत् येथे वृद्धि होत नाहीं. आणि सिचि हें अकाराला विशेषण घेतलें म्हणजे हलादि हा बहुव्रीहि घेऊन त्याची षष्ठी जरी घेतली तरी हरकत नाहीं.

षष्ठी घेतल्यास अपिपठिषीत् या ठिकाणीं वृद्धि कां होणार नाहीं?

व्यवधानामुळेंच होणार नाहीं.

बरें, पण, हा 'हल्' या शब्दाच्या उपयोगाचा विचार फार दूरवर गेला; प्रस्तुत सूत्रांतच शेवटच्या वर्णाच्या पूर्वींच्या वर्णाला वृद्धि व्हावी हा उपयोग आहे; त्याप्रमाणेंच 'अचः' या शब्दाचा उपयोग, 'इको गुणवृद्धी' या परिभाषासूत्रानें इकालाच वृद्धि करावी हा जो नियम सांगितला आहे तो येथें घेऊं नये, हा आहे.

(सू. ५) जागृ या धातूला वृद्धीचा निषेध काय म्हणून सांगितला आहे?

सिच् पुढें असताना वृद्धि होऊ नये म्हणून.

हा उपयोग देतां येणार नाहीं. कारण वृद्धीचा विषय असतांना किंवा गुणनिषेधाचा विषय असतांना जागृ धातूला मुद्दाम गुण सांगितला आहे;

---

१. (सू. ४) ज्याला इडागम झालेला आहे असा सिच् प्रत्यय पुढें असतांना हलन्त धातूला पूर्वसूत्रानें वृद्धि होत नाहीं; उदा० अदेवीत्, अकोषीत्.

१. (सू. ५) ह, म, य, हे वर्ण शेवटीं असलेले धातू, तसेंच क्षण्, श्वस्, जागृ, णिप्रत्ययान्त, श्वि, आणि एकारेत्संज्ञक धातू यांना वृद्धि होत नाहीं; उ० अग्रहीत्, अक्षणीत्.

षेधविषये च स बाधको भविष्यति । गुणे तर्हि कृते रपरत्वे च हलन्तलक्षणा वृद्धिः प्राप्नोति । नेटि [ ७. २. ४ ] इति तस्याः प्रतिषेधो भविष्यति । इयं तर्हि प्रतिषेधोत्तरकाला वृद्धिरारभ्यतेऽतो ल्रान्तस्य [२] इति ॥

अपर आह । कक्ष्यया कक्ष्या निमातव्या । सिचि वृद्धिश्च प्राप्नोति गुणश्च । गुणो भवति । गुणे कृते रपरत्वे च हलन्तलक्षणा वृद्धिः प्राप्नोति नेटि [ ४ ] इति च तस्याः प्रतिषेधो भवति । प्रतिषेधोत्तरकालमतो हलादेर्लघोः [७] इति विभाषा वृद्धिः प्राप्नोति न च किंचित् । अतो ल्रान्तस्य [२] इति च वृद्धिः प्राप्नोति न च किंचित् ॥

[ [1]ऊर्णोतेर्विभाषा ॥ ७।२।६ ॥
[1]अतो हलादेर्लघोः ॥ ७।२।७ ॥ ]
[1]नेड् वशि कृति ॥ ७।२।८ ॥

किमर्थं पुरस्तात्प्रतिषेध उच्यते न विध्युत्तरकालः प्रतिषेधः क्रियेत । तद्यथा । अन्यत्रापि विध्युत्तरकालाः प्रतिषेधा भवन्ति । कान्यत्र । कर्तरि कर्मव्यतिहारे न गतिहिंसार्थेभ्यः [१. ३. ३. १४; १५] इति । देवताद्वन्द्वे च नेन्द्रस्य परस्य [७. ३. २१, २२] ।

---

तो गुण वृद्धीचा बाध करीलच; तेव्हां प्रस्तुत सूत्रानें वृद्धिनिषेध आणखी सांगण्याची जरूर नाहीं.

बरें तर, गुण केल्यावर व रेफ पुढें जोडल्यावर जागर् येथील अकाराला, 'वदव्रजहलन्तस्याचः' या सूत्रानें व्यंजनान्त धातूला सांगितलेली वृद्धि होऊं लागेल, ती न व्हावी म्हणून प्रस्तुत सूत्रांत जागृ हा शब्द घातला आहे.

ही वृद्धि होणार नाहीं. कारण 'नेटि' या सूत्रानें तिचा निषेध होईल.

बरें तर, 'नेटि' हा निषेध जेथें येतो त्याच ठिकाणीं त्या निषेधाला मागें सारून 'अतो ल्रान्तस्य' या सूत्रानें रेफ किंवा लकार शेवटीं असलेल्या धातूंना जी वृद्धि सांगितली आहे ती येथें होऊं लागेल, ती न व्हावी म्हणून प्रस्तुत सूत्रांत जागृ हा शब्द घातला आहे.

अथवा, दुसरा एकादा वैयाकरण असें म्हणेल कीं जसा एकेक जिन्नस तोलून त्याची व्यवस्था लावून नंतर दुसरा तोलण्यास घेतात, तसें येथें करावें. तें असें:—जागृ धातूला सिच् जोडला कीं वृद्धि प्राप्त होते व गुणही प्राप्त होतो. वृद्धि होत नाहीं, गुण होतो; गुण झाल्यावर व गुणापुढें रेफ जोडल्यावर व्यजनान्त धातूला 'वदव्रजहलन्तस्याचः' या सूत्रानें सांगितलेली वृद्धि प्राप्त होते. 'नेटि' या सूत्रानें तिचा निषेध होतो. नंतर 'अतो हलादेर्लघोः' या सूत्रानें वैकल्पिक वृद्धि प्राप्त होतें. तिचें निवारण करण्यास कांहीं नाहीं. तसेंच 'अतो ल्रान्तस्य' या सूत्रानेही वृद्धि प्राप्त होते. तिचें निवारण करण्यासही कांहीं नाहीं. तेव्हां या दोन्ही सूत्रांनीं आलेल्या वृद्धीचें निवारण करण्याकरितां प्रस्तुत सूत्रांत जागृ हा शब्द घातला पाहिजे.

( सू. ८ ) इडागमाचा निषेध इडागमाचा विधि सांगण्यापूर्वी काय म्हणून सांगितला आहे ? तसा सांगू नये. कारण विधि सांगून नंतर त्याचा निषेध केला जातो. इतर ठिकाणींही प्रथम एकाद्या प्रत्ययाचा किंवा आगमाचा विधि सांगून नंतर निषेध सांगितलेला आढळतो.

इतर ठिकाणींही म्हणजे कोठें कोठें ?

का बरें ! 'कर्तरि कर्मव्यतिहारे' (१।३।१४) इत्यादि सूत्रांनीं आत्मनेपदाचा विधि प्रथम सांगितला आहे; व नंतर 'न गतिहिंसार्थेभ्यः' वगैरे सूत्रांनीं निषेध सांगितला आहे. तसेंच 'देवताद्वंद्वे च' (७।३।२१) या सूत्रानें वृद्धि सांगून नंतर 'नेन्द्रस्य परस्य' या सूत्रानें निषेध

---

१. ( सू. ६ ) इडागम झालेला आणि परस्मैपदपरक असा सिच् प्रत्यय पुढें असतांना ऊर्णु धातूला वृद्धि विकल्पानें होते; उ० और्णावीत्, और्णवीत्.

१. ( सू. ७ ) इडागम झालेला आणि परस्मैपदपरक असा सिच् प्रत्यय पुढें असतांना हलादि अंगांतील लघु अकाराला वृद्धि विकल्पानें होते; उदा० अकाणीत्, अकणीत्.

१. (सू. ८) वश् प्रत्याहारांतील वर्ण आरंभीं असलेल्या कृत् प्रत्ययाला इट् हा आगम होत नाहीं; उदा० ईश्वरः, दीप्रः.

तत्रायमप्यर्थो द्विरिड्ग्रहणं न कर्तव्यं भवति प्रकृतमनुवर्तते ॥ नैवं शक्यम् । इडर्थं सार्वधातुकग्रहणं लिङः सलोपे संनिहितं तद्विच्छिद्येत ॥

यदि पुनर्न वृड्व्योश्चतुर्भ्यः [ ७. २. ५९ ] इत्यत्रैवोच्येत । किं कृतं भवति । विध्युत्तरकालश्चैव प्रतिषेधः कृतो भवति द्विश्चेड्ग्रहणं न कर्तव्यमिडर्थं च सार्वधातुकग्रहणं लिङः सलोपे संनिहितं भवति । तत्रायमप्यर्थो द्विः प्रतिषेधो न कर्तव्यो भवति ॥ नैवं शक्यम् । इह हि तुष्टोथ दुद्रोथेत्यृतो भारद्वाजस्य [ ७. २. ६३ ] इत्येतस्मान्नियमादिट् प्रसज्येत । कृसृभृवृस्तुद्रुस्रुश्रुवो लिटि (१३) इत्येष योगः प्रतिषेधार्थो भविष्यति । यद्येष योगः प्रतिषेधार्थो य एतस्माद्योगादिट् परिप्राप्यते नियमात्स न सिध्यति । पेचिव पेचिम । शेकिव । शेकिम । एवं तर्हि कृसृभृ इत्येतेषां ग्रहणं नियमार्थं भविष्यति स्तुद्रुश्रुस्रुवां प्रतिषेधार्थं वृङ्वृञोर्ज्ञापकार्थम् । एवमपि सामान्यविहितस्यैवेटः प्रतिषेधो विज्ञायेत विशेष-

---

सांगितला आहे. प्रस्तुत ठिकाणीं विधि प्रथम सांगून नंतर निषेध सांगितला तर आणखीहि असा फायदा होतो कीं दोनदां 'इट्'शब्द घालावा लागत नाहीं; कारण पूर्वी प्रकरणात चालू असलेले जें इट् पद तें पुढें अनुवृत्त होईलच.

असा फायदा दाखविणे शक्य नाहीं. कारण, इडागमाला निमित्त म्हणून घातलेला जो 'रुदादिभ्यः सार्वधातुके' या सूत्रातील सार्वधातुके हा शब्द नेहमींच्या अष्टाध्यायीपाठक्रमांत 'लिङः सलोपोऽनन्त्यस्य' या सूत्रांत अनुवृत्तीनें दाखल होतो, तो सूत्रांचा पाठक्रम फिरविल्यास दाखल होऊं शकणार नाहीं. कारण, मध्यें निषेधप्रकरण आल्यामुळें 'सार्वधातुके' हें पद पुढें जाण्याचें थांबेल, व त्यामुळें तें 'लिङः सलोपोऽन्त्यस्य' ( ७।२।७९ ) या सूत्रांत येणार नाहीं.

बरें पण, सगळ्या विधिसूत्रांनंतर नव्हे, पण कांहीं विधिसूत्रांनंतर, उदाहरणार्थ 'न वृड्व्यश्चतुर्भ्यः' ( ७।२।५९ ) या सूत्रानंतर, सर्व निषेधसूत्रें घातलीं तर—

मग त्यांत काय साधतें ?

कां बरें ? नेहमींच्या रीतीनें विधिसूत्रांनंतर निषेधसूत्रें केलीं जातात, इतकेंच नव्हे तर इट् हा शब्द दोनदां घालावा लागत नाहीं; व इडागमाला निमित्त म्हणून घातलेला 'सार्वधातुके'शब्द 'लिङः सलोपो'० या सूत्रांत येऊं शकतो. शिवाय, आणखीहि एक फायदा सहज घडून येतो तो हा कीं इडागमाचा निषेध विधिसूत्राचे अगोदर व मागाहून असा जो हल्लींच्या पाठांत दोनदां केलेला आहे, व त्याकरितां 'न' हा शब्द दोनदां उच्चारला आहे तो दोनदां उच्चारावा लागणार नाहीं.

असें म्हणणें शक्य नाहीं. कारण, तुष्टोथ व दुद्रोथ, या ठिकाणीं सूत्रांचा पाठ फिरविल्यास 'ऋतो भारद्वाजस्य' या नियमानें इडागम होऊं लागेल.

पण 'कृसृभृवृ०' या सूत्रानें इडागमाचा निषेध होईल.

जर 'कृसृभृवृ०' हें सूत्र इडागमाचा निषेध सांगण्याकरिताच समजलें तर पेचिव पेचिम, शेकिव शेकिम, इत्यादि ठिकाणीं हें सूत्र नियमार्थ समजल्यामुळें जो इडागम होतो तो होणार नाहीं.

असें होईल तर कृ, सृ, भृ, या तीन धातूंचें उच्चारण नियमाकरिता आहे असें समजलें जाईल. व स्तु, द्रु, श्रु आणि स्रु यांचें उच्चारण इडागमाचा प्रतिषेध होण्याकरितां समजलें जाईल. आणि वृङ् व वृञ् या धातूंचें एकत्र केलेलें 'वृ'-शब्दानें उच्चारण ज्ञापकाकरितां समजलें जाईल.

पण असें केलें तरी स्तु द्रु श्रु स्रु, या ठिकाणीं सांगितलेला निषेध 'कृसृभृ' हा भाग नियमाकरितां आहे असें समजल्यामुळें सामान्यतऱ्हेनें लिटामध्यें जो इडागम येतो त्याचा होईल; 'वल् पुढें असतांना' अशा विशिष्ट तऱ्हेनें 'ऋतो भारद्वाजस्य' हें सूत्र नियमार्थ समज-

विहितश्चायं थलीति ॥

पुरस्तात्पुनः प्रतिषेधे सत्यनारभ्यापवादोऽयं भवति तेन यावानिण्नाम तस्य सर्वस्यैव प्रतिषेधः सिद्धो भवति । यदि खल्वप्येषोऽभिप्रायस्तन्न क्रियत इति पुरस्तादपि प्रतिषेधे सति तन्न करिष्यते । कथम् । इदमस्ति नेड् वशि कृतीति । ततो वक्ष्यामि । आर्धधातुकस्य वलादेरिति । इडित्यनुवर्तते नेति निवृत्तम् ॥

अथ कृद्ग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । बिभिदिव बिभिदिमेति । नैतदस्ति प्रयोजनम् । कृसभृवृस्तुद्रुस्रुश्रुवो लिटि ( १३ ) इत्येतस्मान्नियमादत्रेड् भविष्यति ॥ नात्र तेन परिप्रापणं प्राप्नोति । किं कारणम् । प्रकृतिलक्षणस्य प्रतिषेधस्य स प्रत्यारम्भः प्रत्ययलक्षणश्चायं प्रतिषेधः ॥ उभयोः स प्रत्या-

---

त्यामुळे जो इडागम स्तु व द्रु या धातूंना होऊं लागतो त्याचा निषेध 'स्तु द्रु श्रु स्रु' या पदानें होणार नाहीं; व तुष्टोथ, दुद्रोथ, या ठिकाणी इडागम होऊन रूपें बिघडतीलच.

पण निषेधसूत्र जर अष्टाध्यायीपाठक्रमांत आचार्य पाणिनींनीं वास्तविक जसें सांगितलें आहे तसेंच सर्वांत अगोदर सांगितलें तर 'कृसृभृ०' या सूत्रानें सांगितलेला इडागमाचा निषेध हा, विधि सांगण्यापूर्वी जसा अपवाद सांगावा तशा तऱ्हेचा होईल व त्यामुळें, कोणत्याही सूत्रानें पुढें इडागम सांगितला जावो, एकंदर इडागमाचा निषेध 'कृसृभृ०' या सूत्रानें होईल व तुष्टोथ व दुद्रोथ या ठिकाणीं कोणताहि दोष येणार नाहीं. बरें, जर सर्व विधिसूत्रें अगोदर व सर्व निषेधसूत्रें मागाहून सांगण्याचा खटाटोप करण्याचा फायदा एक वेळा इट् हा शब्द उच्चारावा लागत नाहीं येवढाच असेल तर सर्व निषेधसूत्रें पूर्वी लिहिलीं तरी सुद्धां तो फायदा मिळूं शकेल.

तें कसें ?

हें 'नेड् वशि कृति' सूत्र केलें आहेच. त्या निषेधप्रकरणानंतर 'आर्धधातुकस्येड् वलादेः' असें न म्हणतां 'आर्धधातुकस्य वलादेः' असें सूत्र म्हणूं. 'आर्धधातुकस्य वलादेः' येथें 'नेड् वशि कृति' या प्रस्तुत सूत्रांतून इट् हा शब्द अनुवृत्त होईल; 'न' शब्द अनुवृत्त होणार नाहीं.

बरें तर, प्रस्तुत सूत्रांत 'कृति' हें पद कशाकरितां घातलें आहे ?

बिभिदिव व बिभिदिम, या उदाहरणांमध्यें इडागमाचा निषेध होऊं नये म्हणून.

हें कारण सांगता येत नाहीं. कारण जरी प्रस्तुत सूत्रांत 'कृति' हें पद गाळलें तरी प्रस्तुत सूत्र बिभिदिव, बिभिदिम, येथें लागूं पडणार नाहीं; त्याचा बाध 'कृसृभृ०' या नियमानें केला जाईल, व नियमामुळे येथें इडागम होईल.

'कृसृभृ०' हें नियमसूत्र बिभिदिव, व बिभिदिम, येथे लागू पडणार नाहीं.

तें कां बरें ?

'एकाच उपदेशेऽनुदात्तात्' या सूत्रानें कोणताही प्रत्यय निमित्त म्हणून न सांगता केवळ प्रकृतीला म्हणजे कांहीं विशिष्ट धातूंना म्हणून जो इडागमाचा निषेध सांगितला आहे त्याचा नियम 'कृसृभृ०' या सूत्रानें केला जातो व लिटामध्यें त्या विशिष्ट धातूंना इडागम केला जातो; प्रस्तुत 'नेड् वशि कृति' या सूत्रानें विशिष्टप्रत्ययाला उद्देशून इडागमाचा निषेध केला आहे. तेव्हां प्रस्तुत निषेधाला 'कृसृभृ०' हा नियम लागू पडणार नाहीं; व बिभिदिव, बिभिदिम, या रूपांच्या ऐवजीं बिभिद्व, बिभिद्म, अशीं रूपें होतील.

हें म्हणणें बरोबर नाहीं. 'कृसृभृ' या सूत्रानें नियमाच्या जोरावर लिट् प्रत्यय पुढें असताना सांगितलेला इडागम हा प्रकृतिनिमित्तक निषेध जेथें केला आहे तेथेंही होऊं शकतो व प्रत्ययनिमित्तक निषेध जेथें केला आहे तेथेंही होऊं शकतो.

असें कशावरून समजतें ?

'कृसभृवृस्तुद्रुस्रुश्रुवो लिटि' या सूत्रांत वृङ् व

रम्भः । कथं ज्ञायते । वृङ्वृञोर्ग्रहणात् । कथं कृत्वा ज्ञापकम् । इमौ वृङ्वृञावुदात्तौ तयोः प्रकृतिलक्षणः प्रतिषेधो न प्राप्नोति । पश्यति त्वाचार्य उभयोः स प्रत्यारम्भ इति ततो वृङ्वृञोर्ग्रहणं करोति। न खल्वपि कश्चिदुभयवान्प्रतिषेधः प्रकृतिलक्षणः प्रत्ययलक्षणश्च । ततः किम् । तुल्यजातीयेऽसति यथैव प्रकृतिलक्षणस्य नियामको भवत्येवं प्रत्ययलक्षणस्यापि नियामको भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । इह मा भूत् । रुदिवः रुदिमः ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । उपरिष्टाद्योगविभागः करिष्यते । आर्धधातुकस्य । यदेतदनुक्रान्तमेतदार्धधातुकस्य द्रष्टव्यम् । तत इड् वलादेरिति ॥ तत्र त्वेतावद् द्रष्टव्यं यदि किंचित्तत्रान्यदप्यार्धधातुकमहृ०

---

वृञ् या धातूचें 'वृ' या पदानें उच्चारण केलं आहे यावरून.

हे असे सिद्ध होतें ?

वृङ् व वृञ् हे दोन्ही धातू उदात्त आहेत. तेव्हा 'एकाच उपदेशेऽनुदात्तात्' या सूत्रानें, सांगितलेला प्रकृतिनिमित्तक इडागमनिषेध येथें येत नाहीं. जर 'कृसृभृ०' हा नियम प्रकृतिनिमित्तक इडागमनिषेध जेथें आहे तेथेच लागू पडतो असे म्हटले तर 'वृ' धातूला तो नियम लागू पडणार नाहीं, व वृ धातुला लिटामध्यें सर्व ठिकाणीं 'श्र्युकः किति' आणि 'नेड् वशि कृति' या दोन सूत्रानीं इडागमाचा निषेध होईलच; व तसा निषेध झाल्यास 'कृसृभृ ' या सूत्रांत 'वृ' हें पद घालणें व्यर्थ होइल ज्या अर्थी इतकें असूनही 'वृ' हें पद घातलें आहे त्या अर्थी आचार्य पाणिनि सुचवितात कीं 'कृसृभृ०' हा नियम प्रकृतिनिमित्तक आणि प्रत्ययनिमित्तक या दोन्ही प्रकारच्या इडागमनिषेधावर लागू पडतो, व त्या ठिकाणीं इडागम होतो; व असें झाल्यास वृ धातुला इडागम होईल तो होऊ नये म्हणून ते सूत्रात 'वृ' हें पद घालतात.

शिवाय, वास्तविक पाहता प्रकृति व प्रत्यय या दोन्ही निमित्तांनीं मिळून इडागमाचा निषेध कोणत्याही सूत्रांत सांगितला नाहीं. तेव्हां काय ठरतें ? येवढेंच ठरतें कीं 'कृसृभृ०' या नियमाखाली, म्हणजे प्रकृतिनिमित्तक आणि प्रत्ययनिमित्तक या दोन्ही प्रकारचा, इडागमनिषेध एकाच सूत्रांत कोणत्याही ठिकाणीं ज्या अर्थी मिळत नाहीं त्या अर्थी प्रकृतिनिमित्तक इडागमनिषेध ज्या सूत्रांत सांगितला आहे त्याही सूत्राविषयीं 'कृसृभ०' हा नियम घेण्यात येतो, व प्रत्ययनिमित्तक इडागमनिषेध ज्या सूत्रात सांगितला आहे त्याही सूत्राविषयीं तो घेण्यात येतो; तेव्हां बिभिदिव व बिभिदिम या रूपांत 'कृसृभृ०' हा नियम लागू पडू शकेल व तीं रूप साधणें हा प्रस्तुत सूत्रातील 'कृति' शब्दाचा उपयोग म्हणून देता येणार नाहीं, व 'कृति' पद व्यर्थ तें व्यर्थच होईल.

बरें तर, रुदिवः व रुदिमः या ठिकाणीं इडागमाचा निषेध प्रस्तुत सूत्रानें होऊ नये म्हणून प्रस्तुत सूत्रात कृति हा शब्द घातला आहे असा 'कृति' शब्दाचा उपयोग देऊ.

हाही उपयोग देता येत नाहीं; कारण, पुढें 'आर्धधातुकस्येड् वलादेः' या सूत्राचे 'आर्धधातुकस्य' 'इड् वलादेः' असे दोन भाग करतां येतील, आणि आर्धधातुकस्य याचा अर्थ जें कांहीं प्रकरण म्हणजे इडागमनिषेधप्रकरण चालू आहे तें आर्धधातुक प्रत्ययासंबधानें समजावें, असा घेतां येईल.

सूत्राचे भाग करण्यास हरकत नाहीं, पण सूत्रविभाग केला असतांना आर्धधातुकस्य या शब्दाचा आणखी कांहीं उपयोग आहे कीं नाहीं,

---

२. 'कृसृभृ०' या नियमसूत्रामध्यें कृ सृ, वगैरे ही विशिष्ट प्रकृति निमित्त धरली आहे; आणि लिटि हा विशिष्ट प्रत्ययही निमित्त धरला आहे. अशीं दोन्ही प्रकारचीं विशिष्ट निमित्तें एखाद्या निषेधामध्यें धरलीं असतीं तर त्याच निषेधाचा हा नियम झाला असता, पण तसा निषेध कोठेंच नाहीं.

णस्य प्रयोजनमस्ति । अथ न किंचिदिह वा कृद्ग्रहणं क्रियेत तत्र वार्धधातुकग्रहणं को न्वत्र विशेषः ॥

**नेड् वरमनादौ कृति ॥ १ ॥**

वरमनादौ कृतीट्प्रतिषेधं प्रयोजयति । ईशिता ईशितुम् ईश्वरः । व । र । दीपिता दीपितुम् दीप्रः । र । म । भसिता भसितुम् भस्म । म । न । यतिता यतितुम् यत्नः ॥ अथान्ये ये वशादयस्तत्र कथम् । उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि ॥

[१]**तितुत्रतथसिसुसरकसेषु च ॥ ९ ॥**

**तितुत्रेष्वग्रहादीनाम् ॥ १ ॥**

तितुत्रेष्वग्रहादीनामिति वक्तव्यम् । इह मा भूत् । निगृहीतिः उपस्निहितिः निकुचितिः निपठितिरिति ॥

[१]**एकाच उपदेशेऽनुदात्तात् । ७।२।१० ॥**

एकाज्ग्रहणं किमर्थम् ।

**एकाज्ग्रहणं जागर्त्यर्थम् ॥ १ ॥**

एकाज्ग्रहणं क्रियते जागर्तेरिट्प्रतिषेधो मा भूदिति । जागरिता जागरितुम् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । उपदेशेऽनुदात्तादित्युच्यते जागर्तिश्चोपदेश उदात्तः ॥ न ब्रूम इहार्थं जागर्त्यर्थमेकाज्ग्रहणं कर्तव्यमिति । किं तर्हि । उत्तरार्थम् । श्र्युकः किति ( ११ )

---

कां हा वरतीं दाखविला येवढाच आहे, हें पाहिलें पाहिजे. जर दुसरा कोणताही उपयोग नसेल– आणि तो नाहींच–तर प्रस्तुत सूत्रांत कृति हा शब्द घातला काय किंवा 'आर्धधातुकस्य' असा तुकडा पाडला काय, या दोन्हींत फरक काय ?

( वा. १ ) वशि असें पद जरी सूत्रात उच्चारलें आहे तरी व, र, म, न, हींच व्यजनें आरंभीं असणारा जो कृत्प्रत्यय त्याच ठिकाणीं फक्त प्रस्तुत सूत्राला उदाहरणें मिळतात; व या उदाहरणाकरिताच इडागमाचा प्रतिषेध करावा लागतो; उदाहरणार्थ, ईशिता, ईशितुम् अशींच रूपें तकारादि कृत्प्रत्यय पुढें असताना होतात, पण वकारादि प्रत्यय पुढें असतांना ईश्वरः असें रूप होतें. त्याप्रमाणेंच दीप् धातूचीं दीपिता, दीपितुम्, दीप्रः अशीं रूपें होतात. भस् धातूचीं भसिता, भसितुम्, भस्म, व यत् धातूचीं यतिता, यतितुम्, यत्नः अशीं रूपें होतात.

बरें; पण व, र, म, न, यांशिवाय दुसरा एकादा वश् वर्ण आरंभीं असणारे प्रत्यय पुढें असताना काय वाट ?

असे सर्व प्रत्यय उणादीच आहेत व उणादि प्रत्यय शेवटीं असलेले सर्व शब्द व्युत्पत्तिरहित आहेत असें समजतात.

( सू. ९, वा १ ) प्रकृत सूत्रात ति, तु, त्र, वगैरे प्रत्ययांना इडागम होत नाहीं म्हणून जें विधान कले आहे तें ग्रह् वगैरे धातूंविषयीं समजूं नये असं म्हणावें; म्हणजे निगृहीतिः, उपस्निहितिः, निकुचितिः, निपठितिः, या ठिकाणीं प्रस्तुत सूत्र लागू होणार नाहीं व इडागम होईल.

(सू. १०) येथें 'एकाच्' पदाचा काय उपयोग आहे?

(वा. १) एकाच् पदाचा उपयोग जागृ धातूविषयीं आहे. स्पष्ट म्हणावयाचें म्हणजे प्रस्तुत सूत्रांत एकाच् हें पद घातलें आहे त्याचा उपयोग जागृ धातूला जागरिता, जागरितुम्, इत्यादि उदाहरणे साधतेवेळीं इडागमाचा निषेध होऊं नये हा आहे.

हा उपयोग देता येत नाहीं. प्रस्तुत सूत्रांत ' उपदेशाचे वेळीं अनुदात्त ' असें म्हटलें आहे; आणि जागृ हा धातु-तर उपदेशीं उदात्त आहे.

आम्ही असें म्हणत नाहीं कीं याच सूत्रांत जागृ धातु वगळण्याकरितां येथें एकाच् हें पद घातले आहे, तर आमचें म्हणणें इतकेंच कीं पुढील सूत्रात एकाच् या शब्दाचा जागृ धातु वगळण्याकरितां उपयोग आहे. ' श्र्युकः किति '

---

१. ( सू. ९ ) ति, तु, त्र, त, थ, सि, सु, सर, क, आणि स, ह्या दहा ( १० ) कृत् प्रत्ययांना इडागम होत नाहीं; उदा० तन्तिः, दीप्तिः, सक्तुः, वगैरे.

१. ( सू. १० ) उपदेशीं एकाच् आणि अनुदात्त असा जो धातु त्याच्या पुढील वलादि प्रत्ययाला इडागम होत नाहीं. उदा० पक्ता, पक्ष्यति.

इतीट्प्रतिषेधं वक्ष्यति स जागर्तेर्मा भूदिति । जागरितः जागरितवानिति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । जागर्तेर्गुण उच्यते वृद्धिविषये प्रतिषेधविषये च स बाधको भविष्यति । तत्र गुणे कृते रपरत्वे च कृतेऽनुगन्तत्वादिट्प्रतिषेधो न भविष्यति । ननु चोपदेशाधिकारात्प्राप्नोति । उपदेशग्रहणं निवर्तयिष्यते । यदि निवर्त्यते स्तीर्त्वा पूर्त्वा इत्वोत्त्वयोः कृतयो रपरत्वे चानुगन्तत्वादिट्प्रतिषेधो न प्राप्नोति । नैष दोषः । आनुपूर्व्या सिद्धमेतत् । नात्राकृत इट्प्रतिषेध इत्वोत्त्वे प्राप्नुतः । किं कारणम् । न क्त्वा सेट् [ १. २. १८ ] इति कित्त्वप्रतिषेधात् । इदं तर्हि । आतिस्तीर्षति निपुपूर्षति इत्वोत्त्वयोः कृतयो रपरत्वे चानुगन्तत्वादिट्प्रतिषेधो न प्राप्नोति । मा भूदेवं श्र्युकः किति (११) इति । इट् सनि वा ( ४१ ) इत्येवं भविष्यति । इदं तर्हि । आस्तीर्णम् निपूर्ताः पिण्डाः । इत्वोत्त्वयोः

---

या सूत्रानें इडागमाचा निषेध पुढें सांगावयाचा आहे तो जागृ या धातूविषयीं जागरितः, जागरितवान् वगैरे उदाहरणात होऊं नये.

हाही उपयोग देता येतोच असें नाहीं. कारण जागृ या धातूला वृद्धि किंवा वृद्धिनिषेध याचा विषय असताना गुण होतो असे सांगितलें आहे, तो जागरितः वगैरे उदाहरणामध्ये 'श्र्युकः किति' या सूत्राने सांगितल्यानें इट्प्रतिषेधाचा बाधक होईलच. स्पष्टीकरण करावयाचें म्हणजे जागरितः वगैरे उदाहरणांमध्यें रेफ पुढें असलेला असा 'अर्' हा गुण झाल्यावर जागृ हा धातु उक् शेवटीं असलेला असा राहत नाहीं; म्हणून 'श्र्युकः किति' हा इडागमाचा निषेध तेथें येणारच नाहीं.

पण 'श्र्युकः किति' या सूत्रांत उपदेशाचे वेळीं जागृ धातु हा उक् शेवटीं असलेला आहे म्हणून 'श्र्युकः किति' हें सूत्र जागरितः या उदाहरणांत जागृ धातूला गुण केल्यावरही लागू पडेल.

असें असेल तर 'उपदेशे' हें पद 'श्र्युकः किति' या सूत्राचे अगोदर थांबविण्यांत येईल.

जर उपदेशपद 'श्र्युकः किति' या सूत्राचे अगोदर थांबलें तर स्तीर्त्वा व पूर्त्वा, या उदाहरणांमध्यें ऋकाराला इकार (७।१।१००) व उकार (७।१।१०२) हे आदेश केल्यावर इ व उ यांचे पुढे रेफ आल्यामुळें उक् शेवटीं असणं संभवणार नाहीं, व त्यामुळें 'श्र्युकः किति' हा निषेध तेथें येणार नाहीं, व रूपें स्तीरित्वा, पूरित्वा, अशीं भलतींच होतील.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या क्रमानें कार्यें प्रवृत्त होतात त्या क्रमानेंच ती केलीं असतां योग्य तीं रूपे साधतात. स्तीर्त्वा, पूर्त्वा, या ठिकाणीं इडागमाचा निषेध केल्याशिवाय इकार व उकार हे आदेश प्राप्तच होत नाहींत; तेव्हां प्रथम इडागमाचा निषेध होईल व नंतरच इकार व उकार हे आदेश होतील.

असें काय म्हणून होतें ?

इडागमाच्या सहित जो क्त्वा प्रत्यय तो कित् समजूं नये असा कित्त्वाचा निषेध (१।२।१८) आहे म्हणून

बरें तर, आतिस्तीर्षति, निपुपूर्षति, हीं उदाहरणें घ्या. या ठिकाणीं रेफ पुढें असलेला इकार व उकार हे आदेश केल्यावर धातु उक् शेवटीं असलेला असा राहत नाहीं, म्हणून इडागमाचा निषेध येणार नाहीं.

इडागमाचा निषेध 'श्र्युकः किति' या सूत्रानें नाहीं झाला तर नाहीं. 'इट् सनि वा' या सूत्रानें येथें[२] इडागमाचा विकल्प प्राप्त होत आहेच.

बरें तर, आस्तीर्णम् व निपूर्ताः पिण्डाः येथील

---

२ तेव्हां अगोदर इडागमाचा निषेध केला तरच क्त्वा या प्रत्ययाचें कित्त्व कायम राहून गुणाचा निषेध ( १।१।५ ) येईल. गुण मागें सरला तरच इत्त्व, उत्त्व, होत असतात. नाहीं तर गुण त्यांचा बाध करतो, ( ७।१।१०२ भाष्य पहा. )

कृतयो रपरत्वे चानुगन्तत्वादिट्प्रतिषेधो न प्राप्नोति। मा भूदेवम्। इट् सनि वेति सनि विभाषा यस्य विभाषा (१५) इति प्रतिषेधो भविष्यति ॥

इहार्थमेव तर्हि वध्यर्थमेकाज्ग्रहणं कर्तव्यम्। वध इट्प्रतिषेधो मा भूदिति। वधिषीष्टेति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम्। क्रियमाणेऽपि वा एकाज्ग्रहणे वध इट्प्रतिषेधः प्राप्नोति। वधिषीष्टेति। किं कारणम्।

**वध इट्प्रतिषेधः संनिपात एकाच्त्वात्प्रकृतेश्चानुदात्तत्वात् ॥ २ ॥**

संनिपाते चैव हि वधिरेकाच्श्रूयते प्रकृतिश्चास्यानुदात्ता ॥

किं पुनः कारणमेवं विज्ञायत उपदेशेऽनुदात्तादेकाचः श्रूयमाणादिति। यङ्लोपार्थम्। यङ्लोपे मा भूदिति। बेभिदिता बेभिदितुम्। चेच्छिदिता चेच्छिदितुम्।

**एकाच उपदेशेऽनुदात्तादित्युपदेशवचनमनुदात्तविशेषणं चेत्क्र्यादिभ्यो लिटि नियमानुपपत्तिरप्राप्तत्वात्प्रतिषेधस्य ॥ ३ ॥**

एकाच उपदेशेऽनुदात्तादित्युपदेशवचनमनुदात्तविशेषणं चेत् क्र्यादिभ्यो लिटि नियमस्यानुपपत्तिः। किं कारणम्। अप्राप्तत्वा-

---

आस्तीर्ण, निपूर्त, वगैरे उदाहरणें घ्या. या ठिकाणींहि इकार व उकार हे आदेश केल्यावर व त्यांच्यापुढें रेफ जोडल्यावर ‘उक्’ शेवटीं नसल्यामुळें प्रस्तुत सूत्रानें इडागमाचा निषेध होणार नाहीं.

न होऊं द्या. ‘इट् सनि वा’ या सूत्रानें सन् पुढें असतांना इडागम विकल्पानें होत असल्यामुळें ‘यस्य विभाषा’ (७।२।१५) या सूत्रानें आस्तीर्ण, निपूर्त, वगैरे उदाहरणांमध्यें इडागमाचा निषेध होईल.

बरें तर, वध् धातूकरितां प्रस्तुत सूत्रांतच एकाच् या पदाचा उपयोग दाखवितां येतो. वध् धातूला वधिषीष्ट वगैरे उदाहरणामध्यें इडागमाचा निषेध होऊं नये म्हणून प्रस्तुत सूत्रांत एकाच् हें पद पाहिजे.

हाही उपयोग सांगतां येत नाहीं. एकाच् पद जरी घातलें तरी सुद्धां वध् धातूला इडागमाचा निषेध होऊं शकतो.

काय म्हणून इडागमाचा निषेध प्राप्त होतो?

(वा. २) वध धातु आतां एकाच् दिसतो म्हणून व त्याची मूळ प्रकृति जो हन् धातु तो अनुदात्त आहे म्हणून.

पण प्रस्तुत सूत्राचा ‘प्रकृतीमध्यें म्हणजे मूळ स्वरूपामध्यें अनुदात्त व हल्लीं दिसण्यांत एकाच् अशा धातूला’ इत्यादि अर्थ काय म्हणून करतां?

यङ्लोपाकरिता. ज्या ठिकाणीं यङाचा लोप होतो त्या ठिकाणीं, म्हणजे उदाहरणार्थ बेभिदिता बेभिदितुम्, चेच्छिदिता चेच्छिदितुम्, या ठिकाणीं इडागमाचा निषध होऊं नये म्हणून.

(वा. ३) प्रस्तुत ‘एकाच उपदेशेऽनुदात्तात्’ या सूत्रांत उपदेश हा शब्द जर अनुदात्त शब्दालाच विशेषण घेतला तर लिटामध्यें ‘कृसृभृ०’ हें सूत्र नियमाकरितां घेतलें जाणें शक्य होणार नाहीं.

असें काय म्हणून?

कारण कीं प्रतिषेध अगोदर केला जात नाहीं

---

३. वध यांतील अकाराचा लोप (६।४।४८) झाल्यानंतर वध् हा एकाच् आहे. उपदेशे याचा संबंध फक्त अनुदात्त या पदाकडेच आहे, एकाच् या पदाकडे नाहीं, असें गृहीत धरून हें लिहिलें आहे. वध हा हन् धातूला आदेश (२।४।४२) झाला असल्यामुळें वध याची मूळ प्रकृति म्हणजे उपदेश अनुदात्त आहे.

४. भिद् धातूहून यङ् प्रत्यय करून बेभिद हा यङ्प्रत्ययान्त धातु होतो. त्याहून लुट् प्रत्यय आणि तुमुन् प्रत्यय केले आहेत. यङ् प्रत्ययांतील यकाराचा व अकाराचा लोप (६।४।४८, ४९) झाला आहे. भिद् धातु हा मूळचा जरी एकाच् आहे तरी आतां द्वित्व झाल्यानंतर एकाच् नाहीं, म्हणून इडागमाचा निषेध होत नाहीं.

त्प्रतिषेधस्य। द्विर्वचने कृत उपदेशेऽनुदात्ताद्देकाचः श्रूयमाणादितीट्प्रतिषेधो न प्राप्नोति। असतीट्प्रतिषेधे नियमो नोपपद्यते॥ असति नियमे को दोषः।

**तत्र पचादिभ्य इड्वचनम् ॥ ४ ॥**

तत्र पचादिभ्य इड् वक्तव्यः। पेचिम शेकिम॥

**सनश्चेट्प्रतिषेधः ॥ ५ ॥**

सनश्चेट्प्रतिषेधो वक्तव्यः। बिभित्सति चिच्छित्सति। द्विर्वचने कृत उपदेशेऽनुदात्तादेकाचः श्रूयमाणादितीट्प्रतिषेधो न प्राप्नोति॥

इह च नीत्तः तत्वे कृतेऽनच्कत्वादिट्प्रतिषेधो न प्राप्नोति॥

नैष दोषः। आनुपूर्व्या सिद्धमेतत्। नात्राकृत इट्प्रतिषेधे तत्वं प्राप्नोति। किं कारणम्। ति कितीत्युच्यते॥ यदप्युच्यत एकाच उपदेशेऽनुदात्तादित्युपदेशवचनमनुदात्तविशेषणं चेत्कृत्वादिभ्यो लिटि नियमानुपपत्तिरप्राप्तत्वात्प्रतिषेधस्येति मा भून्नियमः। ननु चोक्तं तत्र पचादिभ्य इड्व-

---

म्हणून. ज्या ठिकाणीं एकादा विधि साहजिकच होत असून पुन्हां सांगण्यात येतो त्या ठिकाणीं तो विधि किंवा प्रतिषेध नियमाखातर समजला जातो. प्रस्तुत स्थलीं म्हणजे चकृव, चकृम, वगैरे ठिकाणीं कृ धातूला द्वित्व केल्यावर 'एकाच उपदेशे०' या सूत्राचा 'उपदेशीं अनुदात्त व हल्लीं 'एकाच्' असा अर्थ[५] केल्यास 'एकाच उपदेशे' हें सूत्र लागू पडत नाहीं, व इडागमाचा निषेध 'एकाच उपदेशे०' या सूत्रानें होऊं शकत नाहीं, आणि प्रस्तुत 'एकाच उपदेशे०' या सूत्रानें कृ धातूला लिटामध्यें इडागमाचा निषेध न झाल्यास 'कृसृभृवृ०' या सूत्रांतील कृ धातूचें उच्चारण नियमाकरितां म्हणून समजलें जाणार नाहीं.

नियमाकरितां न समजलें तर हरकत काय ?

(वा. ४) कां बरें ? नियम न घेतल्यास पच् वगैरे धातूंच्या लिटाचीं रूपें साधतांना दोष येईल; पेच् हें उपदेशीं अनुदात्त व श्रूयमाण एकाच् असें असल्यामुळें 'एकाच उपदेशे' या सूत्रानें पेचिम, शेकिम वगैरे रूपांमध्यें इडागमाचा निषेध होईल, व इडागम होण्याकरितां निराळा इडागम सांगावा लागेल.

(वा. ५) तसेंच बिभित्सति, चिच्छित्सति, वगैरे उदारणांमध्यें सन् प्रत्ययाला इडागम होऊं लागेल, व तो न होण्याकरितां त्याचा निषेध करावा लागेल. असें करण्याचें कारणः— धातला द्वित्व केल्यावर इडागमाचा निषेध होत नाहीं. कारण इडागमाचा निषेध होण्यास उपदेशीं अनुदात्त व हल्लीं एकाच् असा धातू लागतो तो चिच्छिद्, बिभिद् वगैरे ठिकाणीं मिळत नाहीं.

त्याप्रमाणेंच 'नीत्तः' या उदाहरणांत दा धातूच्या आकाराला तकारादेश (७।४।४७) केल्यावर धातूमध्यें एकही अच् शिल्लक राहत नसल्यामुळें इडागमाचा निषेध होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण क्रमानें कार्यें जशीं प्राप्त होतील तशीं करीत गेल्यास सर्व साधतें. 'नीत्तः' येथें इडागमाचा निषेध केल्याशिवाय तकारादेशाची प्राप्तीच येत नाहीं. कारण काय, तर तकारादेश होण्यास तकार प्रारंभीं असलेला कित् प्रत्यय पुढें असतांना असें निमित्त सांगितलें आहे. आणि शिवाय वरतीं जें सांगितलें आहे कीं 'एकाच उपदेशे' या सूत्रात उपदेश हा शब्द जर अनुदात्त शब्दालाच विशेषण घेतला तर लिटाचीं रूपें साधतेवेळीं 'कृसृभृवृ०' हें सूत्र नियमादाखल म्हणून घेतलें जाणार नाहीं, कारण कृ, सृ, भृ, इत्यादि धातूना लिटामध्यें इडागमाचा निषेध इतर सूत्रानें प्राप्त होत नाहीं त्या संबंधानें असें म्हणता येईल कीं नियम न घेतला तरी हरकत नाहीं, कांहीं बिघडत नाहीं.

पण वरतीं तेथेंच नाहीं कां सांगितलें कीं तसें झाल्यास पच् धातूला इडागम लिटामध्यें सांगावा लागेल म्हणून ?

५. कारण द्वित्व केल्यानंतर चकृ हें एकाच् नाहीं.

चनमिति । नैष दोषः । उक्तं तत्र थल्ग्रहणस्य प्रयोजनं समुच्चयो यथा विज्ञायेत थलि च सेटि क्ङिति च सेटीति ॥ यदप्युच्यते सनश्चेट्प्रतिषेध इति

**उभयविशेषणत्वात्सिद्धम् ॥ ६ ॥**

उभयमुपदेशग्रहणेन विशेषयिष्यामः । उपदेशेऽनुदात्तादुपदेश एकाच इति ॥ यङ्लोपे कथम् ।

**यङ्लोपे च तदन्तद्विर्वचनात् ॥ ७ ॥**

सन्यङन्तस्य स्थाने द्विर्वचनं तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टः स भवति यः स एकाजुपदेशेऽनुदात्तः ॥ अथापि द्विःप्रयोगो द्विर्वचनमेवमपि न दोषः । न ह्यस्य भिदुपदेश उपदेशः । किं तर्हि । बेभिदुपदेश उपदेशः । अथापि भिदुपदेश उपदेश एवमपि न दोषः । अकारेण व्यवहितत्वान्न भविष्यति । ननु च लोपे कृते नास्ति व्यवधानम् । स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव । न

---

हा दोष येत नाहीं. कारण 'थलि च सेटि' या सूत्रावरील भाष्यात थल् हें पद घालण्याचा उपयोग म्हणून सांगण्यात आलाच आहे कीं कित् अथवा ङित् प्रत्यय पुढें असतांना ' अत एकहल्मध्ये०' यानें सर्व काम भागून प्रस्तुत 'थलि च सेटि' या सूत्रात नुसतें सेटि हे पद घातलें असताना इडागम होण्यास योग्य एकटा थल् प्रत्ययच शिल्लक राहत असल्यामुळे थलि पद न घातल्यास चालत असू नही ज्या अर्थी आचार्य पाणिनींनीं 'थलि' पद घातलें आहे त्या अर्थी तें सुचवितात कीं थलि हें उच्चारलेलें पद व क्ङिति हें अनुवृत्त पद हीं दोन्हीं निमित्तें समजलीं जावीं, व तसें झाल्यामुळे प्रथम इडागम व्हावा व नतर एत्व व्हावें तव्हां जरी 'कृसृभृ०' हें नियमसूत्र न समजलें तरी पपच् हे अग एकस्वरयुक्त नसल्यामुळे तेथें इण्निषेध होणार नाहीं व इष्टरूप साधेल. तसेच सन् प्रत्ययाला इडागमाचा निषेध सांगावा लागेल म्हणून जें वर म्हटलें आहे त्याविषयींही असें म्हणता येईल कीं निषेध सांगण्याचें कारण नाहीं.

(वा. ६ ) कारण, उपदेशे हें पद 'एकाचः' व 'अनुदात्तात्' या दोहींनाही विशेषण म्हणून घेण्यात येईल व काम भागेल. उपदेशामध्ये एकस्वरयुक्त व उपदेशामध्येंच अनुदात्त अशा धातूच्या पुढील आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होत नाहीं असा प्रस्तुत सूत्राचा अर्थ करण्यांत येईल.

पण तसें केलें तर यङ्लोपाच्या रूपाविषयीं काय ? तेथें दोष राहतोच ना ?

( वा. ७ ) यङ्लोपाच्या रूपांत दोष येत नाहीं. कारण यङ्लोपाचीं रूपें साधतांना यङ् शेवटीं असलेलें जें शब्दस्वरूप त्याला द्वित्व सांगितलें असल्यामुळें सन्नन्त किंवा यङन्त यांतील भिद्स् किंवा भिद्य् या एकाच् भागाला द्वित्वरूपाचा आदेश झाल्यावर मूळ प्रकृति कोणती व पुढें सन् प्रत्यय किंवा यङ् प्रत्यय कोणता याचाच घोटाळा उडून जातो; व उपदेशीं एकाच् व अनुदात्त असा जो धातु तो मुळींच कळेनासा होतो. तेव्हा अर्थातच निषेध येणार नाहीं. बरें, द्वित्व म्हणजे दोन वेळां शब्द घालणें म्हणजे एकदा जो शब्द उच्चारला असेल त्याच्या पुढे तसलाच पुनः उच्चारणें असें म्हटलें तरी कांहीं दोष येत नाहीं. कारण भिद् हा जो उपदेश तो ह्या यङन्त धातूचा उपदेश नव्हे.

तर मग उपदेश कोणता ?

बेभिद् हा जो उपदेश तो ह्याचा उपदेश आहे, आणि जरी बेभिद्यते, बेभिदिता, वगैरे रूपामध्यें भिद् हा उपदेश समजला तरी सुद्धां दोष येत नाहीं; कारण बेभिद् व ता प्रत्यय यांचेमध्ये अकार आल्यामुळे आनन्तर्य नाहींसें होईल व इडागमनिषेध होणार नाहीं.

पण तेथें अकाराचा लोप केल्यावर अकार नाहींसा होईल व तो मध्यें येतो असें म्हणतां येणार नाहीं.

मध्यें येतो असेंच म्हणावें लागेल; कारण तेथें स्थानिवद्भाव ( १।१।५७ ) होईल.

स्थानिवद्भाव होऊं शकणार नाहीं; ज्याला

सिध्यति। पूर्वविधौ स्थानिवद्भावो न चायं पूर्वविधिः। एवं तर्हि पूर्वस्मादपि विधिः पूर्वविधिः॥ कः पुनरुपदेशो न्याय्यः। यः कृत्स्नः। कश्च कृत्स्नः। य उभयोः। यदि तर्हि य उभयोः स कृत्स्नः स च न्याय्यो वध इट्प्रतिषेधः प्राप्नोति। आवधिषीष्टेति॥ नैष दोषः। आद्युदात्तनिपातनं करिष्यते स निपातनस्वरः प्रकृतिस्वरस्य बाधको भविष्यति। एवमप्युपदेशिवद्भावो वक्तव्यः। यथैव हि स निपातनस्वरः प्रकृतिस्वरं बाधत एवं प्रत्ययस्वरमपि बाधेत। आवधिषीष्टेति। नैष दोषः। आर्धधातुकीयाः सामान्येन भवन्त्यनवस्थितेषु प्रत्ययेषु। तत्रार्धधातुकसामान्ये वधिभावे कृते सति शिष्टत्वात्प्रत्यय-

---

स्थानिवद्भाव करावयाचा त्याच्या पूर्वीच्याला कांहीं कार्य करावयाचें असल्यास स्थानिवद्भाव होतो. प्रस्तुत स्थलीं पूर्वीच्याला कार्य करावयाचें नाहीं.

असें असेल तर 'पूर्वविधौ' या शब्दाचा 'पूर्वीच्याहून पुढच्याला म्हणजे ज्याला स्थानिवद्भाव करावयाचा त्याचेही पुढच्याला कार्य कर्तव्य असताना' असा अर्थ करूं.

बरें पण, बेभिद् कीं भिद्, कोणता उपदेश घेणें रास्त आहे ?

भिद् धातूच्या सर्व उदाहरणांमध्यें सांगतां येतो तो.

कोणता पण तो कीं जो सर्व ठिकाणीं सांगतां येईल ?

अर्थात् जो भिद् धातूहून यङ् वगैरे प्रत्यय केला किंवा न केला अशा दोन्ही ठिकाणीं लागू पडेल तो, म्हणजे भिद्.

जर दोन्ही ठिकाणीं जो लागू पडेल तोच सर्व ठिकाणीं सांगतां येतो व तो योग्य उपदेश असें म्हटलें तर 'आवधिषीष्ट' या उदाहरणात वध् धातूच्या पुढें इडागमाचा निषेध होऊं लागेल.[६]

हा दोष येत नाहीं. कारण वध हा आदेश आद्युदात्त असा सांगूं; म्हणजे तो वध् या आदेशाचा आद्युदात्त स्वर 'हन्' या मूळ प्रकृतीचा जो अनुदात्त स्वर त्याचा बाध करील.

तरी पण, उपदेशिवद्भाव सांगावा लागणारच; म्हणजे उच्चारणकालींच लिङ्, लुङ्, वगैरेंचा विषय असतांनाच हन् धातूला वध हा आदेश होईल व तो त्याच वेळीं अनुदात्त होईल, व नंतर प्रत्यय पुढें लावले जातील, व प्रत्ययांचे स्वर प्रकृतिस्वर जो आद्युदात्त त्याचा बाध करतील. जर उपदेशिवद्भाव न घेतला तर आवधिषीष्ट या उदाहरणात निपातनस्वर जो आद्युदात्त तो प्रत्ययस्वराचाही बाध करील व रूपाचा स्वर बिघडेल.

हा दोष येत नाहीं. कारण कीं आर्धधातुकाच्या निमित्तानें होणारे आदेश वगैरे साधारणपणें प्रत्यय लावण्याच्या अगोदरच केले जातात. तेव्हां आर्धधातुक या सामान्य निमित्ताला मानून होणारा वध हा आदेश प्रत्यय लावण्याच्या अगोदरच होईल, आणि प्रत्यय लावल्यावर प्रत्ययाचा स्वर सर्वांत शेवटीं होऊन

---

६. हन् धातूला वध आदेश झाला आहे. तेव्हां वध आदेश होतो त्या ठिकाणीं तसेंच होत नाहीं त्या ठिकाणी हन् हा उपदेश सांगतां येतो. तेव्हां वध याचा उपदेश हन् असा सांगणें हेंच योग्य होणार आहे. त्या उपदेशामध्यें एकाचही आहे आणि अनुदात्तही आहे, म्हणून इडागमाचा निषेध होईल.

७. हा जो वध यांतील पहिला अकार उदात्त सांगितला तो उदाहरणामध्यें टिकणारा नाहीं. कारण याच्या मागून प्रत्ययस्वर होऊन त्या वेळीं शेषनिघातानें (६।१।१५८) हा अकार अनुदात्त होणार आहे. तेव्हां ह्या उदात्त सांगण्याचा उद्देश इतकाच कीं वध झाला उपदेशीं अनुदात्त म्हणतां येऊं नये. परंतु वर सांगितल्याप्रमाणें हन् हा उपदेश घेऊन जर इडागमाचा निषेध होईल तर तें आद्युदात्त सांगणें व्यर्थ होईल. तेव्हां त्याच्या जोरावर वध आदेश केल्यानंतर तथें इडागमाचा निषेध येत नाहीं असें मानतां येतें. तेव्हां तशा ठिकाणीं हन् याचा आदेश जो वध तो हन् यासारखा अनुदात्त होत नाहीं. कारण प्रत्ययाचे स्वर सतिशिष्ट म्हणजे मागून होणारे आहेत. (६।१।१५८ वा. ९ पहा.)

स्वरो भविष्यति ॥

अथ के पुनरनुदात्ताः । आदन्ता अद्रिद्राः इवर्णान्ताश्चाश्विश्रिडीशीदीधीवेवीङः । उवर्णान्ता युरुणुक्षुक्ष्णुस्नूर्णुवर्जम् । ॠदन्ता श्चाजागृवृङ्वृञः । शकिः कवर्गान्तानाम् । पाचिवचिसिचिमुचिरिचिविचिप्राच्छियजिभजिसृजित्यजिभुजिभ्रस्जिभञ्जिरुजियुजिणिजिविजिमञ्जिस्वञ्जयश्चवर्गान्तानाम् । सदिशदिहृदिच्छिदितुदिनुदिस्विदिभिदिस्कन्दिक्षुदिखिद्यतिविन्दिविद्यतिराधियुधिबुधिशुधिक्रुधिरुधिमाधिव्यधिबन्धिसिध्यतिहनिमन्यतयस्तवर्गान्तानाम् । तपितिपिवपिशपिचुपिलुपिलिपिस्वप्यापिक्षिपिसृपितृपिदृपियभिरभिलभियमिरमिनमिगमयः पवर्गान्तानाम् । रुशिरिशिदिशिविशिलिशिस्पृशिदृशिक्रुशिमृशिदंशित्विषिकृषिश्लिषिविषिपिषितुषिदुषिद्विषिघसिवसिदहिदिहिवहिदुहिनहिरुहिलिहिमिहयश्चोष्मान्तानाम् । वसिः प्रसारणी ॥

[ [1]श्र्युकः किति ॥ ७।२।११ ॥

सनि ग्रहगुहोश्च ॥ ७।२।१२ ॥ ]

[1]कृसृभृवृस्तुद्रुस्रुश्रुवो लिटि ॥ ७।२।१३ ॥

क्रञोऽसुटः ॥ १ ॥

कृञोऽसुट इति वक्तव्यम् । इह मा भूत् । संचस्करिव संचस्करिम ॥ तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । गुणे कृते रपरत्वे

---

तो इतर स्वरांना मार्गे सारून उरेल.

बरें; अनुदात्त धातू कोणते ?

दरिद्रा या धातूशिवाय सर्व आकारान्त धातू; श्वि, श्रि, डी, शी, दीधी आणि वेवी याना सोडून सर्व इकारान्त धातू; यु, रु, णु, क्षु, क्ष्णु, स्नु आणि ऊर्णु यांशिवाय सर्व उकारान्त धातू; जागृ, वृङ् व वृञ् याशिवाय सर्व ऋकारान्त धातू; कवर्गान्तांत एकटा शक् धातू; चवर्गान्तामध्यें पच्, वच्, सिच्, मुच्, रिच्, विच्, प्रच्छ्, यज्, भज्, सृज्, त्यज्, भुज्, भ्रस्ज्, भञ्ज्, रुज्, युज्, णिज्, विज्, सञ्ज् आणि स्वञ्ज्; तवर्गान्तामध्यें सद्, शद्, हद्, छिद्, तुद्, नुद्, स्विद्, भिद्, स्कन्द्, क्षुद्, खिद्, विन्द्, विद्यति, राध्, युध्, बुध्, शुध्, क्रुध्, रुध्, साध्, व्यध्, बन्ध्, सिध् हन् आणि मन् ( चतुर्थगण ); पवर्गान्तांमध्यें तप्, तिप्, वप्, शप्, चुप्, लिप्, लुप्, स्वप्, आप्, क्षिप्, सृप्, तृप्, दृप्, यभ्, रभ्, लभ्, यम्, रम्, नम्, आणि गम्; ऊष्मान्तामध्ये रुश्, रिश्, दिश्, विश्, लिश्, स्पृश्, दृश्, क्रुश्, मृश्, दश्, त्विष्, कृष्, श्लिष्, विष्, पिष्, तुष्, दुष्, द्विष्, घस्, वस्, दह, दिह्, वह्, दुह्, नह्, रुह्, लिह्, आणि मिह्. वस् धातू दोन आहेत त्यापैकीं संप्रसारण होणाराच वस् धातु घ्यावयाचा.

( सू. १३ वा. १ ) सुडागम न लागलेल्या कृ धातूच्या पुढील लिट् प्रत्ययाला इडागमाचा निषेध होतो असें बोलावें, म्हणजे संचस्करिव व संचस्करिम, येथें इडागमाचा निषेध होणार नाहीं.

बरें तर, तसें बोलणे जरूर असेल तर अवश्य बोलावें.

बोलण्याची जरूर नाहीं; कारण, या ठिकाणीं सुट् हा आगम लागल्यानंतर गुण झाल्यावर रेफ पुढें प्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० जिघृक्षति, बुभूर्षति.

---

१. ( सू. ११ ) ज्याच्या शेवटीं उक् प्रत्याहारांतील वर्ण आहे आणि ज्यामध्यें अच् एकच आहे असा धातु किंवा श्रि धातु यांच्या पुढील गकार किंवा ककार इत्संज्ञक असलेल्या प्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० युतः युतवान् श्रितः श्रितवान्.

१. ( सू. १२ ) ग्रह्, गुह् आणि उक् प्रत्याहारांतील वर्ण शेवटीं असलेला धातु यांच्या पुढील सन्

१. ( सू १३ ) लिट् प्रत्यय केला असतां तेथें इडागमाचा निषेध कोणत्याही सूत्रानें करणें झाल्यास तो फक्त कृ, सृ, भृ, आणि वृ हे धातू असतील तरच करावा; तसेंच स्तु, द्रु, स्रु आणि श्रु या धातूंच्या पुढील लिट् प्रत्ययाला इडागम करूं नये.

चानुगन्तत्वादिट्प्रतिषेधो न भविष्यति ॥ एवमप्युपदेशाधिकारात्प्राप्नोति । तस्मादसुट इति वक्तव्यम् ॥

## [१]श्वीदितो निष्ठायाम् ॥७।२।१४॥

श्विग्रहणं किमर्थं न प्रसारणे कृते प्रसारणपूर्वत्वे चोगन्तादित्येव सिद्धम् ॥ अत उत्तरं पठति ।

### श्विग्रहणमिदन्तत्वादुपदेशस्य ॥ १ ॥

श्विग्रहणं क्रियत इदन्तत्वादुपदेशस्य । उपदेश उगन्तादित्युच्यते श्वयतिश्चोपदेश इदन्तः ॥

## [१]यस्य विभाषा ॥ ७ । २ । १५ ॥

### यस्य विभाषाविदेः ॥ १ ॥

यस्य विभाषाविदेरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । विदितः विदितवानिति ॥ तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । यदुपाधेर्विभाषा तदुपाधेः प्रतिषेधः । शविकरणस्य विभाषा लुग्विकरणश्चायम् ॥

## [१]आदितश्च ॥ ७ । २ । १६ ॥

---

जोडल्यावर क्त धातूच्या शेवटीं उक् नसल्यामुळें इडागमाचा निषेध होणार नाहींच, तेव्हा त्याकरितां प्रस्तुत वार्तिकाची जरूर नाहीं.

असें जरी असलें तरी 'उपदेशे' हा अधिकार प्रस्तुत सूत्रांत असल्यामुळें व उपदेशीं जो उगन्त असा अर्थ असल्यामुळें संचस्करिव व संचस्करिम, येथें इण्निषेध प्रस्तुत सूत्रानें प्राप्त होईलच; तेव्हा तो न होण्याकरितां असुटः असें म्हटलेंच पाहिजे.

( सू. १४ ) प्रस्तुत सूत्रांत 'श्वि' पद कशाकरिता घातलें आहे ? निष्ठाप्रत्यय पुढे असतांना श्वि धातूला संप्रसारण ( ६ । १ । १५ ) केल्यावर उ हा उक् मार्गे असल्यामुळें 'श्रयुकः किति' या सूत्रानेच इण्निषेध होईल; एकंदरींत प्रस्तुत सूत्रात श्वि या शब्दाची जरूर नाहीं. हा पूर्वपक्ष मनांत घेऊन उत्तर देतातः—

( वा. १ ) प्रस्तुत सूत्रांत श्वि शब्द घातला आहे; कारण श्वि धातु हा उपदेशीं इकारान्त आहे व त्यामुळें त्याला 'श्र्युकः किति' हें सूत्र लागू पडत नाहीं. 'श्र्युकः किति' या सूत्राचा अर्थ करतांना 'उपदेशीं उगन्त धातूच्या पुढें' असें म्हटलें आहे व श्वि धातु उपदेशीं इकारान्त आहे; उगन्त नाहीं.

( सू. १५ वा. १ ) प्रस्तुत सूत्रात 'अविदेः' म्हणजे विद् धातूशिवाय असा शब्द घालावा, म्हणजे विदितः, विदितवान् या ठिकाणीं इण्निषेध होणार नाहीं.

बर तर मग तसा शब्द घालावा.

घालण्याची जरूर नाहीं; कारण ज्या उपाधीनें युक्त अशा विद् धातूला इडागमाचा विकल्प होतो त्या उपाधीनेंच युक्त अशा विद् धातूला प्रस्तुत सूत्रानें इडागमाचा निषेध होईल. 'श'च्या विकरणानें युक्त अशा तुदादि गणातील विद् धातूच्या पुढें इडागम विकल्पानें लागतो व त्याला निष्ठा प्रत्यय पुढें असतांना इण्निषेध होईल. विदितः विदितवान् हीं रूपें ज्यापासून साधतात तो विद् धातु लुग्विकरणानें युक्त आहे; व त्याच्या पुढील आर्धधातुक प्रत्ययाला इडागमाचा विकल्प कोठेंही सांगितला नाहीं.

---

२. लुब्धोथ येथें गुण झाल्यानंतर उगन्त नाहीं, तरी तेथें निषेध झाला पाहिजे, हे 'उपदेशे' म्हणण्याचें फल आहे

१ ( सू. १४ ) श्वि धातु, किंवा ज्याचा दीर्घ ईकार इत्संज्ञक आहे असा धातु यांहून पर जी निष्ठा म्हणजे क्त आणि क्तवतु हे प्रत्यय त्यांना इडागम होत नाही; उदा० शूनः शूनवान्, उद्विग्नः.

१. ( सू. १५ ) ज्या धातूच्या पुढील कोणत्याही वकाद्या प्रत्ययाला इडागम विकल्पानें सांगितला असेल त्या धातूच्या पुढील क्त आणि क्तवतु प्रत्ययांना इडागम होत नाही; उदा० गूढः गूढवान्, विधूनः विधूनवान्,

१. (सू. १६) ज्याचा दीर्घ आकार इत्संज्ञक आहे अशा धातूपुढील क्त आणि क्तवतु प्रत्ययांना इडागम होत नाहीं. उदा० ञिष्विदा धातूहून स्विन्नः स्विन्नवान्.

**विभाषा भावादिकर्मणोः।७।२।१७॥**

किमर्थो योगविभागो नादितो विभाषा भावादिकर्मणोरित्येवोच्येत । केनेदानीं कर्तरि प्रतिषेधो भविष्यति । यस्य विभाषा [ ७.२.१५ ] इत्यनेन ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद्योगविभागं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो यदुपाधेर्विभाषा तदुपाधेः प्रतिषेध इति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । यस्य विभाषाविदेरित्युक्तं तन्न वक्तव्यं भवति ॥

**क्षुब्धस्वान्तध्वान्तलग्नम्लिष्टविरिब्धफाण्टबाढानि मन्थमनस्तमःसक्ताविस्पष्टस्वरानायासभृशेषु ।७।२।१८।**

**क्षुब्धं मन्थाभिधाने ॥ १ ॥**

क्षुब्धं मन्थाभिधान इति वक्तव्यम् क्षुभितं मन्थेनेत्येवान्यत्र । क्षुब्ध ॥ स्वान्त

**स्वान्तं मनोऽभिधाने ॥ २ ॥**

स्वान्तं मनोऽभिधान इति वक्तव्यम् स्वनितं मनसेत्येवान्यत्र । स्वान्त ॥ ध्वान्त

**[ ध्वान्तं तमोऽभिधाने ॥ ३ ॥ ]**

---

( सू. १६, १७ ) हीं दोन सूत्रें निरनिराळीं कां सांगितलीं ? दोन्ही मिळून 'आदितो विभाषा भावादिकर्मणोः' असें एकच सूत्र कां सांगितलें नाहीं ?

दोन्ही मिळून एक सूत्र केल्यास कर्ता या अर्थी निष्ठा प्रत्यय केला असतांना इडागमाचा निषेध कोणत्या सूत्रानें होईल ?

अशी अडचण कां ? 'यस्य विभाषा' या सूत्रानें. कारण आकार इत् असलेल्या धातूंच्या पुढील निष्ठाप्रत्ययाला भाव व आदिकर्म हे अर्थ असतांना प्रस्तुत सूत्रानेंच इडागमाचा विकल्प सांगितला आहे. तेव्हां इतर अर्थ असतांना 'यस्य विभाषा' या सूत्रानें निष्ठाप्रत्ययाला इडागमाचा निषेध होईलच. तेव्हां निष्कर्ष काय ? दोन्ही मिळून एक सूत्र केल्यानें काम भागत असतांना ज्या अर्थी आचार्य पाणिनि दोन सूत्रें करतात त्या अर्थी ते सुचवितात कीं ज्या उपाधीनें युक्त अशा धातूला इडागमाचा विकल्प होत असेल त्या उपाधीनें युक्त अशाच धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाला इडागमाचा निषेध[2] होतो असा आचार्यांचा अभिप्राय समजण्याचें प्रयोजन काय ?

कां बरें ? 'यस्य विभाषा' या सूत्रावर 'अविदेः' असें वार्तिक सांगितले आहे, तें सागण्याची जरूर राहत नाहीं.

( सू. १८, वा. १ ) 'मन्थ' म्हणजे 'भिजवलेले सातू' या अर्थी क्षुब्ध असें निष्ठाप्रत्ययान्त रूप होतें असें बोलावें. म्हणजे इतर अर्थी क्षुभित असें रूप होईल. उदाहरणार्थ, घुसळखांब्यानें घुसळलेलें या अर्थी 'क्षुभितं मन्थेन' असाच प्रयोग होईल. 'क्षुब्धं मन्थेन' असा होणार नाहीं. क्षुब्ध. स्वान्ताविषयीं--

(वा. २) 'मन' हा अर्थ असतांना 'स्वान्त' असें निष्ठाप्रत्ययान्त रूप होतें असें बोलावें म्हणजे इतर ठिकाणीं म्हणजे 'स्वान्त' याचा मन अर्थ नसतांना 'स्वनितं मनसा' असाच प्रयोग होईल. स्वान्त. 'ध्वान्त'शब्दाविषयीं--

---

१. ( सू. १७ ) ज्याचा दीर्घ आकार इत्संक आहे अशा धातूपुढील भाव किंवा आदिकर्म या अर्थी केलेल्या निष्ठाप्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; उदा० भिन्नं मेदितम्, प्रभिन्नः प्रमेदितवान्.

२. असें मानलें म्हणजे मात्र 'आदितश्च' हें निराळें सूत्र केलेंच पाहिजे. कारण भाव किंवा आदिकर्म या उपाधीनें युक्त प्रत्ययाला विकल्प आहे. तेव्हां त्याहून निराळ्या अशा कर्ता या उपाधीनें युक्त अशा निष्ठाप्रत्ययाला इडागमाचा निषेध होणार नाहीं.

१. (सू. १८) क्षुब्ध, स्वान्त, ध्वान्त, लग्न, म्लिष्ट, विरिब्ध, फाण्ट आणि बाढ हे शब्द, मन्थ, मनस्, तमस्, सक्त, अविस्पष्ट, स्वर, अनायास आणि भृश हे आठ अर्थ क्रमानें गम्यमान असतांना निपातित केले जातात.

२. सूत्रांत जरी मन्थशब्द उच्चारला आहे तरी त्याचा 'क्षुभ् धातूचा मन्थाशीं संबंध असतांना' असा अर्थ होण्याचा संभव आहे म्हणून हें वार्तिक केलें आहे.

ध्वान्तं तमोऽभिधान इति वक्तव्यम् । ध्वनितं तमसेत्येवान्यत्र ॥

**धृषिशसी वैयात्ये ॥ ७।२।१९ ॥**

किमिदं वैयात्य इति । वियातभावो वैयात्यम् ॥

**दृढः स्थूलबलयोः ॥ ७।२।२० ॥**

दृढनिपातनं किमर्थं न दृहेर्नेड् भवतीत्येवोच्येत ।

**दृढनिपातनं नकारहकारलोपार्थं परस्य च ढत्वार्थम् ॥ १ ॥**

दृढनिपातनं क्रियते नकारहकारलोपार्थम् । नकारहकारलोपो यथा स्यात् । परस्य च ढत्वार्थम् । परस्य च ढत्वं यथा स्यात् ॥

**अनिड्वचने हि रभावाप्रसिद्धिरलघुत्वात् ॥ २ ॥**

अनिड्वचने हि रभावस्याप्रसिद्धिः । द्रढीयान् । किं कारणम् । अलघुत्वात् ॥

**नलोपवचनं च ॥ ३ ॥**

नलोपश्च वक्तव्यः ॥ इह च परिद्रढय्य गतः ल्यपि लघुपूर्वस्य ( ६.४.५६ ) इत्यया-

---

( वा. ३ ) अंधार हा अर्थ असतांना ' ध्वान्त ' असें निष्ठाप्रत्ययान्त रूप होतें असें बोलावें, म्हणजे इतर ठिकाणीं ' ध्वनितं तमसा ' असाच शब्दप्रयोग होईल.

( सू. १९ ) वैयात्य म्हणजे काय ?

वियाताचा स्वभाव म्हणजे वैयात्य. वियात[2] म्हणजे विनयशून्य.

( सू. २० ) दृढ असें निपातन सांगण्याचें कारण काय ? दृह् धातूच्या पुढें निष्ठाप्रत्ययाला इडागम होत नाहीं असें कां सांगू नये ? ही शंका दूर करण्याकरितां वार्तिकः--

( वा. १ ) दृढ असा शब्द निपातन म्हणून येथें दिला आहे; उद्देश काय तर नकार व हकार यांचा लोप व्हावा हा. दृंह् या धातूमधील जे नकार व हकार त्यांचा लोप[2] व्हावा हा निपातनाचा उद्देश आहे. तसेंच धातूच्या पुढील व्यंजनाला ढत्व होण्याकरितांही निपातन सांगणें जरूर आहे. धातूच्या पुढें असलेला जो निष्ठाप्रत्ययाचा तकार त्याला ढकार व्हावा हाही निपातन करण्याचा उद्देश आहेच. एवढेंच नव्हे तर--

( वा. २ ) जर दृह् या धातूच्या पुढें निष्ठाप्रत्ययाला इडागम होत नाहीं असें म्हटलें तर द्रढीयान्[3] या रूपांत ऋकाराला रेफादेश होणार नाहीं. कारण ' र ऋतो हलादेर्लघोः ' ( ६ । ४ । १६१ ) या सूत्रानें ऋकाराला ' र ' आदेश होण्यास ऋकार लघु असावा लागतो व येथें 'ढो ढे लोपः' ( ८।३। १३ ) यानें दोन ढकारांपैकीं पूर्वीच्या ढकाराचा झालेला लोप 'र ऋतो०' या सूत्रानें कार्य कर्तव्य असतांना असिद्ध ( ८।२।१ ) असल्यामुळें ऋकार हा संयुक्त व्यंजन पुढें आल्याकारणानें लघु राहत नाहीं.

( वा. ३ ) तसेंच 'इडागम होत नाहीं' म्हटल्यास दृह् धातूच्या नकाराचा पण लोप सांगावा लागेल. कारण दृंह् धातूचा इकार इत् असल्यामुळें 'अनिदिताम् ०' (६।४।२४) या सूत्रानें नकाराचा लोप होणार नाहीं. शिवाय ' परिद्रढय्य[4] गतः' येथें 'ल्यपि लघुपूर्वात्' ( ६ । ४ । ५६ ) या सूत्रानें ऋकार हा संयोगपूर्वकत्वामुळें गुरु अस-

---

१. ( सू. १९ ) दांडगेपणा हा अर्थ गम्यमान असेल तरच धृष् आणि शस् या धातूंच्या पुढील निष्ठाप्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० धृष्टोऽयं, विशस्तोऽयम्.

२. वि म्हणजे विपरीत आहे यात म्हणजे वर्तन ज्याचें अशीं वियात या शब्दाची व्युत्पत्ति आहे.

१ ( सू. २० ) स्थूल किंवा बलवान् हा अर्थ गम्यमान असतांना 'दृढ' असा शब्द निपातिला जातो.

२. हकाराला ढकार ( ८।२।३१ ) होऊन त्याचा लोप ( ८।३।१३ ) होईलच.

३. अतिशयेन दृढः द्रढीयान्. येथें दृढ शब्दाहून ईयसुन् ( ५।३।५७ ) प्रत्यय केला आहे.

४. परिदृढ या शब्दाहून 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे०' या गणसूत्रानें णिच् प्रत्यय करून पुढें क्त्वा प्रत्यय (३।४।२१) केला आहे व त्याला ल्यबादेश (७।१।३७) झाला आहे.

देशो न स्यात् । इह च पारिद्दढी कन्येति गुरूपोत्तमलक्षणः ष्यङ् प्रसज्येत ॥

प्रभौ परिवृढः ॥ ७।२।२१ ॥

परिवृढ इति किमर्थं निपात्यते न परिपूर्वाद् वृहेर्नेड् भवतीत्येवोच्येत ।

परिवृढनिपातनं च ॥ १ ॥

किम् । नकारहकारलोपार्थं परस्य च ढत्वार्थमनिड्वचने हि रभावाप्रसिद्धिरलघुत्वान्नलोपवचनं चेत्येव । परिव्रढीयानिति र ऋतो हलादेर्लघोः ( ६. ४. १६१ ) इति रभावो न स्यात् । इह च परिव्रढय्य गत इति ल्यपि लघुपूर्वस्य (६.४.५६) इत्ययादेशो न स्यात् । इह च पारिवृढी कन्येति गुरूपोत्तमलक्षणः ष्यङ् प्रसज्येत ॥

[कृच्छ्रगहनयोः कषः ॥ ७।२।२२ ॥]

घुषिरविशब्दने ॥ ७।२।२३ ॥

किमर्थमविशब्दन इत्युच्यते न विशब्दने चुरादिणिचा भवितव्यम् ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदयमविशब्दन इत्याह तज्ज्ञापयत्याचार्यो विशब्दने घुषेर्विभाषा णिज्भवतीति ।

---

त्यामुळे त्याच्या पुढील णि प्रत्ययाला अय् आदेश होणार नाहीं, आणि 'पारिद्दढी कन्या' येथे उपोत्तम म्हणजे अन्त्य वर्णाजवळचा वर्ण ऋकार हा गुरु असल्यामुळें 'अणिञोरनार्षयोर्गुरूपोत्तमयोः ष्यङ् गोत्रे' (४।१।७८) या सूत्रानें गोत्र या अर्थी स्त्रीलिंगविवक्षा असतांना ष्यङ् प्रत्यय होईल.

(सू. २१) परिवृढ असें निपातन करण्याचें काय कारण? परि-उपसर्गयुक्त वृह् धातूच्या पुढील निष्ठेला इडागम होत नाहीं असें कां सांगू नये? ही शंका दूर करण्याकरितां वार्तिककार वार्तिक लिहितातः --

( वा. १ ) परिवृढ हेंही निपातन म्हणूनच दिलें आहे. कशाकरितां तर, नकार व हकार याचा लोप व्हावा व तकाराला ढकार व्हावा; निपातन न करितां जर केवळ निष्ठेला इडागम होत नाहीं असें म्हटलें तर ऋकार हा लघु नसल्यामुळें त्याला 'र' आदेश होणार नाहीं, तो सांगावा लागेल; व नकाराचाही लोप सांगावा लागेल. परिव्रढीयान् या उदाहरणामध्ये 'र ऋतो हलादेर्लघोः' या सूत्रानें र आदेश होणार नाहीं. तसेंच 'परिव्रढय्य गतः' या स्थलीं 'ल्यपि लघुपूर्वात्' या सूत्रानें अय् आदेश होणार नाहीं. त्याचप्रमाणें 'पारिवृढी कन्या' या ठिकाणीं वृढ येथील ऋकार हा संयोग पुढें असल्यामुळें गुरु मानला जाऊन ष्यङ् हा गोत्रार्थी तद्धितप्रत्यय होऊं लागेल.

(सू. २३) या सूत्रांत 'अविशब्दने' हा शब्द कशाकरितां घातला आहे? घालण्याचें काहीं कारण नाहीं. भ्वादि गणांतील घुष् धातु 'अविशब्दन' या अर्थी असतो म्हणजे विशब्दनाशिवाय दुसऱ्या कोणत्याही अर्थी आहे. 'विशब्दन' या अर्थी घुष् धातु चुरादि गणांत सांगितला आहे. त्याच्यापुढें णिच् हटकून असणारच ( ३।१।२५ ). तेव्हा आपोआपच 'घुषिः' एवढेंच सूत्र केलें तरी 'अविशब्दन' या अर्थी असणाऱ्याच भ्वादि गणांतील घुष् धातूला हें सूत्र लागू पडेल. याप्रमाणें काम भागत असतांना ज्या अर्थी आचार्य पाणिनि 'अविशब्दने' शब्द उच्चारतात त्या अर्थी ते सुचवितात कीं विशब्दन या अर्थी असणाऱ्या चौरादिक धातूहून णिच् विकल्पानें होतो.

---

५ परिद्दढस्य गोत्रापत्यं स्त्री पारिद्दढी, म्हणजे परिद्दढाची नात.

१. ( सू. २१ ) प्रभु या अर्थी परिवृढ असा शब्द निपातिला जातो.

१. ( सू. २२ ) कष्ट किंवा गहन म्हणजे कठिण हा अर्थ गम्यमान असतांना कष् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० कष्टं व्याकरणम्.

१. ( सू. २३ ) शब्दानें आपल्या मनांतील अर्थ प्रकट करणें याला विशब्दन म्हणतात; विशब्दनाशिवाय दुसऱ्या कोणत्याही अर्थी घुष् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० घुष्टा रज्जुः.

२. तेव्हा त्या विशब्दनार्थक घुष् धातूहून निष्ठाप्रत्ययच करतां येत नाहीं.

किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् ।

महीपालवचः श्रुत्वा जुघुषुः पुष्यमाणवाः एष प्रयोग उपपन्नो भवति ॥

[अर्देः संनिविभ्यः ॥ ७।२।२४ ॥
अभेश्चाविदूर्ये ॥ ७।२।२५ ॥ ]
णेरध्ययने वृत्तम् ॥ ७।२।२६ ॥

किमिदमध्ययनाभिधायिकायां निष्ठायां निपातनं क्रियत आहोस्विदध्ययने चेद् वृतिर्वर्तत इति । किं चातः । यद्यध्ययनाभिधायिकायां निष्ठायां निपातनं क्रियते सिद्धं वृत्तो गुणः वृत्तं पारायणम् वृत्तं गुणस्य वृत्तं पारायणस्येति न सिध्यति । अथ विज्ञायतेऽध्ययने चेद् वृतिर्वर्तत इति न दोषो भवति । यथा न दोषस्तथास्तु ॥ अध्ययने चेद् वृतिर्वर्तत इत्यपि वै विज्ञायमाने न सिध्यति । किं कारणम् । वृतिरयमकर्मकः । अकर्मकाश्चापि ण्यन्ताः सकर्मका भवन्ति । अकर्मकश्चात्र वृतिः । कथं पुनर्ज्ञायतेऽकर्मकोऽत्र वृतिरिति । अकर्मकाणां भावे क्तो भवतीत्येवमत्र भावे क्तो भवति । तत्रोदितः क्त्वि विभाषा यस्य

---

हें सुचविण्याचा उपयोग काय ?

'महीपालवचः श्रुत्वा जुघुषुः पुष्यमाणवाः' या वाक्यातील 'जुघुषुः' हा प्रयोग साधला जातो.

( सू. २६ ) बरें पण, या सूत्रांत 'वृत्त' हें निष्ठेचें रूप निपातन म्हणून दिलेलें आहे तें निष्ठेचा अर्थ अध्ययन असतांना सांगितलें आहे कीं अध्ययन या अर्थी असलेल्या वृत् धातूचें रूप निपातन म्हणून सांगितलें आहे ?

दोहोंमध्यें फरक काय ?

जर निष्ठेचा अर्थ अध्ययन असतांना हें रूप निपातन सांगितलें आहे असें समजलें तर 'वृत्तो गुणः' 'वृत्तं पारायणम्' हे प्रयोग बरोबर ठरतात; पण 'वृत्तं गुणस्य', 'वृत्तं पारायणस्य' हे प्रयोग बरोबर ठरत नाहींत. कारण येथें वृत्त या शब्दाचा अध्ययन हा अर्थ नाहीं. जर 'अध्ययन या अर्थी वृत् धातूचा प्रयोग केला असला तर' असा प्रस्तुत सूत्राचा अर्थ समजला तर कोणताही दोष येत नाहीं.

ज्या रीतीनें कोणताही दोष येत नाहीं ती रीत स्वीकारावी.

अध्ययन ( अध्ययनाचें वर्तन ) या अर्थी वृत् धातूचा प्रयोग केला असला तर, असा अर्थ करूनही 'वृत्त गुणस्य' हें णिप्रत्ययान्त वृत् धातूचें रूप साधत नाहीं.

तें काय म्हणून ?

वृत्तं गुणस्य, वृत्तं पारायणस्य, या ठिकाणीं वृत् धातु अकर्मक आहे खरा, पण अकर्मक धातूंना णिच् जोडला म्हणजे ते सकमक होतात, आणि प्रस्तुत उदाहरणांत वृत् धातु अकर्मकच घेतला पाहिजे.

प्रस्तुत उदाहरणांत वृत् धातु अकर्मक पाहिजे हें कसे समजतें ?

भाव या अर्थी निष्ठाक्तप्रत्यय अकर्मक धातूंनाच लावला जातो व प्रस्तुत 'वृत्तं गणस्य' या उदाहरणांत भाव या अर्थीच निष्ठाक्तप्रत्यय लावला आहे. तेव्हा येथें वृत् धातु अकर्मक आहे, तेव्हां अर्थातच तो णिच्रहित आहे; व त्याचा उकार इत् असल्यामुळें त्याच्यापुढें क्त्वा प्रत्ययाला इडागमाचा विकल्प होतो (७।२।५६) व म्हणून त्याच्या पुढील निष्ठाप्रत्ययाला 'यस्य

---

१. ( सू. २४ ) सम्, नि किंवा वि उपसर्ग असतांना अर्द् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० समर्णः, न्यर्णः, वर्णः.

१. (सू. २५) अभि हा उपसर्ग असतांना अर्द् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाला इडागम होत नाहीं, परंतु सामीप्य हा अर्थगम्यमान असेलतर; उदा.अभ्यर्णम्.

१. ( सू. २६ ) वृत् धातूहून णि प्रत्यय करून त्याच्यापुढें क्तप्रत्यय केला असतां येथें वृत्त असा शब्द निपातन केला आहे; परंतु वृत् धातूचा अर्थ अध्ययन असला पाहिजे; उदा० वृत्तो गुणो देवदत्तेन.

२. गुण म्हणजे पदें, क्रम, वगैरे.

३. कारण येथें भावे क्तप्रत्यय केला आहे.

विभाषा ( ७. २. १५ ) इतीट्प्रतिषेधो भविष्यति ।। अथ णिग्रहणं किमर्थम् ।

**वृत्तनिपातने णिग्रहणमण्यन्तस्यावधारणप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

वृत्तनिपातने णिग्रहणं क्रियतेऽण्यन्तस्यावधारणं मा भूदिति ।। कैमर्थक्यान्नियमो भवति । विधेयं नास्तीति कृत्वा । इह चास्ति विधेयम् । किम् । ण्यधिकाद् वृतेरिट्प्रतिषेधो विधेयः । तत्रापूर्वो विधिरस्तु नियमोऽस्त्वित्यपूर्व एव विधिर्भविष्यति न नियमः ।। कुतो नु खल्वेतदधिकार्थे आरम्भे सति ण्यधिकस्य भविष्यति न पुनः सनधिकस्य वा स्याद्यङधिकस्य वेति । तस्माण्णिग्रहणं कर्तव्यम् ॥ अथ किमर्थं निपातनं क्रियते ।

**निपातनं णिलोपेड्गुणप्रतिषेधार्थम् ॥२॥**

निपातनं क्रियते णिलोपार्थमिड्गुणप्रतिषेधार्थं च ॥

**वा दान्तशान्तपूर्णदस्तस्पष्टच्छन्नज्ञप्ताः ॥ ७।२।२७ ॥**

अथ दान्तशान्तयोः किं निपात्यते ।

**दान्तशान्तयोरुपधादीर्घत्वं च ॥ १ ॥**

---

विभाषा' या सूत्रानें इडागमाचा निषेध होईलच; निपातन करण्याचें कारण नाहीं.

तर मग सूत्रांत 'णि' शब्द कशाकरितां घातला आहे ?

( वा. १ ) वृत्त शब्दाचें प्रस्तुत सूत्रांत निपातन करतांना णि शब्द घातला आहे, त्याचा ण्यन्तरहिताबद्दल नियम करण्यांत येऊं नये हा हेतु होय. कोठेंही नियम करावयाचा म्हणजे व्यर्थता आली असतां नियम करावयाचा. व्यर्थता येते ती जेथें कांहीं नवीन सांगितलें जात नाहीं तेथें. प्रस्तुत ठिकाणीं तर णिजन्त वृत् धातूला इडागमाचा निषेध हा नवीन सांगतां येतो, तेथें दुसऱ्या कोणत्याही सूत्रानें निषेध प्राप्त होत नाहीं. तेव्हां अपूर्वविधि समजावा किंवा नियम समजावा अशी शंका उपस्थित झाली असतां अपूर्वविधि मागणेंच रास्त आहे. नियम मानणें रास्त नव्हे.

पण वृत् धातूपासून साधल्या जाणाऱ्या दुसऱ्या णिजन्त, सन्नन्त, वगैरे धातूंपैकीं णिजन्ताहूनच 'वृत्त' रूप व्हावें, सन्नन्त किंवा यङन्त यापासून होऊं नये, हें कशावरून समजावयाचें ?

हें समजण्यास मार्ग एकच. सूत्रांत णि शब्द उच्चारणें. तेव्हां सूत्रांत णि शब्द उच्चारावा !

बरें, वृत् धातूचें णिजन्ताचें 'वृत्त' हें निपातन कोणकोणत्या हेतूंनीं करावयाचें ?

( वा. २ ) निपातन करण्याचे हेतु णिलोप, इडागमाचा प्रतिषेध व गुणाचा प्रतिषेध हे होत.

( सू. २७ ) दान्त आणि शान्त हीं निपातनें सांगण्यांत कोणकोणत्या गोष्टी करावयाच्या म्हणून सांगितल्या जातात ?

( वा. १ ) दान्त व शान्त हीं निपातनें सांगण्यांत उपधेला दीर्घही ज्यास्ती सांगण्यांत येतो.

---

४. णि शब्द घातला नाहीं तर साध्या वृत् धातूकरितां हें सूत्र नको; तेव्हां तें नियमार्थ होईल. तो नियम असा:–उदित् धातूला जर ' यस्य विभाषा ' हें सूत्र लावावयाचें तर अध्ययनार्थक वृत् धातूलाच लावावें तेव्हां, इतर उदित् धातूला तें सूत्र लागणार नाहीं हा दोष येतो, याकरितां ' णेः' असें म्हटलें आहे.

५. साध्या वृत् धातूपुढील निष्ठा प्रत्ययाला इडागमाचा निषेध सिद्ध ( ७।२।१५ ) असल्यामुळें सामर्थ्यास्तव हें सूत्र णिप्रत्ययान्ताला लागू होईल. अशा रीतीनें 'णेः' पदावांचून काम भागतें, आणि सूत्र विध्यर्थ होतें. विधि संभवत असतांना नियम मानणें योग्य नाहीं. कारण नियम मानला असतां प्राप्त झालेल्या शास्त्राचा बाध करावा लागतो हें गौरव होतें.

१. ( सू. २७ ) णिप्रत्ययान्त दम्, शम्, पूर्, दस्, स्पश्, छद्, ज्ञप्, या धातूंहून क्त प्रत्यय केला असतां तेथें दान्त, शान्त, पूर्ण, दस्त, स्पष्ट, छन्न, आणि ज्ञप्त अशीं निपातनें विकल्पानें समजावीं. एकदां दमित, शमित, पूरित, दसित, स्पशित, छादित आणि ज्ञपित अशींही रूपें होतात.

किं च । णिलोपेट्प्रतिषेधौ च ॥ उपधादीर्घत्वमनिपात्यम् । वृद्ध्या सिद्धम् । न सिध्यति । मितां ह्रस्वः ( ६.४.९२) इति ह्रस्वत्वेन भवितव्यम् । एवं तर्ह्यनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति ( ६. ४. १५ ) इत्येवमत्र दीर्घत्वं भविष्यति । न सिध्यति , किं कारणम् । णिचा व्यवहितत्वात् । णिलोपे कृते नास्ति व्यवधानम् । स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावो दीर्घविधिं प्रति न स्थानिवदिति ॥

अथ स्पष्टच्छन्नयोः किं निपात्यते ।

**स्पष्टच्छन्नयोरुपधाह्रस्वत्वं च ॥ २ ॥**

किं च । णिलोपेट्प्रतिषेधौ च ॥

**रुष्यमत्वरसंघुषास्वनाम्[1] ॥७।२।२८॥**

**घुषिस्वनोर्वावचनमिट्प्रतिषेधाद्विप्रतिषेधेन ॥ १ ॥**

घुषिस्वनोर्वावचनमिट्प्रतिषेधाद्भवति विप्रतिषेधेन । घुषेरिट्प्रतिषेधस्यावकाशोऽसंपूर्वादविशब्दनम् । घुष्टा रज्जुः घुष्टो मार्गः । वावचनस्यावकाशः संपूर्वाद्विशब्दनम् । संघुष्टं वाक्यम् संघुषितं वाक्यम् । संपूर्वादविशब्दन

---

ज्यास्ती कोणापेक्षा ?

अर्थात् णिलोप आणि इडागमनिषेध यांपेक्षां मागील वार्तिकांत सांगितलेले णिलोप व इडागमनिषेध होतात, आणि शिवाय उपधेला दीर्घही होतो.

उपधेला दीर्घ सांगण्याची जरूर नाहीं. कारण णिचाच्या निमित्तानें वृद्धि ( ७।२।११५ ) होऊन अकाराला आकार होईल व काम भागेल.

काम भागणार नाहीं. कारण वृद्धि झाल्यावर 'मितां ह्रस्वः'(६।४।९२) या सूत्रानें दीर्घ आकाराला ऱ्हस्व आकार होईल.

तर मग 'अनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति' (६।४।१५) या सूत्रानें येथें दीर्घ होईल.

तरीही रूप साधणार नाहीं; कारण दीर्घ होणार नाहीं.

काय म्हणून ?

अनुनासिक वर्ण व आरंभीं झल् असलेला कित् प्रत्यय यांच्यामध्यें णिच् येतो म्हणून.

णिचाचा लोप केल्यावर णिच् मध्यें येत नाहीं.

जरी लोप झाला तरी स्थानिवद्भावानें (१।१।५७) णिच् आहे असें समजलें जाईल व तो अनुनासिक वर्ण आणि कित् प्रत्यय यांच्या मध्यें येईल.

पण या ठिकाणीं 'न पदान्त०' (१।१।५८) या सूत्रानें स्थानिवद्भावाचा निषेध सांगितला आहे; दीर्घ कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असें तेथें सांगितलें आहे.

बरें, स्पष्ट व छन्न हीं निपातनें सांगण्यात कोणकोणत्या गोष्टी करावयाच्या म्हणून सांगितल्या आहेत ?

(वा. २) स्पष्ट व छन्न हीं निपातनें सांगण्यांत उपधेला ऱ्हस्वही ज्यास्ती सांगण्यांत येतो.

ज्यास्ती म्हणजे काय ? ज्यास्ती कोणापेक्षां ?

अर्थात् णिलोप आणि इडागमाचा निषेध यांपेक्षां.

( सू. २८, वा. १ ) घुष् व स्वन् या धातूंना प्रस्तुत सूत्रानें सांगितलेला इडागमाचा विकल्प 'घुषिरविशब्दने' (८।२।२३) व 'क्षुब्धस्वान्त०' (७।२।१८) या सूत्रांनीं सांगितलेल्या इडागमनिषेधाचा बाध करून प्रवृत्त होतो. दोघानाही स्वतंत्र उदाहरणें सांपडतात. घुष् धातूला इडागमनिषेधाचें स्थल सम् उपसर्ग न लावलेल्या व अविशब्दन अर्थ असलेल्या घुष् धातूचें निष्ठेचें रूप 'घुष्टा रज्जुः' 'घुष्टो मार्गः' वगैरे; येथें विकल्पाची प्राप्तीही नाहीं. विकल्पाचें स्थल सम् उपसर्ग लावलेल्या व विशब्दन अर्थ असलेल्या घुष् धातूचें निष्ठेचें रूप 'संघुष्टं वाक्यं, संघुषितं वाक्यम्'; येथें इडागमनिषेधाची प्राप्तीही नाहीं. सम् उपसर्ग जोडलेल्या व विशब्दनभिन्न अर्थ पुढील निष्ठा प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो.

---

१. ( सू. २८ ) रुष्, अम्, त्वर्, सम्–उपसर्गपूर्वक घुष् आणि आ–उपसर्गपूर्वक स्वन् या धातूंच्या

उभयं प्राप्नोति । संघुष्टा रज्जुः संघुषिता रज्जुः । वावचनं भवति विप्रतिषेधेन ॥ स्वन इट्प्रतिषेधस्यावकाशोऽनाङ्पूर्वान्मनोऽभिधानम् । स्वान्तं मनः । वावचनस्यावकाश आङ्पूर्वादमनोऽभिधानम् । आस्वान्तो देवदत्तः आस्वनितो देवदत्तः । आङ्पूर्वान्मनोऽभिधान उभयं प्राप्नोति । आस्वान्तं मनः आस्वनितं मनः । वावचनं भवति विप्रतिषेधेन ॥

**[1]हृषेर्लोमसु ॥ ७।२।२९ ॥**

हृषेर्लोमकेशकर्तृकस्येति वक्तव्यम् । हृष्टानि लोमानि हृषितानि लोमानि । हृष्टं लोमभिः हृषितं लोमभिः । हृष्टाः केशाः हृषिताः केशाः । हृष्टं केशैः हृषितं केशैः ॥

विस्मितप्रतिघातयोरिति वक्तव्यम् । हृष्टो देवदत्तः हृषितो देवदत्तः । हृष्टा दन्ताः हृषिता दन्ताः ।

**[1]अपचितश्च ॥ ७।२।३० ॥**

अपचित इति किं निपात्यते । चायश्चिभावो निपात्यते । अपचितः ॥

क्तिनि नित्यमिति वक्तव्यम् ॥ अपचितिः ॥

**[ [1]हु ह्वरेश्छन्दसि ॥ ७।२।३१ ॥**

**[1]अपरिह्वृताश्च ॥ ७।२।३२ ॥**

**[1]सोमे ह्वरितः ॥ ७।२।३३ ॥**

**[1]ग्रसितस्कभितस्तभितोत्तभित-**

---

असलेल्या घुष् धातूचें निष्ठेचें रूप घेतल्यास विकल्प व निषेध दोन्ही प्राप्त होतात; उदाहरणार्थ, 'संघुष्टा रज्जुः', 'संघुषिता रज्जुः' येथें; आणि दोन्हींचा विरोध आल्यावर दोन्हींपैकीं पर कार्य म्हणजे विकल्प निषेधाचा बाध करून होतो. त्याचप्रमाणें स्वन् धातूला इडागमाच्या निषेधाचें स्थल आ उपसर्ग पूर्वी नसतां 'मन' अर्थ असलेला 'स्वान्त'शब्द. विकल्पाचें स्थल आ उपसर्ग पूर्वी असलेलें व 'मन' अर्थ नसलेलें स्वन् धातूचें निष्ठेचें रूप; उदाहरणार्थ 'आस्वान्तो देवदत्तः, आस्वनितो देवदत्तः'. पण आ पूर्वी असलेलें व मन अर्थ असलेलें जें स्वन् धातूचें निष्ठेचें रूप तेथें दोन्ही कार्यें उपस्थित होतात व त्यांचा विरोध आला असता परत्वामुळें विकल्प होतो, व आस्वान्तं मनः, आस्वनितं मनः असे प्रयोग होतात.

(सू. २९) लोम शब्द किंवा केश शब्द कर्ता असतांना हृष् धातूच्या पुढें निष्ठा प्रत्ययाला इडागमाचा विकल्प होतो, असें म्हणावें; उदा० हृष्टानि लोमानि, हृषितानि लोमानि, हृष्टं लोमभिः हृषितं लोमभिः, हृष्टाः केशाः, हृषिताः केशाः, हृष्टं केशैः, हृषितं केशैः. आश्चर्यचकित किंवा कुंठित या अर्थी प्रयोग केलेल्या हृष् धातूच्याही पुढें निष्ठा प्रत्ययाला इडागमाचा विकल्प होतो, असें बोलावें; उदाहरणार्थ : हृष्टो देवदत्तः, हृषितो देवदत्तः, हृष्टा दन्ताः, हृषिता दन्ताः.

(सू. ३०) सूत्रांतील 'अपचित' शब्दानें कोणकोणत्या गोष्टी सांगितल्या आहेत ?

'चाय्' धातूला 'चि' आदेश होतो असें सांगितलें आहे; उदा० अपचितः.

क्तिन् प्रत्यय पुढें असतांना 'चाय्' धातूला चि आदेश नित्य होतो असें बोलावें; उदा० अपचितिः.

---

१ (सू. २९) लोम कर्ता असतांना हृष् धातूच्या पुढील निष्ठाप्रत्ययाला इट् आगम विकल्पानें होतो; उदा० हृष्टं, हृषितं लोम.

१. (सू. ३०) अपउपसर्गपूर्वक चाय् धातूहून क्त प्रत्यय केला असतां तेथें 'अपचित' असें निपातन विकल्पानें केलें जातें; उदा० अपचितः, अपचायितः.

१. (सू. ३१) वेदामध्यें ह्वृ धातूला ह्रु असा आदेश निष्ठाप्रत्यय पुढें असतांना होतो, उदा० अह्रुतमसि हविर्धानम्.

१. (सू. ३२) तसेंच वेदामध्यें अपरिह्वृत असें निपातन केलें जातें; तेथें ह्रु आदेश होत नाहीं.

१. (सू. ३३) सोमाचा संबंध असेल तर ह्वृ धातूहून क्त प्रत्यय केला असतां ह्वरित असें वेदामध्यें निपातन केलें जातें.

१. (सू. ३४) ग्रस् धातूला क्त प्रत्यय लागून ग्रस्त असें रूप होतें त्याच्या ऐवजीं वेदामध्यें ग्रसित असें निपातन केलें जातें; तसेंच स्कब्ध, स्तब्ध, उत्तब्ध, चत्त, विकस्त, विशस्तृ, शंस्तृ, शास्तृ,

**चत्तविकस्ता विशस्तृशंस्तृशास्तृतरुतृतरूतृवरुतृवरूतृवरूत्री-रुज्ज्वलिति क्षरिति क्षमिति वमित्यमितीति च ॥ ७।२।३४ ॥ ]**

**आर्धधातुकस्येड् वलादेः ॥७।२।३५॥**

आर्धधातुकग्रहणं किमर्थम् । यथा वलादिग्रहणमार्धधातुकविशेषणं विज्ञायेत । वलादेरार्धधातुकस्येति ॥ अथाक्रियमाण आर्धधातुकग्रहणे कस्य वलादिग्रहणं विशेषणं स्यात् । अङ्गस्येति वर्तते । अङ्गविशेषणम् । तत्र को दोषः । अङ्गस्य वलादेरादित इट् प्रसज्येताडाड्वत् । तद्यथाडाटावङ्गस्यादितो भवतस्तद्वत् ॥ क्रियमाणेऽप्यार्धधातुकग्रहणेऽनिष्टं शक्यं विज्ञातुम् । वलादेरार्धधातुकस्य यदङ्गमिति । अक्रियमाणे चेष्टम् । अङ्गस्य यो वलादिरिति । किं चाङ्गस्य वलादिः । निमित्तम् । यस्मिन्नङ्गमित्येतद्भवति । कस्मिंश्चैतद्भवति । प्रत्यये । यावता क्रियमाणे चानिष्टं विज्ञायतेऽक्रियमाणे चेष्टं तत्राक्रियमाण एवेष्टं विज्ञास्यामः ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । इह मा भूत् । आस्ते शेते ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । रुदादिभ्यः सार्वधातुके [७. २.

---

( सू. ३५ ) या सूत्रात 'आर्धधातुक' शब्द कशाकरिता घातला आहे ?

अशाकरितां कीं 'वलादेः' हा शब्द 'आर्धधातुकस्य' या शब्दाला विशेषण म्हणून लागावा व 'वलादि जो आर्धधातुक' असा अन्वय व्हावा.

बरें तर, आर्धधातुक हा शब्द सूत्रात घातला नाहीं तर वलादेः हा शब्द कोणत्या शब्दाचें विशेषण होईल ?

'अङ्गस्य' हा अधिकार चालू असल्यामुळें 'अङ्गस्य' हे पद येथे आहेच, तेव्हा 'वलादेः' हें पद 'अङ्गस्य' या पदाचें विशेषण होईल.

तसें झाल्यास काय दोष येईल ?

कां बरें ? वलादि अशा अगाला इडागम होतो, असा अर्थ होऊन अट व आट् याप्रमाणें अंगाच्या आरंभीं इकार लावण्यांत येईल. अट् व आट् हे आगम जसे अंगाच्या आरंभीं लावले जातात त्याप्रमाणें इकारहि आरंभींच लावला जाईल.

मग 'आर्धधातुक' शब्द घातला तरी 'वलादि जो आर्धधातुक प्रत्यय त्याचें जें अग त्या अंगाला' असा अनिष्ट अर्थ होऊ शकतो; तसेंच 'आर्धधातुक' शब्द घातला नाहीं तरी इष्ट जो वाक्यार्थ तो होऊं शकतोः—अगाचा जो वलादि, वगैरे वगैरे. अगाचा वलादि कशा प्रकारचा ? निमित्त. जो पुढें असतांना मागें अग असें काहीं असते असा. काय पुढें असतांना मागें अंग असें काहीं असतें ? अर्थात् प्रत्यय. तेव्हां अंगाचा जो वलादि प्रत्यय तो पुढें असताना त्या प्रत्ययाला इडागम होतो, असा इष्ट वाक्यार्थ होतो. एकंदरींत आर्धधातुक हा शब्द घातला तरी अनिष्ट वाक्यार्थ होतो आणि न घातला तरी इष्ट वाक्यार्थ होतो, अशी गोष्ट आहे. तेव्हा आर्धधातुक हा शब्द न घालताही इष्ट वाक्यार्थ होतो तोच घेतां येईल. साराश, आर्धधातुक शब्दाचा काहीं उपयोग नाहीं.

बरें तर, आर्धधातुक शब्दाचा उपयोग सांगण्यात येईल कीं आस्ते, शेते वगैरे ठिकाणीं सार्वधातुक प्रत्यय पुढें असतां सार्वधातुकाला इडागम होऊ नये.

हाही उपयोग देता येत नाहीं. कारण सार्वधातुक व आर्धधातुक या दोन्ही प्रत्ययांना इडागम होऊ लागल्यास 'रुदादिभ्यः सार्वधातुके' हें

---

तरितृ, तरीतृ, वरितृ वरीतृ वरीत्री, उज्ज्वलति क्षरति, क्षमति वमति, आणि अमति अशीं रूपें लोकामध्यें होतात; त्यांच्या ऐवजीं वेदामध्यें क्रमानें स्कभित, स्तभित उत्तभित चत्त विकस्त, विशस्तृ, शंस्तृ शास्तृ, तरुतृ तरूतृ वरुतृ, वरूतृ वरूत्री, उज्ज्वलिति क्षरिति, क्षमिति, वमिति, आणि अमिति अशीं रूपें निपातित केलीं जातात.

१ ( सू. ३५ ) वल् प्रत्याहारांतील वर्ण ज्याचा आदि आहे अशा आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होतो; उदा० भविता, भविष्यति.

७६] इत्येतन्नियमार्थं भविष्यति । रुदादिभ्य एव सार्वधातुक इड् भवति नान्येभ्य इति ॥ एवमपि वृक्षत्वम् वृक्षता अत्र प्राप्नोति । नैष दोषः । धातोरिति वर्तते । एवमपि लूभ्याम् पूभ्याम् अत्र प्राप्नोति । एवं तर्हि विहितविशेषणं धातुग्रहणम् । धातोर्यो विहितः । ननु धातोरेवायं विहितः । न चायं धातोरित्येवं विहितः ॥ क्व पुनर्धातुग्रहणं प्रकृतम् । ऋत इद्धातोः [ ७. १. १०० ] इति । तद्वै षष्ठीनिर्दिष्टं पञ्चमीनिर्दिष्टेन चेह विहितः शक्यते विशेषयितुम् । अथेदानीं षष्ठीनिर्दिष्टेन चापि विहितः शक्यते विशेषयितुं शक्यमार्धधातुकग्रहणमकर्तुमिति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये सप्तमस्याध्यायस्य द्वितीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

सूत्र नियम म्हणून समजलें जाईल व सार्वधातुक प्रत्ययाला इडागम जर होईल तर रुद् वगैरे धातूंच्या पुढेंच होईल असा 'रुदादिभ्यः०' याचा अर्थ केला जाईल, व आस्ते, शेते येथील दोष टाळतां येईल.

असें जरी झालें तरी वृक्षत्वम्, वृक्षता, या ठिकाणीं प्रस्तुत सूत्रांत आर्धधातुक शब्द न घातल्यास त्व व तल् या प्रत्ययांना इट् होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'धातोः' हें पद प्रस्तुत सूत्रांत अनुवृत्तीनें आलें आहे.

तरी पण लूभ्याम्, पूभ्याम्, येथें इडागम होऊं लागेल. कारण क्विप् प्रत्यय पुढें केला तरी लू व पू हे धातू समजले जातात.

असें झाल्यास धातोः हा शब्द धातूहून पुढें केलेला असा अर्थ करून प्रत्ययाला विशेषण लावूं.

मग त्यांत काय ? लूभ्याम्, पूभ्याम्, येथें भ्याम् हा प्रत्यय धातूहूनच पुढें केला आहे.

पण 'धातोः' असा शब्द उच्चारून धातूच्या निमित्तानें धातूहून पुढें केला नाहीं.

पण-येथें 'धातोः' हा शब्द अनुवृत्त होण्याला धातु शब्द मागें कोठें घातला आहे कीं जो येथें अनुवृत्त होऊं शकेल ?

'ऋत इद्धातोः' ( ७।१।१०० ) येथें धातु शब्द आहे तो प्रस्तुत सूत्रांत येईल.

पण तो धातोः शब्द षष्ठीविभक्तींत उच्चारला आहे, प्रस्तुत सूत्रांत पञ्चमीविभक्तींत उच्चारलेला 'धातोः' शब्द पाहिजे, म्हणजे धातूहून असा अर्थ करून विहित म्हणजे सांगितलेला या शब्दाशीं त्याचा संबंध जोडतां येईल.

तर मग षष्ठीविभक्तींत जरी 'धातोः' शब्द उच्चारला तरी विहित या शब्दाशीं त्याचा संबंध जोडतां येणें अगदीं शक्य आहे. सारांश, आर्धधातुक हा शब्द न उच्चारला तरी चालेल.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि मुनींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या सातव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादातील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

२. धातूसंबंधीं जो विहित असा संबंध होय. धातुशब्द उच्चारून सांगितलेला जो प्रत्यय त्याला धातुसंबंधी असें म्हणतां येतें.

## स्नुक्रमोरनात्मनेपदनिमित्ते ॥ ७।२।३६ ॥

**स्नुक्रमोरनात्मनेपदनिमित्ते चेत्कृत्युपसंख्यानम् ॥ १ ॥**

स्नुक्रमोरनात्मनेपदनिमित्ते चेत्कृत्युपसंख्यानं कर्तव्यम् । प्रस्नविता प्रस्नवितुम् प्रस्नवितव्यम् । प्रक्रमिता प्रक्रमितुम् प्रक्रमितव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अविशेषेण स्नुक्रमोरिडागममुक्त्वात्मनेपदपरे नेति वक्ष्यामि ।

**आत्मनेपदपरप्रतिषेधे तत्परपरसीयुडेकादेशेषु प्रतिषेधः ॥२॥**

आत्मनेपदपरप्रतिषेधे च तत्परपरसीयुडेकादेशेषु प्रतिषेधो वक्तव्यः । तत्परपरे तावत् । प्रसुस्नूषिष्यते प्रचिक्रंसिष्यते । सीयुटि । प्रस्नोषीष्ट प्रक्रंसीष्ट । एकादेशे । प्रस्नोष्यन्ते प्रक्रंस्यन्ते । एकादेशे कृते व्यपवर्गाभावान्न प्राप्नोति । अन्तादिवद्भावेन व्यपवर्गः । उभयत आश्रये नान्तादिवत् । एवं तर्ह्येकादेशः पूर्वविधिं प्रति स्थानिवद्भव-

---

(सू. ३६, वा १.) स्नु आणि क्रम् ह्या धातूंच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इट् हा आगम होतो, पण तेथें आत्मनेपदाचें निमित्त नसलें पाहिजे, असें म्हटलें तर कृत् प्रत्ययांच्या कांहीं उदाहरणांमध्यें इडागम होतो असें म्हटलें पाहिजे; उदा० प्रस्नविता, प्रस्नवितुम्, प्रस्नवितव्यम्; प्रक्रमिता, प्रक्रमितुम्, प्रक्रमितव्यम्.

तर मग तसें म्हणावें.

तसें म्हणावयास नको. स्नु आणि क्रम् या धातूंच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होतो असें मोघम सांगून ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष आत्मनेपद पुढें असेल तेथें इडागम होत नाहीं असा निषेध सांगितला असतां काम भागेल.

(वा. २) ज्या प्रत्ययाच्या पुढें आत्मनेपद आहे अशा प्रत्ययाला इडागम होत नाहीं असा निषेध केला तर आत्मनेपद पुढें असलेला प्रत्यय ज्याच्या पुढें आहे त्याला इडागम होत नाहीं, तसेंच सीयुडागम झाल्यानंतर त्या ठिकाणीं आणि एकादेश होतो त्या ठिकाणीं इडागम होत नाहीं असें म्हणावें. आत्मनेपद पुढें असलेला प्रत्यय ज्याच्या पुढें आहे अशाचें उदाहरणः— प्रसुस्नूषिष्यते, प्रचिक्रंसिष्यते. सीयुटाचें उदाहरणः—प्रस्नोषीष्ट, प्रक्रंसीष्ट. एकादेशाचें उदाहरणः —प्रस्नोष्यन्ते, प्रक्रंस्यन्ते. या ठिकाणीं एकादेश झाल्यानंतर स्य प्रत्यय पूर्वी आहे आणि आत्मनेपद प्रत्यय त्याच्या पुढें आहे असें दिसत नसल्यामुळे इडागमाचा निषेध प्राप्त होत नाहीं.

अन्तादिवद्भावानें (६।१।८५) तो त्याच्या पुढें आहे असें समजतां येईल.

पण दोन्ही बाजू एकदम दाखवावयाच्या असतील तर अन्तादिवद्भाव होत नाहीं.

---

१. (सू. ३६) ज्या ठिकाणीं स्नु आणि क्रम् हे धातू आत्मनेपदाला निमित्त होत नसतील त्याच ठिकाणीं त्यांच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होतो; इतर ठिकाणीं होत नाहीं; उदा० प्रस्नविता, प्रक्रमिता; प्रत्युदाहरणार्थ–प्रस्नोष्ट, प्रक्रंसीष्ट.

२. 'प्रस्नुते गौः स्वयमेव' या कर्मकर्तरि- प्रयोगामध्यें आत्मनेपद झालें आहे (३।१।८७). त्या ठिकाणीं स्नु धातूचा अर्थ जो व्यापार तो कर्मावरचाच घेतला आहे. तेव्हां येथें कर्माला कर्तृत्वविवक्षा करणें हें आत्मनेपदाला निमित्त आहे. तसेंच, भावे प्रयोग, कर्मणि प्रयोग, हें आत्मनेपदाचें निमित्त आहे.

३. या ठिकाणी सन् प्रत्ययाला इडागमाचा निषेध झाला पाहिजे; परंतु तो होणार नाहीं. कारण सन् प्रत्ययाच्या पुढें आत्मनेपद नाहीं. मध्यें 'स्य' या प्रत्यानें व्यवधान आहे.

४. येथें सीष्ट याला इडागमाचा निषेध झाला पाहिजे; तो होणार नाहीं. कारण तो प्रत्यय स्वतःच आत्मनेपद आहे. त्याच्यापुढें आत्मनेपद नाहीं.

५. येथें स्य प्रत्ययाला इडागमाचा निषेध झाला पाहिजे; परंतु तो होणार नाहीं. कारण स्य ह्या वलादि- प्रत्ययाच्या पुढें अन्ते हा आत्मनेपद प्रत्यय जरी आहे तरी एकादेश केल्यानंतर तो त्याच्या पुढें आहे असें

तीति स्थानिवद्भावाद् व्यपवर्गः । तत्परपर-सीयुटोस्तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः ॥

## सिद्धं तु स्नोरात्मनेपदेन समानपदस्थस्येट्प्रतिषेधात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । स्नोरात्मनेपदेन समानपदस्थस्य नेड् भवतीति वक्तव्यम् ॥ यदि स्नोरात्मनेपदेन समानपदस्थस्येण्न भवतीत्युच्यते प्रस्नवितेवाचरति प्रस्नवित्रीयते अत्र न प्राप्नोति । बहिरङ्गत्वाच्च । बहिरङ्गलक्षणमत्रात्मनेपदम् ॥

## क्रमेश्च ॥ ४ ॥

क्रमेश्चात्मनेपदेन समानपदस्थस्येण्न भवतीति वक्तव्यम् ॥ अथ किमर्थं क्रमेः पृथग्ग्रहणं क्रियते न स्नुक्रमिभ्यामित्येवोच्येत । कर्तरि चात्मनेपदविषयात्कृति नेति वक्ष्यति तत्क्रमेरेव यथा स्यात्स्नोर्मा भूत् । व्यतिप्रस्नवितारौ व्यतिप्रस्नवितारः ॥

## कर्तरि चात्मनेपदविषयात्कृति ॥ ५ ॥

कर्तरि चात्मनेपदविषयात्कृति प्रतिषेधो वक्तव्यः । प्रक्रन्ता उपक्रन्ता ॥

---

तर मग तो एकादेश पूर्वाला विधि कर्तव्य असता स्थानीसारखा समजला जातो (१।१।५७), या स्थानिवद्भावानें 'तो त्याच्यापुढें आहे' असें समजता येईल.

याप्रमाणें एकादेश झालेल्या उदाहरणांची वाट लागली तरी तत्परपर आणि सीयुट् या दोन ठिकाणीं इडागमाचा निषेध सांगितलाच पाहिजे.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

ज्या उदाहरणांमध्यें आत्मनेपद झालें असेल त्या उदाहरणांमध्यें स्नु धातूच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होत नाहीं असें सांगावें.

आत्मनेपद झालेल्या उदाहरणांमध्यें स्नु धातूच्या पुढील वलादि प्रत्ययाला इडागम होत नाहीं असें जर म्हटलें तर प्रस्नवितेव आचरति प्रस्नवित्रीयते या उदाहरणामध्ये इडागम होणार नाहीं. येथें आत्मनेपद बहिरङ्ग आहे हेंही कारण आहे.

(वा. ४) आत्मनेपद झालेल्या उदाहरणांमधील वलादि प्रत्ययाला इडागम होत नाहीं, असें क्रम् धातूसंबंधानेही म्हटलें पाहिजे.

मग हें मागाहून निराळे कां बरें सांगितलें ? तसें सांगू नये. स्नु आणि क्रम् या दोन्ही धातूसंबधानें एकदमच सांगावें.

निराळें सांगण्याचा हेतु इतकाच कीं 'कर्तरि चात्मनेपदविषयात्कृति' असें पुढें वार्तिककार सांगणार आहेत; तें वार्तिक क्रम् धातूलाच लागू पडावें, स्नु धातूला लागू नये; उदा० व्यतिप्रस्नवितारौ, व्यतिप्रस्नवितारः.

( वा. ५) आत्मनेपदाचा विषय जो क्रम् धातु त्याच्या पुढें कर्ता अर्थी केलेल्या कृत् प्रत्ययाला इडागम होत नाहीं असें म्हणावें; उदा० प्रक्रन्ता, उपक्रन्ता.

---

म्हणतां येत नाहीं.

६. प्रउपसर्गपूर्वक स्नु धातूहून तृच् प्रत्यय व त्याला इडागम होऊन प्रस्नवितृ असा शब्द सिद्ध होतो. त्याहून क्यङ् (३।१।११) प्रत्यय, रीङ् आदेश (७।४।२७), पुढें आत्मनेपद ( १।३।१२ ) होऊन प्रस्नवित्रीयेते हें क्रियापद सिद्ध होतें.

७. स्नु धातूहून तृच् प्रत्यय केल्याबरोबर इडागम प्राप्त होतो. त्याच वेळीं येणारा त्याचा निषेध अंतरंग आहे, आणि प्रस्नवित्रीय या क्यङ्प्रत्ययान्त धातूच्या पुढील लट् प्रत्ययाचे स्थानीं होणारें आत्मनेपद बहिरंग आहे. तेव्हा तें आत्मनेपद निषेधाच्या दृष्टीनें असल्यामुळें येथे निषेध प्राप्त होत नाहीं.

८. वि आणि अति हे दोन उपसर्ग क्रियेचा विनिमय दाखविनात म्हणून येथें स्नु धातु आत्मनेपदविषय आहे (१।३।१४).

९. प्र आणि उप या उपसर्गांपुढील क्रम् धातूहून आत्मनेपद होतें ( १।३।४२ ), म्हणून येथें क्रम् धातु आत्मनेपदाचा विषय आहे.

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम् । स्नोरात्मनेपदेन समानपदस्थस्येण्न भवतीति वक्तव्यम् । क्रमेश्चेति वक्तव्यम् । कर्तरि चात्मनेपदविषयात्कृतीति वक्तव्यम् । सूत्रं च भिद्यते ॥

यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं स्नुक्रमोरनात्मनेपदनिमित्तेचे त्कृत्युपसंख्यानमिति । नैष दोषः । स्नुक्रमी एवात्मनेपदनिमित्तत्वेन विशेषयिष्यामः । न चेत्स्नुक्रमी आत्मनेपदस्य निमित्ते इति । कथं पुनर्धातुर्नामात्मनेपदस्य निमित्तं स्यात् । धातुरेव निमित्तम् । आह हि भगवाननुदात्तङित आत्मनेपदं शेषात्कर्तरि परस्मैपदम् [१. ३. १२; ७८] इति । यत्र तर्हि धातुर्नाश्रीयते । भावकर्मणोः [ १. ३. १३ ] इति । अत्रापि धातुरेवाश्रीयते । भावकर्मवृत्ताद्धातोरिति । कथं प्रक्रमितव्यम् । सत्यात्मनेपदे निमित्तशब्दो वर्तते । कथं प्रक्रन्ता उपक्रन्ता । तस्मादसत्यपि । कथं प्रक्रमितव्यम् । तस्मात्सत्येव ।

---

तर मग हें बरेंच सांगावें लागत आहे. तें असें कीं आत्मनेपद झालेल्या उदाहरणांमध्ये स्नु धातूच्या पुढील वलादि प्रत्ययाला इडागम होत नाहीं. क्रम् धातूसंबंधानेही तसेंच. शिवाय, आत्मनेपदाचा विषय जो क्रम् धातु त्याच्यापुढें कर्ता या अर्थी केलेल्या कृत् प्रत्ययाला इडागम होत नाहीं. शिवाय मूळ सूत्र फिरवावें लागतेंच.

तर मग मूळ सूत्र आहे तसेंच असू दे.

पण सूत्र आहे तसेंच ठेवलें तर ' आत्मनेपदाचे निमित्त नसलेल्याच ठिकाणीं स्नु आणि क्रम् या धातूंच्या पुढील वलादि प्रत्ययाला इडागम होतो असें म्हटलें तर कृत् प्रत्ययाच्या कांहीं उदाहरणामध्यें इडागम होतो असें म्हणावें लागेल, ' असा पूर्वीच दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. 'अनात्मनेपदनिमित्ते ' हें स्नु–क्रम् याचेंच विशेषण करूं. म्हणजे स्नु आणि क्रम् हे धातू ज्या ठिकाणीं आत्मनेपदाचें निमित्त होत नसतील त्याच ठिकाणीं इडागम होतो असा अर्थ होईल.

पण धातु हा आत्मनेपदाचें निमित्त कसें बरें होईल ?

कां बरें ? धातूच तर आत्मनेपदाचें निमित्त होतो. प्रत्यक्ष भगवान् सूत्रकारच ' अनुदात्तङित आत्मनेपदम्' (१।३।१२), 'शेषात्कर्तरि परस्मैपदम्' (१।३।७८), या सूत्रांमध्यें ते ते विशेष धातू निमित्त धरूनच आत्मनेपद व परस्मैपद सांगत आहेत.

तर मग ज्या ठिकाणीं विशेष धातु निमित्त धरला नाहीं तेथें कसें ? उदा० 'भावकर्मणोः' (१।३।१३).

तेथें देखील धातूच आत्मनेपदाचें निमित्त म्हणून धरला आहे. ज्या क्रियेचीं भाव व कर्म हीं मुख्यत्वानें विषय आहेत अशा क्रियेला दाखविणाऱ्या धातूहून आत्मनेपद होतें असा त्या सूत्राचा अर्थ आहे.

तर मग प्रक्रमितव्यम् येथें प्रकृत सूत्रानें इडागमाचा निषेध होईल त्याची काय वाट ?

पण ज्या उदाहरणामध्यें प्रत्यक्ष आत्मनेपद झालें असेल तेथेंच धातूला आत्मनेपदाचें निमित्त म्हणतां येतें.

तर मग प्रक्रन्ता, उपक्रन्ता, हीं उदाहरणें कशीं साधतील ? त्याकरितां प्रत्यक्ष आत्मनेपद झालें नसलें तरी फक्त योग्यता पाहून निमित्त म्हटलें पाहिजे.

पण असें गृहीत धरलें तर प्रक्रमितव्यम्, उपक्रमितव्यम्, हीं उदाहरणें कशीं साधतील ! त्याकरितां प्रत्यक्ष आत्मनेपद जेथें झालें असेल तेथेंच धातूला 'आत्मनेपदाचें निमित्त' असें म्हणावें, असेंच रास्त रीतीनें गृहीत धरलें पाहिजे.

पण असें गृहीत धरलें तर प्रक्रन्ता, उपक्रन्ता, या उदाहरणांची वाट काय ?

---

१०. भावे-प्रयोग, कर्मणि-प्रयोग किंवा कर्मकर्तरि-प्रयोग वगैरे आत्मनेपदाचें इतर निमित्त असेल तरी हरकत नाहीं; फक्त हे धातू निमित्त नसावेत.

११. म्हणजे नुसती योग्यता असली तर तिचा कांहीं उपयोग नाहीं.

कथं प्रक्रन्ता उपक्रन्ता। वक्तव्यमेवैतत्कर्तरि चात्मनेपदविषयात्कृतीति। अथवा कृतीति वर्तते॥

## ग्रहोऽलिटि दीर्घः ॥७।२।३७॥

### ग्रहेर्दीर्घत्व इड्ग्रहणम् ॥ १ ॥

ग्रहेर्दीर्घत्व इड्ग्रहणं कर्तव्यम्। इटो दीर्घ इति वक्तव्यम्॥ न वक्तव्यम्। प्रकृतमनुवर्तते। क्व प्रकृतम्। आर्धधातुकस्येड् वलादेः [ ७.२.३५ ] इति॥ एवमपि कर्तव्यमेव।

### अग्रहणे ह्यसंप्रत्ययः षष्ठ्यभावात् ॥२॥

अक्रियमाणे हीड्ग्रहणेऽसंप्रत्ययः स्यात्। किं कारणम्। षष्ठ्यभावात्। षष्ठीनिर्दिष्टस्यादेशा उच्यन्ते न चात्र षष्ठीं पश्यामः॥ क्रियमाणे चापीड्ग्रहणे

### चिण्वदिटः प्रतिषेधः ॥ ३ ॥

चिण्वदिटः प्रतिषेधो वक्तव्यः। ग्राहिष्यते॥

### यङ्लोपे च ॥ ४ ॥

यङ्लोपे च प्रतिषेधो वक्तव्यः। जरीगृहिता जरीगृहितुम् जरीगृहितव्यम्॥ यदि पुनरिड्दीर्घ आगमान्तरं विज्ञायेत।

### इड् दीर्घ इति चेद्विप्रतिषिद्धम् ॥ ५ ॥

इड् दीर्घ इति चेद्विप्रतिषिद्धं भवति। यदि इण्न दीर्घः। अथ दीर्घो न इट्।

---

त्याकरितां 'कर्तरि चात्मनेपदविषयात्कृति' असें जे वार्तिककारांनीं म्हटलें आहे तें म्हणावेंच. अथवा 'कृति' या पदाची अनुवृत्ति आणावी म्हणजे काम भागेलें[१२].

(सू. ३७, वा. १) या सूत्रामध्यें जो ग्रह् या धातुसंबंधानें दीर्घ सांगितला आहे तेथें इट् शब्द उच्चारावा. इडागमला दीर्घ होतो असें म्हणावें.

तसें म्हणावयास नको. कारण इट् या पदाची अनुवृत्ति मागून चालूच आहे.

मागें कोठें बरें इट् शब्द उच्चारला आहे?

'आर्धधातुकस्येड् वलादेः' ( ७।२।३५ ) या सूत्रामध्यें.

तरी देखील प्रकृत सूत्रांत इट् शब्द उच्चारलाच पाहिजे.

(वा. २) येथें इट् शब्द उच्चारला नाहीं तर अर्थबोधच होणार नाहीं.

कां बरें होणार नाहीं?

अनुवृत्तीनें येणाऱ्या इट् शब्दाच्या पुढें षष्ठी-विभक्ति लावलेली नाहीं म्हणून. षष्ठी विभक्ती उच्चारूनच आदेश सांगितले जातात; आणि येथें तर षष्ठी विभक्ति दृष्टीस पडत नाहीं.

आतां येथें षष्ठी विभक्तींत इट् पद घातलें तरी—

(वा. ३) चिण्वद्भावाच्या बरोबर जो इडागम सांगितला (६।४।६२) त्याला हा दीर्घ होत नाहीं, असें म्हणावें; उदा० ग्राहिष्यते.

(वा. ४) तसेंच यङ् प्रत्ययाचा लोप झाला असतां तेथेंही इडागमाला दीर्घ होत नाहीं, असें म्हणावें; उदा० जरीगृहित, जरीगृहितुम्, जरीगृहितव्यम्. आतां जर दीर्घ इट् होतो असा या सूत्रानें स्वतन्त्रच निराळा आगम सांगितला तर—

(वा. ५) दीर्घ इट् होतो हें म्हणणें विरुद्ध होतें. जर इट् आहे तर दीर्घ नव्हे. बरें दीर्घ असेल तर इट् नव्हे. इट्ही आहे आणि तोच

---

१२. 'नेड् वशि कृति०' या सूत्रांतून कृति या पदाची येथें अनुवृत्ति आणून त्याचा फक्त क्रम् धातूशींच संबंध करून स्वतंत्र वाक्यार्थ करावा. तो असा कीं क्रम् धातूला आत्मनेपदाची योग्यता असल्यास त्याच्या पुढील कृत् प्रत्ययाला इडागम होत नाहीं.

१. (सू. ३७) लिट् प्रत्यय सोडून इतर ठिकाणीं ग्रह धातूच्या पुढील इडागमाला दीर्घ होतो; उदा० ग्रहीता, ग्रहीतुम्; प्रत्युदाहरणार्थ–जगृहि, जगृहिम.

२. ग्रह् धातूहून यङ् प्रत्यय (३।१।२२), संप्रसारण (६।१।१६), द्वित्व (६।१।९) व रीक् आगम (७।४।९०), होऊन जरीगृह्य या यङन्त धातूहून लुट् प्रत्यय, तास् प्रत्यय ( ३।१।३३ ), यङ् प्रत्ययाच्या यकाराचा लोप (६।४।४९) आणि अकाराचा लोप (६।४।४८) हीं कार्यें येथें झालीं आहेत.

इड् दीर्घश्चेति विप्रतिषिद्धम् ॥

**प्रतिषिद्धस्य च पुनर्विधाने दीर्घत्वाभावः ॥ ६ ॥**

प्रतिषिद्धस्य च पुनर्विधाने दीर्घत्वस्याभावः। वुवूर्षते विवरिषते विवरीषते ॥ अत्रापि इड् दीर्घ इत्यनुवर्तिष्यते ॥ यत्तर्हि विदेशस्थं प्रतिषिध्य पुनर्विधानं तन्न सिध्यति। जृव्रश्च्योः क्त्वि [७. २. ५५] श्र्युकः किति [ ११ ] इत्यनेन प्रतिषिद्धे दीर्घत्वं न प्राप्नोति। जरित्वा जरीत्वा ॥ ईटो विधिरिटः प्रतिषेधः। यथाप्राप्त इड् दीर्घो भविष्यति ॥ यदि तर्हि इटो ग्रहण ईटो ग्रहणं न भवति जरीत्वा न क्त्वा सेट् [ १. २. १८ ] इति कित्त्वप्रतिषेधो न प्राप्नोति। इह च अग्रहीदिति इट ईटि [८.२.२८] इति सिज्लोपो न प्राप्नोति। इह च अग्रहीत् नेटि [७.२.४] इति वृद्धिप्रतिषेधो न प्राप्नोति। मा भूदेवम्। ह्मयन्तानामित्येवं भविष्यति। अत्रापि नेटीत्येवानुवर्तते। तच्चावश्यमिड्ग्रहणमनुवर्त्यमधाक्षीदित्येवमर्थम्। तथा अग्रहीध्वम् अग्रहीढ्वम् विभाषेटः। [ ८.३.७९ ] इति मूर्धन्यो न प्राप्नोति। तस्मान्नैवं शक्यं वक्तुमिटो ग्रहण ईटो ग्रहणं न भवतीति। भवति

---

दीर्घही आहे हें म्हणणें अगदींच विरूद्ध होतें.

(वा. ६) शिवाय निषिद्ध झालेल्या इडागमाचें पुनः विधान होत असल्यामुळें इडागमाला दीर्घाचें विधान होणार नाहीं; उदा० वुवूर्षते, विवरिषते, विवरीषते. पण 'वृतो वा' या पुढील सूत्रामध्यें इट्पदाबरोबर दीर्घपदाची अनुवृत्ति करतां येईल.

तर मग, ज्या ठिकाणीं इडागमाचा निषेध झाल्यानंतर लांबच्या सूत्रानें पुन: इडागमाचें विधान केलें जातें त्या ठिकाणीं दीर्घ होणार नाहीं; उदा० जरीत्वा. येथें इडागमाचा 'श्र्युकः किति ' ( ७।२।११ ) यानें निषेध केल्यानंतर 'जृव्रश्च्योः क्त्वि ' ( ७।२।५५ ) या दूरच्या सूत्रानें इडागम होईल, पण त्याला दीर्घ होणार नाहीं.

'वृतो वा ' या सूत्राने ईडागम सांगितला आहे आणि निषेध तर इडागमाचा आहे. तेव्हां दीर्घ इडागम होण्यास काहींच अडचण दिसत नाहीं. तो प्राप्त झालेला होणारच.

पण जर इट् या शब्दानें ईट् याचें ग्रहण न होईल तर जरीत्वा येथें 'न क्त्वा सेट्' (१।२।१७) या सूत्रानें कित्त्वाचा निषेध होणार नाहीं. तसेंच 'अग्रहीत्' येथें 'इट ईटि' (८।२।२८) यानें सिच् प्रत्ययाचा लोप होणार नाहीं. आणि अग्रहीत् येथेंच 'नेटि' (७।२।४) यानें वृद्धीचा निषेध होणार नाहीं.

'नेटि ' या सूत्रानें वृद्धीचा निषेध झाला नाहीं तर न होऊं दे, 'ह्मयन्तक्षण०' (७।२।५) यानें येथें वृद्धीचा निषेध होईल.

पण 'ह्मयन्तक्षण०' या सूत्रामध्यें 'नेटि' या सूत्रांतून इटि या पदाची अनुवृत्ति आहेच. शिवाय तेथे इटि या पदाची अनुवृत्ति आणलीच पाहिजे. कारण अधाक्षीत् येथें 'ह्मयन्तक्षण०' यानें वृद्धीचा निषेध न झाला पाहिजे.

तसेंच इट् या शब्दानें ईट् याचें ग्रहण झालें नाहीं तर अग्रहीध्वम् अग्रहीढ्वम् येथें जे 'विभाषेटः' (८।३।७९) या सूत्रानें विकल्पानें ढत्व होत असतें ते होणार नाहीं. तेव्हां एकंदरींत 'इट्' या शब्दाने ईट् याचें ग्रहण होत नाहीं' हें म्हणणें शक्य नाहीं. बरें आतां इट् या शब्दानें इट् याचे

---

३. 'वृतो वा ' या पुढील सूत्रामध्यें फक्त इट् याचीच अनुवृत्ति होऊन त्याचेंच विधान त्या सूत्रानें होईल आणि वृतः इत्यादि उदाहरणांमध्यें 'श्र्युकः किति' ( ७।२।११ ) या निषेधाचा बाध करून इडागम होऊं लागेल. आणि वृ धातूहून सन् प्रत्यय केला असतां तेथें 'इट्सनि वा' ( ७।२।४१ ) यानें जो विकल्पानें इडागम होतो त्याला दीर्घ सांगणारें शास्त्रच नाहीं असा दोष यतो.

४. हें सूत्र दूर असल्यामुळें तेथें दीर्घपदाची अनुवृत्ति करतां येत नाहीं.

चेत्प्रतिषिद्धस्य च पुनर्विधाने दीर्घाभाव इत्येव ॥ तस्मादशक्य इड् दीर्घ आगमान्तरं विज्ञातुम् । न चेद्विज्ञायत इटो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । आर्धधातुकस्येति वर्तते । ग्रहः परस्यार्धधातुकस्य दीर्घत्वं वक्ष्यामि । इहापि तर्हि प्राप्नोति । ग्रहणम् ग्रहणीयम् । वलादेरिति वर्तते । एवमपि ग्रहीता ग्रहीतुम् अत्र न प्राप्नोति । भूतपूर्वगत्या भविष्यति ॥ एवमपि ग्राहकः अत्र प्राप्नोति । किंचेट्प्रतीघातेन खल्वपि दीर्घत्वमुच्यमानमिटं बाधते । तस्मादिटो ग्रहणं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । आर्धधातुकस्येड् वलादेरिति । ननु चोक्तमेवमपि कर्तव्यमेवाग्रहणे ह्यसंप्रत्ययः षष्ठ्यर्थानिर्देशादिति । नैष दोषः । ग्रह इत्येषा पञ्चमीडिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य ( १. १. ६७ ) इति ॥ एवं च कृत्वा सोऽप्यदोषो भवति यदुक्तं चिण्वदिटः प्रतिषेधे इति । कथम् । प्रकृतस्येट इदं दीर्घत्वं न च चिण्वदिट् प्रकृतः ॥ यङ्लोपे कथम् । यङ्लोपे चोक्तमिटि सर्वत्र । क्व सर्वत्र । यथैव प्रकृ-

---

ग्रहण होतें असें म्हटले तर हे दोष येणार नाहींत. पण निषिद्ध झालेल्या इडागमाचें पुनः विधान संमत असल्यामुळें इडागमाला 'वृतो वा' या सूत्रानें दीर्घाचें विधान होणार नाहीं, इत्यादि दोष येतातच. तेव्हा प्रकृत सूत्रानें दीर्घ ईट् सांगावा आणि तसा सांगतां येत नसेल तर प्रकृत सूत्रामध्यें इटः असा शब्द घातला पाहिजे.

तरी पण तसा शब्द घालावयास नको. आर्धधातुकस्य या पदाची अनुवृत्ति आणिली असतां ग्रह् धातूच्या पुढील आर्धधातुक प्रत्ययाला दीर्घ होतो असा अर्थ होईल.

पण तसें केलें तर ग्रहणम्, ग्रहणीयम्, येथें देखील दीर्घ होऊं लागेल.

वलादेः या पदाची अनुवृत्ति आणिली म्हणजे काम भागेल.

पण अनुवृत्ति आणिली तर ग्रहीता, ग्रहीतुम्, या मूळच्याच उदाहरणांमध्यें इडागम झाल्यानंतर प्रत्ययाचें वलादित्व नष्ट झाल्यामुळे दीर्घ होणार नाहीं.

इडागम करण्याच्या पूर्वी वलादित्व होतें तें गृहीत धरून इडागम झाल्यानतर दीर्घ होईल.

पूर्वीचें वलादित्व गृहीत धरलें तर ग्राहकः येथें वु या प्रत्ययाला अकादेश (७।१।१) झाल्यानंतर दीर्घ होऊं लागेल. शिवाय ग्रहीता, ग्रहीतुम्, या मूळच्याच उदाहरणांमध्यें इडागमाला मागें सारून त्याच्या अगोदरच दीर्घ होऊं लागून इष्ट उदाहरण साधणार नाहीं. एकदरींत, प्रकृत सूत्रामध्यें इटः असा शब्द घातला पाहिजे

तसा शब्द घालावयास नको. कारण मागून अनुवृत्तीने तो येत आहे.

मागें कोठें इट्शब्द आहे ?

'आर्धधातुकस्येड् वलादेः' (८।२।३५) येथें आहे.

पण मागें असें सांगितलेच आहे ना कीं इट् पदाची अनुवृत्ति येत आहे तरी देखील या प्रकृत सूत्रामध्ये इट् शब्द उच्चारलाच पाहिजे. नाहीं तर मागून येणाऱ्या इट् शब्दाला षष्ठी विभक्ती लाविलेली नसल्यामुळें अर्थबोध होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण येथें ग्रहः ही पंचमी विभक्ति आहे. तिच्या जोरावर जरी मागून इट् असें प्रथमान्त पद येत आहे तरी त्या प्रथमेच्या जागीं येथें षष्ठीची कल्पना होईल. कारण 'तस्मादित्युत्तरस्य' (१।१।६७) अशी परिभाषा आहे. आणि असें केले असता ग्राहिष्यते येथेंही दोष येत नाहीं कीं ज्याकरिता 'चिण्वदिटः प्रतिषेधः' (वा. ३) असे म्हटलें आहे.

तो दोष कसा बरें येत नाहीं ?

ह्या सूत्रानें जो इडागमाचा दीर्घ सांगितला आहे, तो चालू असलेल्या इडागमासंबंधानेंच

तस्येटो दीर्घत्वमथापि इड् दीर्घ आगमान्तरं विज्ञायेत ।

**यङ्लोपे चोक्तम् ॥ ७ ॥**

किमुक्तम् । तदन्तद्विर्वचनादिति ॥

**[ वृतो वा ॥ ७।२।३८ ॥**

**न लिङि ॥ ७।२।३९ ॥**

**सिचि च परस्मैपदेषु ॥७।२।४०॥**

**इट् सनि वा ॥ ७।२।४१ ॥**

**लिङ्सिचोरात्मनेपदेषु ॥ ७।२।४२ ॥**

**ऋतश्च संयोगादेः ॥ ७।२।४३ ]**

**स्वरतिसूतिसूयतिधूञूदितो वा ॥ ७।२।४४ ॥**

अथ वेति वर्तमाने पुनर्वावचनं किमर्थम् ।

**पुनर्वावचनं लिङ्सिचोर्निवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

पुनर्वावचनं क्रियते लिङ्सिचोर्निवृत्त्यर्थम् ॥

---

लागू पडतो, आणि चिण्वदिट्० (६।४।६२) असा जो इडागम सांगितला आहे तो या प्रकरणांतील नव्हे, म्हणून त्याला ह्या प्रकृत सूत्रानें दीर्घ होणारच नाहीं.

यङ्लोपाच्या उदाहरणामध्यें दोष शिल्लक राहतो त्याची वाट काय ?

यङ्लोपाच्या उदाहरणामध्यें इडागम केल्यावर दीर्घ होत नाहीं अशाबद्दल मागें सांगितलेंच आहे व ते सर्व पक्षीं लागू पडतें.

सर्व पक्ष ते कोणते ?

आतांच सांगितलेल्याप्रमाणें ह्या प्रकरणात सांगितलेल्या अशाच इडागमाला दीर्घ होतो हा पक्ष घ्या किंवा येथें स्वतन्त्र असा निराळाच दीर्घ इडागम सांगितला आहे हा पक्ष घ्या.

(वा. ७) मग तें सर्व पक्षीं लागू पडणारें असें यङ्लोपाच्या उदाहरणासंबंधानें काय बरें सांगितलें आहे ?

यङ्प्रत्ययान्त धातुला द्वित्वाचें विधान केलें आहे हें तें सांगितलें आहे.

(सू. ४४) आतां येथें वा या शब्दाची मागून अनुवृत्ति येत असतांना पुन्हा येथें वा हा शब्द कशाकरितां उच्चारला आहे ?

(वा. १) पूर्वीच्या वा शब्दाबरोबर लिङ् व सिच्, यांची अनुवृत्ति येईल ती न यावी

---

५. सन्यङोः (६।१।९) या सूत्रानें मूळ धातूला द्वित्व न मागतां तें यङन्त धातूला सांगितलें आहे तें त्यांतील एकाच् प्रथम भागाला म्हणजे गृह्य् याला गृह्य् गृह्य् असा आदेश होतो त्यामुळें ग्रह् धातु कोणता तें कळत नाहीं. म्हणून प्रकृत सूत्राची प्राप्ति तेथें येत नाहीं.

१. (सू. ३८) वृङ्, वृञ्, आणि दीर्घऋकारान्त धातू यांच्या पुढील इडागमाला दीर्घ विकल्पानें होतो; उदा० वरिता वरीता, तरिता तरीता.

१. (सू. ३९) लिङ् प्रत्ययाच्या उदाहरणांमध्यें वृङ् वृञ् आणि दीर्घऋकारान्त धातू यांच्या पुढील इडागमाला दीर्घ होत नाहीं; उदा० विवरिषीष्ट.

१ (सू. ४०) तसेंच, ज्याच्या पुढें परस्मैपद आहे असा सिच् प्रत्यय पुढें असतांना वृङ्, वृञ् आणि दीर्घऋकारान्त धातू यांच्या पुढील इडागमाला दीर्घ होत नाहीं; उदा० प्रावारिष्टाम्, अतारिष्टाम्, आस्तारिष्टाम्.

१. (सू. ४१) वृङ् वृञ् आणि दीर्घऋकारान्त धातू यांच्या पुढील सन् प्रत्ययाला इडागम होतो; उदा० वुवूर्षति, विवरिषते.

१. (सू ४२) आत्मनेपद प्रयोगामध्यें वृङ्, वृञ् आणि दीर्घऋकारान्त धातू यांच्या पुढील जो लिङ् किंवा सिच् हा प्रत्यय त्याला इडागम विकल्पानें होतो; उदा० वृषीष्ट वरिषीष्ट, आस्तरिषीष्ट आस्तीर्षीष्ट, प्रावृषीष्ट प्रावरिषीष्ट.

१. (सू. ४३) आत्मनेपद प्रयोगामध्यें संयोग आरंभी असलेला जो ह्रस्वऋकारान्त धातु त्याच्या पुढील जो लिङ किंवा सिच् हा प्रत्यय त्याला इडागम विकल्पानें होतो, उदा० स्मृषीष्ट स्मरिषीष्ट, अस्मृषाताम् अस्मरिषाताम्.

१ (सू ४४) भ्वादि गणांतील स्वृ धातु, अदादि किंवा दिवादि गणांतील सू धातु, धूञ् धातु आणि दीर्घ ऊकार ज्यांचा इत्संज्ञक आहे असे धातू यांच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; उ० स्वर्ता, स्वरिता.

अथ किमर्थं सूतिसूयत्योः पृथग्ग्रहणं क्रियते । सुवतेर्मा भूत् ॥ अथ किमर्थं धूञः सानुबन्धकस्य ग्रहणं क्रियते । धुवतेर्मा भूदिति ॥

किं पुनरियं प्राप्ते विभाषाहोस्विदप्राप्ते । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते । यदि स्वरतिरुदात्तस्ततः प्राप्ते । अथानुदात्तस्ततोऽप्राप्ते ।

**स्वरतिरुदात्तः ॥ २ ॥**

स्वरतिरुदात्तः पठ्यते ॥ किमर्थं तर्हि वावचनम् ।

**वावचनं निवृत्त्यर्थम् ॥ ३ ॥**

वावचनं क्रियते निवृत्त्यर्थम् ॥

**अनुदात्ते हि किति वाप्रसङ्गः प्रतिषिध्य पुनर्विधानात् ॥ ४ ॥**

अनुदाते हि सति किति विभाषा प्रसज्येत । स्वृत्वा । किं कारणम् । प्रतिषिध्य पुनर्विधानात् । प्रतिषिध्य किलायं पुनर्विधीयते । स यथैवैकाज्लक्षणं प्रतिषेधं बाधत एवं श्र्युकः किति [७. २. ११] इत्येतमपि बाधेत ॥ यदि तर्ह्युदात्तः स्वरतिः पठिष्यति विप्रतिषेधं स्वरतेर्वेट्त्वाद्धतः स्ये विप्रतिषेधेनेति स विप्रतिषेधो नोपपद्यते । किं कार-

---

याकरितां पुन्हां येथें वा हा शब्द घातला आहे.

आता येथें सूति आणि सूयति असे दोन सू धातूंचें निरनिराळें उच्चारण कशाकरिता केलें आहे?

तिसरा जो तुदादि गणांतील स धातु त्याचें येथें ग्रहण होऊं नये म्हणून.

आतां इत्संज्ञक ञ् जोडलेल्या 'धू' धातूचें उच्चारण कशाकरितां केलें आहे?

तुदादिगणांतील 'धू' धातूचें ग्रहण होऊं नये म्हणून.

पण काय हो प्राप्त झालेल्या इडागमाचा येथें विकल्प सांगितला आहे किंवा प्राप्त न झालेल्या इडागमाचा विकल्प सांगितला[२] आहे?

अगोदर हें सांगा पाहूं कीं इडागम येथें कोणत्या तऱ्हेनें प्राप्त होतो आणि कोणत्या तऱ्हेनें प्राप्त होत नाहीं.

स्वृ हा धातु जर उपदेशीं उदात्त धरला तर इडागम प्राप्त होतो; आणि जर अनुदात्त धरला तर 'एकाच उप०' (७।२।१०) या निषेधामुळें इडागम प्राप्त होत नाहीं.

( वा. २ ) स्वृ हा धातु उपदेशीं उदात्त पठन केला आहे.

तर मग प्रकृत सूत्रामध्यें वा हा शब्द कशाकरितां घातला[३] आहे?

( वा. ३ ) वा हा शब्द निवृत्तीकरितां घातला[४] आहे.

(वा. ४ ) स्वृ धातु हा उपदेशीं अनुदात्त मानला तर कित् प्रत्यय पुढें असतांना इडागमाचा विकल्प होऊं लागेल; उदा० स्वृत्वा.

कां म्हणून?

निषेधाची प्राप्ति असतांना स्वृ धातूच्या पुढील प्रत्ययाला प्रकृत सूत्राने मुद्दाम इडागम सांगितला आहे. तेव्हां ह्या प्रकृत सूत्रानें जसा 'एकाचः' ( ७।२।१० ) या निषेधाचा बाध होतो तसा 'श्र्युकः किति' (७।२।११) ह्या निषेधाचाही बाध होईल.

आतां जर हा स्वृ धातु उपदेशीं उदात्त मानला तर 'स्वरतेर्वेट्त्वाद्धतः स्ये विप्रतिषेधेन' ( ७।२।७० वा. १ ) असा जो विप्रतिषेध पुढें सांगितला जाणार आहे तो जुळणार नाहीं.

---

२. हा विचार फक्त स्वृ या धातूसंबंधानेंच आहे. कारण बाकीचे सू वगैरे धातू उदात्तच असल्यामुळे त्यांच्या उदाहरणांमध्यें इडागमाची प्राप्तीच येत आहे.

३. या सूत्रांत उच्चारलेले सर्वच धातू उदात्त असल्यामुळें इडागम प्राप्त होत आहे असें असतां पुनः या प्रकृत सूत्रानें इडागम सांगितला आहे तो व्यर्थ होईल म्हणून सामर्थ्यास्तव विकल्प होईल; म्हणजे एकदा इडागमाची निवृत्ति होईल. तेव्हां सूत्रांत वा हा शब्द घालावयास नको.

४. सामर्थ्यास्तव एकदां इडागमाची निवृत्ति होते अशीच कल्पना होईल याविषयीं प्रमाण नाहीं; सामर्थ्यास्तव निषेधाचा बाध होतो अशीही कल्पना होईल. आणि स्वृतः येथें 'श्र्युकः किति' या निषेधाचा बाध होईल; तेव्हां इडागमाची एकदां निवृत्तीच झाली पाहिजे; याकरितां वा हा शब्द सूत्रांत उच्चारला आहे.

णम् । स विधिरयं प्रतिषेधो विधिप्रतिषेधयोश्चायुक्तो विप्रतिषेधः ॥ सोऽपि विधिर्न मृदूनामिव कार्पासानां कृतः प्रतिषेधविषय आरभ्यते । स यथैवैकाज्लक्षणं प्रतिषेधं बाधत एवमिममपि बाधिष्यते ॥ अथवा येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्ते वलादिलक्षण इयं विभाषारभ्यते स्यलक्षणे पुनः प्राप्ते चाप्राप्ते च । अथवा मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन्बाधन्त इत्येवमियं विभाषा वलादिलक्षणमिटं बाधिष्यते स्यलक्षणं न बाधिष्यते ॥

अथवा पुनरस्त्वनुदात्तः । ननु चोक्तमनुदात्ते हि किति बाप्रसङ्गः प्रतिषिध्य पुनर्विधानादिति । नैष दोषः । येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्त एकाज्लक्षणे प्रतिषेध इयं विभाषारभ्यते श्र्युकः कितीत्येतस्मिन्पुनः प्राप्ते चाप्राप्ते च ॥ अथवा श्र्युकः कितीत्येष योग उदात्तार्थश्च येभ्यश्चानुदात्तेभ्य इट् प्राप्यते तद्बाधनार्थश्च । अथवा श्र्युकः कितीतीहानुवर्तिष्यते । अथवाचार्य-

---

काय कारण ?

कारण असें कीं 'ऋद्धनोः स्ये' (७।२।७० ) हा विधि आहे; आणि प्रकृत सूत्र तर इडागम एकदां न व्हावा अशा उद्देशानें केलें असल्यामुळे निषेध आहे. तेव्हां विधि आणि निषेध यांची बरोबरी नसल्यामुळें विप्रतिषेध संभवत नाहीं.

पण 'ऋद्धनोः स्ये' हा जरी विधि आहे तरी देखील तो मऊ कापसाचा बनविल्यासारखा अगदींच कांहीं कमजोर नाहीं. तो देखील निषेधाचा विषय असतांना तेथें मुद्दाम सांगितला आहे. तेव्हां तो जसा 'एकाच०' (७।२। १० ) या निषेधाचा बाध करतो तसा प्रकृत सूत्राचाही बाध करूं शकेल. अथवा ज्याची सर्व ठिकाणीं प्राप्ति येते त्याचा बाध होत असतो या न्यायाला अनुसरून येथें असें म्हणतां येतें कीं, प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या विकल्पाच्या सर्व उदाहरणांमध्यें सर्व ठिकाणीं वलादिनिमित्तक इडागमाची (७।२।३५) प्राप्ति येते, नाहीं असें कोठेंच नाहीं; आणि स्य प्रत्ययाला सांगितलेला इडागम मात्र कोठें येतो व कोठें येत नाहीं. तेव्हां प्रकृत सूत्रानें वलादिनिमित्तक इडागमाचाच बाध होईल. अथवा 'दोन विधींच्या मध्यें सांगितलेले अपवाद हे मागील विधींचाच बाध करतात, पुढील विधीचा बाध करीत नाहींत' या न्यायानें प्रकृत सूत्रानें सांगितलेला इडागमाचा विकल्प (७।२।४४) हा वलादिनिमित्तक इडागमाचाच (७।२।३५) बाध करील, स्य प्रत्ययाला सांगितलेल्या इडागमाचा (७।२।७०) बाध करणार नाहीं.

अथवा स्वृ हा धातु उपदेशीं अनुदात्तच असू दे.

पण अनुदात्त मानला तर कित् प्रत्यय पुढें असताना प्रकृत सूत्रानें इडागमाचा विकल्प होऊं लागेल; कारण इडागमाचा निषेध प्राप्त झाला असतां तेथें मुद्दाम हा विकल्प सांगितला असल्यामुळें तो 'एकाच उपदेशे०' या निषेधाप्रमाणें 'श्र्युकः किति' या निषेधाचाही बाध करील.

हा दोष येत नाहीं. कारण, ज्याची सर्व ठिकाणीं प्राप्ति येते त्याचाच बाध होत असतो. तेव्हां प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या विकल्पाच्या सर्व उदाहरणांमध्यें 'एकाचः' या निषेधाची प्राप्ति येते, नाहीं असें कोठेंच नाहीं. आणि 'श्र्युकः किति' हा निषेध मात्र कोठें येतो आणि कोठें येत नाहीं. तेव्हां अर्थातच त्याचा बाध होणार नाहीं. अथवा 'श्र्युकः किति' हें शास्त्र उदात्त धातूंकरितां, व ज्या अनुदात्त धातूंच्या पुढील कित् प्रत्ययाला इडागम प्राप्त होतो त्या करितां उपयोगांत आणावयाचें आहे. स्वृ हा धातु अनुदात्त आहे व त्याच्या पुढील कित् प्रत्ययाला प्रकृत सूत्रानें इडागम प्राप्त होत आहे. अथवा, 'श्र्युकः किति' याची प्रकृत सूत्रांत अनुवृत्ति आणून स्वतन्त्र वाक्यार्थ येथें केला म्हणजे कित् प्रत्ययाला इडागमाचा विकल्प होणार नाहीं.

प्रवृत्तिर्ज्ञापयति नेयं विभाषोग्लक्षणस्य प्रतिषेधस्य विषये भवतीति यदयं सनीवन्तर्धभ्रस्जदम्भुश्रिस्वृयूर्णुभरज्ञपिसनाम् [ ७. २. ४९ ] इति स्वृग्रहणं करोति ॥

**[ रधादिभ्यश्च ॥ ७।२।४५ ॥**

**निरः कुषः ॥ ७।२।४६ ॥ ]**

**इण्निष्ठायाम् ॥ ७।२।४७ ॥**

इडिति वर्तमाने पुनरिड्ग्रहणं किमर्थम् ।

**इड्ग्रहणं नित्यार्थम् ॥ १ ॥**

नित्यार्थोऽयमारम्भः ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धात्र विभाषा पूर्वेणैव तत्रारम्भसामर्थ्यान्नित्यो विधिर्भविष्यति ॥ नात्र पूर्वेण विभाषा प्राप्नोति । किं कारणम् । यस्य विभाषा [ ७. २. १५ ] इति प्रतिषेधात् । तत्रारम्भसामर्थ्याद्विभाषा लभ्येत पुनरिड्ग्रहणादिडेव भवति ॥

**तीषसहलुभरुषरिषः ॥ ७।२।४८ ॥**

**इषेस्तकारे श्यन्प्रत्ययात्प्रतिषेधः ॥ १ ॥**

इषेस्तकारे श्यन्प्रत्ययात्प्रतिषेधो वक्तव्यः । इह मा भूत । प्रेषिता प्रेषितुम् प्रेषितव्यम् ॥

---

अथवा, आचार्यांनीं 'सनीवन्तर्धभ्रस्जदम्भुश्रिस्वृयूर्णुभरज्ञपिसनाम्' (७।२।४९) या सूत्रामध्यें जो स्वृ हा शब्द उच्चारला आहे या त्यांच्या कृतीवरून असें सूचित होत आहे कीं 'श्र्युकः किति' या निषेधाच्या उदाहरणांमध्यें प्रकृत सूत्रानें सांगितलेला विकल्प प्रवृत्त होत नाहीं.[५]

(सू. ४७) इट् या पदाची अनुवृत्ति येत असतां पुनः येथें इट् असा शब्द कशाकरितां उच्चारला आहे ?

(वा. १ ) इडागम हा निष्ठा प्रत्ययाला नित्य व्हावा याकरितां हे सूत्र केलें आहे.

इडागम नित्य होणें हा येथें पुन्हां इट् शब्द घालण्याचा उपयोग दाखविला तो बरोबर नाहीं. कारण, पूर्वसूत्रानें येथेंही इडागमाचा विकल्प सिद्धच आहे. तेव्हां ज्या अर्थी हें सूत्र मुद्दाम केलें आहे त्या अर्थी त्याच्या जोरावर ह्या सूत्रानें नित्य इडागम होईल.

पण निष्ठा प्रत्यय केला असतांना येथें पूर्वसूत्रानें इडागमाचा विकल्प सिद्ध होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं 'यस्य विभाषा' (७।२।१५) ह्या सूत्रानें निष्ठाप्रत्ययामध्यें इडागमाचा निषेध प्राप्त होत आहे. तेव्हां ज्या अर्थी मुद्दाम हें सूत्र केलें त्या अर्थी त्याच्या जोरावर तो निषेध मागें सरेल आणि विकल्प होऊं लागेल. पण पुनः इट् शब्द उच्चारला म्हणजे मात्र त्याच्या जोरावर नेहमीं इडागमच होईल.

(सू. ४८ वा. १ ) ज्या इष् धातूहून श्यन् प्रत्यय होतो त्या दिवादि गणांतील इष् धातूच्या पुढील तकारादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागमाचा विकल्प होत नाहीं, असें म्हणावें. कारण प्रेषिता, प्रेषितुम्, प्रेषितव्यम्, या उदाहरणांमध्यें इडागमाचा विकल्प न झाला पाहिजे.

---

५. असें गृहीत धरलें नाहीं तर स्वृ धातूच्या पुढील सन् प्रत्यय कित् ( १।२।९ ) असल्यामुळें जरी 'श्र्युकः किति' यानें निषेध प्राप्त झाला तरी त्याचा प्रकृत सूत्रानें बाध होऊन इडागमाचा विकल्प होईलच. तेव्हां 'सनीवन्तर्ध०' या सूत्रामध्यें स्वृ ग्रहण व्यर्थ होईल.

१. ( सू. ४५. ) रधादिगणपठित धातूंच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; उदा० रधिता रद्धा, नशिता नष्टा, वगैरे. दिवादि गणामध्यें रध् धातूपासून हा रधादि गण समजावा.

१. ( सू. ४६ ) निर् या उपसर्गाच्या पुढील जो कुष् धातु त्याच्या पुढील वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; उ० निष्कोष्टा, निष्कोषिता.

१. ( सू. ४७ ) निर् या उपसर्गाच्या पुढील जो कुष् धातु त्याच्या पुढील निष्ठाप्रत्ययाला इडागम होतो; उदा० निष्कुषितवान्, निष्कुषितः.

१. (सू. ४८ ) इष्, सह्, लुभ्, रुष् आणि रिष् या धातूंच्या पुढील तकारादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; एष्टा एषिता, इत्यादि.

[ सनीवन्तर्धभ्रस्जदम्भुश्रिस्वृयूर्णुभरज्ञपिसनाम् ॥ ७।२।४९ ॥
क्लिशः क्त्वानिष्ठयोः ॥ ७।२।५० ॥
पूङश्च ॥ ७।२।५१ ॥ ]
वसतिक्षुधोरिट् ॥ ७।२।५२ ॥
इडिति वर्तमाने पुनरिड्ग्रहणं किमर्थम् ।
पुनरिड्ग्रहणं नित्यार्थम् ॥ १ ॥
इडिति वर्तमाने पुनरिड्ग्रहणं क्रियते नित्यार्थम् । नित्यार्थोऽयमारम्भः ॥
[ अञ्चेः पूजायाम् ॥ ७।२।५३ ॥
लुभो विमोहने ॥ ७।२।५४ ॥
जॄव्रश्च्योः क्त्वि ॥ ७।२।५५ ॥
उदितो वा ॥ ७।२।५६ ॥
सेऽसिचिकृतचृतच्छृदतृदनृतः ॥ ७।२।५७ ॥ ]
गमेरिट् परस्मैपदेषु ॥ ७।२।५८ ॥
गमेरिट् परस्मैपदेषु चेत्कृत्युपसंख्यानम् ॥ १ ॥
गमेरिट् परस्मैपदेषु चेत्कृत्युपसंख्यानं कर्तव्यम् । जिगमिषिता जिगमिषितुम् जिगमिषितव्यम् ॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । अविशेषेण गमेरिडागममुक्त्वात्मनेपदपरे नेति वक्ष्यामि ।

---

( सू. ५२ ) इट् अशी अनुवृत्ति येत असतांना पुनः येथें इट् असा शब्द कशाकरितां उच्चारला आहे ?

( वा. १ ) इट् अशी अनुवृत्ति येत असतांना पुनः जो येथें इट् असा शब्द उच्चारला आहे तो नित्य होण्याकरितां उच्चारला आहे. म्हणजे इडागम नित्य व्हावा याकरितां हें सूत्र केलें आहे.

( सू ५८ वा. १ ) गम् धातूच्या पुढील सकारादि प्रत्ययाला इडागम होतो, पण परस्मैपद पुढें असतांना असें म्हटलें तर कृत् प्रत्यय केला असेल तर्थें इडागम होतो असें म्हटलें पाहिजे. उदाहरणार्थ जिगमिषिता, जिगमिषितुम्, जिगमिषितव्यम्.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. गम् धातूच्या पुढील सकारादि प्रत्ययाला मोघमच इडागम सांगून फक्त आत्मनेपद पुढें असतांना इडागम होत नाहीं असें सांगतां येईल.

---

१. ( सू. ४९ ) इव् अंतीं असलेल्या तसेंच ऋध्, भ्रस्ज् दम्भ्, श्रि, स्वृ, यु, ऊर्णु, भर, ज्ञपि, आणि सन्, या धातूंच्या पुढील सन् प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; उदा० दिदेविषति, दूद्यूषति, अर्दिधिषति ईर्त्सति.

१. ( सू. ५० ) क्लिश् धातूच्या पुढील क्त्वा आणि निष्ठा या प्रत्ययांना इडागम विकल्पानें होतो; उदा० क्लिष्ट्वा क्लिशित्वा, इत्यादि.

१. ( सू. ५१ ) पूङ् धातूच्या पुढील क्त्वा आणि निष्ठा या प्रत्ययांना इडागम विकल्पानें होतो; उदा० पूत्वा, पवित्वा.

१. ( सू. ५२ ) वस् आणि क्षुध् या धातूंच्या पुढील क्त्वा आणि निष्ठा या प्रत्ययांना इडागम होतो; उदा० उषित्वा उषितवान्, क्षुधित्वा क्षुधितवान्.

१. ( सू. ५३ ) पूजा अर्थ गम्यमान असतांना अञ्च् धातूच्या पुढील क्त्वा आणि निष्ठा या प्रत्ययांना इडागम होतो; उदा० अञ्चित्वा, अञ्चितः.

१. ( सू. ५४ ) विमोहन अर्थ गम्यमान असतांना लुभ् धातूच्या पुढील क्त्वा आणि निष्ठा या प्रत्ययांना इडागम होतो; उदा० लुभित्वा, लोभित्वा, विलुभितः.

१. ( सू. ५५ ) जॄ आणि व्रश्च् या धातूंच्या पुढील क्त्वा प्रत्ययाला इडागम होतो; उदा० जरित्वा जरीत्वा, व्रश्चित्वा.

१. ( सू. ५६ ) ज्या धातूंचा ह्रस्व उकार इत्संज्ञक आहे, अशा धातूंच्या पुढील क्त्वा प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; उदा० शमित्वा, शान्त्वा.

१. (सू. ५७) कृत्, चृत्, छृद्, तृद्, आणि नृत् या धातूंच्या पुढील जो सिच् प्रत्ययाशिवाय सकारादि आर्धधातुक प्रत्यय त्याला इडागम विकल्पानें होतो; उदा० कर्त्स्यति कर्तिष्यति, वगैरे.

१. ( सू. ५८ ) परस्मैपद केलें असेल तर गम् धातूच्या पुढील सकारादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होतो; उदा० गमिष्यति.

आत्मनेपदपरप्रतिषेध उक्तम् ॥ २ ॥

किमुक्तम् । आत्मनेपदपरप्रतिषेधे तत्परपरसीयुडेकादेशेषु प्रतिषेध इति । इहाप्यात्मनेपदपरप्रतिषेधे तत्परपरसीयुडेकादेशेषु प्रतिषेधो वक्तव्यः । तत्परपरे तावत् । संजिगंसिष्यते । सीयुटि । संगंसीष्ट । एकादेशे । संगंस्यन्ते । एकादेशे कृते व्यपवर्गाभावान्न प्राप्नोति ॥

सिद्धं तु गमेरात्मनेपदेन समानपदस्थस्येट्प्रतिषेधात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । गमेरात्मनेपदेन समानपदस्थस्येण्न भवतीति वक्तव्यम् ॥

न[१] वृद्भ्यश्चतुर्भ्यः ॥ ७।२।५९ ॥

वृतादिप्रतिषेधे च ॥ १॥

किम् । कृत्युपसंख्यानं कर्तव्यम् । विवृत्सिता विवृत्सितुम् विवृत्सितव्यम् ॥ तत्तङुपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । अविशेषेण वृतादिभ्य इट्प्रतिषेधमुक्त्वात्मनेपदपर इड् भवतीति वक्ष्यामि ।

आत्मनेपदपर इड्वचने तत्परपरसीयुडेकादेशेष्विड्वचनम् ॥ २ ॥

आत्मनेपदपर इड्वचने तत्परपरसीयुडेकादेशेष्विड् वक्तव्यः । तत्परपरे तावत् । विवर्तिषिष्यते । सीयुटि । वर्तिषीष्ट । एकादेशे ।

---

( वा. २ ) आत्मनेपद पुढें असतांना इडागम होत नाहीं असें म्हटलें तर त्याबद्दल मागें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सांगितलें आहे ?

आत्मनेपदपरप्रतिषेधे तत्परसीयुडेकादेशेषु प्रतिषेधः ( ७।२।३६ वा. २ ) असें सांगितलें आहे. येथेंही पण तसेंच म्हणजे 'ज्या प्रत्ययाच्या पुढें आत्मनेपद आहे अशा प्रत्ययाला इडागम होत नाहीं असा निषेध केला तर आत्मनेपद पुढें असलेला प्रत्यय ज्याच्या पुढें आहे त्याला इडागम होत नाहीं, तसेंच सीयुडागम झाल्यानंतर त्या ठिकाणीं आणि एकादेश झाल्यानंतर त्या ठिकाणीं इडागम होत नाहीं असें म्हणावें लागणार आहे. आत्मनेपद पुढें असलेला प्रत्यय ज्याच्या पुढें आहे अशाचें उदाहरण संजिगंसिष्यते; सीयुटाचें उदाहरण संगंसीष्ट; एकादेशाचें उदाहरण संगंस्यन्ते. या ठिकाणीं एकादेश झाल्यानंतर स्य प्रत्यय पूर्वी आहे, आत्मनेपद प्रत्यय त्याच्या पुढें आहे असें दिसत नसल्यामुळें इडागमाचा निषेध प्राप्त होत नाहीं.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

ज्या उदाहरणामध्यें आत्मनेपद झालें असेल त्या उदाहरणामध्यें गम् धातूच्या पुढील सकारादि प्रत्ययाला इडागम होत नाहीं असें म्हणावें.

( सू. ५९ वा. १ ) हा जो वृत् वगैरे धातूंच्या पुढील सकारादि प्रत्ययाला इडागमाचा निषेध सांगितला आहे त्या विषयीं देखील —

काय त्याविषयीं आणखी म्हणावयाचें आहे ?

कृत् प्रत्यय केला असेल तेथेंही परस्मैपद नसलें तरी हा निषेध प्रवृत्त होतो असें म्हणावें; उदा० विवृत्सिता, विवृत्सितुम्, विवृत्सितव्यम्.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. वृत् वगैरे चार धातूंच्या पुढील सकारादि प्रत्ययाला इडागम होत नाहीं असें मोघमच सांगून फक्त आत्मनेपद पुढें असतां इडागम होतो असें सांगतां येईल.

( वा. २ ) ज्या प्रत्ययाच्या पुढें आत्मनेपद आहे अशा प्रत्ययाला इडागम होतो असें सांगितलें तर आत्मनेपद पुढें असलेला प्रत्यय ज्याच्या पुढें आहे त्याला इडागम होतो, तसेंच सीयुडागम झाल्यानंतर त्या ठिकाणीं आणि एकादेश झाल्यानंतर त्या ठिकाणीं इडागम होतो असें म्हणावें लागणार आहे. आत्मनेपद पुढें असलेला प्रत्यय ज्याच्या पुढें आहे अशाचें उदाहरण विवर्तिषिष्यते, सीयुटाचें उदाहरण

---

१ (सू. ५९) परस्मैपदामध्यें वृत्, वृध्, शृध्, आणि स्यन्द् या चार धातूंच्या पुढील सकारादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० वर्त्स्यति.

वर्तिष्यन्ते वर्धिष्यन्ते ॥

**सिद्धं तु वृतादीनामात्मनेपदेन समानपदस्थस्येड्वचनात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । वृतादीनामात्मनेपदेन समानपदस्थस्येड् भवतीति वक्तव्यम् ॥

**चतुस्तासिक्लृपिग्रहणानर्थक्यं च ॥ ४ ॥**

चतुर्ग्रहणं चानर्थकं सर्वेभ्यो हि वृतादिभ्यः प्रतिषेध इष्यते । तासिग्रहणं चानर्थकम् । किं कारणम् ।

**निवृत्तत्वात्सकारस्य ॥ ५ ॥**

निवृत्तं सकारादाविति । तास्ग्रहणे चेदानीमक्रियमाणे क्लृपिग्रहणेनापि नार्थः । एषोऽपि हि वृतादिः पञ्चमः ॥ भवेत्क्लृपिग्रहणं न कर्तव्यं तास्ग्रहणं तु कर्तव्यम् । यद्धि तत्सकारादाविति न तच्छक्यं निवर्तयितुं तृच्यपि हि प्रसज्येत । वर्तिता वर्धिता । तास्ग्रहणे चेदानीं क्रियमाणे क्लृपिग्रहणमपि कर्तव्यमन्येभ्योऽपि वृतादिभ्यस्तासौ मा भूदिति ॥ भवेत्तास्ग्रहणं कर्तव्यं क्लृपिग्रहणं तु नैव कर्तव्यम् । अन्येभ्योऽपि वृतादिभ्यस्तासौ कस्मान्न भवति । परस्मैपदेष्विति वर्तते क्लृपेरेव च तास्परस्मैपदपरो नान्येभ्यो वृतादिभ्यः ॥ यद्येवं तास्ग्रहणेनापि

---

वर्तिषीष्ट; एकादेशाचें उदाहरण वर्तिष्यन्ते, वर्धिष्यन्ते.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

ते कसें ?

ज्या उदाहरणामध्यें आत्मनेपद झालें असेल त्या उदाहरणांमध्यें वृत् वगैरे चार धातूंच्या पुढील सकारादि प्रत्ययाला इडागम होतो असें म्हणावें.

(वा. ४ ) प्रकृत सूत्रामध्यें चतुर्भ्यः हा शब्द निरुपयोगी आहे. कारण सर्वच वृत् वगैरे चार धातूंच्या पुढील सकारादि प्रत्ययाला इडागमाचा निषेध होणें इष्ट आहे.

तसेंच तासि हा शब्दही निरुपयोगी आहे.

काय कारण ?

कारण असें कीं सकारादि अशा अर्थाचें 'से' हें पद 'न वृतादिभ्यः' या सूत्रांत निवृत्त करावें, म्हणजे त्याची अनुवृत्ति करूं नये.

याप्रमाणें तासि असें म्हटलें नाहीं तर क्लृपः असें नुसतें म्हणण्यांतही कांहीं अर्थ नाहीं. कारण हा क्लृप् धातू देखील वृतादि गणामधील पांचवा धातु आहे.

अशा रीतीनें क्लृपः असें म्हटलें नाहीं तरी चालेल. पण तासि असें मात्र म्हटलेंच पाहिजे. कारण सकारादि अशा अर्थाचें 'से' हें पद 'न वृतादिभ्यः' या सूत्रात निवृत्त करून चालावयाचें नाहीं. तें तेथें निवृत्त केलें तर वर्तिता, वर्धिता, या तृच्प्रत्ययान्त रूपांमध्येंही इडागमाचा निषेध होऊं लागेल, आणि अशा रीतीनें तासि हें पद कायम ठेवलें म्हणजे क्लृपः हें देखील पद ठेवावेंच लागणार. कारण क्लृप् या धातूशिवाय इतर जे वृत् वगैरे धातू त्यांच्या पुढील तास् प्रत्ययाला इडागमाचा निषेध न झाला पाहिजे.

वस्तुतः विचार केला तर तासि हें पद कायम ठेवावें, क्लृपः हें मात्र ठेवूं नयेच.

पण तें ठेवलें नाहीं तर क्लृप् या धातूशिवाय इतर जे वृत् वगैरे धातू त्यांच्या पुढील तास् प्रत्ययाला इडागमाचा निषेध कां बरें होणार नाहीं?

तेथें निषेध न होण्याचें कारण हें कीं येथें परस्मैपदेषु या पदाची अनुवृत्ति आहे; आणि परस्मैपदामध्यें तास् हा प्रत्यय फक्त क्लृप् धातूच्या पुढें संभवतो; वृत् वगैरे इतर धातूंच्या पुढें संभवत नाहीं; कारण ते धातू आत्मनेपदी आहेत.

आतां असेंच जर आहे तर तासि हा शब्द

---

२. चतुर्भ्यः असें न म्हणतां 'वृतादिभ्यः' असें सूत्र केलें तर या वृतादि गणामध्यें पांचवा क्लृप् धातु येईल. परंतु त्या क्लृप् धातूच्या पुढील सकारादि प्रत्ययाला वृत् वगैरे चारांप्रमाणें इडागम न होणें इष्टच आहे. गणपाठामध्यें त्या क्लृप् धातूच्या पुढें गणसमाप्तीचें चिन्ह म्हणून वृत्करण केलें आहे. तेव्हां तेथें अर्थातच वृतादि गण संपेल. तेव्हां क्लृप् पुढील धातू वृतादिगणामध्यें येऊ नयेत असा चतुर्भ्यः या म्हणण्याचा उपयोग मुळींच संभवत नाहीं.

३. तेव्हां 'न वृतादिभ्यः' या सूत्रानेंच काम भागेल.

नार्थः । तृचि कस्मान्न भवति । परस्मैपदेष्विति वर्तते ॥

[तासि च क्लृपः ॥ ७।२।६० ॥

अचस्तास्वत्थल्यनिटो नित्यम् ॥ ७।२।६१ ॥]

उपदेशेऽत्वतः ॥ ७।२।६२ ॥

तासावत्वत्प्रतिषेधे घसेः प्रतिषेधप्रसङ्गोऽकारवत्त्वात् ॥ १ ॥

तासावत्वत्प्रतिषेधे घसेः प्रतिषेधः प्राप्नोति । जघसिथ । किं कारणम् । अकारवत्त्वात् ॥ सोऽपि ह्यकारवान् ॥

सिद्धं तु हलादिग्रहणात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । हलादिग्रहणं कर्तव्यम् ॥ तच्चावश्यं कर्तव्यम् । अदयशी प्रयोजयतः । अदयशी तावन्न प्रयोजयतः । किं कारणम् । तासावनिट इत्युच्यते सेटौ चेमौ तासौ । अञ्ज्वशू तर्हि प्रयोजयतः । अञ्ज्वशू चापि न प्रयोजयतः । किं कारणम् । तासौ नित्यानिट इत्युच्यते विभाषितेटौ चैतौ । अदिस्तर्हि प्रयोजयति । आदिथ ॥ क्रियमाणेऽपि वै हलादिग्रहणेऽत्र प्राप्नोति । जघसिथ । एषोऽपि हलादिः ।

---

ठेवण्याचा कांहीं उपयोग नाहीं

पण तासि हा शब्द ठेवला नाहीं तर तृच् प्रत्यय केला असतां तेथें इडागमाचा निषेध कां होत नाहीं ?

परस्मैपदेषु या पदाची अनुवृत्ति आहे ना !

(सू. ६२ वा. १) ह्रस्वअकारयुक्त धातूच्या पुढील थल् प्रत्ययाला तास् प्रत्ययाप्रमाणें इडागम होत नाहीं असा जो हा प्रकृत सूत्रानें निषेध केला आहे तो निषेध घस् धातूसंबंधानें लागू होईल; उदाहरणार्थ जघसिथ.

काय कारण ?

कारण असें कीं घस् धातूही ह्रस्व अकारयुक्त आहे.

(वा. २) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

हलादि असें येथें म्हणावें. आणि येथें हलादि असें अवश्य म्हटलेंच पाहिजे. कारण अद् आणि अश् या धातूंना हा निषेध न लागला पाहिजे.

अद् व अश् यांकरितां येथें हलादि असें म्हणावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं 'ज्या धातूहून तास् प्रत्यय केला असता इडागम होत नाहीं' असें येथें म्हटलें आहे तेवढ्यानेंच काम भागेल. कारण अद् व अश् यांच्या पुढें तास् प्रत्यय केला असता इडागम होत असतो.

अञ्ज् व अशू या धातूंकरितां तर हलादि असें येथें म्हटले पाहिजे ना ?

अञ्जू व अशू यांकरितांही येथें हलादि असें म्हणावयास नको. कारण 'ज्या धातूहून तास् प्रत्यय केला असतां इडागम मुळींच होत नाहीं' असें येथें म्हटले आहे; आणि अञ्ज् व अश् यांच्यापुढें तास् प्रत्यय केला असतां विकल्पानें इडागम होत असतो.

तर मग अद् धातूकरिताच येथें हलादि असें म्हटलें पाहिजे. नाहीं तर आदिथ येथें हा इडागमाचा निषेध होऊं लागेल.

पण हलादि असें येथें म्हटलें तरी जघसिथ येथें हा निषेध लागू पडतोच. कारण घस् हा उपदेशामध्यें हलादि आहेचें.

---

१. (सू. ६०) परस्मैपदामध्यें क्लृप् धातूच्या पुढील तास् प्रत्ययाला आणि सकारादि प्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० कल्प्ता, कल्प्स्यति.

१. (सू. ६१) ज्या अजन्त धातूच्या पुढील तास् प्रत्ययाला इडागम मुळींच होत नाहीं त्या धातूच्या पुढील थल् प्रत्ययाला इडागम होत नाहीं; उदा० चिचेथ, निनेथ.

१. (सू. ६२) उपदेशामध्यें ह्रस्वअकारयुक्त धातूच्या पुढील थल् प्रत्ययाला तास् प्रत्ययाप्रमाणें इट् आगम होत नाहीं.

२. अद् धातूला घस् आदेश (२।४।४०) झाला असल्यामुळें घस् धातूचा उपदेश अद् हा आहे. आणि अद् हा हलादि नाहीं म्हणून जघसिथ येथे प्रकृत सूत्रानें निषेध होत नाहीं.

३. अद् या उपदेशामध्यें हलादि नसला तरी तिकडे पाहण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण उपदेशीं

**तस्य चाभावात्तासौ ॥ ३ ॥**

तासावनिट इत्युच्यते न च घसिस्तासावस्ति ॥ ननु च यस्तासौ नास्त्यनिडप्यसौ तासौ भवति । नैवं विज्ञायते यस्तासावनिडिति । कथं तर्हि । यस्तासावस्त्यनिट् चेति । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । सप्तम्यर्थेऽपि वै वतिर्भवति । तद्यथा मथुरायामिव मथुरावत् । पाटलिपुत्र इव पाटलिपुत्रवत् । एवं तासाविव तास्वत् ॥

**ऋतो भारद्वाजस्य ॥ ७।२।६३ ॥**

किमर्थमिदमुच्यते नाचस्तास्वत्थल्यनिटो नित्यम् [ ७.२.६१ ] इत्येव सिद्धम् । एवं तर्हि नियमार्थोऽयमारम्भः । ऋत एव भारद्वाजस्य नान्यतो भारद्वाजस्येति । क्व मा भूत् । ययिथ ववियेति ।

**ऋतो भारद्वाजस्येति नियमानुपपत्तिरप्राप्तत्वात्प्रतिषेधस्य ॥ १ ॥**

ऋतो भारद्वाजस्येति नियमानुपपत्तिः । किं कारणम् । अप्राप्तत्वात्प्रतिषेधस्य । गुणे कृते

---

( वा. ३ ) येथे तर 'ज्या धातूहून तास् प्रत्यय केला असतां इडागम होत नाहीं' असें म्हटलें आहे, आणि घस् धातु तर तास् प्रत्ययापूर्वी मुळींच दिसत नाहीं.

पण जो धातु तास् प्रत्ययापूर्वी मुळींच दिसत नाहीं त्याला तास् प्रत्ययापूर्वी इडागम होणारा असेंही म्हणतां येणार नाहीं.

'तास् प्रत्ययापूर्वी इडागम न होणारा' असा येथें अर्थ नाहीं.

तर मग कसा आहे ?

'जो धातु तास् प्रत्ययापूर्वी आहे आणि तेथें त्याच्यामुळें ज्याला इडागम होत नाहीं' असा अर्थ आहे.

हें काय बरें असें बोलावें ? तसें बोलूं नये. कारण सूत्रामध्यें तसे शब्द नसतां त्याचा अर्थ तसा कसा समजला जाईल ?

सूत्रामध्यें तसे शब्द आहेत. कारण वत् हा प्रत्यय सप्तमीच्या अर्थीही होत असतो (५।१।११६); उदाहरण : 'मथुरेमध्यें जसें' अशा अर्थी 'मथुरावत्' असा प्रयोग होतो. तसेंच 'पाटलिपुत्र नगरामध्यें जसें' या अर्थी 'पाटलिपुत्रवत्' असा प्रयोग होतो. त्याप्रमाणें येथें 'तास् प्रत्ययापूर्वी जसें' या अर्थी 'तास्वत्' असा सूत्रामध्यें प्रयोग केला आहे.

(सू. ६३) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? करावयास नको. कारण ह्या सूत्राचीं जहर्थ वगैरे उदाहरणें 'अचस्तास्वत्थलि०' (७।२।६१) या सूत्रानेंच सिद्ध होतात.

तर मग हें सूत्र नियमार्थ केलें आहे असें समजावें. तो नियम असा कीं भारद्वाज ऋषींच्या मतीं ह्रस्वऋकारान्त धातु असेल तरच त्याच्या पुढील थल् प्रत्ययाला इडागमाचा निषेध होतो; त्याशिवाय इतर धातूंच्या पुढील थल् प्रत्ययाला इडागमाचा निषेध भारद्वाजमतीं होत नाहीं.

ह्या नियमामुळें इडागमाचा निषेध होत नाहीं अशीं उदाहरणें कोणतीं ?

पपिथ, वविथ, इत्यादि.

(वा. १) प्रकृत सूत्र नियमार्थ आहे हें म्हणणें जुळत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं प्रतिषेधाची प्राप्ति येत नाहीं. जहर्थ येथे हृ या ह्रस्वऋकारान्त धातूला गुण

---

हलादि असावा असें येथें म्हटलें आहे; अजादि नसावा असें म्हटलें नाहीं.

४. तेव्हां घस् धातूचा तास् प्रत्ययापूर्वी प्रयोग जरी नाहीं तरी ' तास् प्रत्ययापूर्वी इडागम न होणारा ' असें त्याला म्हणतां येईल असा अभिप्राय आहे.

१. ( सू. ६३ ) भारद्वाज ऋषींचें मत असें आहे कीं वरील दोन सूत्रांनीं जो थल् प्रत्ययाला इडागमाचा निषेध सांगितला आहे तो बरोबर नाहीं; तेथें इडागम होतोच; फक्त ऱ्हस्वऋकारान्त धातूच्या पुढील थल् प्रत्ययाला मात्र इडागम होत नाहीं. तेव्हां भारद्वाजमतीं पपिथ, पेचिथ, अशीं रूपें होतात, आणि इतर मतीं पपाथ, पपक्थ, अशीं होतात. एकंदरींत त्या

रपरत्वे चानजन्तत्वात्प्रतिषेधो न प्राप्नोति ॥ असति नियमे को दोषः ।

**तत्र पचादिभ्य इड्वचनम् ॥ २ ॥**

तत्र पचादिभ्य इड् वक्तव्यः । पेचिथ शेकिथेति ॥ यदि पुनरयं भारद्वाजः पुरस्तादपकृष्येत । अचस्तास्वत्थल्यनिटो नित्यं भारद्वाजस्य । उपदेशेऽत्वतो भारद्वाजस्य । तत ऋतः । भारद्वाजस्येति निवृत्तम् । सिध्यत्येवमयं तु भारद्वाजः स्वस्मान्मतात्प्रच्यावितो भवति ॥ एवं तर्हि

**योगविभागात्सिद्धम् ॥ ३ ॥**

योगविभागः करिष्यते । अचस्तास्वत्थल्यनिटो नित्यमुपदेशे । ततोऽत्वतः । अत्वतश्चोपदेश इति ॥

**बभूथाततन्थ जगृभ्म ववर्थेति निगमे ॥ ७।२।६४ ॥**

वृग्रहणं किमर्थं न कृसृभृवृस्तुद्रुश्रुस्रुवो लिटि [ ७. २. १३. ] इत्येव सिद्धम् । एवं

---

करून तो रपर झाल्यानंतर हर् हें अजन्त राहत नसल्यामुळें 'अचस्तास्वत्०' ( ७।२।६१ ) या निषेधाची प्राप्ति येत[2] नाहीं.

मग प्रकृत सूत्र नियमार्थ झालें नाहीं तर कोठें बरें दोष येईल ?

(वा. २) नियम नसला तर पच् वगैरे धातूंच्या पुढील थल् प्रत्ययाला एकदां इडागम होतो असें वचन करावें लागेल; उदा० पेचिथ, शेकिथ, इत्यादि. आता जर भारद्वाज शब्द मागे ओढून पूर्वीच्या सूत्रात घातला तर मात्र हें वचन करावयास नको. तें असें कीं, 'अचस्तास्वत्थल्यनिटो नित्यं भारद्वाजस्य' असें एक सूत्र[3] होय. 'उपदेशेऽत्वतः' हें दुसरें सूत्र होय. येथें 'भारद्वाजस्य' या शब्दाची अनुवृत्ति आहेच. त्याच्यापुढें 'ऋतः' एवढेंच तिसरे सूत्र होय. येथें मात्र 'भारद्वाजस्य' या शब्दाची अनुवृत्ति नाहीं.

अशा रीतीनें उदाहरणें सिद्ध होतील खरीं. परंतु असे केले तर हा भारद्वाज ऋषि आपल्या मतापासून भ्रष्ट करविला जातो.

तर मग ?

(वा. ३ ) सूत्रांचा विभाग निराळ्या तऱ्हेचा केला म्हणजे सर्व सिद्ध होईल. तो असा: 'अचस्तास्वत्थल्यनिटो नित्यमुपदेशे' असें एक सूत्र होय. 'अत्वतः' असें दुसरें सूत्र होय. 'उपदेशीं ह्रस्व अकार ज्या धातूमध्यें आहे' इत्यादि ह्या सूत्राचा अर्थ पूर्वीप्रमाणेंच आहे.

(सू. ६४) ह्या सूत्रामध्यें वृ धातूचें जें ववर्थ असें निपातन केलें आहे तें कशाकरितां ? तें करावयास नको. कारण 'कृसृभृवृस्तुद्रुश्रुस्रुवो लिटि' (७।२।१३) या सूत्रानेंच इडागमाचा निषेध सिद्ध आहे.

---

धातूंची थलामध्यें दोन दोन रूपें होतात. ऋकारान्त धातूचें मात्र एकच जहर्थ असें सर्वांच्या मतीं सारखेंच रूप होतें.

२. हर् असा ऱ्हस्वअकारयुक्त धातु झाला तरी तो तसा उपदेशीं नसल्यामुळें 'उपदेशेऽत्वतः' या सूत्रानें हा इडागमाचा निषेध सिद्ध होत नाहीं.

३. ज्या धातूच्या पुढील तास् प्रत्ययाला इडागम होत नाहीं अशा अजन्त धातूच्या पुढील थल् प्रत्ययाला भारद्वाजाच्या मतीं इडागम होत नाहीं, असा या सूत्राचा अर्थ होय; म्हणजे अर्थातच इतर मतीं इडागम होतो. तेव्हा पपिथ, पपाथ अशीं दोन रूपें साधलीं एवढेंच होणार आहे. परंतु 'ऋतो भारद्वाजस्य' हें सूत्र नियमार्थ घेतलें असतां जरी अशींच दोन रूपें होतात तरी त्या वेळीं भारद्वाज मतीं पपिथ असें होतें तें आतां भारद्वाज मनीं पपाथ असें होतें. एकंदरींत भारद्वाजाचें मत फिरविल्यासारखें होतें.

४. पुढील सूत्रांतील उपदेशे हें पद ह्या सूत्रांत घेतलें त्यामुळें उपदेशीं अजन्त असा अर्थ होतो; तेव्हां हृ धातूला गुण होऊन तो रपर होऊन हर् असें झालें. त्यामुळें तो आतां अजन्त नाहीं तरी उपदेशी हृ असा अजन्त आहे म्हणून निषेध सिद्ध होईल. तेव्हां अर्थातच प्रकृत सूत्र नियमार्थ घेतां येतें.

१. ( सू. ६४ ) बभूविथ, आततिथ, जगृहिम, अशीं जीं रूपें लोकांमध्यें होतात त्यांच्या ऐवजीं वेदामध्यें बभूथ, आततन्थ, जगृभ्म अशीं रूपें निपात म्हणून सांगितलीं जातात. तसेंच ववर्थ असें इडागम न

तर्हि नियमार्थोऽयमारम्भः । नियम एव यथा स्यात् । क मा भूत् । ववरिथ ॥

[ [1]विभाषा सृजिदृशोः ॥ ७।२।६५ ॥
इडत्त्यर्तिव्ययतीनाम् ॥ ७।२।६६ ॥]
वस्वेकाजाद्घसाम् ॥ ७।२।६७ ॥

किमर्थमिदमुच्यते ।

**वस्वेकाजाद्घसांवचनं नियमार्थम् ॥ १ ॥**

नियार्थोऽयमारम्भः । वसावेकाजाद्घसामेव । क मा भूत् । बिभिद्वान् ॥ किमुच्यते नियमार्थमिति न पुनर्विध्यर्थोऽपि स्यात् । प्रतिषेधोऽपि ह्यत्र प्राप्नोति नेड् वशि कृति [ ७.२.८ ] इति । कृच्चैव ह्ययं वशादिश्च । एवं तर्हि कृसृभृवृस्तुद्रुस्रुश्रुवो लिटि [ ७ २. १३ ] इत्येतस्मान्नियमादत्रेड् भविष्यति ॥ नात्र तेन परिप्रापणं प्राप्नोति । किं कारणम् । प्रकृतिलक्षणस्य प्रतिषेधस्य स प्रत्यारम्भः प्रत्ययलक्षणश्चायं प्रतिषेधः ॥ उभयोः स प्रत्यारम्भः । कथं ज्ञायते । वृङ्वृञोर्ग्रहणात् ।

---

तर मग ववर्थ हें निपातन नियमार्थ केलें आह. तो नियम असा कीं वेदामध्येंच ववर्थ असे रूप व्हावें.

या नियमामुळें इडागमाचा निषेध लागू पडत नाहीं असें उदाहरण कोणतें ?

लोकामध्यें ववरिथ असेंच होतें.

( सू. ६७ ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

( वा. १ ) नियमार्थ हें सूत्र केलें आहे. तो नियम असा कीं एकाच् धातु, आकारान्त धातु आणि घस् धातु ह्याच धातूंच्या पुढील क्वसु प्रत्ययाला इडागम होतो, इतर धातूंच्या पुढील क्वसु प्रत्ययाला इडागम होत नाहीं.

ह्या नियमामुळें इडागम झाला नाहीं असें उदाहरण कोणते ?

बिभिद्वान् येथें इडागम झाला नाहीं.

पण काय हो, हें सूत्र नियमार्थ आहे असें काय म्हणतां ? विध्यर्थही कां बरें होणार नाहीं ? कारण पेचिवान्, ददिवान्, वगैरे उदाहरणांमध्यें क्वसु प्रत्ययाला इडागमाचा निषेध 'नेड् वशि कृति' ( ७।२।८ ) या सूत्रानें प्राप्त होत आहेच. क्वसु प्रत्यय हा कृत्प्रत्यय आहे आणि वशादिही आहे.

तर मग त्या निषेधाला 'कृसृभृ०' ( ७ । २। १३ ) हा नियम[2] मागे सारील आणि येथें इडागम सिद्ध होईल.

पण 'कृसृभृ०' हें नियमसूत्र येथें लागू पडणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं 'एकाच उपदेशे' ( ७।२। १० ) या सूत्रानें कोणताही विशेष प्रत्यय निमित्त म्हणून न धरतां फक्त 'अनुदात्त धातु' या विशेष प्रकृतीला धरून जो इडागमाचा निषेध सांगितला आहे त्याचाच 'कृसृभृ०' या सूत्रानें नियम केला जातो, आणि 'नेड् वशि०'(७।२।८) हा निषेध तर विशिष्ट प्रत्ययाला धरून केला आहे.

पण 'कृसृभृ०' हा नियम दोन्ही प्रकारच्या निषेधांना दूर करण्याकरितां केला आहे ना ?

असें कशावरून समजतें ?

'कृसृभृ०' या सूत्रामध्यें वृङ् आणि वृञ् या धातूंचें जें वृ शब्दानें उच्चारण केलें आहे त्यावरून.

---

झालेलें रूप वेदामध्येंच होतें. तेव्हां या नियमामुळें लोकामध्यें ववरिथ असें रूप होतें.

१. ( सू ६५ ) सृज् आणि दृश् या धातूंच्या थल् प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; उदा० सस्रष्ठ ससर्जिथ दद्रष्ठ ददर्शिथ.

१ (सू. ६६) अद्, ऋ आणि व्येञ् या धातूंच्या पुढील थल् प्रत्ययाला इडागम नित्य होतो; उदा० आदिथ, आरिथ, संविव्ययिथ.

१. (सू. ६७) द्वित्व केल्यानंतर कांहीं कार्यामुळें एकाच् बनलेले असे धातू, आकारान्त धातू आणि घस् धातु यांच्या पुढें असलेल्या अशाच क्वसु प्रत्ययाला इडागम होतो; इतर धातूंच्या पुढील क्वसु प्रत्ययाला होत नाहीं; उदा० पेचिवान्, तस्थिवान्, जक्षिवान्.

२. क्वसु हा जरी कृत् प्रत्यय आहे तरी तो लिटाचे स्थानीं ( ३।२।१०७ ) होत असल्यामुळें 'कृसृभृ०' हें सूत्र येथें लागू पडतें.

कथं कृत्वा ज्ञापकम् । इमौ वृङ्वृञावुदात्तौ तयोः प्रकृतिलक्षणः प्रतिषेधो न प्राप्नोति । पश्यति त्वाचार्य उभयोः स प्रत्यारम्भ इति ततो वृङ्वृञोर्ग्रहणं करोति । न खल्वपि कश्चिदुभयवान्प्रतिषेधः प्रकृतिलक्षणः प्रत्ययलक्षणश्च । तुल्यजातीयेऽसति यथैव प्रकृतिलक्षणस्य नियामको भवत्येवं प्रत्ययलक्षणस्यापि नियामको भविष्यति ॥ अथ यावता वसावेकाज्भ्य इटा भवितव्यं को न्वत्र विशेषो नियमार्थे वा सति विध्यर्थे वा । न खलु कश्चिद्विशेषः । आहोपुरुषिकामात्रं तु भवानाह विध्यर्थमिति । वयं तु ब्रूमो नियमार्थमिति ॥

अथैकाज्ग्रहणं किमर्थम् । इह मा भूत । बिभिद्वान् चिच्छिद्वानिति ॥ क्रियमाणेऽपि वा एकाज्ग्रहणेऽत्र प्राप्नोति । एषोऽपि ह्येकाच् ॥ एवं तर्हि कृते द्विर्वचने य एकाच् । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । एकाज्ग्रहणसामर्थ्यात् । न हि कश्चिदकृते द्विर्वचनेऽनेकाजस्ति यदर्थमेकाज्ग्रहणं क्रियते । ननु चायमस्ति जागर्तिः ।

---

हें कसें सिद्ध होतें ?

वृङ् आणि वृञ् हे दोन्ही धातू उदात्त आहेत. तेव्हां 'एकाच उपदेशे०' हा जो विशिष्ट प्रकृतीला धरून सांगितलेला निषेध तो त्या दोन्ही धातूंना प्राप्त होत नाहीं. असें असतां ज्या अर्थी आचार्यांनीं 'कृसृभृ०' या सूत्रामध्यें या धातूंचें ग्रहण केलें आहे त्या अर्थी ते सुचवितात कीं 'कृसृभृ०' हा नियम दोन्ही प्रकारच्या निषेधांना लागू पडतो. असें समजूनच त्यानीं सूत्रामध्यें वृङ् आणि वृञ् याचा वृ या शब्दानें निर्देश केला आहे. शिवाय 'कृसृभृ०' या नियमसूत्रामध्यें प्रकृति आणि प्रत्यय हे दोन्ही विशेष प्रकारचे धरले आहेत. ह्या नियमासारखे म्हणजे प्रकृति आणि प्रत्यय हे दोन्ही विशेष प्रकारचे ज्यामध्यें धरले आहेत असें निषेधशास्त्र एकही नाहीं कीं तेवढ्यापुरताच हा नियम आहे असें म्हणतां येईल. आतां नियमाला आपल्यासारखें निषेधशास्त्र ज्या अर्थी मिळत नाहीं त्या अर्थी जसा हा नियम विशिष्ट प्रकृतीला धरून सांगितलेल्या निषेधाला लागू पडतो तसा विशिष्ट प्रत्ययाला धरून सांगितलेल्या निषेधालाही लागू पडेलच.

एकंदरीत 'कृसृभृ०' हा नियम 'नेड् वशि०' या निषेधाला देखील मागें सारील. तेव्हा एकाच्, आकारान्त आणि घस् या धातूंच्या पुढील क्वसु प्रत्ययाला इडागम सिद्ध होत असल्यामुळें प्रकृत सूत्र नियमार्थ होणार आहे.

पण काय हो, हें प्रकृत सूत्र नियमार्थ म्हटलें काय अथवा विध्यर्थ म्हटलें काय, दोहोंमध्यें उदाहरणांत फरक काय होणार आहे ?

फरक काहींच होणार नाहीं. फक्त मीपणामुळें 'प्रकृत सूत्र विध्यर्थ आहे' असें तुम्ही म्हणत आहां, पण आम्ही म्हणतों की हें सूत्र नियमार्थच आहे.

आतां ह्या प्रकृत सूत्रामध्यें एकाच् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

बिभिद्वान्, चिच्छिद्वान्, येथें बिभिद्, चिच्छिद्, हे धातू अनेकाच् असल्यामुळें तेथें इडागम होऊं नये याकरितां म्हटलं आहे.

पण एकाच् असें म्हटलें तरी देखील येथें इडागम प्राप्त होतोच. कारण भिद्, असा मूळ धातू एकाच् आहेच.

तर मग द्वित्व केल्यानंतर जो एकाच्, असा अर्थ येथें घेतां येईल.

हें असें काय बरें बोलावें ? असें बोलूं नये. कारण सूत्रामध्यें तशा अर्थाचा शब्द नसतांना तसा अर्थ कसा बरें घेता येईल ?

एकाच् असें जें सूत्रांत उच्चारलें आहे त्याच्या जोरावरच तसा अर्थ घेतां येईल. कारण द्वित्व करण्याच्या पूर्वी कोणताही धातु एकाच् नाहीं असें होतच नाहीं कीं ज्याकरितां येथें एकाच् शब्द घातला आहे असे म्हणतां येईल.

पण जागृ हा धातु हा मूळचाच अनेकाच् आहे

जागृवांसो अनुग्मन् । यत्तर्ह्याकारग्रहणं करोति न हि कश्चिदकृते द्विर्वचन आकारान्तोऽनेकाजस्ति। ननु चायमस्ति दरिद्रातिः। न दरिद्रातेरिटा भवितव्यम् । किं कारणम् । उक्तमेतद्दरिद्रातेरार्धधातुके लोपः सिद्धश्च प्रत्ययविधाविति । यश्चेदानीं प्रत्ययविधौ सिद्धः सिद्धोऽसाविड्विधौ । एवमपि भूतपूर्वगतिर्विज्ञायेत । आकारान्तो यो भूतपूर्व इति । एकाज्ग्रहणमेव तर्हि ज्ञापकम् ! ननु चोक्तं जागर्त्यर्थमेतत्स्यात् । नैकमुदाहरणमेकाज्ग्रहणं प्रयोजयति । यद्येतावत्प्रयोजनं स्याज्जागर्तेर्नेत्येव ब्रूयात् ॥

अथ घसिग्रहणं किमर्थं नैकाजित्येव सिद्धम ॥

घसिग्रहणमनच्कत्वात् ॥ २ ॥

घसिग्रहणं क्रियते लोपे कृतेऽनच्कत्वादिण्न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । इट् क्रियतां लोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वा-

---

ना ? 'जागृवांसो अनुग्मन्' असा त्याचा प्रयोगही आहे. त्यामध्यें क्वसु प्रत्ययाला इडागम केलेला नाहीं.

तर मग सूत्रामध्यें आत् असें जें उच्चारलें आहे त्याच्या जोरावर द्वित्व केल्यानंतर एकाच् असा अर्थ घेतां येईल. कारण कोणताही आकारान्त धातु द्वित्व करण्याच्या पूर्वी एकाच् नाहीं असें होतच नाहीं.

पण दरिद्रा हा आकारान्त धातु मूळचाच अनेकाच् आहे ना ?

दरिद्रा हा धातु जरी अनेकाच् आकारान्त आहे तरी त्याच्या पुढील क्वसु प्रत्ययाला येथें आत् असा शब्द घातल्यामुळें इडागम होईल असें म्हणतां येत नाहीं.

काय बरें कारण ?

याचें कारण मागें ( ६।४।११४ वा. १२ ) सांगितलेंच आहे कीं आर्धधातुक प्रत्ययाची विवक्षा असतांना दरिद्रा धातूच्या आकाराचा लोप होतो, आणि तो लोप प्रत्यय कर्तव्य असतांना सिद्ध समजावा. आतां जो हा लोप प्रत्यय कर्तव्य असताना सिद्ध आहे तो इडागम कर्तव्य असतांनाही सिद्धच असणार[3].

तरी पण भूतपूर्वगति येथें घेतां येईल. म्हणजे सूत्रांत आत् असा शब्द घातला त्याच्या जोरावर दरिद्रा असा जो लोप करण्याच्या पूर्वी आकारान्त धातु होता तो घेऊन इडागम करतां येईल.

तर मग सूत्रांत जो एकाच् असा शब्द घातला त्याच्याच जोरावर 'द्वित्व केल्यानंतर एकाच्' असा अर्थ घेतां येईल.

पण तसा अर्थ घेतला नाहीं तरी साध्या अर्थानेंच त्या एकाच् शब्दाचा उपयोग जागृ या धातूकरितां होईल असें आतांच सांगितले आहे ना ?

सांगितलें आहे खरें, पण फक्त जागृ हा एकच धातु वगळण्याकरितां येथें एकाच् शब्द घेतला असें म्हणता येत नाहीं. कारण तेवढाच उपयोग असता तर तेवढ्यापुरतें 'जागर्तेर्न' म्हणजे जागृ धातूच्या पुढील क्वसु प्रत्ययाला इडागम होत नाहीं असें विशेषच म्हटलें असतें.

आतां प्रकृत सूत्रामध्यें घस् असा शब्द कशाकरितां उच्चारला आहे ? तो उच्चारावयास नको. कारण घस् धातूच्या पुढील क्वसु प्रत्ययाला इडागम एकाच् या म्हणण्यानेंच सिद्ध होणार आहे.

(वा. २) ह्या सूत्रामध्यें जो घस् असा शब्द उच्चारला आहे त्याचें कारण हें कीं घस् धातूंतील अकाराचा लोप ( ६।४।१०० ) केल्यानंतर त्या धातूमध्यें एकही अच् नाहीं असें होत असल्यामुळें एकाच् या म्हणण्यानें इडागम सिद्ध होणार नाहीं.

आतां येथें अगोदर असा विचार केला पाहिजे कीं इडागम पूर्वी करावा कीं लोप पूर्वी करावा.

मग येथें काय बरें अगोदर करावें ?

---

३. तेव्हां इडागम करतेवेळीं दरिद् असा रेफान्तधातु झाला, आकारान्त नाहीं. एकंदरींत सूत्रांतील आत् या पदाचा दरिद्रा या धातूसंबंधानें उपयोग करतां येणार नाहीं.

दिडागमः । नित्यो लोपः । कृतेऽपीटि प्राप्नोत्यकृतेऽपि । इडपि नित्यः । कृतेऽपि लोपे प्राप्नोत्यकृतेऽपि । अनित्य इण्न हि कृते लोपे प्राप्नोति । किं कारणम् । अनच्कत्वात् । एवं तर्हि द्विर्वचने कृतेऽभ्यासे योऽकारस्तदाश्रय इड् भविष्यति । न सिध्यति । किं कारणम्। द्वित्वाल्लोपस्य परत्वात् । द्विर्वचनं क्रियतां लोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाल्लोपः । लोपे कृतेऽनच्कत्वाद् द्विर्वचनं न प्राप्नोति । घसिग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति । कथम् । वचनादिड् भविष्यति । इटि कृते द्विर्वचनं क्रियतां लोप इति यद्यपि परत्वाल्लोपः स्थनिवद्भावाद् द्विर्वचनं भविष्यति ॥

## विभाषा गमहनविदविशाम् ॥ ७।२।६८ ॥

दृशेश्चेति वक्तव्यम् । ददृश्वान् ददृशिवान् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । दृशेरिति वर्तते ॥

## [सनिं ससनिवांसम् ॥ ७।२।६९ ॥]

---

परत्वास्तव इट् आगम पूर्वी करावा.

पण लोप नित्य आहे ना ? कारण तो लोप इडागम केल्यानंतरही प्राप्त होतो. आणि इडागम करण्याच्या पूर्वीही प्राप्त होतो.

इडागम देखील नित्य आहे. कारण लोप केल्यानंतरही तो प्राप्त होतो आणि लोप करण्याच्या पूर्वीही प्राप्त होतो.

असें म्हणतां येत नाहीं. इडागम अनित्य आहे. कारण लोप केल्यानंतर त्याची प्राप्ति येत नाहीं.

काय कारण ?

धातूमध्यें एकही अच् शिल्लक राहत नाहीं; तेव्हां त्याला एकाच् म्हणतां येत नाहीं.

तर मग घस् धातूला द्वित्व केल्यानंतर लोप झाला तरी अभ्यासामधील अकार घेऊन धातु एकाच् होत असल्यामुळें इडागम करतां येईल.

अशा रीतीनेंही हे उदाहरण सिद्ध होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं द्वित्वापेक्षां लोपाला परत्व आहे. तें असें कीं येथें अगोदर द्वित्व करावें कीं अगोदर लोप करावा असा विचार उत्पन्न होतो. मग त्यामध्यें काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव द्वित्वाचा बाध करून लोप अगोदर होईल, आणि तो लोप झाल्यानंतर धातमध्यें एकही अच् शिल्लक राहत नाहीं, म्हणून द्वित्वच होणार नाहीं, असा दोष येतो. हा दोष सूत्रामध्यें घस् शब्द घातला असतां येत नाहीं.

तो कसा ?

तो असा कीं घस् शब्द उच्चारला त्या जोरावर सर्वांच्या अगोदर इडागम होईल. आणि इडागम झाल्यानंतर द्वित्व करावें कीं लोप करावा असा विचार उत्पन्न झाल्यानंतर जरी परत्वास्तव अगोदर लोप झाला तरी त्या लोपाला स्थानिवद्भाव ( १।१।५९ ) होऊन द्वित्व होईल आणि रूप साधेल.

( सू. ६८ ) दृश् धातूच्या पुढील क्वसु प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो असें म्हणावें; उदा० ददृशिवान् ददृश्वान्.

तर मग तसें म्हटले पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण दृश् धातूची अनुवृत्तीच मागून ( ७।२।६५ ) येत आहे.

---

१. ( सू ६८ ) गम्, हन्, विद् आणि विश् या धातूंच्या पुढील क्वसु प्रत्ययाला इडागम विकल्पानें होतो; उदा० जग्मिवान्, जगन्वान्, वगैरे.

१. ( सू ६९ ) सन् धातूहून लिट् प्रत्यय, त्याला क्वसु आदेश, द्वित्व, एत्व, अभ्यासलोप ( ६।४।१२१ ) ही कार्यें झाल्यानंतर एकाच् होत असल्यामुळें 'वस्वेकाजा०' ( ७.२।६७ ) यानें इडागम होतो. पुढें त्या सेनिवस् शब्दाचें द्वितीयैकवचन सेनिवांसम् असें होतें वेदामध्यें जर त्याच्या मागें सनिम् असें उपपद असेल तर त्या निपातनाच्या जोरावर एत्व आणि अभ्यासलोप होत नाहींत, आणि द्वित्व केल्यावर धातु एकाच् झाला नाहीं तरी इडागम होतो. त्यामुळें सनिं ससनिवांसम् असें निपातन केलेलें रूप सिद्ध होतें.

**ऋद्धनोः स्ये ॥ ७।२।७०॥**

**स्वरतेर्वेट्त्वादृतः स्ये विप्रतिषेधेन ॥१॥**

स्वरतिलक्षणाद्वावचनादृतः स्य इत्येतद्भवति विप्रतिषेधेन। स्वरतिलक्षणस्य वावचनस्यावकाशः। स्वर्ता स्वरिता। ऋतः स्य इत्यस्यावकाशः। करिष्यते हरिष्यते। इहोभयं प्राप्नोति। स्वरिष्यति अस्वरिष्यत्। ऋतः स्य इत्येतद्भवति विप्रतिषेधेन॥

**[अञ्जेः सिचि ॥ ७।२।७१ ॥**

**स्तुसुधूञ्भ्यः परस्मैपदेषु ॥ ७२ ॥]**

**यमरमनमातां सक्च ॥ ७।२।७३ ॥**

किमुदाहरणम्। अयंसीत् व्यरंसीत् अनंसीत् अयासीत् अवासीत्॥ नैतदस्ति। नास्त्यत्र विशेषः सति वेट्यसति वा॥ इदं तर्हि। अयंसिष्टाम् अयंसिषुः। व्यरंसिष्टाम् व्यरंसिषुः। अनंसिष्टाम् अनंसिषुः। अयासिष्टाम् अयासिषुः। अवासिष्टाम् अवासिषुः॥ इदं चाप्युदाहरणम्। अयंसीत् व्यरंसीत् अनंसीत् अयासीत् अवासीत्। ननु चोक्तं नास्त्यत्र विशेषः सति वेट्यसति वेति। अयमस्ति विशेषः। यद्यत्रेण्न स्याद् वृद्धिः प्रसज्येत। इटि पुनः सति नेटि (७.२.४) इति प्रतिषेधः सिद्धो भवति। मा भूदेवं ह्म्यन्तानामित्येवं भविष्यति। अत्रापि नेटीत्यनुवर्तते। तच्चावश्य-

---

(सू. ७० वा. १) ह्रस्वऋकारान्त धातूच्या पुढील स्य प्रत्ययाला प्रकृत सूत्रानें सांगितलेला नित्य इडागम हा स्वृ धातूला सांगितलेल्या वैकल्पिक इडागमाचा विप्रतिषेधानें बाध करतो. स्वृ धातूला सांगितलेल्या वैकल्पिक इडागमाचें स्वतंत्र उदाहरण स्वर्ता स्वरिता; तसेंच ह्रस्वऋकारान्त धातूच्या पुढील स्य प्रत्ययाला सांगितलेल्या नित्य इडागमाचें स्वतंत्र उदाहरण: करिष्यते, हरिष्यते. पण, स्वरिष्यति, अस्वरिष्यत्, येथें दोन्ही प्राप्त होतात, त्यांमध्यें विप्रतिषेधानें नित्य इडागम होतो.

(सू. ७३) या सूत्राचें उदाहरण कोणतें ?

अयंसीत्, व्यरंसीत्, अनंसीत्, अयासीत्, अवासीत्.

हीं ह्या सूत्राचीं उदाहरणें होत नाहींत. कारण ह्या उदाहरणांमध्यें प्रकृत सूत्रानें इडागम केला काय आणि न केला काय, रूपें सारखींच होत आहेत.

तर मग हीं उदाहरणें घ्या: अयंसिष्टाम् अयंसिषुः, व्यरंसिष्टाम् व्यरंसिषुः, अनंसिष्टाम् अनंसिषुः, अयासिष्टाम् अयासिषुः, अवासिष्टाम् अवासिषुः, शिवाय अयंसीत्, व्यरंसीत्, अनंसीत्, अयासीत, अवासीत्, हीं जीं पूर्वी उदाहरणें दाखविलीं तीं देखील ह्या सूत्राचीं उदाहरणें होतातच.

पण त्या ठिकाणीं 'प्रकृत सूत्रानें इट् केला काय आणि न केला काय, रूपें सारखींच होत आहेत' असें आतांच सांगितलें आहे ना ?

रूपें सारखीं होत नाहींत. त्यांमध्यें फरक असा आहे कीं जर प्रकृत सूत्रानें तेथें इडागम केला नाहीं तर पहिल्या तीन उदाहरणांमध्यें 'वदव्रज०' (७।२।३) या सूत्रानें वृद्धि होऊं लागेल, आणि इडागम केला म्हणजे मात्र 'नेटि' (७।२।४) या सूत्रानें त्या वृद्धीचा निषेध होईल.

'नेटि' या सूत्रानें निषेध न होऊ दे; 'ह्म्यन्त०' या सूत्रानें निषेध होईल.

पण तेथेंही न या पदाबरोबर इटि या पदाची अनुवृत्ति आहेच. आणि तेथें इटि या पदाची अनुवृत्ति अवश्य आणलीच पाहिजे. नाहींतर

---

१. (सू. ७०) ह्रस्वऋकारान्त धातु आणि हन् धातु यांच्या पुढील स्य प्रत्ययाला नित्य इडागम होतो; उदा० करिष्यति, हनिष्यति.

१. (सू. ७१) अञ्ज् धातूच्या पुढील सिच् प्रत्ययाला इडागम नित्य होतो; उदा० आञ्जीत्.

१. (सू. ७२) स्तु, सु आणि धूञ् या धातूंच्या सिच् प्रत्ययाला परस्मैपद पुढें असतांना इडागम नित्य होतो; उदा० अस्तावीत्, असावीत्, अधावीत्.

१. (सू. ७३) यम्, रम्, नम् आणि आकारान्त धातू यांच्या पुढील सिच् प्रत्ययाला परस्मैपद पुढें असतांना इडागम नित्य होतो आणि त्याबरोबरच ह्या धातूंना सक् असा आगम होतो; उदा० अयंसीत्, अरंसीत्, अयासीत्,

मिङ्ग्रहणमनुवर्त्यमधाक्षीदित्येवमर्थम् ॥ आकारान्ताश्चापि पदपूर्वा एकवचन उदाहरणम्। मा हि यासीत् । यत्त्रेण स्यादनुदात्तस्य ईटः श्रवणं प्रसज्येत । इटि पुनः सत्युक्तमेतदर्थवत्तु सिचश्चित्करणसामर्थ्याद्धीट उदात्तत्वमिति तत्रैकादेश उदात्तेनोदात्तः (८.२.५) इत्युदात्तत्वं सिद्धं भवति ॥

**[ [१]स्मिपूङ्रञ्ज्वशां सनि ॥७।२।७४॥**

**[१]किरश्च पञ्चभ्यः ॥ ७।२।७५ ॥**

**[१]रुदादिभ्यः सार्वधातुके ॥७।२।७६॥]**

**[१]ईशः से ॥७।२।७७ ॥**

**[१]ईडजनोर्ध्वे च ॥ ७।२।७८ ॥**

किमर्थो योगविभागो नेशीडजनां स्ध्वे इत्येवोच्येत । ईशो ध्वे मा भूदिति । इष्यत एव । ईशिध्व इति । ईडजनोस्तर्हि से मा भूदिति । इष्यत एव । ईडिषे जनिष इति । ईशस्तर्हि स्वे मा भूदिति । इष्यत एव । ईशिष्वेति । से तर्हि यः स्वशब्दस्तत्र यथा स्यात्क्रियासमभिहारे यः स्वशब्दस्तत्र मा

---

अधाक्षीत् येथें वृद्धीचा निषेध होऊं लागेल. तसेंच आकारान्त धातूचीं जीं एकवचनाचीं दोन उदाहरणें दाखविलीं आहेत तीं देखील 'मा' हें पद पूर्वी लावलें म्हणजे ह्या प्रकृत सूत्राचीं उदाहरणें होतात; उदा० 'मा हि यासीत्' येथें प्रकृत सूत्रानें इडागम झाला नाहीं तर दीर्घ ईडागम ( ७।३।९६ ) जो झाला आहे तो अनुदात्त[२] आहे तो तसाच राहील आणि इडागम झाला म्हणजे मात्र तो उदात्त होतो. 'अर्थवत्तु सिचश्चित्करणसामर्थ्याद्धीट उदात्तत्वम्'(३।१।४४ वा.२) असें मागें सांगितलेंच आहे. त्या इडागमाचा दीर्घ ईडागमाबरोबर एकादेश (६।१।१०१) झाला म्हणजे तो 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) यानें उदात्त होऊन अन्तोदात्त रूप होतें.

सू. ७७, ७८, हीं दोन सूत्रें निरनिराळीं कशाकरितां केलीं आहेत ? तशीं करावयास नकोत. 'ईशीडजनां स्ध्वे' असें एकच सूत्र करावें. एक सूत्र केले तर ईश् धातूच्या पुढील ध्वे या प्रत्ययाला इडागम होऊं लागेल, तो न झाला पाहिजे.

त्या ठिकाणीं इडागम इष्टच आहे. 'ईशिध्वे' असाच प्रयोग होतो.

तर मग ईड् आणि जन् ता धातूंच्या पुढील से या प्रत्ययाला इडागम न झाला पाहिजे.

तेथें देखील इडागम इष्टच आहे. ईडिषे, जनिषे, असेच प्रयोग होतात.

तर मग ईश् धातूच्या पुढील 'स्व' याला इडागम होऊं[२] नये, म्हणून तसें केलें असेल.

तेथें देखील इडागम इष्टचें आहे. ईशिष्व असाच प्रयोग होत आहे.

तर मग 'से' पासून तयार झालेल्या 'स्व'-शब्दालाच इडागम झाला पाहिजे. क्रियासमभिहार या अर्थी स्वतंत्र सांगितलेला ( ३।४।२ ) जो स्वशब्द त्याला इडागम होऊं नये, म्हणून तसें केलें असेल.

---

२. आगम हे स्वाभाविक अनुदात्त असतात.

( सू. ७४ ) स्मि, पूङ्, ऋ, अञ्ज् आणि अश् या धातूंच्या पुढील सन् प्रत्ययाला इडागम होतो; उदा० सिस्मयिषते, पिपविषते.

१. ( सू. ७५ ) कॄ, गॄ, दृङ्, धृङ् आणि प्रच्छ या पांच धातूंच्या पुढील सन् प्रत्ययाला इडागम होतो; उदा० चिकरिषति, जिगरिषति.

१. ( सू. ७६ ) रुद्, स्वप्, श्वस्, अन्, आणि जक्ष् या पांच धातूंच्या पुढील वलादि सार्वधातुकप्रत्ययाला इडागम होतो; उदा० रोदिति, स्वपिति.

१. ( सू. ७७, ७८ ) ईश्, ईड्, आणि जन् या धातूंच्या पुढील जे, से आणि ध्वे हे सार्वधातुकप्रत्यय त्यांना इडागम होतो; उदा० ईडिषे, ईडिध्वे, ईशिषे.

२. एक सूत्र करून त्यामध्यें ' स्ध्वे ' असें म्हटलें आहे, त्यामुळें सकारादिप्रत्यय आणि ध्वे यांना इडागम होतो असा अर्थ होईल आणि स्व याला इडागम होऊं लागेल.

१. निराळें सूत्र करून से असें म्हटलें तरी स्व याला इडागम होणारच. कारण स्व हा से याचाच विकार ( ३।४।९१ ) आहे.

भूदिति । अत्रापीष्यते । स भवानीशिष्वेशिष्वेत्येवायमीष्ट इति । आतश्चेष्यत एवं ह्याह सिद्धं तु लोण्मध्यमपुरुषैकवचनस्य क्रियासमभिहारे द्विर्वचनादिति ॥

## [लिङः सलोपोऽनन्त्यस्य ।७।२।७९।]

## अतो येयः ॥ ७।२।८० ॥

किं सार्वधातुकग्रहणमनुवर्तत उताहो न । किं चार्थोऽनुवृत्त्या । बाढमर्थो यद्यकारात्परो याशब्द आर्धधातुकमस्ति । ननु चायमस्ति । चिकीर्ष्यात् । जिहीर्ष्यात् । लोपोऽत्र बाधको भविष्यति ॥ किं तर्ह्यस्मिन्योग उदाहरणम् । पचेत् यजेत् ॥ अत्राप्यतो दीर्घो यञि (७.३.१०१) इति दीर्घत्वं प्राप्नोति । स यथैवेयादेशो दीर्घत्वं बाधत एवं लोपमपि बाधेत । तस्मात्सार्वधातुकग्रहणमनुवर्त्यम् ॥

## [ आतो ङितः ॥ ७।२।८१ ॥ ]

## आने मुक् ॥ ७।२।८२ ॥

### मुकि स्वरे दोषः ॥ १ ॥

मुकि सति स्वरे दोषो भवति । पचमानः यजमानः । मुका व्यवहितत्वादनुदात्तत्वं न प्राप्नोति । ननु चायं मुगदुपदेशभक्तोऽदुप-

---

तेथें देखील इडागम इष्टच आहे; उदा०—स भवानीशिष्वेशिष्वेत्येवायमीष्टे. शिवाय येथें इडागम इष्ट आहे असेंच समजलें पाहिजे. कारण 'सिद्धं तु लोण्मध्यमपुरुषैकवचनस्य क्रियासमभिहारे द्विर्वचनात्' (३।४।२, वा. ५) असें वार्तिककारांनी तेथें सांगितलें आहे.

(सू. ८०) येथें 'सार्वधातुके' या पदाची अनुवृत्ति येते कीं नाहीं ?

अनुवृत्ति आणण्यांत काय बरें फायदा होणार आहे ?

फायदा चांगलाच होईल; पण जर ह्रस्व-अकारान्त अंगाच्या पुढे आर्धधातुक 'या' हा शब्द दृष्टीस पडेल तर.

दृष्टीस पडेल असें कां म्हणतां ? चिकीर्ष्यात्, जिहीर्ष्यात्, येथें तसा 'या' शब्द आहेच कीं.

आहे खरा, पण त्या ठिकाणीं लोप (६।४।४८) हा इयादेशाचा बाध करील.

असेंच आहे तर मग या सूत्राचें उदाहरण तरी कोणतें ?

कां बरें ? पचेत्, यजेत्, हीं आहेतच कीं सार्वधातुक प्रत्ययाचीं उदाहरणें.

पण येथें देखील 'अतो दीर्घो यञि' (७।३।१०१) यानें दीर्घ प्राप्त होत आहेच. तेव्हां तेथें इयादेश जसा दीर्घाचा बाध करतो तसा चिकीर्ष्यात् येथे लोपाचाही बाध करील. एकंदरींत सार्वधातुके या पदाची येथें अनुवृत्ति आणली पाहिजे असें सिद्ध होतें.

(सू. ८२. वा १) मुगागम केला असतां स्वरामध्यें दोष येतो. पचमानः, यजमानः, येथें मुगागमानें व्यवधान होत असल्यामुळें आन या प्रत्ययाला अनुदात्त स्वर होणार नाहीं.

पण मुगागम हा त्या अदुपदेशाचा म्हणजे ह्रस्व अकाराचा अवयव असल्यामुळें त्या मकारासहित अम् एवढ्याला अदुपदेश म्हणतां येईल.

---

४. या वार्तिकाप्रमाणें 'क्रियासमभिहार या अर्थी दृष्टीस पडणारा स्व हा शब्द देखील से याचाच विकार आहे, स्वतन्त्र नव्हे, असें सिद्ध होतें.

१. (सू. ७९) सार्वधातुक लिङ् प्रत्ययांतील सकारांचा लोप होतो, फक्त शेवटच्या सकाराचा होत नाहीं; उदा० कुर्यात्, कुर्याताम्.

१. (सू. ८०) ह्रस्वअकारान्त अंगाच्या पुढें असणारा जो सार्वधातुक प्रत्ययांतील या हा भाग त्याला इय् असा आदेश होतो; उदा० भवेत्, भवेताम्.

१. (सू. ८१) ह्रस्वअकारान्त अंगाच्या पुढें असणाऱ्या ङित् सार्वधातुक प्रत्ययांच्या 'आ'काराला 'इय्' आदेश होतो.

१. (सू. ८२) आन प्रत्यय पुढें असतांना आकारान्त अंगाच्या 'आ'काराला मुक् (म् हा आगम मागें) लागतो.

२. पच् धातूहून लट् प्रत्यय, त्याचे स्थानीं शानच् (३।२।१२४), मध्यें शप् प्रत्यय, नंतर प्रकृत सूत्रानें मुगागम होऊन पचमान असा शब्द सिद्ध होतो. येथें शप् प्रत्ययांतील ह्रस्व अकार हा अदुपदेश म्हणजे उपदेशीं ह्रस्व अकार आहे म्हणून त्याच्या पुढील आन या लसार्वधातुकाला अनुदात्त (६।१।१८६) कराव-

देशग्रहणेन ग्राहिष्यते । न सिध्यति । अङ्गस्य मुगुच्यते विकरणान्तं चाङ्गं सोऽयं संघातभक्तोऽशक्योऽदुपदेशग्रहणेन ग्रहीतुम् ॥ एवं तर्ह्यभक्तः करिष्यते ।

**अभक्ते च ॥ २ ॥**

किम् । स्वरे दोषो भवति । पचमानः यजमानः । मुका व्यवहितत्वादनुदात्तत्वं न प्राप्नोति । एवं तर्हि परादिः करिष्यते ।

**परादौ दीर्घप्रसङ्गः ॥ ३ ॥**

यदि परादिः क्रियतेऽतो दीर्घो यञि (७.३.१०१) इति दीर्घत्वं प्राप्नोति ॥ नैष दोषः । तिङीत्येवं तत् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं मुकि स्वरे दोष इति । परिहृतमेतददुपदेशभक्तोऽदुपदेशग्रहणेन ग्राहिष्यते । ननु चोक्तमङ्गस्य मुगुच्यते विकरणान्तं चाङ्गं सोऽयं संघातभक्तोऽशक्योऽदुपदेशग्रहणेन ग्रहीतुमिति ॥

अथायमङ्गभक्तः स्याद् गृह्येतादुपदेशग्रहणेन । बाढं गृह्येत । अङ्गभक्तस्तर्हि भविष्यति । तत्कथम् । अतो या इयः (७.२.८०) इत्यत्राकारग्रहणं पञ्चमीनिर्दिष्टमङ्गस्येति च षष्ठीनिर्दिष्टं तत्राशक्यं विविभक्तित्वादत इति पञ्चम्याङ्गं विशेषयितुम् । तत्प्रकृतमिहानुव-

---

अशा रीतीनेही सिद्ध होणार नाहीं. कारण मुक् हा आगम अदुपदेशाचा नव्हे, तो अकारान्त अंगाला सांगितला आहे आणि येथें तर पच शप्प्रत्ययान्त अंग आहे. तेव्हा मुक् हा पच या समुदायाचा अवयव झाला असल्यामुळें अदुपदेश या शब्दानें त्याचें ग्रहण करता येणार नाहीं.

तर मग तो मकार कोणाचाही अवयव नव्हे असाच सांगतां येईल.

(वा.२)अवयव मानला नाहीं तरी देखील—

काय होईल ?

स्वरामध्यें दोष येणारच. पचमानः; यजमानः, येथें त्या मकारानें व्यवधान होत असल्यामुळें आन प्रत्ययाला अनुदात्त स्वर होणार नाहीं.

तर मग पुढील प्रत्ययाचा आद्यावयव मुट् असा आगम सांगतां येईल.

(वा. ३) पुढील प्रत्ययाचा आद्यावयव केला तर मागील अकाराला 'अतो दीर्घो०' (७।३।१०१) या सूत्रानें दीर्घ होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'अतो दीर्घ यञि' या सूत्रामध्यें मागून (७।३।८८) तिङि या पदाची अनुवृत्ति आणतां येईल; म्हणजे तो दीर्घ तिङ् प्रत्यय पुढें असतांनाच होईल; आन हा तर कृत् प्रत्यय आहे.

अशा रीतीने सिद्ध होतें, पण मुट् सांगण्यांत सूत्र फिरवावें लागतें ना ?

तर मग मूळचें सूत्र जसें आहे तसेंच तें असूं दे.

पण मुक् असाच ठेवला तर स्वरामध्यें दोष येतो असें आतांच सांगितलें आहे ना ?

त्याचा परिहारही पण केलाच आहे कीं मुक् हा अदुपदेशाचा अवयव असल्यामुळें त्या मकारासहित अम् एवढ्याला अदुपदेश म्हणतां येईल.

त्याचेंही उत्तर दिलेंच आहे कीं मुक् हा अदुपदेशाचा अवयव नव्हे; तर तो अंगाचा अवयव आहे; आणि येथें अंग तर पच हें शप्प्रत्ययान्त आहे. तेव्हां तो मुगागम पच या समुदायाचा अवयव झाला असल्यामुळें अदुपदेश या शब्दानें त्याचें ग्रहण करतां येणार नाहीं.

आता हा मुगागम जर ऱ्हस्व अकाराचा अवयव होईल तर अदुपदेश या शब्दाने अम् याचें ग्रहण होईल ना ?

खास होईल.

तर मग मुक् हा आगम ऱ्हस्व अकाराचाच अवयव आहे असें समजतां येईल.

तें कसें ?

मागें 'अतो येयः' या सूत्रामध्यें अतः हें पद पञ्चम्यन्त उच्चारलें आहे आणि अङ्गस्य हें

---

याचा. परंतु मध्यें मुगागम म्हणून जो अकाराच्या पुढें मकार आला आहे, त्यानें व्यवधान होत असल्यामुळें अनुदात्त होणार नाहीं.

र्तिष्यते । एवमपि षष्ठ्यभावान्न प्राप्नोति । आन इत्येषा सप्तम्यत इति पञ्चम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य ( १. १. ६६ ) इति ॥

[[1]ईदासः ॥ ७।२।८३ ॥ ]

**[1]अष्टन आ विभक्तौ ॥ ७।२।८४ ॥**

**अष्टन्जनादिपथिमथ्यात्वेष्वान्तरतम्यादनुनासिकप्रसङ्गः ॥ १ ॥**

अष्टन्जनादिपथिमथ्यात्वेष्वान्तरतम्याद्नुनासिकः प्राप्नोति । अष्टाभिः अष्टाभ्यः । जातः जातवान् । पन्थाः मन्थाः ॥

**सिद्धमनण्त्वात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अनण्त्वात् । कथमनण्त्वम् । अण्सवर्णान्गृह्णातीत्युच्यते न चाकारोऽण् ॥

**उच्चारणसामर्थ्याद्वा ॥ ३ ॥**

अथवा शुद्धोच्चारणसामर्थ्यान्न भविष्यति ॥ नेतौ स्तः परिहारौ । यत्तावदुच्यतेऽनण्त्वादिति न ब्रूमोऽण्सवर्णान्गृह्णातीति । कथं तर्हि । तपरस्तत्कालस्य (१. १. ७०) इति ।

---

षष्ठ्यन्त पद आहे. तेव्हां तेथें भिन्न विभक्ति असल्यामुळें अतः हें अंगाला विशेषण करता येत नाहीं, त्यामुळें अकारान्त अंग असा अर्थ न होतां अंगाचा अवयव जो ऱ्हस्व अकार असाच तेथें अन्वय होणार आहे. तींच पदें तशींच पुढें चालू झालेलीं येथें येत आहेत. तेव्हां अंगाचा अवयव जो ऱ्हस्व अकार त्याहून आन प्रत्यय पुढें असतांना मुगागम होतो असा अर्थ होईल.

तरी पण अतः ही षष्ठी नसल्यामुळें अकाराला मुक् होणार नाहींच. 'आने' ही सप्तमी आहे, तिच्या जोरावर 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' (१।१।६६) ही परिभाषा तेथें उपस्थित झाल्यामुळें अतः ही जरी पंचमी आहे तरी तेथें षष्ठीची कल्पना होईल.

(सू. ८४, वा. १ ) अष्टन् शब्द, जन् वगैरे धातू ( ६।४।४२ ) आणि पथिन् व मथिन् हे शब्द (७।१।८५) यांच्या नकाराला जो आकारादेश होतो तो नकारासारखा अनुनासिक आकार होऊं लागेल: अष्टाभिः, अष्टाभ्यः, जातः, जातवान्, पन्थाः, मन्थाः.

(वा. २) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

दीर्घ आकार अण् नाहीं म्हणून त्यानें अनुनासिक आकाराचें ग्रहण होणार नाहीं.

दीर्घ आकार अण् नाहीं असें कसें म्हणता येतें ?

अण् सवर्णाचें ग्रहण करतो (१।१।६९) असें जें म्हटलें आहे त्या कामीं दीर्घ आकाराला अण् म्हणतां येत नाहीं.

(वा. ३) अथवा प्रकृत सूत्रामध्यें शुद्ध म्हणजे निरनुनासिक आकार उच्चारला आहे, त्यामुळें उदाहरणामध्यें नकाराला आदेश होतांना तसाच होईल.[1]

हीं दोन्ही उत्तरें बरोबर नाहींत. अनण्त्वात् असें जें पहिलें उत्तर दिलें आहे त्यासंबंधानें आमचें म्हणणें इतकें कीं अण् सवर्णाचें ग्रहण करतो (१।१।६९) म्हणून येथें सानुनासिक आकाराचें ग्रहण होईल असें आम्ही मुळींच म्हणत नाहीं.

तर काय म्हणतां ?

तपरस्तत्कालस्य (१।१।७०) या शास्त्रानें येथें सानुनासिक आकाराचें ग्रहण होईल असें आमचें म्हणणें आहे. तसेंच उच्चारणसामर्थ्यात् असें जें दुसरें उत्तर दिलें आहे त्यासंबंधानें आमचें

---

१. (सू. ८३) आस् धातूच्या पुढील आन प्रत्ययाच्या आकाराला ईकारादेश होतो; उदा० आसीनः.

१. (सू. ८४) अष्टन् शब्दाच्या नकाराला आकारादेश होतो, हलादि विभक्ति पुढे असतांना; उदा० अष्टाभिः, अष्टाभ्यः.

२. दीर्घ अकार हा कांहीं मूळचा अण् नव्हे. अइउण् येथें उच्चारलेला ऱ्हस्व अकार हा मूळचा अण् आहे; त्याने सवर्णाचें ग्रहण केल्यानंतर दीर्घ आकार हा अण् म्हणतां येणार; आणि अण् म्हटल्यानंतर, प्रकृत सूत्रांतील आ या दीर्घ आकारानें सानुनासिक आकार या सवर्णाचें येथें ग्रहण होणार, असा अन्योन्याश्रय येतो.

१. नाहीं तर स्थानीसारखा सानुनासिकच आकार सूत्रामध्यें उच्चारला असता.

यदप्युच्यत उच्चारणसामर्थ्याद्वेत्यस्त्यन्यदुच्चारणे प्रयोजनम् । किम् । उत्तरार्थम् । रायो हलि ( ७.२.८५ ) इति ॥ एवं तर्हि नेमौ पृथक्परिहारौ । एकपरिहारोऽयम् । सिद्धमनण्त्वादुच्चारणसामर्थ्याद्वेति । इह तावदष्टाभिः अष्टाभ्य इत्यनण्त्वात्सिद्धम् । जातः जातवान् पन्थाः मन्थाः उच्चारणसामर्थ्यात्सिद्धम्॥यद्येवं पृथक्परिहारयोरपि न दोषः। यो यत्र परिहारः स तत्र भविष्यति ॥

**[ [१]रायो हलि ॥ ७।२।८५ ॥ ]**

**युष्मदस्मदोरनादेशे ॥ ७।२।८६ ॥**

अनादेशग्रहणं शक्यमकर्तुम् । कथम् । हलीत्यनुवर्तते न चादेशो हलादिरस्ति ॥ तदेतदनादेशग्रहणं तिष्ठतु तावत्सांन्यासिकम् ॥

**[ [१]द्वितीयायां च ॥ ७।२।८७ ॥**

**[१]प्रथमायाश्च द्विवचने भाषायाम् ॥ ७।२।८८ ॥ ]**

**[१]योऽचि ॥ ७।२।८९ ॥ ]**

---

म्हणणें असें आहे कीं ह्या प्रकृत सूत्रामध्यें शुद्ध आकार उच्चारण्याचा उपयोग निराळा आहे.

तो उपयोग कोणता ?

'रायो हलि' या पुढील सूत्रानें रै शब्दांतील ऐकाराला आकारादेश होत असतो, तो तेथें निरनुनासिकच होतो, तेव्हा तेथें अनुवृत्तीकरितां येथें शुद्ध आकार उच्चारला आहे.

असें आहे तर मग हीं दोन निरनिराळीं उत्तरें नव्हेतच. हें एकच उत्तर आहे. सिद्धमनण्त्वात् आणि उच्चारणसामर्थ्याद्वा हीं दोन वार्तिकें मिळून एकच उत्तर दिलें आहे. तें असें कीं अष्टाभिः, अष्टाभ्यः, येथें अनुनासिक आकार न होण्याचें कारण आकार अण् नाहीं म्हणून त्यानें सवर्णांचें ग्रहणच होत नाहीं, हें होय; आणि जातः जातवान्, पन्थाः, मन्थाः, येथें अनुनासिक आकार न होण्याचें कारण 'विड्वनोः०' ( ६।४।४१ ) व 'पथिमथ्यृ०' ( ७।१।८५ ) या दोन सूत्रांमध्यें ज्या अर्थी निरनुनासिक उच्चारला आहे त्या अर्थी तसाचें आदेश होतो हें होय. आतां अशीच जर वस्तुस्थिति आहे तर 'हीं दोन निरनिराळीं उत्तरें आहेत' असेंही म्हणतां येईल, कांहीं हरकत दिसत नाहीं. जें उत्तर ज्या उदाहरणामध्यें जुळेल तेथें तें घेतां येईल.

( सू. ८६ ) ह्या सूत्रामध्यें अनादेशे असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

ते कसें ?

हलि या पदाची अनुवृत्ति येथें येत आहे, आणि आदेश तर हलादि असा कोणीच नाहीं. तरी पण आचार्यांनीं अनादेशे असें जें येथें म्हटलें आहे तें तसेंच राहूं दे.

४. 'अष्टन आ०' येथें आकाराच्या पुढें तकार लावला नसल्यामुळें येथें 'तपरस्तत्कालस्य' या शास्त्रानें सवर्णांचें ग्रहण होईल असें म्हणतां येत नाहीं.

५. विड्वनोरनुनासिकस्यात्, पथिमथ्यृभुक्षामात्, या दोन ठिकाणीं तकार लावल्यामुळें 'तपरस्तत्कालस्य' या शास्त्रानें सवर्णग्रहण झालें तरी तेथें शुद्ध आ उच्चारला आहे त्यामुळें तसाच आदेश होईल. कारण तेथें शुद्ध आ उच्चारण्याचा दुसरा कांहींच उपयोग सांगतां येत नाहीं.

१. ( सू. ८५ ) रैशब्दान्त अंगांतील शेवटच्या वर्णाला आकारादेश होतो, हलादि विभक्ति पुढें असतांना; उदा० राभ्याम्, राभिः.

१. ( सू. ८६ ) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील शेवटच्या वर्णाला आदेश न झालेली हलादि विभक्ति पुढें असतांना आकारादेश होतो; उदा० युवाभ्याम् आवाभ्याम्, युष्माभिः अस्माभिः.

२. 'योऽचि' या सूत्रामध्यें अनुवृत्ति होण्याकरितां तें पाहिजे. नें येथेंही स्पष्टप्रतिपत्त्यर्थ होईल.

१. ( सू. ८७ ) द्वितीयाविभक्ति पुढें असतांना युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील शेवटच्या वर्णाला आकारादेश होतो; उदा० युवाम् आवाम् पश्यति.

१. ( सू. ८८ ) प्रथमा व द्वितीया विभक्तींचा द्विवचनप्रत्यय पुढें असतां लौकिक प्रयोगामध्यें युष्मद् व अस्मद् शब्दांतील शेवटच्या वर्णाला आ आदेश होतो.

१. ( सू. ८९ ) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील शेवटच्या वर्णाला यकारादेश होतो, आदेश न झालेली अजादि विभक्ति पुढें असतांना उदा० त्वया, मया.

अज्ग्रहणं शक्यमकर्तुम् । कथम् । अविशेषेण यत्वमुत्सर्गस्तस्य हलादावात्वमपवादः ।

## [1]शेषे लोपः ॥ ७।२।९० ॥

शेषग्रहणं शक्यमकर्तुम् । कथम् । अविशेषेण लोप उत्सर्गस्तस्याजादौ यत्वमपवादो हलादावात्वम् ॥

## [1]मपर्यन्तस्य ॥ ७।२।९१ ॥

परिग्रहणं शक्यमकर्तुम् । मान्तस्येत्येव सिद्धम् ॥ न सिध्यति । किं कारणम् । अन्तशब्दस्योभयार्थत्वात् । कथम् । अयमन्तशब्दोऽस्त्येव सह तेन वर्तते । तद्यथा । मर्यादान्तं देवदत्तस्य क्षेत्रम् । सह मर्यादयेति गम्यते । अस्ति प्राक्तस्माद्वर्तते । तद्यथा नद्यन्तं देवदत्तस्य क्षेत्रमिति । प्राङ् नद्या इति गम्यते । तद्यः सह तेन वर्तते तस्येदं ग्रहणं यथा विज्ञायेत ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सर्वत्रैवान्तशब्दः सह तेन वर्तते । अथ कथं नद्यन्तं देवदत्तस्य क्षेत्रमिति । नद्याः क्षेत्रत्वे संभवो नास्तीति कृत्वा प्राङ्

---

( सू. ८९ ) ह्या सूत्रामध्यें अचि असें म्हटले नाहीं तरी चालेल.

तें कसें ?

कोणतीही विभक्ति पुढें असतांना असा हा मोघम सांगितलेला यकारादेश सामान्य शास्त्र होईल. आणि हलादि विभक्ति पुढें असतांना असा हा विशेष रीतीनें सांगितलेला आकारादेश हा त्याचा अपवाद होईल.

( सू. ९० ) ह्या सूत्रामध्यें शेषे असें म्हटलें नाहीं तरीं चालेल.

ते कसें ?

आदेश झालेली किंवा न झालेली कोणतीही विभक्ति पुढें असतांना असा हा मोघम सांगितलेला लोप सामान्य शास्त्र होईल. आणि अजादिविभक्ति पुढें असतांना असा विशेष रीतीनें सांगितलेला यकारादेश, व तसलीच हलादि विभक्ति पुढें असतांना असा विशेष सांगितलेला आकारादेश हे त्या लोपाचे अपवाद होतील.

( सू. ९१ ) ह्या सूत्रामध्यें परि हा शब्द घातला नाहीं तरी चालेल. 'मान्तस्य' एवढेंच म्हटलें तरी काम भागणार आहे.

तेवढ्यानें काम भागणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं अन्त शब्दाचे अर्थ दोन आहेत.

ते कसे ?

ज्या पदार्थाचा अन्त असें म्हटलें असेल तो पदार्थ त्या अन्तीं असलेल्या वस्तूसहित असा अर्थ कांहीं ठिकाणीं घेतला जातो; उदा० 'मर्यादान्तं देवदत्तस्य क्षत्रम्' असें म्हटले असतां त्या मर्यादेसहित देवदत्ताचें शेत आहे असा अर्थ मनांत येतो. आतां कांहीं ठिकाणीं ज्या पदार्थाचा अन्त असें म्हटलें असेल तो पदार्थ त्या अन्तीं असलेल्या वस्तूशिवाय घेतला जातो; उदा० —'नद्यन्तं देवदत्तस्य क्षेत्रम्' असें म्हटलें असता नदीच्या पूर्वींच शेताची हद्द संपते असें मनात येतें. या दोन अर्थांपैकीं पहिल्या अर्थाचा जो अन्त शब्द तोच येथें घेतला जावा याकरिता 'परि' शब्द घातला आहे. म्हणजे मकार अन्तीं असलेला जो भाग तो मकारासहित युष्म्, अस्म्, एवढा घेतां येईल.

हा परि शब्दाचा उपयोग बरोबर नाहीं. कारण सर्व ठिकाणींच त्या अर्थाचा अन्त शब्द आहे कीं ज्यामुळें अंतीं असलेल्या वस्तूसहितच तो पदार्थ घेतला जातो. त्याकरितां निराळा यत्न नको.

तर मग 'नद्यन्तं देवदत्तस्य क्षेत्रम्' या प्रयोगाची वाट काय ?

नदीला शेत म्हणणें संभवत नाहीं म्हणून नाइलाजास्तव तेथें अन्तशब्दाचा मूळचा अर्थ

---

१. ( सू. ९० ) जी विभक्ति पुढें असतांना आकार आणि यकार हे आदेश होत नाहींत ती विभक्ति पुढें असतांना युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील शेवटच्या वर्णाचा लोप होतो; उदा० त्वम् अहम्, तुभ्यम् मह्यम्.

१. ( सू. ९१ ) हें अधिकारसूत्र आहे. मपर्यन्त म्ह. मकारापर्यन्त भाग; जसा-युष्मद् शब्दांतील युष्म्, अस्मद् शब्दांतील अस्म्.

नद्या इति गम्यते ॥ अवधिद्योतनार्थं तर्हि परिग्रहणं कर्तव्यम् । मान्तस्येतीयत्युच्यमाने यत्रैव मान्ते युस्मदस्मदी तत्रैवादेशाः स्युः । क्व च मान्ते युस्मदस्मदी । युष्मानाचष्टे अस्मानाचष्ट इति युष्मयतेरस्मयतेश्चाप्रत्ययः॥

[ युवावौ द्विवचने ॥ ७।२।९२॥

यूयवयौ जसि ॥ ७।२।९३ ॥

त्वाहौ सौ ॥ ७।२।९४ ॥

तुभ्यमह्यौ ङयि ॥ ७।२।९५ ॥

तवममौ ङसि ॥ ७।२।९६ ॥

त्वमावेकवचने ॥ ७।२।९७ ॥]

प्रत्ययोत्तरपदयोश्च ॥ ७।२।९८ ॥

किमर्थमिदमुच्यते न त्वमावेकवचने (७.२.९७) इत्येव सिद्धम् । न सिध्यति । किं कारणम् । एकवचनाभावात् एकवचन इत्युच्यते न चात्रैकवचनं पश्यामः । प्रत्यय-

---

सोडून नदीच्या पूर्वीच शेताची हद्द संपते असें समजतें.

तर मग येथें परि हा शब्द अवधि दाखविण्याकरितां घातला आहे, असें समजावें. 'मान्तस्य' एवढेंच म्हटलें तर मकारान्त जो युष्मद् किंवा अस्मद् हा शब्द असा अर्थ होईल आणि ज्या ठिकाणीं युष्मद् व अस्मद शब्द मकारान्त होतील तेथेंच त्यांना पुढील आदेश होतील.

असे मकारान्त झालेले युष्मद् व अस्मद् शब्द कोठें सांपडतात ?

युष्मानाचष्टे, अस्मानाचष्टे, या अर्थींच्या युष्मयति, अस्मयति, या शब्दांमध्यें युष्मद् व अस्मद् या शब्दांहून णिच् प्रत्यय व टिलोप करून पुढें क्विप् प्रत्यय करून णिचाचा लोप केला म्हणजे युष्म् व अस्म्, असे मकारान्त युष्मद् व अस्मद् शब्द तयार होतात.

( सू. ९८ ) हें सूत्र कशाकरिता केलें आहे ? करावयास नको. त्वदीयः, मदीयः, त्वत्पुत्रः, मत्पुत्रः हीं ह्या सूत्राचीं उदाहरणें 'त्वमावेकवचने' या पूर्वसूत्रानेंच सिद्ध होतील.

तशा रीतीनें तीं उदाहरणें सिद्ध होणार

---

१. ( सू. ९२ ) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील मपर्यन्त भागाला क्रमानें युव आणि आव असे आदेश होतात, विभक्ति पुढें असतांना; मात्र ते युष्यद् व अस्मद् शब्द द्वित्वसंख्येला दाखविणारे असले पाहिजेत; उदा० युवाम्, आवाम्.

१. ( सू. ९३ ) युस्मद् आणि अस्मद् या शब्दांतील मपर्यन्त भागाला क्रमानें यूय आणि वय असे आदेश होतात, जस् प्रत्यय पुढें असतांना; उदा० यूयम्, वयम्.

१. ( सू. ९४ ) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील मपर्यन्त भागाला क्रमानें त्व आणि अह असे आदेश होतात, सु प्रत्यय पुढे असतांना; उदा० त्वम्, अहम्.

१. ( सू. ९५ ) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील मपर्यन्त भागाला क्रमानें तुभ्य आणि मह्य असे आदेश होतात, ङे प्रत्यय पुढें असतांना; उदा० तुभ्यम्.

१. ( सू. ९६ ) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील मपर्यन्त भागाला क्रमानें तव आणि मम असे आदेश होतात, ङस् प्रत्यय पुढें असतांना; उदा० तव, मम.

१. ( सू. ९७ ) युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील मपर्यन्त भागाला क्रमानें त्व आणि म असे आदेश होतात, विभक्ति पुढें असतांना; मात्र ते युष्मद् व अस्मद् शब्द एकत्वसंख्येला दाखविणारे असले पाहिजेत; उदा० त्वाम्, माम्.

१. ( सू. ९८ ) एकत्वसंख्येला दाखविणाऱ्या अशा युष्मद् आणि अस्मद् या शब्दांतील मपर्यन्त भागाला क्रमानें त्व आणि म असे आदेश होतात, प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतांना; उदा० त्वदीयः, मदीयः, त्वत्पुत्रः, मत्पुत्रः.

२. तव अयं त्वदीयः येथें युस्मद्+ङस् याच्या पुढें छ प्रत्यय ( ४।३।१२० ) व त्याला ईय आदेश झाला आहे. युष्मद्+ङस्+ईय एवढ्याला तद्धितान्त म्हणून प्रातिपदिकसंज्ञा झाल्यामुळें ङस् प्रत्ययाचा लुक् ( २।४।७१ ) झाला आहे ङस् प्रत्ययाला मानून 'त्वमावेकवचने' यानें त्व आदेश होईल. तसेंच तव पुत्रः त्वपुत्रः येथें युष्मद्+ङस्+पुत्र+सु अशी स्थिति असतांना षष्ठीतत्पुरुष ( २।२।८ ) समास झाला आहे. पुढें प्रातिपदिक संज्ञा ( १।२।४६ ) व लुक् झाला आहे. मम अयं मदीयः. मम पुत्रः मत्पुत्रः, येथें अस्मद् शब्द आहे. बाकीं सर्व कार्यें पूर्वीप्रमाणेंच समजावीं.

लक्षणेन । न लुमताङ्गस्य (१.१.६३) इति प्रत्ययलक्षणस्य प्रतिषेधः ॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । लुक्क्रियतामादेशाविति । किमत्र कर्तव्यम् । परत्वादादेशौ । नित्यो लुक् । कृतयोरप्यादेशयोः प्राप्नोत्यकृतयोरपि । अन्तरङ्गावादेशौ ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्प्रत्ययोत्तरपदयोस्त्वमौ शास्ति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्तरङ्गानपि विधीन्बाधित्वा बहिरङ्गो लुग्भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । गोमान्प्रियोऽस्य गोमत्प्रियः यवमत्प्रियः गोमानिवाचरति गोमत्यते यवमत्यते अन्तरङ्गानपि नुमादीन्बहिरङ्गो लुग्बाधत इति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । अस्त्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । येऽन्य एकवचनादेशाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थमेतस्यात् । तद्यथा । तव पुत्रस्त्वत्पुत्रः मम पुत्रो मत्पुत्रः । तुभ्यं हितं त्वद्धि-

---

नाहींत.

काय कारण ?

कारण[३] असें कीं त्या उदाहरणामध्यें एकवचन नाहीं. पूर्वसूत्रामध्यें 'एकवचने' असें म्हटलें आहे आणि या वरील उदाहरणांमध्यें तर एकवचनप्रत्यय पुढें दिसत नाहीं.

दिसत नाहीं तरी प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) तो पुढें आहे असें समजतां येईल.

पण त्या प्रत्ययलक्षणाचा 'न लुमताङ्गस्य' (१।१।६३) हा निषेध येथें येत आहे.

तर मग येथें प्रथमतः असा विचार केला पाहिजे कीं त्या ङस् प्रत्ययाचा लुक् अगोदर करावा कीं त्या ङस् प्रत्ययाच्या निमित्तानें प्राप्त झालेले त्व, आणि म, हे आदेश अगोदर करावे.

मग त्यामध्यें अगोदर काय बरें करावें ?

परत्वास्तव आदेश अगोदर करावे.

पण लुक् नित्य आहे ना ? कारण आदेश केले असतांही लुक् प्राप्त होतो. आणि आदेश केले नाहींत तरी तो प्राप्त होतो.

जरी लुक् नित्य आहे तरी आदेश अन्तरंग आहेत. तेव्हां ते लुकाच्या पूर्वींच होतील.

अशा रीतीनें त्वदीयः वगैरे उदाहरणांमध्यें 'त्वमावेकवचने' यानें त्व आणि म हे आदेश सिद्ध होत असतांना ज्या अर्थी प्रकृत सूत्रानें प्रत्यय आणि उत्तरपद पुढें असतांना त्व आणि म हे आदेश आचार्यांनीं सांगितले आहेत त्या अर्थी ते सुचवितात कीं लुक् बहिरंग असला तरी तो अंतरंग अशाही विधींचा बाध करून अगोदर होतो.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

गोमान् प्रियो यस्य गोमत्प्रियः[४], यवमत्प्रियः, गोमानिव आचरति गोमत्यते, यवमत्यते, या उदाहरणामध्यें नुम् वगैरे कार्यें जरी अंतरंग आहेत तरी त्यांचा बहिरंग लुक् बाध करतो.

पण हें ज्ञापकच मुळीं बरोबर जमत नाहीं. कारण ज्ञापक केल्यावांचूनच त्याचा दुसरा उपयोग संभवतो.

तो कोणता ?

तो असा कीं समासामधील जे एकवचनप्रत्यय ङस् वगैरे त्यांच्या निमित्तानें जे दुसरे आदेश प्राप्त होतात त्यांचा बाध करण्याकरितां हें प्रकृत सूत्र उपयोगीं पडेल; जसें:– तव पुत्रः त्वत्पुत्रः[५], मम पुत्रः मत्पुत्रः, तुभ्यं हितं त्वद्धि-

---

३. विभक्ति पुढें दिसत नाहीं असें या ग्रंथाचें तात्पर्य आहे. कारण विभक्तौ या पदाची येथें अनुवृत्ति आहे. आतां त्या सूत्रामध्यें 'एकवचने' असें जें म्हटलें आहे त्याचा अर्थ 'एकत्वसंख्या असेल तर' असा आहे. एकवचन हा संज्ञाशब्द तेथें घ्यावयाचा नाहीं.

४. गोमत्+सु, प्रिय+सु, या दोन पदांचा बहुव्रीहिसमास येथें झाला आहे. आंतील सु प्रत्ययाला मानून नुम् (७।१।७०) आणि दीर्घ (६।४।१४) प्राप्त होत आहेत म्हणून ते अंतरंग आहेत. आणि लुकाला (२।४।७१) संबंध समासाची जरूर असल्यामुळें तो बहिरंग आहे. गोमत्यते येथें गोमत्+सु याहून क्यङ् प्रत्यय (३।१।११) झाला आहे.

५. त्वत्पुत्रः येथें आंतील ङस् या विभक्तिप्रत्ययाला मानून 'त्वमावेकवचने' या सूत्रानें त्व आदेश प्राप्त होतो परंतु त्याचा बाध करून 'तवममौ ङसि' यानें तव हा

तम् मह्यं हितं मद्धितमिति ॥ यर्त्ताहि मपर्यन्तग्रहणमनुवर्तयति । यद्यत्रान्य एकवचनादेशाः स्युर्मपर्यन्तानुवृत्तिरनर्थिका स्यात् ॥

**त्रिचतुर्युष्मदस्मद्ग्रहणेष्वर्थग्रहणं शब्दविशेषणम् ॥ १ ॥**

त्रिचतुर्युष्मदस्मद्ग्रहणेष्वर्थग्रहणं शब्दविशेषणं द्रष्टव्यम् । त्रिचतुरोः स्त्रियां तिसृचतसृ (७. २. ९९) । यद्यपि समासः पुंसि नपुंसके वा वर्तते त्रिचतुरौ च स्त्रियां वर्तेते भवत्येव तिसृचतसृभावः । प्रियास्तिस्रो ब्राह्मण्योऽस्य ब्राह्मणस्य प्रियतिसा प्रियतिस्रौ प्रियतिस्रः । प्रियचतसा प्रियचतस्रौ प्रियचतस्रः । प्रियास्तिस्रो ब्राह्मण्योऽस्य ब्राह्मणकुलस्य प्रियतिसृ प्रियतिसृणी प्रियतिसृणि । प्रियचतसृ प्रियचतसृणी प्रियचतसृणि ॥ यदा हि समासः स्त्रियां वर्तते त्रिचतुरौ च पुंसि नपुंसके वा तदा मा भूतामिति । प्रियास्त्रयो ब्राह्मणा अस्या ब्राह्मण्याः प्रियत्रिः प्रियत्री प्रियत्रयः । प्रियचत्वाः प्रियचत्वारौ प्रियचत्वारः । प्रियाणि त्रीणि ब्राह्मणकुलान्यस्या ब्राह्मण्याः प्रियत्रिः प्रियत्री प्रियत्रयः । प्रियचत्वाः प्रियचत्वारौ प्रियचत्वारः ॥

---

तम्, मह्यं हितं मद्धितम्.

तर मग प्रकृत सूत्रामध्यें जी मपर्यंतस्य या पदाची अनुवृत्ति येत आहे तीच ज्ञापक होईल. कारण त्वत्पुत्रः वगैरे उदाहरणांमध्यें एकवचन जे ङस् वगैरे प्रत्यय त्यांच्या निमित्तानें जर तव, मम, वगैरे दुसरे आदेश प्राप्त होतील व फक्त त्यांचा बाध करण्याकरितांच प्रकृत सूत्र करावें लागत असेल तर तेथें आलेली मपर्यन्तस्य या पदाची अनुवृत्ति व्यर्थ होणार[१] आहे.

(वा. १ ) कांहीं कार्य सांगण्याकरितां त्रि, चतुर्, युष्मद् आणि अस्मद् हे शब्द सूत्रांत उच्चारले असतील तेथें जें स्त्रियाम्, ( ७।२।९९) द्विवचने (७।२।९२ ), एकवचने (७।२।९७), असें अर्थाचें ग्रहण केलें आहे तें त्या त्रि, चतुर्, युष्मद् आणि अस्मद् या शब्दांचेंच विशेषण समजावें; तदन्त अंगाचें समजूं नये; उदा० स्त्रीलिंगी त्रि व चतुर या शब्दांना क्रमानें तिसृ व चतसृ हे आदेश पुढील सूत्रानें सांगितले आहेत, तेव्हां त्रि आणि चतुर् या शब्दांबरोबर केलेला बहुव्रीहिसमास हा पुल्लिंगी किंवा नपुंसकलिंगी असेल, पण त्यातील त्रि व चतुर् हे शब्द स्त्रीलिंगी असतील तर तेथें तिसृ आणि चतसृ हे आदेश होतातच; उदा० प्रिय आहेत तीन ब्राह्मणी ज्याला असा ब्राह्मण या अर्थाचा प्रियत्रि शब्द पुंल्लिंगी आहे तो प्रियतिसा प्रियतिस्रौ प्रियतिस्रः असा चालतो. प्रिय आहेत तीन ब्राह्मणी स्त्रिया ज्याला असें ब्राह्मणकुल या अर्थाचा प्रियत्रि हा नपुंसकलिंगी शब्द प्रियतिसृ प्रियतिसृणी प्रियतिसृणि असा चालतो. आता, जेव्हा तोच बहुव्रीहिसमास स्त्रीलिंगी आहे पण त्यांतील त्रि, व चतुर् , हे शब्द पुंलिंगी किंवा नपुंसकलिंगी असतील तेथें तिसृ व चतसृ, हे आदेश होत नाहींत; उदा० प्रिय आहेत तीन ब्राह्मण जिला अशी ब्राह्मणी स्त्री या अर्थाचा प्रियत्रि हा स्त्रीलिंगी शब्द प्रियत्रिः प्रियत्री प्रियत्रयः असा चालतो. तशाच अर्थाचा प्रियचतुर् हा स्त्रीलिंगी शब्द प्रियचत्वाः प्रियचत्वारौ प्रियचत्वारः असा चालतो. तसेंच प्रिय आहेत तीन ब्राह्मणकुलें जिला अशी ब्राह्मणी स्त्री या अर्थाचा प्रियत्रि हा स्त्रीलिंगी शब्द प्रियत्रिः प्रियत्री प्रियत्रयः असा चालतो. तशाच अर्थाचा प्रियचतुर् हा स्त्रीलिंगी शब्द प्रियचत्वाः प्रियचत्वारौ प्रियचत्वारः असा चालतो.

---

आदेश होऊं लागेल तो न होण्याकरितां हें सूत्र पाहिजे. म्हणजे ह्या प्रकृत सूत्रानें 'तवममौ ङसि' याचा बाध होऊन त्व आदेश होईल. तसेंच त्वद्धितम् येथें 'तुभ्यमह्यौ ङयि' याचा बाध होऊन त्व आदेश होईल.

१. कारण 'उत्सर्गाचा जो देश तोच देश अपवादाचा असतो' ( उत्सर्गसमानदेशा अपवादाः ) या न्यायानेंच काम भागणार आहे.

युवावौ द्विवचने ( ७. २. ९२ ) । यद्यपि समास एकार्थो वा भवति बह्वर्थो वा भवति द्व्यर्थे च युस्मदस्मदी भवत एव युवावौ । किमविशेषेण । नेत्याह । यूयवयौ जसि त्वाहौ सौ तुभ्यमह्यौ ङयि तवममौ ङसि [ ७. २. ९३–९६] इत्येतान्विधीन्वर्जयित्वा । अतिक्रान्तो युवामतित्वम् अत्यहम् । अतिक्रान्तौ युवामतियुवाम् अत्यावाम् । अतिक्रान्ता युवामतियूयम् अतिवयम् । अतिक्रान्तं युवामतियुवाम् अत्यावाम् । अतिक्रान्तौ युवामतियुवाम् अत्यावाम् । अतिक्रान्तान्युवामतियुवान् अत्यावान् । अतियुवया अत्यावया अतियुवाभ्याम् अत्यावाभ्याम् अतियुवाभिः अत्यावाभिः । अतितुभ्यम् अतिमह्यम् अतियुवाभ्याम् अत्यावाभ्याम् अतियुवभ्यम् अत्यावभ्यम् । अतियुवत् अत्यावत् अतियुवाभ्याम् अत्यावाभ्याम् अतियुवत् अत्यावत् । अतितव अतिमम अतियुवयोः अत्यावयोः अतियुवाकम् अत्यावाकम् । अतियुवयि अत्यावयि अतियुवयोः अत्यावयोः अतियुवासु अत्यावासु ॥

त्वमावेकवचने [ ७. २. ९७ ] । यद्यपि समासो द्व्यर्थो भवति बह्वर्थो वैकार्थे च युस्मदस्मदी भवत एव त्वमौ । किमविशे-

---

तसेंच द्वित्वसंख्येनें युक्त अशा युष्मद् व अस्मद् यांना क्रमानें युव व आव हे आदेश 'युवावौ द्विवचने' या सूत्रानें सांगितले आहेत. तेव्हां युष्मद् व अस्मद् या शब्दांबरोबर केलेला समास हा एकत्व किंवा बहुत्व या संख्येनें युक्त असेल, पण त्यांतील युष्मद् आणि अस्मद् हे शब्द मात्र द्वित्वसंख्येनें युक्त अशा अर्थाचे असतील तेव्हां त्यांना युव आणि आव हे आदेश होतातच.

वर सागितल्याप्रमाणे युष्मद् आणि अस्मद् हे शब्द असतील तर त्यांना सरसकट सर्व विभक्तींमध्यें हे आदेश करावयाचे कीं काय ?

तसे करावयाचे नाहींत. 'यूयवयौ जसि', 'त्वाहौ सौ', 'तुभ्यमह्यौ ङयि' आणि 'तवममौ ङसि' ( ७।२।९३–९६ ) या चार सूत्रांचा विषय सोडून इतर कोणतीही विभक्ति पुढें असतांना करावयाचे आहेत.

तेव्हां तुम्हा दोघांना अतिक्रमण करून गेलेला अशा अर्थाचा अतियुष्मद् हा शब्द आणि आम्हा दोघांना अतिक्रमण करून गेलेला अशा अर्थाचा अत्यस्मद् हा शब्द यांना प्रथमेचें एकवचन व बहुवचन आणि चतुर्थी व षष्ठी यांचें एकवचन सोडून बाकी सर्व ठिकाणीं क्रमानें युव आणि आव हे आदेश होतात. त्यामुळें ते असे चालतात:— अतित्वम् अत्यहम्, अतियुवाम् अत्यावाम्, अतियूयम् अतिवयम्, प्रथमा; अतियुवाम् अत्यावाम्, अतियुवाम् अत्यावाम्, अतियुवान् अत्यावान्, द्वितीया; अतियुवया अत्यावया, अतियुवाभ्याम् अत्यावाभ्याम्, अतियुवाभिः अत्यावाभिः, तृतीया; अतितुभ्यम् अतिमह्यम्, अतियुवाभ्याम् अत्यावाभ्याम्, अतियुवभ्यम् अत्यावभ्यम्, चतुर्थी; अतियुवत् अत्यावत्, अतियुवाभ्याम् अत्यावाभ्याम्, अतियुवत् अत्यावत्, पंचमी; अतितव अतिमम, अतियुवयोः, अत्यावयोः, अतियुवाकम् अत्यावाकम्, षष्ठी; अतियुवयि अत्यावयि, अतियुवयोः अत्यावयोः, अतियुवासु अत्यावासु, स०.

तसेंच एकत्व संख्येनें युक्त अशा अर्थाच्या युष्मद् व अस्मद् या शब्दांना क्रमानें त्व आणि म हे आदेश, 'त्वमावेकवचने' यानें सांगितले आहेत, तेव्हां युष्मद् व अस्मद् या शब्दांबरोबर केलेला समास हा द्वित्व किंवा बहुत्व या संख्येनें युक्त अशा अर्थाचा असेल, पण त्यांतील युष्मद् व अस्मद् हे शब्द मात्र एकत्व संख्येनें युक्त अशा अर्थाचे असतील तर त्यांना त्व आणि म हे आदेश होतातच.

तशा प्रकारच्या युष्मद् आणि अस्मद् या शब्दांना सरसकट सर्व विभक्तींमध्यें त्व आणि म आदेश करावयाचे कीं काय ?

---

७. येथें अति शब्दाचा युष्मद् आणि अस्मद् या शब्दांबरोबर तत्पुरुषसमास ( २।२।१८, वा. ४, सौनागपाठ ) झाला आहे.

षेण । नेत्याह । तानेव विधीन्वर्जयित्वा । अतिक्रान्तस्त्वामतित्वम् अत्यहम् । अतिक्रान्तौ त्वामतित्वाम् अतिमाम्। अतिक्रान्तास्त्वामतियूयम् अतिवयम् । अतिक्रान्तं त्वामतित्वाम् अतिमाम्। अतिक्रान्तौ त्वामतित्वाम् अतिमाम् । अतिक्रान्तांस्त्वामतित्वान् अतिमान् । अतित्वया अतिमया अतित्वाभ्याम् अतिमाभ्याम् अतित्वाभिः अतिमाभिः। अतितुभ्यम् अतिमह्यम् अतित्वाभ्याम् अतिमाभ्याम् अतित्वभ्यम् अतिमभ्यम् । अतित्वत् अतिमत् अतित्वाभ्याम् अतिमाभ्याम् अतित्वत् अतिमत् । अतितव अतिमम अतित्वयोः अतिमयोः अतित्वाकम् अतिमाकम् । अतित्वयि अतिमयि अतित्वयोः अतिमयोः अतित्वासु अतिमासु ॥

यद्येवं यूयवयौ जसि त्वाहौ सौ तुभ्यमह्यौ ङयि तवममौ ङसीत्येतेभ्यो विधिभ्यः परत्वात्त्वमावेकवचन इति प्राप्नोति सावकाशा ह्येते विधय इदानीं भवन्ति । कोऽवकाशः । अनेकार्थे युष्मदस्मदी । त्वमावेकवचन इत्यस्यावकाशः । अन्यानि वचनानि । एकार्थयोर्युष्मदस्मदोरेतेषु वचनेषूभयं प्राप्नोति । परत्वात्त्वमावेकवचन इति प्राप्नोति ॥ नैष दोषः । शेष इति वर्तते । कश्च शेषः ।

---

तसे करावयाचे नाहींत. पूर्वी दाखविलेल्या त्याच चार (७।२।९३-९६) सूत्रांचा विषय सोडून इतर कोणतीही विभक्ति पुढें असतांना करावयाचे आहेत. तेव्हां तुला अतिक्रमण करून गेलेला अशा अर्थाचा अतियुष्मद् शब्द आणि मला अतिक्रमण करून गेलेला अशा अर्थाचा अत्यस्मद् शब्द यांना प्रथमेचें एकवचन व बहुवचन आणि चतुर्थी व षष्ठी यांचें एकवचन सोडून बाकी सर्व ठिकाणीं क्रमानें त्व आणि म हे आदेश होतात. त्यामुळें ते शब्द असे चालतात :—अतित्वम् अत्यहम्, अतित्वाम् अतिमाम्, अतियूयम् अतिवयम्, प्रथ०; अतित्वाम् अतिमाम्, अतित्वाम् अतिमाम्, अतित्वान् अतिमान्, द्वि०; अतित्वया अतिमया, अतित्वाभ्याम् अतिमाभ्याम्, अतित्वाभिः अतिमाभिः, तृ०; अतितुभ्यम् अतिमह्यम्, अतित्वाभ्याम् अतिमाभ्याम्, अतित्वभ्यम् अतिमभ्यम्, चतु०; अतित्वत् अतिमत्, अतित्वाभ्याम् अतिमाभ्याम्, अतित्वत् अतिमत्, पंच०; अतितव अतिमम, अतित्वयोः अतिमयोः, अतित्वाकम् अतिमाकम्, ष०; अतित्वयि अतिमयि, अतित्वयोः अतिमयोः, अतित्वासु अतिमासु, सप्तमी.

आतां, असें आहे तर 'यूयवयौ जसि' 'त्वाहौ सौ' 'तुभ्यमह्यौ ङयि,' 'तवममौ ङसि' (७।२।९३-९६) या चार विधींपेक्षां परत्वास्तव 'त्वमावेकवचने' (७।२।९७) ह्यानें त्व आणि म हे आदेश जस् वगैरे पुढें असतांना होतील. कारण एकत्व संख्येनें युक्त अशा अर्थाचे जे युष्मद् आणि अस्मद् हे शब्द त्यांना त्व आणि म हे आदेश होत असल्यामुळें ह्या त्व आणि म या आदेशांची प्राप्ति जेथें येत नाहीं अशा ठिकाणीं त्या चारी विधींना जागा मिळते.

ती जागा कोणती ?

एकत्व संख्या नसलेल्या अशा अर्थाचे युष्मद् व अस्मद् शब्द ही जागा होय. तसेंच 'त्वमावेकवचने' ह्या विधीलाही स्वतन्त्र जागा मिळते. ती अशी कीं एकत्व संख्येनें युक्त अशा अर्थाच्या युष्मद् व अस्मद् शब्दांहून सु, जस्, ङे, ङस्, या चार प्रत्ययांशिवाय निराळा कोणताही प्रत्यय केला असेल तेथें आतां एकत्व संख्येनें युक्त अशा अर्थाच्या युष्मद् व अस्मद् या शब्दांहून ते चार प्रत्यय केले असतां ते चार विधी प्राप्त होतात आणि 'त्वमावेकवचने' ह्यानें सांगितलेले त्व आणि म यांचीही प्राप्ति येते. अशी दोघांची एका ठिकाणीं प्राप्ति आली असतां परत्वास्तव त्व आणि म हे आदेश होऊं लागतील.

हा दोष येत नाहीं. कारण 'त्वमावेकवचने' येथें 'शेषे' या पदाची अनुवृत्ति येत आहे.

शेष तो कोणता ?

जसादिभिरव्याप्तं यदेकवचनं तस्मिञ्शेषे । अशेषत्वान्न भविष्यति । अथवा त्वमावेकवचन इत्यत्र यूयवयौ जसि त्वाहौ सौ तुभ्यमह्यौ ङयि तवममौ ङसीत्येतदनुवर्तिष्यते ॥

## त्रिचतुरोः स्त्रियां तिसृचतसृ ॥ ७।२।९९ ॥

### तिसृभावे संज्ञायां कन्युपसंख्यानम् ॥१॥

तिसृभावे संज्ञायां कन्युपसंख्यानं कर्तव्यम् । तिसृका नाम ग्रामः ॥

### चतसर्याद्युदात्तनिपातनं च ॥ २ ॥

चतसर्याद्युदात्तनिपातनं कर्तव्यम् । त्रिचतुरोः स्त्रियां तिसृचतसृ । किं प्रयोजनम् । चतस्रः पश्य । शसि स्वरो मा भूदिति ॥ किं चान्यत् ।

### उपदेशिवद्वचनं च ॥ ३ ॥

उपदेशिवद्भावश्च वक्तव्यः । किं प्रयोजनम् ।

### स्वरसिद्ध्यर्थम् ॥ ४ ॥

उपदेशावस्थायामेवाद्युदात्तनिपातने कृते विभक्तिस्वरेण बाधनं यथा स्यात् । चतसृणामिति ॥ स तर्ह्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । न वक्तव्यः ।

### उक्तं वा ॥ ५ ॥

किमुक्तम् । विभक्तिस्वरभावश्च हलादिग्रहणादाद्युदात्तनिपातने हि हलादिग्रहणानर्थक्यमिति ॥

## अचि र ऋतः ॥ ७।२।१०० ॥

---

सु, जस्, ङे, ङस् हे चार प्रत्यय पुढें केले नसतील असे एकत्वसंख्येनें युक्त या अर्थाचे युष्मद् व अस्मद् शब्द हा शेष होय. तेव्हां ते चार प्रत्यय केले असतील तेथें असा शेष नाहीं म्हणून 'त्वमावेकवचने' ह्यानें त्व आणि म हे आदेश होणार नाहींत. अथवा 'त्वमावेकवचने' ह्या सूत्रामध्यें 'यूयवयौ जसि', 'त्वाहौ सौ,' 'तुभ्यमह्यौ ङयि,' 'तवममौ ङसि' या चारी सूत्रांची अनुवृत्ति आणून त्यांचे येथें पुनः स्वतंत्र वाक्यार्थ करावे. असें पुनः विधान केलें म्हणजे त्या जोरावर 'त्वमावेकवचने' ह्याच्या विषयांत त्यांची प्राप्ति आली असतां तेच होतील.

(सू. ९९, वा. १) संज्ञा असतांना त्रि शब्दाहून कन् प्रत्यय (५।३।७५) केल्यानंतर तेथें त्रि शब्दाला तिसृ आदेश होतो असें म्हणावें; उदा० तिसृका हें एका गांवाचें नांव आहे.

(वा. २) तसेंच 'त्रिचतुरोः स्त्रियां तिसृचतसृ' या सूत्रानें सांगितलेल्या चतसृ या आदेशांतील आदि उदात्त होतो असें निपातन करावें.

याचा उपयोग काय ?

उपयोग असा की चतस्रः पश्य येथें 'चतुरः शसि' (६।१।१६७) ह्यानें प्राप्त झालेला अन्त उदात्त न झाला पाहिजे.

तसेंच आणखी काय बरें सांगितलें पाहिजे ?

(वा. ३) उपदेशिवद्भाव सांगावा. म्हणजे आद्युदात्त चतसृ आदेश हा विभक्ति उत्पन्न होण्यापूर्वींच होईल.

याचा काय उपयोग ?

(वा. ४) उपदेशावस्थेमध्यें आद्युदात्त चतसृ आदेश केल्यानंतर पुढील प्रत्ययाला स्वर (३।१।३) झाला असतां त्याच्याबरोबर होणाऱ्या शेषनिघातानें (६।१।१५८) चतसृ आदेशाचा आद्युदात्त स्वर बदलला पाहिजे; उदा० चतसृणाम्.

तर मग तो उपदेशिवद्भाव सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण—

(वा. ५) मागें सांगितलेंच आहे.

काय तें सांगितलें आहे ?

विभक्तिस्वरभावश्च हलादिग्रहणात् । आद्युदात्तनिपातने हि हलादिग्रहणानर्थक्यम् (६।१।६७,

---

१. (सू. ९९) स्त्रीलिंगी जे त्रि आणि चतुर् हे शब्द त्यांना क्रमानें तिसृ आणि चतसृ असे आदेश होतात, विभक्ति पुढें असतांना; उदा० तिस्रः चतस्रः स्त्रियः.

१. (सू. १००) तिसृ आणि चतसृ यांतील ऋकाराला रेफ आदेश होतो, अच् पुढें असतांना; उदा० तिस्रः, चतस्रः.

**अचि रादेशे जस्युपसंख्यानं गुणपरत्वात् ॥ १ ॥**

अचि रादेशे जस्युपसंख्यानं कर्तव्यम् । तिस्रस्तिष्ठन्ति । चतस्रस्तिष्ठन्ति । किं पुनः कारणं न सिध्यति । गुणपरत्वात् । परत्वाद् गुणः प्राप्नोति ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् ।

**न वानवकाशत्वाद्रस्य ॥ २ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । अनवकाशत्वाद्रस्य । अनवकाशो रादेशो गुणं बाधिष्यते । सावकाशो रादेशः । कोऽवकाशः । तिस्रः पश्य । चतस्रः पश्य । नैषोऽस्त्यवकाशः । अत्रापि पूर्वसवर्णदीर्घः प्राप्नोति । स यथैव पूर्वसवर्णं बाधत एवं गुणमपि बाधिष्यते ॥ गुणोऽप्यनवकाशः । सावकाशो गुणः । कोऽवकाशः । हे कर्तः । नैष सर्वनामस्थाने गुणः । कस्तर्हि । संबुद्धिगुणः । अयं तर्हि । हे मातः । एषोऽपि संबुद्धिगुणः एव । नात्र संबुद्धिगुणः प्राप्नोति । किं कारणम् । 'अम्बार्थनद्योर्ह्रस्वः' [ ७. ३. १०७ ] इति ह्रस्वत्वेन भवितव्यम् । भवेद्दीर्घाणां ह्रस्ववचनसामर्थ्यान्न स्याद्ध्रस्वानां तु खलु ह्रस्वत्वं क्रियतां संबुद्धिगुण इति परत्वात्सं-

---

वा. २–३ ) असें मागें सांगितलेंच आहे.

( सू. १००, वा. १ ) हा जो प्रकृत सूत्रानें तिसृ व चतसृ, यांच्या ऋकाराला अच् पुढें असतांना रेफ आदेश सांगितला आहे तो जस् पुढें असतांना होतो, असें मुद्दाम निराळें सांगितलें पाहिजे; उदा० तिस्रस्तिष्ठन्ति, चतस्रस्तिष्ठन्ति.

पण काय बरें कारण कीं प्रथमाबहुवचनाचीं तिस्रः व चतस्रः हीं उदाहरणें सामान्यतः रेफादेश सांगण्यानें सिद्ध होणार नाहींत ?

ह्या रेफादेशाचा बाध करून 'ऋतो ङि'० ( ७।३।११० ) या शास्त्रानें परत्वास्तव गुण प्राप्त होत आहे.

तर मग तसें सांगणें जरूरच आहे.

(वा. २) तसें मुद्दाम निराळें सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं हा रेफादेश अनवकाश आहे. तेव्हां अर्थातच तो गुणाचा बाध करील.

पण रेफादेशाला स्वतंत्र अवकाश आहे ना ?

कोठें तो अवकाश आहे ?

तिस्रः पश्य, चतस्रः पश्य, या द्वितीयाबहुवचनामध्यें.

हा दाखविलेला अवकाश बरोबर नाहीं. कारण येथें देखील पूर्वसवर्णदीर्घ ( ६।१।१०२ ) प्राप्त होत आहे. तेव्हां अनवकाश हा रेफादेश जसा येथें पूर्वसवर्णदीर्घाचा बाध करतो तसा त्याच कारणामुळें प्रथमाबहुवचनामध्यें गुणाचा बाध करील.

पण गुणाच्या विषयांतहि पूर्वसवर्णदीर्घ प्राप्त होत असल्यामुळें गुण देखील अनवकाशच आहे.

तसें नाहीं. गुणाला अवकाश आहे.

तो अवकाश कोणता ?

हे कर्तः येथें गुणाला अवकाश आहे.

कर्तः येथें सर्वनामस्थानाच्या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या गुणाची ( ७।३।११० ) जरूरी नाहीं.

मग येथें कोणता गुण होईल ?

संबुद्धीच्या निमित्तानें सांगितलेला गुण (७।३।१०८) येथें प्राप्त होत आहेच.

तर मग हे मातः येथें त्या गुणाला अवकाश आहे.

पण येथेंही संबुद्धीच्या निमित्तानें सांगितलेला गुण प्राप्त होत आहेच.

असें म्हणतां येत नाहीं. कारण मातः येथें संबुद्धिनिमित्तक गुणाची प्राप्ति येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें की 'अम्बार्थनद्योर्ह्रस्वः' ( ७।३।१०७ ) यानें सांगितलेला ऱ्हस्व हा येथें त्या संबुद्धिगुणाचा बाधक होणार आहे.

जेथें मूळचा दीर्घ असेल तेथें त्याला ऱ्हस्व केल्यानंतर जर गुण होईल तर ऱ्हस्व केला तो फुकट होईल म्हणून ऱ्हस्वविधानसामर्थ्यास्तव तेथें गुण न होऊं दे; परंतु जेथें मूळचाच ऱ्हस्व असेल तेथें ऱ्हस्वाच्या बरोबरच गुणाची प्राप्ति येत असल्यामुळें अगोदर ऱ्हस्व करावा कीं अगो-

बुद्धिगुणेन भवितव्यम् ॥ अथापि कथंचित्सावकाशो गुणः स्यादेवमपि न दोषः। पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इत्येवमयं रादेशो जसि गुणं बाधते सर्वनामस्थानगुणं न बाधिष्यते। तस्मात्सुष्ठूच्यतेऽचि रादेशे जस्युपसंख्यानं गुणपरत्वादिति ॥

## [1]जराया जरसन्यतरस्याम् ७।२।१०१

नुमोऽनङ्जरसौ भवतो विप्रतिषेधेन। नुमोऽवकाशः। त्रपुणी जतुनी तुम्बुरुणी। अनङोऽवकाशः। प्रियसक्थ्ना ब्राह्मणेन। इहोभयं प्राप्नोति। दध्ना सक्थ्ना। जरसोऽवकाशः। जरसा जरसे। नुमोवकाशः। कुण्डानि वनानि। इहोभयं प्राप्नोति। अतिजरांसि ब्राह्मणकुलानि। अनङ्जरसौ नुमो भवतो विप्रतिषेधेन ॥

अथेह लुक्कस्माम्न भवति। अतिजरसं पश्येति। किं पुनः कारणं द्वितीयैकवचनमेवोदाह्रियते न पुनः प्रथमैकवचनमपि। अतिजरसं तिष्ठतीति। अस्त्यत्र विशेषः। नात्राकृतेऽम्भावे जरस्भावः प्राप्नोति। किं कारणम्। अचीत्युच्यते। यदा च जरस्भावः कृतस्तदा लुग्न भविष्यति संनिपातलक्षणो

---

दर गुण करावा असा विचार उत्पन्न होतो, व तेथें परत्वास्तव संबुद्धिगुणच अगोदर होण्याला योग्य आहे. एकंदरींत 'ऋतो ङि' या सर्वनामस्थाननिमित्तक गुणाला तेथें अवकाश नाहीं असें सिद्ध झालें.[2]

आतां येथें अवकाश आहे असें कां होई ना? तरी देखील दोष नाहीं. कारण 'अपवादशास्त्र हें जर सूत्रपाठामध्यें पूर्वी पठित केलें असेल तर तें आपल्या जवळच्या विधीचा बाध करतें, लांबच्या विधीचा बाध करीत नाहीं' या न्यायानें हा र आदेश 'जसि च' (७।३।१०९) याचाच बाध करील, सर्वनामस्थाननिमित्तक गुणाचा (७।३।११०) बाध करणार नाहीं. एकंदरींत 'अचि रादेशे जस्युपसंख्यानं गुणपरत्वात्' असें जें वार्तिककारांनीं म्हटलें आहे तेंच बरोबर आहे.

(सू. १०१) अनङ् आणि जरस् हे आदेश विप्रतिषेधानें नुमागमाचा बाध करतात. त्रपुणी, जतुनी, तुम्बुरुणी, येथें नुमाला (७।१।७३) अवकाश आहे, प्रियसक्थ्ना[2] ब्राह्मणेन येथें अनङ् आदेशाला (७।१।७५) अवकाश आहे, आणि दध्ना, सक्थ्ना, येथें ते दोन्ही विधी प्राप्त होतात. तसेंच या जरस् आदेशाला जरसा, जरसे, येथें अवकाश आहे, कुण्डानि, वनानि येथें नुमागमाला (७।१।७२) अवकाश आहे. आणि अतिजरांसि ब्राह्मणकुलानि येथें ते दोन्ही विधी प्राप्त होतात. तेव्हां त्यांमध्यें अनङ् आणि जरस् हे नुमागमाचा विप्रतिषेधानें बाध करतात.

आतां अतिजरसं पश्य या नपुंसकलिंगी अतिजर शब्दाहून द्वितीयेचें एकवचन केलें असतां तेथें अम् प्रत्ययाचा लुक् (७।१।२३) कां होत नाहीं?

पण काय हो, द्वितीयैकवचनामध्येंच हीं शंका करतां याचें कारण काय? अतिजरसं तिष्ठति अशा त्याच शब्दाच्या प्रथमैकवचनामध्यें ही शंका कां करीत नाहीं?

दोहोंमध्यें विशेष काय?

प्रथमैकवचनामध्यें विशेष असा आहे कीं तेथें अम् आदेश (७।१।२४) केल्याशिवाय जरस् आदेशाची प्राप्तीच येत नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं ह्या प्रकृत सूत्रामध्यें अजादि विभक्ति पुढें असतांना असें म्हटलें आहे. तेव्हां अम् आदेश झाल्यानंतरच त्याच्यामुळें जरस् केला पाहिजे; आणि तसा तो केल्यानंतर लुक् होणार नाहीं. कारण 'संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं

---

२. तेव्हां अनवकाशत्वास्तव तिस्रः या प्रथमाबहुवचनामध्यें र आदेशाचा बाध करून गुण होईल. तेव्हां वार्तिककारांनीं जें सांगितलें तें बरोबर आहे असें सिद्ध झालें.

१. (सू. १०१) अजादि विभक्ति पुढें असतांना जरा शब्दाला जरस् आदेश विकल्पानें होतो; उदा० निर्जरसौ, निर्जरौ, निर्जरसः, निर्जराः.

२. येथें पुंवद्भाव (७।१।७४) झाल्यामुळें नुम् आगमाची प्राप्ति नाहीं.

विधिरनिमित्तं तद्विघातस्येति । यद्येवमतिजरसम् अतिजरसैरित्यत्र न प्राप्नोति अतिजरम् अतिजरैरिति भवितव्यम् । गोनर्दीय आह । इष्टमेवैतत्संगृहीतं भवति । अतिजरम् अतिजरैरिति भवितव्यं सत्यामेतस्यां परिभाषायां संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति

## त्यदादीनामः ॥ ७।२।१०२ ॥

**त्यदादीनां द्विपर्यन्तानामकारवचनम् ।१।**

त्यदादीनां द्विपर्यन्तानामत्वं वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । युष्मदस्मदन्तानां भवदन्तानां वा मा भूदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ॥

**त्यदादीनामकारेण सिद्धत्वाद्युष्मदस्मदोः । शेषे लोपस्य लोपेन ज्ञायते प्राक्ततोऽदिति ॥ १ ॥**

यदयं त्यदादीनामत्वेन सिद्धे युस्मदस्मदोः शेषे लोपं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः प्राक्ततोऽत्वं भवतीति । न सर्वेषामिति ॥

अपि वोपसमस्तार्थमत्वाभावात्कृतं भवेत् ।

नैतदस्ति ज्ञापकम् । उपसमस्तार्थमेतत् स्यात् । अतियूयम् अतिवयम् । उपसमस्तानां हि त्यदादीनामत्वं नेष्यते । अतितत् अतितदौ अतितदः ॥

---

तद्विघातस्य' म्हणजे 'दोघांच्या संबंधाला मानून झालेला विधि हा त्या संबंधाचा विघात करण्याला आपण कारण होत नाहीं,' अशी परिभाषा आहे.

असें जर आहे तर मग त्याच परिभाषेनें अतिजरसम्, अतिजरसैः, या उदाहरणांमध्यें जरस् आदेशच मुळीं होणार नाहीं. तेव्हां तेथें अतिजरम्, अतिजरैः, अशीं रूपें होऊं लागतील.

येथें गोनर्दीय म्हणतो कीं 'होऊं लागतील' असें का म्हणतां? जीं रूपें इष्ट आहेत तींच तुम्ही साधीत आहां. कारण ' संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य' अशी परिभाषाच जर आहे तर अतिजरम्, अतिजरैः, अशीं रूपें होणारच.

( सू. १०२, वा. १ ) त्यदादि गणांतील शब्दांना जो हा अकारादेश सांगितला आहे तो द्वि शब्दापर्यंतच होतो असें म्हणावें म्हणजे त्या त्यदादि गणांतील द्वि शब्दाच्या पुढील जे शब्द, युष्मद्, अस्मद्, भवत् आणि किम्, त्यांना तो होत नाहीं.

असें म्हणण्याचा उपयोग काय?

उपयोग असा कीं युष्मद् व अस्मद् शब्दांपर्यंत अथवा त्यांच्या पुढील भवत् शब्दापर्यंत हा अकारादेश न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण——

युष्मद् आणि अस्मद् या शब्दांना प्रकृत सूत्रानें अकारादेश केल्यानेंच काम भागत असूनही ज्या अर्थी हा आचार्य 'शेषे लोपः' असें सूत्र करून युष्मद् व अस्मद् यांच्या दकाराचा लोप सांगतो त्या अर्थी त्या लोप सांगण्यावरून असें सूचित् होतें कीं युष्मद् व अस्मद् या शब्दांच्या पूर्वींचे म्हणजे द्विशब्दापर्यंत जे शब्द त्यांनाच प्रकृत सूत्रानें अकारादेश होतो; पुढील शब्दांना होत नाहीं.

अथवा समासामध्यें ज्या ठिकाणीं त्यदादिक शब्द उपसर्जन होत असतील त्या ठिकाणीं प्रकृत सूत्रानें अकारादेश होत नसतो, म्हणून 'शेषे लोपः' हें सूत्र केलें असेल. स्पष्टीकरण असें कीं वरील ज्ञापक बरोबर नाहीं. कारण युष्मद् व अस्मद् हे शब्द ज्या ठिकाणीं समासामध्यें दुसऱ्याला विशेषण झाले असतील तेथें दकाराचा लोप होण्याकरितां 'शेषे लोपः' हें सूत्र केलें असेल, उदा० अतियूयम्, अतिवयम्. त्यदादिक शब्द हे समासामध्यें दुसऱ्याला विशेषण झाले असतां तेथें प्रकृत सूत्रानें अकारादेश इष्ट नाहीं, उदा० अतितत्, अतितदौ, अतितदः.

---

१. ( सू. १०२ ) त्यदादि गणांतील जे शब्द त्यांच्या शेवटच्या वर्णाला अकारादेश होतो, विभक्ति पुढें असतांना; उदा० सः, तौ, ते.

टिलोपष्टाबभावार्थः कर्तव्य इति तत्स्मृतम् ॥ २ ॥

यस्तु शेषे लोपष्टिलोपः स वक्तव्यः। किं प्रयोजनम्। टाप्प्रतिषेधार्थम्। टाब्मा भूदिति॥ स तर्हि टिलोपो वक्तव्यः। न वक्तव्यः। अथवा शेषसप्तम्या शेषे लोपो विधीयते। इह युष्मदस्मदोर्लोप इतीयतान्त्यस्य लोपः सिद्धः। सोऽयमेवं सिद्धे सति यच्छेषग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनमवशिष्टस्य लोपो यथा स्यादिति॥

लुप्तशिष्टे हि तस्याहुः कार्यसिद्धिं मनीषिणः॥ ३ ॥

एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न सर्वेषां त्यदादीनामत्वं भवतीति यदयं किमः कः [७. २. १०३] इति कादेशं शास्ति। इतरथा हि किमोऽद्भवतीत्येव ब्रूयात्। सिद्धे विधिरारभ्यमाणो ज्ञापकार्थो भवति न च किमोऽत्त्वेन सिध्यति। अत्त्वे हि सत्यन्त्यस्य प्रसज्येत। सिद्धमन्त्यस्य पूर्वेणैव तत्रारम्भसामर्थ्यादिकारस्य भविष्यति। कुतो नु खल्वेत-

---

शिवाय 'शेषे लोपः' यानें जो लोप सांगितला आहे तो टीचा म्हणजे अद् याचा होतो असें गृहीत धरलें म्हणजे तर तें सूत्र अवश्यच आहे.

अद् या टीचा लोप सांगण्याचा काय उपयोग?

स्त्रीत्वविवक्षा असेल त्यावेळीं टाप् प्रत्यय (४।१।४) होऊं नये.

तर मग तेथें टीचा[२] लोप सांगितला पाहिजे.

सांगावयास नको.

अथवा शेषे ही सप्तमी साम्री घेऊन म्ह० षष्ठीच्या अर्थी न घेतां, 'शेष जी विभक्ति ती पुढें असतांनाच लोप सांगितला आहे'[३] असा अर्थ असूं दे. येथें युष्मदस्मच्छब्दांचा लोप होतो असें म्हटलें तरी 'अलोन्त्यस्य' (१।१।५२) या परिभाषेनें अन्त्य दकाराचाच होणार आहे. अशा रीतीनें सिद्ध होत असतांही ज्या अर्थी आचार्यांनीं शेष शब्द उच्चारला आहे त्या अर्थी त्याचा उपयोग सांगितलाच पाहिजे. तो हा कीं मपर्यंत भागाच्या पुढील अवशिष्ट भागाचा लोप व्हावा.

कारण लोप होऊन अवशिष्ट भाग मकारान्त उरला म्हणजे टाप् न होणें हें इच्छित कार्य सिद्धीला जातें, असें येथें शहाणे लोक बोलत आहेत.

तर मग 'त्यदादि गणांतील सर्व शब्दांना प्रकृत सूत्रानें अकारादेश होत नाहीं' असें पुढील आचार्यांच्या कृतीवरूनच सिद्ध होईल. ती कृति अशी कीं आचार्यांनीं किम् शब्दाला क आदेश पुढील सूत्रानें सांगितला आहे. जर त्यदादि गणांतील सर्व शब्दांना प्रकृत सूत्रानें अकारादेश होईल तर किम् शब्दाला क आदेश न सांगतां अकार हाच आदेश सांगितला असता; तेव्हां आचार्यांनीं सांगितलेला क हा आदेश वरील अर्थाचा ज्ञापक होईल.

पण क आदेश करून जें रूप होतें तें जर क आदेश न सांगतां अकार आदेश सांगण्यानें सिद्ध होईल तर तो क आदेश ज्ञापक होईल. आणि येथें तर किम् शब्दाला अकार आदेश करून कः इत्यादि रूपें साधत नाहींत. कारण अकार आदेश हा इकाराला न होतां 'अलोऽन्त्यस्य' (१।१।५२) या परिभाषेनें अन्त्य मकाराला होईल.

अन्त्य मकारालाच जर होईल तर तो पूर्व

---

२. शेषे ही सप्तमी षष्ठीच्या अर्थी घ्यावी. तेव्हां शेषस्य म्ह० मपर्यन्त भागाच्या पुढील अवशिष्ट भागाचा लोप होतो, असा अर्थ होईल. तेव्हां अर्थातच अद् या टीचा होईल.

३. ह्या अर्थी शेषे या पदाचा कांहीं उपयोग नाहीं. कारण आत्व आणि यत्व हे विधी आपआपल्या विषयांमध्यें ह्या लोपाचा बाध करतील. अद् याचा लोप व्हावा याकरितां शेष शब्द घातला आहे, असा उपयोग सांगावा तर सप्तमीचा तसा अर्थ होत नाहीं. तरी शेषग्रहणसामर्थ्यास्तव अद् याचा लोप होईल.

४. हें इच्छित कार्य प्रकृत सूत्रानें दकाराला अकारादेश करून भागणार नाहीं, याकरितां 'शेषे लोपः' हें अवश्य केलें पाहिजे. तेव्हां अर्थातच त्यदादिक शब्द द्विपर्यंत घ्यावेत, या अर्थाला हें ज्ञापक होत नाहीं.

दनन्त्यार्थ आरम्भे सतीकारस्य भविष्यति न पुनः ककारस्य स्यात्॥यत्तर्हि किमो ग्रहणं करोति। इतरथा हि कादद्भवतीत्येव ब्रूयात्। एवमपि ककारमात्रात्परस्य प्राप्नोति। त्यदादीनामिति वर्तते न चान्यत्किमस्त्यदादिषु ककारवदस्ति ॥ एवमप्यनैकान्तिकं ज्ञापकम्। एतावत्तु ज्ञाप्यते न सर्वेषां त्यदादीनामत्वं भवतीति तत्र कुत एतद् द्विपर्यन्तानां भविष्यति न पुनर्युष्मदस्मदन्तानां वा स्याद्भवदन्तानां वा। किंचावश्यं खल्वप्युत्तरार्थं किमो ग्रहणं कर्तव्यम्। कु तिहोः क्वाति [१०४; १०५] इति। कादेशः खल्वप्यवश्यं साकच्कार्थो वक्तव्यः कः कौ क इत्येवमर्थम्। तस्माद् द्विपर्यन्तानामत्वं वक्तव्यम् ॥

त्यदादीनामकारेण सिद्धत्वाद्युष्मदस्मदोः।
शेषे लोपस्य लोपेन ज्ञायते प्राक्ततोऽदिति ॥ १ ॥
अपि वोपसमस्तार्थमत्वाभावात्कृतं भवेत्।
टिलोपष्टाबभावार्थः कर्तव्य इति तत्स्मृतम् ॥ २ ॥
अथवा शेषसप्तम्या शेषे लोपो विधीयते।
लुप्तशिष्टे हि तस्याहुः कार्यसिद्धिं मनीषिणः ॥ ३ ॥

[ किमः कः ॥ ७।२।१०३ ॥
कु तिहोः ॥ ७।२।१०४ ॥ ]

---

सूत्रानें म्हणजे प्रकृत सूत्रानेंच सिद्ध आहे. तेव्हां पुन्हां ज्या अर्थी सांगितला आहे त्या अर्थी त्याच्या जोरावर तो अन्त्याला म्हणजे इकाराला[५] होईल.

पण अनन्त्याला होईल तो इकारालाच काय म्हणून, ककाराला कां नाहीं होणार? एकंदरींत क आदेश सांगितल्याशिवाय भागत नाहीं. तेव्हां वरील ज्ञापक देतां येत नाहीं.

तर मग त्या सूत्रामध्यें किमः असें जें म्हटलें आहे तेंच वरील अर्थाला ज्ञापक होईल. जर त्यदादि गणांतील सर्व शब्दांना प्रकृत सूत्रानें अकारादेश होईल तर फक्त किम् शब्दातील इकाराला अकार करण्याकरितां 'कात्' एवढेंच सूत्र[६] केलें तरी भागेल.

पण 'कात्' असें सूत्र केलें तर कुमारी, कृष्ण, वगैरे वाटेल त्या शब्दामध्यें ककाराच्या पुढील वर्णाला अकारादेश होऊं लागेल.

तसा होणार नाहीं. त्यदादीनाम् या पदाची अनुवृत्ति तेथें आहे; आणि त्यदादि गणांतील शब्द पाहिले तर त्यांमध्यें किम् शब्दाशिवाय इतर कोणत्याहि शब्दामध्यें ककार नाहीं.

असें असलें तरी देखील त्यांत उणीव आहेच. ज्ञापक होईल एवढें खरें, परंतु त्यांत ज्ञाप्य अंश अनिश्चित स्वरूपाचाच राहणार आहे. एवढेंच ज्ञापक करता येईल कीं त्यदादि गणांतील सर्व शब्दांना प्रकृत सूत्रानें अकारादेश होत नाहीं. पण ते त्यदादिक शब्द द्वि या शब्दापर्यंतच घ्यावे असें कशावरून? युष्मद् व अस्मद् शब्दापर्यंत घ्यावे किंवा भवत् शब्दापर्यंत घ्यावे असें कां ज्ञापक करूं नये? शिवाय दुसरें असें कीं किमः हें पद व्यर्थच होत नाहीं. कारण 'कु तिहोः', 'क्वाति' या पुढील सूत्रांमध्यें अनुवृत्तीकरितां तें उच्चारलें पाहिजे. शिवाय, क आदेश देखील अकच् प्रत्ययासहित (५।३।७१) किम् शब्दाला होण्याकरितां अवश्य सांगितलाच पाहिजे. अकच् केलेल्या किम् शब्दाची म्हणजे ककिम् शब्दाची कः कौ के अशींच रूपें होत असतात. एकंदरींत वार्तिककारांनीं सांगितल्याप्रमाणें द्वि शब्दापर्यंतच त्यदादि गणांतील शब्दांना प्रकृत सूत्रानें अकारादेश होतो असें म्हटलें पाहिजे.

---

५. आणि प्रकृत सूत्रानें मकारालाही अकार आदेश होईल. नंतर त्या दोन अकारांना मिळून पररूप (६।१।९७) होऊन रूप साधेल असा अभिप्राय आहे.

६. ककाराच्या पुढील वर्णाला अकार आदेश होतो, विभक्ति पुढें असतांना; असा त्याचा अर्थ आहे.

१. ( सू. १०३ ) किम् शब्दाला क असा आदेश होतो, विभक्ति पुढें असतांना; उदा० कः, कौ, के.

१. ( सू १०४ ) किम् शब्दाला कु असा आदेश होतो, तकारादि किंवा हकारादि विभक्ति पुढें असतांना; उदा० कुतः, कुह.

**क्वाति ॥ ७।२।१०५ ॥**

किमर्थं क्वादेश उच्यते न कु तिहोस्त्वित्येवोच्येत । का रूपसिद्धिः क्व । यणादेशेन सिद्धम् । न सिध्यति । ओर्गुणः प्रसज्येत ॥

**तदोः सः सावनन्त्ययोः॥७।२।१०६॥**

किमर्थमनन्त्ययोरित्युच्यते । अन्त्ययोर्मा भूदिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । अत्वमन्त्ययोर्बाधकं भविष्यति । अनवकाशा विधयो बाधका भवन्ति सावकाशं चात्वम् । कोऽवकाशः । द्विशब्दः । सत्वमपि सावकाशम् । कोऽवकाशः । अनन्त्यः । कथं पुनः सत्यन्त्येऽनन्त्यस्य सत्वं स्यात् । भवेद्यत्तकारदकाराभ्यामङ्गं विशेषयेत्तस्यानन्त्ययोर्न स्याद्वयं तु खल्वङ्गेन तकारदकारौ विशेषयिष्यामः ॥ एवमप्युभयोः सावकाशयोः परत्वात्सत्वं प्राप्नोति । किं च स्याद्यद्यन्त्ययोः सत्वं स्यात् । इह हे स इत्येङ्ह्रस्वादिति संबुद्धिलोपो न

---

(सू. १०५) ह्या सूत्रानें क्व आदेश हा निराळा कशाकरितां सांगितला आहे ? तो सांगावयास नको. 'कु तिहोस्तु' असें एकच सूत्र करावें.

पण तसें केलें तर क्व हें रूप कसें साधेल ?

कां बरें ? कु आदेश केल्यानंतर उकाराला यण् आदेश (६।१।७७) केला म्हणजे साधेल.

यण् आदेशानें साधणार नाहीं. कारण यणादेशाचा बाध करून 'ओर्गुणः' (६।४।१४६) यानें गुण प्राप्त होत आहे.

(सू. १०६) ह्या सूत्रामध्यें अनन्त्ययोः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

त्यदादि गणातील शब्दांच्या शेवटीं असलेले जे तकार व दकार त्यांना सकारादेश होऊं नये याकरितां म्हटलें आहे.

अनन्त्ययोः याचा हा उपयोग बरोबर नाहीं. कारण शेवटच्या वर्णाला 'त्यदादीनामः' या सूत्रानें प्राप्त झालेला अकारादेश हा सकारादेशाचा बाधक होईल.

पण जे विधी अनवकाश असतात ते दुसऱ्या विधीचा बाध करतात; आणि अकारादेशाला तर अवकाश आहे.

तो अवकाश कोणता ?

द्वि शब्द हा अवकाश आहे.

पण तसा सकारादेशालाही अवकाश आहेच.

तो अवकाश कोणता ?

त्यदादि शब्दांतील शेवटीं नसलेला तकार आणि दकार हा त्याला अवकाश आहे.

पण काय हो, सूत्रामध्यें जर अनन्त्ययोः हें पद नाहीं तर त्यदादिकांच्या शेवटीं तकार व दकार असतांना शेवटीं नसलेल्या अशा तकार व दकार यांना सकारादेशाचें विधान कसें करतां येईल ?

तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें शेवटीं नसलेल्या तकार व दकार यांना सकाराचें विधान करतां येणार नाहीं हें खरें. पण कोणाला ? तकार व दकार हें अंगाचें विशेषण जो करील त्याला. आम्ही तर त्याच्या उलट अंग हें तकार व दकार यांचें विशेषण करीत आहों. अशा अर्थानें सकारादेशाला अवकाश मिळत असल्यामुळें दोन्ही विधी सावकाश समजले जातील.

तरी पण अंतीं असलेल्या तकार व दकार यांना दोन्ही विधी प्राप्त झाले असतां त्यांमध्यें परत्वास्तव सकारादेशच होऊं लागेल.

झाला तर काय होईल ?

जर शेवटीं असलेल्या तकार व दकार यांना अकारादेश न होतां सकारादेश झाला तर 'हे स' या उदाहरणामध्यें 'एङ्ह्रस्वात्०' (६।१।६९)

---

१. (सू. १०५) किम् शब्दाला क्व आदेश होतो, अत् ही विभक्ति पुढें असतांना; उदा० क्व.

२. किम् शब्दाला कु आदेश होतो, तकारादि, ह किंवा अत् हे विभक्तिप्रत्यय पुढें असतांना असा त्या सूत्राचा अर्थ होईल.

१. सू. (१०६) त्यदादि गणांतील जे शब्द त्यांतील अंतीं नसणारे जे तकार आणि दकार त्यांना सकार आदेश होतो, सु प्रत्यय पुढें असतांना; उदा० सः, असौ.

२. तदोः हें अंगाचें विशेषण केलें म्हणजे तकारान्त आणि दकारान्त अंग असा अर्थ होतो, व त्या-

स्यात् । इह च या सा अत इति टाब्न स्यात् । तस्मादनन्त्ययोरिति वक्तव्यम् ॥ न वक्तव्यम् । एवं वक्ष्यामि । तदोः सः सौ । ततोऽदसः । अदसश्च दकारस्य सो भवतीति । इदमिदानीं किमर्थम् । नियमार्थम् । अदस एव दकारस्य नान्यस्य दकारस्येति । यदि नियमः क्रियते द्वीयतेरप्रत्ययो द्व इति प्राप्नोति स्व इति चेष्यते । यथालक्षणमप्रयुक्ते ॥

**अदस औ सुलोपश्च ॥ ७।२।१०७ ॥**

अदसः सोर्भवेदौत्वं किं सुलोपो विधीयते ।

अदस एव सोर्भवेदौत्वं किमर्थं सुलोपो विधीयते ।

ह्रस्वाल्लुप्येत संबुद्धिः

इह हेऽसावित्येङ्ह्रस्वात्संबुद्धेः [ ६.१.६९ ] इति लोपः प्रसज्येत ॥

न हलः

हलो लोपः संबुद्धिलोपः । तद्धल्ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् ।

प्रकृतं हि तत् ॥ १ ॥

प्रकृतं हल्ग्रहणम् । क प्रकृतम् । हल्ङ्या-

---

या सूत्रानें जो संबुद्धिप्रत्ययाचा लोप होतो तो होणार नाहीं. तसेंच 'या सा' या उदाहरणामध्यें टाप् प्रत्यय (४।१।४) होणार नाहीं. एकंदरींत अनन्त्ययोः असें सूत्रांत म्हटलेंच पाहिजे असें सिद्ध झालें.

तरी पण अनन्त्ययोः असें म्हणावयास नको. पुढीलप्रमाणें सूत्रें करूं म्हणजें काम भागेल. 'तदोः सः सौ' एवढेंच हें सूत्र असूं दे. त्याच्या पुढें 'अदसः' एवढेंच निराळें सूत्र समजतां येईल. अदस् शब्दाच्या दकाराला सकारादेश होतो सु पुढें असतांना, असा त्याचा अर्थ आहे. आतां हें सूत्र कशाकरितां, कारण पूर्वसूत्रानें सकारादेश सिद्ध होत आहे असा प्रश्न उद्भवतो; तर हें सूत्र नियमार्थ होईल. तो नियम असा कीं पूर्व सूत्रानें जर दकाराला सकारादेश होईल, तर तो फक्त अदस् शब्दाच्याच दकाराला होईल, इतर शब्दाच्या दकाराला सकार होणार नाहीं.

पण जर असा नियम केला तर द्विशब्दाहून क्यच् प्रत्यय (३।१।८) करून त्याच्या पुढें क्विप् प्रत्यय केला असतां त्या शब्दाचें प्रथमैकवचन द्वः असें होईल आणि स्वः असें तर इष्ट आहे.

पण ज्या उदाहरणाचा मूळ प्रयोग कोठेंही दिसत नाहीं अशा ठिकाणीं शास्त्राची प्रवृत्तीच करूं नये, हेंच योग्य होय.

(सू. १०७) अदस् शब्दाच्या पुढील सु प्रत्ययालाच औकार आदेश होऊं दे, निराळा सु प्रत्ययाचा लोप कशाकरितां सांगितला आहे ?

सु प्रत्ययालाच औकार आदेश केला तर हे असौ या उदाहरणामध्यें त्या औकाराचा 'एङ्ह्रस्वात्० ' (६।१।६९) या सूत्रानें लोप होऊं लागेल.

एङ्ह्रस्वात्० या सूत्रानें सांगितलेला संबुद्धिप्रत्ययाचा लोप येथें होणार नाहीं. कारण तो हलाचाच सांगितला आहे.

तर मग तेथें 'हल्' हें पद उच्चारलें पाहिजे.

उच्चारावयास नको. कारण—

हल् असें पद मागून चालूंच आहे.

हल् असें पद मागें कोठेंसें आहे ?

---

प्रमाणें उदाहरणही संभवत आहे.

३. तेव्हां अर्थातच त्यद्, तद्, यद्, एतद्, या शब्दांतील दकाराला सकार होणारच नाहीं. म्हणून त्याकरितां अनन्त्ययोः हें करावयास नको. अनन्त्ययोः या पदाचा तकाराविषयीं कोठेंही उपयोग नाहीं. शेवटीं तकार फक्त भवत् शब्दाचा आहे. पण त्यदादिक शब्द हे द्वि शब्दापर्यंतच घ्यावयाचे असल्यामुळें तेथें सकाराची प्राप्तीच येत नाहीं.

४. कारण अदसः या नियमामुळें 'तदोः सः सौ०' या सूत्रानें दकाराला सकार होणार नाहीं.

१. (सू. १०७) अदस् शब्दाहून सु प्रत्यय केला असतां अदस् शब्दाच्या सकाराला औकार आदेश होतो आणि पुढील सु प्रत्ययाचा लोप होतो; उदा० असौ.

ङ्याब्भ्यो दीर्घात्सुतिस्यपृक्तं हल् [ ६.१.६८ ] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । ह्रस्वादित्येषा पञ्चमी हलिति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [१.१.६७] इति ॥

आप एत्त्वं भवेत्तस्मिन्

इह हेऽसौ ब्राह्मणि आङि चापः संबुद्धौ च [७.३;१०५; १०६] इत्येत्त्वं प्रसज्येत ।

न झलीत्यनुवर्तनात् ।

झलीति तत्रानुवर्तते । क्व प्रकृतम् । सुपि च बहुवचने झल्येत् [७. ३. १०२; १०३ ] इति ॥

प्रत्ययस्थाच्च कादित्त्वम्

इह च असकौ ब्राह्मणीति प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य [७.३.४४] इतीत्त्वं प्रसज्येत । नैष दोषः । प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । आ आप् आबिति । इहापि तर्हि न प्राप्नोति । कारिके हारिके इति ॥

शीभावश्च प्रसज्यते ॥ २ ॥

इह च शीभावश्च प्राप्नोति । असौ ब्राह्मणी । आप उत्तरस्यौङः शी भवतीति शीभावः प्राप्नोति । तस्मात्सोर्लोपो वक्तव्यः ॥

---

' हल्ङ्याब्भ्यो दीर्घात्० ' (६।१।६८) या सूत्रामध्यें आहे.

पण तेथें तें पद प्रथमा विभक्ति लावून उच्चारलें आहे, आणि येथें तर षष्ठी विभक्ति लावून उच्चारलेलें हलः असें पाहिजे.

जरी हल् पद प्रथमा विभक्ति लावलेलें असलें तरी ह्रस्वात् या पंचमीच्या जोरावर त्या हल् पदापुढे येथें षष्ठीची कल्पना होईल. कारण 'तस्मादित्युत्तरस्य' (१।१।६७) अशी परिभाषा आहे.

सु प्रत्ययाला औ आदेश केला तर हे असौ ब्राह्मणि येथें स्त्रीलिंगामध्यें सकाराला अकारादेश केल्यानंतर टाप् प्रत्यय होईल. आणि त्या टाप् प्रत्ययाला औकार हा संबुद्धि प्रत्ययाला आदेश झाला असल्यामुळें त्या संबुद्धि प्रत्ययाच्या निमित्तानें 'औङ आपः' या सूत्राच्या पुढील 'संबुद्धौ च' (७।३।१०६) या सूत्राने एकारादेश होऊं लागेल.

एकारादेश होणार नाहीं. कारण 'संबुद्धौ च' या सूत्रामध्यें मागून झलि या पदाची अनुवृत्ति येत आहे.

झलि हें पद मागें कोठेंसें आहे ?

'सुपि च' या सूत्राच्या पुढील 'बहुवचने झल्येत्' (७।३।१०३) या सूत्रामध्यें झलि हें पद आहे.

तसेंच 'असकौ ब्राह्मणी' येथें अकच् प्रत्यय केलेल्या अदस् शब्दाच्या स्त्रीलिंगी प्रथमैकवचनामध्यें सु प्रत्ययाला औकार झाला तर त्याच्या पूर्वी टाप् होईल आणि त्यामुळें अकच् प्रत्ययांतील अकाराला 'प्रत्ययस्थात्०' (७।३।४४) यानें इकार आदेश होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'प्रत्ययस्थात्०' या सूत्रामध्यें आपि जसें जं म्हटलें आहे तें आ आप् यांचा संधि करून म्हटलें आहे.[3]

असें म्हटलें तर कारिके, हारिके, येथेंही इकार आदेश होणार नाहीं.[4]

शिवाय असौ ब्राह्मणी येथें शी आदेश होऊं लागेल. अप्प्रत्ययान्त अंगाच्या पुढील औकाराला शी आदेश होतो ( ७।१।१८ ) असा जो शी आदेश सांगितला आहे तो असौ येथें स्त्रीलिं·

---

२. तेव्हां असौ ह्यांत सु प्रत्ययाचे स्थानीं केलेला औकार हा संबुद्धि प्रत्यय जरी आहे. तरी झलादि नसल्यामुळें मागील टाप् प्रत्ययाला एकार होत नाहीं.

३. तेव्हां 'आकार या रूपांत असलेला आप् प्रत्यय पुढें असतांना' असा त्याचा अर्थ होतो. असकौ येथें आप् प्रत्ययाच्या आकाराचा पुढील औकाराबरोबर वृद्धिरूपी ( ६।१।८८ ) एकादेश झाला असल्यामुळें त्या आप् प्रत्ययाचें आ हें रूप नष्ट झालें आहे; म्हणून इकार होत नाहीं.

४. कारण येथेंही कारिके शब्दांतील आप् प्रत्ययाचें आ हें रूप नष्ट झालें आहे. कारिका शब्दापुढील प्रथमेच्या किंवा द्वितीयेच्या द्विवचनाच्या औ प्रत्ययाला शी आदेश ( ७।१।१८ ) होऊन गुण ( ६।१।८७ ) झाला आहे.

**सावौत्वप्रतिषेधः साकच्काद्वा सादुत्वं च ॥ १ ॥**

सावौत्वप्रतिषेधः साकच्काद्वा वक्तव्यः । सादुत्वं च परस्योत्वं वक्तव्यम् । असकौ असुकः॥

**उत्तरपदभूतानामादेश उपदेशिवद्वचनम् ॥ २ ॥**

उत्तरपदभूतानां त्यदादीनामादेश उपदेशिवद्भावो वक्तव्यः। परमाहम् परमायम् परमानेन । किं प्रयोजनम् ।

**अनादिष्टार्थम् ॥ ३ ॥**

अकृत एकादेश आदेशा यथा स्युरिति ॥ किं पुनः कारणमेकादेशस्तावद्भवति न पुनरादेशाः । न परत्वादादेशैर्भवितव्यम् ।

**बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ४ ॥**

बहिरङ्गा आदेशाः । अतरङ्ग एकादेशः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ स तर्ह्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । न वक्तव्यः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति पूर्वपदोत्तरपदयोस्तावत्कार्यं भवति नैकादेश इति यदयं नेन्द्रस्य परस्य [ ७.३.२२ ] इति प्रतिषेधं शास्ति । कथं

---

गामध्यें सु प्रत्ययाला जो औकार आदेश केला आहे त्याला होऊं लागेल. एकंदरींत सु प्रत्ययाला औकार आदेश करून भागत नाहीं. तेव्हां आचार्यांनीं सांगितल्याप्रमाणें सु प्रत्ययाचा लोपच केला पाहिजे.

( वा. १ ) अदस् शब्दाला जो हा सु पुढें असतांना औकार आदेश सांगितला आहे तो अकच् प्रत्यय केलेल्या अदस् शब्दाला होत नाहीं आणि अदस् शब्दांतील दकाराला पूर्वसूत्रानें सकारादेश केल्यानंतर त्या सकाराच्या पुढील वर्णाला उकार आदेश होतो; आणि हें सर्व विकल्पानें होतें असें म्हणावें; उदाहरणार्थ असकौ असुकः.

( वा. २ ) समासामध्यें उत्तरपद असलेले जे त्यदादिक शब्द त्यांना आदेश कर्तव्य असेल त्या ठिकाणीं तो आदेश उपदेशावस्थेमध्येंच होतो असें म्हणावें; उदाहरणार्थ परमाहम्[६], परमायम्, परमानेन.

उपदेशावस्थेमध्यें आदेश झाल्यानें काय साधतें?

( वा. ३ ) ह्या त्यदादिक शब्दांचा ज्या ठिकाणीं पूर्वपदाबरोबर संधि होतो म्हणजे एकादेश होतो, त्या ठिकाणीं तो एकादेश होण्याच्या पूर्वीं हे आदेश झाले पाहिजेत.

पण काय हो, जरी उपदेशिवद्भाव सांगितला नसला तरी एकादेशच अगोदर होतात, आदेश अगोदर होत नाहींत, याचें काय बरें कारण असावें? कारण काहींच दिसत नाहीं. उलट, आदेशच एकादेशापेक्षां परत्वास्तव अगोदर झाले पाहिजेत.

आदेश जरी पर आहेत तरी ते अगोदर होणार नाहींत. कारण ते बहिरंग आहेत, व एकादेश अंतरंग आहे, आणि अंतरंगशास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र असिद्ध होतें अशी तर परिभाषा आहे.

तर मग आदेश अगोदर होण्याकरितां उपदेशिवद्भाव सांगितला पाहिजे, असें दिसतें.

उपदेशिवद्भाव सांगावयास नको. आचार्यांच्या कृतीवरूनच हें सिद्ध होत आहे कीं सामासिक शब्दांतील पूर्वपद व उत्तरपद यांना होणारीं कार्यें होईतोंपर्यंत एकादेश होत नाहीं. ती कृति अशी कीं आचार्यांनीं 'नेन्द्रस्य परस्य'

---

५. औङः असा जो ङकार लाविला आहे तो केवळ उच्चारणार्थ आहे. कारण प्रथमा व द्वितीया यांच्या द्विवचनाच्या औ प्रत्ययाला ङकार कोठेंच नाहीं. तेव्हां अर्थातच सु प्रत्ययाचे स्थानीं केलेल्या औकारालाही तो प्राप्त होणारच.

६. परमाहम् या ठिकाणीं परम शब्दाचा अस्मद् शब्दाबरोबर कर्मधारय समास केला आहे. तेथें संधि होऊन परमास्मद् असा सामासिक शब्द तयार झाल्यानंतर त्याच्या पुढें केलेल्या सु प्रत्ययाला मानून होणारा अह आदेश ( ७।२।९४ ) अस्मद् एवढ्याला होईल आणि मागें परम् असें मकारान्त पूर्वपद राहील; आणि उपदेशिवद्भावानें समासाबरोबरच अह आदेश करून मागून संधि झाला म्हणजे हा दोष येत नाहीं.

७. आदेश हे अङ्गस्य या अधिकारांत सांगितले

कृत्वा ज्ञापकम् । इन्द्रे द्वावचौ । तत्रैको यस्येति लोपेनापह्रियतेऽपर एकादेशेन । अनच्क इन्द्रः संवृत्तः । तत्र को वृद्धेः प्रसङ्गः । पश्यति त्वाचार्यः पूर्वपदोत्तरपदयोस्तावत्कार्यं भवति नैकादेश इति ततो नेन्द्रस्य परस्येति प्रतिषेधं शास्ति ॥

अदसः सोर्भवेदौत्वं किं सुलोपो विधीयते ।
ह्रस्वाल्लुप्येत संबुद्धिर्न हलः प्रकृतं हि तत् ॥ १ ॥

आप एत्त्वं भवेत्तस्मिन्न झलीत्यनुवर्तनात् ।
प्रत्ययस्थाच्च कादित्त्वं शीभावश्च प्रसज्यते ॥ २ ॥

[ इदमो मः ॥ ७।२।१०८ ॥

दश्च ॥ ७।२।१०९ ॥

यः सौ ॥ ७।२।११० ॥

इदोऽय् पुंसि ॥ ७।२।१११ ॥

अनाप्यकः ॥ ७।२।११२ ॥

हलि लोपः ॥ ७।२।११३ ॥ ]

मृजेर्वृद्धिः ॥ ७।२।११४ ॥

मृजेर्वृद्धिविधौ क्विप्रतिषेधः ॥ १ ॥

मृजेर्वृद्धिविधौ क्वन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । कंसपरिमृड्भ्याम् कंसपरिमृड्भिः ॥

धातोः स्वरूपग्रहणे वा तत्प्रत्ययविज्ञानात्सिद्धम् ॥ २ ॥

अथवा धातोः स्वरूपग्रहणे तत्प्रत्यये कार्ये-

---

(७।३।२२) असा वृद्धीचा निषेध केला आहे. हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें की 'नेन्द्रस्य परस्य' या सूत्रानें समासांतील उत्तरपद जो इन्द्र शब्द त्याला वृद्धि (७।३।२१) होत नाहीं असें सांगितलें आहे. वृद्धि ही अचालाच सांगितली आहे. इन्द्र शब्दामध्यें तर दोनच अच् आहेत. त्यांतील एक अच् म्हणजे अकार हा 'यस्येति०' (६।४।१४८) यानें लुप्त होतो आणि दुसरा अच् इकार हा एकादेशानें जातो. अशा रीतीनें अचाशिवाय इन्द्र शब्द बनतो. तेव्हां त्या इन्द्र शब्दाला वृद्धीची प्राप्ति तरी येणार कशी ? तेव्हां आचार्य असें समजत आहेत कीं 'सामासिक शब्दांतील पूर्वपद व उत्तरपद यांना होणारीं कार्यें होईतोंपर्यंत एकादेश होत नाहीं.' असें गृहीत धरूनच 'नेन्द्रस्य परस्य' असा वृद्धीचा निषेध आचार्यांनीं केला आहे.

(सू. ११४, वा. १) मृज् धातूला जी ही वृद्धि सांगितली आहे ती क्विप्रत्ययान्त मृज् धातूला होत नाहीं असें म्हणावें; उदाहरणार्थ कंसपरिमृड्भ्याम्, कंसपरिमृड्भिः.

(वा. २) अथवा कोणत्याही धातूचें स्वरूप उच्चारून सांगितलेलें कार्य हें धातूला लागणारा

---

असल्यामुळें त्यांना सबंध शब्दाची जरूर आहे, म्हणून ते बहिरंग आहेत; आणि एकादेशांना फक्त दोन वर्णांची अपेक्षा असल्यामुळें ते अंतरंग आहेत.

१. (सू. १०८) सु प्रत्यय पुढें असतांना इदम् शब्दाच्या मकाराला मकारच होतो; म्हणजे अकार होत नाहीं; उदा० अयम्, इयम्.

१. (सू. १०९) इदम् शब्दाच्या दकाराला मकार आदेश होतो, विभक्तिप्रत्यय पुढें असतांना उदा० इमौ, इमे.

१. (सू. ११०) सु प्रत्यय पुढें असतांना इदम् शब्दाच्या दकाराला यकार आदेश होतो; उदा० इयम्.

१. (सू. १११) पुंलिंगामध्यें इदम् शब्दातील इद् या भागाला अय् असा आदेश होतो, सु प्रत्यय पुढें असतांना; उदा० अयम्.

१. (सू. ११२) तृतीयेपासून सप्तमीपर्यंत विभक्तिप्रत्यय पुढें असतांना इदम् शब्दांतील इद् या भागाला अन् असा आदेश होतो, परंतु त्या इदम् शब्दामध्यें अकच् प्रत्यय केलेला नसावा; उदा० अनेन, अनयोः.

१. (सू. ११३) तृतीयेपासून सप्तमीपर्यंत विभक्तिप्रत्यय जर हलादि असेल तर इदम् शब्दांतील इद् भागाचा लोप होतो, पण त्या इदम् शब्दामध्यें अकच् प्रत्यय केलेला नसावा; उदा० आभ्याम्, एभिः.

१. (सू. ११४) मृज् धातूंतील ऋकाराला वृद्धि होते, धातूला लागणारा प्रत्यय पुढें असतांना; उदा० मार्ष्टि.

विज्ञानात्सिद्धम्। धातुप्रत्यये कार्यं भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ कान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि ।

**प्रयोजनं सृजिदृशिमस्जिनशिहन्तिगिरत्यर्थम् ॥ ३ ॥**

सृजि । रज्जुसृड्भ्याम् रज्जुसृड्भिः । सृजि। दृशि । देवदृग्भ्याम् देवदृग्भिः। दृशि। मस्जि । उदकमग्भ्याम् उदकमग्भिः। मस्जि । नशि। प्रनड्भ्याम् प्रनड्भिः। नशि। हन्ति । वार्त्रघ्नः भ्रौणघ्नः । हन्ति। गिरति । देवगिरौ देवगिरः ॥

यदि स्वरूपग्रहण इत्युच्यते प्रसृड्भ्याम् प्रसृड्भिः अनुदात्तस्य चर्दुपधस्यान्यतरस्याम् [ ६. १. ५९ ] इत्यम्प्राप्नोति । एवं तर्हीयं परिभाषा कर्तव्या धातोः कार्यमुच्यमानं तत्प्रत्यये भवतीति ॥ सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या। न कर्तव्या। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येषा परिभाषेति यदयं भ्रौणहत्ये तत्वं शास्ति ॥

## [1]अचो ञ्णिति ॥ ७।२।११५ ॥

अज्ग्रहणं किमर्थम् ।

**वृद्धावज्ग्रहणं गोऽर्थम् ॥ १ ॥**

वृद्धावज्ग्रहणं क्रियते गोतो वृद्धिर्यथा

---

प्रत्यय पुढें असतांनाच होतें, यानेंच काम भागेल.

तर मग तशी परिभाषा केली पाहिजे.

त्या परिभाषेचा उपयोग होतो अशीं उदाहरणें तरी कोणतीं ?

(वा. ३) उदाहरणें आहेत तर. असें पहा कीं रज्जुसृड्भ्याम्, रज्जुसृड्भिः, येथें सृज् धातूला, तसेंच देवदृग्भ्याम्, देवदृग्भिः, येथें दृश् धातूला अम् आगम (६।१।५८) न झाला पाहिजे. उदकमग्भ्याम्, उदकमग्भिः, येथें मस्ज् धातूला, व प्रनड्भ्याम्, प्रनड्भिः, येथें नश् धातूला, नुम् आगम (७।१।६०) न झाला पाहिजे. वार्त्रघ्नः, भ्रौणघ्नः, येथें वृत्रहन् शब्दांतील हन् धातूच्या नकाराला तकार आदेश (७।३।३२) न झाला पाहिजे. तसेंच देवगिरौ, देवगिरः, येथें गॄ धातूच्या रेफाला लकारादेश (८।२।२१) न झाला पाहिजे.

हीं या परिभाषेचीं उदाहरणे आहेत खरीं, पण अजूनही कांहीं ठिकाणीं दोष शिल्लक राहतातच. कारण या परिभाषेमध्यें ' स्वरूपग्रहणे ' म्हणजे धातूचें विशेष स्वरूप उच्चारून सांगितलेलें कार्य असें म्हटलें आहे. त्यामुळें प्रसृड्भ्याम्, प्रसृड्भिः येथें 'अनुदात्तस्य चर्दुपधस्यान्यतरस्याम्' (६।१।५९) या सूत्रानें अम् आगम प्राप्त होतोच; त्याचें निवारण या परिभाषेनें होणार नाहीं. कारण त्या सूत्रामध्यें धातूचें विशेष स्वरूप उच्चारलें नाहीं.

तर मग 'स्वरूपग्रहणे' हा शब्द काढून टाकून मोघमच ' धातोः कार्यमुच्यमानं तत्प्रत्यये भवति ' अशी परिभाषा करावी.

असो, तर मग एकंदर विचार केला असतां ती परिभाषा केली पाहिजे.

स्वतंत्र रीतीने ती पठण करावयास नको. कारण आचार्यांच्या कृतीवरून ती परिभाषा सिद्ध होत आहे. ती कृति अशी कीं 'दाण्डिनायन०' (६।४।१७४) ह्या सूत्रामध्यें हन् धातूच्या नकाराला तकार होण्याकरितां 'भ्रौणहत्य ' असें निपातन केलें आहे. ती परिभाषा आचार्यांच्या मनांत नसेल तर 'हनस्तो०' (७।३।३२) या सूत्रानेंच येथें तकार होत असल्यामुळें तें निपातन व्यर्थ होणार आहे.

(सू. ११५) येथें 'अचः' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा. १) ह्या वृद्धिविधीमध्यें अचः असें जें म्हटलें आहे तें गोशब्दाकरितां म्हटलें आहे. गौः

---

१. (सू. ११५) अजन्त जें अंग त्याला वृद्धि होते, अकारेत्संज्ञक किंवा णकारेत्संज्ञक असा प्रत्यय पुढें अस-

स्यात् । गौरिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । णित्करणसामर्थ्याद्वेवात्र वृद्धिर्भविष्यति ॥ अथ योगविभागः किमर्थो न ञ्णित्यत उपधाया इत्येवोच्येत । का रूपसिद्धिः चायकः लावकः कारकः । गुणे कृतेऽयवो रपरत्वे चात उपधाया इत्येव सिद्धम् ।

**योगविभागः सख्यिव्यञ्जनाद्यर्थः ॥ २ ॥**

योगविभागः क्रियते सख्यर्थो व्यञ्जनाद्यर्थश्च । सख्यर्थस्तावत् । सखायौ सखायः । व्यञ्जनाद्यर्थः । जैत्रम् यौत्रम् च्यौत्रम् ॥ योगविभागे चेदानीं सखिव्यञ्जनाद्यर्थे क्रियमाणेऽज्ग्रहणमपि कर्तव्यं भवति । किं प्रयोजनम् । गोऽर्थम् । ननु चोक्तं णित्करणसामर्थ्यादेवात्र वृद्धिर्भविष्यतीति । अस्त्यन्य-

---

येथें गो शब्दाला वृद्धि झाली पाहिजे.

हा उपयोग बरोबर नाहीं. कारण येथें वृद्धि जर न होईल तर 'गोतो णित्' (७।१।९०) या सूत्रानें गो शब्दाच्या पुढील सर्वनामस्थानप्रत्यय णित् समजावा, असें जें वृद्धीकरितां सांगितलें आहे तें व्यर्थ होईल. तेव्हां त्याच्या जोरावर गौः येथें इक् नसला तरी वृद्धि होईल.

पण[3] त्या णित् समजण्याचा दुसरा उपयोग आहे ना ?

तो कोणता ?

गावौ, गावः, येथें इक् नसल्यामुळें ओकाराला वृद्धि झाली नाहीं तर अवादेश (६।१।७८) होईल; त्यानंतर प्रत्यय णित् असल्यामुळें 'अत उपधायाः' या पुढील सूत्रानें वृद्धि होईल.

आता हीं दोन सूत्रें निरनिराळीं कशाकरितां केलीं आहेत ? तशीं करावयास नकोत. 'ञ्णित्यत उपधायाः' असें एकच सूत्र करावें.

एक सूत्र केलें तर चायकः, लावकः, कारकः, हीं उदाहरणें कशीं साधतील ?

का बरें ? चि व लू या धातूंना गुण (७।३।८४) होऊन अय् व अव् हे आदेश (६।१।७८) होतील; कृ धातूला गुण होईल तोच रपर होईल; नंतर उपधेला ह्रस्व अकार येत असल्यामुळें 'अत उपधायाः' यानेंच वृद्धि होईल.

(वा. २) ञ्णिति हें वृद्धि सांगणारें निराळें सूत्र सखि शब्दाकरितां आणि ज्या उदाहरणांमध्यें व्यञ्जन आरंभीं असलेला प्रत्यय आहे त्याकरितां केलें आहे. सखिशब्दाचीं उदाहरणें : सखायौ, सखायः. व्यंजन आरंभीं असलेल्या प्रत्ययाचीं उदाहरणें : जैत्रं[5], यौत्रं, च्यौत्रम्. आता जर सखि शब्दाकरितां आणि व्यंजन आरंभीं असलेल्या प्रत्ययांकरितां हें वृद्धि सांगणारें ञ्णिति असें सूत्र निराळें करावें लागतच आहे, तर त्यामध्यें अचः असेंही म्हटलेंच पाहिजे.

कशाकरितां ?

गोशब्दाकरितां.

पण तेथें 'गो शब्दाच्या पुढील सर्वनामस्थानप्रत्यय णित् समजावा असें जें सांगितले आहे त्याच्या सामर्थ्यास्तव ओकार इक् नसला तरी त्याला वृद्धि होईल' असें आतांच सांगितलें आहे ना ?

'णित् समजण्याचा दुसरा उपयोग आहे'

---

तांना; उदा० नायः, नायकः लावः, लावकः गौः, गावौ.

२. सूत्रामध्यें अचः असें म्हटलें नाहीं तर 'इको गुणवृद्धी' (१।१।३) या परिभाषेमुळें इकः असें पद उपस्थित होईल. त्यामुळें नायकः व लावकः येथें नी व लू यांच्या इकाराला व उकाराला वृद्धि होऊन तीं उदाहरणें साधतील. पण गौः येथें ओकार हा इक् नसल्यामुळें त्याला वृद्धि होणार नाहीं.

३. काशी येथें छापिलेल्या प्रतीमध्यें " वृद्धिर्भविष्यति । अस्त्यन्यण्णित्करणस्य प्रयोजनम् । किम् । गावौ गाव इत्यत्रात उपधाया इति वृद्धिर्यथा स्यात् । अथ योगविभागः ... " असा पाठ आहे; त्याला अनुसरून हें भाषांतर केलें आहे.

४. सखायौ येथें गुणाची प्राप्ति नसल्यामुळें चायकः याप्रमाणें येथें साधत नाहीं, तसेंच प्रत्ययाच्या आरंभीं व्यंजन असलें म्हणजे तेथें अय् आणि अव् हे आदेश करता येत नाहींत. तेव्हां या दोन प्रकारच्या उदाहरणांकरितां स्वतंत्र वृद्धि सांगणाऱ्या सूत्राची जरूरी आहे.

५. जि आणि यु या धातूंहून ष्ट्रन् असा उणादि प्रत्यय केला आहे. तसाच च्यु धातूहूनही ष्ट्रन् प्रत्यय (उणादि ४।१०४) केला आहे.

ण्णित्करणस्य प्रयोजनम् । किम् । गावौ गावः । अवादेशे कृतेऽत उपधाया इति वृद्धिर्यथा स्यात् । यत्तु सौ णित्करणं तदनवकाशं तस्यानवकाशत्वादेव वृद्धिर्भविष्यति । यथैव खल्वपि णित्करणसामर्थ्यादनिकोऽपि वृद्धिः प्राप्स्यति एवं तत्वमपि प्राप्नोति । तत्वमपि हि ञ्णितीत्युच्यते । तस्मादज्ग्रहणं कर्तव्यम् ॥

**[ [१]अत उपधायाः ॥ ७।२।११६ ॥ ]**

**[१]तद्धितेष्वचामादेः ॥ ७।२।११७ ॥**

अज्ग्रहणं कर्तव्यम् । ननु च क्रियत एव । द्वितीयं कर्तव्यं यथाचामादिग्रहणमज्विशेषणं विज्ञायेत । अचामादेरच इति । अथाक्रियमाणेऽज्ग्रहणे कस्याचामादिग्रहणं विशेषणं स्यात् । इग्विशेषणमित्याह । अचामादेरिक इति । तत्र को दोषः । इहैव स्यात् । ऐतिकायनः औपगवः । इह न स्यात् । गार्ग्यः वात्स्य इति ॥ तत्तर्ह्यज्ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । अचो ञ्णिति [११५] इति । यदि तदनुवर्ततेऽत

---

असेंही पण तेथें सांगितलेंच आहे; तो उपयोग कोणता म्हणाल तर गावौ, गावः, येथें अवादेश केल्यानंतर 'अत उपधायाः' या सूत्रानें वृद्धि व्हावी, हा तो उपयोग होय.

तरी पण सर्वनामस्थानांतील सु प्रत्ययाला णित् समजण्याचा कांहींच उपयोग येत नाहीं. तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तव गौः येथें ओकार इक् नसला तरी त्याला वृद्धि होईल.

तर मग जसें णित् समजण्याच्या जोरावर णित् समजण्याचें कार्य वृद्धि इक् नसला तरी होईल असें तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें त्याच जोरावर णित् समजण्याचें कार्य तकारादेश (७।३।३२) हा हन् धातु नसला तरी होईल असेंही कोणी म्हणेल. कारण तकारादेश हाही वृद्धीप्रमाणें ञित् व णित् हे प्रत्यय पुढें असतांनाच सांगितला आहे. एकंदरींत ह्या प्रकृत सूत्रामध्यें अचः असें म्हटलें पाहिजे असें सिद्ध झालें.

(सू. ११७) ह्या सूत्रामध्यें अचः असें म्हटलें पाहिजे.

पण अचाम् असा अच् शब्द उच्चारलाच आहे ना ?

तो एक आहेच. त्या शिवाय दुसरा अचः असा शब्द पाहिजे आहे; म्हणजे अचांमध्यें आदि हें त्या अचाचें विशेषण समजून 'अचांमध्यें आदि जो अच् त्याला वृद्धि होते' असा अर्थ होईल.

पण येथें दुसरें अचः असें पद घातलें नाहीं तर 'अचांमध्यें आदि' हें कोणाचें बरें विशेषण होईल ?

[२]इकाचें विशेषण होईल असें आम्ही म्हणतों, कीं ज्यामुळें अचांमध्यें आदि असा जो इक त्याला वृद्धि होते असा अर्थ होईल.

मग तसा अर्थ झाला तर दोष कोठें येईल ?

तसा अर्थ झाला तर ऐतिकायनः, औपगवः, येथेंच इकार आणि उकार यांना वृद्धि होईल, आणि गार्ग्यः, वात्स्यः येथें अकाराला होणार[३] नाहीं.

तर मग अचः असें येथें म्हटलें पाहिजे.

म्हणावयास नको. कारण मागून अचः या पदाची अनुवृत्ति येत आहे.

मागें अचः असें कोठें म्हटलें आहे ?

---

१. ( सू. ११६ ) ञकारेत्संज्ञक किंवा णकारेत्संज्ञक असलेला प्रत्यय पुढें असतांना मागील अंगांतील उपधासंज्ञक ऱ्हस्व अकाराला वृद्धि होते; उदा० पाचकः, पाकः.

१. ( सू. ११७ ) ञकारेत्संज्ञक किंवा णकारेत्संज्ञक असलेला असा तद्धित प्रत्यय पुढें असतांना मागील अंगांतील अचांपैकीं पहिला जो अच् त्याला वृद्धि होते; उदा० उपगोरपत्यमौपगवः.

२. अचः असें म्हटलें नाहीं तर 'इको गुणवृद्धी' (१।१।३) या परिभाषेनें इकः पद येथें उपस्थित होणार आहे.

३. इतिक शब्दाहून फक् प्रत्यय (४।१।९९), उपगु शब्दाहून अण् प्रत्यय (४।१।९२) आणि गर्ग, वत्स, या शब्दांहून यञ् प्रत्यय (४।१।१०५) झाला आहे.

उपधायाः [ ११६] अचश्चेत्यज्मात्रस्योपधाया वृद्धिः प्रसज्येत । छेदक इति । अकारेण तपरेणाचं विशेषयिष्यामः । अचोऽत इति । इहेदानीमच इत्येवानुवर्ततेऽत इति निवृत्तम् । अथवा मण्डूकगतयोऽधिकाराः । यथा मण्डूका उत्प्लुत्योत्प्लुत्य गच्छन्ति तद्वदधिकाराः । अथवैकयोगः करिष्यते । अचो ञ्णित्यत उपधायाः । ततस्तद्धितेष्वचामादेरिति । न चैकयोगेऽनुवृत्तिर्भवति ॥

**तद्धितेष्वचामादिवृद्धावन्त्योपधलक्षणप्रतिषेधः ॥ १ ॥**

तद्धितेष्वचामादिवृद्धावन्त्योपधलक्षणाया वृद्धेः प्रतिषेधो वक्तव्यः । क्रौष्टुः जागत इति । ननु चाचामादिवृद्धिरन्त्योपधलक्षणां वृद्धिं बाधिष्यते । कथमन्यस्योच्यमानान्यस्य बाधिका स्यात् । असति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यात् ॥

**लोकविज्ञानात्सिद्धम् ॥ २ ॥**

सत्यपि संभवे बाधनं भवति । तद्यथा । ब्राह्मणेभ्यो दधि दीयतां तक्रं कौडिन्यायेति सत्यपि संभवे दधिदानस्य तक्रदानं निवर्तकं भवति । एवमिहापि सत्यपि संभवेऽचामादिवृद्धिरन्त्योपधलक्षणां वृद्धिं बाधि-

---

'अचो ञ्णिति' या सूत्रामध्यें म्हटलें आहे.

पण जर तेथून अचः हें पद येथें अनुवृत्त होत असेल तर 'अत उपधायाः' या मधल्या सूत्रामध्येंही त्याचा संबंध होईल आणि तेथें संबंध झाला तर उपधासंज्ञक अशा वाटेल त्या अचाला वृद्धि होऊं लागेल, व भेदकः, छेदकः, येथें इकारालाही वृद्धि होईल.

तसें होणार नाहीं. कारण सूत्रामध्यें उच्चारलेलें अतः हें त्या अचाचें विशेषण करूं, म्हणजे ह्रस्व अकाररूपी जो अच् त्याला वृद्धि होते असा अर्थ होईल. या प्रस्तुत ठिकाणीं मात्र 'अचः' एवढेंच पद अनुवृत्तीनें येतें; 'अतः' या पदाची अनुवृत्ति होत नाहीं. अथवा अधिकाराची गति बेडकाप्रमाणें आहे. बेडूक जसा उड्या मारीत जातो त्याप्रमाणें अधिकार आहेत. अथवा 'अचोञ्णित्यत उपधायाः' असें एकच सूत्र करतां येईल; आणि त्याच्याच पुढें 'तद्धितेष्वचामादेः' हें सूत्र होय. एक सूत्र केलें म्हणजे त्यांत वाक्यार्थ दोन जरी झाले तरी त्यांतल्यात्यांत अनुवृत्ति होत नसते.

(वा. १) ही जी तद्धित प्रत्यय पुढें असतांना पूर्वीच्या अंगांतील अचांमध्यें पहिल्या अचाला वृद्धि सांगितली आहे त्या ठिकाणीं जर शेवटच्या अचाला किंवा उपधेला मागील सूत्रानीं वृद्धि प्राप्त झाली तर ती होत नाहीं, असें म्हणावें; उदा. क्रौष्टुः, जागतः.

पण ही अचांमध्यें पहिल्या अचाला सांगितलेली वृद्धि शेवटच्या वर्णाला प्राप्त झालेल्या वृद्धीचा ( ७।२।११५ ) आणि उपधेला प्राप्त झालेल्या वृद्धीचा ( ७।२।११६ ) बाध करीलच.

तसें होणार नाहीं; आदिवृद्धि ही एकाला सांगितली आहे; ती दुसऱ्याला प्राप्त झालेल्या वृद्धीचा कसा बरें बाध करील ? कारण, ज्या ठिकाणीं दोन्ही कार्यांचा संभव नाहीं तेथेंच खरोखर एकानें दुसऱ्याचा बाध करणें रास्त होईल, आणि येथे तर दोन्ही कार्यांचा संभव आहे.

(वा. २) लोकामध्यें जसें दृष्टीस पडतें तशा रीतीनेंच हें सिद्ध होत आहे. लोकांमध्यें दोन्ही कार्यांचा संभव असूनही तेथें एकानें दुसऱ्याचा बाध झालेला दृष्टीस पडतो; जसें 'ब्राह्मणांना दहीं द्यावें आणि कौडिन्याला ताक द्यावें,' असें म्हटलें असतां तेथें कौडिन्याला तक्रदान आणि दधिदान हीं दोन्ही करतां येतात. तरी त्यांमध्यें तक्रदान हें दधिदानाचा बाध करतें; त्याप्रमाणेंच क्रौष्टुः

---

४. तेव्हां 'अचो ञ्णिति' या सूत्रांतील अचः हें पद एकदम उडी मारून मधल्या सूत्रांशीं स्पर्श न करतांच प्रकृत सूत्रामध्यें अनुवृत्त होईल.

च्यते ॥ विषम उपन्यासः । नाप्राप्ते दधिदाने तक्रदानमारभ्यते तत्प्राप्त आरभ्यमाणं बाधकं भविष्यति । इह पुनरप्राप्तायामन्त्योपधलक्षणायां वृद्धावचामादिवृद्धिरारभ्यते । सुश्रुत् सौश्रुत इति ॥

पुष्करसद्ग्रहणाद्वा ॥ ३ ॥

अथवा यदयमनुशतिकादिषु पुष्करसच्छब्दं पठति तज्ज्ञापयत्याचार्योऽचामादिवृद्धावन्त्योपधलक्षणा वृद्धिर्न भवतीति ॥

[ [1]किति च ॥ ७।२।११८ ॥ ]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये सप्तमस्याध्यायस्य द्वितीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

जागतः, येथें जरी आदिवृद्धीच्या बरोबर अंत्यवृद्धि किंवा उपधावृद्धि करतां येते अशा रीतीनें त्या दोन्ही वृद्धींचा संभव आहे तरी आदिवृद्धि ही अंत्यवृद्धीचा आणि उपधावृद्धीचा बाध करील.

हा लोकांतील दिलेला दृष्टांत बरोबर नाहीं. कारण लोकांमध्यें कौंडिन्याला जें तक्रदान सांगितलें आहे तेथें दधिदान हें प्राप्त होत नाहीं असें कोठेंच होत नाहीं. तेव्हां दधिदान हें अवश्य प्राप्त होत असतांना मुद्दाम सांगितलेलें जें कौण्डिन्याला तक्रदान तें दधिदानाचा बाध करतें हें रास्तच आहे. पण येथें पहावें तर तसें नाहीं. कारण अंत्यवृद्धीची आणि उपधावृद्धीची प्राप्ति जेथें येत नाहीं अशा ठिकाणीं देखील ही आदिवृद्धि सांगितली जाते; उदा० सौश्रुतः येथें सुश्रुत् या शब्दाचा शेवटचा वर्ण अच् नाहीं, व उपधेला अकार नाहीं. एकंदरींत लौकिकन्यायानें हें साधणार नाहीं.

(वा. ३) अथवा अनुशतिकादि गणामध्यें (७।३।२०) जो आचार्यांनीं पुष्करसद् शब्दाचा पाठ केला आहे त्यावरून असें ज्ञापित होतें कीं 'अचांमध्यें पहिल्या अचाला वृद्धि ज्या ठिकाणीं प्राप्त होत असेल तेथें अंत्य वर्णाला किंवा उपधेला प्राप्त झालेली वृद्धि होत नाहीं.'

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सातव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें व दुसरा पाद समाप्त झाला.

---

५. पुष्करे सीदतीति पुष्करसत्, म्ह० पुष्करतीर्थावर राहणारा मनुष्य. येथें पुष्कर आणि सद् या दोन पदांचा समास झाला आहे. त्या पुष्करसद् शब्दाहून अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय ( ४।१।९६ ) झाला आहे. तेथें त्या दोन्ही पदांतील पहिल्या अचाला वृद्धि होण्याकरिता अनुशतिकादि गणामध्यें पुष्करसद् शब्दाचा पाठ केला आहे. त्यामुळें 'पौष्करसादि' असा इञ्प्रत्ययान्त शब्द होतो. जर आदिवृद्धीनें इतर वृद्धीचा बाध केला नाहीं तर उपधावृद्धि होऊन 'पौष्करसादि' असा शब्द सिद्ध होईलच. असें असूनही ज्या अर्थी उभयपदवृद्धीकरितां अनुशतिकादि गणामध्यें पुष्करसद् शब्दाचा पाठ आचार्यांनीं केला आहे त्याअर्थी आदिवृद्धि ही इतर वृद्धीचा बाध करते असें त्यांनीं गृहीत धरलें आहे असें सिद्ध होतें.

१. (सू. ११८) ककार इत्संज्ञक असलेला तद्धितप्रत्यय पुढें असतांना मागील अंगांतील अचांपैकीं जो पहिला अच् त्याला वृद्धि होते; उदा० नाडायनः.

अध्याय ७ पाद २ समाप्त.

**देविकाशिंशपादित्यवाड्दीर्घसत्रश्रेयसामात् ॥ ७।३।१ ॥**

**देविकादिषु तदादिग्रहणम् ॥ १ ॥**

देविकादिषु तदादिग्रहणं कर्तव्यम् । देविकाद्यादीनामिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । दाविकाकूलाः शालयः । शांशपास्थला देवाः ॥ किं पुनः कारणं न सिध्यति ।

**अन्यत्र तद्ग्रहणात्तदन्तग्रहणाद्वा ॥ २ ॥**

अन्यत्र हि तस्य वा ग्रहणं भवति तदन्तस्य वा न चेदं तत्रापि तदन्तम् ॥

**आद्यज्विशेषणत्वात्सिद्धम् ॥ ३ ॥**

आद्यज्विशेषणं देविकादयः । नैवं विज्ञायते देविकादीनामङ्गानामचामादेराकारो भवतीति । कथं तर्हि । ञ्णित्यङ्गस्याचामादेराकारो भवति स चेद्देविकादीनामाद्यज्भवतीति ॥

**आन्तरतम्यनिवर्तकत्वाद्वा ॥ ४ ॥**

अथवा नानेनानन्तरतमा वृद्धिर्निर्वर्त्यते । किं तर्हि । अन्तरतमानेन निवर्त्यते । सिद्धात्र वृद्धिस्तद्धितेष्वचामादेः [७. २. ११७] इत्येव तत्रानेनान्तरतमा वृद्धिर्निवर्त्यते ॥ परिहारान्तरमेवेदं मत्वा पठितं कथं चेदं परिहारान्तरं स्यात् । यदि नाद्यज्विशेषणं देविकादयः । अवश्यं चैतदेवं विज्ञेयमाद्यज्विशेषणं देविकादय इति । यदि नाद्यज्विशेषणं देविकादयः स्युरिहापि प्राप्नोति सुदेविकायां

---

(सू० १, वा. १) या देविका वगैरे शब्दांना वृद्धि सांगणाऱ्या प्रस्तुत सूत्रांत तदादि हा शब्द घालावा. थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे 'देविका वगैरे शब्द व देविका वगैरेंनीं आरंभ होणारे शब्द या सर्वांना' असें बोलावें, म्हणजे दाविकाकूलाः शालयः, शांशपास्थला देवाः, यांतील दाविकाकूल व शांशपास्थल हीं रूपें साधतील.

पण हीं रूपें एरव्हींच कां साधूं शकत नाहींत ?

(वा. २) इतर ठिकाणीं उच्चारलेल्या शब्दाचें किंवा तो शेवटीं असलेल्या सामासिक शब्दाचें ग्रहण होत असतें. प्रकृत स्थलीं देविकाकूल वगैरे शब्द हे उच्चारलेले नव्हेत आणि ते शेवटीं असलेले असेही नव्हेत.

(वा. ३) देविका वगैरे शब्द हे आदिस्वराचे विशेषण होतात. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'देविका वगैरे शब्द शेवटीं ज्यांच्या आहेत अशा अंगांच्या पहिल्या स्वराला 'आ' आदेश होतो' असा अर्थ करावयाचा नाहीं.

तर मग कसा करावयाचा ?

ञ्, ण् किंवा क् इत् असलेला प्रत्यय पुढें असतांना अंगांतील प्रथम स्वराला आकारादेश होतो. तो प्रथम स्वर देविका वगैरे शब्दांतील आरंभींचा स्वर असला पाहिजे.

(वा. ४) अथवा प्रस्तुत सूत्राचें काम 'देविका वगैरे शब्दांच्या पहिल्या स्वराला विसदृश अशी नवीन वृद्धि सांगितली आहे' असें समजूं नये. तर फक्त अत्यन्तसदृश अशी वृद्धि म्हणजे 'ऐ' ही निवृत्त केली जाते. तेव्हां देविका वगैरे शब्दांना 'तद्धितेष्वचामादेः' (७।२।११७) या सूत्रानेंच आ ही वृद्धि केली जाते.

पण प्रस्तुत वार्तिक 'आन्तरतम्यनिवर्तकत्वाद्वा' हें 'आद्यज्विशेषणत्वात्सिद्धम्' या वार्तिकानें अडचण दूर केली असतांनाही अडचण दूर करण्याचें आणखी एक साधन म्हणून सांगितलें आहे ना ? पण 'आद्यज्विशेषणत्वात्' या पूर्ववार्तिकाप्रमाणें जर देविका वगैरे शब्द हे आदिअचाचे विशेषण केले नाहींत तर 'आन्तरतम्य०' या वार्तिकानें ती अडचण दूर होणार नाहीं. आणि पूर्ववार्तिकामध्यें सांगितल्याप्रमाणें देविका वगैरे शब्द हे आदि अचाचे विशेषण होतात म्हणून अवश्य समजलेंच पाहिजे. कारण कीं जर देविका वगैरे शब्द हे आदिअचाचें विशेषण न होतां अंगाचें विशेषण होतील तर 'सुदेविकेमध्यें

---

१. (सू. १) ञकार, णकार किंवा ककार हा इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना देविका, शिंशपा, दित्यवाह्, दीर्घसत्र आणि श्रेयस् या शब्दांतील प्रारंभींच्या स्वराला आकार आदेश होतो.

भवः सौदेविक इति । अथात्राप्याद्यज्विशेषणत्वादित्येव सिद्धं परिहारान्तरं न भवति ॥ न ब्रूमो यत्र क्रियमाणे दोषस्तत्र कर्तव्यमिति । किं तर्हि । यत्र क्रियमाणे न दोषस्तत्र कर्तव्यम् । क्व च क्रियमाणे न दोषः । संज्ञाविधौ । वृद्धिरादैज्देविकादीनामाकार इति । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं देविकादिषु तदादिग्रहणमन्यत्र तद्ग्रहणात्तदन्तग्रहणाद्वेति । परिहृतमेतदाद्यज्विशेषणत्वात्सिद्धमिति ॥

**न्यग्रोधे च केवलग्रहणात् ॥ ५ ॥**

न्यग्रोधे च केवलग्रहणान्मन्यामह आद्यज्विशेषणं देविकादय इति । तस्य हि केवलग्रहणस्यैतत्प्रयोजनमिह मा भूत् न्याग्रोधमूलाः शालय इति । यदि चाद्यज्विशेषणं देविकादयस्ततः केवलग्रहणमर्थवद्भवति ॥ तदेतत्कथं कृत्वा ज्ञापकं भवति । यदि न्यग्रोधशब्दोऽव्युत्पन्नं प्रातिपदिकं भवति । अथ हि न्यग्रोहतीति न्यग्रोधस्ततो नियमार्थं पदान्त इति कृत्वा न ज्ञापकं भवति ॥

---

झालेला' या अर्थाचा सौदेविक शब्द साधण्याचे वेळीं प्रस्तुत सूत्रानें 'दे' मधील एकाराला आकार आदेश होऊन सौदेविक रूप साधण्यास पंचाईत पडेल. सौदेविक वगैरे शब्द साधतांना आलेली अडचण देविका वगैरे शब्द हे आदि अचाचे विशेषण करूनच जर दूर करावी लागते तर 'आन्तरतम्य०' या वार्तिकामध्यें सांगितलेला हा अडचण दूर करण्याचा स्वतंत्र प्रकार म्हणून होऊं शकणार नाहीं.

आमचें म्हणणें तुम्ही बरोबर समजलां नाहीं. आम्ही असें म्हणत नाहीं कीं प्रस्तुत सूत्र ज्या ठिकाणीं दोष येईल अशा ठिकाणीं ( म्हणजे सातव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाच्या आरंभीं) करावें म्हणून.

मग तुम्ही काय म्हणतां ?

ज्या ठिकाणीं हें सूत्र सांगितलें असतां दोष येणार नाहींत अशा ठिकाणीं तें करावें.

कोठें सांगितलें असतां दोष येणार नाहींत ?

संज्ञाप्रकरणामध्यें 'वृद्धिरादैच्' (१।१।१) या सूत्रानंतर. म्हणजे वृद्धिशब्दानें आकार, ऐकार व औकार हे घ्यावे; पण देविका वगैरे शब्दांच्या बाबतींत वृद्धि सांगितल्यास वृद्धि शब्दानें 'आ' स्वर घ्यावा.

असें केलें असतां चालेल खरें, पण सूत्र निराळ्या ठिकाणीं करावें लागतें.

बरें तर मग जेथें हें सूत्र सांगितलें आहे तेथेंच तें राहूं दे.

पण मग 'देविका वगैरे शब्दांचे बाबतींत तदादि शब्द घालावा लागेल' कारण इतर ठिकाणीं उच्चारलेल्या शब्दाचे किंवा तो शेवटीं असलेल्या सामासिक शब्दाचें ग्रहण होत असतें, असें जें म्हटलें आहे त्याची वाट काय ?

त्या दोषाचें निराकरण 'देविका वगैरे शब्द हे आदि अचाचें विशेषण होतात' असें सांगून केलेंच आहे.

(वा. ५ )'न्यग्रोधस्य च केवलस्य' (७।३।५) या सूत्रांत केवल शब्द घातला असल्यामुळेंही असें आम्ही समजतों की देविका वगैरे शब्द हे आदि अचाचे विशेषण होतात. कारण 'न्यग्रोधस्य०' या सूत्रांत केवल पद घालण्याचा हेतु हा आहे कीं 'न्याग्रोधमूलाः शालयः' या न्याग्रोधमूल शब्दांतील न्यग्रोध शब्दामध्यें ऐकार होऊन नैयग्रोध असें होऊं नये. जर देविका वगैरे शब्द हे आदि अचाचे विशेषण म्हणून घेतले तरच न्यग्रोधमूल शब्दामध्यें दोष येत असल्यामुळें त्याकरितां केवल शब्द सूत्रांत घालण्याचा उपयोग होईल.

पण हें ज्ञापक कसें समजलें जातें ?

जर न्यग्रोध हा शब्द व्युत्पत्तिरहित घेतला तर हें ज्ञापक बरोबर जमतें. पण जर 'न्यक् रोहति' म्हणजे खालीं वाढत जाणारा अशा

---

२. न्यक् यामध्यें नि आणि अन्च्, अशीं पदें आहेत. तेव्हां नि यांतील इकाराला यकार ( ६।१।७७ ) केला म्हणजे तो पदाच्या शेवटीं येतो. तेव्हां 'न य्वाभ्याम्०' ( ७।३।३ ) यानेंच ऐच् आगम सिद्ध होतो म्हणून

वहीनरस्येद्वचनम् ॥ ६ ॥

वहीनरस्येत्त्वं वक्तव्यम्। वहीनरस्यापत्यं वैहीनरिः ॥

कुणरवाडवस्त्वाह। नैष वहीनरः। कस्तर्हि। विहीनर एषः। विहीनो नरः कामभोगाभ्यां विहीनरः। विहीनरस्यापत्यं वैहीनरिः ॥

[ केकयमित्रयुप्रलयानां यादेरियः ॥ ७।३।२ ॥ ]

न य्वाभ्यां पदान्ताभ्यां पूर्वौ तु ताभ्यामैच् ॥ ७।३।३ ॥

य्वाभ्यां परस्यावृद्धित्वम्।

य्वाभ्यां परस्यावृद्धित्वं सिद्धम्। कुतः।

अपवादौ वृद्धेर्हि तौ।

अपवादौ हि वृद्धेस्तावैचावुच्येते ॥

नित्यावैचौ तयोर्वृद्धिः

अथवा नित्यावैचौ। कृतायामपि वृद्धौ प्राप्नुतोऽकृतायामपि। नित्यत्वादैचोः कृतयोर्यद्यपि वृद्धिस्तयोरेव।

किमर्थं नेति शिष्यते ॥ १ ॥

अथ किमर्थं प्रतिषेध उच्यते।

ऐचोर्विषयार्थं प्रतिषेधसंनियुक्तवचनम् १

ऐचोर्विषयार्थं प्रतिषेधसंनियोगेनैचावुच्येते।

यत्र य्वाभ्यां परावृद्धिस्तत्राध्यश्वेर्यथा न तौ।

यत्र य्वाभ्यां परस्यावृद्धित्वमुच्यते तत्रैचौ यथा स्याताम्। इह मा भूताम्। आध्यश्विः

---

व्युत्पत्तीचा न्यग्रोध शब्द घेतला तर यकार पदान्तीं असल्यामुळें ऐच् आगम पूर्वसूत्रानें ( ७।३।३ ) सिद्ध होतो. तेव्हां हें सूत्र नियमार्थ होत असल्यामुळें केवलस्य हें ज्ञापक म्हणतां येत नाहीं.

(वा. ६) वहीनर शब्दाच्या स्वरांतील पहिल्या स्वराला 'इ'कार आदेश होतो असें म्हणावें. म्हणजे 'वहीनराचा मुलगा'याअर्थी'वैहीनरि'शब्द साधेल.

कुणरवाडव आचार्यांचें म्हणणें आहे की 'वैहीनरि' यांत मूळ शब्द 'वहीनर'असा नाहीं. विहीनर हाच मूळ शब्द कामभोगांनीं रहित[२] माणूस या अर्थाचा आहे, व त्याचा मुलगा या अर्थी 'वैहिनरि' शब्द कांहीं खटपट केल्याशिवाय सहजच साधतो.

(सू.३)यकाराच्या किंवा वकाराच्या पुढें असलेल्या स्वराला वृद्धि होत नाहीं ही गोष्ट सिद्धच आहे.

कारण ऐ आणि औ हे आगम वृद्धीचे अपवाद आहेत.

अथवा ऐ आणि औ हे आगम नित्य आहेत, कारण वृद्धि केल्यावरही ते होऊं शकतात व वृद्धि करण्याचे पूर्वींही ते होऊ शकतात. तेव्हा ऐ आणि औ हे आगम नित्यत्वास्तव केल्यानंतर जर वृद्धि व्हावयाची तर त्यांना तीच वृद्धि होईल.

तेव्हा प्रस्तुत सूत्रानें 'वृद्धि होत नाहीं' असा निषेध कां सागितला ?

( वा. १ ) ऐ आणि औ हे आगम कोठें होतात तीं स्थलें नक्की करण्याकरितां वृद्धिनिषेधाचें व ऐ आणि औ या आगमाचें एकमेकांबरोबर विधान केलें आहे.

ज्या ठिकाणीं यकार किंवा वकार यांच्या पुढील अचाला वृद्धीचा निषेध केला जाईल तेथेंच हे आगम व्हावेत, इतर ठिकाणीं, उदा-

---

'न्यग्रोध शब्दाला जर ऐच् आगम होईल तर केवलालाच होईल' अशा नियमाकरितां हें सूत्र करावें लागतें.

२. विहीन म्हणजे कामभोगांनीं रहित विरक्त असा नर. येथें विहीन या पूर्वपदांतील न या अक्षराचा लोप झाला आहे ( ६।३।१०९ ).

१. ( सू. २ ) अकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना केकय, मित्रयु आणि प्रलय या शब्दांतील यकारादि भागाला इय असा आदेश होतो; उदा० कैकेयः ( ४।१।१६८), मैत्रेयिका ( ५।१।१३४ ), प्रालेयम् ( ४।३।७४ ).

१. ( सू. ३ ) पदाच्या शेवटीं असलेला जो यकार किंवा वकार त्याच्या पुढील अचाला वृद्धि (७।२।११७) होत नाहीं, आणि त्या यकाराच्या पूर्वी ऐ आणि वकाराच्या पूर्वी औ असे आगम होतात.

दाध्यश्विः माध्वश्विरिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् ।

**अचामादेर्य्वाभ्यां हि तौ**

अचामादिनात्र य्वौ विशेषयिष्यामः । अचामादेर्यौ य्वाविति ॥

**कथं द्व्याशीतिके न तौ ॥ २ ॥**

द्व्याशीतिक इत्यत्र कस्मान्न तौ भवतः । यत्र वृद्धिरचामादेस्तत्रैचावत्र घोर्हि सा ।

यत्राचामादेरित्येवं वृद्धिस्तत्रैचावुच्येते । अत्र घोरित्येवं वृद्धिः । किमिदं घोरिति । उत्तरपदस्येति ॥ उत्तरपदाधिकारेऽप्यवश्यमैजागमोऽनुवर्त्यः पूर्वत्र्यलिन्दे भवः पूर्वत्रैयलिन्द इत्येवमर्थम् । नैष दोषः । उत्तरपदेनात्राचामादिं विशेषयिष्यामोऽचामादिना य्वौ । उत्तरपदस्याचामादेर्यौ य्वाविति ॥

**अथ कस्मात्पदान्ताभ्याम्**

अथ किमर्थं पदान्ताभ्यामित्युच्यते ।

**यथेणो न भवेद्यणः ॥ ३ ॥**

इणो यणादेशे मा भूत् । यतश्छात्त्रा याता इति ॥

---

हरणार्थ, 'आध्यश्विः'[२], 'दाध्यश्विः', 'माध्वश्विः', येथें हे आगम होऊं नयेत.

हा उपयोग सांगतां येणार नाहीं.

कारण अचांमध्यें जो आदि अच् त्याचा संबंध यकारवकारांकडे केला म्हणजे हे आगम वाटेल तेथें असलेल्या पदान्तींच्या यकाराच्या व वकाराच्या पूर्वी होणार नाहींत, तर अचांमध्यें जो आदि अच् त्याच्या स्थानीं झालेले जे यकार आणि वकार त्याच्याच पूर्वी होतील.

तरी पण 'द्व्याशीतिकः'[३] या ठिकाणीं हे आगम कां होत नाहींत ?

याचें कारण असें आहे कीं ज्या ठिकाणीं 'अचामादेः' असें निमित्त असलेली वृद्धि (७।२।११७) प्राप्त होते त्या ठिकाणीं वृद्धीचा निषेध करून त्याच्या बरोबर ऐ व औ हे आगम होतात असें प्रस्तुत सूत्रांत सांगितलें आहे. द्व्याशीतिकः या टिकाणीं तर उलट घोः म्ह० घूला वृद्धि होत आहे.

घूला वृद्धि म्हणजे काय ?

घु म्हणजे उत्तरपद होय[४].

पण उत्तरपदस्य या अधिकारांतील वृद्धि सांगणाऱ्या सूत्रामध्येंही ऐच् पदाची अनुवृत्ति प्रस्तुत सूत्रांतून नेलीच पाहिजे; उदा० पूर्वत्र्यलिन्दामध्यें झालेला या अर्थाचा 'पूर्वत्रैयलिन्दः' हा शब्द साधण्याकरितां 'प्राचां ग्रामनगराणाम्' (७।३।१४)[५] या सूत्रांत ऐच् आगमाची अनुवृत्ति न्यावयास पाहिजे.

हा दोष येत नाहीं. कारण उत्तरपदस्य याचा संबंध अचांमध्यें आदि याच्याकडे करूं; आणि त्याचा य्वौ याच्याकडे संबंध करूं; तेव्हां 'उत्तरपदांतील पहिल्या स्वराचे जागीं झालेला जो यकार अथवा वकार' असा त्या सूत्राचा अर्थ झाला म्हणजे सर्व साधेल.

बरें, प्रस्तुत सूत्रात 'पदान्ताभ्याम्' हें पद कशाकरितां घातलें आहे ?

इण् धातूचे ठिकाणीं यण् आदेश (६।४।८१) होऊन झालेल्या यकाराच्या पूर्वी ऐच् आगम होऊं नये म्हणून; उदाहरणार्थ, यत् म्हणजे

---

२. अधि+अश्व या स्थितींत इकाराला यण् झाला आहे. अध्यश्व शब्दाहून अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय (४।१।९५) झाला आहे. येथें पदाच्या शेवटीं यकार आहे. पण त्याच्या पुढील अकार हा अध्यश्व शब्दांतील पहिला अच् नसल्यामुळें त्याला वृद्धीची प्राप्ति येत नाहीं, तेव्हां अर्थातच तेथें निषेध संभवत नाहीं.

३. द्वि आणि अशीति या शब्दांचा तद्धितार्थी द्विगु समास (२।१।५१) करून पुढें त्याला 'भूत' या अर्थी ठञ् प्रत्यय (५।१।८०) झाला आहे. अशीति या उत्तरपदांतील आदि अच् जो अकार त्याला 'संख्यायाः०' (७।३।१५) यानें वृद्धि झाली आहे.

४. उत्तरपदांतील आदि अचाला येथें 'संख्यायाः०' या सूत्रानें वृद्धि होत आहे.

५. तेव्हां अर्थातच 'संख्यायाः०' या सूत्रामध्येंही ऐ व औ या आगमांची अनुवृत्ति होणारच असल्यामुळें द्व्याशीतिकः येथें ऐ आगम होईल, असा दोष कायम

इह वैयाकरणः सौवश्व इति शाकलं प्राप्नोति य्वोश्च स्थानिवद्भावादायावौ प्राप्नुतः ।

**शाकलायावादेशेषु चोक्तम् ॥ २ ॥**

किमुक्तम् । शाकले तावदुक्तं सिन्नित्यसमासयोः शाकलप्रतिषेध इति । आयावोः किमुक्तम् । अचः पूर्वविज्ञानादैचोः सिद्धमिति ॥

**य्वाभ्यां परस्यावृद्धित्वमपवादौ वृद्धेर्हि तौ ।**
**नित्यावैचौ तयोर्वृद्धिः किमर्थं नेति शिष्यते ॥ १ ॥**
**यत्र य्वाभ्यां परावृद्धिस्तत्राध्यश्वेर्यथा न तौ ।**
**अचामादेर्य्वाभ्यां हि तौ कथं द्व्याशीतिके न तौ ॥ २ ॥**
**यत्र वृद्धिरचामादेस्तत्रैचावत्र घोर्हि सा ।**
**अथ कस्मात्पदान्ताभ्यां यथेणो न भवेद्यणः ॥ ३ ॥**

## द्वारादीनां च ॥ ७।३।४ ॥[1]

अथ परस्यावृद्धिरित्यनुवर्तत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तते शौवं मांसम् टिलोपे कृत ऐजागमो न प्राप्नोति । अथ निवृत्तं स्वाध्यायशब्दो द्वारादिषु पठ्यते तत्र यावन्तो यणः सर्वेभ्यः पूर्व ऐजागमा प्राप्नोति । यथेच्छसि तथास्तु ॥ अस्तु तावदनुवर्तते । कथं शौवं मांसम् । आनुपूर्व्यसिद्धमेतत् । नात्राकृत ऐजागमे टिलोपः

---

जाणारा मनुष्य; या यत् शब्दापासून 'त्याचा शिष्य' या अर्थी अण् प्रत्यय जोडून शब्द साधावयाचा असल्यास 'यात' असा शब्द व्हावा, 'ऐयत' असा होऊं नये.

आतां वि+आकरण, सु+अश्व, अशी व्युत्पत्ति असलेल्या व्याकरण व स्वश्व या शब्दांपासून साधलेल्या वैयाकरणः, सौवश्वः, वगैरे शब्दांमध्यें इकार व उकार याना 'इकोऽसवर्णे०' ( ६।१। १२७) या सूत्रानें प्रकृतिवद्भाव प्राप्त होतो; तसेंच, यकार व वकार याना स्थानिवद्भावानें (१।१।५७) इ व उ समजून ऐ व औ यांना अनुक्रमें आय् व आव् हे आदेश प्राप्त होतात. त्याचें निराकरण कसें करावयाचें ?

( वा. २ ) शाकल म्हणजे शाकल्य ऋषींच्या मतानें इ, उ, ऋ, ऌ, या स्वराचा प्रकृतिभाव आणि आय् व आव् या आदेशांसंबंधानें मागेंच सांगितलें आहे.

काय सागितलें आहे ?

प्रकृतिभावासंबंधानें तर 'सिन्नित्यसमासयोः शाकलप्रतिषेधः' ( ६।१।१२७ वा. १ ) असें वार्तिकच आहे.

बरें आय् आणि आव् यांविषयीं काय सांगितलें आहे ?

'अचः पूर्वत्वविज्ञानादैचोः सिद्धम्' (१।१।५७ वा. १ ) असें त्याविषयींही वार्तिक आहे.

( सू. ४ ) 'पुढील वर्णाला वृद्धि होत नाहीं' ह्या पदाचा येथें संबंध होतो किंवा नाहीं ?

यात काय बरें फरक आहे ?

फरक असा आहे कीं जर या पदांचा संबंध होत असेल तर शौव मासम्, येथें श्वन् शब्दाहून अञ् प्रत्यय ( ४।३।१५४ ) करून 'टि'चा लोप ( ६।४।१४४ ) केल्यानंतर वकाराच्या पूर्वी औ आगम होणार नाहीं. आतां त्या पदाचा येथें संबंध होत नाहीं असें म्हटलें तर 'स्वाध्याय' हा शब्द द्वारादि गणात घातला असल्यामुळें त्या शब्दामध्यें जितके म्हणून यण् आहेत तितक्या सर्वांच्या पूर्वी ऐच् आगम होऊं लागेल.

कोणताही पक्ष घेतला तरी हरकत नाहीं. इच्छेस येईल तो घ्यावा. त्या पदाचा संबंध होतो असें कां असे ना !

तर मग शौवं मांसम् येथील शौव शब्द कसा साधेल ?

---

राहतो.

१. ( सू. ४ ) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना द्वार वगैरे शब्दांतील यकार किंवा वकार यांच्या पुढील अचाला वृद्धि

प्राप्नोति । किं कारणम् । प्रकृत्यैकाच् [ ६. ४. १६३ ] इति प्रकृतिभावेन भवितव्यम् । तदेतदानुपूर्व्या सिद्धं भवति ॥ अथवा पुनरस्तु निवृत्तम् । ननु चोक्तं स्वाध्यायशब्दो द्वारादिषु पठ्यते तत्र यावन्तो यणः सर्वेभ्यः पूर्व ऐजागमः प्राप्नोतीति । कः पुनरर्हति स्वाध्यायशब्दं द्वारादिषु पठितुम् । एवं किल पठ्येत स्वमध्ययनं स्वाध्याय इति । तच्च न । सुष्ठु वाध्ययनं स्वाध्यायः शोभनं वाध्ययनं स्वाध्यायः । अथापि स्वमध्ययनं स्वाध्याय एवमपि न दोषः । अचामादेरिति वर्तते ॥

[ न्यग्रोधस्य च केवलस्य ॥ ७।३।५ ॥
न कर्मव्यतिहारे ॥ ७।३।६ ॥
स्वागतादीनां च ॥ ७।३।७ ॥ ]
श्वादेरिञि ॥ ७।३।८ ॥

अयं श्वन्शब्दो द्वारादिषु पठ्यते तत्र कः प्रसङ्गो यत्तदादेः स्यात् । नैव प्राप्नोति नार्थः प्रतिषेधेन । तदादिविधिना प्राप्नोति । नैव

---

येथें जशीं कार्यें प्राप्त होतात त्या क्रमानें तीं केलीं असतां हें उदाहरण सिद्ध होतें. कारण येथें औ हा आगम झाल्याशिवाय टिलोपाची प्राप्तीच येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं त्या वेळीं टिलोपाचा बाधक प्रकृत्यैकाच् ( ६।४।१६३ ) यानें प्रकृतिभाव प्राप्त होत आहे. तेव्हां क्रमानें कार्यें केलीं असतां हें उदाहरण सिद्ध होत आहे.

अथवा त्या पदांचा संबंध येथें नाहीं असें कां असे ना ?

पण संबंध नसला तर द्वारादि गणांतील स्वाध्याय शब्दामध्यें जितके म्हणून यण् आहेत तितक्या सर्वांच्या पूर्वी ऐच् आगम होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना ?

द्वारादि गणामध्यें स्वाध्याय शब्दाचा पाठ असेल तर हा दोष येणार, पण द्वारादि गणामध्यें स्वाध्याय शब्दाचा पाठ करतो कोण ? स्वतःचें जें अध्ययन तो स्वाध्याय असा विग्रह असेल तर तेथें पाठ करावा लागणार आहे; पण तसा विग्रहच केला नाहीं म्हणजे काम भागेल. सुष्ठु जें अध्ययन तो स्वाध्याय किंवा शोभन जें अध्ययन तो स्वाध्याय असा सु या शब्दानें विग्रह केला म्हणजे पूर्वसूत्रानेंच औ आगम सिद्ध होत आहे. आतां जरी स्वतःचें जें अध्ययन तो स्वाध्याय असा विग्रह केला तरीहि दोष येत नाहीं; कारण द्वारादि गणामध्यें स्व शब्दाचा पाठ निराळा केला आहे त्यानेंच सिद्ध होईल. आतां 'अचांमध्यें आदि अच्' ह्या पदांची अनुवृत्ति मात्र येथें आहेच.

( सू. ८ ) द्वारादि गणामध्यें श्वन् शब्दाचा केवलाचाच पाठ आहे. तेव्हां श्वन् शब्द आरंभीं असलेल्या शब्दासंबंधानें 'द्वारादीनां च' या सूत्राची प्राप्ति तरी येणार कशी ? तेव्हां प्राप्तीच

---

होत नाहीं, आणि त्या यकार व वकार यांच्या पूर्वी क्रमानें ऐ व औ हे आगम होतात.

२. स्व हा शब्द घेऊन विग्रह केला तर स्व शब्दांतील वकार पदान्तीं नसल्यामुळें पूर्वसूत्रानें ऐच् आगम सिद्ध होत नाहीं.

३. सु, आ, अध्याय अशीं पदें आहेत.

४. त्यामुळें त्या आदि अचाच्या पूर्वीचे यकार व वकार घ्यावयाचे असल्यामुळें स्वाध्याय शब्दांतील पुढील यकारांच्या मागें ऐ आगम होत नाहीं.

१. ( सू. ५ ) अकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना केवळ न्यग्रोध शब्दांमधील यकाराच्या पुढील अचाला वृद्धि होत नाहीं, आणि त्या यकाराचे पूर्वी ऐ आगम होतो.

१. ( सू. ६ ) ज्या शब्दांमध्यें क्रियेचा विनिमय गम्यमान होत असेल त्या शब्दांमध्यें पदान्तीं असलेल्या यकार व वकार यांच्या पुढील अचाला वृद्धीचा निषेध आणि पूर्वी ऐच् आगम हे दोन्ही होत नाहींत.

१. ( सू. ७ ) स्वागत वगैरे शब्दांमध्यें वकार व वकार यांच्या पुढील अचाला वृद्धीचा निषेध आणि पूर्वी ऐच् आगम हे दोन्ही होत नाहींत.

१. ( सू. ८ ) श्वन् शब्द आरंभीं असलेल्या शब्दांतील वकाराच्या पुढील अचाला वृद्धीचा निषेध आणि पूर्वी औ आगम हे दोन्ही होत नाहींत, इञ् प्रत्यय पुढें असतांना.

तदादिविधिरस्ति ॥ अत उत्तरं पठति ।

**प्रतिषेधे श्वादिग्रहणं ज्ञापकमन्यत्र श्वन्ग्रहणे तदादिग्रहणस्य शौवहानाद्यर्थम् ॥ १ ॥**

प्रतिषेधे श्वादिग्रहणं क्रियते ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र श्वन्ग्रहणे तदादिविधिर्भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । शौवहानाद्यर्थम् । शौवहानं नाम नगरम् । शौवादंष्ट्रो मणिरिति ॥

**इकारादिग्रहणं च श्वागणिकाद्यर्थम् ॥२॥**

इकारादिग्रहणं च कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । श्वागणिकाद्यर्थम् । श्वगणेन चरति श्वागणिकः ।

**तदन्तस्य चान्यत्र प्रतिषेधः ॥ ३ ॥**

तदन्तस्य चान्यत्र प्रतिषेधो वक्तव्यः । श्वाभस्त्रेः स्वं श्वाभस्त्रम् ॥

**[ पदान्तस्यान्यतरस्याम् ॥७।३।९॥ ]**

**उत्तरपदस्य ॥ ७।३।१० ॥**

---

येत नाहीं म्हणून हा निषेध नको.

तर मग तदादिविधीच्या जोरावर श्वन् शब्द आरंभीं असलेल्या अशा श्वभस्त्र वगैरे शब्दांना 'द्वारादीनां च' या सूत्राची प्राप्ति येत आहे.

पण तेथें तदादिविधि घेण्याविषयीं कांहींच प्रमाण दिसत नाहीं.

यानंतर वार्तिककार म्हणतात:-

(वा. १) ह्या निषेधसूत्रामध्यें 'श्वादेः' असें जें म्हटले आहे तें ज्ञापकाकरितां म्हटले आहे.

पण, त्या ज्ञापकानें कोणती गोष्ट कळवावयाची आहे ?

'श्वादेः' यावरून आचार्य असें ज्ञापन करीत आहेत कीं इतर ठिकाणीं श्वन् शब्द उच्चारला असता श्वन् शब्द आरंभीं असलेल्या अशा शब्दाचे तेथें ग्रहण होतें.

या ज्ञापकाचा काय उपयोग ?

शौवहानें[2] वगैरे शब्द साधणें हा उपयोग आहे. शौवहान नांवाचें एक नगर आहे; शौवादंष्ट्र हा एक मणि आहे.

(वा. २) ह्या सूत्रामध्यें इञ् प्रत्यय पुढें असतांना असे जे म्हटलें आहे त्याच्या ऐवजीं इकारादि कोणताही प्रत्यय पुढें असतांना असें म्हणावें.

त्याचा काय उपयोग ?

श्वागणिक वगैरे शब्द साधणें हा ह्याचा उपयोग आहे. श्वगण शब्दाहून 'त्यानें संचार करतो' या अर्थी ठक् प्रत्यय (४।४।८) होऊन श्वागणिक असा शब्द सिद्ध होतो.

(वा. ३) इञ् प्रत्यय शेवटीं असलेला जो शब्द त्याच्या पुढे पुनः दुसरा तद्धित प्रत्यय केला असता तेथेंही हें सूत्र लागूं पडतें असें म्हणावें; उदा० श्वाभस्त्रेः स्वं श्वाभस्त्रम् .

---

२. श्वन् शब्दाचा हान शब्दाबरोबर षष्ठीतत्पुरुष होऊन नकाराचा लोप ( ८।२।७ ) होऊन श्वहान शब्द सिद्ध होतो; नंतर तें श्वहान ज्यामध्यें आहे असें नगर या अर्थी अण् प्रत्यय ( ४।२।६७ ) होतो. द्वारादि गणामध्यें जरी नुसत्या श्वन् शब्दाचाच पाठ आहे तरी या ज्ञापकामुळें श्वहान, श्वादंष्ट्र, अशा शब्दांनाही 'द्वारादीनां च' हें सूत्र लागूं पडून हीं रूपें [illegible] होतात. तसेंच श्वन् शब्दाचा दंष्ट्रा शब्दाबरोबर षष्ठीतत्पुरुष व 'शुनो दन्त०' ( ६।३।१३६, वा. ) यानें दीर्घ होऊन श्वादंष्ट्रा असा शब्द सिद्ध होतो. त्याच्या पुढें 'तेथें असलेला' या अर्थी अण् प्रत्यय ( ४।३।५३ ) झाला आहे.

३. येथें श्वाभस्त्रि या इञ्प्रत्ययान्त शब्दाहून 'तस्येदम्' ( ४।३।१२० ) यानें अण् प्रत्यय झाला आहे.

१. ( सू. ९ ) श्वन् शब्द आरंभीं असलेला आणि पद शब्द शेवटीं असलेला असा जो शब्द त्यांतील वकाराच्या पुढील अचाला वृद्धीचा निषेध आणि पूर्वी औ आगम हे दोन्ही विकल्पानें होतात, ञकार, णकार किंवा ककार हे इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना.

१. ( सू. १० ) यापुढें 'यथातथा०' ( ७।३।३१ ) या सूत्रापर्यंत प्रत्येक सूत्रामध्यें 'उत्तरपदस्य' या पदाचा संबंध होतो.

किमर्थमिदमुच्यते । अवयवादृतोः [ ७. ३. ११ ] इति वक्ष्यति तदुत्तरपदस्य यथा स्यादचामादेर्मा भूत् । नैतदस्ति प्रयोजनम् । अवयवादिति पञ्चमी तत्रान्तरेणाप्युत्तरपदग्रहणमुत्तरपदस्यैव भविष्यति । उत्तरार्थं तर्हि सुसर्वार्धाज्जनपदस्य [ १२ ] इति । सुसर्वार्धादिति पञ्चमी । दिशोऽमद्राणाम् [१३]। दिश इति पञ्चमी । प्राचां ग्रामनगराणाम् [ १४ ] । दिश इत्येव । संख्यायाः संवत्सरसंख्यस्य च [१५] । संख्याया इति पञ्चमी । वर्षस्याभविष्यति [१६] । संख्याया इत्येव । परिमाणान्तस्यासंज्ञाशाणयोः [१७ ] इति । संख्याया इत्येव ॥ इदं तर्हि प्रयोजनं जे प्रोष्ठपदानाम् [ १८ ] उत्तरपदस्य यथा स्यात्पूर्वपदस्य मा भूत् । प्रोष्ठपदासु जातः प्रोष्ठपादो ब्राह्मणः ।

**तद्धितेष्वचामादिवृद्धेरुत्तरपदवृद्धिर्विप्रतिषेधेन द्व्याशीतिकाद्यर्थम् ॥१॥**

तद्धितेष्वचामादिवृद्धेरुत्तरपदवृद्धिर्भवति विप्रतिषेधेन । किं प्रयोजनम् । द्व्याशीतिकाद्यर्थम् । अचामादिवृद्धेरवकाशः । ऐतिकायनः औपगवः । उत्तरपदवृद्धेरवकाशः । द्विषाष्टिकः त्रिषाष्टिकः । इहोभयं प्राप्नोति । द्व्याशीतिकः त्र्याशीतिकः। उत्तरपदवृद्धिर्भवति

---

(सू. १०) हा अधिकार कशाकरितां केला आहे ?

अवयवादृतोः (७।३।११) असें पुढें सूत्र आहे, त्यानें सांगितलेली वृद्धि उत्तरपदांतील आदि-अचाला झाली पाहिजे, पूर्वपदांतील आदि-अचाला होऊं नये, याकरितां केला आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण त्या सूत्रांत 'अवयवात्' असें पञ्चम्यन्त पद आहे. तेव्हां अवयववाचक शब्दाहून पुढच्या शब्दाला सांगितलेलें कार्य आपोआपच उत्तरपदाला होईल. त्यामुळें तेथें उत्तरपदस्य हा अधिकार नसला तरी चालेल.

तर मग त्याच्या पुढें 'सुसर्वार्धाजनपदस्य' (७।३।१२) येथें या अधिकाराचा उपयोग होईल.

तेथें देखील 'सुसर्वार्धात्' हें पंचम्यन्त पद असल्यामुळें काम भागेल. 'दिशोऽमद्राणाम्' (७।३।१३) येथेंही 'दिशः' हें पद पंचम्यन्त आहे. 'प्राचां ग्रामनगराणाम्' (७।३।१४) येथें 'दिशः' या पंचम्यन्त पदाची अनुवृत्ति आहेच. 'संख्यायाः संवत्सरसंख्यस्य च' (७।३।१५) या सूत्रामध्यें संख्यायाः हें पंचम्यन्त पद आहेच. 'वर्षस्याभविष्यति' (७।३।१६) येथें 'संख्यायाः' या पंचम्यन्त पदाची अनुवृत्ति आहे. 'परिमाणान्तस्यासंज्ञाशाणयोः' (७।३।१७) येथेंही 'संख्यायाः' या पचम्यन्त पदाची अनुवृत्ति आहेच.

तर मग या अधिकाराचा उपयोग असा समजावा कीं त्याच्या पुढील 'जे प्रोष्ठपदानाम्' (७।३।१८) या सूत्रानें सांगितलेली वृद्धि उत्तरपदांतील आदि अचाला झाली पाहिजे, पूर्वपदांतील आदि अचाला होऊं नये; उदा० प्रोष्ठपदासु जातो माणवकः प्रोष्ठपादः[२].

(वा. १) 'तद्धितेष्वचामादेः' (७।२।११) यानें सांगितलेल्या वृद्धीचा उत्तरपदाला सांगितलेली वृद्धि विप्रतिषेधामुळें परत्वास्तव बाध करते.

याचा काय उपयोग ?

द्व्याशीतिक वगैरे उदाहरणें साधणें हा याचा उपयोग आहे. 'तद्धितेष्वचामादेः' याला ऐतिकायनः, औपगवः, येथें अवकाश आहे; तसाच उत्तरपदाला सांगितलेल्या वृद्धीला द्विषाष्टिकः त्रिषाष्टिकः येथें अवकाश आहे; आणि द्व्याशीतिकः, त्र्याशीतिकः येथें त्या दोन्ही वृद्धी एकाच वर्णाला प्राप्त होत आहेत. तेव्हां त्यांमध्यें उत्तरपदाला सांगितलेली वृद्धि हीच परत्वास्तव होते.

पण येथें एकाच आकाराला दोन्ही वृद्धी आल्या आहेत. मग त्यांमध्यें 'तद्धितेष्वचामादेः'

---

२. प्रोष्ठपद शब्दाहून 'तत्र जातः' या अर्थी अण् प्रत्यय ( ४।३।१६ ) झाला आहे.

विप्रतिषेधेन । कः पुनरत्र विशेषोऽचामादिवृद्धौ वा सत्यामुत्तरपदवृद्धौ वा । अयमस्ति विशेषः । यद्यत्राचामादिवृद्धिः स्यादैजागमः प्रसज्येत ॥

[ अवयवादृतोः ॥ ७।३।११ ॥
सुसर्वार्धाज्जनपदस्य ॥७।३।१२॥
दिशोऽमद्राणाम् ॥ ७।३।१३ ॥ ]
प्राचां ग्रामनगराणाम् ॥७।३।१४॥

नगरग्रहणं किमर्थं न प्राचां ग्रामाणामित्येव सिद्धम् । न सिध्यति । अन्यो ग्रामोऽन्यन्नगरम् । कथं ज्ञायते । एवं हि कश्चित्कंचित्पृच्छति । कुतो भवानागच्छति ग्रामात् । स आह । न ग्रामान्नगरादिति ॥ ननु च भो य एव ग्रामस्तन्नगरम् । कथं ज्ञायते । लोकतः । ये हि ग्रामे विधयो नेष्यन्ते साधीयस्ते नगरे न क्रियन्ते । तद्यथा । अभक्ष्यो ग्राम्यकुक्कुटोऽभक्ष्यो ग्राम्यशूकर इत्युक्ते सुतरां नागरोऽपि न भक्ष्यते । तथा ग्रामे नाध्येयमिति साधीयो नगरे नाधीयते । तस्माद्य एव ग्रामस्तन्नगरम् । कथं यदुक्तमेवं हि कश्चित्कंचित्पृच्छति कुतो भवानागच्छति ग्रामात् स आह

---

यानें वृद्धि झाली काय आणि उत्तरपदाला म्हणून वृद्धि झाली काय, त्यांत काय बरें फरक होणार आहे?

फरक आहे तर. द्याशीतिकः येथें 'तद्धितेष्वचामादेः' यानें वृद्धि करावी तर तिचा निषेध आणि ऐच् आगम हे होऊं लागतील.

( सू. १४ ) ह्या सूत्रामध्ये नगर हा शब्द कशाकरितां घातला आहे ? तो घालावयास नको. 'प्राचां ग्रामाणाम्' एवढेंच सूत्र केलें तरी काम भागेल.

तेवढ्यानें काम भागणार नाहीं. कारण ग्राम निराळा आणि नगर निराळें.

हें कसें समजतें ?

व्यवहारावरून समजतें. असें पहा कीं कोणी एक चैत्र वगैरे मनुष्य दुसऱ्या कोणाला विचारतो कीं तूं कोणत्या गावाहून आलास ? तो उत्तर देतो कीं गांवाहून आलों नाहीं, तर नगराहून आलों आहें. तेव्हां या व्यवहारावरून नगराला गाव म्हणत नाहींत असें समजतें.

पण काय हो, गांव ज्यांना म्हणतात त्यांपैकींच नगर आहे ना ?

हें कशावरून समजतें ?

व्यवहावरून समजतें. असें पहा कीं गांवांतील वस्तूसंबंधानें जे विधी इष्ट नाहींत ते खरोखर नगरांतील वस्तूसंबंधानेंही केले जात नाहींत. गांवांतील कोंबडा अभक्ष्य आहे, गांवांतील डुक्कर अभक्ष्य आहे, असें सांगितलें असतां नगरांतील कोंबडा किंवा डुक्कर हा सर्वथा अभक्ष्यच समजतात. तसेंच गांवामध्यें अध्ययन करूं नये असें म्हटलें असतां तेवढ्यावरून नगरामध्यें देखील खरोखरच अध्ययन करीत नाहींत. तेव्हां गांव म्हणून ज्यांना म्हणतात त्यापैकींच नगर आहे. तें गांवापेक्षां निराळें नव्हे.

'तर मग कोणी एक चैत्र वगैरे मनुष्य दुसऱ्या कोणाला विचारतो कीं तूं कोणत्या गांवांहून आलास ? तो उत्तर देतो कीं गांवाहून

---

१. ( सू. ११ ) ञकार, णकार किंवा ककार हा इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना अवयववाचक शब्दापुढील जें ऋतुवाचक उत्तरपद त्यांतील अचांमधील पहिल्या अचाला वृद्धि होते.

१. ( सू. १२ ) ञकार, णकार किंवा ककार हा इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना सु, सर्व किंवा अर्ध या शब्दांपुढील जें उत्तरपद त्यांतील अचांमधील पहिल्या अचाला वृद्धि होते.

१. ( सू. १३ ) ञकार, णकार किंवा ककार हा इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना दिग्वाचक शब्दाच्या पुढें जें मद्रखेरीज करून देशवाचक उत्तरपद त्यांतील आदि अचाला वृद्धि होते.

१. ( सू. १४ ) ञकार, णकार किंवा ककार हा इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना पूर्वेकडील देशांतील ग्रामवाचक किंवा नगरवाचक असें जें दिग्वाचक शब्दापुढील उत्तरपद त्यांतील आदि अचाला वृद्धि होते.

न ग्रामान्नगरादिति । संस्त्यायविशेषमसावाचष्टे । संस्त्यायविशेषा ह्येते ग्रामो घोषो नगरं संवाह इति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद् ग्रामग्रहणे नगरग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र ग्रामग्रहणे नगरग्रहणं न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । विशिष्टलिङ्गो नदीदेशोऽग्रामाः [ २. ४. ७ ] इत्यत्र नगरप्रतिषेधश्चोदितः स न वक्तव्यो भवति ॥ यद्येतज्ज्ञाप्यत उदीच्यग्रामाच्च बह्वचोऽन्तोदात्तात् [४. २. १०९] इत्यत्र नगरग्रहणं कर्तव्यम् । वाहीकग्रामेभ्यश्च [४. २. ११७] नगरग्रहणं कर्तव्यम् । दिक्शब्दा ग्रामजनपदाख्यानचानराटेषु [ ६. २. १०३ ] नगरग्रहणं कर्तव्यम् । इदं चतुर्थं ज्ञापकार्थम् । तत्रातिनिर्बन्धो न लाभः । तस्माद्यस्मिन्नेव ग्रामग्रहणे नगरग्रहणं नेष्यते तस्य प्रतिषेधो वक्तव्यः ॥

## संख्यायाः संवत्सरसंख्यस्य च ॥ ७।३।१५ ॥

संवत्सरग्रहणमनर्थकं परिमाणान्तस्येति कृतत्वात् ॥ १ ॥

संवत्सरग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । परिमाणान्तस्येति कृतत्वात् । परिमाणान्तस्यासंज्ञाशाणयोः [७. ३. १७] इत्येव सिद्धम् ॥

---

आलों नाहीं, तर नगराहून आलों आहे ' असें जें वर सांगितलें आहे त्याची वाट काय ?

' गांवाहून आलों नाहीं तर नगराहून आलों' या म्हणण्यानें फक्त त्यानें आपल्या गांवाचा रिवाज दाखविला आहे. निरनिराळ्या रिवाजांमुळेंच ग्राम², घोष, नगर, संवाह इत्यादि नांवें पडलीं आहेत.

तर मग अशा रीतीनें ग्राम या शब्दानेंच काम भागत असतांनाही जो येथें आचार्यांनीं नगर शब्द अधिक घातला आहे त्यावरून ते असें ज्ञापन करतात कीं इतर ठिकाणीं कोठेंही ग्राम शब्द उच्चारला असतां तेथें नगराचें ग्रहण होत नाहीं.

ह्या ज्ञापकाचा काय उपयोग ?

विशिष्टलिङ्गो नदीदेशोऽग्रामाः ( २।४।७ ) येथें जो नगराचा प्रतिषेध केला आहे तो करावयास नको.

पण असें ज्ञापक केलें तर 'उदीच्यग्रामाच्च बह्वचोऽन्तोदात्तात् ( ४।२।१०९ ) येथें ग्राम शब्दानें नगर येणार नाहीं; म्हणून तेथे नगरशब्द घालावा लागेल. तसेंच दुसऱ्या स्थळीं म्हणजे 'वाहीकग्रामेभ्यश्च' (४।२।११७) येथेंही नगर शब्द घालावा लागेल. तिसऱ्या स्थळीं म्हणजे ' दिक्शब्दा ग्रामजनपदाख्यानचानराटेषु' (६।२।१०३) येथेंही नगर शब्द घातला पाहिजे. आणि चवथ्या स्थळीं म्ह० प्रकृत सूत्रामध्यें ज्ञापकाकरितां नगर शब्द ठेवावा लागणार आहे. तेव्हां हें फार गौरव होत आहे; यांत कांहीं फायदा दिसत नाहीं. तात्पर्य, ग्राम शब्दानें नगराचा संग्रह करावा. ज्या ठिकाणीं संग्रह नको असेल तेवढ्यापुरता तेथें नगराचा निषेध करावा.

( सू. १५, वा. १ ) ह्या सूत्रामध्यें संवत्सर शब्दाचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ' परिमाणान्तस्यासंज्ञाशाणयोः' ( ७।३।१७ ) या सूत्रानेंच तें सिद्ध होत

---

२. ज्या ठिकाणीं ब्राह्मण व शेतकरी लोक मुख्यत्वानें राहतात त्याला ग्राम म्हणतात. ज्या ठिकाणीं गाई, म्हशी, वगैरे पशू बाळगणारे लोक मुख्यत्वानें राहतात त्याला घोष म्हणतात. ज्या ठिकाणीं प्रत्येक जातीचे बरेच लोक त्या त्या एकेक भागामध्यें राहातात, आणि त्याला सभोंवतीं तट व खंदक आहे, त्याला नगर म्हणतात. अशाच तऱ्हेच्या फार वस्तीच्या नगराला संवाह म्हणतात.

१. ( सू. १५ ) अकार, णकार किंवा ककार हा इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना संख्यावाचक शब्दाच्या पुढें जो संवत्सर शब्द किंवा संख्यावाचक उत्तरपद त्यांतील आदि अचाला वृद्धि होते.

**ज्ञापकं तु कालपरिमाणानां वृद्धिप्रतिषेधस्य ॥ २ ॥**

एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यः कालपरिमाणानां वृद्धिर्न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । द्वैरात्रिकः त्रैरात्रिकः अत्र वृद्धिर्न भवति । नैतदस्ति प्रयोजनम् । नास्त्यत्र विशेषः सत्यां वोत्तरपदवृद्धावसत्यां वा । इदं तर्हि । द्वैसमिकः त्रैसमिकः । इदं चापि प्रयोजनं द्वैरात्रिकः त्रैरात्रिकः । ननु चोक्तं नास्त्यत्र विशेषः सत्यां वोत्तरपदवृद्धावसत्यां वेति । अयमस्ति विशेषः । यद्यत्रोत्तरपदवृद्धिः स्यादचामादेर्वृद्धिर्न स्यात् ॥

अपर आह । ज्ञापकं तु कालपरिमाणानां परिमाणाग्रहणस्य । एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यः कालपरिमाणानां परिमाणग्रहणेन ग्रहणं न भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि [४. १. २२] द्विवर्षा त्रिवर्षा । परिमाणपर्युदासेन पर्युदासो न भवति ॥

**[वर्षस्याभविष्यति ॥ ७।३।१६ ॥**

**परिमाणान्तस्यासंज्ञाशाणयोः ॥ १७**

---

आहे[२].

( वा. २ ) तर मग या संवत्सर शब्दावरून आचार्य असें ज्ञापन करतात कीं कालपरिमाणवाचक शब्दांना वृद्धि (७।३।१७) होत नाहीं.

या ज्ञापकाचा काय उपयोग ?

द्वैरात्रिकः त्रैरात्रिकः, येथें रात्रि शब्दांतील आकाराला वृद्धि होत नाहीं.

हा ह्या ज्ञापकाचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण रात्रि शब्दामध्यें आदि अच् आकार आहे. त्याला वृद्धि झाली काय किंवा न झाली काय, कांहीं फरकच नाहीं.

तर मग या ज्ञापकाचा उपयोग द्वैसमिकः[४], त्रैसमिकः, येथें समा या कालपरिमाणवाचक शब्दांतील आदि अच् जो ऱ्हस्व अकार त्याला वृद्धि होत नाहीं. द्वैरात्रिकः व त्रैरात्रिकः येथें सुद्धां या ज्ञापकाचा उपयोग आहेच.

पण तेथें रात्रि या उत्तरपदांतील आकाराला वृद्धि झाली काय किंवा न झाली काय, कांहीं फरक दिसत नाहीं असें सांगितलें आहे ना ?

सांगितलें तें खरें नव्हे. कारण तेथें फरक आहे. तो असा कीं रात्रि या उत्तरपदांतील आदि अच् जो आकार त्याला वृद्धि झाली तर द्वि व त्रि या पूर्वपदांतील आदि अचाला म्ह० इकाराला वृद्धि होणार नाहीं.

दुसऱ्या कांहीं वैयाकरणांनीं ह्या वार्तिकाचा पाठ 'ज्ञापकं तु कालपरिमाणाना परिमाणाग्रहणस्य' असा घेतला आहे. त्याचा असा अर्थः--

तर मग या संवत्सर शब्दावरून आचार्य असें ज्ञापन करतात कीं कालपरिमाणवाचक शब्दांचें परिमाण शब्दानें कोठेंच ग्रहण होत नाहीं.

या ज्ञापकाचा काय उपयोग ?

'अपरिमाणबिस्ताचितकम्बल्येभ्यो न तद्धितलुकि' (४।१।२२) या सूत्रामध्यें अपरिमाण असें जे परिमाणशब्द वगळले आहेत तेथें कालपरिमाणवाचक शब्द वगळले जात नाहींत, हा याचा उपयोग आहे; उदा० द्विवर्षा, त्रिवर्षा.

---

२. कारण, संवत्सर हें एक प्रकारचें कालपरिमाण आहे.

३. द्वि शब्दाचा रात्रि शब्दाबरोबर तद्धितार्थी द्विगु ( २।१।५१ ) केल्यानंतर पुढें 'अधीष्ट' या अर्थी (५।१ ८० ) ठञ् प्रत्यय झाला आहे.

४. द्वि शब्दाचा समा शब्दाबरोबर तद्धितार्थी द्विगु झाला आहे.

५. कारण, उत्तरपदवृद्धीनें तिचा बाध होणार आहे.

१. ( सू. १६ ) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला आणि भावे (५।१।८०) या अर्थाशिवाय इतर अर्थाचा तद्धित प्रत्यय पुढे असतांना संख्यावाचक शब्दापुढील उत्तरपद जो वर्ष शब्द त्यांतील आदि अचाला वृद्धि होते; उदा० द्विवार्षिकः.

१. ( सू. १७ ) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना परिमाणवाचक शब्द शेवटीं असलेल्या अंगामध्ये संख्यावाचक शब्दापुढील

जे प्रोष्ठपदानाम् ॥ १८ ॥
हृद्भगसिन्ध्वन्ते पूर्वपदस्य च ॥१९
अनुशतिकादीनां च ॥ २० ॥
देवताद्वन्द्वे च ॥ २१ ॥
नेन्द्रस्य परस्य ॥ २२ ॥
दीर्घाच्च वरुणस्य ॥ २३ ॥
प्राचां नगरान्ते ॥ २४ ॥
जङ्गलधेनुवलजान्तस्य विभाषितमुत्तरम् ॥ २५ ॥
अर्धात्परिमाणस्य पूर्वस्य तु वा २६
नातः परस्य ॥ ७।३।२७ ॥ ]
प्रवाहणस्य ढे ॥ ७।३।२८ ॥

परस्य वृद्धिर्नेत्यनुवर्तत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तते प्रवाहणेयी भार्यास्येति

---

(सू. २८) ह्या सूत्रामध्यें 'उत्तरपदांतील आदि अचाला वृद्धि होत नाहीं' या पदांची अनुवृत्ति होते किंवा नाहीं ?

त्यांत काय फरक होणार आहे ?

फरक असा कीं जर त्या पदांची अनुवृत्ति होत असेल तर 'प्रवाहणेयी अशी आहे भार्या ज्याची' या अर्थी 'प्रवाहणेयीभार्य' असा जो सामासिक शब्द सिद्ध होतो त्यामध्यें 'वृद्धि-

---

जें शाण शब्दाशिवाय उत्तरपद त्यांतील आदि अचाला वृद्धि होते, पण तो तद्धितप्रत्ययान्त शब्द कोणाची संज्ञा नसावी; उदा० द्विकौडविकः.

१. (सू. १८) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला 'जात' या अर्थाचा (४।३।२५) तद्धित प्रत्यय पुढें असतांना प्रोष्ठपदा, भद्रपदा इत्यादि शब्दांमध्यें उत्तरपदांतील आदि अचाला वृद्धि होते; उदा० प्रोष्ठपदासु जातः प्रोष्ठपादः.

१. (सू. १९) ञकार, णकार, किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना हृत्, भग किंवा सिंधु हे शब्द शेवटी असलेल्या अंगामध्यें पूर्वपद आणि उत्तरपद या दोहोंमधील आदि अचाला वृद्धि होते; उदा० सुहृदयस्येदं सौहार्दम्, सुभगस्य भावः सौभाग्यम्, सक्तुसिन्धुषु भवः साक्तुसैन्धवः

१. (सू. २०) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना अनुशतिक वगैरे शब्दांमध्यें पूर्वपद आणि उत्तरपद या दोहोंमधील आदि अचाला वृद्धि होते; उदा० आनुशातिकम्.

१. (सू. २१) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना देवतावाचक शब्दांच्या द्वंद्वामध्यें पूर्वपद आणि उत्तरपद या दोहोंमधील आदि अचाला वृद्धि होते; उदा० आग्निवारुणी.

१. (सू. २२) देवतावाचक शब्दांच्या द्वंद्वामध्यें जर इन्द्र शब्द उत्तरपद असेल तर त्या इन्द्र शब्दांतील आदि अचाला वृद्धि होत नाहीं; उदा० सौमेन्द्रः.

१. (सू. २३) दीर्घाच्या पुढें उत्तरपद वरुण शब्द असेल तर त्या वरुण शब्दांतील आदि अचाला वृद्धि होत नाहीं; उदा० ऐन्द्रावरुणम्.

१. (सू. २४) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना पूर्वदेशांतील नगराचें वाचक जें नगर शब्द शेवटीं असलेलें अंग त्यामध्ये पूर्वपद आणि उत्तरपद या दोहोंमधील आदि अचाला वृद्धि होते; उदा० सौह्मनागरः.

१. (सू. २५) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना जङ्गल धेनु किंवा वलज हे शब्द शेवटीं असलेल्या अंगामध्यें पूर्वपदांतील आदि अचाला वृद्धि नित्य होते आणि उत्तरपदांतील आदि अचाला वृद्धि विकल्पानें होते; उदा० कौरुजाङ्गलम्,

१. (सू. २६) ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना अर्ध शब्दापुढील जो परिमाणवाचक शब्द तो शेवटीं असलेल्या अंगामध्यें उत्तरपदांतील आदि अचाला वृद्धि नित्य होते; आणि अर्ध या पूर्वपदांतील आदि अचाला वृद्धि विकल्पानें होते; उदा० आर्धद्रौणिकम्, अर्धद्रौणिकम्.

१. (सू. २७) पूर्वसूत्राच्या विषयामध्यें परिमाणवाचक उत्तरपदाचा आदि अच् जर ऱ्हस्व अकार असेल तर त्याला वृद्धि मुळींच होत नाहीं; पूर्वपदांतील आदि अचाला मात्र वृद्धि विकल्पानें होते; उदा० आर्धप्रस्थिकम्, अर्धप्रस्थिकम्.

१. (सू. २८) ढ हा तद्धितप्रत्यय पुढें असतांना प्रवाहण शब्दामध्यें उत्तरपदांतील आदि अचाला वृद्धि

प्रवाहणेयीभार्यः वृद्धिनिमित्तस्येति पुंवद्भावप्रतिषेधो न प्राप्नोति । अथ निवृत्तं न दोषो भवति । यथा न दोषस्तथास्तु ॥ अथवा पुनरस्त्वनुवर्तते । ननु चोक्तं प्रवाहणेयी भार्यास्य प्रवाहणेयीभार्यः वृद्धिनिमित्तस्येति पुंवद्भावप्रतिषेधो न प्राप्नोतीति । नैष दोषः । मा भूदेवम् । जातेरित्येवं भविष्यति ॥

**[ तत्प्रत्ययस्य च ॥ ७।३।२९ ॥**

**नञः शुचीश्वरक्षेत्रज्ञकुशलनिपुणानाम् ॥ ७।३।३० ॥ ]**

**यथातथायथापुरयोः पर्यायेण ॥३१॥**

अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथमयाथातथ्यम् आयथातथ्यम् अयाथापुर्यम् आयथापुर्यम् । यदा तावत्पूर्वपदस्य वृद्धिस्तदैवं विग्रहः करिष्यते । न यथातथा अयथातथा । अयथातथाभाव आयथातथ्यम् । यदोत्तरपदस्य वृद्धिस्तदैवं विग्रहः करिष्यते । यथातथाभावो याथातथ्यम् । न याथातथ्यमयाथातथ्यम् ॥

**हनस्तोऽचिण्णलोः ॥ ७।३।३२ ॥**

**हन्तेस्तकारे तद्धिते प्रतिषेधः ॥१ ॥**

---

निमित्तस्य०' (६।३।३९) या सूत्रानें पुंवद्भावाचा निषेध झाला पाहिजे, तो होणार नाहीं. आतां त्या पदांची येथें अनुवृत्ति होत नाहीं असें म्हटलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

तर मग ज्या रीतीनें दोष येत नसेल तसेंच असू दे.

अथवा त्या पदांची अनुवृत्ति येथें झाली तरी हरकत नाहीं.

पण 'प्रवाहणेयी अशी आहे भार्या ज्याची' या अर्थी 'प्रवाहणेयीभार्य' असा जो शब्द सिद्ध होतो त्यामध्यें 'वृद्धिनिमित्तस्य०' या सूत्रानें पुंवद्भावाचा निषेध होणार नाहीं, असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. त्या सूत्राने पुंवद्भावाचा निषेध झाला नाहीं तरी न होऊं दे. 'जातेश्च' (६।३।४१) यानें निषेध होईल.

(सू. ३१) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल.

पण हें सूत्र केलें नाहीं तर अयाथातथ्यम्, आयथातथ्यम्, अयाथापुर्यम्, आयथापुर्यम् हीं उदाहरणें कशीं साधतील ?

आयथातथ्यम् अशी पूर्वपदाला वृद्धि जेव्हां पाहिजे असेल तेव्हां पुढे दिल्याप्रमाणें विग्रह करावा: न यथातथा अयथातथा, अयथातथाभावः आयथातथ्यम्. आतां अयाथातथ्यम् अशी उत्तरपदाला वृद्धि जेव्हां पाहिजे असेल तेव्हा असा विग्रह करावा: यथातथाभावः याथातथ्यम् न याथातथ्यम् अयाथातथ्यम्.

---

होते आणि पूर्वपदांतील आदि अचाला वृद्धि विकल्पानें होते; उदा० प्रावाहणेयः प्रवाहणेयः.

१. (सू. २९) तो 'ढ' प्रत्यय शेवटीं असलेला जो प्रवाहणेय हा शब्द, त्यामध्यें उत्तरपदांतील आदि अचाला वृद्धि होते आणि पूर्वपदांतील आदि अचाला वृद्धि विकल्पानें होते, ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना. उदा० प्रवाहणस्यापत्यं प्रावाहणेयिः, प्रवाहणेयिः.

१. (सू. ३०) नञाच्या पुढें असलेलीं जीं शुचि, ईश्वर, क्षेत्रज्ञ, कुशल किंवा निपुण हीं उत्तरपदें तीं शेवटीं असलेल्या अंगामध्यें उत्तरपदांतील आदि अचाला वृद्धि नित्य होते आणि पूर्वपदांतील आदि अचाला वृद्धि विकल्पानें होते, ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना, उदा० आशौचम्, अशौचम्.

१. (सू. ३१) नञाच्या पुढें असलेलीं जीं यथातथ किंवा यथापुर हीं उत्तरपदें तीं शेवटीं असलेल्या अंगामध्यें पूर्वपद आणि उत्तरपद या दोहोंपैकीं कोणत्या तरी एकांतील आदि अचाला वृद्धि होते, ञकार, णकार किंवा ककार इत्संज्ञक असलेला तद्धितप्रत्यय पुढें असतांना; उदा० आयथातथ्यम् अयाथातथ्यम्.

२. न शब्दाचा यथातथा शब्दाबरोबर नञ्तत्पुरुष अगोदर करून नंतर ष्यञ्प्रत्यय (५।१।१२४) केला म्हणजे वृद्धि (७।२।११७) नञांतील अकाराला होईल आणि यथातथा शब्दाहून ष्यञ् प्रत्यय अगोदर करून नंतर याथातथ्य शब्दाबरोबर नञ्तत्पुरुष केला म्हणजे यथा शब्दांतील अकाराला वृद्धि होईल.

१. (सू. ३२) हन् धातूच्या नकाराला तकार

हन्तेस्तकारे तद्धिते प्रतिषेधो वक्तव्यः । वार्त्रघ्नम् भ्रौणघ्नम् ॥

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । धातोः स्वरूपग्रहणे तत्प्रत्यये कार्यविज्ञानात्सिद्धमिति ॥

**आतो युक्चिण्कृतोः ॥७।३।३३॥**

कृद्ग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । ददौ दधौ । नैतदस्ति प्रयोजनम् । अचिण्णलोरिति वर्तते । यद्यचिण्णलोरिति वर्तते अदायि अधायीत्यत्र न प्राप्नोति । वचनाच्चिणि भविष्यति । अचिण्णलोरिति वर्तते ॥ एवमपि चौडिः बालाकिरित्यत्र प्राप्नोति । लोपोऽत्र बाधको भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । लोपः क्रियतां युगिति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्युक् । एवं तर्ह्यचामादेरिति वर्तते । यत्राचामादिराकारस्तत्र युगिति ॥ एवमपि ज्ञादेवतास्य स्थालीपाकस्य ज्ञः स्थालीपाकः अत्र प्राप्नोति । तस्मात्कृद्ग्रहणं कर्तव्यम् ॥

**नोदात्तोपदेशस्य मान्तस्यानाचमेः ॥ ७।३।३४ ॥**

---

( सू. ३२, वा. १ ) हा जो हन् धातूच्या नकाराला तकार सांगितला आहे तो तद्धित प्रत्यय पुढें असतांना होत नाहीं असें म्हणावें; उदा० वार्त्रघ्नम्, भ्रौणघ्नम्.

(वा. २) अथवा हें मागें सांगितलेंच आहे. (७।२।११४ वा. २ ).

तें काय बरें सांगितलें आहे ?

धातूचें स्वरूप उच्चारून सांगितलेलें कार्य धातोः असा अधिकार करून सांगितलेले प्रत्यय पुढें असतांनाच होतें म्हणून हें सिद्ध होतें.

( सू. ३३ ) ह्या सूत्रामध्यें कृत् असा शब्द कशाकरिता घातला आहे ?

ददौ, दधौ, या ठिकाणीं युक् आगम होऊं नये म्हणून घातला आहे.

हा त्याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण, अचिण्णलोः या पदाची अनुवृत्ति येथें येत आहे.

जर अचिण्णलोः या पदाची अनुवृत्ति येथें येत असेल तर अदायि, अधायि, या ठिकाणीं युक आगम होणार नाहीं.

ह्या सूत्रामध्यें मुद्दाम चिण् असा शब्द उच्चारला आहे त्यामुळें चिण् प्रत्यय पुढें असतांना युक् आगम होईल. तेव्हां अचिण्णलोः या पदाची अनुवृत्ति ददौ, दधौ, हीं उदाहरणें साधण्याकरितां आणावी.

तरी पण चौडिः, बालाकिः, येथें युक् आगम होऊं लागेल[३].

येथें आकाराचा लोप ( ६।४।१४८ ) युक् आगमाचा बाध करील.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो कीं अगोदर लोप करावा किंवा अगोदर युक् आगम करावा ?

मग त्यांमध्यें काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव युक् आगम होऊं लागेल.

तर मग 'अचांमध्यें आदि' अशी अनुवृत्ति येथें आणावी म्हणजे जेथें आकार हा अचांमध्यें आदि असेल तेथेंच युक् आगम होईल.

तरी पण ज्ञा शब्दाहून 'ज्ञा आहे देवता ज्या स्थालीपाकाची' या अर्थी अण् प्रत्यय (४।४।२४) होऊन ज्ञः स्थालीपाकः असें जें रूप होतें तेथें युक् आगम होऊं लागेलच. एकंदरींत सूत्रामध्यें जो कृत् शब्द घातला आहे तोच बरोबर आहे.

---

होतो अकार किंवा णकार इत्संज्ञक असलेला प्रत्यय पुढें असतांना. मात्र त्या प्रत्ययांमध्यें चिण् किंवा णल् हे नसावे; उदा० घातयति.

१. ( सू. ३३ ) चिण् प्रत्यय अथवा अकार किंवा णकार इत्संज्ञक असलेला कृत्प्रत्यय पुढें असतांना दीर्घ आकार शेवटीं असलेल्या धातूला युक् असा आगम होतो; उदा० दायकः

२. दा व धा या धातूंहून लिट्, तिप्, णल् (३।४।८२ ), औकार ( ७।१।३४ ) आणि वृद्धि (६।१।८८ ) हीं कार्यें येथें झालीं आहेत.

३. चूडा व बलाका या शब्दांहून अपत्यार्थी इञ् प्रत्यय ( ४।१।९६ ) झाला आहे.

१. ( सू. ३४ ) चिण् प्रत्यय अथवा अकार किंवा

अत्यल्पमिदमुच्यतेऽनाचमेरिति। अवमिकमिचमीनामिति वक्तव्यम्। वामः कामः आचामः ॥

[ जनिवध्योश्च ॥ ७।३।३५ ॥

अर्तिह्रीव्लीरीक्नूयीक्ष्माय्यातां पुग्णौ ॥ ७।३।३६ ॥ ]

शाच्छासाह्वाव्यावेपां युक् ७।३।३७

णिच्प्रकरणे धूञ्प्रीञोर्नुग्वचनम् ॥१॥

णिच्प्रकरणे धूञ्प्रीञोर्नुग्वक्तव्यः। धूनयति प्रीणयति ॥

पातेर्लुग्वचनम् ॥ २ ॥

पालयति ॥

[वो विधूनने जुक् ॥ ७।३।३८ ॥

लीलोर्नुग्लुकावन्यतरस्यां स्नेहविपातने ॥ ७।३।३९ ॥

भियो हेतुभये षुक् ॥७।३।४०॥

स्फायो वः ॥ ७।३।४१ ॥

शदेरगतौ तः ॥ ७।३।४२ ॥

रुहः पोऽन्यतरस्याम् ॥७।३।४३॥ ]

प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्यात इदाप्यसुपः ॥ ७।३।४४ ॥

स्थग्रहणं किमर्थम्। इदं विचारयिष्यत इत्त्वे कग्रहणं संघातग्रहणं वा स्याद्वर्णग्रहणं वेति। तद्यदा संघातग्रहणं तदा स्थग्रहणं

---

( सू. ३४ ) ह्या सूत्रामध्यें आउपसर्गपूर्वक चम् धातु हा एकटाच वगळला आहे हें फार कमी आहे; कम् आणि वम् हेही धातू ह्या निषेधामध्यें आणखी वगळले पाहिजेत; उदा० वामः, कामः, आचामः,

( सू. ३७, वा. १ ) णि प्रत्यय पुढें असतांना हे जे धातूला आगम सांगितले आहेत त्या प्रकरणामध्यें धूञ् आणि प्रीञ् या धातूंना नुक् आगम णि प्रत्यय पुढें असतांना होतो, असें म्हणावें; उदा० धूनयति, प्रीणयति.

( वा. २ ) पा धातूला णि प्रत्यय पुढें असतांना लुक् असा आगम होतो असें म्हणावें; उदा० पालयति.

( सू० ४४ ) ह्या सूत्रामध्यें स्थ शब्द कशाकरितां घातला आहे ?

येथें असा एक विचार करण्यांत येणार आहे कीं ह्या इत्त्व सांगणाऱ्या शास्त्रामध्यें कात् असें

---

णकार इत्संज्ञक असलेला कृत् प्रत्यय पुढें असतांना आउपसर्गपूर्वक चम् धातूशिवाय उपदेशीं उदात्त आणि मकारान्त अशा धातूला उपधावृद्धि होत नाहीं ( ७।२। ११६ ); उदा० अशमि, शमकः.

१. ( सू. ३५ ) चिण् प्रत्यय किंवा ञकार अथवा णकार इत्संज्ञक असलेला कृत् प्रत्यय पुढें असतांना जन् आणि वध् या धातूंना उपधावृद्धि होत नाहीं; उदा० जनकः, वधकः.

१. ( सू. ३६ ) ऋ, ह्री, व्ली, री, क्नूयी, क्ष्मायी आणि आकारान्त धातु यांना णि प्रत्यय पुढें असतांना पुक् असा आगम होतो; उदा० अर्पयति, ह्रेपयति.

१. ( सू. ३७ ) शा, छा, सा, ह्वा, व्या, वे आणि पा या धातूंना णि प्रत्यय पुढें असतांना युक् असा आगम होतो.

१. ( ३८) णि प्रत्यय पुढें असतांना वा धातूला कंपन हा अर्थ गम्यमान असतांना जुक् असा आगम होतो, उदा० वाजयति.

१. ( ३९ ) णि प्रत्यय पुढें असतांना ली धातूला नुक् आगम आणि ला धातूला लुक् आगम हे दोन्ही विकल्पानें होतात, स्निग्ध पदार्थ पातळ करणें हा अर्थ गम्यमान असतांना; उदा० घृतं विलीनयति, विलाययति; विलालयति, विलापयति.

१. ( ४० ) णि प्रत्यय पुढें असतांना भी धातूला षुक् आगम होतो, पण धातूचा अर्थ जें भय तें प्रयोजक कर्त्यापासून असलें पाहिजे; उदा० जटिलो भीषयते.

१. (४१) णि प्रत्यय पुढें असतांना स्फाय् धातूच्या यकाराला वकार आदेश होतो; उदा० स्फावयति.

१. ( ४२ ). गमनाशिवाय इतर अर्थाच्या शद् धातूच्या दकाराला णि प्रत्यय पुढें असतांना तकार आदेश होतो; उदा० शातयति.

१. (४३) णि प्रत्यय पुढें असतांना रुह् धातूच्या हकाराला पकार आदेश विकल्पानें होतो; उदा० रोपयति, रोहयति.

१. (४४) प्रत्ययांतील जो ककार त्याच्या पूर्वींच्या

कर्तव्यमिहापि यथा स्यात् कारिका हारिका। यदा हि वर्णग्रहणं तदा केवलः ककारः प्रत्ययो नास्तीति कृत्वा वचनाद्भविष्यति ॥

अथासुप इति कथमिदं विज्ञायते ? असुब्वतोऽङ्गस्येति । अहोस्विन्न चेत्सुपः पर आबिति । किं चातः । यदि विज्ञायतेऽसुब्वतोऽङ्गस्येति बहुचर्मिका अत्र न प्राप्नोति। अथ विज्ञायते न चेत्सुपः पर आबिति न दोषो भवति । यथा न दोषस्तथास्तु ॥

इदं विचार्यत इत्त्वे कग्रहणं संघातग्रहणं वा स्याद्वर्णग्रहणं वेति । कश्चात्र विशेषः ।

**इत्त्वे कग्रहणं संघातग्रहणं चेदेतिकास्वप्राप्तिः ॥ १ ॥**

इत्त्वे कग्रहणं संघातग्रहणं चेदेतिकास्वप्राप्तिः । एतिकाश्चरन्ति । वचनाद्भविष्यति । अस्ति वचने प्रयोजनम् । किम् । कारिका हारिका ॥ अस्तु तर्हि वर्णग्रहणम् ।

---

जें म्हटलें आहे तेथें ककार व अकार या दोन वर्णांचा समुदाय मिळून क हें सबंध अक्षर गृहीत धरावयाचें अथवा अकार उच्चारणार्थ समजून फक्त ककार हें व्यंजन गृहीत धरावयाचें. त्यांत जेव्हां क हा समुदाय गृहीत धरला जाईल तेव्हां ह्या सूत्रांतील 'स्थ' हा शब्द ठेवलाच पाहिजे. कारण कारिका व हारिका येथेंही हें इत्त्व झालें पाहिजे. आतां जेव्हां क् हें फक्त वर्णाचें ग्रहण केलें असेल तेव्हा ककार हा प्रत्यय कोठेंच नसल्यामुळें प्रत्ययांतील ककार असा अर्थ स्थ शब्दावांचूनही प्रत्ययात्कात् या म्हणण्यानेंच होईल.

आतां येथें असुपः याचा अर्थ कसा घ्यावयाचा ? सुप् ज्यामध्यें नाहीं असें अंग पाहिजे किंवा सुप् प्रत्ययाच्या पुढें नसलेला असा आप् प्रत्यय पाहिजे ?

या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक आहे ?

फरक असा आहे कीं सुप् ज्यामध्यें नाहीं असें अंग पाहिजे असेल तर 'बहुचर्मिका' येथें इत्त्व होणार नाहीं. आतां सुप् प्रत्ययाच्या पुढें नसलेला आप् पाहिजे असेल तर हा दोष येणार नाहीं.

मग जो अर्थ घेतला असतां दोष येणार नसेल तोच अर्थ असूं दे.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो की ह्या इत्त्व सांगणाऱ्या शास्त्रामध्यें कात् असें जें म्हटलें आहे तेथे ककार व अकार या दोन वर्णांचा समुदाय मिळून क हें सबंध अक्षर गृहीत धरावयाचें अथवा अकार उच्चारणार्थ समजून फक्त ककार हा एकटा वर्णच गृहीत धरावयाचा ?

ह्या दोहोंमध्यें फरक काय आहे ?

( वा. १ ) ह्या इत्त्व सांगणाऱ्या शास्त्रामध्यें क हें समुदायाचें ग्रहण असेल तर एतिका या उदाहरणामध्यें इत्त्वाची प्राप्ति येणार नाहीं; उदा० एतिकाश्चरन्ति.

पण ज्या अर्थी इत्त्व सांगितलेंच आहे त्या अर्थी येथें होईल.

तसें होणार नाहीं. कारण दुसरें चांगलें उदाहरण मिळत आहे.

तें कोणतें ?

कारिका अथवा हारिका हें तें उदाहरण होय.

---

जो ह्रस्व अकार त्याला ह्रस्व इकार आदेश होतो, आप् प्रत्यय पुढें असतांना; परंतु तो आप् प्रत्यय सुप् प्रत्ययाच्या पुढें नसला पाहिजे.

२. स्थ हा शब्द नसेल तर प्रत्यय जो क असा अर्थ होऊन दत्तिका वगैरे उदाहरणांमध्येंच इत्त्व होईल; कारण तेथें दत्त शब्दाहून क प्रत्यय (५।३।७६) केला आहे; आणि कारिका येथें कृ धातूहून ण्वुल् प्रत्यय (३।१।१२८) आणि त्याला अक आदेश (७।१।१) झाला आहे. येथें क हा प्रत्ययांतील भाग आहे; प्रत्यय नाहीं.

३. बहु+जस् व चर्मन्+जस् या सुबन्त पदांचा बहुव्रीहि होऊन पुढें कप् प्रत्यय (५।४।१५४) झाला आहे. सुप् प्रत्ययांचा जरी लुक् (२।४।७१) झाला आहे, तरी प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) अंगामध्यें असें गृहीत धरतां येतें.

४. एतद् शब्दांतील अद् या भागाच्या पूर्वी अकच् प्रत्यय (५।३।७१) झाला आहे. ह्या एतकद् शब्दांतील ककार फक्त अकच् प्रत्ययाचा आहे. त्या कका-

**वर्णग्रहणं चेद्व्यवहितत्वादप्रसिद्धिः ॥२॥**

वर्णग्रहणं चेद्व्यवहितत्वान्न प्राप्नोति । कारिका हारिका । अकारेण व्यवहितत्वान्न प्राप्नोति । एकादेशे कृते नास्ति व्यवधानम् । एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद् व्यवधानमेव ॥ एवं तर्ह्याहायं प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्येति न कचिदव्यवधानं तत्र वचनाद्भविष्यति ।

**वचनप्रामाण्यादिति चेद्रथकट्यादिष्वतिप्रसङ्गः ॥ ३ ॥**

वचनप्रामाण्यादिति चेद्रथकट्यादिषु दोषो भवति । रथकट्या गर्गकाम्या ॥ नैष दोषः । येन नाव्यवधानं तेन व्यवहितेऽपि वचनप्रामाण्यात् । केन च नाव्यवधानम् । वर्णेनैकेन । संघातेन पुनर्व्यवधानं भवति न भवति च ॥

अथवा पुनरस्तु संघातग्रहणम् । ननु चोक्तमित्त्वे कग्रहणं संघातग्रहणं चेदेतिकास्वप्राप्तिरिति । परिहृतमेतद्वचनाद्भविष्यतीति । ननु चोक्तमस्ति वचने प्रयोजनम्

---

तर मग कात् हें ककार ह्या वर्णाचेंच फक्त ग्रहण केलें आहे असें असूं दे.

(वा. २) कात् हें वर्णाचें ग्रहण केलें असेल तर व्यवधानामुळें इत्त्वाला उदाहरणच मिळत नाहीं. कारिका व हारिका येथें अकारानें व्यवधान येत असल्यामुळें इत्त्वाची प्राप्ति येत नाहीं.

ककाराच्या पुढील अकाराचा टाप् प्रत्ययाच्या आकाराबरोबर एकादेश (६।१।१०१) केला म्हणजे व्यवधान नाहीं असें होत आहे.

तरी पण पूर्वाला इत्त्व हा विधि कर्तव्य असतांना त्या एकादेशाला स्थानिवद्भाव (१।१।५७) होत असल्यामुळें व्यवधान आहेच.

तर मग येथें आचार्य तर आप् प्रत्यय पुढें असतांना प्रत्ययांतील ककार असें म्हणतात, आणि ककार व आप् प्रत्यय यांमध्यें व्यवधान नाहीं असें कोठेंच मिळत नाहीं. तेव्हां व्यवधान खपतें असें वचनसामर्थ्यास्तव म्हणावें.

(वा. ३) वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपतें असें म्हणावें तर रथकट्या, गर्गकाम्या, इत्यादि उदाहरणांमध्यें दोष येतो.

हा दोष येत नाहीं. कारण जेवढ्या भागानें व्यवधान नाहीं असें कोठेंच होत नाहीं तेवढ्याच भागानें व्यवधान असलें तरी वचनसामर्थ्यास्तव तें खपतें.

व्यवधान नाहीं असें कोठेंच होत नाहीं असें जें म्हणतां तें केवढ्या भागानें होतें ?

फक्त एका वर्णानें. वर्णाच्या समुदायानें होणारें व्यवधान हें मात्र कोठें होतें आणि कोठें होत नाहीं.

अथवा, प्रकृत सूत्रामध्यें कात् हें क या समुदायाचेंच ग्रहण केलें आहे असें का असे ना ?

पण या इत्त्व सांगणाऱ्या शास्त्रामध्यें क हें समुदायाचें ग्रहण केलें असेल तर एतिका या उदाहरणामध्यें इत्त्व होणार नाहीं असें आतांच सांगितलें आहे ना ?

सांगितलें आहे खरें, पण त्याचें उत्तरही लगेच तेथें दिलें आहे कीं ज्याअर्थी इत्त्व सांगितलेंच आहे त्याअर्थी वचनसामर्थ्यास्तव होईल.

पण त्याच्याही पुढें इत्त्वाला दुसरें चांगलें

---

राच्या पुढील अकार हा मूळचा एतद् शब्दांतील आहे.

५. आपि हें ककाराला विशेषण असल्यामुळें ककाराच्या पुढें लगेंच आप् प्रत्यय पाहिजे. कारक या अकारान्त शब्दाहून टाप् प्रत्यय (४।१।४) केला असल्यामुळें ककार आणि आप् यांच्या मध्यें अकारानें व्यवधान येतें.

६. रथ शब्दाहून कट्यच् प्रत्यय (४।२।५१) झाला आहे. त्यानंतर स्त्रीलिंगी टाप् प्रत्यय झाला आहे. तसेंच सुबन्त गर्ग शब्दाहून काम्यच् प्रत्यय (३।१।९), नंतर भाव या अर्थी अ प्रत्यय (३।३।१०२), व नंतर टाप् प्रत्यय झाला आहे. येथें प्रत्ययांतील ककार आणि आप् यांमध्यें अट्य आणि आम्य या भागानें व्यवधान होत असल्यामुळें इत्त्व होत नाहीं. व्यवधान खपतें असें म्हटलें तर रथिकट्या, गर्गिकाम्या, अशीं भलतींच रूपें होतील.

किम् कारिका हारिकेति । अत्राप्येकादेशे कृते व्यपवर्गाभावान्न प्राप्नोति । अन्तादिवद्भावेन व्यपवर्गः । उभयत आश्रये नान्तादिवत् । एवं तर्ह्येकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद्व्यपवर्गः । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येवंजातीयकानामपीत्त्वमिति यदयं न यासयोः [ ४५ ] इति प्रतिषेधं शास्ति ॥

ममकनरकयोरुपसंख्यानमप्रत्ययस्थत्वात् ॥ ४ ॥

ममकनरकयोरुपसंख्यानं कर्तव्यम् । मामिका नरिका । किं पुनः कारणं न सिध्यति । अप्रत्ययस्थत्वात् ॥

त्यक्त्यपोश्च प्रतिषिद्धत्वात् ॥ ५ ॥

त्यक्त्यपोश्चोपसंख्यानं कर्तव्यम् । दाक्षिणात्यिका अमात्यिका । किं पुनः कारणं न सिध्यति । प्रतिषिद्धत्वात् । उदीचामातः स्थाने यकपूर्वायाः [४६] इति प्रतिषिद्धत्वात् ॥

---

उदाहरण दाखविलें आहे.

ते कोणतें ?

कारिका, हारिका, हें तें उदाहरण होय.

येथेंही एकादेश केल्यानंतर क या समुदायाच्या पुढें आप् असें पौर्वापर्य नसल्यामुळें इत्त्वाची प्राप्ति येणार नाहीं.

अन्तादिवच्च (६।१।८५) ह्या अतिदेशाच्या जोरावर तें पौर्वापर्य मानतां येईल.

हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण एकादेश झाला असतां तेथें दोन्ही बाजूचे दोन धर्म एकदम 'अन्तादिवच्च' यानें मानूं नयेत अशी परिभाषा आहे.

तर मग कारिका, हारिका, येथें पूर्वाला इत्त्व हा विधि कर्तव्य असतांना एकादेशाला स्थानिवद्भाव (१।१।५७) होत असल्यामुळे 'क आणि त्याच्या पुढें आप्' असें पौर्वापर्य गृहीत धरतां येईल.

तर मग 'न यासयोः' (७।३।४५) असा जो पुढें या इत्त्वाचा निषेध आचार्यांनीं केला आहे त्यावरून असें ज्ञापन होतें कीं एतिका यासारख्या अकच् प्रत्यय झालेल्या शब्दांमध्यें इत्त्व होतें.

ममक आणि नरक या शब्दांमध्यें ककाराच्या पूर्वीच्या अकाराला आप् प्रत्यय पुढें असतांना, ऱ्हस्व इकार आदेश होतो, असें म्हणावें; उदा० मामिका, नरिका.

पण सूत्रानें येथें सिद्धि कां बरें होत नाहीं ?

हा ककार प्रत्ययांतील नव्हे म्हणून.

( वा. ५ ) प्रत्ययांतील ककाराच्या पूर्वीचा जो त्यक् आणि त्यप् या प्रत्ययांचा अकार त्याला ऱ्हस्व इकार आदेश होतो, आप् प्रत्यय पुढें असतांना, असें म्हणावें; उदा० दाक्षिणात्यिका.

पण सूत्रानेंच का बरें येथें सिद्धि होत नाहीं ?

निषेध केला आहे म्हणून. 'उदीचामातः स्थाने यकपूर्वायाः' या सूत्राने त्यक् व त्यप् प्रत्यय केले असतील तेथें इत्त्वाचा एकदां निषेध प्राप्त होत आहे.

---

७. अशा रीतीनें कारिका व हारिका हीं चांगलीं उदाहरणें इत्त्वाला मिळत असल्यामुळें 'एतिका येथें वचनसामर्थ्यास्तव इत्त्व होतें' असें म्हणतां येत नाहीं. एकंदरींत कात् हें क या समुदायाचें ग्रहण केलें आहे, या पक्षावर एतिका येथें इत्त्व होणार नाहीं हा दोष कायम राहतो.

८. अकच् प्रत्यय होतो त्या ठिकाणीं क हा समुदाय प्रत्ययांतील नाहीं; फक्त त्यांतील ककार मात्र प्रत्ययाचा आहे. तरी पण क हा समुदाय कसा तरी प्रत्ययांतील आहे असें गृहीत धरण्याविषयीं हें ज्ञापक आहे.

९. मम इयं मामिका. अस्मद् शब्दाहून अण् प्रत्यय आणि अस्मद् शब्दाला ममक आदेश ( ४।३।३ ) झाला आहे. नरान् कायतीति नरिका. नरउपपदपूर्वक कै धातूहून क प्रत्यय ( ३।२।३ ) झाला आहे.

१०. दक्षिण शब्दाहून आच् प्रत्यय (५।३।३६), अव्यय संज्ञा ( १।१।३८ ), त्यक् प्रत्यय (४।२।९८), टाप् प्रत्यय ( ४।१।४ ), क प्रत्यय ( ५।३।७६ ), व पुनः टाप् प्रत्यय हीं कार्यें झालीं आहेत.

**न यासयोः ॥ ७।३।४५ ॥**

न यत्तदोरिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । यकां यकामधीते । तकां तकां पचामह इति ॥

**प्रतिषेधे त्यकन उपसंख्यानम् ॥ १ ॥**

प्रतिषेधे त्यकन उपसंख्यानं कर्तव्यम् । उपत्यका अधित्यका ॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नैवंजातीयकानामित्त्वं भवतीति यदयं मृदस्तिकन् [५. ४. ३९] इतीत्त्वभूतं निर्देशं करोति ॥

**पावकादीनां छन्दस्युपसंख्यानम् ॥२॥**

पावकादीनां छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । हिरण्यवर्णाः शुचयः पावकाः । ऋक्षकाः अलोमकाः । छन्दसीति किमर्थम् । पाविका अलोमिका ॥

**आशिषि च ॥ ३ ॥**

आशिषि चोपसंख्यानं कर्तव्यम् । जीवताज्जीवका । नन्दतान्नन्दका । भवताद्भवका ॥

**उत्तरपदलोपे च ॥ ४ ॥**

उत्तरपदलोके चोपसंख्यानं कर्तव्यम् । देवदत्तिका देवका । यज्ञदत्तिका यज्ञका ॥

**क्षिपकादीनां च ॥ ५ ॥**

क्षिपकादीनां चोपसंख्यानं कर्तव्यम् । क्षिपका ध्रुवका धुवका ॥

**तारका ज्योतिषि ॥ ६ ॥**

तारका ज्योतिष्युपसंख्यानं कर्तव्यम् । तारका । ज्योतिषीति किमर्थम् । तारिका

---

( सू. ४५ ) 'न यासयोः' या सूत्राच्या ऐवजीं 'न यत्तदोः' असें सूत्र करावें. कारण यकां यकामधीते, तकां तकां पचामहे, येथेंही प्रकृत सूत्राने निषेध झाला पाहिजे.

( वा. १ ) त्यकन् प्रत्ययांतील ककाराच्या पूर्वीच्या अकाराला पूर्व सूत्रानें प्राप्त झालेलें इत्त्व होत नाहीं असें ह्या निषेधप्रकरणामध्यें वचन करावें; उदा० उपत्यका, अधित्यका.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण, मृदस्तिकन् (५।४।३९) येथें इत्त्व झालेलें तिकन् असें जें उच्चारण केलें आहे त्यावरून असें ज्ञापन होतें कीं अशा प्रकारच्या अनेकाच् प्रत्ययांतील अकाराला इत्त्व होत नाहीं.

(वा. २) पावका वगैरे शब्दांतील अकाराला वेदामध्यें इत्त्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० हिरण्यवर्णाः शुचयः पावकाः, ऋक्षकाः, अलोमकाः.

वेदामध्यें असें कशाकरितां म्हटलें आहे ?

लोकामध्यें पाविका, अलोमिका, असें इत्त्व झालेंच पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

(वा. ३) आशीर्वाद अर्थ गम्यमान असताना इत्त्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० जीवतात् इति जीवका, नन्दतात् इति नन्दका, भवतात् इति भवका.

( वा. ४ ) उत्तरपदाचा लोप झाला असता तेथें इत्त्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० देवदत्तिका देवका, यज्ञदत्तिका यज्ञका.

(वा. ५) क्षिपका वगैरे शब्दातील अकाराला इत्त्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० क्षिपका, ध्रुवका, धुवका.

(वा. ६) तारका शब्दांतील अकाराला इत्त्व होत नाहीं, त्याचा ज्योति अर्थ असतांना, असें

---

१. (सू.४५) यद् आणि तद् या शब्दांतील अकाराला पूर्वसूत्रानें प्राप्त झालेला न्हस्व इकार आदेश होत नाहीं.

२. सूत्रामध्यें या सा असें उच्चारलें आहे. या हें यद् शब्दाचें स्त्रीलिंगी प्रथमेचें एकवचन आहे. तसेंच सा हें तद् शब्दाचें आहे. म्हणून इतर ठिकाणीं म्हणजे द्वितीया वगैरे विभक्तींमध्यें ह्या सूत्रानें इत्त्वाचा निषेध होणार नाहीं, तो झाला पाहिजे, म्हणून सूत्रामध्यें यत्तदोः असे नुसते शब्द उच्चारावे.

३. येथें उप आणि अधि यांहून त्यकन् प्रत्यय ( ५।२।३४ ) झाला आहे.

४. येथें 'आशिषि च' ( ३।१।१५० ) या सूत्रानें वुन् प्रत्यय झाला आहे.

५. अनजादौ च ( ५।३।८३ भा. वा. ) यानें येथें दत्ता या उत्तरपदाचा लोप झाला आहे.

दासी ॥

**वर्णका तान्तवे ॥ ७ ॥**

वर्णका तान्तव उपसंख्यानं कर्तव्यम् । वर्णका । तान्तव इति किमर्थम् । वर्णिका भागुरी लोकायतस्य ॥

**वर्तका शकुनौ प्राचाम् ॥ ८ ॥**

वर्तका शकुनौ प्राचामुपसंख्यानं कर्तव्यम् । वर्तका शकुनिः । शकुनाविति किमर्थम् । वर्तिका भागुरी लोकायतस्य । प्राचामिति किमर्थम् । वर्तिका ॥

**अष्टका पितृदेवत्ये ॥ ९ ॥**

अष्टका पितृदेवत्य उपसंख्यानं कर्तव्यम् । अष्टका । पितृदेवत्य इति किमर्थम् । अष्टिका खारी ॥

**वा सूतकापुत्रकावृन्दारकाणाम् ॥ १० ॥**

वा सूतकापुत्रकावृन्दारकाणामुपसंख्यानं कर्तव्यम् । सूतका सूतिका । पुत्रका पुत्रिका । वृन्दारका वृन्दारिका ॥

**उदीचामातः स्थाने यकपूर्वायाः ॥७।३।४६॥**

किमर्थं स्त्रीलिङ्गनिर्देशः क्रियते न यकपूर्वस्येत्येवोच्येत । स्त्रीविषयो य आकारस्तस्य स्थाने योऽकारस्तस्य प्रतिषेधो यथा स्यात् । इह मा भूत् । शुभं यातीति शुभंयाः शुभं-

---

म्हणावें; उदा० तारका.

'ज्योति अर्थ असतांना' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

ज्योति अर्थ नसेल तेथें इत्त्व होतेंच; उदा० तारयतीति तारिका दासी.

(वा. ७ ) तन्तुविकार हा अर्थ गम्यमान असेल तर वर्णका शब्दांतील अकाराला इत्त्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० वर्णका[६].

'तन्तुविकार अर्थ पाहिजे' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

'वर्णिका[७] भागुरी लोकायतस्य' येथें इत्त्व झालें पाहिजे याकरितां म्हटलें आहे.

(वा. ८) पूर्वेकडील देशांमध्यें पक्षी हा अर्थ गम्यमान असतांना वर्तका शब्दामधील अकाराला इत्त्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० वर्तका शकुनिः.

'पक्षी हा अर्थ गम्यमान असतां' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

'वर्तिका[८] भागुरी लोकायतस्य' येथें इत्त्व झालें पाहिजे याकरितां म्हटलें आहे.

'पूर्वेकडील देशांमध्यें' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

इतर देशांमध्यें वर्तिका असेंच एका पक्ष्याला म्हणतात.

(वा. ९ ) पितृदेवतेला उद्देशून केलें जाणारें कर्म हा अर्थ गम्यमान असतांना अष्टका शब्दामध्यें अकाराला[९] इत्त्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० अष्टका.

'पितृदेवतेला उद्देशून केलें जाणारें कर्म हा अर्थ गम्यमान असतांना' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

'अष्टिका[१०] खारी' येथें इत्त्व व्हावें याकरितां म्हटलें आहे.

(वा. १०) सूतका, पुत्रका आणि वृन्दारका या शब्दांतील ककाराच्या पूर्वीच्या अकाराला इत्त्व विकल्पानें होतें असें म्हणावें; उदा० सूतका सूतिका, पुत्रका पुत्रिका, वृन्दारका वृन्दारिका.

(सू. ४६) येथें यकपूर्वायाः अशी 'यकपूर्वा' या स्त्रीलिंगी शब्दाची षष्ठी कशाकरितां घातली आहे ? तशी घालूं नये. यकपूर्वस्य असेंच म्हणावें.

स्त्रीलिंगाला दाखविणारा जो आकार म्हणजे आप् प्रत्यय त्याचे स्थानीं जो ऱ्हस्व अकार त्यालाच हा एकदां होणारा इत्त्वाचा निषेध

---

६. महत्त्व वगैरे गुण दाखविणारें शालीसारखें वस्त्र.

७. लोकायत मताचें वर्णन करणारी भागुरी स्त्री.

८. लोकायत मताला अनुसरणारी भागुरी स्त्री.

९. अष्टका नांवाचें एक विशेष प्रकारचें श्राद्ध आहे.

१०. अष्टिका म्हणून एक प्रकारचें परिमाण 'दीडमणी' आहे.

१. (४६) 'प्रत्ययस्थात्०' या सूत्रानें ज्या अकाराला इत्त्व होतें तो अकार जर आप् प्रत्ययाचे स्थानीं झाला

यिका मद्रंयिका ॥

**यकपूर्वे धात्वन्तप्रतिषेधः ॥ १ ॥**

यकपूर्वे धात्वन्तप्रतिषेधो वक्तव्यः । किं प्रयोजनम् । सुनयिका अशोकिका अपाकिका ॥

**भस्त्रैषाजाज्ञाद्वास्वा नञ्पूर्वाणामपि ॥ ७।३।४७ ॥**

एषाद्वे नञ्पूर्वे अनुदाहरणे ॥ असुप इति प्रतिषेधात् ॥

अथ भस्त्राग्रहणं किमर्थं नाभाषितपुंस्काद्दित्येव सिद्धम् ॥

**भस्त्राग्रहणमुपसर्जनार्थम् ॥ १ ॥**

उपसर्जनार्थोऽयमारम्भः । अभस्त्रिका अभस्त्रका ॥

**नञ्पूर्वग्रहणानर्थक्यं चोत्तरपदमात्रस्येद्वचनात् ॥२॥**

नञ्पूर्वग्रहणं चानर्थकम् । किं कारणम् । उत्तरपदमात्रस्येद्वचनात् । उत्तरपदमात्रस्येत्त्वं वक्तव्यम् । निर्भस्त्रका निर्भस्त्रिका । बहुभस्त्रका बहुभस्त्रिका ॥

---

झाला पाहिजे. शुभं याति शुभंयाः शुभंयिका. तसेंच भद्रंया शब्दाचें भद्रयिका. येथें इत्त्वाचा विकल्प होत नाहीं.

(वा. १) 'अकाराचे पूर्वी यकार किंवा ककार असेल तर' असें जेथें म्हटलें आहे तेथील यकार किंवा ककार धातूच्या शेवटचे वर्ण नसावे असें म्हणावें.

याचा काय उपयोग ?

सुनयिका, अशोकिका, अपाकिका, येथें इत्त्व नित्यच होतें.

(सू. ४७) ह्या सहा शब्दांपैकीं एषा आणि द्वा या दोन शब्दांचीं उदाहरणें नञ्तत्पुरुषाचीं संभवत नाहींत. कारण त्या ठिकाणीं आप् प्रत्यय सुपाच्या पुढेंच नियमानें येत असल्यामुळें असुपः हा निषेध येतो.

आतां या सूत्रामध्यें भस्त्रा शब्द कशाकरितां घातला आहे ? तो घालावयास नको. कारण त्या शब्दांतील अकाराला इत्त्व 'अभाषितपुंस्काच्च' या पुढील सूत्रानेंच सिद्ध होत आहे.

(वा. १) भस्त्रा शब्द हा ज्या सामासिक शब्दामध्यें विशेषण होत असेल त्या ठिकाणीं इत्त्व होण्याकरितां येथें भस्त्रा शब्द घातला आहे; उदा० अभस्त्रिका, अभस्त्रका.

(वा. २) ह्या सूत्रामध्यें नञ्पूर्वाणाम् असें जें म्हटलें आहे त्याचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं हे शब्द उत्तरपद असले म्हणजे तशा सर्वच ठिकाणीं इत्त्व होतें असें म्हटलें पाहिजे; उदा० निर्भस्त्रका, निर्भस्त्रिका;

---

असेल आणि अकाराच्या पूर्वी यकार किंवा ककार असेल तर त्याला इत्त्व विकल्पानें होतें.

२. शुभंया आणि भद्रंया या शब्दांहून 'अज्ञात' या अर्थी कन् प्रत्यय (५।३।७३), मागें ऱ्हस्व (७।४।१३), पुढें टाप् (४।१।४) अशीं कार्यें झालीं आहेत. येथें इत्त्व नित्य होतें.

१. (सू. ४७) भस्त्रा, एषा, अजा, ज्ञा, द्वा आणि स्वा या शब्दांतील आप् प्रत्ययाचे स्थानीं झालेला आणि ककाराच्या पूर्वी असणारा असा जो ऱ्हस्व अकार त्याला इत्त्व विकल्पानें होतें, आप् प्रत्यय पुढें असतांना, आणि तो आप् प्रत्यय सुपाच्या पुढें नसला पाहिजे.

२. कारण, हे दोन शब्द सर्वनामसंज्ञक असल्यामुळें क प्रत्ययाचा बाध करून अकच् (५।३।७१) होतो व तो त्या शब्दांमध्येंच शिरतो, तेव्हां समास करतेवेळीं उत्तरपदाच्या पुढें केलेला जो सुप् प्रत्यय त्याची प्रत्ययलक्षणानें जी कल्पना होते ती आप् प्रत्ययाच्या मागें अगदीं जवळ होते.

३. कारण भस्त्रा हा शब्द नित्यस्त्रीलिंगी आहे.

४. येथें नञाचा भस्त्रा शब्दाबरोबर बहुव्रीहि समास केला असल्यामुळें हा सामासिक शब्द नित्यस्त्रीलिंगी नाहीं म्हणून पुढील सूत्रानें येथें सिद्धि होत नाहीं.

**[ अभाषितपुंस्काच्च ॥७।३।४८॥**
**आदाचार्याणाम् ॥ ७।३।४९ ॥ ]**

**इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये सप्तमस्याध्यायस्य तृतीये पादे प्रथममाह्निकम् ॥**

---

बहुभस्त्रका, बहुभस्त्रिका.

याप्रमाणें भगवान् पतञ्जलींनीं रचलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सातव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

१. ( सू. ४८ ) नित्यस्त्रीलिंगी शब्दाहून केलेला जो आप् प्रत्यय त्याचे स्थानीं झालेला आणि ककाराच्या पूर्वी असणारा असा जो ऱ्हस्व अकार त्याला इत्त्व विकल्पानें होतें, आप् प्रत्यय पुढें असतांना, आणि तो आप् प्रत्यय सुपाच्या पुढें नसला पाहिजे; उदा० खट्विका, खट्वका.

१. (सू. ४९) पूर्वसूत्राच्याच विषयामध्यें त्या ऱ्हस्व अकाराला दीर्घ आकार आदेश आचार्यांच्या मतानें होतो; इतरांच्या मतानें होत नाहीं; म्हणजे तसेंही रूप एकदां होतें; उदा० खट्वाका.



**ठस्येकः ॥ ७।३।५० ॥**

किमिदं ठादेशे वर्णग्रहणमाहोस्वित्संघातग्रहणम् । कश्चात्र विशेषः ।

**ठादेशे वर्णग्रहणं चेद्धात्वन्तस्य प्रतिषेधः ॥ १ ॥**

ठादेशे वर्णग्रहणं चेद्धात्वन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । पठिता पठितुम् ॥ अस्तु तर्हि संघातग्रहणम् ।

**संघातग्रहणं चेदुणादिमाथितिकादीनां प्रतिषेधः ॥ २ ॥**

संघातग्रहणं चेदुणादिमाथितिकादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । उणादीनां तावत् । कण्ठः वण्ठः शण्ठः । इह च मथितं पण्यमस्य माथितिक इत्यकारलोपे कृते तान्तादिति कादेशः प्राप्नोति । वर्णग्रहणे पुनः सत्यल्विधिरयं भवति ॥

**तस्माद्विशिष्टग्रहणम् ॥ ३ ॥**

तस्माद्विशिष्टस्य ठकारस्य ग्रहणं कर्तव्यम् ॥

न कर्तव्यम् । अस्तु तावद्वर्णग्रहणम् । ननु चोक्तं ठादेशे वर्णग्रहणं चेद्धात्वन्तस्य

---

(सू. ५०) या सूत्रानें जो हा 'ठ'ला इक आदेश सांगितला आहे तो फक्त ठकार या एका वर्णालाच करावयाचा[२] किंवा ठकार आणि अकार मिळून ठ या समुदायाला करावयाचा[३] ?

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

(वा. १) येथें ठस्य या पदानें केवळ ठ वर्णाचेंच ग्रहण करावयाचें असेल तर धातूच्या शेवटीं असलेल्या ठ वर्णाला हा आदेश होत नाहीं असा निषेध केला पाहिजे; उदा० पठति, पठितुम्.

तर मग ठ वर्ण आणि अकार मिळून ठ या समुदायाचेंच येथें ग्रहण करावें.

(वा. २) ठ वर्ण आणि अकार मिळून समुदायाचें ग्रहण असेल तर उणादि प्रत्ययांना आणि माथिति वगैरे शब्दामध्यें इक हा आदेश होत नाहीं असा निषेध केला पाहिजे. उणादि प्रत्ययाचें उदाहरण : कण्ठः[४], शण्ठः, पण्ठः. तसेंच मथितं पण्यमस्य माथितिकः येथें मथित शब्दाहून ठक् प्रत्यय (४।४।५१) करून त्याला प्रकृत सूत्रानें इक आदेश केल्यानंतर मथित शब्दातील शेवटच्या अकाराचा लोप (६।४।४८) केल्यानंतर मथित् हें तकारान्त झालें आहे; म्हणून पुढील सूत्रानें क आदेश प्राप्त होतो. कारण इक आदेश हा ठ आहे असें स्थानिवद्भावानें (१।१।५६) मानतां येतें. आता येथें ठस्य हें केवळ वर्णाचेंच ग्रहण केलें आहे असें मानलें म्हणजे मात्र क आदेश हा अल्विधि होत असल्यामुळें स्थानिवद्भाव होत नाहीं.

(वा. ३) तेव्हां येथें ठस्य असें मोघम म्हणून उपयोग नाहीं. तर विशिष्ट[५] ठ वर्णाचें ग्रहण केलें पाहिजे.

तसें करावयास नको. ठस्य हें केवळ ठवर्णाचेंच ग्रहण होऊं दे.

पण येथें केवळ ठवर्णाचेंच ग्रहण होत असेल तर धातूच्या शेवटीं असलेल्या ठवर्णाला हा आदेश होत नाहीं असा निषेध केला पाहिजे, असें आतांच म्हटलें आहे ना ?

---

१. ( सू. ५०) अंगसंज्ञेला निमित्त जो ठवर्णरूप प्रत्यय त्याला इक असा आदेश होतो.

२. या पक्षीं ठस्य येथें अकार उच्चारणार्थ घातला आहे असें समजावें. ठक्, ठञ्, वगैरे प्रत्यय सांगितले आहेत तेथेही अकार उच्चारणार्थच समजावा. ठकार मात्र प्रत्यय होतो. इक हा आदेश मात्र अकारान्त आहे.

३. या पक्षीं ठक, ठञ, वगैरे प्रत्ययही अकारान्तच समजावे.

४. कण् धातूहून ठ प्रत्यय ( उणा. १।१०३ ), शम् धातूहून ठ प्रत्यय ( उणा. १।१०४ ), पण् धातूहून ठ प्रत्यय अशा रीतीनें ठ प्रत्यय झाला आहे. हा प्रत्यय अकारान्त असल्यामुळें त्यांतील ठकार अंगसंज्ञेचें निमित्त होत नाहीं, म्हणून वर्णपक्षीं येथें दोष येत नाहीं.

५. तद्धितस्य ठादेरिकः असें सूत्र केलें पाहिजे. तद्धितस्य म्हणण्यानें कण्ठ वगैरे शब्दांमध्यें दोष येत नाहीं. ठादेः असें विशेषण म्हणून ठकाराचें आश्रयण केलें असल्यामुळें हा अल्विधि होतो, म्हणून माथितिकः येथें दोष येत नाहीं.

प्रतिषेध इति । नैष दोषः । अङ्गादिति वर्तते । न वा अङ्गादिति पञ्चम्यस्ति । एवं तर्हि प्रत्ययस्थस्येति वर्तते । क्व प्रकृतम् । प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्यात इदाप्यसुपः [ ७. ३. ४४ ] इति । तद्वै पञ्चमीनिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । अर्थाद्विभक्तिविपरिणामो भविष्यति । तद्यथा । उच्चानि देवदत्तस्य गृहाणि । आमन्त्रयस्वैनम् । देवदत्तमिति गम्यते । देवदत्तस्य गावोऽश्वा हिरण्यम् । आढ्यो वैधवेयः । देवदत्त इति गम्यते । पुरस्तात्षष्ठीनिर्दिष्टं सदर्थात्प्रथमानिर्दिष्टं द्वितीयानिर्दिष्टं च भवति । एवमिहापि पुरस्तात्पञ्चमीनिर्दिष्टं सदर्थात्षष्ठीनिर्दिष्टं भविष्यति । एवमप्युणादीनां प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः । उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि । एवमपि कर्मठ इत्यत्र प्राप्नोति । एवं तर्ह्यङ्गस्येति संबन्धषष्ठी विज्ञायते । अङ्गस्य यष्ठकारः । किं चाङ्गस्य ठकारः । निमित्तम् । यस्मिन्नङ्गमित्येतद्भवति । कस्मिंश्चैतद्भवति । प्रत्यये ॥ अथवा पुनरस्तु संघा-

हा दोष येत नाहीं. कारण अङ्गात् असें पद येथें मागाहून अनुवृत्तीनें येत आहे.[६]

पण मागाहून अङ्गस्य असा अधिकार चालू आहे; तेथें अङ्गात् अशी पञ्चमी नाहीं.

तर मग प्रत्ययस्थस्य या पदाची अनुवृत्ति येथें आणली म्हणजे दोष येणार नाहीं.

पण प्रत्ययस्थस्य असें पद मागें कोणत्या सूत्रांत आहे ?

प्रत्ययस्थात् कात्पूर्वस्यात इदाप्यसुपः ( ७।३।४४) या सूत्रामध्यें आहे.

पण त्या सूत्रामध्यें प्रत्ययस्थात् अशी पंचमी आहे; आणि येथें तर प्रत्ययस्थस्य अशी षष्ठी पाहिजे.

षष्ठी पाहिजे तर विभक्तीची बदल होऊन प्रत्ययस्थस्य अशी षष्ठी घेतां येईल. असें पहा की ' 'हीं पुढें दिसणारीं उंच घरें देवदत्ताचीं आहेत', 'त्याला बोलवा ' अशीं दोन वाक्यें उच्चारलीं असतां पुढील वाक्यांतील 'त्याला' या पदाने देवदत्ताचा जो परामर्श होतो तो ' देवदत्ताचीं' असा षष्ठी विभक्तीनें न होतां ' देवदत्ताला ' असा द्वितीया विभक्तीनें होतो. तसेंच ' ह्या गाई, हे घोडे, हें सर्व द्रव्य देवदत्ताचें आहे'; 'हा विधवेचा पुत्र (राडलेक) मोठा संपन्न आहे' अशीं दोन वाक्यें उच्चारलीं असतां पुढील वाक्यांत पुत्र हा देवदत्तच मनात येतो. पण तो तेथें ' देवदत्ताचें ' असा षष्ठी विभक्तीनें न येतां 'देवदत्त' असा प्रथमा विभक्तीनेंच मनात येतो. याप्रमाणेंच येथेही पूर्वी जरी 'प्रत्ययस्थात्' अशी पंचमी आहे तरी येथें अर्थाच्या धोरणानें षष्ठी घेतां येईल.

तरी पण उणादि प्रत्ययांतील ठ वर्ण प्रत्ययस्थ असल्यामुळें त्या ठिकाणीं ह्या इक आदेशाचा निषेध केला पाहिजे.

हा दोष येत नाहीं. कारण, उणादि प्रत्ययांची कल्पना करून साधले जाणारे शब्द मूळचे अव्युत्पन्न म्हणजे प्रकृतिप्रत्ययकल्पना नसलेले असेच समजावे.

तरी पण कर्मठः[७] येथें इक आदेश होईल असा दोष येतोच.

तर मग अङ्गस्य असें षष्ठीविभक्तीनें उच्चारलेलें पद येथें अनुवृत्त करावें, आणि षष्ठीचा अर्थ संबंध घेऊन अगाचा जो ठवर्ण असा अर्थ करावा.

अङ्गाचा ठवर्ण म्हणजे कसा समजावा ?

जो अङ्गाचा निमित्त म्हणजे जो पुढें असल्यामुळें पूर्वीच्या भागाला अङ्ग असें म्हणतां येतें तो.

कशा प्रकारचा ठवर्ण पुढें असल्यामुळें पूर्वीच्या भागाला अङ्ग म्हणतां येतें ?

तो ठकार प्रत्यय असेल तर तसें म्हणतां

६. पठ् वगैरे धातूंमध्यें ठ वर्णाच्या मागें अंग नाहीं म्हणून दोष येत नाहीं.

७. येथें कर्मन् शब्दाहून अठच् प्रत्यय ( ५।२।३५ ) झाला आहे.

तग्रहणम् । ननु चोक्तं संघातग्रहणं चेदुणादिमाथितिकादीनां प्रतिषेध इति । उणादीनां तावत्प्रतिषेधो न वक्तव्यः । परिहृतमेतदुणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानीति । यदप्युच्यत इह च मथितं पण्यमस्य माथितिक इत्यकारलोपे कृते तान्तादिति कादेशः प्राप्नोतीति नैष दोषः । अकारलोपस्य स्थानिवद्भावान्न भविष्यति । न सिध्यति । पूर्वविधौ स्थानिवद्भावो न चायं पूर्वविधिः । अयमपि पूर्वविधिः । पूर्वस्मादपि विधिः पूर्वविधिरिति ॥ अथाप्युणादयो व्युत्पाद्यन्त एवमपि न दोषः । क्रियते न्यास एव विशिष्टग्रहणं ठस्येति ॥

## इसुसुक्तान्तात्कः ॥ ७।३।५१ ॥

इह कस्मान्न भवति । आशिषा तरत्याशिषिकः । उषा तरत्यौषिकः । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥ अथेह कथं भवितव्यम् । दोर्भ्यां तरति । दौष्क इति

---

येते[८] (१।४।१३).

अथवा ठ्+अ ह्या समुदायाचेंच येथें ग्रहण केलें आहे असेंच असू दे.

पण समुदायाचें ग्रहण केलें तर उणादि प्रत्ययांना आणि माथितिक वगैरे शब्दांमध्यें इक हा आदेश होत नाहीं असा निषेध केला पाहिजे, असें आतांच म्हटलें आहे ना ?

म्हटलें आहे खरें. पण त्यापैकीं उणादि प्रत्ययांना तर निषेध करावयास नकोच. कारण त्याचा परिहार आतांच केला आहे. तो असा कीं उणादि प्रत्ययांची कल्पना करून साधले जाणारे शब्द मूळचे अव्युत्पन्नच समजावे. तसेंच माथितिकः येथें मथित शब्दाहून ठक् प्रत्यय करून त्याला प्रकृत सूत्रानें इक आदेश केल्यानंतर शेवटच्या अकाराचा लोप झाल्यामुळें मथित् हें तकारान्त होतें, म्हणून पुढील सूत्रानें क आदेश प्राप्त होतो, असें जें म्हटलें आहे, तोही दोष येत नाहीं. कारण अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव (१।१।५७) झाल्यामुळें तें तकारान्त आहे असें समजतां येत नाहीं; म्हणून क आदेश होणार नाहीं.

पण अशा रीतीनें हें रूप सिद्ध होणार नाहीं. कारण तो स्थानिवद्भाव पूर्वाला विधि कर्तव्य असेल तरच होत असतो आणि येथें क आदेश हा जो विधि कर्तव्य आहे तो पूर्वाला नाहीं; इक ह्या पुढील प्रत्ययाला होणारा आहे.

तसा असला तरी देखील त्याला पूर्वविधि म्हणतां येते. कारण पूर्वविधि या शब्दामध्यें पञ्चमीतत्पुरुष समासही येथें आहे : पूर्वस्मात् विधिः पूर्वविधिः. तसेंच उणादि प्रत्ययांची कल्पना करून साधले जाणारे शब्द तसेंच साधलेले गृहीत धरावे असा पक्ष गृहीत धरला तरीही येथें दोष येत नाहीं. कारण येथें विशिष्ट ठकाराचें ग्रहण करावें असें सांगितलेंच आहे.

(सू. ५१) आशिषा तरति आशिषिकः, उषा तरति औषिकः, येथें हा क आदेश कां होत नाहीं ?

'ज्या ठिकाणीं लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त ह्या दोघांचें ग्रहण संभवतें तेथें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण होतें ' या परिभाषेनें हा दोष येत नाहीं.

आतां दोर्भ्यां तरति या अर्थी दोस् शब्दाहून

---

८. प्रत्ययांतील सुद्धां ठ वर्ण अंगसंज्ञेच्या उपयोगीं पडत नाहीं. तर ठ वर्ण एवढाच प्रत्यय असला पाहिजे (१।४।१३).

९. तेव्हां पूर्वींचा जो मथित् हा भाग त्याहून पुढच्या इक या भागाला होणारा जो क आदेश त्यालाही पूर्वविधि असें म्हणतां येतें; म्हणून स्थानिवद्भाव होण्यास हरकत नाहीं.

१. (सू. ५१.) इस्, उस्, उ, ऋ, ल आणि त् हे शेवटीं असलेल्या अंगाच्या पुढील ठ वर्णाला क आदेश होतो.

२. सर्पिष्कः, धानुष्कः, या उदाहरणांमध्यें सृप् धातूहून इस् प्रत्यय (उणा. २।१०८) आणि धन् धातूहून उस् प्रत्यय (उणा. २।११७) होऊन सर्पिस् आणि धनुस् हे शब्द साधले आहेत. त्यांच्या पुढें तरति या अर्थी ठक् प्रत्यय (४।४।५) होतो; आणि प्रकृत सूत्रानें क आदेश होतो. येथें इस् व उस् प्रतिपदोक्त आहेत. कारण तशा स्वरूपाचेच ते प्रत्यय आहेत.

भवितव्यम् । कथम् । यदि वर्णैकदेशा वर्णग्रहणेन गृह्यन्ते ॥

[ चजोः कुघिण्ण्यतोः ॥ ७।३।५२ ॥
न्यङ्क्वादीनां च ॥ ७।३।५३ ॥ ]
हो हन्तेर्ञ्णिन्नेषु ॥ ७।३।५४ ॥

किमिदं ञ्णिन्नकारग्रहणं हन्तिविशेषणम् । ञ्णिन्नकारपरस्य हन्तेर्यो हकार इति । आहोस्विद्धकारविशेषणम् । ञ्णिन्नकारपरस्य हकारस्य स चेद्धन्तेरिति । कश्चात्र विशेषः ।

हन्तेस्तत्परस्येति चेन्नकारेऽप्रसिद्धिः ॥ १ ॥

हन्तेस्तत्परस्येति चेन्नकारेऽप्रसिद्धिः । घ्नन्ति घ्नन्तु अघ्नन् ॥ अस्तु तर्हि हकारविशेषणम् ।

हकारस्येति चेञ्ञ्णित्यप्राप्तिः ॥ २ ॥

हकारस्येति चेञ्ञ्णित्यप्राप्तिः । घातयति घातकः । किं कारणम् । नकारेण व्यवहित-

---

ठक् प्रत्यय (४।४।५) केला असतां कसें रूप होतें ?

दौष्कः असें व्हावें.

ते कसें ?

'वर्णाच्या एकदेशाचें स्वतंत्र वर्णाप्रमाणें ग्रहण केलें जातें' अशी परिभाषाच जर आहे तर तसें रूप होणारच.

(सू. ५४) ञकारेत्संज्ञक किंवा णकारेत्संज्ञक असलेला प्रत्यय आणि नकार अशीं जीं तीन निमित्तें येथें दृष्टीस पडतात त्यांचा संबंध हन् धातूकडे करावयाचा, म्हणजे 'ञित्, णित् आणि नकार पुढें असलेला जो हन् धातु त्याच्या हकाराला' असा अर्थ करावयाचा, किंवा त्या निमित्तांचा संबंध हकाराकडे करावयाचा, म्हणजे 'ञित्, णित् आणि नकार हे पुढें असलेला जो हन् धातूचा हकार त्याला' असा अर्थ करावयाचा? या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

(वा. १) तीं निमित्तें पुढें असलेला जो हन् धातु असें म्हटलें तर नकार पुढें असलेला हन् धातु कोठेंच प्रसिद्ध नाहीं. नकाराचीं उदाहरणें पहा : घ्नन्ति, घ्नन्तु, अघ्नन्.

तर मग हन् धातूच्या हकाराकडेच त्या निमित्तांचा संबंध असूं दे.

(वा. २) हकाराकडे संबंध केला तर ञकार किंवा णकार इत्संज्ञक असलेला प्रत्यय हकाराच्या पुढें नसल्यामुळें तेथें कुत्व होणार नाहीं; उदा० घातयति, घातकः.

काय कारण ?

कारण असें कीं ञित् किंवा णित् आणि हन् धातूचा हकार यांमध्यें नकारानें व्यवधान होत असल्यामुळें कुत्व होणार नाहीं.

---

आशिषिकः येथें आउपसर्गपूर्वक शास् धातूहून क्विप् प्रत्यय करून शास् धातूच्या आकाराला इकार ( ६।४।३४ वा. १ ) झाला आहे; तो इकार आणि शास् धातूमधील शेवटचा सकार मिळून येथें इस् होतो तो लाक्षणिक होय. तसेंच वस् धातूहून क्विप् प्रत्यय झाला आहे आणि धातूच्या वकाराला संप्रसारणानें उकार ( ६।१।१५ ) झाला आहे; तो उकार आणि वस् धातूमधील शेवटचा सकार मिळून येथें उस् होतो तो लाक्षणिक होय. म्हणून त्या आशिस् आणि उस् ह्या शब्दांहून ठक् प्रत्यय ( ४।४।५ ) केला असतां प्रकृत सूत्रानें क आदेश होत नाहीं.

१. दोस् शब्दामध्यें जो ओकार आहे तो संध्यक्षर आहे, म्हणजे अ आणि उ या दोन वर्णांचा ओकार बनतो. त्या ओ या वर्णाचे जे दोन एकदेश अ आणि उ त्यांतील उकार हा स्वतंत्र वर्णासारखा समजला तर दोस् शब्दांतील शेवटचा भाग धनुस् शब्दाप्रमाणें उस् असा असल्यामुळें प्रकृत सूत्रानें क आदेश होणार आहे.

१. ( सू. ५२ ) घकार इत्संज्ञक असलेला प्रत्यय किंवा ण्यत् प्रत्यय पुढें असतांना धातूच्या शेवटच्या चकाराला आणि जकाराला कवर्गादेश होतो; उदा० पाकः, त्यागः.

१. ( सू. ५३ ) न्यङ्कु वगैरे शब्द कवर्गादेश होऊनच सिद्ध झाले आहेत असें समजावें; उदा० न्यङ्कुः.

१. ( सू. ५४ ) हन् धातूच्या हकाराला कवर्ग म्हणजे घकारादेश होतो, ञकारेत्संज्ञक किंवा णकारेत्संज्ञक असलेला प्रत्यय हन् धातूच्या पुढें असेल तर किंवा हन् धातूंतील हकाराच्या पुढें नकार असेल तर.

स्यान्न प्राप्नोति ॥ वचनाद्भविष्यति । इहापि वचनात्प्राप्नोति । हननमिच्छति हननीयति हननीयतेर्ण्वुल् हननीयक इति ॥

**स्थानिवद्भावाच्चाचो नकारेऽप्रसिद्धिः ॥ ३ ॥**

स्थानिवद्भावाच्चाचो नकारेऽप्रसिद्धिः । घ्नन्ति घ्नन्तु ॥ वचनाद्भविष्यति ।

**वचनप्रामाण्यादिति चेदलोपे प्रतिषेधः ॥ ४ ॥**

वचनप्रामाण्यादिति चेदलोपे प्रतिषेधो वक्तव्यः । हन्ता हन्तुम् ॥ नकारग्रहणसामर्थ्यादलोपे न भविष्यति । अस्त्यन्यन्नकारग्रहणस्य प्रयोजनम् । किम् । श्रूयमाणविशेषणम् । यत्र नकारः श्रूयते तत्र यथा स्यात् । इह मा भूत् । हतः हथ इति ॥

**सिद्धं तूपधालोप इति वचनात् ॥५॥**

सिद्धमेतत् । कथम् । उपधालोपे चेति वक्तव्यम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं हन्तेस्तत्परस्येति चेन्नकारेऽप्रसिद्धिरिति । वचनाद्भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु हकारविशेषणम् । ननु चोक्तं हकारस्येति चेञ्ञ्णित्यप्राप्तिरिति।

---

पण तसें झालें तर ञित् आणि णित् यांना कोठेंच उदाहरण मिळणार नाहीं. तेव्हां वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपेल.

असें असेल तर हननमिच्छति हननीयति, हनन या शब्दाहून क्यच् प्रत्यय ( ३।१।८ ) करून त्या हननीय या धातूहून ण्वुल् प्रत्यय ( ३।१।१३३ ) केला म्हणजे हननीयक असा जो शब्द सिद्ध होतो तेथेंही वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपेल आणि कुत्व होऊं लागेल.

( वा. ३ ) शिवाय घ्नन्ति, घ्नन्तु, येथें अचाच्या लोपाला ( ६।४।९८ ) स्थानिवद्भाव (१।१।५७ ) होऊन व्यवधान येत असल्यामुळें नकाराचेंही उदाहरण मिळत नाहीं.

वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपेल आणि तेथें कुत्व होईल.

( वा. ४ ) वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपत असेल तर हन्ता, हन्तुम्, अशा ज्या उदाहरणांमध्यें अकाराचा लोप होत नाहीं तेथें कुत्व होत नाहीं असा निषेध करावा लागेल.

नकार हें जें निमित्त धरलें आहे तें व्यर्थ होईल[2] म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव अकाराचा लोप जेथें होत नाहीं तेथें कुत्व होणार नाहीं.

पण नकार हें निमित्त धरण्याचा उपयोग निराळा संभवत आहे.

तो कोणता ?

तो उपयोग असा कीं नकार हा श्रूयमाण पाहिजे; ह्मणजे ज्या ठिकाणीं नकार कायम राहतो तेथेंच कुत्व झालें पाहिजे; ज्या ठिकाणीं नकाराचाच लोप होतो अशा हतः व हथः या उदाहरणांमध्यें कुत्व न झालें पाहिजे.

(वा. ५) हें सर्व सिद्ध होत आहे.

तें कसें ?

सूत्रामध्यें जें नकार हें निमित्त धरलें आहे तें काढून टाकून त्याच्या ऐवजीं उपधालोपे असें ह्मणावें.

असें म्हटलें असतां सर्व सिद्ध होईल खरें, पण मूळचें सूत्र फिरवावें लागणार आहे.

तर मग सूत्र मूळचें आहे तसेंच असूं दे.

पण निमित्ताचा संबंध हन् धातूकडे केला तर नकार पुढें असलेला हन् धातु घ्नन्ति वगैरे उदाहरणांमध्यें संभवत नाहीं, असें आतांच सांगितलें आहे ना ?

वचनसामर्थ्यास्तव नकाराचा संबंध हन् धातूच्या हकाराकडे करतां येईल.

अथवा ञित् , णित् आणि नकार या तिन्ही निमित्तांचा हकाराकडेच संबंध असूं दे.

पण तसें केलें तर घातयति इत्यादि उदा-

---

२. कारण , मधल्या अकाराचा लोप झाला म्हणजे तेथेंच हकाराच्या पुढें नकार संभवतो आणि तेथेंच नकार या निमित्तानें कुत्व होतें. पण जर अकाराचा लोप झाला तरी कुत्व होणार आणि न झाला तरी होणार, तर अर्थातच नकार हें निमित्त धरण्यांत कांहीं फायदा दिसत नाहीं.

३. हन् धातूची उपधा म्हणजे अकार, त्याचा लोप झाला असतांना हकाराला कुत्व होतें, असा अर्थ होय.

वचनाद्भविष्यति । ननु चोक्तमिहापि वचनात्प्राप्नोति हननीयक इति । नैष दोषः । येन नाव्यवधानं तेन व्यवहितेऽपि वचनप्रामाण्यात् । न च क्वचिद्धात्ववयवेनाव्यवधानमेतेन पुनः संघातेन व्यवधानं भवति न च भवति ॥ यदप्युच्यते स्थानिवद्भावाद्घ्नाचो नकारेऽप्रसिद्धिरिति वचनाद्भविष्यति । ननु चोक्तं वचनप्रामाण्यादिति चेदलोपे प्रतिषेध इति । नैष दोषः । आनन्तर्यमिहाश्रीयते हकारस्य नकार इति । क्वचिच्च संनिपातकृतमानन्तर्यं शास्त्रकृतमनानन्तर्यं क्वचिच्च न संनिपातकृतं नापि शास्त्रकृतम् । लोपे संनिपातकृतमानन्तर्यमलोपे नैवं संनिपातकृतं नापि शास्त्रकृतम् । यत्र कुतश्चिदेवानन्तर्यं तदाश्रयिष्यामः ॥

## अभ्यासाच्च ॥ ७।३।५५ ॥

### अभ्यासात्कुत्वमसुपः ॥ १ ॥

अभ्यासात्कुत्वमसुप इति वक्तव्यम् । इह मा भूत् । हननमिच्छति हननीयति हननीयतेः सन् जिहननीयिषतीति ॥ तत्तर्हि

---

हरणांमध्यें जित् किंवा णित् प्रत्यय आणि हकार यांमध्यें व्यवधान असल्यामुळे कुत्व होणार नाहीं, असे आतांच सांगितलें आहे ना ?

वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपेल असेंही सांगितलेंच आहे.

पण व्यवधान खपतें असें असेल तर हननीयकः येथेंही कुत्व होऊं लागेल, असा दोष दाखविलाच आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपतें' हें खरें, पण जेवढ्या भागानें व्यवधान नाहीं असें कधींच होत नाहीं तेवढ्याच भागानें नाइलाजास्तव व्यवधान खपतें. हकार आणि जित् किंवा णित् प्रत्यय यांमध्यें धातूमधील अन् या भागानें व्यवधान नाहीं असें कोठेंच होत नाहीं; म्हणून धातूमधील कांहीं भाग मध्यें असला तरी चालेल आणि हननीयकः येथें धातूच्या भागापेक्षा अधिक अशा अनीय या समुदायानें व्यवधान आहे. असें अधिक वर्णांनीं व्यवधान कोठें असतें आणि कोठें नसतें; तेव्हां अर्थातच तें खपणार नाहीं.

तसेंच 'घ्नन्ति वगैरे उदाहरणांमध्यें अकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव होऊन व्यवधान येत असल्यामुळें नकाराचें उदाहरण अव्यवहित मिळत नाहीं' असें जें म्हटलें आहे त्यासंबंधानेंही असें म्हणतां येईल कीं वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपतें.

पण वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपत असेल तर ज्या ठिकाणीं अकाराचा लोप होत नाहीं अशा हन्ता वगैरे उदाहरणांमध्यें कुत्वाचा निषेध करावा लागेल असेंही सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण नकार पुढें असतांना हकाराला कुत्व होतें असें येथें हकार आणि नकार यांचें सामीप्य गृहीत धरलें आहे. तें सामीप्य कांहीं ठिकाणीं म्हणजे अकाराचा लोप झाल्यानंतर वस्तुतः खरेंच असतें. पण लोपाला स्थानिवद्भाव होत असल्यामुळें शास्त्रानें सामीप्य नाहीं असे म्हणतां येतें. तसेंच अकाराचा लोप होत नाहीं अशा ठिकाणीं त्या दोन वर्णांचें सामीप्य वस्तुतः खरें नाहींच; पण ज्या शास्त्राचे जोरावर मानतां येईल असें शास्त्रही नाहीं. तेव्हा अकाराचा लोप झाल्यानंतर शास्त्रानें सामीप्य नसलें तरी वस्तुतः खरें सामीप्य असतें. आणि लोप होत नाहीं अशा ठिकाणीं खरेंही सामीप्य नाहीं व शास्त्रानेंही नाहीं. अशा स्थितींत कोणत्या तरी एका बाजूनें सामीप्य असेल तेथें तें गृहीत धरून कुत्व करतां येईल.

(सू. ५५, वा. १) हें जें अभ्यासाच्या पुढील हकाराला कुत्व सांगितलें आहे तेथें तो हन् धातु सुबन्ताचा अवयव नसावा असें म्हणावें. कारण हननमिच्छन्ति हननीयति अशा हनन–अम् या सुबन्ताहून क्यच् प्रत्यय ( ३।१।८ ) केल्यानंतर हननीय या क्यच्प्रत्ययान्त धातूहून (३।१।३२) सन् प्रत्यय होऊन जें जिहननीयिषति असें रूप होतें तेथें प्रकृत सूत्रानें कुत्व न झालें पाहिजे.

---

१. (सू. ५५) अभ्यासापुढील हन् धातूच्या हकाराला कुत्व होतें.

वक्तव्यम् । न वक्तव्यम् । हन्तेरभ्यासादित्युच्यते न चैष हन्तेरभ्यासः । हन्तेरेषोऽभ्यासः । कथम् । एकाचो द्वे प्रथमस्य [ ६. १. १ ] इति । एवं तर्हि हन्तेरङ्गस्य योऽभ्यासस्तस्मादित्युच्यते न चैष हन्तेरङ्गस्याभ्यासः । हन्तेरङ्गस्यैषोऽभ्यासः । कथम् । एकाचो द्वे प्रथमस्येति । एवं तर्हि यस्मिन्हन्तिरङ्गं तस्मिन्योऽभ्यासस्तस्मादित्युच्यते यस्मिंश्चात्र हन्तिरङ्गं न तस्मिन्नभ्यासो यस्मिंश्चाभ्यासो न तस्मिन्हन्तिरङ्गं भवति ॥

## हेरचङि ॥ ७।३।५६ ॥

अचङीति किमर्थम् । प्राजीहयद्दूतम् ॥

**हेश्चङि प्रतिषेधानर्थक्यमङ्गान्यत्वात् ॥ १ ॥**

हेश्चङि प्रतिषेधोऽनर्थकः । किं कारणम् । अङ्गान्यत्वात् । ण्यन्तमेतदङ्गमन्यद्भवति । लोपे कृते नाङ्गान्यत्वम् । स्थानिवद्भावादङ्गान्यत्वमेव ॥

**ज्ञापकं त्वन्यत्र ण्यधिकस्य कुत्वविज्ञानार्थम् ॥ २ ॥**

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण हन् धातूचा जो अभ्यास असें येथें म्हटलें आहे आणि येथें तर हन् धातूचा अभ्यास नाहीं.[2]

हन् धातूचाच अभ्यास येथें आहे.

तो कसा ?

प्रथम एकाच् भागाला द्वित्व होतें (६।१।१) आणि येथें तर हन् धातु हाच प्रथम एकाच् भाग आहे.[3]

तर मग 'अङ्गसंज्ञक अशा हन् धातूचा जो अभ्यास ' असें येथें म्हटलें आहे आणि येथें तर हन् धातु अङ्गसंज्ञक नसल्यामुळें[4] अङ्गसंज्ञक अशा हन् धातूचा अभ्यास येथें नाहीं.

अङ्गसंज्ञक अशा हन् धातूचा अभ्यास येथें आहे

तो कसा ?

प्रथम एकाच् भागाला द्वित्व होतें, आणि येथें तर हन् हा जो प्रथम एकाच् भाग त्याला अंगसंज्ञा आहे.

तर मग ज्या प्रत्ययामुळें हन् धातूला अङ्गसंज्ञा होतें त्याच प्रत्ययामुळें द्वित्व होऊन झालेला जो हन् धातूचा अभ्यास त्याच्या पुढील हकाराला येथें कुत्व सांगितलें आहे आणि जिहनीयिषति येथें जो ल्युट् (म्ह०अन) प्रत्यय पुढें असतांना हन् धातूला अंगसंज्ञा होत आहे त्या ल्युट् प्रत्ययामुळे येथें अभ्यास नाहीं. कारण ल्युट् प्रत्यय द्वित्वाला कारण होत नाहीं. आणि ज्या सन् प्रत्ययामुळे द्वित्व होऊन हन् हा अभ्यास होतो त्या सन् प्रत्ययामुळे हन् धातूला येथें अंगसंज्ञा नाहीं. तेव्हां कांहीं दोष येत नाहीं.[5]

( सू० ५६ ) येथें ' चङ् प्रत्यय पुढें नसतांना ' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

प्राजीहयत् दूतम् येथे कुत्व न व्हावें याकरिता म्हटलें आहे.

( वा. १ ) हि या धातूच्या हकाराला कुत्व सांगतांना चङ् प्रत्यय पुढें नसावा असा निषेध केला आहे तो निरुपयोगी आहे.

काय कारण ?

कारण असें कीं येथें हि धातूला चङ् प्रत्ययामुळें अंगसंज्ञा नाहीं. तसें 'हायि' हें अङ्ग णिच्प्रत्ययान्त निराळें आहे.

पण णिच् प्रत्ययाचा लोप ( ६।४।५१ ) झाल्यानंतर निराळें अंग दिसत नाहीं ना ?

तरी पण स्थानिवद्भावामुळें ( १।१।५७ ) निराळें अंग समजण्यांत येणारच.

---

२. कारण, हननीयिष या सन्प्रत्ययान्त धातूचा अभ्यास आहे.

३. द्वित्व जरी हननीयिष या सन्नन्त धातूला होतें तरी तें हन् या भागालाच होतें.

४. सन् या प्रत्ययामुळें अंगसंज्ञा हननीय पर्यंतच्याला आहे, हन् धातूला नाहीं.

५. हन् धातूहून ल्युट् प्रत्यय केला असल्यामुळें ल्युट् प्रत्ययामुळें हन् धातूला अंगसंज्ञा आहे.

१. (सू. ५६ ) अभ्यासापुढील हि धातूच्या हकाराला कुत्व होतें, पण चङ् प्रत्यय पुढें नसला पाहिजे.

एवं तर्हि ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र ण्यधिकस्य कुत्वं भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । प्रजिघाययिषतीत्यत्र कुत्वं सिद्धं भवति ॥

**सन्लिटोर्जेः ॥ ७।३।५७ ॥**

**जिग्रहणे ज्यः प्रतिषेधः ॥ १ ॥**

जिग्रहणे ज्यः प्रतिषेधो वक्तव्यः । जिज्यतुः जिज्युरिति ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेत्येवमेतस्य न भविष्यति । सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या । अवश्यं कर्तव्या अध्याप्य गत इत्येवमर्थम् ॥

**[ विभाषा चेः ॥ ७।३।५८ ॥ ]**

**न क्वादेः ॥ ७।३।५९ ॥**

**क्वयजिव्रजियाचिरुचीनामप्रतिषेधो निष्ठायामनिटः कुत्ववचनात् ॥ १ ॥**

क्वयजिव्रजियाचिरुचीनामप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । कुत्वं कस्मान्न भवति । निष्ठायामनिटः कुत्ववचनात् । निष्ठायामनिटः कुत्वं वक्ष्यामि सेटश्चैते

---

(वा० २) तर मग येथें अचङि या निषेधावरून आचार्य असें ज्ञापन करतात कीं चङ् प्रत्ययाशिवाय इतर ठिकाणींही धातूपेक्षां णि प्रत्यय अधिक असला तरी कुत्व होतें.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं प्रजिघाययिषति येथें हि धातूच्या हकाराला कुत्व सिद्ध होतें.

( सू. ५७, वा. १ ) हें जें जि धातूच्या जकाराला कुत्व सांगितलें आहे, तें 'ज्या' या धातूला संप्रसारण होऊन जें 'जि' असें होतें त्याच्या जकाराला होत नाहीं, असा निषेध करावा. उदा०जिज्यतुः, जिज्युः.

तर मग तसा निषेध केला पाहिजे.

तसा निषेध करावयास नको. कारण 'ज्या ठिकाणीं लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त या दोघांचें ग्रहण संभवतें तेथें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण होतें' या परिभाषेमुळें या 'ज्या' धातूचें जें 'जि' हें लाक्षणिक रूप त्याच्या जकाराला प्रकृत सूत्रानें कुत्व होणारच नाहीं.

तर मग ती तशी परिभाषा केली पाहिजे.

जिज्यतुः येथें कुत्व न होण्याकरितां केली पाहिजे असें नाहीं, तर इतर ठिकाणींही त्या परिभाषेची जरूर आहेच; उदा०अध्याप्य गतः.

( सू. ५९, वा. १ ) ह्या कुत्वनिषेधाच्या प्रकरणामध्यें प्रकृत सूत्रानें कवर्ग आरंभीं असलेल्या धातूला, तसेंच अज् आणि व्रज् ( ७।३।६० ), तसेंच याच् आणि रुच् ( ७।३।६६ ) या धातूंना जो कुत्वाचा निषेध केला आहे तो करावयास नको. तो निषेध निरर्थक आहे.

तर मग त्या धातूंना कुत्व कां बरें होत नाहीं ?

निष्ठाप्रत्ययांमध्यें अनिट् जे धातू त्यांना कुत्व होतें असें म्हटलें म्हणजे सर्व काम भागेल. कारण हे वरील सर्व धातू निष्ठाप्रत्ययामध्यें सेट् आहेत. म्हणजे या धातूंच्या पुढील क्त आणि क्तवतु या

---

१. (सू. ५७) सन् प्रत्यय किंवा लिट् प्रत्यय पुढें असतांना अभ्यासापुढील जि धातूच्या जकाराला कुत्व होतें.

२. ज्या धातूहून लिट् प्रत्यय, तस्, अतुस् आदेश आणि संप्रसारण ( ६।१।१६ ) झाल्यानंतर जि याला द्वित्व झालें आहे.

३. अधिउपसर्गपूर्वक इङ् धातूहून णिच् प्रत्यय, वृद्धि (७।२।११५), आत्व (६।१।४८), पुक् आगम ( ७।३। ३६ ) होऊन जें आप् असें रूप होतें तें लाक्षणिक असल्यामुळें 'विभाषाऽऽपः' ( ६।४।५७ ) यानें णिच् प्रत्ययाला अय् आदेश होत नाहीं. त्यामुळें णि प्रत्ययाचा लोप (६।४।५१) होतो. पुढें क्त्वा प्रत्यय ( ३।४।२१ ) होऊन त्याला ल्यप् आदेश (७।१।३७) झाला आहे.

१. ( सू. ५८ ) सन् प्रत्यय किंवा लिट् प्रत्यय पुढें असतांना अभ्यासापुढील चि धातूच्या चकाराला कुत्व विकल्पानें होतें.

१. ( सू. ५९ ) कवर्ग आरंभीं असलेल्या धातूच्या शेवटीं असलेल्या चकाराला आणि जकाराला कुत्व होत नाहीं.

निष्ठायाम् ॥ यदि निष्ठायामनिटः कुत्वमुच्यते कथं शोकः समुद्र इति ।

**शुच्युब्ज्योर्घञि कुत्वम् ॥ २ ॥**

शुच्युब्ज्योर्घञि कुत्वं वक्तव्यम् ॥ कथमर्कः ।

**अर्चेः कविधानात्सिद्धम् ॥ ३ ॥**

नैतद्घञन्तम् । औणादिक एष कशब्दस्तस्मिन्नाष्टमिकं कुत्वम् ॥

**[ अजिव्रज्योश्च ॥ ७।३।६० ॥ ]**

**भुजन्युब्जौ पाण्युपतापयोः ॥ ७।३।६१ ॥**

**भुजः पाणौ ॥ १ ॥**

भुजः पाणाविति वक्तव्यम् । कथं न्युब्ज उपताप इति ।

**न्युब्जेः कर्तृत्वादप्रतिषेधः ॥ २ ॥**

अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । कुत्वं कस्मान्न भवति । कर्तृत्वात् । नैतद्घञन्तम् । कर्तृप्रत्यय एषः । न्युब्जतीति न्युब्जः ॥ अधिकरणसाधनो वै लक्ष्यते घञ् । न्युब्जिताः शेरतेऽस्मिन्न्युब्ज उपताप इति । एषोऽपि हि कर्तृसाधन एव । कथम् । न्युब्जयतीति न्युब्जः ॥

---

यांना इडागम होत आहे.

पण निष्ठाप्रत्ययामध्यें जे अनिट् धातू त्यांनाच कुत्व सांगितलें तर शोकः[२], समुद्रः हीं रूपें कशीं साधतील ?

( वा. २ ) शुच् धातूच्या चकाराला आणि उब्ज् धातूच्या जकाराला घञ् प्रत्यय पुढें असतांना कुत्व होतें असें म्हणावें.

तरी पण अर्कः हें रूप कसें साधावें ?

( वा. ३ ) अर्क हा शब्द अर्च् धातूहून घञ् प्रत्यय करून साधला आहे असें समजूं नये; तर अर्च् धातूहून उणादि क प्रत्यय ( उणा. ३।४० ) झाला आहे, आणि तो क प्रत्यय पुढें असतांना धातूच्या चकाराला आठव्या अध्यायांत सांगितलेलें कुत्व ( ८।२।३० ) होतें[३].

(सू. ६१ वा. १) 'भुजः पाणौ' एवढेंच सूत्र करावें.

पण तेवढेंच सूत्र केलें तर रोग या अर्थाचा न्युब्ज शब्द कसा साधावा ?

( वा. २ ) अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय. न्युब्ज शब्दामध्यें कुत्वाचा प्रतिषेध करावयास नको.

मग न्युब्ज शब्दामध्यें जकाराला कुत्व कां बरें होत नाहीं ?

न्युब्ज हा शब्द घञ् प्रत्यय करून साधला आहे असें समजूं नये. कर्ता या अर्थी अच् प्रत्यय ( ३।१।१३४ ) येथें झाला आहे. न्युब्जतीति न्युब्जः.

पण रोग या अर्थी न्युब्ज शब्द अधिकरण या अर्थी घञ् प्रत्यय करून साधलेलाही दिसतो. न्युब्जिताः शेरते अस्मिन्निति न्युब्ज उपतापः; म्हणजे ज्या रोगामध्यें लोक पालथे होऊन झोप घेतात तो रोग.

या अर्थीही कर्ता या अर्थीच येथें प्रत्यय केला आहे, असें समजावें.

तें कसें ?

न्युब्जयतीति न्युब्जः अशी त्या शब्दाची व्युत्पत्ति समजावी.

---

२. शोक शब्दामध्यें शुच् धातूहून घञ् (३।३।१२१), गुण ( ७।३।८६ ) आणि कुत्व (७।३।५२) हीं कार्यें झालीं आहेत समुद्र शब्दामध्यें उब्ज् धातूहून घञ् प्रत्यय आणि कुत्व हीं कार्यें झालीं आहेत. शुच शोके आणि उब्ज आर्जवे हे धातू तर निष्ठा प्रत्यय केला असतांना अनिट् नाहीत, तेव्हां त्यांना कुत्व होणार नाहीं, असा दोष येतो.

३. त्या ककाराचा विकल्पानें लोप ( ८।४।६५ ) होतो. क प्रत्ययाच्या ककाराला इत्संज्ञा नाहीं व लोप नाहीं.

१.(सू ६०) अज् आणि व्रज् या धातूंच्या जकाराला कुत्व होत नाहीं; उदा० समाजः, परिव्राजः.

१. ( सू ६१ ) पाणि (हस्त) या अर्थी भुज शब्द आणि रोग या अर्थी न्युब्ज शब्द हे निपातित केले जातात. दोन्ही शब्दांमध्यें कुत्व होत नाहीं. भुज शब्दामध्यें गुणही होत नाहीं.

२. जो स्वतः पालथा असतो असा एक रोग.

[प्रयाजानुयाजौ यज्ञाङ्गे ॥७।३।६२॥
वञ्चेर्गतौ ॥ ७।३।६३ ॥
ओक उचः के ॥ ७।३।६४ ॥
ण्य आवश्यके ॥ ७।३।६५ ॥ ]
यजयाचरुचप्रवचर्चश्च ॥ ७।३।६६॥
प्रवचिग्रहणमनर्थकं वचोऽशब्दसंज्ञाभावात् ॥ १ ॥

प्रवचिग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । वचोऽशब्दसंज्ञाभावात् । वचोऽशब्दसंज्ञायां प्रतिषेध उच्यते प्रपूर्वश्च वचिरशब्दसंज्ञायां वर्तते ॥ उपसर्गनियमार्थं तर्हीदं वक्तव्यम् । प्रपूर्वस्यैव वचेरशब्दसंज्ञायां प्रतिषेधो यथा स्यात् । इह मा भूत् । अविवाक्यमिति ।

उपसर्गपूर्वनियमार्थमिति चेदविवाक्यस्य विशेषवचनात्सिद्धम् ॥ २ ॥

विशेष एतद्वक्तव्यम् । अविवाक्यमहरिति । क मा भूत् । अविवाच्यमेवान्यदिति ॥

ण्यप्रतिषेधे त्यजेरुपसंख्यानम् ॥ ३ ॥

ण्यप्रतिषेधे त्यजेरुपसंख्यानं कर्तव्यम् । त्याज्यम् ॥

---

(सू. ६६, वा. १) ह्या सूत्रामध्ये प्रउपसर्गपूर्वक वच् धातूचें जें ग्रहण केलें आहे तें निरुपयोगी आहे.

काय कारण ?

कारण असें कीं 'शब्दाची संज्ञा नसेल तर वच् धातूला कुत्व होत नाहीं' असा निषेध पुढील सूत्रामध्ये सांगितलाच आहे, आणि प्रपूर्वक वच् धातूहून घञ्, ण्यत्, वगैरे प्रत्यय करून तयार झालेला शब्द कोणत्याही प्रकारच्या शब्दाची संज्ञा असत नाहीं.

तर मग उपसर्गाच्या संबधानें नियम होण्याकरिता येथे प्रवच् असें म्हटलें पाहिजे, तो नियम असा कीं शब्दाची संज्ञा नसताना कोणत्याही उपसर्गापुढील वच् धातूला जर पुढील सूत्राने कुत्वाचा निषध होईल तर तो फक्त प्र उपसर्ग असतानाच होतो; इतर उपसर्ग असताना होत नाहीं; उदा० अविवाक्यम् अहः.

( वा० २ ) उपसर्गाच्या संबंधानें नियम होण्याकरितां येथें प्रवच् असें म्हटले असेल तर तें बरोबर नाहीं. 'अविवाक्य' हा शब्द 'अविवाक्यमहः' असें तेवढ्यापुरतें विशेष वचन करून साधावा.

ह्या विशेष वचनानें कोठें बरें कुत्व होत नाहीं?

एक प्रकारचा दिवस हा अर्थ नसून दुसरा कांहीं अर्थ असेल तर अविवाच्य असाच शब्द होतो.

( वा. ३ ) ण्य प्रत्यय पुढें असताना जो कुत्वाचा निषेध सांगितला आहे त्या ह्या प्रकरणामध्यें त्यज् धातूला कुत्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० त्याज्यम्.

---

१ (सू ६२) यज्ञाचें अंगभूत कर्म हा अर्थ गम्यमान असतांना प्रयाज आणि अनुयाज हे शब्द निपातित केले जातात

१ ( सू. ६३) गमन या अर्थाचा जो वञ्च् धातु त्याच्या चकाराला कुत्व होत नाहीं

१ (सू ६४) उच् धातूहून क प्रत्यय केला असतां 'ओक' असा शब्द निपातित केला जातो, म्हणजे येथें गुणाचा निषेध असतांनाही गुण होतो, आणि कुत्वाची प्राप्ति नसतांनाही कुत्व होते

१ (सू.६५) ण्य प्रत्यय पुढें असताना आणि आवश्यक हा अर्थ गम्यमान असतांना कोणत्याही धातूच्या चकाराला व जकाराला कुत्व होत नाहीं; उदा० अवश्यपाच्यम्.

१. ( सू. ६६ ) यज्, याच्, रुच्, प्रउपसर्गपूर्वक वच् व ऋच् या धातूंच्या चकाराला आणि जकाराला ण्य प्रत्यय पुढें असताना कुत्व होत नाहीं

२. दहा रात्रींनीं होणाऱ्या एका विशेष प्रकारच्या यज्ञांतील दहाव्या दिवसाला अविवाक्य म्हणतात त्या दिवशीं ऋत्विज लोक विशेष चर्चा करीत नाहींत.

३ 'यज्ञातील दहावा दिवस' या अर्थी अविवाक्य असें निपातन केलें जातें असा याचा अर्थ आहे. या निपातनामुळें पुढील सूत्रानें कुत्वाचा निषेध होत नाहीं.

४. विशेष चर्चा न करण्यासारखें एखादें कर्म असा अविवाच्य या शब्दाचा अर्थ आहे. उपसर्गासंबं-

**[वचोऽशब्दसंज्ञायाम् ॥७।३।६७॥[1]**

**प्रयोज्यनियोज्यौ शक्यार्थे ॥६८॥][1]**

**भोज्यं भक्ष्ये ॥ ७।३।६९ ॥[1]**

**[ भोज्यमभ्यवहार्ये ॥ १ ॥ ]**

भोज्यमभ्यवहार्ये इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । भोज्यः सूपः । भोज्या यवागूरिति । किं पुनः कारणं न सिध्यति । भक्षिरयं खरविशदे वर्तते तेन द्रवे न प्राप्नोति ॥ नावश्यं भक्षिः खरविशद एव वर्तते । किं तर्हि । अन्यत्रापि वर्तते । तद्यथा । अब्भक्षः वायुभक्ष इति ।

**घोर्लोपो लेटि वा ॥७।३।७० ॥[1]**

वेति शक्यमवक्तुम् । कस्मान्न भवति । तदग्निरग्नये ददात् । अस्त्वत्र लोप आटः श्रवणं भविष्यति तेनोभयं सिध्यति । दधद्रत्नानि दाशुषे । ददाद्रत्नानि दाशुषे ॥

**ओतः श्यनि ॥ ७।३।७१ ॥[1]**

**[ ओतः शिति ॥ १ ॥ ]**

ओतः शितीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

**उत्तरत्र शिद्ग्रहणाभावाय ॥ २ ॥**

तत्रायमप्यर्थः ष्ठिवुक्लम्वाचमां शिति

---

( सू ६९, वा. १ . येथें ‘ भोज्यं भक्ष्ये ’ याच्या एवजीं ‘ भोज्यमभ्यवहार्ये ’ असें म्हणावें, कारण भोज्यः सूपः, भोज्या यवागूः, येथेंही कुत्वाचा निषेध झाला पाहिजे.

पण येथें कुत्वाचा निषेध ‘भोज्यं भक्ष्ये’ यानें कां बरें होणार नाहीं ?

घट्ट आणि मूर्त अशा खाण्याच्या पदार्थाला भक्ष्य म्हणतात[2]. तेव्हा वरण, पेज, हे पदार्थ पातळ असल्यामुळें तेथे कुत्वाचा निषेध होणार नाहीं

दातानें चावून खाणें असाच भक्ष् धातूचा अर्थ आहे असा कांहीं नियम नाहीं, तर इतर ठिकाणींही भक्ष् धातूचा प्रयोग दृष्टीस पडतो; उदा० अब्भक्षः[3], वायुभक्षः.

(सू. ७०) ह्या सूत्रामध्यें ‘वा’ असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

पण जर ‘वा’ असें म्हटलें नाहीं तर ‘तदग्निरग्नये ददात्’ या मन्त्रातील लेटाच्या क्रियापदामध्यें आकाराचा लोप का बरें होत नाहीं ?

येथ धातूच्या आकाराचा लोप होऊ दे. जो हा आकार दिसतो तो आट् आगमाचा (३।४।९४ ) आहे तेथें अट् आणि आट् असे दोन आगम पाळीपाळीनें होत असल्यामुळें दधद्रत्नानि दाशुषे आणि ददात् अशीं दोन्ही रूपें सिद्ध होतात.

( सू. ७१, वा. १ ) ह्या ‘ओतः श्यनि’ या सूत्राच्या ऐवजीं ‘ओतः शिति’ असें सूत्र करावें.

याचा काय बरें उपयोग ?

( वा. २ ) शिति असें म्हटलें असता येथें थोडें लाघव आहे[2]. पण दुसरी एक गोष्ट

---

धानें नियम करून ‘ अविवाक्यमहः ’ हें साधलें तर हा अविवाच्य शब्द सिद्ध होणार नाहीं.

१. ( सू ६७ ) शब्दाची संज्ञा नसेल तर वच् धातूच्या चकाराला कुत्व होत नाहीं.

१ ( सू ६८) प्रयोज्य आणि नियोज्य ह्या शब्दांचें शक्यता हा अर्थ गम्यमान असताना निपातन केलें आहे; उदा० प्रयोक्तुं शक्यः प्रयोज्यः, नियोक्तुं शक्यः नियोज्यः.

१. ( सू. ६९ ) भक्ष्य असा अर्थ गम्यमान असतांना भोज्य असा शब्द निपातन केला जातो.

२. दांतानें चावून खाणें हा भक्ष् धातूचा अर्थ आहे असा येथें समज आहे.

३ जल हें पातळ आहे व वायु हा अमूर्त आहे, तरी तेथें भक्ष् धातूचा प्रयोग होतो.

१ (सू. ७०) लेट् प्रत्यय पुढें असतांना दा आणि धा या धातूंच्या आकाराचा लोप विकल्पानें होतो.

१. ( सू. ७१ ) श्यन् प्रत्यय पुढें असतांना धातूच्या ओकाराचा लोप होतो; उदा० श्यति.

२. श्यनि या पदापेक्षां शिति या पदामध्यें एक व्यंजन कमी होत असल्यामुळें अर्धी मात्रा कमी होते, असें लाघव आहे. आतां शकारेत्संज्ञक असलेले शप् वगैरे प्रत्यय बरेच आहेत, तरी ओकारान्त धातूपुढें श्यन् प्रत्ययच होत असल्यामुळें दोष येत नाहीं.

[७५] इति शिद्ग्रहणं न कर्तव्यं भवति ॥ ननु च भोः श्यन्ग्रहणमपि तर्ह्युत्तरार्थं कर्तव्यम् । शमामष्टानां दीर्घः श्यनि [७४] इति श्यन्ग्रहणं न कर्तव्यं भवति । अत्राप्यस्तु शितीत्येव । यदि शितीत्युच्यते अनु त्वेन्द्रो भ्रमतु मदतु अत्रापि प्राप्नोति । शमादिभिरत्र शितं विशेषयिष्यामः । शमादीनां यः शिदिति । कश्च शमादीनां शित् । शमादिभ्यो यो विहितः । एवमपि तस्यति यस्यति अत्र प्राप्नोति । अष्टानामिति वचनान्न भविष्यति ॥

[ क्सस्याचि ॥ ७।३।७२ ॥
लुग्वा दुहदिहलिहगुहामात्मनेपदे दन्त्ये ॥ ७।३।७३ ॥
शमामष्टानां दीर्घः श्यनि ७।३।७४॥]
ष्ठिवुक्लमुचमां शिति ॥७।३।७५ ॥

दीर्घत्वमाङि चमः ॥ १ ॥

दीर्घत्वमाङ्चम इति वक्तव्यम् । आचामति । इह मा भूत् । उच्चमति विचमतीति ॥

[ क्रमः परस्मैपदेषु ॥ ७।३।७६ ॥ ]
[ इषुगमियमां छः ॥ ७।३।७७ ॥

---

अशी साधने की पुढें 'ष्ठिवुक्लमुचमां शिति'(७।३। ७५ ) येथें 'शिति' असें करावयास नको.

पण काय हो, श्यनि हें देखील पुढें अनुवृत्ति होण्याकरितां पाहिजे. येथें श्यनि असें केलें म्हणजे पुढें 'शमामष्टानां दीर्घः श्यनि' (७।३।७४) येथें 'श्यन' असें पद घालावयास नको.

शमामष्टानां० येथें शिति याच्या अनुवृत्तीनें काम भागेल.

पण जर तेथें शित् प्रत्यय निमित्त धरला तर 'अनु त्वेन्द्रो भ्रमतु मदतु'येथेंही दीर्घ होऊ लागेल.

हा दोष येणार नाहीं. कारण शमादीनाम् या पदाचा संबंध 'शिति' याच्याकडे करतां येईल, व त्यामुळें शम् वगैरे धातूंचा जो शित् प्रत्यय असा अर्थ होईल.

शम् वगैरे धातूंचा शित् प्रत्यय तो कोणता?

शम् वगैरे धातूंहून सांगितलेला जा शित् प्रत्यय तो त्याचा शित् प्रत्यय समजावा.

तरी पण तस्यति, यस्यति, येथें दीर्घ होईल हा दोष येतो.

सूत्रामध्यें अष्टानाम् असें म्हटलें असल्यामुळें इतर धातूना दीर्घ होणार नाहीं

(सू ७५, वा. १) चम् धातूला जो या सूत्रानें दीर्घ सांगितला आहे तो आङ् उपसर्ग लावला असेल तरच होतो असें म्हणावें; उदा० आचामति. उच्चमति, विचमति, इत्यादि उदाहरणांमध्यें आङ् उपसर्ग नसल्यामुळें दीर्घ होत नाहीं.

---

३. भ्रमतु येथें 'वा भ्राश०' ( ३।१।७० ) या सूत्रानें एकदा शप् प्रत्ययही होत आहे. मद् हा धातु भ्वादिगणामध्यें आहे;त्यामुळें मदतु येथें शप् प्रत्यय झाला आहे

४. शम् वगैरे धातू हे दिवादि गणांत असल्यामुळें त्यांहून 'दिवादिभ्यः श्यन्' ( ३।१।६९ ) या सूत्रानें श्यन् प्रत्यय सांगितला आहे.

५. 'शमादीनाम्' या पदाचा संबंध शित् प्रत्ययाशीं असल्यामुळे शम् वगैरे धातूंच्या अचाला दीर्घ होतो' असा अर्थ होणार नाहीं; तेव्हां इतर धातूंनाही दीर्घ होईल असा दोष येतो.

६. शमाम् हें पद जवळ असल्यामुळें अर्थातच ते आठ धातू शम् धातू पासूनच घ्यावयाचे आहेत.

१ (सू ७२ ) अच् आरंभी असलेला प्रत्यय पुढें असतांना क्स प्रत्ययाच्या अकाराचा लोप होतो; उदा० अधुक्षाताम्.

१ (सू ७३) तकार, वकार, वगैरे दन्तस्थानातील वर्ण आरंभी असलेला आत्मनेपद प्रत्यय पुढे असतांना दुह्, दिह्, लिह् आणि गुह् या धातूंपुढील क्स प्रत्ययाचा विकल्पानें लुक् होतो; उदा० अदुग्ध, अधुक्षत.

१.(सू ७४) शम् वगैरे आठ धातूंमधील अचाला श्यन् प्रत्यय पुढें असताना दीर्घ होतो;उदा० शाम्यति.

१ (सू ७५) ष्ठिव्, क्लम् आणि चम् या धातूंमधील अचाला शकार इत्संज्ञक असलेला प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

१.(सू ७६) परस्मैपद प्रत्यय पुढें असलेला शित् प्रत्यय पुढें असतांना क्रम् धातूंतील अचाला दीर्घ होतो; उदा० क्रामति.

१.(सू ७७) इष्, गम् आणि यम् या धातूंच्या शेवटच्या वर्णाला शित् प्रत्यय पुढे असताना छकार आदेश होतो.

इषेश्छत्वमहलि ॥ १ ॥

इषेश्छत्वमहलीति वक्तव्यम्। इह मा भूत्। इष्णाति इष्यति ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। अचीति वर्तते। एवमपीषाणेत्यत्र प्राप्नोति। अथाहलीत्युच्यमाने कस्मादेवात्र छत्वं न भवति। नैवं विज्ञायते न हल् अहल् अहलीति। कथं तर्हि। अविद्यमानो हलस्मिन्सोऽयमहल् अहलीति। यद्येवमचीत्यपि वर्तमाने न दोषः। न ह्यचा शिद्विशेष्यते। शिति भवति कतरस्मिन् अचीति। कथं तर्हि। शिताज्विशेष्यते। अचि भवति कतरस्मिन् शितीति ॥

पाघ्राध्मास्थाम्नादाण्दृश्यर्तिसर्तिशदसदां पिबजिघ्रधमतिष्ठमनयच्छपश्यर्च्छधौशीयसीदाः ॥१ ७।३।७८ ॥

पिबेर्गुणप्रतिषेधः ॥ १ ॥

पिबेर्गुणप्रतिषेधो वक्तव्यः। पिबति। लघूपधगुणः प्राप्नोति ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। गुणः कस्मान्न भवति। पिबिरदन्तः।

अदन्त इति चेदुक्तम् ॥ २ ॥

किमुक्तम्। धातोरन्त इति चेदनुदात्तत्वग्रहणमिति ॥ अथवाऽनुवृत्ते पुनर्वृत्तावविधि-

---

(सू. ७७, वा. १) इष् धातूला हा जो छकारादेश सांगितला आहे तो हल् पुढें असतांना होत नाहीं, असें म्हणावें कारण इष्णाति, इष्यति इत्यादि ठिकाणीं इष् धातूला छकार न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण मागून (७।३।७२) 'अचि' या पदाची अनुवृत्ति येथें येत आहे.

तरी पण इषाण[२] येथें दोष कायम राहतोच.

हा दोष येथें 'अहलि' असें म्हटलें तरी आहेच ना ?

अहलि असें म्हटलें म्हणजे हा दोष नाहीं. कारण 'अहलि' येथें न हल् अहल् असा नञ्तत्पुरुष करूं नये. तर न हल् यस्मिन् म्हणजे ज्यामध्यें हल् नाहीं असा प्रत्यय पुढें असताना असा अहलि या पदामध्यें बहुव्रीहि समास घ्यावा[३].

अशा तऱ्हेनें जर इषाण येथील दोष घालवावयाचा असेल तर अचि या पदाची येथें अनुवृत्ति आणिली असतांनाही तो घालवितां येईल. 'शित् प्रत्यय पुढें असताना तो शित् प्रत्यय कसा तर अजादि' असें अचि हें शित् प्रत्ययाचें विशेषण करूं नये; तर 'अच् पुढें असतांना, तो अच् कसा तर शित्' असें शिति हें अचाचें विशेषण करावें.

(सू. ७८ वा. १) ह्या सूत्रानें पा धातूला पिब आदेश झाल्यानंतर गुण होत नाहीं असें म्हणावें; उदा० पिबति येथें 'पुगन्तलघू०' (७।३।८६) यानें गुण प्राप्त होत आहे.

तर मग तसा निषेध केला पाहिजे.

तसा निषेध करावयास नको. कारण पिब हा आदेश ऱ्हस्वअकारान्त[२] आहे.

पिब आदेश ऱ्हस्वअकारान्त मानला तर त्यासंबंधानें सांगितलेंच आहे.

(वा. २) तें काय सांगितलें आहे ?

धातोरन्त इति चेदनुदात्तत्वग्रहणम्

---

२. क्र्यादि गणांतील इष् धातूचें लोटाच्या मध्यमपुरुषाचें एकवचन 'इषाण' असें होतें. येथें श्ना प्रत्ययाला शानच् आदेश (३।१।८३) झाला आहे.

३. शानच् आदेश हा शकारेत्संज्ञक असल्यामुळें हलादि नव्हे तरी त्यामध्यें नकार हा हल् आहे त्यामुळे छकार होत नाहीं.

४. शान हा प्रत्यय जरी शित् आहे तरी त्यांतील अच् जो आकार तो शित् आहे असें म्हणतां येत नाहीं.

१. (सू. ७८) पा, घ्रा, ध्मा, स्था, म्ना, दाण्, दृश्, ऋ, सृ, शद् आणि सद् या अकरा धातूंना क्रमानें पिब, जिघ्र, धम, तिष्ठ, मन, यच्छ, पश्य, ऋच्छ, धौ, शीय आणि सीद असे अकरा आदेश शित् प्रत्यय पुढें असतांना क्रमानें होतात.

२. पिब आदेश अकारान्त मानला म्हणजे उपधासंज्ञा (१।१।६५) बकाराला होते, इकाराला होत नाहीं. तेव्हां लघु उपधा नसल्यामुळें गुण होत नाहीं.

निष्ठितस्येत्येवं न भविष्यति ॥

## ज्ञाजनोर्जा ॥ ७।३।७९ ॥

दीर्घोच्चारणं किमर्थं न ज्ञाजनोर्ज इत्येवोच्येत । का रूपसिद्धिः जानाति जायते । अतो दीर्घो यञि [७. ३. १०१] इति दीर्घत्वं भविष्यति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद्दीर्घोच्चारणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषाङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिरिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । पिबेर्गुणप्रतिषेधश्चोदितः स न वक्तव्यो भवति ॥

## [ प्वादीनां ह्रस्वः ॥ ७।३।८० ॥

## मीनातेर्निगमे ॥ ७।३।८१ ॥

## मिदेर्गुणः ॥ ७।३।८२ ॥ ]

## जुसि च ॥ ७।३।८३ ॥

## जुसि गुणे यासुट्प्रतिषेधः ॥ १ ॥

जुसि गुणे यासुडादौ प्रतिषेधो वक्तव्यः । चिनुयुः सुनुयुरिति ॥ न वक्तव्यः । नैवं विज्ञायते मिदेर्गुणः [८२] जुसि चेति । कथं तर्हि । मिदेर्गुणोऽजुसि चेति । किमिदमजु-

---

(.६।१।१६२ वा. १ ) असें सांगितलें आहे. अथवा 'अङ्गस्य या अधिकारांतील कार्य करून रूप सिद्ध झाल्यानंतर मागून प्राप्त झालेलें जें अङ्गस्य या अधिकारांतील दुसरें कार्य तें होत नाहीं' या परिभाषेनें गुण होणार नाहीं.

(सू. ७९) येथें 'जा' असा दीर्घ आदेश कशाकरितां सांगितला आहे ? तसा सांगावयास नको. 'ज्ञाजनोर्जः' असेंच सूत्र करावें.

पण तसें सूत्र केलें तर जानाति, जायते, हीं रूपें कशीं साधतील ?

अतो दीर्घो यञि ( ७।३।१०१) या सूत्रानें तेथें दीर्घ होईल.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांना जें येथें आचार्यांनीं 'जा' असें दीर्घाचें उच्चारण केलें आहे त्यावरून 'अङ्गाधिकारांतील कार्य केलें असतां तेथें दुसरें अङ्गाधिकारांतील कार्य होत नाहीं' अशी परिभाषा ज्ञापित होते.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

पिब् आदेश झाल्यानंतर तेथें गुण होत नाहीं (७।३।७८ वा. १) असा जो निषेध केला आहे तो करावयास नको.

(सू. ८३ वा १) हा जो जुस् प्रत्यय पुढें असतांना गुण सांगितला आहे तो त्या जुस् प्रत्ययाला यासुट् आगम ( ३।४।१०३ ) झाला असतां होत नाहीं असें म्हणावें; उदा० चिनुयुः, सुनुयुः.

तर मग तसा निषेध केला पाहिजे.

तसा निषेध करावयास नको. कारण 'मिदेर्गुणोजुसि च' असा आचार्यांनीं सूत्रांचा पाठ केल्यानंतर त्यामध्यें सूत्राचा विभाग करतांना मिदेर्गुणः, जुसि च, असा न करतांना मिदेर्गुणः, अजुसि च; असा करावा.

'अजुसि च' हें काय आहे ?

अच् आणि उस् अशीं त्यांत पदें आहेत.

---

३. धातोः या सूत्रानें सांगितलेला उदात्त जर अंताला होईल तर 'अनुदात्ते च' (६।१।१९०) हें सूत्र करावें लागेल, आणि न अंतीं असेल तर तेथें आदीला उदात्त होतो असें म्हणावें लागेल असा अर्थ आहे.

४. पिब आदेश अकारान्त मानला नाहीं तरी हरकत नाहीं कारण अंगाधिकारांतील कार्य पिब आदेश करून पिबति हें रूप सिद्ध होतें तेव्हां तेथें गुण हे अंगाधिकारांतील दुसरें कार्य होत नाहीं.

१. ज्ञा धातु किंवा जन् धातु यांना शित् प्रत्यय पुढें असतांना 'जा' असा आदेश होतो.

१. ( सू. ८० ) क्र्यादि गणांतील जे पू धातूपासून पुढील ल्ली पर्यंत धातु त्यांना ह्रस्व होतो, शित् प्रत्यय पुढे असतांना; उदा० पुनाति

१. ( स. ८१ ) वेदामध्यें मी धातूला शित् प्रत्यय पुढें असतांना ह्रस्व होतो; उदा० प्रमीणन्ति व्रतानि.

१. ( सू. ८२ ) मिद् धातूच्या इकाराला शित् प्रत्यय पुढें असतांना गुण होतो उदा० मेद्यति

१. (सू. ८३) अंगाच्या शेवटीं असलेल्या इकाराला जुस् ( ३।४।१०८ ) प्रत्यय पुढें असतांना गुण होतो.

२. उस् असें पद असलें तरी त्यानें जुसाचें ग्रहण होईल. जुस् यांतील जकार इत्संज्ञक आहे.

सीति । अजादावुस्यजुसीति । इहापि तर्हि प्राप्नोति । चक्रुः जह्रुरिति । एवं तर्हि शितीति वर्तते ॥ एवमपि अजुहवुः अबिभयुरित्यत्र न प्राप्नोति । भूतपूर्वगत्या भविष्यति । न सिध्यति न ह्युस्शिद् भूतपूर्वः । उस्शिद् भूतपूर्वो नास्तीति कृत्वोसि यः शिद् भूतपूर्वस्तस्मिन्भविष्यति ॥ अथवा क्रियते न्यास एव । अविभक्तिको निर्देशः । नैवं विज्ञायते मिदेर्गुणो जुसि चेति । कथं तर्हि । मिदेर्गुण उजुसीति । उकारादौ जुसि ॥ अथवाचीति वर्तते तेन जुस विशेषयिष्यामः । अजादौ जुसीति ॥

[सार्वधातुकार्धधातुकयोः ॥७।३।८४]

जाग्रोऽविचिण्णल्ङित्सु ॥७।३।८५॥

इह जागरयति जागरक इति गुणे कृते रपरत्वे चात उपधायाः [ ७.२.११६ ] इति वृद्धिः प्राप्नोति तस्याः प्रतिषेधो वक्तव्यः ।

**चिण्णलोः प्रतिषेधसामर्थ्यादन्यत्र गुणभूतस्य वृद्धिप्रतिषेधः ॥ १ ॥**

---

त्याचा अर्थ ' अच् आरंभीं असलेला असा उस् प्रत्यय ' असा आहे.

उस् प्रत्यय पुढें असतांना गुण सांगितला तर चक्रुः, जह्रुः, येथें लिटामध्येंही गुण होऊं लागेल.[3]

तर मग तेथें शिति या पदाची अनुवृत्ति आणावी म्हणजे चक्रुः, जह्रुः येथें दोष येणार नाहीं.[4]

पण शिति या पदाची अनुवृत्ति येथें आणली तर अजुहवुः, अबिभयुः, या मूळच्या उदाहरणांमध्येंच गुणाची प्राप्ति येणार नाहीं.[5]

जरी येथ गुण करतेवेळीं शित् प्रत्यय नाहीं तरी पूर्वी येथें शित् प्रत्यय केला होता तो गृहीत धरून प्रकृत सूत्रानें गुण करतां येईल.

तरी देखील साधणार नाहीं कारण शिति हें उसि याचें विशेषण होईल, आणि येथें तर उस् हा पूर्वी देखील शित् नव्हता.

उस् हा पूर्वी देखील शित् नव्हता म्हणून उस् पुढें असतांना त्याच्या मागें जो शप् हा शित् प्रत्यय पूर्वी झालेला होता तो गृहीत धरून गुण करतां येईल.

अथवा सूत्रकारानीं येथें तसेंच सूत्र केलें आहे. सूत्रामध्यें गुण असा अकारान्त शब्द विभक्तिरहितच उच्चारला आहे. मिदेर्गुणो जुसि च या पाठामध्यें सूत्राचा विभाग करतांना मिदेर्गुणः जुसि च असा न करतां मिदेर्गुण आणि उजुसि च असा करावा.

उजुसि हें काय आहे ?

उ आणि जुस् अशीं त्यांत पदें आहेत; त्याचा अर्थ उकार आरंभी असलेला जुस् प्रत्यय असा आहे.

अथवा मिदेर्गुणः जुसि च असाच सूत्राचा विभाग समजावा. फक्त मागून अचि या पदाची अनुवृत्ति करावी, आणि तें जुसि याचें विशेषण करावें. म्हणजे अच् आरंभी असलेला जुस् प्रत्यय असा अर्थ होईल. त्यामुळें चिनुयुः, सुनुयुः, येथ दोष येणार नाहीं.[6]

( सू. ८५ ) जागरयति, जागरकः, येथें प्रकृत सूत्रानें गुण होऊन तो रपर ( १।१।५१ ) झाल्यानंतर ' अत उपधायाः ' ( ७।२।११६ ) या सूत्रानें वृद्धि प्राप्त होते तिचा निषेध केला पाहिजे.

---

३. लिटामध्यें उस् ( ३।४।८२ ) आहे; जुस् नाहीं. तरी उस् असें येथ पद काढल्यामुळें दोष येत आहे.

४. कारण लिटामध्यें शप् प्रत्यय होत नसतो.

५. कारण येथें शप् प्रत्यय जरी झाला आहे तरी त्याचा लुक् ( २।४।७५ ) झाला आहे येथें अभ्यस्तसंज्ञा ( ६।१।५ ) असल्यामुळें जुस् ( ३।४।१०९ ) झाला आहे.

६. चिनुयुः, सुनुयुः, येथें गुण होणार नाहीं, अशी व्यवस्था सूत्रामध्येंच करून ठेविली आहे.

१ ( सू. ८४ ) अंगाच्या शेवटीं असलेल्या इकाला सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढे असतांना गुण होतो.

१. (सू. ८५) जागृ धातूच्या ऋकाराला गुण होतो, वृद्धीचा किंवा वृद्धिनिषेधाचा विषय असला पाहिजे, फक्त त्या ठिकाणीं वि, चिण्, णल् आणि ङित प्रत्यय नसावे.

यदयमविचिण्णल्ङिरिति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न गुणाभिनिर्वृत्तस्य वृद्धिर्भवतीति ॥

किं पुनरयं पर्युदासः । यदन्यद्विचिण्णल्ङिद्भ्य इति । आहोस्वित्प्रसज्यायं प्रतिषेधः। विचिण्णल्ङित्सु नेति । कश्चात्र विशेषः ।

**प्रसज्यप्रतिषेधे जुसिगुणप्रतिषेधप्रसङ्गः २**

प्रसज्यप्रतिषेधे जुसिगुणप्रतिषेधः प्राप्नोति । अजागरुः ॥

**उत्तमे च णलि ॥ ३ ॥**

उत्तमे च णलि प्रतिषेधः प्राप्नोति । अहं जजागर ॥

**न वानन्तरस्य प्रतिषेधात् ॥ ४ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अनन्तरस्य प्रतिषेधात् । अनन्तरं यद् गुणविधानं तस्य प्रतिषेधः । कुत एतत् । अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वेति ॥

**जुसि पूर्वेण गुणविधानम् ॥ ५ ॥**

जुसि पूर्वेण गुणो विधीयते जुसि च [ ८४ ] इति ॥

**णलि च ॥ ६ ॥**

किम् । न वानन्तरस्य प्रतिषेधादित्येव । णलि च पूर्वेण गुणो विधीयते सार्वधातुकार्धधातुकयोः [ ८४ ] इति ॥

अथवा पुनरस्तु पर्युदासः ।

**अतोऽन्यत्र विधाने वावगुणत्वम् ॥७॥**

अतोऽन्यत्र विधाने वावगुणत्व वक्तव्यम् । जागृविः ॥

---

(वा. १) ह्या सूत्रामध्यें जे आचार्यांनीं गुणाच्या निमित्तांतून चिण् आणि णल् हे वगळले आहेत त्यावरून ते असें सुचवितात कीं गुणानें झालेल्या अकाराला वृद्धि होत नाहीं.

पण काय हो, येथें जें सूत्रामध्यें ' अविचिण्णल्ङित्सु ' असें म्हटलें आहे तेथें पर्युदास घ्यावयाचा कीं ज्याच्या योगानें ' वि, चिण्, णल् आणि ङित् याशिवाय इतर प्रत्यय पुढें असतांना जागृ धातूला गुण होतो, ' असा अर्थ होईल, किंवा प्रसज्यप्रतिषेध घ्यावयाचा कीं ज्याच्या योगानें 'जागृ धातूला गुण होतो' असा मोघम विधि होऊन पुढें वि, चिण्, णल् आणि ङित् प्रत्यय पुढें असताना गुण होत नाहीं, असा दुसरा वाक्यार्थ होऊन त्यानें गुणाचा निषेध होईल.

ह्या दोहोंमध्यें फरक काय ?

( वा. २ ) प्रसज्यप्रतिषेध घेतला तर अजागरुः येथें जुसि च ( ७।३।८३ ) यानें होणाऱ्या गुणाचाही ह्यानें निषेध होऊं लागेल.

(वा ३. ) तसेंच अहं जजागर येथें लिटामध्यें उत्तमपुरुषैकवचनाला णल् आदेश केला असतां तेथें पूर्व सूत्रानें होणाऱ्या गुणाचाही ह्यानें निषेध होऊं लागेल.

( वा. ४ ) अथवा हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असे कीं या सूत्रानें केलेला जो निषेध तो जवळच्या गुणाचा म्हणजे याच सूत्रानें सांगितलेल्या गुणाचा होतो.

कशावरून ?

' विधि किंवा निषेध हे जवळच्या संबंधानें होतात, दूरच्या संबंधानें होत नाहींत, ' अशी परिभाषा आहे.

( वा. ५ ) अजागरुः येथें जुस् पुढें असतांना जो गुण होतो तो पूर्वीच्या म्हणजे ' जुसि च ' या दूरच्या सूत्रानें होतो.

( वा. ६ ) णल् पुढें असतांनाही तसेंच.

तसेंच तें काय ?

जवळच्याचाच निषेध होतो, म्हणजे याच सूत्रानें सांगितलेल्या गुणाचा निषेध होतो. अहं जजागर येथें णल् पुढे असतांना जो गुण होतो तो ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' या दुसऱ्याच सूत्रानें होतो.

अथवा येथे पर्युदासच असूं दे.

( वा. ७ ) वि, चिण्, णल् आणि ङित् यांशिवाय इतर प्रत्यय पुढें असतांना गुणाचें विधान केलें तर वि प्रत्यय पुढें असतांना पूर्व

**न वा पर्युदाससामर्थ्यात् ॥ ८ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । पर्युदाससामर्थ्यादत्र गुणो न भविष्यति ॥ अस्त्यन्यत्पर्युदासे प्रयोजनम् । किम् । किमर्थं पर्युदासः स्यात् । शुद्धपरस्य विशब्दस्य प्रतिषेधे ग्रहणमनुनासिकपरश्च क्वौ विशब्दः ॥ वस्वर्थं तर्हि पर्युदासः स्यात् । जागृवांसो अनुग्मन् । कथं पुनर्वेः पर्युदास उच्यमानो वस्वर्थः शक्यो विज्ञातुम् । सामर्थ्याद्वस्वर्थमिति विज्ञास्यते ।

**वस्वर्थमिति चेन्न सार्वधातुकत्वात्**

**सिद्धम् ॥ ९ ॥**

वस्वर्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । सार्वधातुकत्वात्सिद्धम् । कथं सार्वधातुकसंज्ञा । छान्दसः क्वसुः । लिट् च च्छन्दसि सार्वधातुकमपि भवति । तत्र सार्वधातुकमपिन्ङिदिति ङित्त्वात्पर्युदासो भविष्यति ॥ अथवा वकारस्यैवेदमशक्तिजेनेकारेण ग्रहणम् ॥

**पुगन्तलघूपधस्य च ॥७।३।८६॥**

संयोगे गुरुसंज्ञायां गुणो भेत्तुर्न सिध्यति ।

---

सूत्राने गुण होऊ लागेल; त्याचा निषेध केला पाहिजे; उदा० जागृविः.

(वा. ८) तसा निषेध करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं जागृविः येथें पूर्वसूत्रानें गुण झाला तर ह्या सूत्रानें गुण सांगताना जो वि प्रत्यय वगळला आहे तो व्यर्थ होईल; म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव येथें पूर्वसूत्रानेंही गुण होत नाहीं.

पण येथें वि प्रत्यय वगळण्याचा उपयोग दुसराच संभवतो.

तो कोणता ?

जागृ धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां तेथें प्रकृत सूत्राने गुण न होणें हा येथें 'वि' प्रत्यय वगळण्याचा उपयोग आहे.

पण येथे निरनुनासिक इकाराचा वि शब्द उच्चारला आहे, त्यानें सानुनासिक इकारानें युक्त असा क्विप् प्रत्यय वगळला जाणारच नाहीं.

तर मग वि शब्द वगळण्याचा उपयोग वसु प्रत्ययाकडे होईल, आणि त्यामुळें 'जागृवांसो अनुग्मन्' या मंत्रामध्यें जागृ धातूला प्रकृत सूत्रानें गुण होणार नाहीं.

पण येथें वगळतांना वि असें उच्चारलें आहे त्यानें वसु प्रत्ययाचें कसें ग्रहण होईल ?

वि याचा वि या स्वरूपानें उपयोग होत नाहीं; म्हणून सामर्थ्यास्तव वकारादि अशा अर्थानें वसु प्रत्ययाचें त्यानें ग्रहण होईल.

(वा. ९) वसु प्रत्यय वगळण्याकरितां येथें वि असें उच्चारलें आहे असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं वसु प्रत्ययाला सार्वधातुक संज्ञा असल्यामुळें तो ङित् या पदानेंच वगळला जाईल.

पण वसु प्रत्ययाला सार्वधातुक संज्ञा कशी बरें होणार ?

क्वसु प्रत्यय हा वेदामध्यें (३।२।१०७) लिटाचे स्थानीं सांगितला आहे. आणि वेदामधील लिट् प्रत्ययाला सार्वधातुक संज्ञाही (१।४।११७) होते. नंतर सार्वधातुकमपित् (१।२।४) या सूत्रानें तो ङित् समजला जात असल्यामुळें येथें ङित् या शब्दानेंच तो वगळला जाईल.

अथवा केवळ व्यञ्जनाचा उच्चार स्पष्ट होत नसल्यामुळें त्याकरितां त्याच्या जवळ स्वर लावण्याची पद्धत आहे. त्याप्रमाणें येथें वकाराच्या जवळ इकार लावून वि असें उच्चारलें आहे. तेव्हां अर्थातच त्या वकारानें वकारादि प्रत्ययाचें ग्रहण होईल.

---

२ कारण, येथें पूर्वसूत्रानें प्राप्त झालेल्या गुणाचा निराळा निषेध ( १।१।५ ) आहे.

१. ( सू. ८६ ) पुक् आगम ( ७।३।३६ ) अंतीं असलेलें किंवा उपधेला लघु वर्ण असलेलें जें अंग त्यांतील इकाला सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना गुण होतो.

संयोगे गुरुसंज्ञायां भेत्ता भेत्तुमिति गुणो न प्राप्नोति ॥

**विध्यपेक्षं लघोश्चासौ**

विध्यपेक्षं लघुग्रहणं कृतं लघोश्चासौ विहितः ॥

**कथं कुण्डिर्न दुष्यति ॥ १ ॥**

कुण्डिता हुण्डिता अत्र कस्मान्न भवति ।

**धातोर्नुमः**

धातोर्नुम्विधावुक्तं तत्र धातुग्रहणस्य प्रयोजनं धातूपदेशावस्थायामेव नुम्भवतीति ।

**कथं रञ्जेः**

कथं रञ्जेरुपधालक्षणा वृद्धिः । आश्चर्यो रागः । विचित्रो रागः ।

**स्यन्दिश्रन्थ्योर्निपातनात् ।**

यदयं स्यन्दिश्रन्थ्योरवृद्ध्यर्थं निपातनं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येवंजातीयकानां वृद्धिरिति ॥

**अनल्लोपशिदीर्घत्वे विध्यपेक्षे न सिध्यतः ॥ २ ॥**

अनल्लोपः । दध्ना सक्थ्ना । शिदीर्घत्वम् । कुण्डानि वनानि ॥ एवं तर्हि

---

(सू. ८६) संयोग पुढें असतांना मागील ऱ्हस्वाला लघु संज्ञा न होतां गुरु संज्ञाच होत असल्यामुळे भेत्ता, भेत्तुम्, येथें प्रकृत सूत्रानें गुण होणार नाहीं.

ह्या सूत्रामध्यें उपधेला लघु पाहिजे असें जें म्हटलें आहे तें प्रत्ययविधीच्या अपेक्षेनें म्हटलें आहे.[२] आणि येथें हा तृच् प्रत्यय किंवा तुमुन् प्रत्यय जो केला आहे तो उपधेला लघु असतांनाच केला आहे.

तसें घतलें तर कुण्डिता, हुण्डिता, येथें गुण कां होत नाहीं ?[३]

धातूला नुमागम सांगणाऱ्या सूत्रामध्यें धातुग्रहणाचा उपयोग असा सांगितला आहे कीं धातूच्या उपदेशकालीं म्हणजे प्रत्यय करण्याच्या पूर्वींच नुमागम होतो. ( ७।१।५८ वा. ४).

आश्चर्यो रागः, विचित्रो रागः, येथें रञ्ज् धातूहून घञ् प्रत्यय झाला असल्यामुळें तेथें अत उपधायाः (७।२।११६) या सूत्रानें वृद्धि कशी होते?[४]

स्यन्द् आणि श्रन्थ् या धातूंहून घञ् प्रत्यय केला असतांना तेथें फक्त नकाराचा लोप सांगावयाचा तो सोडून त्या नकारलोपाच्या प्रकरणामध्येंच 'वृद्धि न व्हावी' ही अधिक गोष्ट साधण्याकरितां जीं स्यद (६।४।२८), प्रश्रथ, हिमश्रथ (६।४।२९), अशीं निपातनें आचार्यांनीं केलीं आहेत त्यांवरून ते असें ज्ञापित करतात कीं अशा उदाहरणांमध्ये वृद्धि होते.[५]

दध्ना, सक्थ्ना, येथें अनङ् आदेश (७।१।७५) झाल्यानंतर होणारा अनाच्या अकाराचा लोप (६।४।१३४), तसेंच कुण्डानि, वनानि, येथें शि आदेश (७।१।२०) व नुमागम (७।१।७२) झाल्यानतर होणारा नकारान्त अंगांतील उपधेला दीर्घ (६।४।८) हे दोन विधी विध्यपेक्ष असतील तर सिद्ध होणार नाहींत.[६]

---

२ 'ज्याच्या उपधेला लघु वर्ण आहे अशा धातूहून केलेला सार्वधातुक किंवा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना ' असा अर्थ होतो.

३. त्यामुळें कुण्ड् याहून प्रत्यय झाला त्या वेळीं उपधेला लघु नसल्यामुळें गुण होत नाहीं.

४. कारण, ह्या प्रकृत सूत्राप्रमाणें त्या वृद्धि सांगणाऱ्या सूत्रामध्येंही ' ञित् व णित् प्रत्यय करतांना उपधेला ऱ्हस्व अकार असला पाहिजे ' असा अर्थ होणार आहे आणि रञ्ज् धातूमध्यें तर उपधेला नकार आहे, अकार नाहीं.

५. प्रत्ययविधीच्या वेळीं उपधेला ऱ्हस्व अकार नसून तो ऱ्हस्व अकार उपधेला आला तरी त्या ठिकाणीं. एकंदरींत हें वृद्धिविधान विध्यपेक्ष नाहीं असें सिद्ध झालें.

६ कारण दध्ना येथें प्रत्यय करताना अंगाच्या शेवटीं अन् नव्हता; तसेंच कुण्डानि येथें प्रत्यय करताना अंगाच्या शेवटीं नकार नव्हता. एकंदरींत कोणताही विधि विध्यपेक्ष मानणें म्हणजे विधीचें उद्देश्य प्रत्यय करतेवेळीं सिद्ध असलें पाहिजे असा आग्रह धरणें बरोबर नाहीं.

**अभ्यस्तस्य यदाहाचि**

यदयं नाभ्यस्तस्याचि पिति सार्वधातुके [८७] इत्यज्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येवंजातीयकानां गुण इति ।

**लङर्थं तत्कृतं भवेत् ।**

लङर्थमेतत्स्यात् । अनेनेक् ॥

**क्नुसनोर्यत्कृतं कित्त्वं ज्ञापकं स्याल्लघोर्गुणे ॥ ३ ॥**

यदयं त्रसिगृधिधृषिक्षिपेः क्नुः [ ३. २. १४० ] इको झल्हलन्ताच्च [१.२.९;१०] इति क्नुसनौ कितौ करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येवंजातीयकानां गुण इति ॥

संयोगे गुरुसंज्ञायां गुणो भेत्तुर्न सिध्यति । विध्यपेक्षं लघोर्ग्रासौ कथं कुण्डिनं दुष्यति ॥ १ ॥

धातोर्नुमः कथं रञ्जेः स्यन्दिश्रन्थ्योर्निपातनात् । अनङ्लोपशिदीर्घत्वे विध्यपेक्षे न सिध्यतः ॥ २ ॥

अभ्यस्तस्य यदाहाचि लङर्थं तत्कृतं भवेत् । क्नुसनोर्यत्कृतं कित्त्वं ज्ञापकं स्याल्लघोर्गुणे ॥ ३ ॥

## नाभ्यस्तस्याचि पिति सार्वधातुके ॥ ७।३।८७ ॥

**अभ्यस्तानामुपधाह्रस्वत्वमचि पस्पशाते चाकशीमि वावशतीरिति दर्शनात् ॥१॥**

---

तर मग ' नाभ्यस्तस्याचि पिति० ' या पुढील सूत्रामध्यें गणाचा निषेध सांगतांना आचार्यांनीं जें ' अचि ' असें म्हटलें आहे तें व्यर्थ होईल; तेव्हां त्यावरून ते असें ज्ञापित करतात कीं अशा प्रकारच्या उदाहरणामध्यें गुण होतो.

पण अचि हें व्यर्थ होत नाहीं. कारण 'अनेनेक्' या लङाच्या उदाहरणामध्यें अच्‌ही पुढें नाहीं आणि हल्‌ही पुढें नाहीं अशा ठिकाणीं गुणाचा निषेध होऊं नये याकरिता अचि असें तेथें केलें पाहिजे.

तर मग ' त्रसिगृधिधृषिक्षिपेः क्नुः ' ( ३।२।१६० ) या सूत्रामध्यें गृध्नुः इत्यादि उदाहरणांमध्यें गुणाचा निषेध ( १।१।५ ) होण्याकरितां जो क्नु प्रत्यय कित् केला आहे, तसेंच चिचीषति, विवित्सति, येथें गुणाचा निषेध होण्याकरितां ' इको झल् ' ( १।२।१० ) ' हलन्ताच्च ' ( १।२।११ ) या सूत्रांनीं जो सन् प्रत्ययाला कित् असा अतिदेश केला आहे तो व्यर्थ होईल. तेव्हां त्यावरून आचार्य असें ज्ञापित करतात कीं अशा प्रकारच्या[११] उदाहरणांमध्यें गुण होतो.

( सू. ८७ वा १ ) अभ्यस्ताच्या उपधेला अच् पुढें असतांना ऱ्हस्व होतो असें या सूत्रानें[२] सांगावें.

---

तेव्हां " भेत्ता ' येथें गुण करतेवेळीं इकाराला लघु संज्ञा नसल्यामुळें गुण होणार नाहीं, हा दोष कायम राहतो.

७. कारण हल् पुढें असतांना गुरु संज्ञा ( १।४।११ ) होत असल्यामुळें लघु उपधेला सांगितलेल्या गुणाची प्राप्तिच येत नाहीं.

८. धातूच्या शेवटीं संयोग नाहीं अशा उदाहरणांमध्यें.

९. अनेनेक् येथें प्रत्ययाचा लोप ( ६।१।६८ ) झाल्यानंतर प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) पित् सार्वधातुक पुढें आहे असें समजत असल्यामुळें गुणाचा निषेध होऊं लागेल याकरितां अचि असें म्हटलें पाहिजे.

१० टीप ७ पाहणें.

११. टीप ८ पाहणें.

१. ( सू. ८७ ) अच् आरंभीं असलेला पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना अभ्यस्ताच्या लघु उपधेला गुण होत नाहीं; उदा० नेनिजानि.

२. या सूत्रानें गुणाचा निषेध सांगूं नये, नेनिजानि इत्यादि उदाहरणामध्यें गुण होऊं दे; तो गुण झाल्यानंतर या सूत्रानें ऱ्हस्व होऊन रूपें साधतील.

अभ्यस्तानामुपधाह्रस्वत्वमपि वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । पस्पशाते चाकशीमि वावशतीरिति प्रयोगो दृश्यते । कपोतः शरदं पस्पशाते । अहं भुवनं चाकशीमि । वावशतीरुदाजदिति ॥

**बहुलं छन्दस्यानुषग्जुजोषदिति दर्शनात् ॥ २ ॥**

बहुलं छन्दसि वक्तव्यमुपधाह्रस्वत्वम् । किं प्रयोजनम् । आनुषग्जुजोषदिति दर्शनात् । यस्त आतिथ्यमानुषग्जुजोषत् ॥

यद्युपधाह्रस्वत्वमुच्यते

प्रियां मयूरः प्रतिनर्नृतीति

यद्वत्त्वं नरवर नर्नृतीषि हृष्टः

अत्र गुणः प्राप्नोति । तस्मान्नार्थ उपधाह्रस्वत्वेन । कस्मान्न भवति । पस्पशाते चाकशीमि वावशतीरिति । स्पशिकशिवशयः प्रकृत्यन्तराणि ॥

**भूसुवोस्तिङि ॥ ७।३।८८ ॥**

**भूसुवोः प्रतिषेध एकाज्ग्रहणं बोभवीत्यर्थम् ॥ १ ॥**

भूसुवोः प्रतिषेध एकाज्ग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । बोभवीत्यर्थम् । इह मा भूत् । बोभवीति ॥ यद्येकाज्ग्रहणं क्रियते अभूत् । अत्र न प्राप्नोति । क्व तर्हि स्यात् ।

---

याचा काय उपयोग ?

पस्पशाते,[३] चाकशीमि, वावशतीः, असे प्रयोग दृष्टीस पडतात; उदा० कपोतः शरदं पस्पशाते, अहं भुवनं चाकशीमि, वावशतीरुदाजत्.

( वा. २ ) हा अभ्यस्ताच्या उपधेला सांगितलेला ऱ्हस्व वेदामध्यें बाहुल्येंकरून होतो असें म्हणावें.

त्याचा काय उपयोग ?

आनुषग्जुजोषत् असा ऱ्हस्व न झालेला प्रयोग दिसतो; उदा० यस्त आतिथ्यमानुषग्जुजोषत्.

पण जर गुणाचा निषेध न करतां ऱ्हस्व सांगितला तर प्रिया मयूरः प्रतिनर्नृतीति, यद्वत्त्वं नरवर नर्नृतीषि हृष्टः, या ठिकाणीं गुण होऊं लागेल असा दोष येतो. तेव्हां उपधेला ऱ्हस्व सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

पण जर ऱ्हस्व सांगितला नाहीं तर पस्पशाते, चाकशीमि, वावशतीः, येथ दीर्घाचें उच्चारण कां होत नाहीं ?

स्पश्, कश् आणि वश् या निराळ्या धातूंचीच तीं रूपें आहेत असें समजावें.

(सू. ८८, वा. १) हा जो भू आणि सू या धातूंना गुणाचा निषेध सांगितला आहे तो ते धातू एकाच् असतील तरच होतो असें म्हणावें.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं बोभवीति येथें गुणाचा निषेध झाला पाहिजे.

पण जर एकाच् असें म्हटलें तर अभूत् येथें अट् आगम ( ६।४।७१ ) झाल्यानंतर एकाच्

---

३. स्पश् धातूहून लेट् प्रत्यय, प्रथमपुरुष द्विवचनाचा आताम् प्रत्यय, शपाचा श्लु (२।४।७६), द्वित्व (६।१।१०) एत्व (३।४।७९), आट् आगम (३।४।९४) व प्रकृत वार्तिकानें ऱ्हस्व हीं कार्यें झालीं आहेत. कश् धातूहून यङ्लुक, द्वित्व (६।१।९) अभ्यासदीर्घ (७।४।८३), लट्, उत्तम पुरुषाचा एकवचनाचा मिप्, आणि ईडागम (७।३।९४) हीं कार्यें झालीं आहेत. वाश् धातूहून यङ्लुक्, लट्, शतृ प्रत्यय ङीप् ( ४।१।६ ) व प्रकृत वार्तिकानें ऱ्हस्व हीं कार्यें झालीं आहेत.

४. इकाराला आणि उकाराला गुण झाला तरी त्याला ऱ्हस्वानें इकार व उकारच होतो, पण ऋकाराला गुण झाला म्हणजे तो अर् असा होतो, म्हणून नर्नृतीति हें रूप साधण्याकरितां गुणाचा निषेधच केला पाहिजे. नर्नृतीति येथें नृत् धातूहून यङ्लुक्, लट्, तिप् व ईडागम हीं कार्यें झालीं आहेत.

१. (सू. ८८) भू आणि सू या धातूंना सार्वधातुक तिङ् प्रत्यय पुढें असतांना गुण होत नाहीं. उदा० अभूत्, सुवै.

२. बोभवीति येथें भू धातूहून यङ्, त्याचा लुक्, पुढें लट्प्रथमपुरुषैकवचनाचा तिप्, अट् आगम (३।४।४) आणि गुण व अवादेश हीं कार्यें झालीं आहेत.

मा भूत् । तस्मान्नार्थ एकाज्ग्रहणेन । कस्मान्न भवति । बोभवीतीति । बोभूत्वित्येतन्नियमार्थं भविष्यति । अत्रैव यङ्लुगन्तस्य गुणो न भवति नान्यत्रेति । क मा भूत् । बोभवीतीति ॥

[ उतो वृद्धिर्लुकि हलि ॥ ७।३।८९ ॥

ऊर्णोतेर्विभाषा ॥ ७।३।९० ॥

गुणोऽपृक्ते ॥ ७।३।९१ ॥ ]

तृणह इम् ॥ ७।३।९२ ॥

किमर्थं तृहिरागतश्नम्को गृह्यते न तृहेरिम्भवतीत्येवोच्येत ।

**तृणहिग्रहणं श्नमिमोर्व्यवस्थार्थम् ॥१॥**

तृणहिग्रहणं श्नमि कृत इम्यथा स्यात् ॥

**तृहिग्रहणे हीम्विषये श्नमभावोऽनवकाशत्वात् ॥ २ ॥**

तृहिग्रहणे हि सतीम्विषये श्नमोऽभावः स्यात् । किं कारणम् । अनवकाशत्वात् । अनवकाश इम्श्नमं बाधेत ॥ इदमयुक्तं वर्तते । किमत्रायुक्तम् । तृणहिग्रहणं श्नमिमोर्व्यवस्थार्थमित्युक्त्वा तत उच्यते तृहि-

---

नसल्यामुळें निषेध होणार नाहीं.

तर मग तो निषेध होईल तरी कोठें ?

'मा भूत्' येथें अडागम नसल्यामुळें (६।४।७४) निषेध होईल. एकंदरींत अभूत् येथें दोष येत असल्यामुळें एकाच् शब्द घालण्यांत अर्थ दिसत नाहीं.

पण एकाच् असें म्हटलें नाहीं तर बोभवीति या ठिकाणीं गुणाचा निषेध कां बरें होत नाहीं ?

बोभूतु असें जें निपातन ( ७।४।६५ ) केलें आहे तें नियमार्थ होईल. तो नियम असा कीं यङ् प्रत्ययाचा लुक् झाला असतां जर प्रकृत सूत्रानें गुणाचा निषेध होईल तर बोभूतु येथेंच तो होतो, अन्यत्र होत नाहीं.

ह्या नियमानें गुणाचा निषेध कोठें होत नाहीं ?

बोभवीति येथें गुणाचा निषेध होत नाहीं.

(सू. ९२) ह्या सूत्रामध्यें तृह् धातु हा श्नम् प्रत्यय ज्याहून केला आहे असा कशाकरितां उच्चारला आहे ? तसा उच्चारावयास नको. तृह् धातुला इम् आगम होतो इतकेंच सांगावें.

( वा. १ ) अगोदर श्नम् केल्यानतर मागून इम् आगम झाला पाहिजे अशी व्यवस्था होण्याकरितां तृणह् असें सूत्रामध्यें उच्चारलें आहे.

( वा. २ ) ह्या सूत्रामध्यें तृणह असें न म्हणतां तृह असें म्हटलें तर श्नम् आगमाच्या बरोबरच या इम् आगमाची प्राप्ति येत असल्यानें ज्या ठिकाणीं ह्या इम् आगमाची प्राप्ति येईल त्या ठिकाणीं श्नम् आगम होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं इम् आगम हा अनवकाश असल्यामुळें तो श्नम् आगमाचा बाध करील.

पण हें वार्तिककाराचें बोलणें अयोग्य दिसतें.

यांत अयोग्यपणा कोणता बरें आहे ?

श्नम् झाल्यानंतर इम् आगम व्हावा अशी व्यवस्था होण्याकरिता तृणह असें म्हटलें आहे असें आरंभीं सांगून त्याच्या पुढें वार्तिककारांनीं असें म्हटलें आहे कीं 'तृह असें म्हटलें तर ज्या ठिकाणीं इम् आगमाची प्राप्ति येईल त्या ठिकाणीं

---

(१.सू.८९) हल् आरंभीं असलेला पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना आणि शप् प्रत्ययाचा लुक् झाला असतांना अंगाच्या शेवटच्या ऱ्हस्व उकाराला वृद्धि होते; उदा० यौति.

१ (सू ९०) हल् आरंभीं असलेला पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना ऊर्णु धातूच्या शेवटच्या उकाराला वृद्धि विकल्पानें होते; उदा० प्रोर्णौति, प्रोर्णोति.

१.(सू. ९१) अपृक्त (१।२।४१) हल्रूपी पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना ऊर्णु धातूच्या शेवटच्या उकाराला गुण होतो.

१.(सू. ९२) तृह् धातुला श्नम् (३।१।७८) होऊन तृणह् असें स्वरूप प्राप्त झाल्यानंतर त्याला हल् आरंभीं असलेला पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना इम् असा आगम होतो; उदा० तृणेढि.

ग्रहणे ह्रीम्विषये अमभावोऽनवकाशत्वादिति । तत्र वक्तव्यं तृणह्ग्रिहणं अमिमोभावाय तृहिग्रहणे ह्रीम्विषये अमभावोऽनवकाशत्वादिति ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । व्यवस्थार्थमित्येव सिद्धं न ह्यसतो व्यवस्थेति ॥

**[ ब्रुव ईट् ॥ ७।३।९३ ॥**

**यङो वा ॥ ७।३।९४ ]**

**तुरुस्तुशम्यमः सार्वधातुके ॥ ७।३।९५ ॥**

सार्वधातुक इति वर्तमाने पुनः सार्वधातुकग्रहणं किमर्थम् ।

**पुनः सार्वधातुकग्रहणमपिदर्थम् ॥१॥**

अपिदर्थोऽयमारम्भः । अधिगो शमीध्वं सुशमि शमीध्वं शमीध्वमध्रिगो ॥

**[अस्तिसिचोऽपृक्ते ॥ ७।३।९६ ॥**

**बहुलं छन्दसि ॥ ७।३।९७ ॥**

**रुदश्च पञ्चभ्यः ॥ ७।३।९८ ॥**

**अड् गार्ग्यगालवयोः ॥७।३।९९॥**

---

अनवकाश अशा इम् आगमानें बाघ होत असल्यामुळे अम् होणारच नाहीं' हें अयोग्य दिसतें[२]. येथें वार्तिककार असें बोलले असते तर तें योग्य झालें असतें कीं ' तृणह असें जें म्हटले आहे तें अम् आणि इम् हे दोन्ही आगम होण्याकरितां म्हटलें आहे; जर तृह असेंच म्हटलें असतें तर इम् आगमाने बाघ होत असल्यामुळे अम् झाला नसता. '

तर मग तसें वार्तिककारानीं सांगितलें पाहिजे.

तसेंच सांगितले पाहिजे असें नाहीं. 'व्यवस्था होण्याकरितां' असें जें पूर्वीच्या वार्तिकात म्हटलें आहे त्यानेंच 'ते दोन्ही आगम होण्याकरितां' ही गोष्ट सिद्ध होते. कारण जर दोन्ही आगम होत नसतील तर त्यांची व्यवस्था संभवतच नाहीं.

(सू. ९५) सार्वधातुके असे मागून (७।३।८७) अनुवृत्तीने येत असतां येथें पुनः सार्वधातुके असें कशाकरिता म्हटले आहे ?

(वा. १) मागील सार्वधातुके हें पिताशीं संबंध पावलेलें आहे आणि येथें सार्वधातुक प्रत्यय अपित् देखील घेता आला पाहिजे; म्हणून पुनः येथें सार्वधातुके असें म्हटलें आहे; उदा० अध्रिगो शमीध्वं सुशमि शमीध्वं शमीध्वमध्रिगो.

---

२. कारण तृह असें म्हटलें असतां जो दोष पुढील वार्तिकाने दाखविला तोच दोष न येण्याकरितां तृणह असें म्हटलें आहे, असें पूर्वीच्या वार्तिकांत सांगितलें पाहिजे.

१ (सू. ९३) ब्रू धातूच्या पुढील हल् आरंभी असलल्या पित् सार्वधातुक प्रत्ययाला ईट् असा आगम होतो; उदा० ब्रवीति.

१. ( सू. ९४ ) यङ्प्रत्ययान्त धातूच्या पुढील हल् आरंभीं असलेल्या पित् सार्वधातुक प्रत्ययाला ईट् आगम विकल्पानें होतो; उदा० वावदीति, रोरवीति वर्वर्ति. ह्या उदाहरणांमध्यें यङाचा लुक् झाला आहे; यङन्ताचीं उदाहरणें नाहींत.

१ (सू. ९५) तु रु, स्तु शम् आणि अम् या धातूंच्या पुढील हल् आरंभीं असलेल्या सार्वधातुक प्रत्ययाला ईट् आगम विकल्पानें होतो; उदा० तवीति, तौति.

२ शमीध्वम् येथें ध्वम् हा प्रत्यय पित् नाहीं; तरी त्याला ईट् आगम झाला आहे

१. (सू. ९६) अस् धातु आणि सिच् प्रत्यय यांच्या पुढील अपृक्त सार्वधातुक प्रत्ययाला ईट् आगम होतो; उदा० आसीत्, आतीत्.

१ (सू ९७) अस् धातु आणि सिच् प्रत्यय यांच्या पुढील अपृक्त सार्वधातुक प्रत्ययाला वेदामध्यें ईट् आगम बाहुल्येकरून होतो; उदा० आः.

१.(सू ९८) रुद्, स्वप्, श्वस्, अन् आणि जक्ष् या पांच धातूंपुढील अपृक्तहल्रूपी सार्वधातुक प्रत्ययाला ईट् आगम होतो; उदा० अरोदीत्.

१ (सू.९९) रुद्, स्वप्, श्वस्, अन् आणि जक्ष् या पांच धातूंच्या पुढील अपृक्तहल्रूपी सार्वधातुक प्रत्ययाला अट् हा आगम गार्ग्य आणि गालव यांच्या मतानें होतो; उदा० अरोदत्.

**अडः सर्वेषाम् ॥ ७।३।१०० ॥**

**अतो दीर्घो यञि ॥ ७।३।१०१ ॥**

**सुपि च ॥ ७।३।१०२ ॥ ]**

**बहुवचने झल्येत् ॥ ७।३।१०३ ॥**

**अतो दीर्घाद्बहुवचन एत्त्वं विप्रतिषेधेन १**

अतो दीर्घाद्बहुवचने एत्त्वं भवति विप्रतिषेधेन। अतो दीर्घो यञि सुपि च [१०१; १०२ ] इत्यस्यावकाशः। वृक्षाभ्याम् प्लक्षाभ्याम्। बहुवचने झल्येदित्यस्यावकाशः। वृक्षेषु प्लक्षेषु। इहोभयं प्राप्नोति। वृक्षेभ्यः प्लक्षेभ्यः। एत्त्वं भवति विप्रतिषेधेन॥

**[ ओसि च ॥ ७।३।१०४ ॥**

**आङि चापः ॥ ७।३।१०५ ॥**

**संबुद्धौ च ॥ ७।३।१०६ ]**

**अम्बार्थनद्योर्ह्रस्वः ॥७।३।१०७॥**

डलकवतीनां प्रतिषेधो वक्तव्यः। अम्बाडे अम्बाले अम्बिके॥

तल्ह्रस्वत्वं वा ङिसंबुद्ध्योः॥ तल्ह्रस्वत्वं वा ङिसंबुद्ध्योरिति वक्तव्यम्। देवत देवते। देवतायाम् देवते॥

स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। स कथं न वक्तव्यो भवति।

**अम्बार्थे द्व्यक्षरं यदि।**

---

(सू. १०३, वा. १) बहुवचन पुढें असतांना प्रकृत सूत्रानें सांगितलेलें एत्त्व हें ऱ्हस्व अकाराला पूर्वसूत्रानें सांगितलेल्या दीर्घापेक्षां विप्रतिषेधानें पूर्वी होतें. यञ् आरंभीं असलेला सुप् प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्व अकाराला 'सुपि च' या सूत्रानें सांगितलल्या दीर्घाला वृक्षाभ्या, प्लक्षाभ्याम्, येथें अवकाश आहे. बहुवचने झल्येत् ह्या प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या एत्त्वाला वृक्षेषु, प्लक्षेषु येथें अवकाश आहे, आणि वृक्षेभ्यः, प्लक्षेभ्यः, येथें हे दोन्ही विधी प्राप्त होतात. त्यामध्ये विप्रतिषेधामुळें दीर्घाचा बाध करून एत्त्व होतें.

(सू. १०७) ड, ल आणि क हीं व्यंजनें ज्यामध्ये आहेत अशा स्त्रीलिंगी शब्दाला प्रकृत सूत्रानें सांगितलेला ऱ्हस्व होत नाहीं असें म्हणावें; उदा० हे अम्बाडे, हे अम्बाले, हे अम्बिके.

ङि प्रत्यय किंवा संबुद्धि प्रत्यय पुढें असतांना तल्प्रत्ययान्त (५।१।११९) शब्दाच्या शेवटीं असलेल्या स्त्रीप्रत्ययाला ऱ्हस्व विकल्पानें होतो असें म्हणावें; उदा० हे देवत, हे देवते, देवतायाम् ह्या अर्थी देवते.

तर मग ड, ल, क हे वर्ण असलेल्या स्त्रीलिंगी शब्दाला ऱ्हस्व होत नाहीं असा निषेध सांगितला पाहिजे.

तसा निषेध स्वतंत्र सांगावयास नको.

तो कसा नको ?

अम्बा या अर्थाच्या शब्दाला जो हा ऱ्हस्व

---

१. (सू. १००) अद् धातूच्या पुढील अपृक्तहल्रूपी सार्वधातुक प्रत्ययाला अडागम सर्व आचार्यांच्या मतानें होतो; उदा० आदत्.

१. (सू. १०१) अंगाच्या शेवटीं असलेल्या ऱ्हस्व अकाराला यञ् आरंभीं असलेला सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो; उदा० पचामि, पचावः

१. (सू. १०२) अंगाच्या शेवटीं असलेल्या ऱ्हस्व अकाराला यञ् आरंभीं असलेला सुप् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो. उदा० रामाय.

१ (सू. १०३) अंगाच्या शेवटीं असलेल्या ऱ्हस्व अकाराला झल् आरंभीं असलेला बहुवचनाचा सुप् प्रत्यय पुढें असतांना एकार आदेश होतो. उदा० रामेभ्यः.

१ (सू. १०४) अंगाच्या शेवटीं असलेल्या ऱ्हस्व अकाराला एकार आदेश ओस् प्रत्यय पुढें असतांना होतो. उदा० रामयोः.

१ (सू. १०५) अंगाच्या शेवटीं असलेल्या स्त्रीप्रत्यय आकाराला तृतीयैकवचनप्रत्यय पुढें असतांना एकार आदेश होतो, उदा० रमया.

१ (सू १०६) अंगाच्या शेवटीं असलेल्या स्त्रीप्रत्यय आकाराला संबुद्धि (२।३।४९) प्रत्यय पुढें असतांना एकार आदेश होतो उदा० हे रमे

१. (सू. १०७) अम्बा या अर्थाच्या शब्दांना आणि नदीसंज्ञक शब्दांना संबुद्धिप्रत्यय पुढें असतांना

यदम्बार्थं द्व्यक्षरं गृह्यते ॥

तर्हि ह्रस्वत्वं वक्तव्यम्। अवश्यं छन्दसि ह्रस्वत्वं वक्तव्यम् उपगायन्तु मां पत्नयो गर्भिणयो युवतय इत्येवमर्थम् ॥

मातॄणां मातच्पुत्रार्थमर्हते । मातॄणां मातजादेशो वक्तव्यः पुत्रार्थमर्हते। गार्गीमात वात्सीमात ॥

## ह्रस्वस्य गुणः ॥ ७।३।१०८ ॥

इह कस्मान्न भवति । नदि कुमारि किशोरि ब्राह्मणि ब्रह्मबन्धु । ह्रस्ववचनसामर्थ्यात् । अस्त्यन्यद्ध्रस्ववचने प्रयोजनं पृथग्विभक्ति मोच्चीचरमिति। शक्यं पृथग्विभक्तिरनुच्चारयितुम्। कथम्। एवमयं ब्रूयात्। अम्बार्थानां ह्रस्वः नदीह्रस्वयोर्गुण इति ।

---

सांगितला आहे तो ते शब्द दोन अक्षरांचे असतील तरच होतो. तेव्हां त्यानेंच काम भागेलें.[2]

तर मग तल्प्रत्ययान्त शब्दाच्या शेवटीं असलेल्या स्त्रीप्रत्ययाला ह्रस्व सांगितला पाहिजे.

तोही सांगावयास नको. कारण वेदामध्यें वाटेल त्या ठिकाणीं ऱ्हस्व होतो अशी व्यवस्था 'उप गायन्तु मां पत्नयो गर्भिणयो युवतयः' इत्यादि मन्त्रामध्यें गर्भिणी वगैरे शब्दांना ऱ्हस्व होण्याकरितां अवश्य केलीच पाहिजे; तेव्हां त्यानेंच काम भागेल.

पुत्राची योग्यता दाखविण्याकरिता प्रयोग केलेला जो मातृ शब्द त्याला मातच् असा आदेश संबुद्धि पुढें असतांना होतो, असें म्हटलें पाहिजे; उदा० गार्गीमातें, वात्सीमात.

( सू. १०८ ) नदि, कुमारि, किशोरि, ब्राह्मणि, ब्रह्मबन्धु, हीं जीं नदी वगैरे शब्दांचीं संबुद्धिप्रत्ययाचीं रूपें त्यामध्यें पूर्वसूत्रानें ऱ्हस्व केल्यानंतर ह्या प्रकृत सूत्रानें गुण कां होत नाहीं ?

त्या ठिकाणीं ऱ्हस्व सांगितलेला व्यर्थ होईल म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव ऱ्हस्व केल्यानंतर गुण होणार नाहीं

पण नदीसंज्ञक शब्दांना जो पूर्वसूत्रानें ऱ्हस्व सांगितला आहे त्याचा उपयोग निराळा संभवत आहे; तो असा कीं जर नदीसंज्ञक शब्दांना ऱ्हस्व न सांगतां एकदम गुणच सांगावा तर अम्बार्थानां ऱ्हस्वः आणि नद्या गुणः अशी अम्बार्थ आणि नदी अशा दोन शब्दांना निरनिराळी विभक्ति उच्चारावी लागेल, ती उच्चारावयास नको.

ऱ्हस्व सांगण्याचा हा उपयोग बरोबर नाहीं. एकदम गुण सांगितला तरी नदी शब्दाला निराळी विभक्ति न लावणें शक्य आहे. कारण अम्बार्थानां ऱ्हस्वः, नदीऱ्हस्वयोर्गुणः, असें सूत्रकाराला बोलतां आलें असतें.

पण असें जर केलें तर 'जसि च' या पुढील सूत्रामध्यें 'नदीह्रस्वयोः' एवढ्या पदाची अनुवृत्ति होईल आणि नदीसंज्ञक शब्दांनाही जस् पुढें असतांना गुण होऊं लागेल.

तर मग येथें सूत्रांचा विभाग निराळ्या

---

ऱ्हस्व होतो. उदा० हे अम्ब, हे कुमारि.

२. अक्का, अल्ला, या शब्दांना हे अक्क, हे अल्ल या ठिकाणीं ऱ्हस्व होईल आणि अम्बाडा वगैरे शब्दांना हे अम्बाडे इत्यादि ठिकाणीं ऱ्हस्व होणार नाहीं

३. व्यत्ययो बहुलम् ( ३।१।८५ ) यानें दीर्घाच्या ऐवजीं ऱ्हस्व उच्चारला आहे अशी कल्पना केली पाहिजे.

४ गार्गी माता अस्य गार्गीमातृकः या शब्दाचें संबोधनैकवचन हे गार्गीमात असें आहे. गार्गी ही प्रसिद्ध विदुषी ज्याची आई आहे असें म्हटलें असतां त्या आईमुळें तिच्या मुलाचें महत्त्व दाखविलें जातें.

१. (सू. १०८) अंगाच्या शेवटीं असलेल्या ऱ्हस्वाला संबुद्धि पुढें असतांना गुण होतो. उदा० हे हरे, हे विष्णो.

२. गुण होणें हाच ऱ्हस्व सांगण्याचा उपयोग आहे असें असलें तर एकदम गुणच सांगावा; निराळा जो ऱ्हस्व सांगितला आहे तो व्यर्थच होणार आहे.

३ एकंदरींत एकदम गुण सांगणें ही गोष्ट नदीशब्दाला निराळी विभक्ति न लावतां साधत नाहीं; म्हणून 'अम्बार्थनद्योर्ह्रस्वः' असा जो सूत्रकारांनीं नदीसंज्ञकशब्दालाही ऱ्हस्व सांगितला आहे तो बरोबरच आहे; व्यर्थ होत नाहीं. तेव्हां नदि, कुमारि, इत्यादि ठिकाणीं प्रकृत सूत्रानें गुण होऊं लागेल, हा दोष कायम राहतो.

यद्येवमुच्यते जसि च [ १०९ ] इत्यत्र नद्या अपि गुणः प्राप्नोति ॥ एवं तर्हि योगविभागः करिष्यते । अम्बार्थनद्योर्ह्रस्वः । ततो ह्रस्वस्य । ह्रस्वस्य च ह्रस्वो भवति । किमर्थमिदम् । गुणं वक्ष्यति तद्बाधनार्थम् । ततो गुणः । गुणश्च भवति ह्रस्वस्येति ॥ अथवा ह्रस्वस्य गुण इत्यत्राम्बार्थनद्योर्ह्रस्व इत्येतदनुवर्तिष्यते ॥

## जसि च ॥ ७।३।१०९ ॥

### जसादिषु च्छन्दसि वावचनं प्राङ् णौ चङ्युपधायाः ॥ १ ॥

जसादिषु च्छन्दसि वेति वक्तव्यम् । किमविशेषेण । नेत्याह । प्राङ् णौ चङ्युपधायाः । किं प्रयोजनम् ।

### अम्बे दर्वि शतक्रत्वः पश्वे नृभ्यः किकिदीव्या ॥ २ ॥

अम्बे अम्ब । दर्वि दर्वे । शतक्रत्वः शतक्रतवः । पश्वे पशवे । किकिदीव्या किकिदीविना ॥

## [ ऋतो ङिसर्वनामस्थानयोः ॥ ७।३।११० ॥ ]

## घेर्ङिति ॥ ७।३।१११ ॥

---

तऱ्हेचा करतों, तो असा कीं अम्बार्थनद्योर्ह्रस्वः या पूर्वसूत्राच्या पुढे 'ह्रस्वस्य' एवढेंच निराळें सूत्र समजावें. त्याचा अर्थः– पूर्वसूत्रानें केलेल्या ह्रस्वाला ह्रस्व होतो.

ह्रस्वाला पुनः ह्रस्व सांगण्यांत हेतु काय ?

पुढील 'गुणः' या सूत्रानें प्राप्त झालेल्या गुणाचा बाध व्हावा हा हेतु आहे. त्या 'ह्रस्वस्य' या सूत्राच्या पुढें 'गुणः' असें सूत्र समजावें. ह्रस्वाला सबुद्धि पुढें असताना गुण होतो असा त्याचा अर्थ होय.

अथवा 'ह्रस्वस्य गुणः' एवढे एकच सूत्र समजून त्यामध्यें 'अम्बार्थनद्योर्ह्रस्वः' हें पूर्वसूत्र सर्व अनुवृत्त आणून त्याचा पुनः तेथें निराळा वाक्यार्थ करावा म्हणजे त्यानें गुणाचा बाध होईल.

(सू. १०९ वा. १) 'जसि च' याला आरंभ करून पुढील सूत्रांनीं जीं कार्यं सांगितलीं आहेत तीं वेदामध्यें विकल्पानें होतात असें म्हणावें.

पुढील कार्यें म्हणजे वाटेल तितकीं घ्यावयाचीं कीं काय ?

वाटेल तितकीं घ्यावयाचीं नाहींत. तर 'णौ चङ्युपधायाः' (७।४।१) या सूत्राच्या पूर्वींचीं घ्यावयाचीं असें आचार्य म्हणतात.

त्याचा काय उपयोग ?

(वा.२) अम्बा शब्दाचें अम्ब असें रूप होतें; तेथें एकदां विकल्पानें ह्रस्व होत असल्यामुळें अम्बे असेंही रूप होतें. दर्वि शब्दाचें गुणाच्या विकल्पामुळें दर्वे याच्या ऐवजीं दर्वि असेंही संबोधन होतें. शतक्रतु शब्दाहून जस् प्रत्यय केला असतां गुणाच्या विकल्पामुळें शतक्रतवः याच्या ऐवजीं शतक्रत्वः असेही होतें. पशु शब्दाचें पशवे असें चतुर्थीचें एकवचन होतें तेथें गुणाच्या विकल्पामुळें एकदां पश्वे असेंही होतें. किकिदीवि शब्दाचें तृतीयेचें एकवचन किकिदीविना असें होतें; तेथें 'ना' आदेशाच्या विकल्पामुळें एकदा किकिदीव्या असेंही होतें.

---

१. (सू. १०९) जस् प्रत्यय पुढें असतांना अंगाच्या शेवटीं असलेल्या ऱ्हस्वाला गुण होतो. उदा० हरयः.

१. (सू. ११०) अंगाच्या शेवटीं असलेल्या ऱ्हस्व ऋकाराला ङि प्रत्यय किंवा सर्वनामस्थान ( १।१।४३ ) प्रत्यय पुढें असतांना गुण होतो. उदा० मातरौ, मातरः.

१. (सू. १११) ङकार इत्संज्ञक असलेला सुप् प्रत्यय पुढें असतांना घिसंज्ञक (१।४।७) शब्दांच्या शेवटच्या वर्णाला गुण होतो; उदा० हरये, भानवे.

**घेर्ङिति गुणविधाने ङीसार्वधातुके प्रतिषेधः ॥ १ ॥**

घेर्ङिति गुणविधाने ङीसार्वधातुके प्रतिषेधो वक्तव्यः । पट्वी मृद्वी । कुरुत इति ॥

**सुबधिकारात्सिद्धम् ॥ २ ॥**

सुबिति वर्तते । क्व प्रकृतम् । सुपि च बहुवचने झल्येत [ १०२; १०३ ] इति ॥

**[ आण्नद्याः ॥ ७।३।११२ ॥ ]**[1]

**याडापः ॥ ७।३।११३ ॥**[1]

इह अतिखट्वाय अतिमालायेति ह्रस्वत्वे कृते स्थानिवद्भावाद्याद् प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः ।

**याड्विधानेऽतिखट्वायेत्यप्रतिषेधो ह्रस्वादेशत्वात् ॥ १ ॥**

याड्विधाने अतिखट्वाय अतिमालायेत्यप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । याट् कस्मान्न भवति । ह्रस्वादेशत्वात् । ह्रस्वादेशोऽयम् । उक्तमेतन्ङ्याब्ग्रहणेऽदीर्घ इति ॥ अथेदानीमसत्यपि स्थानिवद्भावे दीर्घत्वे कृत आप्चासौ भूतपूर्व इति कृत्वा याट् कस्मान्न भवति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति । ननु चेदानीं सत्यपि स्थानि-

---

(सूत्र १११, वा. १) हा जो घेर्ङिति या सूत्रानें गुण सांगितला आहे तो ङी आणि सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना होत नाहीं असें म्हणावें; उ० पट्वी, मृद्वी, कुरुतः इ०

(वा. २) सुपि असें पद मागून अनुवृत्त होत आहे, त्यामुळें तेथें सिद्धि होईल.

सुपि असें मागें कोठेंसें आहे ?

'सुपि च' (७।३।१०२) येथून सुपि हें पद 'बहुवचने झल्येत्' (७।३।१०३) इत्यादि सूत्रांमध्यें अनुवृत्त होत आहे.

(सू. ११३) अतिखट्वाय[2], अतिमालाय, येथें टाप् प्रत्ययाला ह्रस्व केल्यानंतर त्याला स्थानिवद्भाव (१।१।५६) होत असल्यामुळें प्रकृत सूत्रानें याट् आगम होऊं लागेल; त्याचा निषेध सांगितला पाहिजे.

तसा निषेध सांगावयास नको.

(वा. १) हा जो प्रकृत सूत्रानें याट् आगमाचा विधि केला आहे त्याचा अतिखट्वाय येथें निषेध सांगावयास नको; म्हणजे अप्रतिषेधच होतो. अनर्थक जो प्रतिषेध तो अप्रतिषेध होय.

तर मग अतिखट्वाय येथें प्रकृत सूत्रानें याट् कां बरें होत नाहीं ?

हा जो येथें आदेश झाला आहे तो ऱ्हस्व आदेश आहे; म्हणून स्थानिवद्भाव होत नाहीं. कारण 'ङ्याब्ग्रहणेऽदीर्घः' (१।१।५६, वा. २०) असा स्थानिवद्भावाचा निषेध मागें सांगितलाच आहे.

पण आतां येथें स्थानिवद्भाव झाला नाहीं तरी त्या ह्रस्वाला पुनः दीर्घ (७।३।१०२) केल्यानंतर हा प्रत्यक्ष असलेला आकार आणि पूर्वीचा पकार मिळून आप् आहे असें समजून प्रकृत सूत्रानें याट् आगम कां बरें होत नाहीं ?

'लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त या दोघांचें ग्रहण ज्या ठिकाणीं संभवतें त्या ठिकाणीं प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें' या परिभाषेनें होत नाहीं[3].

---

१. (सू. ११२) नदीसंज्ञक शब्दाच्या पुढील ङकार इत्संज्ञक असलेल्या सुप् प्रत्ययाला आट् आगम होतो; उदा० कुमार्यै.

१. (सू. ११३) आप् हा स्त्रीप्रत्यय शेवटीं असलेल्या अंगाच्या पुढील ङकार इत्संज्ञक असलेल्या सुप् प्रत्ययाला याट् असा आगम होतो; उदा० रमायै, खट्वायै.

२. खट्वा या स्त्रीलिंगी आप्प्रत्ययान्त शब्दावरोबर अति शब्दाचा द्वितीयातत्पुरुष केल्यानंतर खट्वा या आप् प्रत्ययाच्या आकाराला ऱ्हस्व (१।२।४८) होऊन अतिखट्व असा शब्द सिद्ध होतो. खट्वां अतिक्रान्तः अतिखट्वः असा त्याचा विग्रह आहे.

३. कारण इथें दीर्घानें झालेला आ आणि पूर्वीचा प् असा हा येथें लाक्षणिक आप् झाला आहे.

वद्भाव एतया परिभाषया शक्यमुपस्थातुम् । नेत्याह । न हि तदानीं क्वचिदपि स्थानिवद्भावः स्यात् ॥

[सर्वनाम्नःस्याड्ढ्रस्वश्च॥७।३।११४॥

विभाषा द्वितीयातृतीयाभ्याम् ॥७।३।११५॥ ]

ङेराम्नद्याम्नीभ्यः॥७।३।११६ ॥

इदुद्भ्यामाम्विधानमौत्त्वस्य परत्वात् ॥१॥

इदुद्भ्यामाम्विधेयः । शकट्याम् पद्धत्याम् धेन्वामिति । किं पुनः कारणं न सिध्यति । औत्त्वस्य परत्वात् । परत्वादौत्त्वं प्राप्नोति ॥

योगविभागात्सिद्धम् ॥ २ ॥

योगविभागः करिष्यते । ङेराम्नद्याम्नीभ्यः । तत इदुद्भ्याम् । इदुद्भ्यामुत्तरस्य ङेराम्भवतीति । शकट्याम् पद्धत्याम् धेन्वामिति । तत औदच्च घेः ॥

[ इदुद्भ्याम् ॥ ७।३।११७ ॥ ]

औत् । अच्च घेः ॥७।३।११८-११९॥

औत्त्वे योगविभागः ॥ १ ॥

औत्त्वे योगविभागः कर्तव्यः । औत् । औद्भवतीदुद्भ्याम् । ततोऽच्च घेरिति । अका-

---

पण असेंच असेल तर येथें स्थानिवद्भाव झाला तरी या परिभाषेनेच काम भागणार आहे.

तसें मात्र होणार नाहीं. कारण, स्थानिवद्भावानें मानलेलें आप् वगैरे स्वरूप जर प्रतिपदोक्त नव्हे म्हणून उपयोगीं पडणार नाहीं, तर कोठेंही स्थानिवद्भावच होणार नाहीं.

(सू. ११६, वा. १) ऱ्हस्व इकार व उकार शेवटीं असलेल्या स्त्रीलिंगी शब्दाच्या पुढील सप्तम्येकवचनाच्या ङि प्रत्ययाला आम् आदेश होतो, असें पुन: निराळें स्वतन्त्र विधान केलें पाहिजे; उदा० शकट्याम्, पद्धत्याम्, धेन्वाम्.

पण या शकटि वगैरे शब्दांना नदी संज्ञा ( १।४।६ ) असल्यामुळें प्रकृत सूत्रानेंच आम् आदेश प्राप्त होतो; तेव्हां त्यानेंच का बरें सिद्ध होत नाहीं ?

पुढील सूत्रानें सांगितलेल्या ङि प्रत्ययाला औकार आदेश हा पर असल्यामुळें आम् आदेशाचा बाध करून होऊं लागेल.

( वा. २ ) सूत्राचा विभाग केला म्हणजे हें सिद्ध होतें. तो असा कीं 'ङेराम्नद्याम्नीभ्यः' या सूत्राच्या पुढें 'इदुद्भ्याम्' (७।३।११७) एवढेंच सूत्र निराळें करावें. ऱ्हस्व इकार किंवा उकार शेवटीं असलेल्या स्त्रीलिंगी शब्दाच्या पुढील ङि प्रत्ययाला आम् आदेश होतो; उदा० शकट्याम्, पद्धत्याम्, धेन्वाम्. त्याच्या पुढें 'औदच्च घेः' असें सूत्र आहे.

( सू. ११८, वा. १) त्या 'औदच्च घेः' या औकारादेश सांगणाऱ्या सूत्रामध्यें सूत्राचा विभाग करावा. त्यांतील 'औत्' एवढेंच पूर्वीचें सूत्र होय. ऱ्हस्व इकार व उकार शेवटीं असलेल्या शब्दाच्या पुढील ङि प्रत्ययाला औकार आदेश होतो असा त्याचा अर्थ आहे. त्याच्या पुढें 'अच्च घेः' असें निराळें सूत्र समजावें. घिसंज्ञक शब्दाच्या पुढील ङि प्रत्ययाला औकार आदेश होतो आणि घिसंज्ञक शब्दाचा शेवटच्या वर्णाला ऱ्हस्व अकार आदेश होतो असा त्याचा अर्थ होय.

---

१. ( सू. ११४ ) आप् हा स्त्रीप्रत्यय शेवटीं असलेल्या सर्वनामसंज्ञक शब्दाच्या पुढील ङकार इत्संज्ञक असलेल्या सुप् प्रत्ययाला स्याट् असा आगम होतो, आणि पूर्वीच्या आकाराला ऱ्हस्व होतो; उदा० सर्वस्यै.

१. ( सू. ११५ ) द्वितीया आणि तृतीया या शब्दांच्या पुढील ङकार इत्संज्ञक असलेल्या सुप् प्रत्ययाला स्याट् आगम आणि पूर्वीच्या आकाराला ऱ्हस्व हे विकल्पानें होतात; उदा० द्वितीयस्यै, द्वितीयायै.

१.(सू.११६) नदीसंज्ञक शब्द, तसेंच स्त्रीलिंगाचा आप् प्रत्यय शेवटीं असलेले शब्द आणि नी शब्द याच्या पुढील सप्तम्येकवचनाच्या ङि प्रत्ययाला आम् असा आदेश होतो.

१. ( सू. ११७ ) ह्रस्व इकार अथवा ह्रस्व उकार शेवटीं असलेल्या नदीसंज्ञक शब्दांच्या पुढील ङि प्रत्ययाला आम् असा आदेश होतो.

१. ( सू ११८–११९ ) ह्रस्व इकार अथवा ह्रस्व उकार शेवटीं असलेल्या शब्दांच्या पुढील ङि प्रत्ययाला औ असा आदेश होतो, आणि घिसंज्ञक शब्द असेल तर त्याच्या अन्त्य वर्णाला अ असा आदेश होतो.

रश्च भवति घेरिति ॥ किमर्थो योगविभागः ।

**सखिपतिभ्यामौत्त्वार्थः ॥ २ ॥**

सखिपतिभ्यामौत्त्वं यथा स्यात् । सख्यौ पत्यौ ॥

**एकयोगे ह्यप्राप्तिरत्त्वसंनियोगात् ॥ ३ ॥**

एकयोगे हि सत्यौत्त्वस्याप्राप्तिः । किं कारणम् । अत्त्वसंनियोगात् । अत्त्वसंनियोगेनौत्त्वमुच्यते तेन यत्रैवात्त्वं तत्रैवौत्त्वं स्यात् ॥

**न वाकारस्यान्वाचयवचनाद्यथा क्यङि सलोपः ॥ ४ ॥**

न वार्थ औत्त्वे योगविभागेन । किं कारणम् । अकारस्यान्वाचयवचनात् । प्रधानशिष्टमौत्त्वमन्वाचयशिष्टमत्त्वं यथा क्यङि सलोपः । तद्यथा । प्रधानशिष्टः क्यङ् प्रातिपदिकमात्राद्भवति यत्र च सकारस्तत्र लोपः ॥

**अत्त्वे टाप्प्रतिषेधः ॥ ५ ॥**

अत्त्वे टापः प्रतिषेधो वक्तव्यः । शकटौ पद्धतौ धेनौ । अत्त्वे कृते टाप्प्राप्नोति ॥

**न वा संनिपातलक्षणस्यानिमित्तत्वात् ॥ ६ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । संनिपातलक्षणस्यानिमित्तत्वात् । संनिपातलक्षणो

---

हा सूत्राचा विभाग कशाकरितां वेगळा करावा लागत आहे ?

( वा. २ ) सखि आणि पति या शब्दांच्या पुढील ङि प्रत्ययाला औकार आदेश झाला पाहिजे; उदा० सख्यौ, पत्यौ.

( वा.० ३ ) 'औदच्च घेः' असें एकच सूत्र असेल तर सख्यौ व पत्यौ ह्या ठिकाणीं औकार आदेश प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं 'औदच्च घेः' या सूत्रानें घिसंज्ञक शब्दाला अकार आणि त्याच्याच बरोबर पुढील ङि प्रत्ययाला औकार आदेश सांगितला जाणार आहे. त्यामुळें ज्या ठिकाणीं मागील शब्दाला अकार आदेश होईल त्याच ठिकाणीं पुढील प्रत्ययाला औकार आदेश होईल[३].

( वा. ४ ) पण 'औदच्च घेः' या सूत्राचा विभाग करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ज्या ठिकाणीं दोन कार्यें सांगितलीं असतात त्या ठिकाणीं तीं कार्यें अगदीं बरोबरीनेंच होतात असा कांहीं नियम नाहीं; तर त्यांमध्यें एक मुख्यत्वानें आणि दुसरें त्याच्या अनुषङ्गानें अशींही तीं कार्यें करता येतात. तेव्हां 'औदच्च घेः' या सूत्रानें औकारादेशाचें विधान मुख्यत्वानें केलें आहे आणि अकारादेशाचें विधान हें आनुषंगिक आहे. जसें क्यङि सलोपः म्हणजे 'कर्तुः क्यङ् सलोपश्च' (३।१।११) या सूत्रानें क्यङ् प्रत्यय हा मुख्यत्वानें सांगितला आहे म्हणून तो वाटेल त्या प्रातिपदिकाहून होतो आणि सकाराचा लोप प्रातिपदिकाच्या शेवटीं सकार असल्यास तेथें होतो त्याप्रमाणेंच येथें समजाव.

( वा. ५ ) शकटौ, पद्धतौ, धेनौ, येथें प्रकृत सूत्रानें ङि प्रत्ययाला औकार आदेश आणि मागील इकाराला अकार आदेश होऊन शकट+औ या प्रकारच्या स्थितीमध्यें ऱ्हस्वअकारान्त शब्दाहून सांगितलेला टाप् प्रत्यय ( ४।१।४ ) प्राप्त होतो, त्याचा प्रतिषेध केला पाहिजे.

( वा. ६ ) हा प्रतिषेध करावयास नको.

काय कारण ?

---

२. सखि शब्दाला ( १।४।७ ) आणि केवळ पति शब्दाला (१।४।८) घि संज्ञा नसल्यामुळें सख्यौ व पत्यौ या ठिकाणीं अकार आदेश करतां येत नाहीं; त्यामुळें तेथें पुढील प्रत्ययाला औकार आदेशही होणार नाहीं.

३. तेव्हां औकारादेश हा अकारादेशावर अवलंबून राहणार नाहीं.

विधिरनिमित्तं तद्विघातस्येति टाप्न भविष्यति ॥

डित्करणाद्वा ॥ ७ ॥

अथवा ङिदौकारः करिष्यते । औ ङिच्च घेः ॥

आङो नास्त्रियाम् ॥ ७।३।१२० ॥

किमर्थमस्त्रियामित्युच्यते नाङो ना पुंसीत्येवोच्येत । का रूपसिद्धिः त्रपुणा जतुना । नुमा सिद्धम् ॥ नैवं शक्यम् । इह हि अमुना ब्राह्मणकुलेनेति मुभावस्यासिद्धत्वान्नुम्न स्यात् । अस्त्रियामिति पुनरुच्यमाने न दोषो भवति । कथम् । वक्ष्यत्येतन्न मु टादेश इति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये सप्तमस्याध्यायस्य तृतीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

कारण असें कीं घिसंज्ञक शब्द आणि पुढील प्रत्यय या दोघांच्या सामीप्यसंबंधामुळें झालेला जो अकार आदेश तो त्या दोघांच्या मध्यें शिरून त्यांचें सामीप्य घालविणाऱ्या टाप् प्रत्ययाला कारण होणार नाहीं. तेव्हां 'संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्य' या परिभाषेनें येथें टाप् प्रत्यय होत नाहीं.

(वा. ७) अथवा घिसंज्ञक शब्द असेल तेथें त्याला अकार आदेश न सांगतां त्या ठिकाणीं पुढील ङि प्रत्ययाला झालेला औकार आदेश ङित् होतो असें म्हणावें; म्हणजे 'औ ङिच्च घेः' असें सूत्र करावें.

(सू. १२०) ह्या सूत्रामध्यें अस्त्रियाम् असें कशाकरितां म्हटलें आहे ? तसें न म्हणतां 'आङो ना पुंसि' असेंच म्हणावें.

पण 'पुंसि' असें म्हटलें तर नपुंसकलिंगीं ना आदेश होणार नाहीं; तेव्हां त्रपुणा, जतुना, या उदाहरणाची सिद्धि कशी होईल ?

नुम् आगम (७।१।७३) होऊन तीं उदाहरणें साधतील.

पण अशा रीतीनें अमुना ब्राह्मणकुलेन हें उदाहरण साधणें शक्य नाहीं. कारण अमुना येथें अदस् याला झालेला मु आदेश[2] (८।२।८०) असिद्ध (८।२।१) असल्यामुळें नुम् आगम होणार नाहीं.

आतां येथें अस्त्रियाम् असें म्हटलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण 'न मु ने' याच्या ऐवजीं 'न मु टादेशे' (८।२।३ वा. १) असें म्हणावें असें पुढें वार्तिककार सांगणार आहेत.

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सातव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें व तिसरा पाद समाप्त झाला.

---

४. या परिभाषेचा अर्थ मागें ( १।१।३९ ) पहा.

५. तेव्हां शकटौ येथें पुढील औकार आदेश ङित् झाल्यामुळें मागील इकाराचा लोप (६।४।१४३) होतो; म्हणून टाप् प्रत्ययाची प्राप्तीच येत नाहीं.

१. (सू. १२०) घिसंज्ञक शब्दाच्या पुढील तृतीयैकवचन टाप् प्रत्ययाला ना असा आदेश होतो; परंतु तो आदेश स्त्रीलिंगामध्यें मात्र होत नाहीं; उदा० हरिणा.

२. नपुंसकलिंगी अदस् शब्दाहून तृतीयैकवचन टा प्रत्यय, सकाराला अकार आदेश (७।२।१०२) व पररूप (६।१।९७) होऊन अद-आ अशी स्थिति असतांना 'टा' चे स्थानीं होणारा जो इन आदेश (७।१।१२) त्याला मु आदेश (८।२।८०) हा 'न मु टादेशे' या वार्तिकानें सिद्ध होत असल्यामुळें इन आदेशाचा बाध करून परत्वास्तव द याला मु आदेश होतो. नंतर तो झालेला मु आदेश धरून सूत्रानें सांगितलेल्या ना आदेशाकाठीं 'न मु टादेशे' या वार्तिकानें सिद्ध होत असल्यामुळें घि संज्ञा (१।४।७) होऊन ना आदेश होतो अशा रीतीनें अमुना हें रूप सिद्ध होतें.

**णौ चङ्युपधाया ह्रस्वः ॥ ७।४।१ ॥**

अथ णिग्रहणं किमर्थं न चङ्युपधाया ह्रस्व इत्येवोच्येत । चङ्युपधाया ह्रस्व इतीयत्युच्यमाने अलीलवत् अपीपवत् ऊकारस्यैव ह्रस्वत्वं प्रसज्येत । नैतदस्ति प्रयोजनम् । वृद्धिरत्र बाधिका भविष्यति । वृद्धौ तर्हि कृतायामौकारस्यैव ह्रस्वत्वं प्रसज्येत । नैतदस्ति । अन्तरङ्गत्वादत्रावादेशो भविष्यति । न हीदानीं ह्रस्वभाविन्युपधा भवति तस्माण्णिग्रहणं कर्तव्यम् ॥

अथ चङ्ग्रहणं किमर्थं न णावुपधाया इत्येव सिद्धम् । णावुपधाया ह्रस्व इतीयत्युच्यमाने कारयति हारयतीत्यत्रापि प्रसज्येत । नैतदस्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न णावेव ह्रस्वत्वं भवतीति यदयं मितां ह्रस्वत्वं शास्ति । इहापि तर्हि न प्राप्नोति । अचीकरत् अजीहरत् । वचनाद्भविष्यति । इहापि तर्हि वचनात्प्राप्नोति । कारयति हारयति । तस्माच्चङ्ग्रहणं कर्तव्यम् ॥

अथोपधाग्रहणं किमर्थम् ।

**णौ चङ्युपधाग्रहणमन्त्यप्रतिषेधार्थम् १**

णौ चङ्युपधाग्रहण क्रियतेऽन्त्यस्य ह्रस्वत्वं मा भूत् । णौ चङि ह्रस्व इतीयत्युच्यमाने अलीलवत् अपीपवत् अन्त्यस्यैव ह्रस्व-

---

(सू. १) ह्या सूत्रामध्यें णौ असें कशाकरितां म्हटलें आहे ? तसें म्हणावयास नको. 'चङ्युपधाया ह्रस्वः' असेंच सूत्र करावें.

'चङ्युपधाया ह्रस्वः' एवढेंच सूत्र केलें तर अलीलवत् , अपीपवत् , येथें ऊकारालाच ह्रस्व होऊं लागेल.

णौ याचा हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण येथें वृद्धि (७।२।११५) ही ऱ्हस्वाचा बाध करील.

तर मग वृद्धि केल्यानंतर त्या वृद्धीनें झालेल्या औकारालाच हा ह्रस्व होऊं लागेल.

हें म्हणणें देखील बरोबर दिसत नाहीं. कारण ऱ्हस्वापेक्षा अगोदर अंतरंगत्वास्तव आव् (६।१।७८) हा आदेश होईल. आणि तो आव् आदेश केल्यानतर ज्याला ऱ्हस्व झाला पाहिजे असा आकार चङ् पुढें असताना त्याच्या मागील णिप्रत्ययान्त अंगाच्या उपधेला असत नाहीं. तेव्हां णौ असें म्हटलें पाहिजे.

आतां ह्या सूत्रामध्यें 'चङि' असें कशाकरितां म्हटलें आहे ? तसें म्हणावयास नको. 'णावुपधाया ऱ्हस्वः' एवढेंच म्हटलें असतां काम भागेल.

पण 'णावुपधाया ऱ्हस्वः' एवढेंच सूत्र केलें तर कारयति, हारयति, येथेंही ह्रस्व होऊं लागेल.

हा चङि म्हणण्याचा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि मित्संज्ञक धातूंना णि प्रत्यय पुढें असतांना स्वतंत्र ह्रस्व सांगतो (६।४।९२) त्या अर्थी तो असें ज्ञापित करतो कीं णि प्रत्यय पुढे असतांना त्यानें ऱ्हस्व होत नाहीं.

तर मग त्या ज्ञापकामुळें अचीकरत् अजीहरत्, येथेंही प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व होणार नाहीं.

पण ज्या अर्थीं प्रकृत सूत्र आचार्यांनीं केलें आहे त्या अर्थीं त्याच्या जोरावर तेथें ऱ्हस्व होईल.

तर मग त्याच्या त्याच जोरावर कारयति, हारयति, येथेंही ऱ्हस्व होऊं लागेल. तेव्हां त्याची व्यवस्था लागण्याकरितां 'चङि' असें म्हटलें पाहिजे.

आतां येथें उपधाग्रहण कशाकरितां केलें आहे ?

(वा. १) 'णौ चङि' या सूत्रामध्यें जें उपधाग्रहण केलें आहे तें अंत्याला ऱ्हस्व होऊं नये एवढ्याकरितां केलें आहे. उपधाग्रहण न करतां 'णौ चङि ह्रस्वः' एवढेंच सूत्र केलें तर अलीलवत् अपीपवत् , येथें चङ् प्रत्यय पुढें असलेला

---

१. ( सू. १ ) ज्या णि प्रत्ययाच्या पुढें चङ् प्रत्यय झालेला आहे असा णि प्रत्यय पुढें असतांना मागील अंगांतील उपधेला ऱ्हस्व होतो.

२. कारण चङ् पुढें असतांना त्याच्या मागील णिप्रत्ययान्त अंगाच्या उपधेला ऊकार आहे.

त्वं प्रसज्येत ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । अन्तरङ्गत्वादत्रावादेशो भविष्यति । न हीदानीं ह्रस्वभाव्यन्त्योऽस्ति । अन्त्यो ह्रस्वभावी नास्तीति कृत्वा वचनादनन्त्यस्य भविष्यति । इहापि वचनात्प्राप्नोति । अचकाङ्क्षत् अववाञ्छत् । येन नाव्यवधानं तेन व्यवहितेऽपि वचनप्रामाण्यात् । केन च नाव्यवधानम् । वर्णेन । एतेन पुनः संघातेन व्यवधानं भवति न भवति च ॥ उत्तरार्थं तर्ह्युपधाग्रहणं कर्तव्यम् । लोपः पिबतेरीच्चाभ्यासस्य [४] उपधाया यथा स्यात् । अपीप्यत् अपीप्यताम् अपीप्यन् ॥

अथेह कथं भवितव्यम् । मा भवानटिटदिति । आहोस्विन्मा भवानाटिटदिति । मा भवानाटिटदिति भवितव्यम् । ह्रस्वत्वं कस्मान्न भवति । द्विर्वचने कृते परेण रूपेण व्यवहितमिति कृत्वा । इदमिह संप्रधार्यम् । द्विर्वचनं क्रियतां ह्रस्वत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्ध्रस्वत्वम् । नित्यं द्विर्वचनम् । कृते ह्रस्वत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि । एवं तर्ह्या-

---

असा णि प्रत्यय पुढें असतांना त्याच्या मागील अन्त्याला[३] ह्रस्व होऊं लागेल.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण ऱ्हस्वापेक्षां अगोदर अंतरंगत्वास्तव आव् आदेश होईल. आव् आदेश केल्यानंतर ह्रस्व होण्यासारखा वर्ण शेवटीं नाहीं तर अर्थातच वचनसामर्थ्यास्तव अंतीं नसलेल्याला होईल.

तर मग वचनसामर्थ्यास्तव अचकाङ्क्षत्, व अववाञ्छत्, येथें शेवटीं दोन व्यंजनें असलीं तरी त्याच्या मागील आकाराला ऱ्हस्व होऊं लागेल.

वचनसामर्थ्यास्तव नाइलाजानें व्यवधान सहन करावयाचें तें जेवढयानें अवश्य सहन केलेंच पाहिजे असें असेल तेवढयानेंच सहन करावयाचें.

असें व्यवधान केवढयानें बरें अवश्य सहन केलेंच पाहिजे ?

एका वर्णानें अवश्य सहन केलेंच पाहिजे. अनेक वर्णांच्या समुदायानें व्यवधान कोठें असतें आणि कोठें असत नाहीं.

तर मग पुढें 'लोपः पिबतेरीच्चाभ्यासस्य' येथें अनुवृत्ति होण्याकरितां येथें उपधाग्रहण केलें पाहिजे. कारण त्यानें सांगितलेला लोप हा अपीप्यत्, अपीप्यताम्, अपीप्यन्, येथें पाय् याच्या उपधेचा म्हणजे आकाराचा झाला पाहिजे.

आता अट् धातूहून णिच् प्रत्यय करून पुढें चङ् प्रत्यय केला असता मा भवान् अटिटत् असें रूप व्हावें किंवा मा भवान् आटिटत् असें व्हावें ?

मा भवान् आटिटत् असें रूप व्हावें असें वाटतें.

पण तेथें प्रकृत सूत्रानें ह्रस्व कां बरें करीत नाहीं ?

अट् धातूहून णिच् प्रत्यय, चङ् प्रत्यय व उपधावृद्धि ( ७।२।११६ ) करून आटि+अत् अशी स्थिति असतां द्वित्वाच्या पूर्वी जरी ऱ्हस्वाची प्राप्ति येते तरी त्यांतील टि या भागाला द्वित्व केल्यानंतर त्या दुसऱ्या टि शब्दानें व्यवधान होत असल्यामुळें ऱ्हस्व केला नाहीं.

मग आतां येथें असा विचार केला पाहिजे कीं अगोदर द्वित्व करावें कीं अगोदर ऱ्हस्व करावा.

मग तुमचें काय म्हणणें आहे ?

मला वाटतें कीं परत्वास्तव ऱ्हस्वच अगोदर करावा.

परंतु द्वित्व नित्य आहे ना ? कारण, ऱ्हस्व केल्यानंतरही तें प्राप्त होतें आणि ऱ्हस्व करण्याच्या पूर्वीही

---

३. ककाराला; किंवा त्याला वृद्धि अगोदर झाली तर औकाराला.

४. प्रकृत सूत्रानें येथें ऱ्हस्व होतो कीं नाहीं याबद्दल हा प्रश्न आहे. आट् आगम ( ६।४।७२ ) होऊन संधि झाला म्हणजे ऱ्हस्व झाला किंवा न झाला तो फरक समजणार नाहीं. म्हणून आट् आगम न होण्याकरितां ( ६।४।७४ ) मागें मा शब्द टाकला आहे. त्या मा शब्दाबरोबर संधि झाला म्हणजे पुनः तीच स्थिति होणार, म्हणून त्याच्या पुढें भवान् शब्द टाकला आहे.

चार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति द्विर्वचनाद्ध्रस्वत्वं बलीय इति यदयमोणिमृदितं करोति। कथं कृत्वा ज्ञापकम्। ऋदित्करण एतत्प्रयोजनमृदितां नेति प्रतिषेधो यथा स्यात्। यदि चात्र पूर्वं द्विर्वचनं स्यादृदित्करणमनर्थकं स्यात्। द्विर्वचने कृते परेण व्यवहितत्वाद्ध्रस्वत्वं न भविष्यति। पश्यति त्वाचार्यो द्विर्वचनाद्ध्रस्वत्वं बलीय इति तत ओणिमृदितं करोति। तस्मान्मा भवानटटदित्येव भवितव्यम्॥

## उपधाह्रस्वत्वे णेर्णिच्युपसंख्यानम्॥२॥

उपधाह्रस्वत्वे णेर्णिच्युपसंख्यानं कर्तव्यम्। वादितवन्तं प्रयोजितवान् अवीवदद्वीणां परिवादकेन। किं पुनः कारणं न सिध्यति। णिचा व्यवहितत्वात्। णिलोपे कृते नास्ति व्यवधानम्। स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव। प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावश्चङ्परनिर्ह्रासे न स्थानिवदिति॥ एवमप्यग्लोपिनां नेति प्रतिषेधः प्राप्नोति। वृद्धौ कृतायां लोपस्तस्मादग्लोप्यङ्गं भवति। इदमिह संप्रधार्यम्। वृद्धिः क्रियतां लोप इति किमत्र कर्तव्यम्। परत्वा-

तें प्राप्त होत आहे. तेव्हां द्वित्वच झालें पाहिजे.

तर मग आम्ही असें म्हणतों कीं आचार्यांनीं जो ओण् धातूला इत्संज्ञक ऋकार जोडला आहे, त्या त्यांच्या कृतीवरून 'द्वित्वापेक्षा ऱ्हस्व प्रबल आहे' असें सूचित होतें.

हें ज्ञापक कसें बरें जमतें?

असे जमते कीं प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या ऱ्हस्वाचा पुढील सूत्रानें निषेध व्हावा हा इत्संज्ञक ऋकार जोडण्याचा उपयोग आहे. परंतु जर ह्रस्वाच्या पूर्वी द्वित्व होईल तर द्वित्वाचे मागून ओणिणत् येथें णि या भागानें व्यवधान येत असल्यामुळें ऱ्हस्वाची प्राप्तीच येत नाहीं; तेव्हां त्याकरिता जोडलेला इत्संज्ञक ऋकार व्यर्थ होतो असें असता ज्या अर्थी आचार्य ओण् धातूला इत्संज्ञक ऋकार जोडतात त्यावरून ते असें समजतात कीं द्वित्वापेक्षा ऱ्हस्व प्रबल आहे. तेव्हा एकंदरींत मा भवान् अटिटत् असेंच रूप होतें असें सिद्ध झालें.

( वा. २ ) हा जो प्रकृत सूत्रानें णि प्रत्यय पुढें असतांना उपधेला ऱ्हस्व सांगितला आहे तो त्या णिप्रत्ययान्ताहून दुसरा पुनः णिच् केला असेल तेथेंही होतो असें सांगावें, उदा० वादितवन्त प्रयोजितवान् या अर्थी अवीवदत्[५] वीणां परिवादकेन. वीणा वाजविणाऱ्याला प्रेरणा करिता झाला, असा येथें अर्थ विवक्षित आहे.

पण येथे प्रकृत सूत्रानें कां बरें ह्रस्व होणार नाहीं?

णिच् प्रत्ययानें व्यवधान आहे म्हणून.

पण त्या णिच् प्रत्ययाचा लोप केला असतां व्यवधान नाहीसें होईल.

लोप झाला तरी स्थानिवद्भावानें (१।१।५७) व्यवधान आहेच.

पण प्रकृत सूत्रानें सांगितलेला ऱ्हस्व कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा स्थानिवद्भावाचा निषेध ( १।१।५८ वा. २ ) सांगितला आहे ना?

अशा रीतीनें जरी अवीवदत् येथें प्रकृत सूत्रानेंच ऱ्हस्व प्राप्त होत आहे तरी तो होणार नाहीं. कारण अकाचा लोप झाला असेल तेथें ऱ्हस्व करूं नये, असा पुढील सूत्रानें निषेध केला आहे.

वृद्धि करण्याच्या पूर्वी णिच् प्रत्ययाचा लोप (६।४।५१) केला म्हणजे तो इकाराचा होतो, म्हणून अकाचा लोप होतो असें म्हणतां येईल. पण त्या पहिल्या णिच् प्रत्ययाला वृद्धीनें (७।२।११५) ऐकार आदेश झाल्यानंतर त्याचा लोप झाला तरी तो अकाचा लोप होत नाहीं, तेव्हां ते अंग अग्लोपि होत नाहीं.

पण येथें अगोदर असा विचार केला पाहिजे की प्रथमतः वृद्धि करावी किंवा लोप करावा?

५. वद् धातूहून णि प्रत्यय करून त्याहून पुनः णिच् प्रत्यय करून चङ् प्रत्यय केला आहे. ' वाद+इ+इ+अत् ' अशा स्थितीमध्यें प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व झाला पाहिजे तो मध्यें णि प्रत्ययाचें जरी व्यवधान आहे तरी या वार्तिकामुळें ऱ्हस्व होतो.

द् वृद्धिः । नित्यो लोपः । कृतायामपि वृद्धौ प्राप्नोत्यकृतायामपि । अनित्यो लोपः । अन्यस्य कृतायां वृद्धौ प्राप्नोत्यन्यस्याकृतायां शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । उभयोरनित्ययोः परत्वाद्वृद्धिः । वृद्धौ कृतायां लोपस्तत्राग्लोप्यङ्गं भवति । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति वृद्धेर्लोपो बलीयानिति यदयमग्लोपिनां नेति प्रतिषेधं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । अस्त्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । यत्र वृद्धावपि कृतायामगेव लुप्यते । अत्यरराजत् । यत्तर्हि प्रत्याहारग्रहणं करोति । इतरथा ह्यलोपिनां नेति ब्रूयात् ॥ एवं वा वृद्धेर्लोपो बलीयानिति । अथवारभ्यते पूर्वविप्रतिषेधो ण्यल्लोपावियङ्यण्गुणवृद्धिदीर्घत्वेभ्यः पूर्वविप्रतिषिद्धमिति । तस्मादुपसंख्यानं कर्तव्यमिति ।

[१]नाग्लोपिशास्वृदिताम् ॥७।४।२ ॥

---

मग काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव लोकापेक्षां वृद्धि अगोदर करावी.

पण लोप नित्य आहे ना ? कारण वृद्धि केली तरी तो प्राप्त होत आहे आणि वृद्धि करण्याच्या पूर्वीहि तो प्राप्त होत आहे.

अशा रीतीनें लोपाची प्राप्ति जरी येत आहे तरी वृद्धि केल्यानंतर तो लोप निराळ्या वर्णाला म्हणजे ऐकाराला प्राप्त होतो, आणि वृद्धि करण्याच्या पूर्वी निराळ्या वर्णाला म्हणजे इकाराला प्राप्त होतो. निरनिराळ्या शब्दाना प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो. तेव्हां वृद्धि आणि लोप हे दोघेही अनित्य असल्यामुळे त्यामध्यें परत्वास्तव वृद्धि अगोदर होणार आणि ती केल्यानंतर लोप झाला तरी त्या अंगामध्यें अकाचा लोप झाला असें होत नाहीं.

तर मग आम्ही असें म्हणतों कीं 'अंगामध्यें अकाचा लोप झाला असतां तेथ ऱ्हस्व होत नाहीं' असा जो आचार्यांनीं पुढील सूत्रामध्यें निषेध केला आहे त्या त्यांच्या कृतीवरून 'वृद्धीपेक्षां लोप प्रबल आहे' असें सूचित होतें.

हें ज्ञापक बरोबर जमत नाहीं. कारण वृद्धीपेक्षा लोप प्रबल धरला नाहीं तरी त्या निषेधाचा उपयोग दुसरीकडे होत आहे.

तो कोणता ?

तो असा कीं वृद्धि अगोदर करून मागून लोप केला तरी तो अकाचाच होतो; उदा०— अत्यरराजत्[६].

तर मग अकाचा लोप झाला असतां ऱ्हस्व होत नाहीं असें जे त्या निषेधामध्यें अक् या प्रत्याहाराचें ग्रहण केलें आहे त्यावरून वृद्धीपेक्षां लोप प्रबल आहे असें सूचित होतें. कारण, लोप प्रबल नसला तर अत्यरराजत् यासारखीं अकाराच्या लोपाचींच त्या निषेधाला उदाहरणें मिळणार; आणि तसेंच जर असेल तर आचार्यांनीं तो निषेध सागताना अग्लोपि याच्याएवजीं अलोपि असेंच म्हटलें असतें. एकंदरींत वृद्धीपेक्षां लोप प्रबल आहे असें सिद्ध झालें. अथवा लोप प्रबल आहे असें सिद्ध करण्याला ज्ञापकाची जरूरच नाहीं. कारण 'णीचा लोप आणि अकाराचा लोप हे इयङ्, यण्, गुण, वृद्धि आणि दीर्घ यांपेक्षां पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतात' (६।१।४८ वा. १) असें वार्तिककारांनीं सांगितलेंच आहे तेव्हा अवीवदत् येथें वृद्धीचा बाध करून णीचा लोप झाला म्हणजे त्या अंगामध्यें अकाचा लोप होतो, म्हणून ऱ्हस्वाचा निषेध प्राप्त होतो; त्याला मार्गे सारून ऱ्हस्व होण्याकरितां प्रकृत वार्तिक पाहिजे असें सिद्ध झालें.

---

६. राजन् शब्दाहून णिच् प्रत्यय करून अकाराला उपधावृद्धीनें (७।२।११६) आकार आदेश करून नंतर आन् या टीचा लोप केला तरी तो अकाचा लोप होत आहेच.

१. (सू. २) अकाचा लोप झाला असेल त्या अंगाला तसेंच शास् धातूला आणि ऱ्हस्व ऋकार इत्संज्ञक असलेल्या धातूला चङ्पर णिच् प्रत्यय पुढें असतांना पूर्वसूत्रानें ह्याळका ऱ्हस्व होत नाहीं.

**अग्लोपिप्रतिषेधानर्थक्यं च स्थानिवद्भावात् ॥१॥**

अग्लोपिप्रतिषेधश्चानर्थकः। किं कारणम्। स्थानिवद्भावात्। स्थानिवद्भावादत्र ह्रस्वत्वं न भविष्यति ॥ यत्र तर्हि स्थानिवद्भावो नास्ति तदर्थमयं योगो वक्तव्यः। क्व स्थानिवद्भावो नास्ति। यो हलचोरादेशः। अत्यरराजत्। किं पुनः कारणं हलचोरादेशो न स्थानिवदित्युच्यते। अजादेशः स्थानिवदित्युच्यते। न चायमच एवादेशः। किं तर्हि। अचश्चान्यस्य च। अग्लोपिनां नेत्यपि तर्हि प्रतिषेधो न प्राप्नोति। किं कारणम्। अग्लोपिनां नेत्युच्यते न चात्राग्गेव लुप्यते। किं तर्हि। अक् चान्यश्च। योऽत्राग्लुप्यते तदाश्रयः प्रतिषेधो भविष्यति। यथैव तर्हि योऽत्राग्लुप्यते तदाश्रयः प्रतिषेधो भवत्येवं योऽत्राज्लुप्यते तदाश्रयः स्थानिवद्भावो भविष्यति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदग्लोपिनां नेति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्य इत उत्तरं स्थानिवद्भावो न भवतीति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। पूर्वत्रासिद्धे न स्थानिवदित्युक्तं तन्न वक्तव्यं भवति ॥ यद्येतज्ज्ञाप्यते आदी-

---

( सू. २ वा. १ ) अकाचा लोप झालेल्या अंगाला जो हा ऱ्हस्वाचा निषेध सांगितला आहे तो निरुपयोगी आहे.

काय कारण ?

अकाच्या लोपाला स्थानिवद्भाव (१।१।५७) केला म्हणजे व्यवधान येत असल्यामुळें आपोआपच ऱ्हस्व होणार नाहीं.

तर मग ज्या ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नसेल त्याकरितां हा निषेध सांगितला पाहिजे.

पण अकाचा लोप तर झाला आहे आणि स्थानिवद्भाव तर होत नाहीं, असें उदाहरण तरी कोणतें ?

जो आदेश नुसत्या अचाला न होतां हल् आणि अच् या दोहोंना मिळून होतो त्या ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं; उदा० अत्यरराजत्.

पण हल् आणि अच् या दोहोंना मिळून झालेल्या आदेशाला स्थानिवद्भाव होत नाहीं याचें काय बरें कारण असावें ?

अचाच्या आदेशाला स्थानिवद्भाव होतो असें तेथें म्हटलें आहे आणि येथें जो अन् याचा लोप झाला आहे, तो अचाचाच आदेश नव्हे तर अच् आणि त्याशिवाय दुसरा वर्ण मिळून त्या समुदायाचा आदेश आहे.

तर मग त्याप्रमाणेंच अकाचा लोप झाला असता ऱ्हस्व होत नाहीं हा निषेध देखील तशा ठिकाणीं लागू पडणार नाहीं.

काय कारण ?

अकाचा लोप झालेल्या अंगाला ऱ्हस्व होत नाहीं असें तेथें म्हटलें आहे आणि येथें तर अकाचाच लोप झालेला नाहीं; तर अक् आणि त्याशिवाय दुसरा वर्ण मिळून अन् या समुदायाचा लोप झालेला आहे.

तरी पण त्या समुदायामध्यें अकाचा लोप झाला आहे ना ? त्यावर अवलंबून ऱ्हस्वाचा निषेध होईल.

तर मग त्या समुदायामध्यें जो अकाचा लोप झाला आहे त्यावर अवलंबून ह्रस्वाचा निषेध होईल त्याप्रमाणेंच जो अचाचा लोप झाला आहे त्यावर अवलंबून स्थानिवद्भावही होईल.

तर मग अशा रीतीनें स्थानिवद्भावानें सर्व काम भागत असतांना जो आचार्यांनीं अकाचा लोप झाला असतां तेथें ऱ्हस्व होत नाहीं असा निषेध केला आहे त्यावरून तें असें सुचवितात कीं या ऱ्हस्व प्रकरणापासून पुढील कार्यें कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

त्रिपादींतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं (१।१।५८ वा. ३), असा जो निषेध केला आहे तो करावयास नको.

आतां जर हें ज्ञापक घेतलें तर आ उपसर्ग-

---

२. येथें अकार अच् आणि नकार हल् हे दोन वर्ण मिळून 'अन्' या टिसंज्ञक भागाचा लोप झाला आहे.

धयतेरादीधकः आवेवयतेरावेवकः यीवर्णयोर्दीधीवेव्योः [ ७. ४. ५३ ] इति लोपो न प्राप्नोति । इह च यत्प्रलुनीह्यत्र तिङि चोदात्तवति [ ८. १. ७१ ] इत्येष स्वरो न प्राप्नोति। नैष दोषः । यत्तावदुच्यत आदीधयतेरादीधकः आवेवयतेरावेवकः यीवर्णयोरिति लोपो न प्राप्नोतीति यीवर्णयोरित्यत्र वर्णग्रहणसामर्थ्याद्भविष्यति । यदप्युच्यते यत्प्रलुनीह्यत्र तिङि चोदात्तवतीत्येष स्वरो न प्राप्नोतीति बहिरङ्गो यणादेशोऽन्तरङ्गः स्वरोऽसिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

[1] भ्राजभासभाषदीपजीवमीलपीडामन्यतरस्याम् ॥ ७।४।३ ॥

काण्यादीनां चेति वक्तव्यम् । के पुनः काण्यादयः । काणिराणिश्राणिभाणिहेठिलोपयः । अचकाणत् अचीकणत् । अरराणत् अरीरणत् । अशश्राणत् अशिश्रणत् । अबभाणत् अबीभणत् । अजिहेठत् अजीहिठत् । अलुलोपत् अलूलुपत् ॥

[ [1] लोपः पिबतेरीच्चाभ्यासस्य ॥ ७।४।४ ॥

[1] तिष्ठतेरित् ॥ ७।४।५ ॥

[1] जिघ्रतेर्वा ॥ ७।४।६ ॥

[1] उर्ऋत् ॥ ७।४।७ ॥

---

पूर्वक दीधी आणि वेवी या धातूहून णिच् प्रत्यय करून पुढें ण्वुल् प्रत्यय केला असतां आदीधकः आणि आवेवकः, अशीं रूपें होतात, तेथें 'यीवर्णयोर्दीधीवेव्योः' (७।४।५३) या सूत्रानें धातूच्या ईकाराचा लोप होतो तो होणार नाहीं; कारण णिचाचा लोप झाल्यानंतर त्याला जर स्थानिवद्भाव झाला नाहीं तर इवर्ण पुढें आहे असें म्हणतां येणार नाहीं.

तसेंच 'यत्प्रलुनीह्यत्र' येथें 'तिङि चोदात्तवति' ( ८।१।७१ ) या सूत्रानें प्र याला जो अनुदात्त स्वर होत असतो तो होणार नाहीं. कारण लुनीहि या तिङन्तातील शेवटच्या इकाराला झालेला जो यण् आदेश त्याला जर स्थानिवद्भाव झाला नाहीं तर उदात्तयुक्त तिङन्त पुढें आहे असें म्हणतां येणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. आदीधयति आणि आवेवयति या धातूंपासून सिद्ध होणाऱ्या आदीधकः आणि आवेवकः या रूपांमध्यें 'यीवर्णयोर्दीधीवेव्योः' या सूत्रानें सांगितलला लोप होणार नाहीं असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तर असें कीं 'अत्र' या पदांतील अकाराला मानून झालेला यण् आदेश बहिरंग आहे आणि स्वर हा अन्तरंग आहे; आणि अन्तरंग कर्तव्य असतांना बहिरंग शास्त्र असिद्ध होतें, अशी परिभाषा आहे. तेव्हां यण् असिद्ध असल्यामुळें स्वर होईल.

( सू. ३ ) काणि वगैरे धातूंनाही हा ऱ्हस्व विकल्पानें होतो असें म्हणावें.

काणि वगैरे धातू ते कोणते बरें ?

काणि, राणि, श्राणि, भाणि, हेठि आणि लोपि हे णिप्रत्ययान्त सहा धातू काणि वगैरे धातू होत; उदा० अचकाणत् अचीकणत्, अरराणत् अरीरणत्, अशश्राणत् अशिश्रणत्, अबभाणत् अबीभणत्, अजिहेठत् अजीहिठत्, अलुलोपत् अलूलुपत्.

---

१. ( सू. ३ ) चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना भ्राज, भास, भाष, दीप, जीव, मील आणि पीड यांच्या उपधेला ऱ्हस्व विकल्पानें होतो.

१. ( सू. ४ ) चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना भ्वादि गणांतील पा धातूला द्वित्व केल्यानंतर उत्तरखंडांतील उपधेचा लोप होतो आणि अभ्यासांतील आकाराला इकारादेश होतो.

१. ( सू. ५ ) चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असताना स्था धातूच्या उपधेला ऱ्हस्व इकार आदेश होतो.

१. (सू. ६) चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना घ्रा धातूच्या उपधेला ह्रस्व इकारादेश विकल्पानें होतो.

१. (सू. ७ ) चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना धातूच्या उपधेला असलेल्या ऋ वर्णाला

## [1]नित्यं छन्दसि ॥ ७।४।८ ॥ ]

## [2]दयतेर्दिगि लिटि ॥[ ७।४।९ ॥

इह अवदिग्ये अवदिग्याते अवदिग्यिरे दिग्यादेशे कृते द्विर्वचनं प्राप्नोति तत्र साभ्यासस्येति वक्तव्यम्। ननु च द्विर्वचने कृते साभ्यासस्य दिग्यादेशो भविष्यति । न सिध्यति । किं कारणम् ।

### दिग्यादेशस्य परत्वात्साभ्यासस्यादेशवचनम् ॥ १ ॥

दिग्यादेशः क्रियतां द्विर्वचनमिति परत्वाद्दिग्यादेशेन भवितव्यम् । तत्र साभ्यासस्येति वक्तव्यम् ॥

एवं तर्हि दिग्यादेशो द्विर्वचनं बाधिष्यते। पुनःप्रसङ्गविज्ञानाद् द्विर्वचनं प्राप्नोति ।

पुनःप्रसङ्ग इति चेदमादिभिस्तुल्यम्। पुनःप्रसङ्ग इति चेदमादिभिस्तुल्यमेतद्भवति। तद्यथा। अमादिषु कृतेषु पुनः प्रसङ्गाच्छिशी लुग्नुमो न भवन्ति। एवं दिग्यादेशे कृते पुनःप्रसङ्गाद् द्विर्वचनं न भविष्यति । अथवा विप्रतिषेधे पुनःप्रसङ्ग इत्युच्यते विप्रतिषेधश्च द्वयोः सावकाशयोरिह पुनरनवकाशो दिग्यादेशो द्विर्वचनं बाधिष्यते ॥ यदि तर्ह्यनवकाशा विधयो बाधका भवन्ति बभूव भभावो द्विर्वचनं बाधेत। सावकाशो भूभावः। कोऽवकाशः। भविता भवितुम्। इह तर्हि च-

---

( सू. ९) अवदिग्ये अवदिग्याते अवदिग्यिरे या उदाहरणांमध्यें दिगि आदेश केल्यानंतर द्वित्व प्राप्त होतें. त्याकरितां प्रकृत सूत्रामध्यें ' साभ्यासस्य ' असें म्हटलें पाहिजे.

पण अगोदर द्वित्व केल्यानंतर अभ्यासासहित दे धातूला दिगि आदेश होऊन रूपें सिद्ध होण्यास काय हरकत आहे ?

तशी मात्र सिद्ध होणार नाहींत.

काय कारण ?

( वा. १ ) दिगि आदेश करावा कीं द्वित्व करावें, असा विचार उपस्थित झाला असतां परत्वास्तव दिगि आदेश अगोदर होईल, याकरितां अभ्यासासहित दे धातूला दिगि आदेश होतो असें म्हटलें पाहिजे.

तर मग आता येथें दिगि या आदेशानें द्वित्वाचा बाधच केला जाईल.

बाध केला तरी पुनःप्रसङ्गविज्ञान म्हणजे बाधक शास्त्र झाल्यानतर मागून बाध्य शास्त्राची प्राप्ति येत असल्यास तें करावें या न्यायानें मागून द्वित्व प्राप्त होत आहे ना ?

पुनःप्रसङ्गविज्ञानानें द्वित्व होईल असें म्हणाल तर अम् वगैरेंप्रमाणें हें समजावें. जसें त्व ब्राह्मणकुलम् इत्यादि ठिकाणीं अम् ( ७।१।२ ) वगैरे आदेश केल्यानंतर शि, शी, लुक् आणि नुम् यांची मागून प्राप्ति येत असली तरी ते होत नाहींत, तसें येथें द्वित्वाचा बाध करून दिगि आदेश केल्यानंतर मागून द्वित्वाची प्राप्ति येत असली तरी तें होणार नाहीं. अथवा विप्रतिषेधानें ज्या ठिकाणीं बाध होतो तेथें पुनःप्रसंगानें बाधित शास्त्राचा मागून होण्याचा संभव असतो. आणि विप्रतिषेध तर दोन विधींना निरनिराळें चारितार्थ्य असेल तरच होतो. आता येथें पहावें तर दिगि आदेशाला द्वित्वाशिवाय कोठेंही चारितार्थ्य नाहीं. तेव्हां अनवकाश असा दिगि आदेश हा अपवाद म्हणून द्वित्वाचा बाध करील.

जर अनवकाश असलेले विधी दुसऱ्या विधींचा बाध करतील तर बभूव येथें भू आदेशानें-( २।४।५२ )ही द्वित्वाचा बाध होईल.

तेथें बाध होणार नाहीं. कारण त्या भू आदेशाला द्वित्वाशिवाय निराळें चारितार्थ्य आहे.

तें चारितार्थ्य कोठें वरें आहे ?

---

ऱ्हस्व ऋकारादेश विकल्पानें होतो.

१. ( सू. ८ ) चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना धातूच्या उपधेला असलेल्या ऋ वर्णाला ह्रस्व ऋकार आदेश वेदामध्यें नित्य होतो.

१. ( सू.९) देङ् रक्षणे या धातूला लिट् प्रत्यय पुढें असताना दिगि असा आदेश होतो.

२ मागें ७।१।२६ वा. २ आणि ७।१।७२ वा. ३ पहावें.

क्षिङः ख्याञ्वा लिटि [ २. ४. ५४; ५५ ] इति ख्याञ्द्विर्वचनं बाधेत। इह चापि बभूवेति यदि तावत्स्थाने द्विर्वचनं भूभावः सर्वादेशः प्राप्नोत्यथ द्विःप्रयोगो द्विर्वचनं परस्य भूभावे कृते पूर्वस्य श्रवणं प्राप्नोति ॥ नैष दोषः। आर्धधातुकीयाः सामान्येन भवन्त्यनवस्थितेषु प्रत्ययेषु। तत्रार्धधातुकसामान्ये भूभावे कृते यो यतः प्रत्ययः प्राप्नोति स ततो भविष्यति ॥

**[१]ऋतश्च संयोगादेर्गुणः ७।४।१०॥**

**संयोगादेर्गुणविधाने संयोगोपधग्रहणं कृञर्थम् ॥ १ ॥**

संयोगादेर्गुणविधाने संयोगोपधग्रहणं कर्तव्यम्। किमर्थम्। कृञर्थम्। इहापि यथा स्यात्। संचस्करतु संचस्करुः॥ यदि संयोगोपधग्रहणं क्रियते नार्थः संयोगादिग्रहणेन। इहापि सस्वरतुः सस्वरुः संयोगोपधस्येत्येव सिद्धम्। भवेत्सिद्धं सस्वरतुः सस्वरुरिति इदं तु न सिध्यति संचस्करतुः संचस्करुरिति। किं कारणम्। सुटो बहिरङ्गलक्षणत्वात्। बहिरङ्गः सुट्। अन्तरङ्गो गुणः।

---

भविता, भवितुम्, इत्यादि ठिकाणीं चारितार्थ्य आहे. तेथें द्वित्वाची मुळींच प्राप्ति नाहीं.

तर मग 'चक्षिङः ख्याञ्' याच्या पुढील 'वा लिटि' (२।४।५५) या सूत्रानें सांगितलेला चक्षिङ् धातूला ख्याञ् आदेश द्वित्वाचा बाध करील. तसेंच बभूव येथें भू आदेशानें द्वित्वाचा बाध केला नाहीं तरी दोष आहेच. तो असा कीं अस् याला दित्व होईल तें स्थानेद्विर्वचनपक्षीं एका अस् याचे स्थानीं 'अस्अस्' एवढा आदेश होईल; आणि नंतर भू आदेश त्या 'अस्अस्' एवढ्याला होईल. द्विःप्रयोगपक्षीं एका अस् याचें पुढें दुसऱ्यादा तसेंच पुनः अस् हें उच्चारलें जाईल. त्यांत पुढच्या अस् याला भू आदेश होईल आणि मागें अस् हें तसेंच राहील.

हा दोष येत नाहीं. कारण 'आर्धधातुके' (२।४।३५) या अधिकारात सांगितलेले आदेश हे आर्धधातुकसंज्ञक विशेष प्रत्यय पुढे करण्याच्या पूर्वीच अमुक जातीचा प्रत्यय पुढें करावयाचा आहे इतकें सामान्यतः मनांत आल्याबरोबर करावयाचे आहेत. आतां अशा स्थितींत भू आदेश केल्यानंतर एखाद्या ठिकाणीं त्या रूपान्तरामुळें प्रत्ययांत बदल होईल तर आदेश झाल्यानतर ज्याहून जो प्रत्यय प्राप्त होईल तोच तेथें होईल.

(सू. १०, वा. १) संयोग आरंभीं असलेल्या धातूला हा जो गुण सांगितला आहे तेथें संयोग उपधेला असलेल्या धातूला होतो असें आणखी म्हणावें.

कशाकरितां?

कृञ् धातूकरितां. तें असें कीं संचस्करतुः व संचस्करुः येथेंही गुण झाला पाहिजे.

पण असा जर संयोग उपधेला असलेल्या धातूला गुण सांगितला तर संयोग आरंभीं असलेल्या धातूला निराळा गुण सांगावयास नको; त्याचा कांहीं उपयोग नाहीं. कारण, संयोग आरंभीं असलेले जे स्वृ वगैरे धातू त्यांच्या उपधेला संयोग असल्यामुळें त्या म्हणण्यानेंच सस्वरतुः व सस्वरुः येथें गुण सिद्ध होत आहे.

पण तसें केलें तर संचस्करतुः व संचस्करुः, हीं उदाहरणें सिद्ध होणार नाहींत?

काय कारण?

---

३. तेव्हां लिट् प्रत्यय करावयाचा इतकें मनांत आल्याबरोबर अस् धातूला भू आदेश होतो. नंतर लिट् प्रत्यय करून दित्व केलें म्हणजे ते भू यालाच होईल; आणि बभूव हें रूप सिद्ध होईल. चख्यौ येथें ख्याञ् आदेश देखील तसाच अगोदर होईल. तेव्हां त्यानें द्वित्वाचा बाध होईल ही शंका मुळींच येत नाहीं.

४. अस् धातूहून कृत्प्रत्यय करावयाचा असें मनांत आल्याबरोबर भू आदेश होईल; नंतर हलन्त नसल्यामुळें ण्यत् प्रत्यय (३।१।१२४) न होतां अजन्त असल्यामुळें य प्रत्ययच होईल. (३।१।९७); उदा० भव्यम्.

१. (सू १०) संयोग आरंभीं असलेल्या ऱ्हस्व-ऋकारान्त धातूला लिट् प्रत्यय पुढें असतांना गुण होतो.

असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे । संयोगादिग्रहणे तु क्रियमाणे संयोगोपधग्रहणमनन्यार्थं विज्ञायते ॥

**ऋतो लिटि गुणाञ्ञ्णिति वृद्धिर्विप्रतिषेधेन ॥ २ ॥**

ऋतो लिटि गुणाञ्ञ्णिति वृद्धिर्भवति पूर्वविप्रतिषेधेन । ऋतो लिटि गुणस्यावकाशः । सस्वरतुः सस्वरुः । ञ्णिति वृद्धेरवकाशः । स्वारकः ध्वारकः । इहोभयं प्राप्नोति । सस्वार दध्वार । ञ्णिति वृद्धिर्भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥

**पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वा सिद्धम् ॥ ३ ॥**

अथवा पुनःप्रसङ्गाद् गुणे कृते रपरत्वे चात उपधायाः [ ७. २. ११६. ] इति वृद्धिर्भविष्यति ॥ नैष युक्तः परिहारः । पुनःप्रसङ्गो नाम स भवति यत्र तेनैव कृते प्राप्नोति तेनैव चाकृते । अत्र खलु गुणे कृते रपरत्वे चात उपधाया इति वृद्धिः प्राप्नोत्यकृते चाचो ञ्णितीति । तस्मात्सुष्ठूच्यत ऋतो लिटि गुणाञ्ञ्णिति वृद्धिर्विप्रतिषेधेनेति ॥

**[ ऋच्छत्यृताम् ॥ ७।४।११ ॥ ][1]**

**शृदृप्रां ह्रस्वो वा ॥ ७।४।१२ ॥[1]**

किमर्थं ह्रस्वो वेत्युच्यते न गुणो वेत्युच्येत । तत्रायमप्यर्थो गुणग्रहणं न कर्तव्यं

---

सुट् आगमाला बहिरंगत्व आहे म्हणून. सम् या निराळ्या पदामुळें होणारा सुट् आगम बहिरंग आहे, आणि गुण अंतरंग आहे; आणि अंतरंग गुण कर्तव्य असतांना बहिरंग सुट् आगम असिद्ध आहे. तेव्हां जरी वस्तुत: संयोग उपधेला आहे तरी तो गुणाच्या दृष्टीनें असिद्ध असल्यामुळें गुण होणार नाहीं. आतां संयोग आरंभीं असलेल्या धातूला गुण निराळा सांगितला असला म्हणजे मात्र हें सिद्ध होतें. कारण त्या वेळीं संयोग उपधेला असलेल्या धातूला जो गुण सांगितला आहे तो मुद्दाम संचस्करतुः याकरितांच सांगितला असल्यामुळें त्याच्या जोरावर अंतरंगपरिभाषेचा बाध होईल.

( वा. २ ) हा जो प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व ऋकारान्त धातूला लिट् प्रत्यय पुढें असतांना गुण सांगितला आहे त्यापेक्षां ञकारणकारेत्संज्ञक असलेला प्रत्यय पुढें असतांना सांगितलेली वृद्धि ( ७।२।११५ ) विप्रतिषेधानें अगोदर होते. प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या गुणाला त्या वृद्धीशिवाय सस्वरतुः व सस्वरु: येथें चारितार्थ्य आहे. तसेंच ञकारणकारेत्संज्ञक असलेला प्रत्यय पुढें असतांना सांगितलेल्या वृद्धीला ह्या गुणाशिवाय स्वारकः व ध्वारक: येथें चारितार्थ्य आहे; आणि सस्वार, दध्वार येथें ते दोन्ही विधी प्राप्त होतात. त्यांमध्यें पूर्वविप्रतिषेधानें वृद्धि ही गुणाचा बाध करते.

( वा. ३ ) अथवा पुनःप्रसंगविज्ञानानें हें सिद्ध होतें. म्हणजे सस्वार येथें प्रकृत सूत्रानें सांगितलेला गुण हा परत्वास्तव वृद्धीचा बाध करून अगोदर जरी झाला तरी तो रपर झाल्यामुळें अत उपधायाः ( ७।२।११६ ) यानें वृद्धि होऊन उदाहरण साधेल.

अशा रीतीनें हें उदाहरण साधणें बरोबर नाहीं. कारण पुनःप्रसंगविज्ञान हें अशालाच म्हणतात कीं ज्या ठिकाणीं बाधक शास्त्र केल्यानंतर ज्यानें कार्य प्राप्त होतें त्यानेंच तें बाधक शास्त्र करण्याचे पूर्वींही प्राप्त होत असतें. आतां येथें पहावें तर बाधक शास्त्र म्हणजे गुण केल्यानंतर तो रपर झाल्यामुळें ‘ अत उपधायाः ’ या शास्त्रानें वृद्धि प्राप्त होते, आणि गुण करण्याचे पूर्वीं ‘ अचो ञ्णिति ’ या शास्त्रानें वृद्धि प्राप्त होतें. तेव्हां गुणापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें वृद्धि अगोदर होते असें जें वार्तिककारांनीं येथें म्हटलें आहे तेंच चांगलें आहे.

( सू. १२ ) ह्या सूत्रामध्यें ऱ्हस्व विकल्पानें होतो असें कशाकरितां म्हटलें आहे ? तसें म्हणू

---

१. ( सू. ११ ) तुदादि गणांतील ऋच्छ् धातु, ऋ धातु आणि दीर्घ ऋकारान्त धातू यांना लिट् प्रत्यय पुढें असतांना गुण होतो.

१. ( सू. १२ ) शॄ, दॄ आणि पॄ या धातूंना लिट् प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें ऱ्हस्व होतो.

भवति। प्रकृतमनुवर्तते। क्व प्रकृतम्। ऋतश्च संयोगादेर्गुणः [१०] इति।

ऋतो ह्रस्वत्वमित्त्वप्रतिषेधार्थम् ॥१॥

ऋतो ह्रस्वत्वमुच्यत इत्त्वप्रतिषेधार्थम्। इत्त्वं मा भूदिति। गुणो वेतीयत्युच्यमाने गुणेन मुक्त इत्त्वं प्रसज्येत। ह्रस्वो वेत्युच्यमाने ह्रस्वेन मुक्ते यथाप्राप्तो गुणो भविष्यति॥

[१]केऽणः ॥ ७।४।१३ ॥

केऽणो ह्रस्वत्वे तद्धितग्रहणं कृन्निवृत्त्यर्थम् ॥ १ ॥

केऽणो ह्रस्वत्वे तद्धितग्रहणं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्। कृन्निवृत्त्यर्थम्। कृति मा भूत्। राका धाकेति॥ तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि॥

[ न कपि ॥ ७।४।१४ ॥

आपोऽन्यतरस्याम् ॥ ७।४।१५ ॥

ऋदृशोऽङि गुणः ॥ ७।४।१६ ॥

अस्यतेस्थुक् ॥ ७।४।१७ ॥

श्वयतेरः ॥ ७।४।१८ ॥

---

नये, तर गुण विकल्पानें होतो असेंच म्हणावें. तसें म्हणण्यांत आणखीही एक फायदा असा आहे कीं सूत्रामध्यें गुण हा शब्द प्रत्यक्ष उच्चारावयास नको. कारण तो (मागून) अनुवृत्त होत आहे.

मागें कोठें गुण हा शब्द आहे ?

'ऋतश्च संयोगादेर्गुणः' या सूत्रामध्यें गुण शब्द आहे.

(वा. १) हा जो दीर्घ ऋकाराला न्हस्व ऋकार येथें सांगितला आहे तो इत्वाच्या निषेधाकरतां सांगितला आहे. शश्रतुः येथें इत्त्व(७।१।१००) न झालें पाहिजे. गुण विकल्पानें होतो असें येथें म्हटलें तर गुण केला नाहीं त्या वेळीं इत्त्व होऊं लागेल. आतां न्हस्व विकल्पानें होतो असें येथें म्हटलें म्हणजे न्हस्वाचे वेळीं शश्रतुः होऊन जेव्हां न्हस्व होत नाहीं त्या वेळीं पूर्व सूत्रानें प्राप्त झालेला गुण होईल.

(सू. १३, वा. १) हा जो प्रकृत सूत्रानें क प्रत्यय पुढें असतांना अणाला न्हस्व सांगितला आहे तो क हा तद्धित प्रत्यय पुढें असेल तर होतो असें म्हणावें.

ह्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं कृत्प्रत्ययाची निवृत्ति झाली पाहिजे. म्हणजे क हा कृत्प्रत्यय पुढें असेल तर न्हस्व होऊं नये; उदा० राका[२], धाका.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण 'उणादि प्रत्यय करून सिद्ध होणारीं प्रातिपादिकें हीं मूळचीं अव्युत्पन्नच आहेत, म्हणजे त्यांमध्यें धातु, प्रत्यय, ही कांहीं कल्पनाच नाहींं' या परिभाषेनें काम भागत आहे.

---

२. न्हस्व केला त्या वेळीं यण् होऊन शश्रतुः असें रूप होतें आणि न्हस्व केला नाहीं त्या वेळीं मागील सूत्रानें गुण होऊन शशरतुः असें रूप होतें. आतां गुण विकल्पानें सांगितला तर गुण केला त्या वेळीं शशरतुः हें साधेल आणि गुण केला नाहीं त्या वेळीं दीर्घ ऋकारालाच यण् होऊन शश्रतुः हें रूप साधेल, असा अभिप्राय आहे.

१. ( सू. १३ ) क प्रत्यय पुढें असतांना अंगाच्या शेवटीं असलेल्या अ, इ आणि उ या वर्णांना न्हस्व होतो.

२. रा आणि धा या धातूंहून 'कृदाधारा०' (उणा. ३।२० ) या सूत्रानें क प्रत्यय होऊन पुढें स्त्रीलिंगी टाप् प्रत्यय झाला आहे.

१. ( सू १४ ) कप् प्रत्यय पुढें असतांना पूर्व सूत्रानें सांगितलेला न्हस्व होत नाहीं.

१. ( सू. १५ ) अंगाच्या शेवटीं असलेल्या आप् प्रत्ययाला क प्रत्यय पुढें असतांना न्हस्व विकल्पानें होतो.

१ ( सू. १६ ) ऋकारान्त धातू आणि दृश् धातु यांना अङ् प्रत्यय पुढें असतांना गुण होतो.

१. ( सू. १७ ) दिवादि गणांतील अस् धातूला अङ् प्रत्यय पुढें असतांना थुक् असा आगम होतो.

१. ( सू. १८ ) श्वि धातूच्या इकाराला अङ् प्रत्यय पुढें असतांना अकार आदेश होतो.

पतः पुम् ॥ ७।४।१९ ॥

वच उम् ॥ ७।४।२० ॥

शीङः सार्वधातुके गुणः ॥ ७।४।२१ ॥

अयङ्यि क्ङिति ॥ ७।४।२२ ॥]

उपसर्गाद्ध्रस्व ऊहतेः ॥ ७।४।२३ ॥

इह कस्मान्न भवति । प्रोह्यते उपोह्यते । एकादेशे कृते व्यपवर्गाभावात् ॥ एवमपि आ ऊह्यते ओह्यते समोह्यत इत्यत्र प्राप्नोति । अण इति वर्तते ॥

एतेर्लिङि ॥ ७।४।२४ ॥

एतेर्लिङ्युपसर्गात् ॥ १ ॥

एतेर्लिङ्युपसर्गादिति वक्तव्यम् । इह मा भूत् । ईयात् ॥ तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । उपसर्गादिति वर्तते । एवं तर्ह्याचार्योऽन्वाचष्ट उपसर्गादित्यनुवर्तत इति । नैतदन्वाख्येयमधिकारा अनुवर्तन्त इति । एष एव न्यायो यदुताधिकारा अनुवर्तेरन् ॥

[ अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः ॥ ७।४।२५ ॥

च्वौ च ॥ ७।४।२६ ]

रीङृतः ॥ ७।४।२७ ॥

---

(सू. २३) हा प्रकृत सूत्रानें सांगितलेला ऱ्हस्व प्रोह्यते व उपोह्यते, येथें कां बरें होत नाहीं ?

एकादेश केल्यानंतर उपसर्गाच्या पुढें ऊह् धातु नाहीं म्हणून होत नाहीं.

तरी पण आ ऊह्यते येथें एकादेश होऊन ओह्यते असें झाल्यानंतर त्याच्या मागील सम् या उपसर्गाच्या पुढें हा ऊह् धातु दाखवितां येत असल्यामुळें समोह्यते येथें आकाराला ऱ्हस्व कां होत नाहीं ?

'अणः' अशी येथें अनुवृत्ति आहे. तेव्हां ओकार अण् नसल्यामुळें त्याला ऱ्हस्व होत नाहीं.

(सू. २४, वा. १) हा जो इण् धातूच्या अणाला प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व सांगितला आहे तो त्या धातूच्या मागें उपसर्ग असेल तर होतो असें म्हणावें. कारण ईयात् येथें उपसर्ग नसतांना ऱ्हस्व न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण उपसर्गात् या पदाची मागून अनुवृत्तीच येथें येत आहे.

तर मग 'येथें उपसर्गात् अशी अनुवृत्ति आणावी' अशा अर्थाचेंच हें वार्तिक आचार्यांनीं लिहिलें आहे असें समजावें.

पण असें समजणें बरोबर नाहीं. कारण 'अधिकारांची पुढे अनुवृत्ति करावी' असें सांगावें लागत नाहीं. अधिकार म्हटला म्हणजे पुढें त्याची अनुवृत्ति होते हा न्यायच आहे.

---

१ (सू. १९) पत् धातूला अङ् प्रत्यय पुढें असतांना पुम् असा आगम होतो.

१ (सू. २०) वच् धातूला अङ् प्रत्यय पुढें असतांना उम् असा आगम होतो.

१ (सू. २१) शीङ् धातूला सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना गुण होतो.

१ (सू. २२) शीङ् धातूला यकार आरंभीं असलेला ककारेत्संज्ञक किंवा ङकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना अयङ् आदेश होतो.

१ (सू २३) उपसर्गाच्या पुढें ऊह् धातूच्या ऊकाराला यकार आरंभीं असलेला ककारेत्संज्ञक किंवा ङकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्व होतो.

२. प्र या उपसर्गातील अकार आणि ऊह् धातूंतील ऊकार या दोन वर्णांना मिळून एकादेश ओकार झाल्यानंतर केवढ्या भागाला उपसर्ग म्हणावें तें कांहींच सांगतां येत नाहीं.

१. ( सू. २४ ) उपसर्गाच्या पुढें असलेला जो इण् धातूचा अण् त्याला लिङ् प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्व होतो.

१. ( सू. २५ ) अंगाच्या शेवटीं असलेल्या अचाला कृत् किंवा सार्वधातुक ह्यांशिवाय यकारादि प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

१. ( सू. २६ ) अंगाच्या शेवटीं असलेल्या अचाला च्वि प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

१ ( सू २७ ) कृत् किंवा सार्वधातुक ह्यांशिवाय यकारादि प्रत्यय पुढें असतांना किंवा च्वि प्रत्यय पुढें असतांना अंगाच्या शेवटीं असलेल्या ऱ्हस्व ऋकाराला रीङ् आदेश होतो.

दीर्घोच्चारणं किमर्थं न रिङ्कृत इत्येवोच्येत । का रूपसिद्धिः मात्रीयति पित्रीयति । अकृत्सार्वधातुकयोरिति दीर्घत्वं भविष्यति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद्दीर्घोच्चारणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषाङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिर्निष्ठितस्येति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । पिबेर्गुणप्रतिषेधश्चोदितः स न वक्तव्यो भवति ॥

[ रिङ्शयग्लिङ्क्षु ॥ ७।४।२८ ॥
गुणोऽर्तिसंयोगाद्योः ॥ ७।४।२९ ॥]

यङि च ॥ ७।४।३० ॥

यङ्प्रकरणे हन्तेर्हिंसायामीट् ॥ १ ॥

यङ्प्रकरणे हन्तेर्हिंसायामीड् वक्तव्यः । जेघ्नीयते ॥ यदीडभ्यासरूपं न सिध्यति ॥ एवं तर्हि यङ्प्रकरणे हन्तेर्हिंसायामीक् । एवमप्युपधालोपो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि यङ्प्रकरणे हन्तेर्हिंसायां घ्नी ॥

[ ई घ्राध्मोः ॥ ७।४।३१ ॥
अस्य च्वौ ॥ ७।४।३२ ॥

( सू. २७ ) ह्या सूत्रामध्यें रीङ् असा दीर्घ आदेश कशाकरितां सांगितला आहे ? तसा सांगावयास नको. रिङ् ऋतः असेंच सूत्र करावें.

रिङ् असा ह्रस्व आदेश सांगितला तर मात्रीयति व पित्रीयति हीं रूपें कशीं बरें साधतील ?

तेथें रिङ् असा ह्रस्व आदेश जरी झाला तरी तो झाल्यावर ' अकृत्सार्वधातुकयोः० ' ( ७।४।२५ ) या सूत्रानें दीर्घ होईल.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असूनही जें आचार्यांनीं येथें रीङ् असें दीर्घ उच्चारण केलें आहे त्यावरून ते ' अङ्गस्य या अधिकारातील कोणतेही एक कार्य करून प्रयोगार्ह रूप झालें म्हणजे पुनः दुसरें अङ्गस्य या अधिकारातील कार्य प्राप्त झालें तरी करूं नये ' अशी परिभाषा सुचवितात.

या ज्ञापकाचा काय उपयोग ?

पिबति इत्यादि उदाहरणामध्यें पा धातूला पिब आदेश (७।३।७८) केल्यानंतर गुण (७।३।८६ ) न होण्याकरितां जो निषेध (७।३।७८ वा. १ ) सांगितला आहे तो सांगावयास नको.

( सू. ३० वा. १ ) प्रकृत सूत्रानें यङ्च्या निमित्तानें कार्य सांगितलें आहे. ह्या यङ्प्रकरणामध्यें हिंसार्थक हन् धातूच्या पुढील यङ् प्रत्ययाला ईट् आगम होतो असें म्हणावें; उदा० जेघ्नीयते.

जर यङ् प्रत्ययाला ईट् आगम केला तर जेघ्नीयते यांत ' जे ' हें अभ्यासाचें रूप सिद्ध होणार नाहीं.

तर मग ह्या यङ् प्रकरणामध्यें हिंसार्थक हन्-धातूला यङ् प्रत्यय पुढें असतांना ईक् आगम होतो असें म्हणावें.

अशा रीतीनें ' द्विर्वचनेऽचि ' याची प्राप्ति येत नसली तरी पण उपधालोपाची प्राप्ति मुळींच येत नाहीं.

तर मग ह्या यङ्प्रकरणामध्यें हिंसार्थक हन्

१. (सू. २८) श, यक् आणि यकार आरंभीं असलेला सार्वधातुकाशिवाय लिङ्, हे प्रत्यय पुढें असतांना अंगाच्या शेवटीं असलेल्या ह्रस्व ऋकाराला रिङ् असा आदेश होतो.

१. सू २९) यक् आणि यकार आरंभीं असलेला सार्वधातुकाशिवाय लिङ् हे प्रत्यय पुढें असतांना ऋ धातु आणि संयोग आरंभीं असलेला ह्रस्वऋकारान्त धातु यांना गुण होतो.

१.(सू.३०)यङ् प्रत्यय पुढें असतांना ऋ धातु आणि संयोग आरंभीं असलेला ह्रस्वऋकारान्त धातु यांना गुण होतो.

२ यङ् प्रत्ययाला ईट् आगम झाला म्हणजे ईय हा अजादि ङित् प्रत्यय होतो म्हणून हन् धातूच्या उपधेचा लोप (६।४।९८) व कुत्व (७।३।५४) होऊन घ्नीय या भागाला द्वित्व होऊन अभ्यासाला गुण (७।४।८२) होऊन जेघ्नीयते हें रूप साधतें असा अभिप्राय आहे.

३. कारण ईय हा अजादि प्रत्यय झाल्यामुळ द्विर्वचनेऽचि (१।१।५९) यानें उपधालोपाचा द्वित्वाच्या पूर्वी निषेध होईल आणि घ्नीय् या भागाला द्वित्व होणार नाहीं.

१.(सू.३१) घ्रा आणि ध्मा या धातूंच्या शेवटच्या आकाराला यङ् प्रत्यय पुढें असतांना ईकार आदेश होतो.

१.(सू.३२) च्वि प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दांतील शेवटच्या अकाराला ईकार आदेश होतो.

**क्यचि च ॥ ७।४।३३ ॥**

**अशनायोदन्यधनाया बुभुक्षा- पिपासागर्धेषु ॥ ७।४।३४ ॥ ]**

**न च्छन्दस्यपुत्रस्य ॥ ७।४।३५ ॥**

अत्यल्पमिदमुच्यतेऽपुत्रस्येति । अपुत्रादीनामिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । जनीयन्तो न्यग्रवः पुत्रीयन्तः सुदानवः ॥

**छन्दसि प्रतिषेधे दीर्घप्रतिषेधः ॥१॥**

छन्दसि प्रतिषेधे दीर्घत्वस्य प्रतिषेधो वक्तव्यः । संस्वेदयुः मित्रयुः ॥

**न वाश्वाघस्याद्वचनमवधारणार्थम् ॥२॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । अश्वाघस्याद्वचनमवधारणार्थं भविष्यति अश्वाघयोरेव च्छन्दसि दीर्घो भविष्यति नान्यस्येति ॥

**[ दुरस्युर्द्रविणस्युर्वृषण्यति रिषण्यति ॥७।४।३६ ॥**

**अश्वाघस्यात् ॥ ७।४।३७ ॥**

**देवसुम्नयोर्यजुषि काठके ॥७।४।३८**

**कव्यध्वरपृतनस्यर्चि लोपः ॥७।४।३९**

**द्यतिस्यतिमास्थामित्ति किति ॥ ७।४।४० ॥ ]**

**शाच्छोरन्यतरस्याम् ॥ ७।४।४१ ॥**

---

धातूला घ्नी असा आदेश होतो असें म्हणावें, म्हणजे कांहींच दोष उरत नाहीं.

( सू ३५ ) ह्या निषेधामध्यें फक्त पुत्र हा एकच शब्द वगळला आहे, तो फारच थोडा दिसतो; पुत्र वगैरे बरेच शब्द वगळले पाहिजेत; उदा० जनीयन्तो न्यग्रवः, पुत्रीयन्तः सुदानवः.

( वा० १ ) हा जो प्रकृत सूत्रानें वेदामध्यें ईत्वाचा निषेध केला आहे तेथें दीर्घाचाही निषेध करावा; उदा० संस्वेदयुः, मित्रयुः.

( वा० २ ) अथवा दीर्घाचा निषेध करावयास नको.

काय कारण ?

अश्वाघस्यात् ( ७।४।३७ ) हें सूत्र नियमार्थ होईल. तो नियम असा कीं जर वेदामध्यें क्यच् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होईल तर फक्त अश्व आणि अघ या दोन शब्दांनाच होतो, इतराना होत नाहीं.

---

१. (सू. ३३) क्यच् प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दातील शेवटच्या अकाराला ईकार आदेश होतो.

१.(सू ३४) अशन, उदक आणि धन या तीन शब्दांपुढें क्यच प्रत्यय करून ते तीन क्यच्प्रत्ययान्त धातू अशनाय, उदन्य आणि धनाय असे निपातित केले आहेत; त्या तीन धातूंचा अर्थ क्रमानें खाण्याची इच्छा करणें, पिण्याची इच्छा करणें, आणि द्रव्याचा लोभ करणें, असा असला पाहिजे.

१.(सू.३५) वेदामध्यें पुत्र शब्दाशिवाय इतर शब्दांच्या शेवटीं असलेल्या अकाराला क्यच् प्रत्यय पुढें असतांना ईकार किंवा दीर्घ यांपैकीं काहीं होत नाहीं

१. (सू ३६) दुष्ट, द्रविण, वृष आणि रिष्ट या चार शब्दांपुढें क्यच् प्रत्यय करून ते क्यच्प्रत्ययान्त धातु दुरस्य, द्रविणस्य, वृषण्य आणि रिषण्य असे वेदामध्यें निपातित केले आहेत.

१. (सू.३७) वेदामध्यें क्यच् प्रत्यय पुढें असतांना अश्व आणि अघ या शब्दांतील शेवटच्या अकाराला आकार होतो.

१ (सू.३८) यजुर्वेदांतील काठकामध्यें क्यच् प्रत्यय पुढें असतांना देव आणि सुम्न या दोन शब्दांतील शेवटच्या अकाराला आकार होतो.

१. (सू. ३९) ऋचेमध्यें क्यच् प्रत्यय पुढें असतांना कवि, अध्वर, आणि पृतना या शब्दांतील शेवटच्या वर्णाचा लोप होतो.

१. (सू. ४०) दिवादि गणांतील दो आणि सो हे धातू , तसेंच मा आणि स्था हे धातू , यांच्या शेवटच्या वर्णाला तकार आरंभीं असलेला ककारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्व इकार आदेश होतो.

१. (सू. ४१) शा आणि छा या धातूंच्या आकाराला तकार आरंभीं असलेला ककारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतां ऱ्हस्व इकार आदेश विकल्पानें होतो.

इयतेरित्त्वं व्रते नित्यम् ॥ १ ॥

इयतेरित्त्वं व्रते नित्यमिति वक्तव्यम् । संशितव्रतः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् ।

देवत्रातो गलो ग्राह इतियोगे च सद्विधिः । मिथस्ते न विभाष्यन्ते गवाक्षः संशितव्रतः ॥

[ दधातेर्हिः ॥ ७।४।४२ ॥

जहातेश्च क्त्वि ॥ ७।४।४३ ॥

विभाषा छन्दसि ॥ ७।४।४४ ॥

सुधित वसुधित नेमधित धिष्व धिषीय च ॥ ७।४।४५ ॥ ]

दो दद्घोः ॥ ७।४।४६ ॥

अवदत्तं विदत्तं च प्रदत्तं चादिकर्मणि । सुदत्तमनुदत्तं च निदत्तमिति चेष्यते ॥

किं पुनरयं तकारान्त आहोस्विद्दकारान्त उत धकारान्तोऽथवा थकारान्तः । कश्चात्र

( सू. ४१ वा. १ ) दिवादि गणांतील शा धातला जो हा प्रकृत सूत्रानें इकार आदेश विकल्पानें सांगितला आहे तो व्रत हा अर्थ गम्यमान असतांना नित्य होतो असें म्हणावें, उदा० संशितव्रतः.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

देवत्रात या संज्ञाशब्दामध्यें नकार आदेश (८।२।५६) मुळींच होत नाहीं; गळा या अर्थाच्या गल शब्दामध्यें रेफाला लकार आदेश (८।२।२१) नित्य होतो; जलचर या अर्थाच्या ग्राह शब्दामध्यें ण प्रत्यय (३।१।१४३) नित्य होतो; शतृ व शानच् या प्रत्ययांचा केलेला विधि (३।२।१२६) हन्तीति पलायते या वाक्यामध्यें इति शब्दाचा योग असतांना मुळींच होत नाहीं. हे विधी सामान्यतः जरी विकल्पानें करण्यास सांगितले आहेत तरी प्रत्येक उदाहरणामध्यें विकल्पानें होतातच असा नियम नाहीं. तसेंच गवाक्ष शब्दामध्यें अवङ् आदेश (६।१।१२३) नित्य होतो आणि संशितव्रत या शब्दामध्यें प्रकृत सूत्रानें सांगितलेला ह्रस्व इकारादेश नित्य होतो[2].

( सू. ४६ ) अवदत्त, विदत्त, क्रियेचा आरंभ गम्यमान असेल तर त्या ठिकाणीं प्रदत्त, सुदत्त, अनुदत्त आणि निदत्त अशीं हीं रूपें इष्ट आहेत[2].

काय पण हा प्रकृत सूत्रानें सांगितलेला आदेश दत् असा तकारान्त आहे, अथवा दद् असा दकारान्त आहे; किंवा दध असा धका-

---

२. हीं कार्ये विकल्पानें सांगितलीं असूनहि व्यवस्थेनेंच होतात. वर दाखविलेल्या ठिकाणीं कोठें कार्य होतेंच व कोठें कार्य मुळींच होत नाहीं. तेथें त्याच्या उलट उदाहरण प्रयोग नसल्यामुळें होत नाहीं. यालाच व्यवस्थितविभाषा म्हणतात

१. (सू. ४२) जुहोत्यादि गणांतील धा धातूला तकार आरंभीं असलेला ककारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना हि असा आदेश होतो.

१. (सू. ४३) जुहोत्यादि गणांतील त्याग या अर्थाच्या हा धातूला क्त्वा प्रत्यय पुढें असतांना हि असा आदेश होतो.

१ (सू. ४४) त्याच हा धातूला वेदामध्यें क्त्वा प्रत्यय पुढें असतांना हि असा आदेश विकल्पानें होतो.

१. (सू. ४५) सु वसु आणि नेम हे शब्द उपपद असतांना जुहोत्यादि गणांतील धा धातूहून क्त प्रत्यय करून सुधित, वसुधित, नेमधित, असे शब्द निपातित केले जातात; म्हणजे त्या ठिकाणीं वेदामध्यें हि आदेश होत नाहीं. त्याच धा धातूचें लोटाच्या मध्यमपुरुषीं एकवचनाचें जें धत्स्व असें रूप होतें आणि आशीर्लिङाच्या आत्मनेपदीं उत्तमपुरुषीं एकवचनाचें जें धासीय असें रूप होतें त्यांच्या ऐवजीं वेदामध्यें धिष्व आणि धिषीय अशीं रूपें निपातित केलीं जातात.

१. (सू. ४६) घुसंज्ञक दा धातूला तकार आरंभीं असलेला ककारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना, दथ् असा आदेश होतो.

२. या रूपांमध्यें प्रकृत सूत्रानें दथ् आदेश झाला आहे. तेव्हां पुढील सूत्रानें सांगितलेला तकार आदेश जरी या दथ् आदेशाचा आहे तरी देखील एकदां तो अपवाद न होता अवदत्त वगैरे रूपें होतात. आतां एकदां तो तकार आदेश होऊन अवत्त वीत्त, प्रत्त, सूत्त, अनूत्त नीत्त, अशीं रूपें होतातच.

विशेषः ।

सान्ते दोषो दीर्घत्वं स्यात्

यदि तकारान्तो दस्ति [६. ३. १२४] इति दीर्घत्वं प्राप्नोति ॥

दान्ते दोषो निष्ठानत्वम् ।

अथ दकारान्तो रदाभ्यां निष्ठात इति नत्वं प्राप्नोति ॥

धान्ते दोषो धत्वप्राप्तिः

अथ धान्तो झषस्तथोर्धोऽधः [८.२.४०] इति धत्वं प्राप्नोति ॥

थान्तेऽदोषस्तस्मात्थान्तः ॥

अथ थकारान्तो न दोषो भवति ॥

## अच उपसर्गात्तः ॥ ७।४।४७ ॥

### अच उपसर्गात्तत्व आकारग्रहणम् ॥१॥

अच उपसर्गात्तत्व आकारग्रहणं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम् । अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्याकारस्य भविष्यति ॥ न सिध्यति । किं कारणम् ।

### आदेर्हि परस्य ॥ २ ॥

अत्र हि तस्मादित्युत्तरस्यादेः परस्य [१. १. ६७; ५४] इति दकारस्य प्राप्नोति ॥ नैष दोषः ।

### अवर्णप्रकरणात्सिद्धम् ॥ २ ॥

अस्येति वर्तते । क्व प्रकृतम् । अस्य च्वौ [३२] इति ॥ यद्यवर्णग्रहणमनुवर्तते दद्भावे दोषो भवति । एवं तर्ह्येवं वक्ष्यामि दोऽद्घो-

---

रान्त आहे, किंवा दथ् असा थकारान्त आहे[१] ?

दत् असा तकारान्त आदेश मानला तर मागील उपसर्गाला दस्ति ( ६।३।१२४ ) या सूत्रानें दीर्घ होऊं लागेल.

दद् असा दकारान्त आदेश मानला तर पुढील निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला ' रदाभ्यां निष्ठात:० ' ( ८।२।४२ ) या सूत्रानें नकार आदेश होऊं लागेल.

दध् असा धकारान्त आदेश मानला तर पुढील तकाराला ' झषस्तथो:० ' (८।२।४०) या सूत्रानें धकारादेश होऊं लागेल.

दथ् असा थकारान्त आदेश मानला तर मात्र कांहीं दोष येत नाहीं. तेव्हां थकारान्तच आदेश या सूत्रानें सांगितला आहे असें समजावें.

(सु. ४७, वा. १) अच् अंतीं असलेल्या उपसर्गांच्या पुढील दा धातूला हा जो प्रकृत सूत्रानें तकार आदेश सांगितला आहे तो त्या दा धातूच्या आकाराला होतो असें म्हणावें.

तसं म्हणावयास नको. कारण ' अन्त्य अलाला कार्यें करावीं ' ( १।१।५२ ) या परिभाषेनेंच आकाराला होईल.

तशानें सिद्ध होणार नाहीं.

काय कारण ?

( वा. २ ) कारण असें कीं येथें उपसर्गात् ही पंचमी असल्यामुळें ' तस्मादित्युत्तरस्य ' (१।१।६७) आणि ' आदेः परस्य ' (१।१।५४) या दोन परिभाषा मिळून उपसर्गांच्या पुढील दा धातूच्या आदि दकाराला आदेश होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं.

( वा. ३ ) अवर्णाचें प्रकरण चालू असल्यामुळें हें सिद्ध होत आहे. मागून ' अस्य ' हें पद येथें अनुवृत्त होत आहे.

' अस्य ' हें पद मागें कोणत्या बरें सूत्रांत आहे ?

'अस्य च्वौ' (७।४।३२) या सूत्रामध्यें आहे.

पण जर अस्य हें पद येथें अनुवृत्त होत असेल तर ' दो दद् घोः ' या मागील सूत्रामध्यें त्याचा संबंध होईल, आणि तो दथ् आदेश आकाराला होऊन दोष येईल.

तर मग तें सूत्र ' दोऽद्घोः ' असेंच करतां

---

१ सूत्रामध्यें 'दद् घो:' असें उच्चारलें आहे. आदेश कसाही मानला तरी जश्त्वानें 'दद् घो:' असेंच होतें, म्हणून संशय येत आहे.

१. (सू. ४७) अच् अंतीं असलेल्या उपसर्गापुढील घुसंज्ञक दा धातूच्या आकाराला तकार आरंभीं असलेला कित् प्रत्यय पुढें असतांना. तकार आदेश होतो.

रिति । दो य आकारस्तस्याद्भवति । ततोऽच उपसर्गात्तः । अस्येत्येव । एवमपि सूत्रभेदः कृतो भवति । नासौ सूत्रभेदः । सूत्रभेदं कमुपाचक्षन्ति । यत्र तदेवान्यत्सूत्रं क्रियते भूयो वा । यद्धि तदेवोपसंहृत्य क्रियते नासौ सूत्रभेदः ॥ अथवा द्वितकारको निर्देशः क्रियते सोऽनेकाल्शित्सर्वस्य [१.१.५५] इति सर्वस्य भविष्यति । इहापि तर्हि प्राप्नोति । अद्भिः अद्भ्य इति । अच इति वर्तते । तच्चावश्यमनुवर्त्यं लवाभ्यामित्येवमर्थम् ॥ अथवा त्रितकारको निर्देशः करिष्यत इहार्थौ द्वावुत्तरार्थश्चैकः ॥

**द्यतेरित्त्वादचस्तः ॥ ४ ॥**

द्यतेरित्त्वादचस्त इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । द्यतेरित्त्वस्यावकाशः । निर्दितम् निर्दितवान् । अचस्त इत्यस्यावकाशः । प्रत्तम् अवत्तम् । इहोभयं प्राप्नोति । नीत्तम् वीत्तम् । अचस्त इत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

---

येईल. म्हणजे दा धातूच्या अकाराला अथ् असा आदेश होतो असा त्याचा अर्थ होईल. त्याच्या पुढें 'अच उपसर्गात्तः' हें प्रकृत सूत्र आहे. तेव्हां येथें 'अस्य' हें पद अनुवृत्त होईल.

तरी पण 'सूत्र फिरविलें' हा दोष येतोच ना ?

हा सूत्रभेद दोष नव्हे. सूत्रभेद म्हणजे सूत्र फिरविणें हा दोष तशा ठिकाणीं समजतात कीं जेथें पूर्वींचें सूत्र फिरवून तेवढेंच निराळें सूत्र केलें जातें, किंवा पूर्वापेक्षां अधिकच केलें जातें; पण जर पूर्वींच्या सूत्रापेक्षा कमीच केलें असेल तर मात्र तो सूत्रभेद दोष होत नाहीं. अथवा, प्रकृत सूत्रामध्यें दोन तकार असाच आदेश उच्चारला आहे. तेव्हा अर्थातच तो 'अनेकाल्शित्सर्वस्य' ( १।१।५५ ) या परिभाषेनें दा या सर्वाचे स्थानीं होईल.

पण तसें केलें तर हाच आदेश पुढील सूत्रानें सांगितला आहे. तेव्हा अद्भिः, अद्भ्यः, येथेंही तो आदेश सर्व अप् शब्दाला होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण प्रकृत सूत्रांतून अचः असें पंचम्यन्त पद पुढील सूत्रांत अनुवृत्त होतें[2] आहे. आणि अचः या पदाची तेथें अनुवृत्ति तर लवाभ्याम्[3] हें उदाहरण साधण्याकरितां अवश्य केलीच पाहिजे. अथवा प्रकृत सूत्रामध्यें आचार्यांनी तीन तकार उच्चारले आहेत. त्यापैकीं दोन तकारांचा आदेश ह्याच सूत्रानें सांगितला आहे. आणि उरलेला एक तकार पुढें अनुवृत्तीकरिताच उच्चारला आहे. तेव्हां पुढील सूत्रामध्यें एकाच तकाराची अनुवृत्ति होत असल्यामुळें 'सर्वाला होईल' हा दोष येत नाहीं.

( वा. ४ ) दिवादि गणांतील दो धातूला जो इकार आदेश सांगितला आहे त्यापेक्षां प्रकृत सूत्रानें सांगितलेला तकार आदेश हा विप्रतिषेधानें अगोदर होतो. दो धातूला सांगितलेला जो इकार त्याला निर्दितम्, निर्दितवान्, येथें चारितार्थ्य आहे, आणि प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या तकारादेशाला प्रत्तम्, अवत्तम्, या दा धातूच्या रूपामध्यें चारितार्थ्य आहे. आता नि आणि वि या उपसर्गांपुढील दो धातूहून क्त प्रत्यय केला असतां नीत्तम्, व वीत्तम् येथें इकारादेश आणि तकारादेश असे दोन्ही प्राप्त होतात, त्यांमध्यें इकारादेशाचा विप्रतिषेधानें बाध करून तकार आदेश होतो.

---

२. तेव्हां 'अपो भि' याचा असा अर्थ होतो कीं अप् यांतील अचाच्या पुढील वर्णाला भकारादि प्रत्यय पुढें असतांना तकार आदेश होतो. तेव्हां अप् या सर्वाला आदेश सांगितलाच नाहीं, म्हणून सर्वाला होत नाहीं.

३. 'अपो भि' या सूत्रामध्यें अपः या पदानें अप् शब्दाप्रमाणें अप् प्रत्ययाचेंही ग्रहण होईल. तेव्हां लवाभ्याम् येथें लू धातूहून अप् प्रत्यय ( ३।३।५७ ) करून त्या लव शब्दाहून भ्याम् प्रत्यय केला आहे, तेथें तकार आदेश प्राप्त होतो; परंतु तेथें अप् यांतील अचाच्या पुढें भकारादि प्रत्यय पुढें असतांना मध्यें कोणीच वर्ण नसल्यामुळें तो होत नाहीं.

अपो भि ॥ ७।४।४८ ॥

अपो भि मासश्छन्दसि ॥ १ ॥

अपो भीत्यत्र मासश्छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । माद्भिरिष्ट्वा इन्द्रो वृत्रहा ॥ अत्यल्पमिदमुच्यते ।

स्ववस्स्वतवसोर्मास उषसश्च त इष्यते ।

स्ववद्भिः स्वतवद्भिः । समुषद्भिरजायथाः । माद्भिरिष्ट्वा इन्द्रो वृत्रहा ॥

[ सः स्यार्धधातुके ॥ ७।४।४९ ॥

तासस्त्योर्लोपः ॥ ७।४।५० ॥

रि च ॥ ७।४।५१ ॥

ह एति ॥ ७।४।५२ ॥

यीवर्णयोर्दीधीवेव्योः ॥७।४।५३॥]

सनि मीमाघुरभलभशकपतपदामच इस् ॥ ७।४।५४ ॥

इस्त्वं सनि राधो हिंसायाम् ॥ १ ॥

इस्त्वं सनि राधो हिंसायामिति वक्तव्यम् । प्रतिरित्सति । हिंसायामिति किमर्थम् । आरिरात्सति ॥

आप्ज्ञप्यृधामीत् ॥ ७।४।५५ ॥

ज्ञपेरीत्त्वमनन्त्यस्य ॥ १ ॥

ज्ञपेरीत्त्वमनन्त्यस्येति वक्तव्यम् । ज्ञीप्सति ॥ तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । लोपोऽन्त्यस्य बाधको भविष्यति । अनवकाशा विधयो बाधका भवन्ति सावकाशश्च

( सू. ४८, वा. १ ) हा अप् शब्दाला तकार आदेश सांगितला आहे; या ठिकाणीं 'मास् शब्दाच्या सकाराला वेदामध्यें तकार आदेश होतो, भकार आरंभीं असलेला प्रत्यय पुढें असतांना ' असें म्हणावें; उदा० माद्भिरिष्ट्वा इन्द्रो वृत्रहा.

पण वेदामध्यें एकट्या मास् शब्दाबाबतच जें सांगितलें आहे तें फार थोडेंच दिसतें.

स्ववस्, स्वतवस्, मास् आणि उषस् इतक्या शब्दांच्या सकाराला तकार वेदामध्यें इष्ट आहे; उदा० स्ववद्भिः, स्वतवद्भिः, समुषद्भिरजायथाः, माद्भिरिष्ट्वा.

( सू.५४, वा. १ ) हिंसार्थक राध् धातूच्या अचाला इस् आदेश होतो सन् प्रत्यय पुढें असताना असें म्हणावें; उदा० प्रतिरित्सति.

येथें हिंसार्थक असें कशाकरितां म्हटलें आहे ?

हिंसा अर्थ नसेल तेथें इस् आदेश होत नाहीं. उदा० आरिरात्सति.

( सू. ५५, वा. १ ) हा जो ज्ञपि धातूमधील अचाला ईकार सांगितला आहे तो त्यांतील शेवटच्या इकाराला न होतां मागील अकाराला होतो असं म्हणावें; उ० ज्ञीप्सति.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण ज्ञपि धातूमधील शेवटचा इकार हा णिच् प्रत्ययाचा असल्यामुळें त्याचा लोप ( ६।४।४८ ) हा या ईकारादेशाचा बाध करील.

---

१. (सू ४८) अप् शब्दाच्या पकाराला भकार आरंभीं असलेला प्रत्यय पुढें असतांना तकार आदेश होतो.

१. (सू. ४९) अंगाच्या शेवटीं असलेल्या सकाराला सकार आरंभीं असलेला आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना तकार आदेश होतो.

१ (स. ५०) तास् प्रत्यय आणि अस् धातु यांच्या सकार आरंभीं असलेला प्रत्यय पुढें असतांना सकाराचा लोप होतो.

१ (सू. ५१) रेफ आरंभीं असलेला प्रत्यय पुढें असतांनाही तास् प्रत्यय आणि अस् धातु यांच्या सकाराचा लोप होतो.

१ (सू. ५२) तास् प्रत्यय आणि अस् धातु यांच्या सकाराला एकार पुढे असतांना हकार आदेश होतो.

१. (सू. ५३) दीधी आणि वेवी या धातूंच्या शेवटीं असलेल्या ईकाराचा यकार किंवा इवर्ण पुढें असतांना लोप होतो.

१. (सू. ५४) मी, मा, घुसंज्ञक धातू, त्याप्रमाणेंच रभ् , लभ् ,शक्, पत् आणि पद्, या धातूंच्या अचाला सकार आरंभीं असलेला म्हणजे इट् न झालेला सन् प्रत्यय पुढें असतांना इस् असा आदेश होतो. मी धातूमधील ईकाराला प्रकृत सूत्रानें इस् आदेश झाल्यानंतर त्यांतील सकाराला तकार आदेश (७।४।४९) आणि अभ्यासाचा लोप (७।४।५८) होऊन मित्स असा सन्प्रत्ययान्त धातु तयार होतो. याप्रमाणेंच इतर धातू समजावे.

१. (सू ५५) आप्, ज्ञपि आणि ऋध् या धातूंच्या अचाला सकार आरंभीं असलेला सन् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ ईकार आदेश होतो.

णिलोपः । कोऽवकाशः । कारणा हारणा । एवमपीत्त्वमन्त्यस्य लोपस्य बाधकं स्यात् । अनवकाशा हि विधयो बाधका भवन्तीत्त्वमपि सावकाशम् । कोऽवकाशः । अनन्त्यः । कथं पुनः सत्यन्त्येऽनन्त्यस्येत्त्वं स्यात् । भवेद्योऽचाङ्गं विशेषयेत्तस्यानन्त्यस्य न स्याद्वयं तु खल्वङ्गेनाचं विशेषयिष्यामः । अङ्गस्याचो यत्रतत्रस्थस्येति ॥ एवमप्युभयोः सावकाशयोः परत्वादीत्त्वं प्राप्नोति तस्मादनन्त्यस्येति वक्तव्यम् ॥

[ दम्भ इच्च ॥ ७।४।५६ ॥

[1]मुचोऽकर्मकस्य गुणो वा ॥ ७।४।५७ ॥ ]

[1]अत्र लोपोऽभ्यासस्य ॥७।४।५८॥

अभ्यासस्यानचि ॥ १ ॥

अभ्यासस्येति यदुच्यते तदनचि द्रष्टव्यम् । पतापतः चराचरः वदावदः ॥

[ [1]ह्रस्वः ॥ ७।४।५९ ॥ ]

[1]हलादिः शेषः ॥ ७।४।६० ॥

किमियं षष्ठीसमासः । हलामादिर्हलादिः हलादिः शिष्यत इति । आहोस्वित्कर्मधारयः ।

---

पण अनवकाश असे जे विधी ते इतराचा बाध करतात, आणि येथें णिच् प्रत्ययाच्या लोपाला तर ह्या ईकारादेशावांचून निराळा अवकाश आहे.

तो अवकाश कोणता ?

कारणा व हारणा, येथें णिच् प्रत्ययाच्या लोपाला चारितार्थ्य आहे. तेव्हां उलट हा ईकार आदेशच त्या अन्त्य वर्णाच्या लोपाचा बाध करील.

पण अनवकाश असे जे विधी ते इतरांचा बाध करतात आणि येथें तर त्या ईकारादेशाला ही णि प्रत्ययाच्या लोपाशिवाय इतर ठिकाणीं अवकाश आहे.

तो अवकाश कोणता बरें ?

शपि या धातूमधील मागील अकार.

पण हा इकार आदेश अन्त्य अचाला करतां येत असताना मागील अकाराला कसा बरें करतां येईल ?

कां बरें करतां येणार नाहीं ? अच् हें अंगाचें जो विशेषण करील त्याला नाहीं करतां येणार, परंतु आम्ही तर उलट अंग हेंच अचाचें विशेषण करीत आहों. त्यामुळें अंगाचा अवयव जो अच् तो कोठें का असे ना, त्याला ईकार आदेश होतो.

तरी पण णिचाचा लोप आणि ईकार आदेश ह्या दोघांनाही निरनिराळा अवकाश आहे असें होईल, पण त्यामध्यें परत्वास्तव हा ईकारादेशच लोपाचा बाध करून अन्त्याला होईल. तेव्हां वार्तिककारांनीं सांगितल्याप्रमाणें 'अनन्त्याला ईकार आदेश करावा' असें म्हटलें पाहिजे.

( सू ५८, वा. १ ) येथें जीं अभ्यासाला कार्यें सांगितलीं आहेत तीं अच् प्रत्ययाशिवाय इतर ठिकाणीं होतात. तेव्हां पतापतः, चलाचलः, वदावदः ( ६।१।१२ वा. ६ ), येथें अच् प्रत्यय केला असल्यामुळें 'हलादि शेषः' ( ७।४।६० ) या सूत्राची प्रवृत्ति होत नाहीं.

( सू. ६० ) येथ हलादि या पदामध्यें षष्ठीतत्पुरुषसमास आहे कीं ज्याच्या योगानें अभ्यासांतील हलांमध्यें जो आदि हल् तो अवशिष्ट

---

१. ( सू. ५६ ) दम्भ् धातूमधील अचाला सकार आरंभीं असलेला सन् प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्व इकार आणि दीर्घ ईकार असे दोन आदेश आळीपाळीनें होतात.

१ (सू. ५७) अकर्मक मुच् धातूमधील उकाराला सकार आरंभीं असलेला सन् प्रत्यय पुढें असतांना गुण विकल्पानें होतो.

१.(सू. ५८) सनि मीमाघु० (७।४।५४) या सूत्रापासून चार सूत्रांनीं सांगितलेलें कार्य ज्या उदाहरणांमध्यें होत असेल तेथें अभ्यासाचा लोप होतो

१. (सू. ५९) अभ्यासांतील अचाला ह्रस्व होतो.

१. (सू ६०) अभ्यासांतील आरंभीं नसलेल्या सर्व हलांचा म्हणजे व्यंजनांचा लोप होतो; फक्त अभ्यासाच्या आरंभींच व्यंजन असेल तर त्या ठिकाणीं मात्र तेवढें तें राहतें.

हल् आदिर्हलादिः हलादिः शिष्यत इति । कश्चात्र विशेषः ।

**हलादिशेषे षष्ठीसमास इति चेदजादिषु शेषप्रसङ्गः ॥ १ ॥**

हलादिशेषे षष्ठीसमास इति चेदजादिषु शेषः प्राप्नोति । आनक्ष आनक्षतुः आनक्षुः ॥ अस्तु तर्हि कर्मधारयः ।

**कर्मधारय इति चेदादिशेषनिमित्तत्वाल्लोपस्य तदभावे लोपवचनम् ॥ २ ॥**

कर्मधारय इति चेदादिशेषनिमित्तत्वाल्लोपस्य तदभाव आद्यस्य हलोऽभावे लोपो वक्तव्यः । आटतुः आटुः ॥

**तस्मादनादिलोपः ॥ ३ ॥**

तस्मादनादिर्हल्लुप्यत इति वक्तव्यम् ॥

**उक्तं वा ॥ ४ ॥**

किमुक्तम् । प्रतिविधास्यते हलादिशेष इति । अयमिदानीं स प्रतिविधानकालः । इदं प्रतिविधीयते । इदं प्रकृतमत्र लोपोऽभ्यासस्य [५८] इति । ततो वक्ष्यामि । ह्रस्वः [५९] ह्रस्वो भवत्यादेशः । अभ्यासस्य लोप इत्यनुवर्तते । तत्र ह्रस्वभाविनां ह्रस्वो लोपभाविनां लोपो भविष्यति । ततो हलादिः शेषश्चेति ॥ अथवैवं वक्ष्यामि । ह्रस्वोऽहल् । ह्रस्वो भवत्यभ्यासस्येति । ततोऽहल् । अहल्च भवत्यभ्यासः । तत आदिः शेषः । आदिः शेषो भवत्यभ्यासस्येति ॥

---

राहतो, म्ह० बाकीच्या हलांचा लोप होतो, असा अर्थ होईल ? अथवा कर्मधारय समास आहे कीं ज्याच्या योगानें अभ्यासाचा आदि जो हल् तो अवशिष्ट राहतो, अर्थात् बाकीच्या हलांचा लोप होतो असा अर्थ होईल ?

ह्या दोहोंमध्यें फरक काय होणार आहे ?

( वा. १ ) हलादि हा षष्ठीतत्पुरुष समास असेल तर अजादि धातूंमध्यें पुढील हलाचाही शेष होऊं लागेल; उदा० आनक्ष, आनक्षतुः, आनक्षुः.

तर मग कर्मधारय समासच असूं दे.

( वा. २ ) कर्मधारय समास मानला तर अभ्यासाच्या आरंभींचा हल् राहतो असा अर्थ होऊन त्याच निमित्तानें इतर हलांचा लोप होणार आहे. तेव्हां अभ्यासाच्या आरंभीं हल् नसेल त्या ठिकाणीं इतर हलांचा लोप होणार नाहीं, म्हणून त्यांचा लोप होण्याबद्दल वचन केलें पाहिजे; उदा० आटतुः, आटुः.

( वा. ३ ) तेव्हा अभ्यासाच्या आरंभीं नसलेल्या हलांचा लोप होतो असेंच येथें सांगितलें पाहिजे.

( वा. ४ ) अथवा यासंबंधानें मागें सांगितलेंच आहे.

काय बरें तें सांगितलें आहे ?

हा प्रश्न ' हलादिः शेषः ' येथेंच सोडवूं असें सांगितलें आहे.

मग तो प्रश्न सोडविण्याची वेळ आतांच आली आहे.

तर मग तो प्रश्न अशा रीतीनें सोडवावा:— ' अत्र लोपोऽभ्यासस्य ' असें येथें जवळच मागें सूत्र आहे. त्याच्यापुढें 'ह्रस्वः' असें सूत्र आहे. तेथें 'अभ्यासस्य लोपः' या पदांची अनुवृत्ति आहे. तेव्हां दोन वाक्यार्थ करून ह्रस्व आणि लोप हीं दोन्हीं कार्यें अभ्यासाला तेथें सांगितलीं आहेत. त्यांमध्यें ' अतश्च ' ( १।२।२८ ) या परिभाषेमुळें ह्रस्व होण्याला योग्य असें अचच ठरले आहेत. तेव्हां अर्थातच हल् हे लोप होण्याला योग्य असे येथें समजले जातात. एकंदरींत अभ्यासांतील अचाला ह्रस्व होईल आणि हलांचा लोप होईल. त्या लोपाचा अपवाद म्हणून पुढें ' हलादि शेषः ' या सूत्रानें अभ्यासाच्या आरंभीं हल् असेल तेथें तो शिल्लक राहील. अथवा ह्रस्वोहलादिः शेषः असा सूत्रांचा संधि होतो; तेथें अहल् असा परिच्छेद करावा म्हणजे अभ्यासाला ह्रस्व होतो आणि तो

---

२. अक्ष् हा अजादि धातु आहे. त्यांतील क् आणि ष् हे पुढे दोन हल् आहेत, त्यांपैकीं आदि जो ककार तो राहूं लागेल.

अथवा योगविभागः करिष्यते । ह्रस्वादेशो भवत्यभ्यासस्य । ततो हल् । हल्च लुप्यतेऽभ्यासस्य । तत आदिः शेषः । आदिः शेषश्च भवत्यभ्यासस्य ॥

शर्पूर्वाः खयः ७।४।६१ ॥

शर्पूर्वशेषे खर्पूर्वग्रहणम् ॥ १ ॥

शर्पूर्वशेषे खर्पूर्वग्रहणं कर्तव्यम् । खर्पूर्वाः खयः शिष्यन्ते खरो लुप्यन्त इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । उचिच्छिषति व्युचिच्छिषति । तुकः श्रवणं मा भूदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । चर्त्वे कृते तुग्न भविष्यति । असिद्धं चर्त्वं तस्यासिद्धत्वात्तुक्प्राप्नोति । सिद्धकाण्डे पठितमभ्यासजश्त्वचर्त्वमेत्त्वतुकोरिति ॥ एवमप्यन्तरङ्गत्वात्प्राप्नोति तस्मात्खर्पूर्वग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । एत्त्वतुग्ग्रहणं न करिष्यते । अभ्यासजश्त्वचर्त्वे सिद्धमित्येव ॥

---

अभ्यास अहल् होतो, म्हणजे हलांनीं रहित असा होतो. त्याच्या पुढें 'आदिः शेषः' या सूत्रानें त्या अहल्भावाचा अपवाद म्हणून आदिहलाचा शेष सांगितला जाईल. अथवा सूत्रांचा विभाग अशा रीतीनें करावा कीं 'ह्रस्वः' या सूत्रानें अभ्यासाला ऱ्हस्व सांगितल्यानंतर पुढें 'हल्' एवढेंच निराळें सूत्र समजावें; तेथें लोपः या पदाची अनुवृत्ति आणावी म्हणजे त्या सूत्रानें अभ्यासांतील हलाचा लोप सांगितला जाईल; पुढें 'आदिः शेषः' हें दुसरें सूत्र समजावें; त्यानें त्या लोपाचा अपवाद म्हणून अभ्यासातील आदि हलाचा शेष सांगितला जाईल.

( सू. ६१. वा. १ ) ह्या सूत्रामध्यें शर्पूर्वाः ह्याच्या एवेजीं खर्पूर्वाः असें म्हणावें. अभ्यासाच्या आरंभीं खर् असून त्याच्या पुढें खय् असेल तर तो खय् राहतो व मागील खराचा लोप होतो असें म्हणावें.

या म्हणण्याचा उपयोग काय ?

उचिच्छिषति व्युचिच्छिषति इत्यादि ठिकाणीं तुक् आगमाचें श्रवण न झालें पाहिजे हें प्रयोजन होय.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण छकाराला चर्त्वानें ( ८।४।५४ ) चकार केल्यानंतर तुक् होणारच नाहीं.

पण चर्त्व असिद्ध असल्यामुळें अगोदर तुक् आगम प्राप्त होत आहे ना ?

चर्त्व असिद्ध नाहीं. कारण अभ्यासाला सांगितलेलें जश्त्व आणि चर्त्व हीं एत्व किंवा तुगागम कर्तव्य असतांना सिद्ध समजावीं ( ८।२। ६ वा. १३ ) असा अपवाद आहे.

अशा रीतीनें चर्त्व हें सिद्ध समजलें तरी देखील त्यापेक्षां अंतरंगत्वास्तव अगोदरच तुक् आगम होणार आहे, त्याकरितां 'खर्पूर्वाः' असें म्हटलेंच पाहिजे.

तरी पण तसें म्हणावयास नको. कारण 'अभ्यासाला सांगितलेलें जश्त्व आणि चर्त्व हीं सिद्ध समजावीं' एवढेंच तेथें वार्तिक ठेवतां येईल. त्यांतील ' एत्व किंवा तुक् आगम कर्तव्य असतांना' हे शब्द गाळले म्हणजे कामें भागेल.

---

१. (सू. ६१) अभ्यासाच्या आरंभीं शर् असून त्याच्या पुढें खय् असेल तर तेथें तो शर् न राहतां खय् राहतो.

२. उछ् धातूमधील उकाराला तुगागम (६।४।७२), सन् प्रत्यय, त्याला इट् आगम व अजादि धातु असल्यामुळें दुसरा एकाच् जो 'च्छिस्' हा भाग त्याला द्वित्व अशीं कार्यें होतील. नंतर हलादिः शेषः या सामान्यशास्त्रानें अभ्यासांतील तकार, छकार व सकार यांचा लोप होऊन 'उतिच्छिषति' असें भलतेंच रूप होईल.

३. तुक् आगमाला श्चुत्वानें (८।४।४०) जो चकार होतो तो त्या वार्तिकांतील चर्त्व या शब्दानें घेतला म्हणजे, आणि तो 'हलादिः शेषः' याच्या दृष्टीनें असिद्ध समजला म्हणजे पूर्वी तो चकार होऊन नंतर 'हलादिः शेषः' यानें छकार जाऊन उचिच्छिषति हें रूप सिद्ध होईल, असा अभिप्राय आहे.

## आदिशेषप्रसङ्गस्तु ॥ २ ॥

आदिशेषस्तु प्राप्नोति । तिष्ठासति । ननु चानादिशेष आदिशेषं बाधिष्यते । कथमन्यस्योच्यमानमन्यस्य बाधकं स्यात् । असति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यात् ॥ यद्यादिशेषोऽपि भवति शर्पूर्ववचनमिदानीं किमर्थं स्यात् ।

## शर्पूर्ववचनं किमर्थमिति चेत्खयां लोपप्रतिषेधार्थम् ॥ ३ ॥

शर्पूर्ववचनं किमर्थमिति चेत्खयां लोपो मा भूदिति ॥

## व्यपकर्षविज्ञानात्सिद्धम् ॥ ४ ॥

व्यपकर्षविज्ञानात्सिद्धमेतत् । किमिदं व्यपकर्षविज्ञानादिति । अपवादविज्ञानात् । अपवादत्वादत्रानादिशेष आदिशेषं बाधिष्यते॥ ननु चोक्तं कथमन्यस्योच्यमानमन्यस्य बाधकं स्यादिति । इदं तावदयं प्रष्टव्यः । यदि तन्नोच्येत किमिह स्यात् । हलादिशेषः ।हलादिशेषश्चेन्नाप्राप्ते हलादिशेष इदमुच्यते तद्बाधकं भविष्यति॥ यदप्युच्यतेऽसति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयंस्यादिति सत्यपि संभवे बाधनं भवति। तद्यथा । दधि ब्राह्मणेभ्यो दीयतां तक्रं कौ-

---

(वा. २) तिष्ठासति इत्यादि उदाहरणांमध्यें आदिशेष प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण प्रकृत सूत्रानें सांगितलेला अनादीचा शेष हा पूर्व सूत्रानें प्राप्त झालेल्या आदिशेषाचा बाध करील.

पण निरनिराळ्या वर्णांना सांगितलेल्या कार्यांमध्यें एकानें दुसऱ्याचा बाध कसा बरें होईल ? कारण दोन्ही कार्यांचा संभव नसेल तर एकानें दुसऱ्याचा बाध करणें रास्त होणार आहे, आणि येथें तर संभव असा आहे कीं आदीचा शेष आणि अनादीचा शेष अशीं दोन्ही कार्यें एका उदाहरणात करतां येतील.

आतां अशा रीतीनें स्था वगैरे धातूंमध्यें आदीचाहि शेष होईल तर 'शर्पूर्वाः०' हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

(वा. ३) 'शर्पूर्वाः०' हें सूत्र कशाकरितां असें म्हणाल तर पूर्वसूत्रानें जो खयाचा लोप प्राप्त झाला आहे तो होऊं नये याकरितां तें जरूर आहे.

(वा. ४) व्यपकर्षविज्ञानानें हें सिद्ध होत आहे.

व्यपकर्षविज्ञान म्हणजे काय ?

व्यपकर्षविज्ञान म्हणजे अपवाद समजणें. प्रकृत सूत्रानें सांगितलेला अनादीचा शेष हा पूर्वसूत्रानें सांगितलेल्या आदिशेषाचा बाध करील. पण निरनिराळ्या वर्णांना सांगितलेल्या कार्यांमध्ये एकानें दुसऱ्याचा बाध कसा व्हावा असें आताच विचारलें आहे ना ?

विचारलें आहे खरें; पण त्या शंकाकाराला अगोदर असें विचारावें कीं जर शर्पूर्वाः० हें सूत्र केलेंच नसतें तर त्याच्या उदाहरणामध्यें कोणतें शास्त्र प्रवृत्त झालें असतें ? याचें उत्तर ' हलादिः शेषः' यानें आदिशेष झाला असता, असेंच द्यावें लागेल. अशीच जर स्थिति आहे तर 'हलादिः शेषः' याची अवश्य प्राप्ति असतांना मुद्दामच जर 'शर्पूर्वाः' हें सूत्र केलें आहे तर अर्थातच हें त्याचें बाधक होईल. आतां 'दोन्ही कार्यांचा संभव नसेल तर त्यामध्यें एकानें दुसऱ्याचा बाध करणें रास्त होणार आहे, व येथें आदि आणि अनादि या दोघांचाही शेष करतां येतो असा संभव आहे' असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तर असें कीं एका ठिकाणीं दोन्ही कार्यांचा संभव असला तरी त्यांमध्यें एकाने दुसऱ्याचा बाध होतो; जसें 'ब्राह्मणांना दहीं द्या आणि कौडिन्याला ताक द्या' असें म्हटलें असतां तेथें जरी कौडिन्याला दोन्ही देता येतील असा संभव आहे तरी तेथें तक्रदानानें दधिदानाचा बाध होतो असें दृष्टीस पडतें, तसेंच येथें तिष्ठासति

४. स्था धातूला द्वित्व केल्यानंतर पहिल्या स्था या अभ्यासांतील सकार हा शरादि आहे आणि थकार हा खय् अनादि आहे. जसा त्या अनादीचा शेष प्रकृत सूत्रानें होतो, तसा तेथेंच पूर्वसूत्रानें आदीचाही शेष होईल.

ण्डिन्यायेति सत्यपि संभवे दधिदानस्य तक्रदानं बाधकं भवति । एवमिहापि सत्यपि संभवेऽनादिशेष आदिशेषं बाधिष्यते ॥

[ कुहोश्चुः । ७।४।६२ ॥

न कवतेर्यङि । ७।४।६३ ॥

कृषेश्छन्दसि । ७।४।६४ ॥ ]

दाधर्तिदर्धर्तिदर्धर्षिबोभूतुतेतिक्तेऽलर्ष्यापनीफणत्संसनिष्यदत्करिक्रत्कनिक्रदद्भरिभ्रद्दविध्वतोदविद्युतत्तरित्रतःसरीसृपतंवरीवृजन्मर्मृज्यागनीगन्तीति च ॥ ७।४।६५ ॥

दाधर्तीति किं निपात्यते । धारयतेः श्लावभ्यासस्य दीर्घत्वं णिलुक् च ॥ अनिपात्यम् । तुतुजानवदभ्यासस्य दीर्घत्वं पर्णशुषिवण्णिलुग्भविष्यति ॥ धृङो वाभ्यासस्य

---

वगैरे उदाहरणांमध्यें आदिशेष आणि अनादिशेष या दोघांचा संभव जरी असला तरी त्यांमध्यें अनादिशेषानें आदिशेषाचा बाध होईल.

(सू. ६५) दाधर्ति येथें काय निपातन केलें आहे ?

धृ धातूहून णि प्रत्यय करून त्याच्या पुढील शप् प्रत्ययाचा श्लु ( २।४।९६ ) केल्यानंतर अभ्यासाला दीर्घ आणि णि प्रत्ययाचा लुक् या दोन कार्यांचें निपातन केलें आहे.

हें निपातन करावयास नको. तूतुजान या शब्दाप्रमाणें अभ्यासाला दीर्घ (६।१।७) होईल. आणि पर्णशुष् या शब्दाप्रमाणें णि प्रत्ययाचा लुक् ( उणा. २।२३ ) होईल. अथवा दाधर्ति येथें धृङ् धातूच्या पुढील शप् प्रत्ययाचा श्लु होतो; तेथें अभ्यासाला दीर्घ आणि

---

१. ( सू. ६२ ) अभ्यासातील आरंभीं असलेला जो कवर्ग किंवा हकार त्याला चवर्गादेश होतो.

१. ( सू. ६३ ) कु धातूच्या अभ्यासातील आरंभी असलेल्या ककाराला यङ् प्रत्यय पुढें असतांना चवर्ग आदेश होत नाहीं.

१. ( सू. ६४ ) वेदामध्यें कृष् धातूच्या अभ्यासांतील आरंभीच्या ककाराला यङ् प्रत्यय पुढें असतांना चवर्ग आदेश होत नाहीं.

१. (सू. ६५) वेदामध्यें दाधर्ति वगैरे रूपें निपातित केलीं जातात. निपातनामुळें अलर्षि येथें ऋ धातूच्या अर् या अभ्यासांतील रेफाचा 'हलादिः शेष' यानें लोप न होतां त्याला लकारादेश होतो. आपनीफणत् येथें फण् धातूहून यङ्, त्याचा लुक् व पुढें शतृ प्रत्यय झाला आहे; निपातनामुळें अभ्यासाला नीक् आगम झाला आहे. संसनिष्यदत् येथें स्यन्द् धातूहून यङ्लुक् व शतृप्रत्यय झाले आहेत; निपातनामुळें अभ्यासाला निक् आगम झाला आहे, आणि धातूच्या सकाराला षत्व झालें आहे. करिक्रत् येथें कृ धातूहून यङ्लुक् व शतृप्रत्यय झाले आहेत; निपातनामुळें अभ्यासाला रिक् आगम आणि चवर्गादेशाचा ( ७।४।६२ ) अभाव झाला आहे. कनिक्रदत् हें क्रन्द् धातूचें लुङ्चें प्रथम पुरुषाचें एकवचन आहे; निपातनामुळें येथें च्लीला अङ्, द्वित्व, अभ्यासाला निगागम व चवर्गादेशाचा आणि अडागमाचा अभाव हीं कार्यें झालीं आहेत. भरिभ्रत् येथें भृ धातूहून यङ्लुक् व शतृ प्रत्यय झाले आहेत; निपातनामुळें अभ्यासाला रिक् आगम झाला आहे; आणि इत्त्व ( ७।४।७६ ) व जश्त्व (८।४।५४) हीं झालीं नाहींत. दविध्वतः येथें ध्वृ धातूहून यङ्लुक्, शतृ प्रत्यय आणि पुढें प्रथमाबहुवचनाचा जस् प्रत्यय हीं कार्यें झालीं आहेत; निपातनामुळें अभ्यासाला विक् आगम आणि उत्तरखण्डांतील ऋकाराचा लोप झाला आहे दविद्युतत् येथें द्युत् धातूहून यङ्लुक् व शतृ प्रत्यय झाले आहेत; निपातनामुळें अभ्यासाला संप्रसारण ( ७।४।६७ ) झालें नाहीं आणि अभ्यासांतील उकाराला अकार व विक् आगम झाले आहेत. तरित्रतः येथें तृ धातूहून शतृ प्रत्यय होऊन पुढें षष्ठीएकवचनाचा ङस् प्रत्यय झाला आहे; निपातनामुळें शपाचा श्लु आणि अभ्यासाला रिक् आगम झाले आहेत. सरीसृपतम् येथें सृप् धातूहून शतृ प्रत्यय व पुढें द्वितीयैकवचनाचा अम् प्रत्यय झाला आहे, निपातनामुळें शपाचा श्लु, आणि अभ्यासाला रिक् आगम झाले आहेत. वरीवृजत् येथें वृज् धातूहून शतृ प्रत्यय झाला आहे; निपातनामुळें शपाचा श्लु, आणि अभ्यासाला रीक् आगम झाले आहेत. मर्मृज्य हें मृज् धातूचें लिटाचें प्रथमपुरुषाचें एकवचन आहे. निपातनामुळें अभ्यासाला रुक् आगम आणि उत्तरखण्डाला युक् आगम झाले आहेत. आगनीगन्ति येथें गम् धातूहून लट् प्रत्यय केला आहे; निपातनामुळें शपाचा श्लु आणि अभ्यासाला नीक् आगम झाला आहे आणि श्चुत्व झालें नाहीं.

दीर्घत्वं परस्मैपदं च ॥ अनिपात्यम् । तूतुजानवदभ्यासस्य दीर्घत्वं युध्यतिवत्परस्मैपदं भविष्यति ॥

दर्धर्तीति किं निपात्यते । धारयतेः श्लावभ्यासस्य रुग्णिलुक् च ॥ अनिपात्यम् । देवा अदुहूवद्रुट् पर्णशुषिवण्णिलुग्भविष्यति ॥ धृङो वाभ्यासस्य रुक्परस्मैपदं च ॥ अनिपात्यम् । देवा अदुहूवद्रुड्युध्यतिवत्परस्मैपदं च भविष्यति ॥

दर्धर्षीति किं निपात्यते । धारयतेः श्लावभ्यासस्य रुग्णिलुक् च ॥ अनिपात्यम् । देवा अदुहूवद्रुट् पर्णशुषिवण्णिलुक् च भविष्यति॥ धृङो वाभ्यासस्य रुक्परस्मैपदं च ॥ अनिपात्यम् । देवा अदुहूवद्रुड्युध्यतिवत्परस्मैपदं च भविष्यति ॥

बोभूत्विति किं निपात्यते । भवतेर्यङ्लुगन्तस्यागुणत्वं निपात्यते । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धमत्रागुणत्वं भूसुवोस्तिङि [ ७. ३. ८८ ] इति । एवं तर्हि नियमार्थं भविष्यति । अत्रैव यङ्लुगन्तस्य गुणो न भवति नान्यत्रेति । क्व मा भूत् । बोभवीतीति ॥

तेतिक्त इति किं निपात्यते । तिजेर्यङ्लुगन्तस्यात्मनेपदं निपात्यते । नैतदस्ति प्रयोजनम् ।

---

परस्मैपद या दोन कार्यांचें निपातन केलें आहे.

असेंही निपातन करावयास नको. तूतुजान या शब्दाप्रमाणें अभ्यासाला दीर्घ होईल आणि युध्यति ( ३।१।८५ ) याप्रमाणें परस्मैपद होईल.

दर्धर्ति येथें काय निपातन केलें आहे ?

धृ धातूहून णि प्रत्यय होऊन त्यापुढील शप् प्रत्ययाचा श्लु झाला आहे; तेथें अभ्यासाला रुक् आणि णिप्रत्ययाचा लुक् या दोन कार्यांचें निपातन केलें आहे.

हें निपातन करावयास नको. कारण अदुहू याप्रमाणें रुट् आगम होईल आणि पर्णशुष् या शब्दाप्रमाणें णि प्रत्ययाचा लुक् होईल.

अथवा दर्धर्ति येथें धृङ् धातुपुढील प्रत्ययाचा श्लु झाल्यानंतर तेथें अभ्यासाला रुक् आगम आणि परस्मैपद या दोन कार्यांचें निपातन केलें आहे.

असेंही निपातन करावयास नको. कारण अदुहू याप्रमाणें रुट् आगम होईल आणि युध्यति याप्रमाणें परस्मैपद होईल.

दर्धर्षि येथें काय निपातन केलें आहे ?

धृ धातूहून णि प्रत्यय करून त्याच्या पुढील शप् प्रत्ययाचा श्लु झाल्यानंतर तेथें अभ्यासाला रुक् आगम आणि णि प्रत्ययाचा लुक् या दोन कार्यांचें निपातन केलें आहे.

हें निपातन करावयास नको. कारण अदुहू याप्रमाणें रुट् आगम होईल आणि पर्णशुष् या शब्दाप्रमाणें णि प्रत्ययाचा लुक् होईल.

अथवा दर्धर्षि येथें धृङ् धातुपुढील शप् प्रत्ययाचा श्लु झाल्यानंतर तेथें अभ्यासाला रुक् आगम आणि परस्मैपद या दोन कार्यांचें निपातन केलें आहे.

असेंही हें निपातन करावयास नको. कारण अदुहू याप्रमाणें रुट् आगम होईल आणि युध्यति याप्रमाणें परस्मैपद होईल.

बोभूतु येथें काय निपातन केलें आहे ?

भू धातूहून यङ् प्रत्यय व त्याचा लुक् झाला आहे व तेथें ह्या निपातनामुळें गुण होत नाहीं.

हा ह्या निपातनाचा उपयोग बरोबर नाहीं. कारण बोभूतु येथें भूसुवोस्तिङि ( ७।३।८८ ) या सूत्रानेंच गुणाचा निषेध होत आहे.

तर मग हें निपातन नियमार्थ होईल. तो नियम असा कीं यङ्लुक् केल्यानंतर तेथें जर 'भूसुवोस्तिङि' या सूत्रानें गुणाचा निषेध होईल तर फक्त बोभूतु याच उदाहरणामध्यें होतो, इतर ठिकाणीं होत नाहीं.

ह्या नियमामुळें गुणाचा निषेध होत नाहीं असें उदाहरण कोणतें ?

बोभवीति येथें निषेध न आल्यामुळें गुण होतो.

तेतिक्ते येथें काय निपातन केलें आहे ?

तिज् धातूहून यङ् प्रत्यय व त्याचा लुक् झाला आहे व निपातनामुळें आत्मनेपद झालें आहे.

हा ह्या निपातनाचा उपयोग बरोबर नाहीं. कारण प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) यङ् ह्या ङित् प्रत्ययाचें अस्तित्व मानून 'अनुदात्तङितः' (१।३।१२) या सूत्रानेंच आत्मनेपद होणार आहे.

सिद्धमत्रात्मनेपदमनुदात्तङित आत्मनेपदम् [ १. ३. १२ ] इति । नियमार्थं तर्हि भविष्यति । अत्रैव यङ्लुगन्तस्यात्मनेपदं भवति नान्यत्रेति । क मा भूत् । बेभिदीति चेच्छिदीति ॥

## [ उरत् ॥ ७।४।६६ ॥ ]

## द्युतिस्वाप्योः संप्रसारणम् ॥ ७।४।६७ ॥

किमर्थं स्वपेरभ्यासस्य संप्रसारणमुच्यते यदा सर्वेष्वभ्यासस्थानेषु स्वपेः संप्रसारणमुक्तम् ॥

### स्वापिग्रहणं व्यपेतार्थम् ॥ १ ॥

स्वापिग्रहणं क्रियते व्यपेतार्थम् । व्यपेतार्थोऽयमारम्भः । सुष्वापयिषतीति ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

### तत्र क्यजन्तेऽतिप्रसङ्गः ॥ २ ॥

तत्र क्यजन्तेऽतिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । स्वापकमिच्छति स्वापकीयति स्वापकीयतेः सन्सिस्वापकीयिषतीति ।

### सिद्धं तु णिग्रहणात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । णिग्रहणं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम् । निर्देशादेव हि व्यक्तं ण्यन्तस्य ग्रहणमिति ॥ नात्र निर्देशः प्रमाणं शक्यं कर्तुम् । यथा हि निर्देशस्तथेहापि

---

तर मग हें निपातन नियमार्थ होईल. तो नियम असा कीं यङ्लुक् केल्यानंतर तेथें जर 'अनुदात्तङितः' या सूत्रानें आत्मनेपद होईल तर फक्त तेतिक्के याच उदाहरणामध्यें होतें, इतर ठिकाणीं होत नाहीं.

ह्या नियमामुळें आत्मनेपद झालें नाहीं असें उदाहरण कोणतें ?

बेभिदीति, चेच्छिदीति हीं उदाहरणें. येथें आत्मनेपद झालें नाहीं.

( सू. ६७ ) या सूत्रामध्यें स्वप् धातूच्या अभ्यासाला संप्रसारण कशाकरितां सांगितलें आहे ? कारण स्वप् धातूला द्वित्व होऊन ज्या ज्या ठिकाणीं अभ्यास बनतो त्या त्या सर्वच ठिकाणीं त्याला संप्रसारण सांगितलेलेंच आहे.

( वा. १ ) येथें जें 'स्वापि' असें म्हटलें आहे तें व्यवधान असतांनाही संप्रसारण झालें पाहिजे याकरितां म्हटलें आहे; उदा० सुष्वापयिषति.

हा उपयोग आहे खरा पण—

मग पुढें तुमचें काय म्हणणें आहे ?

( वा. २ ) व्यवधान असतानाही संप्रसारण होत असेल तर क्यच्प्रत्ययान्त धातूहून सन् प्रत्यय केला असता दोष येतो. स्वापकमिच्छति या अर्थी स्वापक शब्दाहून क्यच् ( ३।१।८ ) प्रत्यय करून तयार झालेल्या स्वापकीय या धातूहून सन् प्रत्यय केला असता सिस्वापकीयिषति असें रूप होतें, तेथें अभ्यासाला संप्रसारण होऊं लागेल.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

ते कसें ?

ह्या सूत्रामध्यें णिग्रहण करावें म्हणजे सर्व साधेल.

णिग्रहण करावयास नको. कारण आचार्यांनीं सूत्रामध्यें 'स्वापेः' असें उच्चारलें आहे त्यावरून णिप्रत्ययान्त स्वप् धातूचें हें उच्चारण केलें आहे असें स्पष्टच होत आहे.

पण येथें णिप्रत्ययान्त स्वप् धातूचें ग्रहण करण्याबद्दल 'स्वापेः' हा निर्देश प्रमाण धरतां येणार नाहीं; कारण 'स्वापेः' या निर्देशावरूनच जर हें ठरवावयाचें असेल तर जसें स्वप् धातूहून णिप्रत्यय केला म्हणजे 'स्वापि' असें होतें, तसं स्वापं करोति स्वापयति या अर्थी स्वाप शब्दाहून णिच् प्रत्यय केला असतांही तेथें 'स्वापि' असें होतें; त्या स्वापि धातूहून सन् प्रत्यय केला असतां सिष्वापयिषति असें रूप होते, तेथें अभ्यासाला संप्रसारण न झालें पाहिजे. याकरिता प्रकृत

---

१. (सू. ६६) प्रत्यय पुढें असतांना अंगामध्यें अभ्यासातील ऋकाराला ऱ्हस्व अकारादेश होतो.

१. (सू. ६७) द्युत् धातु आणि णिप्रत्ययान्त स्वप् धातु यांच्या अभ्यासामधील यणाला संप्रसारण होतें.

२. येथें अभ्यासाला कारणीभूत प्रत्यय सन् आणि स्वप् धातु यामध्यें णिच् प्रत्ययानें व्यवधान होत आहे. अभ्यास संज्ञा ही द्वित्वामुळें होत असल्यामुळें ज्या प्रत्ययामुळें द्वित्व होतें त्यालाच अभ्यासाला कारणीभूत प्रत्यय म्हणतात.

प्रसज्येत । स्वापं करोति स्वापयति स्वापयतेः सन्सिस्वापयिषतीति । तस्माण्णिग्रहणं कर्तव्यम् ॥

[ व्यथो लिटि ॥ ७।४।६८ ॥
दीर्घ इणः किति ॥ ७।४।६९ ॥
अत आदेः ॥ ७।४।७० ॥
तस्मान्नुड् द्विहलः ॥ ७।४।७१ ॥
अश्नोतेश्च ॥ ७।४।७२ ॥
भवतेरः ॥ ७।४।७३ ॥
ससूवेति निगमे ॥ ७।४।७४ ॥ ]

णिजां त्रयाणां गुणः श्लौ ॥ ७।४।७५ ॥

त्रिग्रहणानर्थक्यं गणान्तत्वात् ॥ १ ॥

त्रिग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । गणान्तत्वात् । त्रय एव निजादयः ॥

उत्तरार्थं तु ॥ २ ॥

उत्तरार्थं तर्हि त्रिग्रहणं कर्तव्यम् । भृञामित् [ ७६ ] त्रयाणां यथा स्यात् । इह मा भूत् । जहाति ॥

[ भृञामित् ॥ ७।४।७६ ॥ ]

अर्तिपिपर्त्योश्च ॥ ७।४।७७ ॥

अर्तिग्रहणं किमर्थं न बहुलं छन्दसि [७८] इत्येव सिद्धम् । न ह्यन्तरेण च्छन्दोऽर्तेः श्लुर्लभ्यः ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद्

---

सूत्रामध्यें णिग्रहण केलें पाहिजे, म्हणजे 'स्वपेर्णेः' असें म्हटलें पाहिजे. तसें म्हटलें म्हणजे स्वप् धातूहून णिप्रत्यय करून जें स्वापि असें होतें तेथेंच संप्रसारण होईल, इतर ठिकाणीं होणार नाहीं.

( सू. ७५, वा. १ ) ह्या सूत्रामध्यें त्रयाणाम् असें म्हणावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं हें तीन धातू झाले कीं तेथें जुहोत्यादि गणच संपत आहे. तेव्हा णिज् वगैरे धातू असें म्हटलें तरी तीनच येतील.

( वा. २ ) तर मग पुढें अनुवृत्ति होण्याकरितां येथें 'त्रयाणाम्' असें पाहिजे. 'भृञामित्' या पुढील सूत्रानें सांगितलेला इकार आदेश भृञ् वगैरे तीनच धातूंच्या अभ्यासाला झाला पाहिजे. त्यांच्या पुढील हा धातूच्या अभ्यासाला न झाला पाहिजे; उदा० जहाति.

( सू. ७७ ) ह्या सूत्रामध्यें 'अर्ति' असें कशाकरितां म्हटलें आहे ? तसें म्हणावयास नको. 'बहुलं छन्दसि' या पुढील सूत्रानेंच ऋ धातूच्या अभ्यासांतील अचाला ऱ्हस्व इकारादेश सिद्ध होत आहे. कारण शपाचा श्लु झालेलें ऋ धातूचें रूप वेदावांचून मिळतच नाहीं.

तर मग अशा रीतीनें सिद्ध होत असतांना ज्या अर्थी आचार्यांनीं येथें 'अर्ति' असें म्हटलें

---

१. (सू. ६८) व्यथ् धातूच्या अभ्यासांतील यकाराला लिट्प्रत्यय पुढें असतांना संप्रसारण होतें.

१ (सू. ६९) इण् धातूच्या अभ्यासांतील इकाराला ककारेत्संज्ञक लिट् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

१. (सू. ७०) अभ्यासांतील आरंभीच्या ऱ्हस्व अकारालाही लिट् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

१. (सू. ७१) ज्या धातूमध्यें दोन हल् आहेत अशा धातूच्या अभ्यासांतील आरंभींचा दीर्घ झालेला जो आकार त्याच्या पुढील उत्तरखंडाला नुट् आगम होतो.

१. (सू. ७२) स्वादि गणांतील अश् धातूच्या आरंभींचा दीर्घ झालेला जो आकार त्याच्यापुढील उत्तरखंडाला नुट् आगम होतो.

१. (सू. ७३) भू धातूच्या अभ्यासांतील उकाराला लिट्प्रत्यय पुढें असतांना अकार होतो.

१. (सू. ७४) अदादि गणांतील सू धातूचें लिट् प्रत्यय करून सुषुवे असें जें रूप लोकामध्यें होतें त्याच्याऐवजीं वेदामध्यें 'ससूव' असें होतें.

१. (सू. ७५) णिज्, विज् आणि विष् या तीन धातूंच्या अभ्यासांतील इकाराला शपाचा श्लु झाला असतांना गुण होतो.

१. ( सू. ७६ ) भृञ्, माङ् आणि ओहाङ् या तीन धातूंच्या अभ्यासांतील शेवटच्या अचाला शपाचा श्लु झाला असतांना ऱ्हस्व इकारादेश होतो.

१. (सू. ७७) जुहोत्यादि गणांतील ऋ आणि पॄ या धातूंच्या अभ्यासांतील शेवटच्या अकाराला शपाचा श्लु झाला असतांना ऱ्हस्व इकारादेश होतो.

र्तिग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भाषायामर्तेः श्लुर्भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । इयर्तीत्येतत्सिद्धं भवति ॥

[ बहुलं छन्दसि ॥ ७।४।७८ ॥

सन्यतः ॥ ७।४।७९ ॥

ओः पुयण्ज्यपरे ॥ ७।४।८० ॥

स्रवतिशृणोतिद्रवतिप्रवतिप्लवतिच्यवतीनां वा ॥७।४।८१ ॥ ]

गुणो यङ्लुकोः ॥ ७।४।८२ ॥

**ऐचोर्यङि दीर्घप्रसङ्गो ह्रस्वाद्धि परं दीर्घत्वम् ॥ १ ॥**

ऐचोर्यङि दीर्घत्वं प्राप्नोति । डोढौक्यते तोत्रौक्यत इति । ननु च ह्रस्वत्वे कृते दीर्घत्वं न भविष्यति । न सिध्यति । किं कारणम् । ह्रस्वाद्धि परं दीर्घत्वम् । ह्रस्वत्वं क्रियतां दीर्घत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्दीर्घत्वेन भवितव्यम् ॥

**न वाभ्यासविकारेष्वपवादस्योत्सर्गाबाधकत्वात् ॥ २ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । अभ्यासविकारेष्वपवादस्योत्सर्गाबाधकत्वात् । अभ्यासविकारेष्वपवादा उत्सर्गान्न बाधन्त इत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ कान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि ॥

**प्रयोजनं सन्वद्भावस्य दीघत्वम् ॥३॥**

अचीकरत् अजीहरत् । सन्वद्भावमपवादत्वाद्दीर्घत्वं न बाधते ॥

---

आहे त्यावरून ते असें सुचवितात कीं शपाचा श्लु झालेला ऋ धातूचा प्रयोग लोकामध्येंही होतो.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं ऋ धातूचें इयर्ति असें रूप लोकामध्येंही होतें.

( सू ८२, वा. १ ) यङ् प्रत्यय पुढें असतांना अभ्यासातील ऐकार आणि औकार यांना दीर्घ होऊं लागेल. उदा० डोढौक्यते व तोत्रौक्यते येथें ढौक् व त्रौक् या धातूंहून यङ् प्रत्यय करून द्वित्व केल्यानंतर अभ्यासांतील औकाराला पुढील सूत्रानें दीर्घ होईल, म्हणजे औकाराला औकारच होईल.

पण औकाराला अगोदर ऱ्हस्वानें उकार करून त्याला प्रकृत सूत्रानें गुण करून ओकार झाला म्हणजे रूप साधेल; दीर्घ होणारच नाहीं.

अशा रीतीनें हें उदाहरण सिद्ध होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ह्रस्वा(७।४।५९)पेक्षां दीर्घ ( ७।४।८३ ) पर आहे. ढौक् धातूच्या अभ्यासांतील औकाराला अगोदर ऱ्हस्व करावा किंवा दीर्घ करावा, असा प्रश्न उपस्थित झाला असतां परत्वास्तव दीर्घ अगोदर व्हावा.

( वा. २ ) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं अभ्यासाला सांगितलेल्या कार्यामध्यें अपवाद हे उत्सर्गांचा म्हणजे सामान्यशास्त्राचा बाध करीत नाहींत. तेव्हां ' अभ्यासविकारामध्यें अपवाद हे उत्सर्गांचा बाध करीत नाहींत' अशी परिभाषाच केली पाहिजे.

या परिभाषेचे उपयोग कोणते ?

(वा. ३) अचीकरत् अजीहरत् इत्यादि ठिकाणीं दीर्घानें (७।४।९४) सन्वद्भावाचा (७।४।९३) अपवाद म्हणून बाध करावा, पण केला जात नाहीं.

---

१. (सू. ७८) शपाचा श्लु झाला असतांना अभ्यासांतील अचाला ऱ्हस्व इकारादेश वेदामध्यें बाहुल्येंकरून होतो.

१. (सू. ७९) सन् प्रत्यय पुढें असतांना अभ्यासांतील ऱ्हस्व अकाराला ऱ्हस्व इकार आदेश होतो.

१. (सू. ८०) सन् प्रत्यय पुढें असतांना अभ्यासाच्या शेवटीं असलेल्या उकाराला ऱ्हस्व इकारादेश होतो परंतु त्या उकाराच्या पुढें पवर्ग, यण् किंवा जकार हे वर्ण असले पाहिजेत व त्या वर्णांच्या पुढें अकार असला पाहिजे.

१. (सू. ८१) सन् प्रत्यय पुढें असतांना स्रु, श्रु, द्रु, प्रु, प्लु आणि च्यु या धातूंच्या अभ्यासाच्या शेवटीं असलेल्या उकाराला ऱ्हस्व इकारादेश विकल्पानें होतो, परंतु उत्तरखंडांतील यणाच्या पुढें अकार असला पाहिजे.

१. (सू. ८२) यङ् प्रत्यय पुढें असतांना किंवा यङाचा लुक् झाला असतांना अभ्यासाच्या शेवटीं असलेल्या इकाराला गुण होतो.

**मान्प्रभृतीनां दीर्घत्वमित्त्वस्य ॥४॥**

मान्प्रभृतीनां दीर्घत्वमपवादत्वादित्त्वं न बाधते ॥

**गणेरीत्वं हलादिशेषस्य ॥ ५ ॥**

गणेरीत्वमपवादत्वाद्धलादिशेषं न बाधते॥

इदमयुक्तं वर्तते । किमत्रायुक्तम् । ऐचोर्यङि दीर्घप्रसङ्गो ह्रस्वाद्धि परं दीर्घत्वमित्युक्त्वा तत उच्यते न वाभ्यासविकारेष्वपवादस्योत्सर्गाबाधकत्वादिति । तस्याश्च परिभाषायाः प्रयोजनानि नामोच्यन्ते प्रयोजनं सन्वद्भावस्य दीर्घत्वं मान्प्रभृतीनां दीर्घत्वमित्त्वस्य गणेरीत्वं हलादिशेषस्येति च । न च सन्वद्भावमपवादत्वाद्दीर्घत्वं बाधते । किं तर्हि । परत्वात् । न खल्वपि मान्प्रभृतीनां दीर्घत्वमपवादत्वादित्त्वं बाधते । किं तर्हि । अन्तरङ्गत्वात् । न खल्वपि गणेरीत्वमपवादत्वाद्धलादिशेषं बाधते । किं तर्हि । अनवकाशत्वात् ॥ एवं तर्हीयं परिभाषा कर्तव्याभ्यासविकारेषु बाधका न बाधन्त इति । सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या । न कर्तव्या । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येषा परिभाषेति यदयमकित इति प्रतिषेधं शास्ति॥

**[१]दीर्घोऽकितः ॥ ७।४।८३ ॥**

अकित इति किमर्थम् । यंयम्यते रंरम्यते ।

---

( वा. ४ ) मीमांसते इत्यादि ठिकाणीं मान् वगैरे धातूंच्या अभ्यासाला सांगितलेल्या दीर्घानें ( ३।१।६ ) अपवाद म्हणून इत्त्वाचा ( ७।४।७९ ) बाध करावा, पण तो केला जात नाहीं.

( वा. ५ ) गण् धातूच्या अभ्यासाला सांगितलेल्या ईकार आदेशानें ( ७।४।९७ ) अपवाद म्हणून 'हलादिः शेषः' याचा बाध करावा, पण तो केला जात नाहीं.

येथें हें सर्व अयोग्य आहे असें दिसतें.

काय बरें येथें अयोग्य आहे असें वाटतें ?

अयोग्यपणा असा दिसतो कीं येथें आचार्य वार्तिककारांनीं 'ऐचोर्यङि दीर्घप्रसङ्गो ह्रस्वाद्धि परं दीर्घत्वम्' ( वा. १ ) असें शंकेमध्यें बाधाचें कारण परत्व हें दाखवून पुढें 'न वाऽभ्यासविकारेष्वपवादस्योत्सर्गाबाधकत्वात्' ( वा. २ ) असें उत्तरामध्यें बाध न होण्याचें कारण अपवादत्व हें सांगितलें आहे. तसेंच पुढें त्या परिभाषेचे उपयोग म्हणून 'प्रयोजनं सन्वद्भावस्य दीर्घत्वम्' ( वा. ३ ), 'मान्प्रभृतीनां दीर्घत्वमित्त्वस्य' ( वा. ४ ), 'गणेरीत्वं हलादिशेषस्य' ( वा. ५ ), असे सांगितले आहेत. परंतु वस्तुस्थिति पाहिली असतां दीर्घानें सन्वद्भावाचा बाध अपवादत्वास्तव प्राप्त झालेला नाहीं; तर परत्वास्तव तो आलेला आहे. तसेंच मान् वगैरे धातूंना सांगितलेल्या दीर्घानें इत्त्वाचा बाध अपवादत्वास्तव प्राप्त झालेला नाहीं; तर अंतरंगत्वास्तव तो आलेला आहे. तसेंच गण् धातूच्या अभ्यासाला सांगितलेल्या ईकारादेशानें 'हलादिः शेषः' याचा बाध अपवादत्वास्तव प्राप्त झालेला नाहीं; तर अनवकाशत्वास्तव प्राप्त झालेला आहे.

असें आहे तर परिभाषेंतील अपवाद हा शब्द काढून अशी परिभाषा करावी की 'अभ्यासविकारांमध्यें बाधक शास्त्रें हीं दुसऱ्याचा बाध करीत नाहींत'.

तर मग तशी परिभाषा केली पाहिजे.

तशी परिभाषा करावयास नको. कारण पुढील सूत्रामध्यें आचार्यांनीं जो 'अकितः' असा निषेध केला आहे त्यावरूनच त्यांनीं ही परिभाषा ज्ञापित केली आहे.

( सू. ८३ ) येथें 'अकितः' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

यंयम्यते, रंरम्यते, या ठिकाणीं नुक् हा कित् आगम ( ७।४।८५ ) झाला असल्यामुळें तेथें

---

२. परिभाषा नसेल तर नुक् वगैरे कित् आगमांनीं दीर्घाचा बाध होत असल्यामुळें यंयम्यते इत्यादि उदाहरणांमध्यें दीर्घ होणारच नाहीं. तेव्हां त्याकरितां केलेलें 'अकितः' हें पद व्यर्थ होईल.

१. (सू. ८३) यङ् प्रत्यय पुढें असतांना किंवा यङाचा लुक् झाला असतांना कित् आगम न झालेल्या अभ्यासांतील अचाला दीर्घ होतो.

अकित इति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति यंयम्यते रंरम्यत इति । नुकि कृतेऽनजन्तत्वात् ॥ अत उत्तरं पठति ।

**अकिद्वचनमन्यत्र किदन्तस्यालोऽन्त्यनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

अकिद्वचनं क्रियते ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र किदन्तस्याभ्यासस्यालोऽन्त्यविधिर्न भवतीति ॥ किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् ।

**प्रयोजनं ह्रस्वत्वात्त्वेत्त्वगुणेषु ॥ २ ॥**

ह्रस्वत्वम् । अवचच्छतुः अवचच्छुः । अत्त्वम् । चच्छृदतुः चच्छृदुः । इत्त्वम् । चिच्छादयिषति चिच्छेदयिषति । गुणः । चेच्छिद्यते चोच्छुप्यते । नुकि कृतेऽनन्त्यत्वादेते विधयो न प्राप्नुवन्ति ॥

**विप्रतिषेधात्सिद्धम् ॥ ३ ॥**

नैतानि सन्ति प्रयोजनानि । विप्रतिषेधेनाप्येतानि सिद्धानि । नुक्क्रियतामेते विधय इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादेते विधय इति ॥

**तदन्ताग्रहणाद्वा ॥ ४ ॥**

अथवा नैवं विज्ञायतेऽभ्यासस्याजन्तस्यर्कारान्तस्याकारान्तस्येगन्तस्येति । कथं तर्हि । अभ्यासे योऽजभ्यासे य ऋकारोऽभ्यासे

---

दीर्घ होऊं नये, याकरिता म्हटले आहे.

परंतु 'अकितः' असें म्हणावयास नको.

'अकितः' असें म्हटलें नाहीं तर यंयम्यते, रंरम्यते, या ठिकाणीं दीर्घ कां बरें होणार नाहीं ?

अगोदर नुक् केल्यानंतर अजन्त अभ्यास नाहीं, म्हणजे अभ्यासाच्या शेवटीं अच् नाहीं, म्हणून होणार नाहीं.

येथें वार्तिककार असें म्हणतातः—

(वा. १) 'अकितः' असें जें येथें म्हटलें आहे तें ज्ञापकाकरितां म्हटलें आहे.

या ज्ञापकानें आचार्यांच्या मनांत काय सुचवावयाचें आहे ?

असें सुचवावयाचें आहे कीं 'ह्या दीर्घाशिवाय इतर कार्यें किदागम अंतीं असलेल्या अभ्यासाला झालीं पाहिजेत, म्हणून तीं कार्यें 'अजन्त अभ्यास' अशा रीतीनें अभ्यास हें विशेष्य करून 'अलोऽन्त्यस्य' यानें अंत्याला करणें इष्ट नाहीं.'

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

(वा २) ऱ्हस्व, अत्व, इत्व आणि गुण ह्या ठिकाणीं या ज्ञापकाचा उपयोग आहे. अवचच्छतुः, अवचच्छुः, येथे छा या अभ्यासांतील आकाराला नुक् आगम ( ६।१।७५ ) केल्यानंतर तो आकार अभ्यासाच्या शेवटीं नाहीं, तरी पण त्याला ऱ्हस्व ( ७।४।५९ ) होतो. चच्छृदतुः, चच्छृदुः, येथें अभ्यासातील ऋकाराला नुक् आगम ( ६।१।७३ ) केल्यानंतरही त्याला अत्व ( ७। ४।६६ ) होतें. चिच्छादयिषति, चिच्छेदयिषति, येथे नुक् आगम झाल्यानंतरही त्या अकाराला इत्व ( ७।४।७९ ) होतें. चेच्छिद्यते, चोच्छुप्यते, येथे नुक् आगम झाल्यानंतरही गुण (७।४।८२) होतो. असे या ज्ञापकाचे उपयोग आहेत.

( वा. ३ ) हे या ज्ञापकाचे उपयोग बरोबर दिसत नाहींत; हीं उदाहरणें विप्रतिषेधानेही सिद्ध होतात. कारण, येथें असा प्रश्न उद्भवतो कीं नुक् आगम अगोदर करावा कीं ऱ्हस्व वगैरे विधी हे अगोदर करावे ?

मग त्यांमध्यें काय बरें करावें ?

नुक् आगमाचा परत्वास्तव बाध करून ऱ्हस्व वगैरे विधीच अगोदर करावे. म्हणजे अर्थातच त्या ज्ञापकाचा काहीं उपयोग नाहीं.

( वा. ४ ) अथवा अचः ( ७।४।५९ ), उः ( ७।४।६६ ), अतः ( ७।४।७९ ) आणि इकः ( ७।४।८२ ) हीं अभ्यासाचीं विशेषणें करून तदन्तविधीचें ( १।१।७२ ) ग्रहण केलें म्हणजे अजन्त अभ्यास, ऋकारान्त अभ्यास, ऱ्हस्व अकारान्त अभ्यास आणि इगन्त अभ्यास असा अर्थ होईल; परतु येथें तसा अर्थ करूं नये.

तर मग कसा करावा ?

अभ्यास हें त्यांचें विशेषण करून अभ्यासां-

योऽकारोऽभ्यासे य इगिति । एवं च कृत्वा दीर्घत्वं प्राप्नोति ॥ एवं तर्हीदमिह व्यपदेश्यं सदाचार्यो न व्यपदिशति । किम् । अपवादो नुग्दीर्घत्वस्येति ॥

एवं तर्हि सिद्धे सति यदकित इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषाभ्यासविकारेषु बाधका न बाधन्त इति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । ऐचोर्यङि दीर्घप्रसङ्गो ह्रस्वाद्धि परं दीर्घत्वमित्युक्तं स न दोषो भवति ॥

**[ [1]नीग्वञ्चुस्रंसुध्वंसुभ्रंसुकसपतपदस्कन्दाम् ॥७।४।८४॥ ]**

**[1]नुगतोऽनुनासिकान्तस्य ॥७।४।८५॥**

**नुकि यंयम्यते रंरम्यत इति रूपासिद्धिः ॥ १ ॥**

नुकि सति यंयम्यते रंरम्यत इति रूपं न सिध्यति ॥

**अनुस्वारागमवचनात्सिद्धम् ॥ २ ॥**

अनुस्वारागमो वक्तव्यः ॥ एवमपीदमेव रूपं स्यात् यँय्यम्यते इदं न स्यात् यंयम्यते ।

**पदान्तवच्च ॥ ३ ॥**

पदान्तवच्चेति वक्तव्यम् । वा पदान्तस्य [ ८. ४. ५९ ] इति ॥

---

तील जो अच्, अभ्यासांतील जो ऋकार, अभ्यासांतील जो ऱ्हस्व आणि अभ्यासांतील जो इक्, असा त्या त्या ठिकाणीं अर्थ करावा. [2] तेव्हां प्रकृत सूत्रामध्येंही तसाच अर्थ होईल आणि यंयम्यते येथें नुक् झाल्यानंतर दीर्घाची प्राप्ति येईल. म्हणून दीर्घ होऊं नये याकरितां 'अकितः' असें जें येथें केलें आहे तें बरोबरच आहे.

तर मग येथें एक गोष्ट सागण्यासारखी असून आचार्य वार्तिककारांनीं सांगितली नाहीं.

ती गोष्ट कोणती ?

नुक् आगम हा प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या दीर्घाचा अपवाद आहे.

तर मग अपवाद नुक् आगम झाल्यानंतर दीर्घ होणार नाहीं. अशा रीतीनें सिद्ध होत असतांही जो प्रकृत सूत्रामध्यें अकितः असा निषेध केला आहे त्यावरून आचार्य अशी परिभाषा सुचवितात कीं 'अभ्यासविकारामध्यें बाधक शास्त्रें हीं दुसऱ्याचा बाध करीत नाहींत.'

ह्या ज्ञापकाचा उपयोग काय ?

'डोढौक्यते येथें अभ्यासाला दीर्घ होऊं लागेल; कारण ऱ्हस्वापेक्षा दीर्घ पर ( ७।४।८२ वा. १ ) आहे' असा जो दोष दाखविला आहे तो दोष या ज्ञापकामुळें येत नाहीं.

(सू. ८५. वा. १) नुक् आगम केला असतां यंयम्यते, रंरम्यते, हीं रूपें सिद्ध होत नाहींत.

(वा. २) नुक् असा आगम न सांगतां अनुस्वारच आगम सांगावा म्हणजे हें सिद्ध होईल.

तरी पण त्या अनुस्वाराला परसवर्ण ( ८।४।५८ ) होऊन यँय्यम्यते असें एकच रूप होईल, यंयम्यते असें होणार नाहीं.

( वा. ३ ) तो अनुस्वार पदाच्या अंतीं असल्यासारखा समजावा, म्हणजे 'वा पदान्तस्य' ( ८।४।५९ ) यानें विकल्पानें परसवर्ण होईल.

---

२. तर उलट अभ्यास हें अच् वगैरेंचें विशेषण करून अभ्यासांतील अचाला ऱ्हस्व होतो अशा प्रकारचे वाक्यार्थ झाले म्हणजे अलोऽन्त्यस्य ही परिभाषा येणार नाहीं; आणि अभ्यासाच्या अंतीं नसलेल्या अचाला ह्रस्व होईल.

३. तेव्हां तें व्यर्थ होत नसल्यामुळें ज्ञापक होत नाहीं व ज्ञापकाची जरूरही नाहीं, असा वार्तिककारांचा अभिप्राय आहे.

१. ( सू. ८४ ) यङ् प्रत्यय पुढें असतांना किंवा यङाचा लुक् झाला असतांना वञ्च्, स्रंस्, ध्वंस्, भ्रंस्, कस्, पत्, पद् आणि स्कन्द् या धातूंच्या अभ्यासाला 'नीक्' असा आगम होतो.

१. ( सू. ८५ ) यङ् प्रत्यय पुढें असतांना किंवा यङाचा लुक् झाला असतांना वर्गातील पांचवा वर्ण शेवटीं असलेल्या अंगामधील जो ऱ्हस्व अकार शेवटीं असलेला अभ्यास त्याला नुक् असा आगम होतो.

२. कारण नुक् आगमानें झालेल्या नकाराला झल् पुढें नसल्यामुळें अनुस्वार ( ८।३।२४ ) होणार नाहीं.

[ जपजभदहदशभञ्जपशां च ॥ ७।४।८६ ॥

चरफलोश्च ॥ ७।४।८७ ॥

उत्परस्यातः ॥ ७।४।८८ ॥

ति च ॥ ७।४।८९ ॥ ]

रीगृदुपधस्य च ॥ ७।४।९० ॥

रीगृत्वतः संयोगार्थम् ॥ १ ॥

रीगृत्वत इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । संयोगार्थम् । संयोगान्ताः प्रयोजयन्ति । वरीवृश्च्यते परीपृच्छ्यते बरीभृज्ज्यते ॥

रुग्रिकौ च लुकि ॥ ७।४।९१ ॥

मर्मृज्यते मर्मृज्यमानास इति चोपसंख्यानम् ॥ १ ॥

मर्मृज्यते मर्मृज्यमानास इति चोपसंख्यानं कर्तव्यम् । मर्मृज्यते मर्मृज्यमानासः ॥

ऋतश्च ॥ ७।४।९२ ॥

किमिदमृकारग्रहणमङ्गविशेषणम् । ऋकारान्तस्याङ्गस्येति । आहोस्विदभ्यासविशेषणम् । ऋकारान्तस्याभ्यासस्येति । अङ्गविशेषणमित्याह । कथं ज्ञायते । यदयं तपरकरणं करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । न हि कश्चिदभ्यासे दीर्घोऽस्ति यदर्थं तपरकरणं क्रियते ॥ अथाङ्गविशेषण ऋकारग्रहणे सति तपरकरणे किं प्रयोजनम् । इह मा भूत् । चाकर्ति

---

( सू. ९०, वा. १ ) हा रीक् आगम सांगतांना धातूच्या उपधेला ऱ्हस्व ऋकार पाहिजे असें जें म्हटलें आहे, तेथें धातूमध्यें ऱ्हस्व ऋकार पाहिजे इतकेंच म्हणावें.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं धातूच्या शेवटीं संयोग असला तर तेथेंही रीक् आगम झाला पाहिजे; उ० वरीवृश्च्यते, परीपृच्छ्यते, बरीभृज्ज्यते.

( सू. ९१, वा. १ ) मर्मृज्यते, मर्मृज्यमानासः, येथें यङ् प्रत्ययाचा लुक् झाला नसला तरी रुक् आगम होतो असें म्हणावें.

( सू. ९२ ) ह्या सूत्रामध्यें ऋतः हें अंगाचें विशेषण करावें कीं ज्यामुळें ' ऱ्हस्व ऋकार शेवटीं असलेल्या अंगामधील जो अभ्यास ' असा अर्थ होईल, अथवा अभ्यासाचें विशेषण करावें कीं ज्यामुळें ' ऱ्हस्व ऋकार शेवटीं असलेला जो अभ्यास ' असा अर्थ होईल ?

अंगाचें विशेषण आहे असें आम्ही म्हणतों.

हें कशावरून समजावें ?

सूत्रामध्यें ऋकाराच्या पुढें ऱ्हस्वाचेंच ग्रहण व्हावें म्हणून जो तकार जोडला आहे त्यावरून समजावें.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें कीं अभ्यासाचें विशेषण केलें तर त्या तकाराचा कांहीं उपयोगच दिसत नाहीं; कारण अभ्यासामध्यें कोठेंच दीर्घ नाहीं कीं ज्याच्या व्यावृत्तीकरितां येथें तकार जोडला आहे असें म्हणतां येईल.

आतां ऋतः हें अंगाचें विशेषण केलें म्हणजे त्या तकार जोडण्याचा कोठें बरें उपयोग होणार

---

१. ( सू. ८६ ) यङ् प्रत्यय पुढें असतांना किंवा यङाचा लुक् झाला असतांना जप्, जभ्, दह्, दश्, भञ्ज् आणि पश् या धातूंच्या अभ्यासाला नुगागम होतो.

१. ( सू. ८७ ) यङ् प्रत्यय पुढें असतांना किंवा यङाचा लुक् झाला असतांना चर् आणि फल् या धातूंच्या अभ्यायाला नुक् असा आगम होतो.

१. ( सू. ८८ ) यङ् प्रयत्य पुढें असतांना किंवा यङाचा लुक् झाला असतांना या धातूंच्या अभ्यासाच्या पुढील उत्तरखण्डांतील ऱ्हस्व अकाराला ऱ्हस्व उकारादेश होतो.

१ ( सू. ८९ ) चर् आणि फल् या धातूंमधील ऱ्हस्व अकाराला तकार आरंभीं असलेला प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्व उकार असा आदेश होतो.

१. ( सू. ९० ) यङ् प्रत्यय पुढें असतांना किंवा यङाचा लुक् झाला असतांना ऱ्हस्व ऋकार उपधेला असलेल्या अंगाच्या अभ्यासाला रीक् असा आगम होतो.

१. (सू. ९१) यङाचा लुक् झाला असेल तेथें ऱ्हस्व ऋकार उपधेला असलेल्या अंगाच्या अभ्यासाला रुक् आणि रिक् असेही ( आणखी पाळीपाळीनें ) आगम होतात.

१. (सू. ९२) यङाचा लुक् झाला असतांना ऱ्हस्व ऋकार शेवटीं असलेल्या अंगाच्या अभ्यासाला रुक्, रिक् आणि रीक् असे तीनही आगम पाळीपाळीनें होतात.

चाकीर्तः चाकिरति ॥

किरतिं चर्करीतान्तं पचतीत्यत्र यो नयेत् ।
प्राप्तिज्ञं तमहं मन्ये प्रारब्धस्तेन संग्रहः ॥

## सन्वल्लघुनि चङ्परेऽनग्लोपे ॥ ७।४।९३ ॥

इह कस्मान्न भवति । अजजागरत् । लघुनि चङ्पर इत्युच्यते व्यवहितं चात्र लघु चङ्परम् । इहापि तर्हि न प्राप्नोति । अचीकरत् अजीहरत् । वचनाद्भविष्यति । इहापि वचनात्प्राप्नोति । अजजागरत् । येन नाव्यवधानं तेन व्यवहितेऽपि वचनप्रामाण्यात् । केन च नाव्यवधानम् । वर्णेन । एतेन पुनः संघातेन व्यवधानं भवति न भवति च । एवमपि अचिक्षणत् । अत्र न प्राप्नोति । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येवंजातीयकानामित्त्वमिति यदयमत्स्मृदृत्वरप्रथम्रद-

---

आहे ?

चाकर्ति[२], चाकीर्तः, चाकिरति, येथें रुक् वगैरे आगम न झाले पाहिजेत असा त्याचा उपयोग आहे.

तुदादि गणांतील दीर्घ ॠकारान्त कॄ धातूच्या पुढें यङ् प्रत्ययाचा लुक् करून पुढें लट् प्रत्यय केला असतां तेथें रूप कसें होतें तें जो सांगेल त्यालाच ' तेथे रुक् वगैरे आगमाची प्राप्ति येते कीं नाहीं हें जाणणारा ' असें आम्ही समजूं, आणि त्यानेंच साधु शब्दांचा संग्रह करण्यास प्रारंभ केला असें होईल.

( सू. ९३ ) अजजागरत् या ठिकाणीं ह्या सूत्रानें सन्वद्भाव कां बरें होत नाहीं ?

लघु स्वर अव्यवहित पुढें असतांना जो अभ्यास, आणि ज्याच्यापुढे चङ् आहे असा णि प्रत्यय अव्यवहित पुढें असतांना जो लघु, असें येथें म्हटले आहे; आणि अजजागरत् येथें तर अभ्यासाच्या पुढें लघु स्वर अकार हा जाग् ह्या भागानें व्यवहित आहे, तसेंच चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय हा लघु स्वराचे पुढें रेफानें व्यवहित आहे.

तर मग अचीकरत्, अजीहरत्, येथेंही सन्वद्भाव होणार नाहीं[२].

अव्यवहित उदाहरण मिळत नाहीं म्हणून वचनसामर्थ्यास्तव व्यवधान खपेल.

असें असेल तर अजजागरत् येथेंही वचनसामर्थ्यास्तव सन्वद्भाव होऊं लागेल.

पण कमींत कमी जेवढ्या भागानें व्यवधान सर्व ठिकाणीं असणारच तेवढ्या भागानें व्यवधान असलें तरी तें नाइलाजास्तव खपतें; तेवढ्या भागानें व्यवधान असलें तरी वचनसामर्थ्यास्तव कार्य होतें.

असें येथे केवढ्या भागानें व्यवधान सहन होतें ?

एका वर्णानें. आतां अजजागरत् येथें वर्णसमुदायाने व्यवधान आहे; आणि असें वर्णसमुदायानें व्यवधान मात्र सर्व ठिकाणीं असतेंच असें नाहीं. कोठें असतें, कोठें नसतें. तेव्हां वर्णसमुदायानें व्यवधान येथें खपत नाहीं.

तरी पण अचिक्षणत् येथें सन्वद्भाव होणार नाहीं आणि त्यामुळें अभ्यासाला सन्यतः ( ७।४।७९ ) यानें इत्त्व होणार नाहीं.

---

२. येथें तुदादि गणांतील दीर्घ ॠकारान्त जो कॄ धातु त्याच्या पुढील यङाचा लुक् करून पुढें लट् प्रत्यय केला आहे.

१. ( सू. ९३ ) ज्या णि प्रत्ययाच्या पुढें चङ् प्रत्यय आहे असा णि प्रत्यय पुढें असतांना जो लघु स्वर तो पुढें असतांना जो अंगांतील अभ्यास त्याला कार्य कर्तव्य असतांना तो णि प्रत्यय सन् प्रत्ययासारखा समजावा, परंतु त्या णि प्रत्ययाच्या निमित्तानें मागील अकाचा लोप झाला नसावा.

२. कारण, लघु स्वर हा अचीकरत् येथें ककारानें आणि अजीहरत् येथें हकारानें व्यवहित आहे; तसेंच दोन्ही ठिकाणीं णि प्रत्यय हा रेफानें व्यवहित आहे.

३. कारण येथें अभ्यासाच्या पुढें लघु स्वर हा ककार आणि षकार या दोन वर्णांनी व्यवहित आहे.

स्तृस्पशाम् [ .९५ ] इतीत्त्वबाधनार्थमत्त्वं शास्ति ॥

**सन्वद्भावदीर्घत्वे णेर्णिच्युपसंख्यानम् ॥१॥**

सन्वद्भावदीर्घत्वे णेर्णिच्युपसंख्यानं कर्तव्यम् । वादितवन्तं प्रयोजितवान् अवीवदद्वीणां परिवादकेन । किं पुनः कारणं न सिध्यति । णिचा व्यवहितत्वात् । लोपे कृते नास्ति व्यवधानम् । स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावो दीर्घविधिं प्रति न स्थानिवदिति । एवमप्यनग्लोप इति प्रतिषेधः प्राप्नोति । वृद्धौ कृतायां लोपस्तन्नाग्लोप्यङ्गं भवति । एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । वृद्धिः क्रियतां लोप इति । किमत्र कर्तव्यम् । परत्वाद् वृद्धिः । नित्यो लोपः । कृतायामपि वृद्धौ प्राप्नोत्यकृतायामपि । लोपोऽप्यनित्यः । अन्यस्य कृतायां वृद्धौ प्राप्नोत्यकृतायामन्यस्य शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । उभयोरनित्ययोः परत्वाद् वृद्धिः । वृद्धौ कृतायां लोपस्तन्नाग्लोप्यङ्गं भवति ॥

---

तर मग अत्स्मृदृत्वरप्रथम्रदस्तृस्पशाम् ( ७।४।९५ ) या सूत्रानें संयोग आरंभीं असलेल्या धातूच्या अभ्यासांतील अकाराला इत्त्व होऊं नये म्हणून जो मुद्दाम अकाराला अकारच सांगितला आहे, त्या आचार्यांच्या कृतीवरून असें ज्ञापित होतें कीं धातूच्या आरंभींच्या संयोगानें व्यवधान असलें तरी तेथें सन्वद्भाव होऊन इत्त्व होतें.

( वा. १ ) हा जो प्रकृत सूत्रानें चङ् पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना सन्वद्भाव सांगितला आहे आणि पुढील सूत्रानें दीर्घ सांगितला आहे तो त्या णिप्रत्ययान्ताहून दुसरा पुन्हां णिच् प्रत्यय केला असतां तेथेंही होतो असें सांगावें; उदा० वादितवन्तं प्रयोजितवान्, अवीवदद्वीणां परिवादकेन. वीणा वाजविणाऱ्याला प्रेरणा करता झाला असा अर्थ येथें विवक्षित आहे.

पण येथे प्रकृत सूत्रानें सन्वद्भाव आणि पुढील सूत्रानें दीर्घ कां बरें होणार नाहीं ?

णिच् प्रत्ययानें व्यवधान आहे म्हणून.

पण त्या णिच् प्रत्ययाचा लोप केला असतां व्यवधान नाहींसें होईल.

लोप झाला तरी स्थानिवद्भावानें (१।१।५७) व्यवधान आहेच.

पण दीर्घ कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाही ( १।१।५८ ) असा स्थानिवद्भावाचा निषेध सांगितला आहे ना ?

तरी पण णि प्रत्ययाच्या निमित्तानें अकाचा लोप झाला असेल तेथें सन्वद्भाव आणि दीर्घ होत नाहींत हा निषेध येथें आहेच.

दुसऱ्या णि प्रत्ययाला मानून पहिल्या णि प्रत्ययाचा वृद्धीच्या पूर्वी लोप (६।४।५१) केला म्हणजे तो इकाराचा लोप होतो म्हणून अकाचा लोप होतो असें म्हणतां येईल; पण त्या पहिल्या णि प्रत्ययाला वृद्धीनें ( ७।२।११५ ) ऐकार झाल्यानंतर त्याचा लोप झाला तरी तो अकाचा लोप होत नाहीं. तेव्हां अनग्लोपे हा निषेध येत नाहीं.

पण येथें अगोदर असा विचार केला पाहिजे कीं प्रथमतः वृद्धि करावी कीं लोप करावा ?

मग काय बरें अगोदर करावें ?

परत्वास्तव लोपापेक्षां वृद्धि अगोदर करावी.

पण लोप नित्य आहे ना ? कारण वृद्धि केली तरी तो प्राप्त होत आहे आणि वृद्धि करण्याच्या पूर्वींही प्राप्त होत आहे.

अशा रीतीनें लोपाची प्राप्ति जरी येत आहे तरी वृद्धि केल्यानंतर तो लोप निराळ्या वर्णाला म्हणजे ऐकाराला प्राप्त होतो आणि वृद्धि करण्याच्या पूर्वी निराळ्या वर्णाला म्हणजे इकाराला प्राप्त होतो; तेव्हा निरनिराळ्या ठिकाणीं प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो. तेव्हां वृद्धि आणि लोप हे दोघेहि अनित्य होत असल्यामुळें त्यांमध्ये परत्वास्तव वृद्धि अगोदर होणार, आणि ती केल्यानंतर लोप झाला तरी तो ऐकाराचा होत असल्यामुळें त्या अंगामध्यें अकाचा लोप झाला असें होत नाहीं.

**मीमादीनां तु लोपप्रसङ्गः ॥ २ ॥**

मीमादीनां तु लोपः प्राप्नोति । अमीमपत् ॥

**सिद्धं तु रूपातिदेशात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । रूपातिदेशोऽयम् । सनि यादृशमभ्यासरूपं तत्सन्वद्भावेनातिदिश्यते न च मीमादीनां सन्यभ्यासरूपमस्ति ॥

**अङ्गान्यत्वाद्वा सिद्धम् ॥ ४ ॥**

अथवा ण्यन्तमेतदङ्गमन्यत् । लोपे कृते नाङ्गान्यत्वम् । स्थानिवद्भावादङ्गमन्यत् ॥ कथमजिज्ञपत् । अत्र सन्यपि ण्यन्तस्यैवोपादानमाप्ज्ञप्यृधामीत् [७. ४. ५५] इति । अत्राङ्गान्यत्वाभावादभ्यासलोपः स्यात् । तत्स्मात्पूर्व एव परिहारः सिद्धं तु रूपातिदेशादिति ॥

**[ दीर्घो लघोः ॥७।४।९४ ॥**

**अत्स्मृदृत्वरप्रथम्रदस्तृस्पशाम् ॥ ७।४।९५ ॥**

**विभाषा वेष्टिचेष्ट्योः ॥७।४।९६॥**

**ई च गणः ॥७।४।९७ ॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये सप्तमस्याध्यायस्य चतुर्थे पादे प्रथममाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

॥ सप्तमोऽध्यायः समाप्तः ॥

---

(वा. २) मी, मा वगैरे धातूंच्या अभ्यासाचा सन् पुढें असतांना जसा लोप होत असतो तसा अमीमपत् इत्यादि उदाहरणामध्यें सन्वद्भावाने होऊं लागेल.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

सन् केला असतां त्या ठिकाणीं जें अभ्यासाचें स्वरूप दिसतें त्याचा या सन्वद्भावानें अतिदेश होत आहे; आणि मी, मा, वगैरे धातूंच्या अभ्यासाला तर सन् पुढें असतांना कांहीं स्वरूपच नाहीं.

( वा. ४ ) अथवा ज्या अंगाच्या अभ्यासाला सन्वद्भावानें कार्य करावें म्हणून येथें सांगितलें आहे तें णिप्रत्ययान्त अंग निराळें; आणि अभ्यासाचा लोप णि प्रत्यय न केलेल्या नुसत्या मी, मा, वगैरे धातूंच्या अभ्यासाचा होत आहे, तेव्हां त्याचा अतिदेश होणार नाहीं.

पण अमीमपत् येथें णि प्रत्ययाचा लोप झाल्यानंतर तेवढेंच अंग शिल्लक राहिलें आहे ना ?

लोप झाला तरी त्याला स्थानिवद्भाव होत असल्यामुळें निराळें अंग होत आहेच.

तरी पण अजिज्ञपत् येथें दोष राहतोच; कारण सन् प्रत्यय केला असतांना जो ज्ञीप्सति येथें अभ्यासाचा लोप होतो तो णिप्रत्ययान्त अंगांतील अभ्यासाचाच होतो. कारण ' आप्ज्ञप्यृधामीत् ' (७।४।५५) येथें ज्ञपि असा णिप्रत्ययान्ताचाच निर्देश केला आहे. तेव्हां तेथें अंग निराळें होत नसल्यामुळें सन्वद्भावानें अभ्यासाचा लोप होऊं लागेल. तेव्हां तेथें 'सन्वद्भावानें रूपाचाच अतिदेश होतो ' हें पूर्वींचेंच समाधान समजलें पाहिजे.

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सातव्या अध्यायाच्या ४ थ्या पादांतील पहिलें आन्हिक व ४ था पाद समाप्त झाला, व सातवा अध्यायही समाप्त झाला.

---

४. कारण, तेथें अभ्यास हा लोपानें मुळींच नाहींसा होतो तेव्हां रूपच नसल्यामुळें अर्थातच त्याचा अतिदेश होत नाहीं.

१. (सू. ९४) सन्वद्भावाचा सर्व विषय असून अभ्यासांतील स्वर लघु असेल तर त्याला दीर्घ आदेश होतो.

१. ( सू. ९५ ) सन्वद्भावाचा विषय असतांना स्मृ, दृ, त्वर्, प्रथ्, म्रद्, स्तृ आणि स्पश् या धातूंच्या अभ्यासांतील अकाराला अकारच आदेश होतो; म्हणजे इत्व ( ७।४।७९ ) होत नाहीं.

१. ( सू. ९६ ) वेष्ट् आणि चेष्ट् या धातूंच्या अभ्यासांतील अचाला ऱ्हस्व चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना अकार आदेश विकल्पानें होतो.

१. (सू ९७) चङ् प्रत्यय पुढे असलेला णि प्रत्यय पुढें असतांना गण् धातूच्या अभ्यासांतील अचाला दीर्घ इकार आणि ऱ्हस्व अकार असे दोन आदेश पाळीपाळीनें होतात.

## सर्वस्य द्वे ॥ ८।१।१॥

सर्ववचनं किमर्थम् ।

**सर्ववचनमलोऽन्त्यनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

सर्वग्रहणं क्रियतेऽलोऽन्त्यनिवृत्त्यर्थम् । अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य द्विर्वचनं मा भूदिति ॥ क पुनरलोऽन्त्यनिवृत्त्यर्थेनार्थः सर्वग्रहणेन । नित्यवीप्सयोः [८. १. ४] इति । नित्यवीप्सयोरित्युच्यते न चान्त्यस्य द्विर्वचनेन नित्यता वीप्सा वा गम्यते । इह तर्हि परेर्वर्जने [५] इत्यन्त्यस्यापि द्विर्वचनेन वर्ज्यमानता गम्येत ॥

**षष्ठीनिर्देशार्थं च ॥ २ ॥**

षष्ठीनिर्देशार्थं च सर्वग्रहणं कर्तव्यम् । षष्ठीनिर्देशो यथा प्रकल्पेत ॥

**अनिर्देशे हि षष्ठ्यर्थाप्रसिद्धिः ॥ ३ ॥**

अक्रियमाणे सर्वग्रहणे षष्ठ्यर्थस्याप्रसिद्धिः स्यात् । कस्य । स्थानेयोगत्वस्य ॥ क पुनरिह षष्ठीनिर्देशार्थेनार्थः सर्वग्रहणेन यावता सर्वत्रैव षष्ठ्युच्चार्यते । परेर्वर्जने [५] प्रसमुपोदः पादपूरणे [६] उपर्यध्यधसः सामीप्ये [७] वाक्यादेरामन्त्रितस्य [८] इति । इह न काचित्षष्ठी नित्यवीप्सयोः [४] इति । ननु चैषैव षष्ठी । नैषा षष्ठी । किं तर्हि ।

---

(सू. १) ह्या सूत्रामध्यें 'सर्वस्य' हा शब्द कशाकरिता घातला आहे ?

(वा. १) अन्त्य अलाला कार्य करावें (१।१।५२) या परिभाषेनें अन्त्य वर्णाला द्वित्व होईल तें होऊं नये, म्हणून येथें सर्व शब्द घातला आहे.

अन्त्य अलाला द्वित्व होऊं नये म्हणून घातलेल्या या सर्व शब्दाचा उपयोग कोणत्या बरें सूत्रांमध्यें होतो ?

'नित्यवीप्सयोः' (८।१।४)या सूत्रामध्यें होतो.

'नित्यवीप्सयोः' असें तेथें म्हटलें आहे आणि शेवटच्या वर्णालाच द्वित्व केलें तर त्या शब्दापासून नित्यता व वीप्सा ह्या मुळींच प्रतीत होणार नाहींत.[2]

तर मग सर्व शब्दाचा उपयोग 'परेर्वर्जने' (८।१।५) या सूत्रामध्यें होईल. कारण शेवटच्या वर्णालाच फक्त द्वित्व झालें तरी देखील वर्जन हा अर्थ प्रतीत होण्याला अडचण नाहीं.

(वा. २) दुसरें असें कीं षष्ठी विभक्तीचा निर्देश करण्याकरितां या सूत्रामध्यें सर्व शब्द घातला पाहिजे, म्हणजे कोणाला कार्य करावें तें चटदिशीं समजेल.

(वा. ३) या सूत्रामध्यें सर्व शब्द घातला नाहीं तर षष्ठ्यर्थाची प्रतीति होणार नाहीं.

कोणत्या षष्ठ्यर्थाची ?

स्थानेयोगत्वाची.[3]

षष्ठीनिर्देशाकरितां या सूत्रामध्यें घातलेल्या सर्व शब्दाचा उपयोग पुढील कोणत्या सूत्रामध्यें बरें होईल ? कारण पुढील सूत्रांमध्यें सर्व ठिकाणीं षष्ठी उच्चारलीच आहे; उदा०—[4] परेर्वर्जने, प्रसमुपोदः पादपूरणे, उपर्यध्यधसः सामीप्ये, वाक्यादेरामन्त्रितस्य इ०.

पण नित्यवीप्सयोः या सूत्रामध्यें काहीं षष्ठी दिसत नाहीं.[5]

नित्यवीप्सयोः हीच षष्ठी [6]आहे ना ?

ही षष्ठी नव्हे.

तर मग ही कोणती विभक्ति आहे ?

---

१. (सू. १) हें अधिकारसूत्र आहे. तेव्हां सर्वस्य आणि द्वे या दोन पदांचा पुढील प्रत्येक सूत्रामध्यें संबंध होतो.

२. तेव्हां अर्थातच शेवटच्या वर्णालाच फक्त द्वित्व न होतां सगळ्या शब्दाला होईल.

३. स्थानेयोगत्व म्हणजे स्थानाशीं संबंध. हा संबंध समजला म्हणजे त्या सूत्रानें सांगितलेलें कार्य कोणाला करावयाचें तें समजतें. एकंदरींत येथें सांगितलेलें द्वित्व कोणाला करावयाचें तें समजण्याकरितां सर्व शब्द घातला आहे. हा सर्व शब्दाचा दुसरा उपयोग होय.

४. परेः, प्रसमुपोदः, उपर्यध्यधसः आणि आमन्त्रितस्य हे शब्द षष्ठ्यन्त उच्चारले आहेत. त्यामुळें तेथें परि, प्र, सम्, इत्यादि शब्दांना द्वित्व करावें असें समजतें. तेव्हां अर्थातच तेथें सर्व शब्दाचा कांहीं उपयोग दिसत नाहीं.

५. नित्यवीप्सयोः ही सप्तमी विभक्ति आहे.

६ नित्यवीप्सा या आबन्त शब्दाचें षष्ठीचें व सप्तमीचें द्विवचन सारखेंच होत असल्यामुळें ही शंका उद्भवते.

अर्थनिर्देश एषः । नित्ये चार्थे वीप्सायां चेति ॥

अलोऽन्त्यनिवृत्त्यर्थेन तावन्नार्थः सर्वग्रहणेन । इदं तावदयं प्रष्टव्यः । नित्यवीप्सयोर्द्वे भवत इत्युच्यते द्विशब्द आदेशः कस्मान्न भवति । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न द्विशब्द आदेशो भवतीति यदयं तस्य परमाम्रेडितमनुदात्तं च [ २; ३ ] इत्याह । कथं कृत्वा ज्ञापकम् । द्विशब्दोऽयमेकाच्तस्यैकाच्त्वात्तस्य परमाम्रेडितमनुदात्तं चेत्येतन्नास्ति । पश्यति त्वाचार्यो न द्विशब्द आदेशो भवतीति ततस्तस्य परमाम्रेडितमनुदात्तं चेत्याह ॥ यदि तर्हि न द्विशब्द आदेशो भवति के तर्हीदानीं द्वे भवतः । द्विशब्देन यदुच्यते । किं पुनस्तत् । द्विशब्दोऽयं संख्यापदं संख्यायाश्च संख्येयमर्थः संख्येये द्वे भविष्यतः । के पुनस्ते । पदे वाक्ये मात्रे वा । तद्यदा तावत्पदे वाक्ये वा तदानेकाल्त्वात्सर्वादेशः सिद्धः । यदा मात्रे अपि तदानेकाल्शित्सर्वस्य [ १.१ ५५] इति सर्वादेशो भविष्यति ॥ यदा तर्ह्यर्धमात्रे तदा सर्वादेशो न सिध्यति । नैष दोषः ।

---

नित्य या अर्थी आणि वीप्सा या अर्थी असा दोन अर्थांचा हा सूत्रकारांनीं निर्देश केला आहे.

अन्त्य वर्णाला द्वित्व होऊं नये याकरितां सूत्रामध्यें सर्व शब्द घालण्याचें कारण नाहीं.

अगोदर असा येथे एक प्रश्न उद्भवतो कीं नित्य आणि वीप्सा हे अर्थ गम्यमान असतांना द्वे होतात असें सूत्रांत म्हटलें आहे. तेव्हां तेथें द्वि हा शब्दच आदेश का बरें होत नाहीं ?

याचें उत्तर असें कीं द्वि हा शब्द आदेश होत नाहीं याविषयीं आचार्यांची प्रवृत्ति ज्ञापक आहे. असें पहा कीं या सूत्राच्या पुढें हा आचार्य पाणिनि 'त्याच्या पुढील भागाला आम्रेडित असें म्हणावें (८।१।२) व तो भाग अनुदात्त करावा' (८।१।३) असें सांगतो.

हे ज्ञापक कसें बरें जमतें ?

द्वि हा एकाच् असा एकच शब्द आहे तेव्हा तो एकच असल्यामुळें 'त्याच्या पुढील भागाला आम्रेडित म्हणावें व तो भाग अनुदात्त करावा' हें म्हणणें जमत नाहीं. तेव्हां अर्थातच आचार्य पाणिनि असें मानतो कीं 'द्वि हा शब्द आदेश होतो' असा द्वे याचा अर्थ नव्हे. म्हणूनच 'त्याच्या पुढील भागाला आम्रेडित म्हणावें व तो भाग अनुदात्त करावा' असें तो म्हणतो.

जर द्वि हा शब्द आदेश होत नाहीं तर आतां द्वे म्हणजे दोन असे कोण होतात ?

द्वि शब्दानें जे सांगितले ते होतात.

कोण बरें तें द्वि शब्दानें सांगितले आहेत ?

द्वि शब्द हें संख्यादर्शक पद आहे. अशा पदांचा 'तितक्या संख्येनें युक्त' असा अर्थ असतो. तेव्हां त्या संख्येने युक्त म्हणजे दोन होतील.

ते दोन कोण ?

पदें, वाक्यें किंवा मात्रा, त्यापैकीं पदें किंवा वाक्यें जेव्हां घातलीं जातील तेव्हां अनेकाल् असल्यामुळें सर्वाला आदेश सिद्ध होतो;[११] जेव्हां मात्रा घेतल्या जातील तेव्हा देखील 'अनेकाल्शित्सर्वस्य' ( १।१।५५ ) या परिभाषेनें सर्वाला आदेश होतो.

द्वे या शब्दानें जर दोन अर्धमात्रा घेतल्या तर मात्र सर्वाला आदेश सिद्ध होणार नाहीं. पण

---

७. जर नित्य आणि वीप्सा या दोन शब्दांचा अशा अर्थाचा निर्देश सूत्रकारानें केला असता तर 'परेर्वर्जने' या सूत्रांतील परेः या शब्दाप्रमाणें नित्यवीप्सयोः ही षष्ठी मानतां आली असती. अर्थाचा निर्देश ज्या ठिकाणीं केला असतो त्या ठिकाणीं सप्तमीच विभक्ति घ्यावी लागते

८. 'द्वे' या शब्दानें ज्याचें विधान केलें आहे त्याच्या.

९. म्हणजे अर्थातच त्यांत दोन भाग नसल्यामुळें.

१० अनेकाल्शित्सर्वस्य ( १।१।५५ ) हें सूत्र पहा.

११. तेव्हां अर्थातच शेवटच्या वर्णाला द्वित्वाची प्राप्ति येत नसल्यामुळें सूत्रामध्यें सर्व शब्दाचा उपयोग नाहीं.

न चार्धमात्रे द्विरुच्येते । किं कारणम् । इह व्याकरणे यः सर्वोल्पीयान् स्वरव्यवहारः स मात्रया भवति नार्धमात्रया व्यवहारोऽस्ति । तेनार्धमात्रे न भविष्यतः ॥ एवमपि कुत एतत्पदे द्वे भविष्यत इति न पुनर्वाक्ये स्यातां मात्रे वा। नित्यवीप्सयोर्द्वे भवत इत्युच्यते न च वाक्यद्विर्वचनेन मात्राद्विर्वचनेन वा नित्यता वीप्सा वा गम्यते ॥

षष्ठीनिर्देशार्थमेव तर्हि सर्वग्रहणं कर्तव्यम् ।

**न वा पदाधिकारात् ॥ ४ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । पदाधिकारात् । पदस्येति प्रकृत्य द्विर्वचनं वक्ष्यामि॥

**तच्च समासतद्धितवाक्यनिवृत्त्यर्थम् ॥ ५ ॥**

तच्चावश्यं पदग्रहणं कर्तव्यं समासनिवृत्त्यर्थं तद्धितनिवृत्त्यर्थं वाक्यनिवृत्त्यर्थं च । समासनिवृत्त्यर्थं तावत् । सप्तपर्णः अष्टापदम् । तद्धितनिवृत्त्यर्थम् । द्विपदिका त्रिपदिका । माषशः कार्षापणशः । वाक्य-

---

हाही दोष येत नाहीं. तेथेंही सर्वाला आदेश सिद्ध होतो. अर्धमात्रेचें दोनदां उच्चारणच संभवत नाहीं.

कां बरें ?

या व्याकरणामध्यें जो कांहीं थोडा बहुत 'स्वर' असा व्यवहार होत आहे तो मात्रेनेंच होत आहे; अर्धमात्रेनें कोठेंही व्यवहार होत नाहीं. तेव्हां दोन अर्धमात्रा होणारच नाहींत.

तरी पण येथें दोन पदेंच कां होतात, दोन वाक्यें किंवा दोन मात्रा कां होत नाहींत ?

नित्य आणि वीप्सा हे अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें असें सांगितलें आहे. आणि सबंध वाक्याला किंवा फक्त एका मात्रेला द्वित्व केलें असतां तेथें नित्य किंवा वीप्सा हे अर्थ प्रतीत होण्याचा मुळींच संभव नाहीं.[१२]

तर मग षष्ठी विभक्तीच्या निर्देशाकरितांच या सूत्रांत सर्व शब्द घातला पाहिजे.

(वा. ४) अथवा त्याकरितांही सर्व शब्दाचा उच्चार करावयास नको.

कां बरें ?

पदाधिकार आहे म्हणून. पदस्य असा अधिकार करून द्वित्व सांगतों.[१३]

(वा. ५) आणि तें पदग्रहण तर समास, तद्धित आणि वाक्य यांच्या निवृत्तीकरितां अवश्यच केलें पाहिजे. त्यांपैकीं समासाच्या निवृत्तीचें उदाहरणः—सप्तपर्णः[१४] अष्टापदम्. तद्धिताच्या निवृत्तीचें उदा० द्विपदिका[१५], त्रिपदिका, माषशः, कार्षापणशः. वाक्याच्या निवृत्तीचें

---

१२. तेव्हां अर्थात् पदालाच द्वित्व होत असल्यामुळें त्याकरितां सूत्रामध्यें सर्व शब्द घालण्याचें कारण नाही.

१३. सूत्रांतील सर्वस्य हा शब्द काढून त्याच्या ऐवजी 'पदस्य' असें म्हणावें, असा अभिप्राय आहे.

१४. सप्तपर्णः, अष्टापदम्. येथें पुढील प्रथमाविभक्तीचा प्रत्यय सोडून त्याच्या मागील सप्तपर्ण, अष्टापद, या भागाला द्वित्व न व्हावें याकरितां पदस्य हा अधिकार केला पाहिजे. पद ही संज्ञा विभक्तिप्रत्ययान्ताला आहे, नुसत्या प्रत्ययाच्या मागील भागाला नाही. सर्वस्य असे म्हटले तरी हा दोष कायमच राहील. याकरितां पदस्य असेंच म्हटलें पाहिजे.

१५. द्विपाद, त्रिपाद, माष, कार्षापण, या शब्दांच्या पुढें वीप्सा या अर्थी तद्धित प्रत्यय (५।४।१४३) लागण्याच्या पूर्वींच नुसत्या प्रकृतिभागाला द्वित्व होईल, तें न व्हावें याकरितां 'पदस्य' असा अधिकार केला पाहिजे.

निवृत्त्यर्थम् । ग्रामे ग्रामे पानीयम् । माषं माषं देहि ॥

अथ क्रियमाणेऽपि वै पदग्रहणे समासनिवृत्त्यर्थमिति कथमिदं विज्ञायते । समासस्य निवृत्त्यर्थं समासनिवृत्त्यर्थमिति । आहोस्वित्समासे निवृत्त्यर्थं समासनिवृत्त्यर्थमिति । किं चातः । यदि विज्ञायते समासस्य निवृत्त्यर्थं समासनिवृत्त्यर्थमिति सिद्धं सप्तपर्णः सप्तपर्णौ सप्तपर्णा इति सप्तपर्णाभ्याम् सप्तपर्णेभ्य इत्यत्र प्राप्नोति । अथ विज्ञायते समासे निवृत्त्यर्थं समासनिवृत्त्यर्थमिति सप्तपर्णः सप्तपर्णौ सप्तपर्णा इत्यत्रापि प्राप्नोति ॥ तथा तद्धितनिवृत्त्यर्थमिति कथमिदं विज्ञायते । तद्धितस्य निवृत्त्यर्थं तद्धितनिवृत्त्यर्थमिति । आहोस्वित्तद्धिते निवृत्त्यर्थं तद्धितनिवृत्त्यर्थमिति । किं चातः । यदि विज्ञायते तद्धितस्य निवृत्त्यर्थं तद्धितनिवृत्त्यर्थमिति सिद्धं द्विपदिकाः त्रिपदिकाः द्विपदिकाभ्याम् त्रिपदिकाभ्याम् माषशः कार्षापणश इत्यत्र प्राप्नोति । अथ विज्ञायते तद्धिते

---

उदा० [16]ग्रामे ग्रामे पानीयम्, माषं माषं देहि.

[17]आतां पदग्रहण केलें तरी तेथें 'समासनिवृत्त्यर्थम्' असें जें म्हटलें आहे तेथें 'समासनिवृत्त्यर्थं' याचा अर्थ कसा समजावा? 'समासाला द्वित्व न व्हावें याकरितां' असा समजावा किंवा 'समासामध्यें द्वित्व न व्हावें याकरितां' असा समजावा?

काय बरें या दोन अर्थांमध्यें फरक आहे?

फरक असा कीं, जर 'समासाला द्वित्व न व्हावें याकरितां' असा अर्थ केला तर सप्तपर्णः, सप्तपर्णौ, सप्तपर्णाः हीं उदाहरणें सिद्ध होतात. पण सप्तपर्णाभ्याम्, सप्तपर्णेभ्यः या उदाहरणांमध्यें द्वित्व [18]प्राप्त होतें. आतां जर 'समासामध्यें द्वित्व न व्हावें याकरितां' असा अर्थ केला तर सप्तपर्णः, सप्तपर्णौ, सप्तपर्णाः, या उदाहरणांमध्येंही द्वित्व [19]प्राप्त होतें.

तसेंच 'तद्धितनिवृत्त्यर्थं' असें जें म्हटलें आहे तेथें त्याचा अर्थ कसा समजावा? 'तद्धितप्रत्ययान्ताला द्वित्व न व्हावें याकरितां' असा समजावा किंवा 'तद्धित प्रत्यय पुढें असतांना पूर्वभागाला द्वित्व न व्हावें याकरितां' असा समजावा?

काय बरें या दोन अर्थांमध्यें फरक आहे?

फरक असा कीं जर 'तद्धितप्रत्ययान्ताला द्वित्व न व्हावें याकरितां' असा अर्थ केला तर द्विपदिकाः त्रिपदिकाः हीं उदाहरणें [20]सिद्ध होतात. पण द्विपदिकाभ्याम्, त्रिपदिकाभ्याम्, माषशः, कार्षापणशः, या उदाहरणांमध्यें द्वित्व [21]प्राप्त होतें.

---

१६. 'ग्रामे पानीयम्' या वाक्याला द्वित्व न व्हावें याकरितां 'पदस्य' असा अधिकार केला पाहिजे.

१७. पदस्य असा अधिकार केला तरी त्यानें सर्व इष्ट सिद्ध होत नाही, असें येथून भाष्यकार प्रतिपादन करीत आहेत.

१८. या ठिकाणी 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' (१।४।१७) या सूत्रानें प्रत्यय सोडून नुसत्या पूर्वभागाला पद संज्ञा होत आहे. तेव्हां पदस्य असा अधिकार केला तरी येथें सप्तपर्ण या समासाला द्वित्व प्राप्त होतें, असा दोष येतो.

१९. समासांतील सप्त या शब्दाला 'सुप्तिङन्तं पदम्' (१।४।१४) या सूत्रानें पदसंज्ञा होत असल्यामुळें द्वित्व प्राप्त होतें, असा दोष येतो.

२०. द्विपदिकाः या पदापैकीं शेवटच्या विसर्गाच्या पूर्वीचा जो 'द्विपदिका' हा तद्धितप्रत्ययान्त भाग त्याला पद ही संज्ञा नसल्यामुळें त्याला द्वित्व होत नाहीं.

२१. भ्याम् किंवा शस् अशा प्रकारचे हलादि प्रत्यय पुढें असतांना त्याच्या मागील भागाला

निवृत्त्यर्थं तद्धितनिवृत्त्यर्थमिति द्विपदिकाः त्रिपदिका इत्यत्रापि प्राप्नोति ॥ तथा वाक्यनिवृत्त्यर्थमिति कथमिदं विज्ञायते। वाक्यस्य निवृत्त्यर्थं वाक्यनिवृत्त्यर्थमिति । आहोस्विद्वाक्ये निवृत्त्यर्थं वाक्यनिवृत्त्यर्थमिति । किं चातः । यदि विज्ञायते वाक्यस्य निवृत्त्यर्थं वाक्यनिवृत्त्यर्थमिति यदि वाक्यं वीप्सायुक्तं भवितव्यमेव द्विर्वचनेन । अथाप्यवयवो भवत्येव ॥ तदेतत्क्रियमाणेऽपि पदग्रहण आलूनविशीर्णं भवति। किंचित्संगृहीतं किंचिदसंगृहीतम् ॥

## सगतिग्रहणं च ॥ ६ ॥

सगतिग्रहणं च कर्तव्यम् । प्रपचति प्रपचति । प्रकरोति प्रकरोतीति। किं पुनः कारणं न सिध्यति। न हि सगतिकं पदं भवति ॥

समासनिवृत्त्यर्थेन तावन्नार्थः पदग्रहणेन। समासेनोक्तत्वाद्वीप्साया द्विर्वचनं न भविष्यति। किं च भोः समासो वीप्सायामित्युच्यते । न खलु वीप्सायामित्युच्यते । गम्यते तु सोऽर्थः । तत्रोक्तः समासेनेति कृत्वा द्विर्वचनं न भविष्यति । यत्र च

---

आतां जर 'तद्धित प्रत्यय पुढें असतांना पूर्वभागाला द्वित्व न व्हावें याकरितां' असा अर्थ घेतला तर द्विपदिकाः, त्रिपदिकाः, या उदाहरणांमध्येंही द्वित्व प्राप्त[२२] होतें.

तसेंच 'वाक्यनिवृत्त्यर्थं' असें जें म्हटलें आहे त्याचा अर्थ कसा समजावा? 'वाक्याला द्वित्व न व्हावें याकरितां' असा समजावा किंवा 'वाक्यामध्यें द्वित्व न व्हावें याकरिता' असा समजावा?

काय बरें या दोन अर्थांमध्यें फरक आहे?

फरक असा कीं जर 'वाक्याला द्वित्व न व्हावें याकरितां' असा अर्थ केला तर वाक्याचा अर्थ वीप्सेनें युक्त असल्यास तेथें द्वित्व झालेंच पाहिजे.[२३] आतां वाक्यार्थाचा एकादा भाग वीप्सेनें युक्त असला तर तेथें द्वित्व होणारच. एकंदरींत पदग्रहण केलें तरी कांहीं तुटतें, कांहीं विस्खलित होतें; कारण कांहींचा संग्रह होतो व कांहींचा संग्रह होत नाहीं.

(वा. ६) शिवाय, पदग्रहण केलें असतां गतिसहिताला द्वित्व होतें असें स्वतंत्र म्हणावें लागेल; उदा० प्रपचतिप्रपचति, प्रकरोतिप्रकरोति.

कोणत्या कारणानें बरें येथें द्वित्व सिद्ध होणार नाहीं?

कारण असें की गतिसहित पद होत नाहीं.[२४]

समासनिवृत्तीकरितां पदग्रहण करावयाला नको. कारण तेथें वीप्सा हा अर्थ समासानें उक्त होत असल्यामुळें त्या अर्थी पुनः द्वित्व होणार नाहीं.

काय हो, वीप्सा या अर्थी समास सांगितला आहे कीं काय?

वीप्सा या अर्थी सांगितला नाहीं हें खरें, परंतु तो वीप्सा हा अर्थ त्या ठिकाणीं भासतो.

मग भासला म्हणून काय झालें?

समासानेंच वीप्सा हा अर्थ दाखविला जात असल्यामुळें द्वित्व होणार नाहीं. ज्या ठिकाणीं

---

'स्वादिष्वसर्वनाम०' (१।४।१७) यानें पदसंज्ञा होते.

२२. इक हा तद्धित प्रत्यय सोडून त्याच्या मागील द्विपद या समासांतील पदाला 'सुप्तिङन्तं०' (१।४।१४)। या सूत्रानें पदसंज्ञा होत असल्यामुळें त्याला द्वित्व होईल असा दोष येतो.

२३. तेव्हां पदस्य असें पदग्रहण केलें तर येथें द्वित्व पाहिजे तें होणार नाही असा उलट दोष येतो.

२४. प्र हें पद निराळें व पचति हें पद निराळें अशी तेथें दोन पदें आहेत.

समासेनानुक्ता वीप्सा भवति तत्र द्विर्वचनम्। तद्यथा। एकैकविचिताः अन्योन्यसहाया इति। अथवा यदत्र वीप्सायुक्तं नादः प्रयुज्यते। किं पुनस्तत्। पर्वणि पर्वणि सप्त पर्णान्यस्य। पङ्क्तौ पङ्क्तावष्टौ पदान्यस्येति॥ तद्धितनिवृत्त्यर्थेन चापि नार्थः पदग्रहणेन। तद्धितेनोक्तत्वाद्वीप्साया द्विर्वचनं न भविष्यति। तद्धितः खल्वपि वीप्सायामित्युच्यते। यत्र च तद्धितेनानुक्ता वीप्सा भवति तत्र द्विर्वचनम्। तद्यथा। एकैकशो ददातीति॥ वाक्यनिवृत्त्यर्थेन चापि नार्थः पदग्रहणेन। पदद्विर्वचनेनोक्तत्वाद्वीप्साया वाक्यद्विर्वचनं न भविष्यति। यत्र च पदद्विर्वचनेनानुक्ता वीप्सा भवति तत्र द्विर्वचनम्। तद्यथा। प्रपचति प्रपचति। प्रकरोति प्रकरोतीति॥

उत्तरार्थं तर्हि पदग्रहणं कर्तव्यम्। तस्य परमाम्रेडितमनुदात्तं च [ २; ३ ] इति वक्ष्यति तत्पदद्विर्वचने यथा स्याद्वाक्यद्विर्वचने मा भूत्। मह्यं ग्रहीष्यति मह्यं ग्रही-

---

समासानें वीप्सा अर्थ दाखविला जात नाहीं, त्या ठिकाणीं द्वित्व होतें; उदा० एकैकविचिताः[25] अन्योन्यसहायाः. अथवा सप्तपर्णः अष्टापदः या उदाहरणांमध्यें ज्या अर्थाला वीप्सेचा योग आहे तदर्थक शब्दाचा मुळीं प्रयोगच नाहीं.

तो अर्थ कोणता बरें ?

ज्याला पर्वापर्वा- ( पेऱ्यापेऱ्या )-मध्यें सात पानें आहेत. ज्याला पंक्तीपंक्तीमध्ये आठ पदें आहेत.[26]

तद्धितनिवृत्तीकरितां देखील पदग्रहण करावयाला नको. कारण वीप्सा हा अर्थ तद्धित प्रत्ययानें उक्त होत असल्यामुळें पुनः त्या अर्थी तेथें द्वित्व होणार नाहीं, आणि तद्धित प्रत्यय तर खरोखरच वीप्सा या अर्थी सांगितलाच आहे.[27] ज्या उदाहरणामध्यें तद्धित प्रत्ययानें वीप्सा हा अर्थ दाखविला जात नाहीं त्या उदाहरणामध्ये द्वित्व होतें; उदा० एकैकशो ददाति.[28]

तसेंच वाक्यनिवृत्तीकरितां देखील पदग्रहण करावयाला नको. पदाला केलेल्या द्वित्वानें वीप्सा हा अर्थ उक्त होत असल्यामुळें वाक्याला द्वित्व होणार नाहीं. ज्या उदाहरणामध्यें पदाला द्वित्व करून त्याच्या योगानें वीप्सा हा अर्थ दाखविला जात नाहीं त्या ठिकाणीं वाक्याला द्वित्व होतच असतें; उदा०— प्रपचतिप्रपचति,[29] प्रकरोतिप्रकरोति.

तर मग उत्तरसूत्राकरितां येथें पदग्रहण केलें पाहिजे. तस्य परमाम्रेडितम् ( ८।१।२ ), अनुदात्तं च ( ८।१।३ ), असें पुढें सांगितलें आहे. तेव्हां त्या सूत्रांनीं द्वित्व केल्यानंतर त्यांतील पुढील भागाला सांगितलेली आम्रेडित ही संज्ञा आणि अनुदात्त स्वर हे पदाला द्वित्व केलें असतां तेथेंच झाले पाहिजेत, वाक्याला द्वित्व

---

२५. एकेकानें वेचलेले कण वगैरे. या ठिकाणी एक या अर्थाची वीप्सा आहे. त्या वीप्सेचा बोध ' एकविचिताः' या समासापासून होत नाही. तसेंच ' अन्यसहायाः ' या समासापासून ' एकमेकाला ' असा अन्य शब्दार्थाच्या वीप्सेचा बोध होत नाही.

२६. येथें पर्व आणि पंक्ति या अर्थाची वीप्सा आहे, आणि त्या शब्दांचा तर प्रयोगच नसल्यामुळें द्वित्वाची शंकाच येथें येत नाहीं.

२७. 'पादशतस्य०' ( ५।४।१ ) या सूत्रानें वुन् हा तद्धित प्रत्यय वीप्सा या अर्थी सांगितला आहे. तेव्हां 'उक्तार्थानामप्रयोगः' या न्यायानें तेथें द्वित्व होणार नाहीं.

२८. येथें एक शब्दाचा अल्प हा अर्थ आहे. 'बह्वल्पार्थां० ' ( ५।४।४२ ) या सूत्रानें शस् प्रत्यय केला आहे. तो वीप्सा या अर्थी केला नाही.

२९. तेव्हां पदग्रहण केलें असतां येथें 'प्रपचति' एवढ्याला द्वित्व होणार नाही असा उलट दोष येतो.

ष्यति। मामभिव्याहरिष्यति मामभिव्याहरिष्यति। कथं चात्र द्विर्वचनम्। छान्दसत्वात्। स्वरोऽपि तर्हि च्छान्दसत्वादेव न भविष्यति॥ उत्तरार्थमेव तर्हि पदग्रहणं कर्तव्यम्। पदस्य पदात् [१६; १७] इति वक्ष्यति तत्पदग्रहणं न कर्तव्यं भवति। सर्वग्रहणमपि तर्ह्युत्तरार्थम्। अनुदात्तं सर्वमपादादौ [१८] इति वक्ष्यति तत्सर्वग्रहणं न कर्तव्यं भवति॥ उभयं क्रियते तत्रैव॥

इहार्थमेव तर्हि षष्ठीनिर्देशार्थमन्यतरत्कर्तव्यम्। षष्ठीनिर्दिष्टस्य स्थाने द्विर्वचनं यथा स्याद् द्विःप्रयोगो मा भूदिति। किं च स्यात्। आं पचसि पचसि देवदत्ता३ आम एकान्तरमामन्त्रितमनन्तिके [५५] इत्येकान्तरता न स्यात्। इह च पौनःपुन्यम् पौनःपुनिकमित्यप्रातिपदिकत्वात्तद्धितोत्पत्तिर्न स्यात्॥

केलें असतां तेथें होऊ नयेत; उदा० मह्यं ग्रहीष्यति मह्यं ग्रहीष्यति, मामभिव्याहरिष्यति मामभिव्याहरिष्यति.

या उदाहरणांमध्यें कोणत्या सूत्रानें बरें द्वित्व झालें आहे?

छान्दस प्रयोग आहे म्हणून द्वित्व झालें आहे.

तर मग येथें अनुदात्त स्वर देखील छान्दस प्रयोग आहे म्हणूनच होणार नाहीं.

तरी पण पुढील सूत्रामध्यें संबंध होण्याकरितांच येथे पदग्रहण केलें पाहिजे. 'पदस्य' (८।१।१६) 'पदात्' (८।१।१७) असें पुढें सांगितलें आहे. येथें पदग्रहण केलें म्हणजे तें पुढील पदग्रहण करावयास नको. तर मग सर्वग्रहण देखील पुढील सूत्रामध्यें संबंध होण्याकरितांच येथें केलें पाहिजे. 'अनुदात्तं सर्वमपादादौ' (८।१।१८) असे पुढें सांगितलें आहे. येथें सर्वग्रहण केलें म्हणजे त्या पुढील सूत्रात सर्वग्रहण करावयास नको. तर मग दोन्ही शब्द पुढें केले आहेत तेथेंच ते असूं देत.

तरी पण इथल्याकरितां म्ह० षष्ठीनिर्देशाकरिता दोहोंपैकीं कोणतें तरी एक केलें पाहिजे. कारण षष्ठी विभक्ति लावून जो शब्द उच्चारला असेल त्याचे स्थानीं आदेश द्वित्व झालें पाहिजे. नुसता त्याचा दुसऱ्यानदा प्रयोग होऊ नये.

नुसतां दुसऱ्यानदा शब्द उच्चारला तर काय बरें होईल?

आम् पचसि पचसि देवदत्त३ या उदाहरणामध्यें 'आम एकान्तरमामन्त्रितमनन्तिके' (८।१।५५) या सूत्राच्या उपयोगीं पडणारें जें एका पदानें व्यवधान तें धरलें जाणार नाहीं.[३०]

तसेंच पौनःपुन्यम्, पौनःपुनिकः, या उदाहरणांमध्यें पुनः पुनः या दोन शब्दांना मिळून प्रातिपदिक संज्ञा नसल्यामुळें त्याहून तद्धिताची उत्पत्ति होणार नाहीं.[३१]

---

३०. मूळचें जें 'पचसि' असें क्रियापद आहे तें काढून त्याच्या जागीं 'पचसिपचसि' असा आदेश करणें याला स्थानेद्विर्वचन म्हणतात. तेव्हां 'पचसिपचसि' हें एकच पद असल्यामुळें आम् याच्या पुढें देवदत्त३ हें आमन्त्रित एकाच पदानें व्यवहित होतें म्हणून येथें 'आम एकान्तर०' या सूत्रानें देवदत्त३ याला अनुदात्त स्वराचा निषेध होतो. आतां मूळचे जे 'पचसि' हे क्रियापद आहे तें कायम ठेवून त्याच्यापुढें तसेच पुनः उच्चारणें याला द्विःप्रयोग द्विर्वचन म्हणतात. तेव्हां पहिले पचसि आणि दुसरें पचसि अशी दोन पदें होत असल्यामुळे आम् याच्या पुढें देवदत्त हें आमन्त्रित दोन पदाने व्यवहित होतें. तेव्हां तेथें 'आम एकान्तर०' या सूत्राने अनुदात्त स्वराचा निषेध होणार नाहीं.

३१. पौनःपुन्य यामध्यें पुनःपुनः या प्रातिपादि-

यदि तर्हि स्थाने द्विर्वचनं राजा राजा वाग्वाक् पदस्येति नलोपादीनि न सिध्यन्ति। इदमिह संप्रधार्यम्। द्विर्वचनं क्रियतां नलोपादीनीति किमत्र कर्तव्यम्। परत्वान्नलोपादीनि। पूर्वत्रासिद्धे नलोपादीनि सिद्धासिद्धयोश्च नास्ति संप्रधारणा। एवं तर्हि पूर्वत्रासिद्धीयमद्विर्वचन इति वक्ष्यामि। तच्चावश्यं वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। विभाषिताः प्रयोजयन्ति। द्रोग्धा द्रोग्धा। द्रोढा द्रोढेति॥ इह तर्हि बिसं बिसम् मुसलं मुसलम् आदेशप्रत्यययोः

आतां जर स्थानेद्विर्वचन घेतलें तर राजाराजा, वाक्वाक्, या उदाहरणांमध्यें पदाला सांगितलेलीं नलोप वगैरे कार्यें पूर्वभागीं होणार नाहींत.[३२]

येथें असा विचार करावा कीं येथें अगोदर द्वित्व करावें कीं अगोदर नलोप वगैरे कार्यें करावीं.

मग येथें काय बरें करावें ?

नलोप वगैरे कार्यें पर असल्यामुळें अगोदर करावीं.

पण पूर्वशास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध (८।२।१) अशा त्रिपादीमध्यें नलोप वगैरे कार्यें सांगितलीं आहेत, आणि सिद्ध व असिद्ध यांची तर बरोबरी लागत नाहीं.

तर मग '[३३]पूर्वत्रासिद्धीयमद्विर्वचने' असें सांगणार आहे, आणि तें तर अवश्य सांगितलेंच पाहिजे.

काय बरें त्या वचनाचा उपयोग ?

वैकल्पिक कार्यें त्याच्या उपयोगांत येतात; उदा० द्रोग्धा[३४]द्रोग्धा, द्रोढाद्रोढा. तर मग बिसंबिसम्, मुसलमुसलम्, या उदाहरणांमध्यें

---

काच्या पुढें य हा तद्धित प्रत्यय झाला आहे. तसें पौनःपुनिकः यामध्यें इक हा तद्धित प्रत्यय झाला आहे. पुनः पुनः भावः पौनःपुन्यम्, पुनः पुनः भवः पौनःपुनिकः, द्विःप्रयोगरूप द्विर्वचन घेतले असतां एका 'पुनः' याच्या पुढें तसाच दुसरा 'पुनः' हा शब्द उच्चारला जातो. तेव्हां अर्थातच तेथे प्रत्येकाला प्रातिपदिकसंज्ञा आहे; दोघांना मिळून नाही.

३२. द्वित्व केल्यानंतर प्रत्येकाला पदसंज्ञा नसल्यामुळे पूर्वभागी राजा येथें नलोप होणार नाही. व वाक् येथे कुत्व होणार नाहीं.

३३. द्वित्वाशिवाय बाकीच्या पूर्वशास्त्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध आहे, असा त्या वचनाचा अर्थ आहे. तेव्हां येथें द्वित्वाच्या दृष्टीनें नलोप वगैरे कार्यें सिद्धच असल्यामुळें द्वित्वाशीं त्यांची बरोबरी लागते, व परत्वास्तव तीं कार्यें द्वित्वाच्या अगोदर होतात; म्हणून येथें कांही दोष नाहीं.

३४. 'वा द्रुहमुह०' (८।२।३३) या सूत्रानें द्रुह धातूच्या हकाराला घत्व विकल्पानें सांगितले आहे. घत्व केलें म्हणजे द्रोग्धा असें रूप होते. घत्व केले नाहीं म्हणजे 'हो ढः' (८।२।३१) या सूत्रानें हकाराला ढत्व होऊन द्रोढा असे रूप होते. 'पूर्वत्रासिद्धीय०' हें वचन जर घेतले नाही तर द्रोह्+ता अशी स्थिति असतांना घत्व, ढत्व, ही त्रिपादीतील कार्यें द्वित्वाच्या दृष्टीनें असिद्ध असल्यामुळें त्यांच्या अगोदर द्वित्व होऊन द्रोह्+ता–द्रोह्+ता असे होईल. नंतर तेथें घत्व वैकल्पिक असल्यामुळे दोहोकडे होईलच असें नियमानें सांगतां येणार नाही. तेव्हां कदाचित् पूर्वभागींच फक्त घत्व केलें तर 'द्रोग्धा–द्रोढा' असें भलतेंच रूप होईल. तसेंच कदाचित् फक्त उत्तरभागींच घत्व केलें तर 'द्रोढा-द्रोग्धा' असें भलतें रूप होईल. याकरितां 'पूर्वत्रासिद्धीय०' हें वचन मानलें पाहिजे. वचन घेतलें असतां घत्व, ढत्व, ही त्रिपादीतील कार्यें द्वित्वाच्या अगोदर होतात व नंतर द्वित्व होऊन 'द्रोग्धा-द्रोग्धा' आणि 'द्रोढा–द्रोढा' अशींच रूपें होतात.

[८. ३. ५९] इति षत्वं प्राप्नोति । आदेशो यः सकारः प्रत्ययो यः सकार इत्येवमेतद्विज्ञायते ॥ इह तर्हि नृभिर्नृभिः रषाभ्यां नो णः समानपदे [८. ४. १] इति णत्वं प्राप्नोति । समानपद इत्युच्यते समानमेव यन्नित्यं न चैतन्नित्यं समानपदमेव । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । समानग्रहणसामर्थ्यात् । यदि हि यत्समानं चासमानं च तत्र स्यात्समानग्रहणमनर्थकं स्यात् ॥

अथवा पुनरस्तु द्विःप्रयोगो द्विर्वचनम् । ननु चोक्तमां पचसि पचसि देवदत्ता३ आम एकान्तरमामन्त्रितमनन्तिक इत्येकान्तरता न प्राप्नोतीति । नैष दोषः । सुप्तिङ्भ्यां पदं विशेषयिष्यामः । सुप्तिङन्तं पदम् [१.४.१४] । यस्मात्सुप्तिङ्विधिस्तदादि सुप्तिङन्तं च । ननु

---

'आदेशप्रत्यययोः' (८।३।५९) या सूत्रानें षत्व प्राप्त[35] होतें.

आदेश[36] जो सकार त्याप्रमाणेंच प्रत्यय जो सकार असेल त्याला तें सांगितलें आहे. तरी पण नृभिर्नृभिः या उदाहरणामध्यें 'रषाभ्यां नो णः समानपदे' (८।४।१) या सूत्रानें सांगितलेलें णत्व प्राप्त[37] होतें.

समानपदे असें तेथें म्हटलें आहे, त्याचा अर्थः--जें कायमचेंच समान[38] आहे, आणि नृभिर्नृभिः हें तर कायमचें समान नव्हे.

कसें बरें असें बोलावें ? असें बोलूं नये. जें सूत्रांत सांगितलें नाहीं तें कसें बरें घेतां येईल ?

सूत्रांतील 'समान' या शब्दाच्या जोरावर घेतां येईल. कारण जें पद समान आहे आणि असमानही आहे त्या ठिकाणीं जर णत्व होईल तर सूत्रांतील समानशब्द निरुपयोगी होणार आहे[39].

अथवा हें द्वित्व द्विःप्रयोगरूपच असूं दे.

आम् पचसि पचसि देवदत्त३ या उदाहरणामध्यें 'आम एकान्तरमामन्त्रितमनन्तिके' (८।१।५५) या सूत्राच्या उपयोगीं पडणारें जें एका पदानें व्यवधान तें धरलें जाणार नाहीं, असा या पक्षावर दोष आतांच सांगितला आहे ना ?

हा दोष येत नाहीं.

अशा विशेष ठिकाणीं सुप् आणि तिङ् यांच्यामुळें पदसंज्ञा साधतां येईल. सुप्तिङन्त पद होतें. म्हणजे ज्याहून सुप् तिङ् प्रत्यय केले जातात त्यापासून त्या सुप् तिङ् प्रत्ययांपर्यंत जेवढा भाग होईल तेवढ्याला

---

३५. कारण स्थानेद्विर्वचन पक्षीं एका 'बिसम्' याचे स्थानी 'बिसंबिसम्' असा आदेश होत असल्यामुळें त्यांतील सकार हा आदेशापैकी सकार होत आहे.

३६. फक्त सकारच ज्या ठिकाणी आदेश होत असेल तेथेंच त्या सूत्रानें षत्व होते.

३७. कारण, स्थानेद्विर्वचनपक्षीं एका 'नृभिः' याचे स्थानी 'नृभिर्नृभिः' असा आदेश होत असल्यामुळें 'नृभिर्नृभिः' हें एकच पद होत आहे.

३८. कायमचेंच समान म्ह० मूळचेंच जें एक, म्हणजे अखण्ड.

३९. सूत्रामध्यें नुसतें 'पदे' इतकेंच म्हटलें तरी त्याचा 'एका पदामध्यें' असा अर्थ घेतां येईल आणि त्यामुळे 'हरये नमः' या ठिकाणी णत्व होणार नाहीं. असे असतांही ज्या अर्थी सूत्रकारांनी सूत्रामध्यें 'समान' हा शब्द अधिक घातला आहे त्याअर्थी तो शब्द कांहीं तरी अधिक अर्थ मनांत आणूनच घातला आहे, असें मानावें लागतें. तो अधिक अर्थ 'कायमचेंच समान' म्हणजे 'अखण्ड' होय.

चैकैकस्मादेवात्र सुप्तिङ्विधिः । समुदाये या वाक्यपरिसमाप्तिस्तया पदसंज्ञा । कुत एतत् । शास्त्राहानेः । एवं हि शास्त्रमहीनं भवति ॥ यदप्युच्यत इह पौनःपुन्यम् पौनःपुनिकमित्यप्रातिपदिकत्वात्तद्धितोत्पत्तिर्न प्राप्नोतीति मा भूदेवम् । समर्थादित्येवं भविष्यति । अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येवंजातीयकेभ्यस्तद्धितोत्पत्तिरिति यदयं कस्कादिषु कौतस्कुतशब्दं पठति ॥

[ [1]तस्य परमाम्रेडितम् ॥ ८।१।२ ॥
[1]अनुदात्तं च ॥ ८।१।३ ॥ ]

[1]नित्यवीप्सयोः ॥ ८ । १। ४ ॥

इह कस्मान्न भवति । हिमवान् [2]वाडवः पारियात्रः समुद्र इति । नित्ये द्वे भवत

पद म्हणतां[40] येतें.

तरी पण ज्या ठिकाणीं द्वित्व केलें जातें त्या ठिकाणीं प्रत्येकाहूनच सुप्-तिङ् प्रत्यय केले जातात ना ?

' समुदाये वाक्यपरिसमाप्तिः ' ह्या न्यायानें दोहोंना मिळून पदसंज्ञा[41] होते.

असें कशावरून ?

शास्त्राची हानि होत नाहीं म्हणून. समुदायाला पदसंज्ञा केली असतां शास्त्र सोडल्यासारखें होत नाहीं. आणखीही जे पूर्वी म्हटलें आहे की पौनःपुन्यम् पौनःपुनिकः या उदाहरणांमध्यें पुनःपुनः या दोन पुनः शब्दांना मिळून प्रातिपदिकसंज्ञा नसल्यामुळें त्याहून तद्धित प्रत्ययाची उत्पत्ति होणार नाहीं, तर ती तशी न होऊं दे. समर्थाहून[42] तद्धित प्रत्ययाची उत्पत्ति होते असें म्हटल्यानें होईल. अथवा ' अशा प्रकारच्या शब्दस्वरूपाहून तद्धित प्रत्यय होतो ' अशाविषयीं आचार्य पाणिनीची प्रवृत्तीच ज्ञापक आहे. असें पहा की, हा आचार्य पाणिनि कस्कादिगणामध्यें ' कौतस्कुत ' या शब्दाचा पाठ करतो[43].

( सू. ४ ) हिमवान्, वाडवः, पारियात्रः,

४०. ' पचसिपचसि ' येथें दोन पच् धातु आणि दोन सि हे तिङ् प्रत्यय आहेत. आतां जरी दुसरा सि हा तिङ् प्रत्यय पहिल्या पच् धातूहून केला नाही तरी तो ज्याहून म्ह० दुसऱ्या पच् धातूहून केला आहे तो दुसरा पच् धातु पहिलाच पच् धातु पुनः उच्चारला असल्यामुळें त्या पहिल्या पच् धातूहून देखील दुसरा सि हा तिङ्-प्रत्यय केल्यासारखा होतो, त्यामुळें ' पचसिपचसि ' एवढ्या समुदायाला पदसंज्ञा करतां येते.

४१. ज्या ठिकाणी प्रत्येकाला कार्य प्राप्त होतें त्या ठिकाणी तें कार्य समुदायाला करतां येईल तर प्रत्येकाला निरनिराळें न करतां समुदायाला करावें. असें समुदायाला कार्य केले असतां प्रत्येक हे त्या समुदायाच्या पोटांत असल्यामुळें त्या प्रत्येकालाही तें कार्य केल्यासारखें होतें. तेव्हां शास्त्राचा त्याग केला असें होत नाहीं.

४२. समर्थ म्हणजें अन्वययोग्य शब्दस्वरूप.

४३ कुतः शब्दाला द्वित्व करून कुतःकुतः असें होते. त्याहून तद्धित प्रत्यय अण् करून कौतःकुतः असें होते. तेथे त्या मधील विसर्गाला सत्व व्हावें म्हणून कौतस्कुतः असा शब्द कस्कादिगणामध्यें घातला आहे. जर कुतःकुतः हे प्रातिपदिक नसल्यामुळे त्याहून तद्धित प्रत्यय न होईल तर त्या गणामध्यें पाठाचा कांहीं उपयोग सांगतां येणार नाही.

१. ( सू. २ ) द्वित्व केल्यानंतर त्यांतील पुढील भागाला आम्रेडित अशी संज्ञा होते.

१. ( सू. ३ ) द्वित्व केल्यानंतर त्यांतील पुढील भाग अनुदात्त होतो.

१. (सू. ४) पौनःपुन्य आणि वीप्सा हे अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें असा सूत्राचा अर्थ आहे.

२. डॉ. कीलहॉर्न यांचे प्रतींत खाण्डवः असा पाठ आहे.

इति प्राप्नोति ॥ नैष दोषः। अयं नित्यशब्दोऽस्त्येव कूटस्थेष्वविचालिषु भावेषु वर्तते। तद्यथा। नित्या द्यौः नित्या पृथिवी नित्यमाकाशमिति । अस्त्याभीक्ष्ण्ये वर्तते । तद्यथा। नित्यप्रहसितः नित्यप्रजल्पित इति। तद्य आभीक्ष्ण्ये वर्तते तस्येदं ग्रहणम् ॥

अथ किमिदं वीप्सेति । आप्नोतेरयं विपूर्वादिच्छायामर्थे सन्विधीयते। यद्येवं चिकीर्षति जिहीर्षतीत्यत्रापि प्राप्नोति। नैष दोषः। नैवं विज्ञायते वीप्सायामभिधेयायामिति । कथं तर्हि । कर्तृविशेषणमेतत् । वीप्सतीति वीप्सः । वीप्सश्चेत्कर्ता भवतीति ॥ कः पुनर्वीप्सार्थः। अनवयवाभिधानं वीप्सार्थः। अनवयवेन द्रव्याणामभिधानमेष वीप्सार्थः।

**अनवयवाभिधानं वीप्सार्थ इति चेज्जात्याख्यायां द्विर्वचनप्रसङ्गः ॥ १ ॥**

अनवयवाभिधानं वीप्सार्थ इति चेज्जात्याख्यायां द्विर्वचनं प्राप्नोति । व्रीहिभिर्यवैर्वेति ॥

---

समुद्रः या शब्दांना द्वित्व कां होत नाहीं ? 'नित्य हा अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें ' असें येथें सांगितलें असल्यामुळें द्वित्व प्राप्त[३] होतें.

हा दोष येत नाहीं. कायमचे जे अचल पदार्थ त्या अर्थी नित्य हा शब्द आहे हे खरें; उदा० पृथिवी नित्य आहे, आकाश नित्य आहे; पण तसाच आभीक्ष्ण्य या अर्थीही नित्य शब्द आहे. उदा० नित्य[४] हसतो, नित्य बडबडतो. तेव्हां जो हा आभीक्ष्ण्य या अर्थी नित्य शब्द आहे तो येथें सूत्रकारानीं घातला आहे.

आतां वीप्सा म्हणजे काय ? वीप्सा या शब्दामध्यें ' वि ' उपसर्गपूर्वक आप् धातूहून इच्छा या अर्थी सन् प्रत्यय केला आहे[५].

असेंच जर आहे तर चिकीर्षति, जिहीर्षति, या उदाहरणांमध्येंही द्वित्व प्राप्त[६] होतें.

हा दोष येत नाहीं. वीप्सा अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें, असा याचा अर्थ आम्ही समजत नाहीं.

तर मग कसा अर्थ ?

कर्त्याचें हें विशेषण आहे. वीप्सतीति वीप्सः अशी वीप्स शब्दाची व्युत्पत्ति आहे. कर्ता जर वीप्स[७] असेल तर द्वित्व होतें.

अशी वीप्सा येथें घेतली असतां काय बरें निष्पन्न होतें ?

द्रव्याचा साकल्यानें क्रिया गुण वगैरेंशीं संबंध दाखविणें हेंच येथे वीप्सा शब्दापासून निष्पन्न होतें.

( वा. १ ) 'साकल्यानें संबंध दाखविणें' हें जर वीप्साशब्दापासून निष्पन्न होत असेल तर जातीची आख्या असताना द्वित्व प्राप्त होतें;

---

३. हिमवान्, पारियात्र, हे कुलपर्वत तसेंच वाडवाग्नि आणि समुद्र हे पदार्थ यावच्चन्द्रदिवाकर कायम असल्यामुळें त्यांना नित्य हा शब्द लागतो. या अभिप्रायानें येथें द्वित्वाची शंका केली आहे.

४. वरचेवर हसतो; वरचेवर कांही तरी बडबड करीत असतो, असा अर्थ आहे; आभीक्ष्ण्य म्हणजे पौनःपुन्य.

५. तेव्हां ' कोणत्याही एकाद्या वस्तूला एकाद्या क्रियेने व्यापण्याची इच्छा करणें' असा वीप्सा शब्दाचा अर्थ होतो.

६. कारण उत्पत्तिक्रियेने किंवा संहारक्रियेनें कट ( चटई ) वगैरे एकाद्या वस्तूला व्यापण्याची इच्छा येथें गम्यमान होत आहे.

७. सगळ्यांशी संबंध व्हावा अशा इच्छेचा. वृक्षंवृक्षं सिञ्चति येथें सेचनक्रियेचा सगळ्या वृक्षांशीं संबंध प्रतीत होतो.

न वैकार्थत्वाज्जातेः ॥ २ ॥

न वैष दोषः । किं कारणम् । एकार्थत्वाज्जातेः । एकार्थो हि जातिः । एकमर्थं प्रत्याययिष्यामीति जातिशब्दः प्रयुज्यते ॥

अनेकार्थाश्रयत्वाच्च वीप्सायाः ॥३॥

अनेकार्थाश्रया च पुनर्वीप्सा । अनेकमर्थं संप्रत्याययिष्यामीति वीप्सा प्रयुज्यते । एकार्थत्वाज्जातेरनेकार्थाश्रयत्वाच्च वीप्साया जात्याख्यायां द्विर्वचनं न भविष्यति ॥

निवर्तकत्वाद्वा ॥ ४ ॥

अथवा नानेन द्विर्वचनं निर्वर्त्यते । किं तर्हि । अद्विर्वचनमनेन निवर्त्यते । यावन्तस्तेऽर्थास्तावतां शब्दानां प्रयोगः प्राप्नोति । तत्रानेन निवृत्तिः क्रियते । नित्यवीप्सयोरर्थयोर्द्वे एव शब्दरूपे प्रयोक्तव्ये नातिबहु प्रयोक्तव्यमिति ॥

सर्वपदसगतिग्रहणानर्थक्यं चार्थाभिधाने द्विर्वचनविधानात् ॥ ५ ॥

सर्वग्रहणं चानर्थकम् । किं कारणम् ।

---

उदा:० व्रीहि[८], यव.

( वा. २ ) हा दोष येत नाहीं.

काय बरें याचें कारण ?

जाति हा एकच अर्थ आहे. एकाच अर्थाची प्रतीति व्हावी या उद्देशानें जातिवाचक शब्दाचा प्रयोग केला जातो.

( वा. ३ ) आणि वीप्सेला तर अनेकार्थाश्रयत्व आहे, म्ह. वीप्सा ही अनेक अर्थावर अवलंबून असते. अनेक अर्थांची प्रतीति व्हावी या उद्देशानें वीप्साद्योतक अशा द्वित्वाचा प्रयोग केला जातो. एकंदरींत जाति हा एकच अर्थ असल्यामुळें आणि वीप्सा ही अनेक अर्थावर अवलंबून असल्यामुळें जातीची आख्या असतांना द्वित्व होणार नाहीं.

( वा. ४ ) अथवा हें सूत्र शब्दाचा दोन वेळ उच्चार करण्यास सांगत नाहीं; फक्त दोहोंपेक्षां ज्यास्त वेळां उच्चार करण्याचा निषेध करतें. कारण जितके पदार्थ वक्त्याला विवक्षित असतात तितके पदार्थ दाखविण्याकरितां तितक्या शब्दांचा प्रयोग प्राप्त होतो. तेव्हां तशा वेळीं या सूत्रानें ' नित्य आणि वीप्सा हे अर्थ गम्यमान असतां दोन वेळांच शब्दाचा प्रयोग करावा फार वेळां करूं नये, ' असें सांगून दोहोंपेक्षां जास्त वेळां शब्दांचा प्रयोग निवृत्त केला जातो.

( वा. ५ ) सर्व ग्रहण निरर्थक[१०] आहे.

कां बरें ?

---

८. जेव्हां एकाद्या तांदुळाच्या राशीला उद्देशून ' हा व्रीहि सुवासिक आहे ' असा प्रयोग केला जातो तेव्हां त्या एक जातीच्या तांदुळाच्या राशीतील सकल तांदुळांशी सुवासाचा संबंध प्रतीत होतो.

९. जर व्रीहिशब्दाचा ' एकेक तांदुळाचा दाणा ' असा अर्थ असता तर तशा तांदुळाच्या अनेक दाण्यांशी सुवासाचा संबंध प्रतीत होत असल्यामुळें वीप्सा गम्यमान होते असें म्हणतां आलें असतें. परंतु येथें व्रीहिशब्दाचा ' व्रीहीची एक जात ' असा अर्थ आहे, त्यामुळें त्या एकाच अर्थाशीं त्या सुगंधाचा संबंध प्रतीत होतो. तेव्हां येथें वीप्सा प्रतीत होत नाहीं असें सिद्ध झालें.

१०. ' नित्यवीप्सयोः ' या सूत्राचा 'द्वित्व करावें' असा अर्थ घेतला म्हणजे तें सर्व पदालाच व्हावें त्याच्या एकाद्या भागाला होऊं नये म्हणून सर्वस्य किंवा पदस्य असें म्हणावें लागतें. तसें गतीचा प्रयोग असतां तेथें नुसत्या क्रियापदाला द्वित्व होऊं नये म्हणून सगतिग्रहण करावें लागतें. आतां वक्ता हा 'अनेक अर्थांचें प्रतिपादन व्हावें ' या हेतूनें आपोआपच द्विरुच्चारण करील; परंतु तसेंच तीन वेळां किंवा त्यांहून जास्त वेळां देखील उच्चारण करील तें त्यानें न करावें याकरितां हें सूत्र

सर्वस्यैव हि द्विर्वचनेनार्थो गम्यते नावयवस्य । पदग्रहणं चानर्थकं पदस्यैव हि द्विर्वचनेनार्थो गम्यते नापदस्य । सगतिग्रहणं चानर्थकं सगतिकस्यैव हि द्विर्वचनेनार्थो गम्यते नागतिकस्य ॥

किं पुनरिदं वीप्सायां सर्वमभिधीयत आहोस्विदेकम् । कश्चात्र विशेषः ।

**वीप्सायां सर्वाभिधाने वचनाप्रसिद्धिः ॥ ६ ॥**

वीप्सायां सर्वाभिधाने वचनं न सिध्यति। ग्रामो ग्रामः । जनपदो जनपदः । बहवस्तेऽर्थास्तत्र बहुषु बहुवचनम् [ १.४.२१ ] इति बहुवचनं प्राप्नोति ॥ अस्तु तर्ह्येकम् ।

**एकाभिधानेऽसर्वद्रव्यगतिः ॥ ७ ॥**

एकाभिधाने सर्वद्रव्यगतिर्न सिध्यति ॥ अस्तु तर्हि सर्वम् । ननु चोक्तं वीप्सायां सर्वाभिधाने वचनाप्रसिद्धिरिति ।

**न वा पदार्थत्वात् ॥ ८ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । पदार्थत्वात् । पदस्यार्थो वीप्सा सुबन्तं च पदं

---

सर्वांचेंच द्विरुच्चारण केलें तर तसा अर्थ दाखविला जातो. अवयवाचें द्विरुच्चारण केलें असतां तसा अर्थ दाखविला जात नाहीं. तसेंच पदग्रहणही निरर्थक आहे. कारण पदाचेंच द्विरुच्चारण केलें असतां तसा अर्थ प्रतीत होतो. जें पद नव्हे त्याच्या द्विरुच्चारणानें तसा अर्थ प्रतीत होत नाहीं. तसेंच सगतिग्रहण देखील निरर्थक आहे. कारण गतिसहित अशाच क्रियापदाच्या द्विरुच्चारणानें तसा अर्थ प्रतीत होतो. गति सोडून गतीच्या जवळच्या क्रियापदाच्या द्विरुच्चारणानें तसा अर्थ प्रतीत होत नाहीं.

आतां येथें असा प्रश्न उद्भवतो कीं ज्या उदाहरणामध्यें वीप्सेची प्रतीति होते तेथें त्या शब्दानें सर्व पदार्थांचें प्रतिपादन केलें जातें किंवा एकाच पदार्थाचें प्रतिपादन केलें जातें.

काय बरें यांत फरक होईल ?

( वा. ६ ) वीप्सेच्या उदाहरणामध्यें शब्दानें त्या सर्व पदार्थांचें प्रतिपादन केलें तर वचन सिद्ध होत नाहीं; उदा० ग्रामोग्रामः, जनपदोजनपदः. ग्राम व जनपद हे पदार्थ बहुत असल्यामुळें ' बहुषु बहुवचनम् ' ( १।४।२१ ) या सूत्रानें बहुवचन प्राप्त[११] होतें.

तर मग एकाच पदार्थाचें प्रतिपादन केलें जातें असें मानूं या.

( वा. ७ ) शब्दानें एकाच पदार्थाचें प्रतिपादन केलें तर त्या सर्व पदार्थांचा बोध होणार नाहीं.

तर मग ' वीप्सेच्या उदाहरणामध्यें त्या सर्व पदार्थांचें प्रतिपादन केलें जातें ' असेंच असूं दे.

पण आतांच म्हटलें आहे कीं, वीप्सेच्या उदाहरणामध्यें सर्व पदार्थांचें प्रतिपादन केलें तर एकवचन सिद्ध होत नाहीं.

( वा. ८ ) हा दोष येत नाहीं.

कां बरें ?

पदार्थ आहे म्हणून. म्हणजे, या ठिकाणीं वीप्सायुक्त जो अर्थ तो पदाचा अर्थ आहे ( प्रातिपदिकाचा नव्हे ), पदसंज्ञा ही सुब-

---

केलें आहे असें मानलें म्हणजे सर्वग्रहण किंवा पदग्रहण व सगतिग्रहण करण्याचें कारणच नाहीं. कारण वक्ता हा आपले मनांतील अर्थांचा बोध व्हावा या हेतूनें शब्दोच्चार करीत असल्यामुळें सर्व पदांतील कांहीं भागाचें व गति सोडून तेथें नुसत्या क्रियापदाचें अनेक वेळां उच्चारण करणारच नाहीं.

११. ग्रामः जनपदः असा एकवचनान्त प्रयोग सिद्ध होणार नाहीं.

ङ्याप्प्रातिपदिकाच्चैकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते न चैतत्प्रातिपदिकम् । यत्तर्हि प्रातिपदिकम् । दृषद्दृषत् समित्समिदिति । एतदपि प्रत्ययलक्षणेन सुबन्तं न प्रातिपदिकम् ॥

अपर आह । न वा पदार्थत्वात् । न वैष दोषः । किं कारणम् । पदार्थत्वात् । पदस्यार्थो वीप्सा सुबन्तं च पदं ङ्याप्प्रातिपदिकाच्चैकत्वादिष्वर्थेषु स्वादयो विधीयन्ते न चैतत्प्रातिपदिकम् । यत्तर्हि प्रातिपदिकम् । दृषद्दृषत् समित्समिदिति । एतदपि प्रत्ययलक्षणेन सुबन्तं न प्रातिपदिकम् ॥

अथेह कथं भवितव्यम् । पचति पचतितरां तिष्ठति । आहोस्वित्पचतितरां पचतितरां

---

न्ताला होत असते, आणि एकत्व वगैरे संख्येला दाखविणारे सु वगैरे प्रत्यय हे तर ङ्यन्त, आबन्त आणि प्रातिपदिक यांहून सांगितले आहेत; आणि पद हें तर प्रातिपादिक नव्हे.[१२]

तर मग जेथें नुसतें प्रातिपदिकच शिल्लक राहतें, उदा०—दृषद्दृषत्, समित्समित्[१३], तेथें कसें ?

हें देखील प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) सुबन्त आहे म्हणून प्रातिपदिक नव्हे.[१४]

येथें दुसरे कोणी असें म्हणतात:—हा दोष येत नाहीं, कां बरें, तर पदार्थ आहे म्हणून. म्हणजे, या ठिकाणीं वीप्सायुक्त जो अर्थ तो पदाचा अर्थ आहे;[१५] पदसंज्ञा ही सुबन्ताला होत असते; आणि एकत्व वगैरे संख्येला दाखविणारे सु वगैरे प्रत्यय हे तर ङ्यन्त, आबन्त आणि प्रातिपादिक यांहून सांगितले आहेत; आणि ग्रामः हें तर प्रातिपदिक[१६] नव्हे.

तर मग ज्या ठिकाणीं नुसतें प्रातिपादिकच शिल्लक राहतें, उदा०—दृषद्दृषत्, समित्समित्, तेथें कसें ?

हें देखील संख्येला दाखविणारा प्रत्यय केला असल्यामुळें सुबन्तच आहे, प्रातिपदिक नव्हे.[१७]

आतां येथें कसा बरें प्रयोग व्हावा ? पचति[१८] पचतितरां तिष्ठति असा व्हावा किंवा पचतितरां पचतितरां तिष्ठति असा व्हावा ?

---

१२. ग्रामः या पदाचा अर्थ वीप्सायुक्त असल्यामुळें त्यावर जरी बहुत्व प्रतीत झाले तरी ' ग्रामः ' हें प्रातिपदिक नसल्यामुळे त्याहून बहुवचन होत नाही.

१३. येथें बहुवचन होईल असा दोष येतो.

१४. सुबन्त हें प्रत्ययान्त असल्यामुळे त्याला प्रातिपदिक संज्ञा ( १।२।४५ ) होत नाही.

१५. ज्याची संख्या प्रतीत झालेली असते असा जो अर्थ तो पदाचा अर्थ असतो.

१६. ज्या अर्थाची संख्या प्रतीत झालेली नाहीं अशा अर्थाचें बोधक.

१७ज्याची संख्या प्रतीत झालेली नसते त्याची संख्या दाखविण्याकरितां बहुवचन वगैरे प्रत्यय सांगितले आहेत. येथें ' ग्रामः ' या पदापासून एकत्वसंख्येनें युक्त असाच अर्थ प्रतीत होत असल्यामुळे त्याहून ' बहुवचन होईल ' असा दोष येत नाहीं.

१८. ' देवदत्त हा एकमारखी पचनक्रिया करीत असतो आणि ती पचनक्रिया अतिशयानें युक्त असते. म्हणजे कच्चेपणा मुळीच ठेवीत नाही, व करपूनही देत नाही, असें उत्तम अन्न तयार करतो ' असा अर्थ विवक्षित असतांना प्रयोग कसा होईल ? द्वित्व करून 'तरप्' प्रत्यय केला तर ' पचति पचतितराम् ' असें होईल व अगोदर 'तरप्' प्रत्यय करून द्वित्व केलें तर पचतितरां पचतितराम् असें होईल. एकसारखी हा अर्थ द्वित्वापासून प्रतीत होतो आणि अतिशय हा अर्थ तर प्रत्ययापासून प्रतीत होतो.

तिष्ठतीति। पचति पचतितरां तिष्ठतीति भवितव्यम्। कथम्। द्विर्वचनं क्रियतामातिशायिक इति द्विर्वचनं भविष्यति विप्रतिषेधेन। इहापि तर्ह्यातिशायिकाद् द्विर्वचनं स्यात्। आढ्यतरमाढ्यतरमानयेति। अस्त्यत्र विशेषः। अन्तरङ्ग आतिशायिकः। काऽन्तरङ्गता। ङ्याप्प्रातिपदिकादातिशायिकः पदस्य द्विर्वचनम्। आतिशायिकोऽपि नान्तरङ्गः। कथम्। समर्थात्तद्धितोऽसावुत्पद्यते सामर्थ्यं च सुबन्तेन। अथवा स्पर्धायामातिशायिको विधीयते न चान्तरेण प्रतियोगिनं स्पर्धा गम्यते॥ एवं तर्हीह द्वावर्थौ वक्तव्यौ नित्यवीप्से चातिशयश्च न चैकस्य प्रयोक्तुरनेकमर्थं युगपद्वक्तुं संभवोऽस्ति। तदेतत्प्रयोक्तर्यधीनं भवति। एतस्मिंश्च प्रयोक्तर्यधीने क्वचित्काचित्प्रसृततरा गतिर्भवति। इह

---

पचति पचतितरां तिष्ठति असा व्हावा.

कां ?

द्वित्व करावें कीं आतिशायनिक[१९] करावा ?

'विप्रतिषेधे परं कार्यम्' (१।४।२) या शास्त्रानें द्वित्व अगोदर होईल.

तर मग 'आढ्यतरमाढ्यतरमानय' या उदाहरणामध्येंही आतिशायनिकापेक्षां अगोदर द्वित्व होईल.

पूर्वीपेक्षां या उदाहरणांत फरक आहे. तो असा की येथें आतिशायनिक अंतरंग आहे.

तो अंतरंग कसा ?

आतिशायनिक प्रत्यय हा ङ्यन्त, आबन्त आणि प्रातिपदिक यांहून होतो आणि द्वित्व हें पदाला[२०] होतें.

आतिशायनिक प्रत्यय देखील अंतरंग नाहीं.

तो कसा ?

तद्धित प्रत्यय हा अन्वययोग्य अशा शब्दाच्या पुढें लागत असतो, आणि शब्दाला दुसऱ्या अर्थाशीं अन्वय होण्याची योग्यता तर सुबन्त झाल्यामुळें येते.[२१] शिवाय, स्पर्धा गम्यमान असताना आतिशायनिक प्रत्यय सांगितला आहे. आणि स्पर्धा तर प्रतियोगीशिवाय प्रतीत होत नाहीं.[२२]

तर मग येथें दोन अर्थ शब्दानें दाखवायाचे आहेत, नित्य आणि वीप्सा यांपैकीं एक, आणि दुसरा अतिशय. ह्या दोन अर्थांची विवक्षा एकाच प्रयोक्त्याला एकदम संभवत नाहीं. ती क्रमानेच होणार असल्यामुळें कसा प्रयोग करावा तें प्रयोक्त्याच्याच स्वाधीन राहत आहे, आणि ही गोष्ट प्रयोक्त्याच्या स्वाधीन राहिली म्हणजे कोठें कोणत्या तरी स्वरूपाचा विशेष प्रकार भासतो; तो असाः—'पचति पचतितरां

---

१९. आतिशायिक म्ह० अतिशय या अर्थाला दाखविणारा प्रत्यय.

२०. प्रातिपदिकाला विभक्तिप्रत्यय लागून पद तयार होतें. तेव्हां प्रातिपदिकाला सांगितलेलें कार्य अगोदर प्रवृत्त होत असल्यामुळे अंतरंग होय आणि अर्थातच पदाला सांगितलेले कार्य त्यापेक्षां बहिरंग होय. बहिरंगापेक्षां अंतरंग अगोदर करावें असें पूर्वीं (१।४।२) सांगितलेंच आहे.

२१. तेव्हां पद तयार झाल्यानंतरच आतिशायनिक प्रत्ययाची प्राप्ति येत असल्यामुळें तो देखील बहिरंगच होतो.

२२. देवदत्तापेक्षां यज्ञदत्तामध्ये कांहीं अतिशय म्ह० विशेष आहे असें म्हटलें म्हणजे तेथें यज्ञदत्ताची देवदत्ताशीं स्पर्धा प्रतीत होते. तेथें देवदत्त हा स्पर्धेचा प्रतियोगी होय. तेव्हां प्रतियोगीचें ज्ञान झाल्यानंतर स्पर्धा गम्यमान होणार आणि नंतर अतिशय भासणार असल्यामुळें आतिशायिक हा बहिरंगच होय. एकंदरींत आतिशायिकापेक्षां द्वित्वच अगोदर होईल ही शंका कायम झाली.

तावत्पचति पचतितरां तिष्ठतीत्येषा प्रसृततरा गतिर्यन्नित्यमुक्त्वातिशय उच्यते । इहेदानीमाढ्यतरमाढ्यतरमानयेत्येषा प्रसृततरा गतिर्यदतिशयमुक्त्वा वीप्साद्विर्वचनमुच्यते ॥

**परेर्वर्जने ॥ ८।१।५ ॥**

**परेरसमासे ॥ १ ॥**

परेरसमास इति वक्तव्यम् । इह मा भूत् । परित्रिगर्तं वृष्टो देवः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । परेर्वर्जन इत्युच्यते न चात्र परिर्वर्जने वर्तते । कस्तर्हि । समासः ॥

**परेर्वर्जने वावचनम् ॥ २ ॥**

परेर्वर्जने वेति वक्तव्यम् । परि त्रिगर्तेभ्यो वृष्टो देवः । परि परि त्रिगर्तेभ्यो वृष्टो देवः ॥

**[ प्रसमुपोदः पादपूरणे ॥ ८।१।६ ॥**

**उपर्यध्यधसः सामीप्ये ॥ ८।१।७ ॥ ]**

**वाक्यादेरामन्त्रितस्यासूयासंमतिकोपकुत्सनभर्त्सनेषु ॥ ८।१।८ ॥**

**असूयाकुत्सनयोः कोपभर्त्सनयोश्चैकार्थत्वात्पृथक्त्वनिर्देशानर्थक्यम् ॥ १ ॥**

असूया कुत्सनमित्येकोऽर्थः । कोपो भर्त्सनमित्येकोऽर्थः । असूयाकुत्सनयोः कोपभर्त्सनयोश्चैकार्थत्वात्पृथक्त्वनिर्देशोऽनर्थकः ।

---

तिष्ठति' या उदाहरणामध्यें असा विशेष प्रकार भासतो की तेथें अगोदर पचनक्रियेची नित्यता दाखवून नंतर त्या क्रियेचा अतिशय प्रतिपादित होतो. 'आढ्यतरमाढ्यतरमानय' या उदाहरणामध्यें असा विशेष प्रकार भासतो की तेथें अगोदर आढ्यतेचा अतिशय दाखवून नंतर तशा आढ्याची वीप्सा द्वित्वानें प्रतिपादित होते.

( सू. ५, वा. १ ) परि या शब्दाला समासाशिवाय इतर ठिकाणीं द्वित्व होतें असें बोलावें; 'परित्रिगर्तं वृष्टो देवः' या उदाहरणामध्यें द्वित्व होऊं नये म्हणून.

तर मग तसें बोललेंच पाहिजे.

तसें बोलावयास नको.

'परेर्वर्जने' यानेंच सिद्ध होतें. परि या शब्दाला वर्जन या अर्थीं द्वित्व होतें असें म्हटलें आहे आणि 'परित्रिगर्तं वृष्टो देवः' या उदाहरणामध्ये 'परि' हा शब्द वर्जन या अर्थीं नाहीं.

तर मग येथे वर्जन या अर्थीं कोणता शब्द आहे ?

समास.

( वा. २ ) परि या शब्दाला वर्जन या अर्थीं द्वित्व होतें तें विकल्पानें होतें असें म्हणावें. उदा० परि त्रिगर्तेभ्यो वृष्टो देवः; परिपरि त्रिगर्तेभ्यो वृष्टो देवः.

( सू. ८, वा १ ) असूया आणि कुत्सन हा एकच अर्थ आहे. तसेंच कोप आणि भर्त्सन हाही एकच अर्थ आहे. तेव्हां असूया आणि कुत्सन हीं, तसेंच कोप आणि भर्त्सन हीं एकच असल्यामुळें ( कुत्सन आणि भत्सर्न यांचा ) निराळेपणानें केलेला निर्देश निरर्थक होत आहे. कारण ज्याला असूया नाहीं तो निंदा करीत नाहीं. तसेंच ज्याला कोप नाहीं तो भर्त्सन

---

१. ( सू. ५ ) वर्जन हा अर्थ गम्यमान असतांना ' परि ' याला द्वित्व होतें.

१. ( सू. ६ ) प्र, सम्, उप, उद्, यापैकीं कोणाही द्वित्व होतें, परंतु द्वित्व केल्यानंतर पादांतील अक्षरसंख्या पुरी होत असेल तर.

१. ( सू. ७ ) सामीप्य अर्थ गम्यमान असतांना उपरि, अधि आणि अधस् यांना द्वित्व होतें.

१. ( सू. ८ ) वाक्याच्या आरंभी जें आमंत्रित त्याला द्वित्व होतें, असूया, संमति, कोप, कुत्सन किंवा भर्त्सन हे अर्थ गम्यमान असतांना.

न ह्यनसूयन्कुत्सयति न चाप्यकुपितो भर्त्सयते। ननु च भो अकुपिता अपि दृश्यन्ते दारकान्भर्त्सयमानाः। अन्ततस्ते तां शरीराकृतिं कुर्वन्ति या कुपितस्य भवति॥ एवं तर्ह्याह

सामृतैः पाणिभिर्घ्नन्ति गुरवो न विषोक्षितैः।
लाडनाश्रयिणो दोषास्ताडनाश्रयिणो गुणाः॥

**एकं बहुव्रीहिवत् ॥ ८। १। ९॥**

इह कस्माद्बहुव्रीहिवद्भावो न भवति। एक इति। एकस्य द्विर्वचनसंबन्धेन बहुव्रीहिवद्भाव उच्यते न चात्र द्विर्वचनं पश्यामः॥

**एकस्य द्विर्वचनसंबन्धेनेति चेदर्थनिर्देशः ॥ १ ॥**

एकस्य द्विर्वचनसंबन्धेनेति चेदर्थनिर्देशः कर्तव्यः। द्विर्वचनमपि ह्यत्र कस्मान्न भवति। तस्माद्वाच्यमस्मिन्नर्थे द्वे भवतो बहुव्रीहिवच्चेति॥

**न वा वीप्साधिकारात् ॥ २ ॥**

न वा वक्तव्यम्। किं कारणम्। वीप्साधिकारात्। नित्यवीप्सयोः [४] इति वर्तते॥

---

करीत नाहीं.[२]

अहो, वडील माणसें न रागावतांच लहान मुलांची भर्त्सना करतांना दिसतात.

तेथेंही त्यांना राग आहेच. फक्त रागावलेल्यांच्या शरीराचा जो एक प्रकारचा आकार असतो तो त्यांचा आंतून असतो.

तर मग 'गुरु हे जें आपल्या हातानें शिष्यांना ताडन करतात तेथें त्यांची अमृताची भावना असते विषाची भावना नसते. कारण त्यांच्या लाड करण्यानें दोष उत्पन्न होतात. आणि ताडन करण्यानें गुण उत्पन्न होतात[३]' असें म्हणतात. म्हणून येथें कुत्सन आणि भर्त्सन यांचा निराळा निर्देश केला आहे.

(सू. ९) एकः या उदाहरणामध्यें बहुव्रीहिवद्भाव कां होत नाहीं?

एक शब्दाला द्वित्व सांगून त्याच्या बरोबर बहुव्रीहिवद्भाव सांगितला आहे. आणि येथें तर एक शब्दाला द्वित्व केलेलें दिसत नाहीं.

(वा. १) एक शब्दाला द्वित्व करावें असें या सूत्रानेंच सांगून त्याच्या बरोबर बहुव्रीहिवद्भाव सांगितला आहे, असें असेल तर हें द्वित्व कोणत्या अर्थी होतें त्या अर्थाचा निर्देश केला पाहिजे. नाहीं तर एकः येथें द्वित्व देखील कां होत नाहीं? तेव्हां एक शब्दाला अमुक अर्थी द्वित्व होतें आणि बहुव्रीहिवद्भाव होतो असें सांगितलें पाहिजे.

(वा. २) तसें सांगण्याचें कारण नाहीं. कां बरें? या सूत्रामध्यें वीप्सेचा संबंध आहे म्हणून. 'नित्यवीप्सयोः' (८।१।४) असें मागें म्हटलें आहे.

---

२. कुत्सन म्हणजे निंदा; त्याचे कारण असूया. तसेंच भर्त्सन म्हणजे शब्दांनीं भय उत्पन्न करणें; त्याचें कारण कोप. जेथे कुत्सन किंवा भर्त्सन प्रतीत होत असेल तेथें त्याचें कारण असूया किंवा कोप हें अवश्य असणारच. तेव्हां कुत्सन आणि भर्त्सन यांच्या उदाहरणांमध्यें असूया आणि कोप याच निमित्तानें द्वित्व करतां येत असल्यामुळें कुत्सन आणि भर्त्सन हीं निराळीं दोन द्वित्वाचीं निमित्तें धरण्याचें कारण नाहीं.

३. तशा ठिकाणी असूया नसतानाच निंदा केली जाते व कोप नसतानाच भर्त्सन केलें जातें. तेव्हां तेथें द्वित्व होण्याकरितां कुत्सन आणि भर्त्सन हे निराळे शब्द उच्चारले आहेत.

१. (सू. ९) 'एक' या शब्दाला द्वित्व होतें आणि तो द्वित्व केलेला एक शब्द बहुव्रीहीसारखा समजावा. 'बहुव्रीहिणा तुल्यं बहुव्रीहिवत्' म्हणजे बहुव्रीहीसारखें समजणें. यामुळें बहुव्रीहीला जीं कार्यें सांगितलीं आहेत तीं एक शब्दाला करतां येतात.

अथ बहुव्रीहिवत्त्वे किं प्रयोजनम् ।

**बहुव्रीहिवत्त्वे प्रयोजनं सुब्लोपपुंवद्भावौ ॥ ३ ॥**

सुब्लोपः । एकैकम् । पुंवद्भावः । गतगता ॥ यद्येवं

**सर्वनामस्वरसमासान्तेषु दोषः ॥ ४ ॥**

सर्वनामस्वरसमासान्तेषु दोषो भवति । सर्वनामविधौ दोषो भवति । एकैकस्मै । न बहुव्रीहौ [ १. १. २९ ] इति प्रतिषेधः प्राप्नोति । सर्वनाम । स्वर । नन सुसु । नञ्सुभ्याम् [ ६. २. १७२ ] इत्येष स्वरः प्राप्नोति । स्वर । समासान्त । ऋगृक् पूः पूः । ऋक्पूरब्धूःपथामानक्षे [ ५. ४. ७४ ] इति समासान्तः प्राप्नोति ॥ सर्वनामविधौ तावन्न दोषः । उक्तं तत्र बहुव्रीहिग्रहणस्य प्रयोजनं बहुव्रीहिरेव यो बहुव्रीहिस्तत्र प्रतिषेधो यथा

---

आता येथें बहुव्रीहिवत् असें म्हणण्याचा काय उपयोग ?

( वा. ३ ) सुपाचा लोप होणें आणि पुंवद्भाव होणें हा उपयोग बहुव्रीहिवत् असें म्हणण्याचा आहे. त्यांपैकीं सुपाच्या लोपाचें उदा०— एकैकम्[2]. पुंवद्भावाचें उदा०— गतगता[3].

असेंच जर आहे तर.—

( वा. ४ ) सर्वनाम, स्वर आणि समासान्त या तीन ठिकाणीं दोष येतो. सर्वनाम संज्ञेमुळें होणाऱ्या कार्याच्या संबंधानें दोष येतो; त्याचें उदा० एकैकस्मै. या ठिकाणीं बहुव्रीहिवद्भावामुळें ' न बहुव्रीहौ ' ( १।१।२९ ) या सूत्रानें सर्वनाम संज्ञेचा निषेध प्राप्त होतो. स्वराचें उदा० नन[4], सुसु. या ठिकाणीं बहुव्रीहिवद्भावामुळें ' नञ्सुभ्याम् ' ( ६।२।१७२ ) हा स्वर प्राप्त होतो.

समासान्ताचें उदा० ऋगृक्, पूः पूः; या ठिकाणीं बहुव्रीहिवद्भावामुळें ' ऋक्पूरब्धूःपथामानक्षे ' [ ५।४।७४ ] या सूत्रानें समासान्त प्राप्त होतो.

सर्वनामकार्याविषयीं तर दोष येत नाहीं. कारण ' बहुव्रीहीच जो बहुव्रीहि' म्हणजे खरा जो बहुव्रीहि तेथेंच ' न बहुव्रीहौ ' (१।१।२९) हा निषेध झाला पाहिजे, बहुव्रीहीसारखा मानल्यानें जो बहुव्रीहि होतो तेथें तो निषेध होऊं नये, असा तेथें बहुव्रीहि ग्रहणाचा उपयोग पूर्वीच सांगितला आहे. स्वर आणि

---

२. एकम् या पदाला द्वित्व करून एकमेकम् असे झालें. नंतर बहुव्रीहीसारखा समजल्यामुळें ' सुपो धातु० ' ( २।४।७१ ) या सूत्रानें दोन्ही भागांतील विभक्तिप्रत्ययाचा लोप होतो. नंतर संधीनें एकैक असें होतें. त्याला विभक्तिप्रत्यय लागून एकैकम् असे होतें.

३. गतगता याचा अर्थ ' गेली रे गेली ' असा आहे. स्त्री गेल्यानंतर तिच्या वियोगानें पीडित झालेल्या पुरुषाच्या तोंडचे हे शब्द आहेत. येथे गता याला ' आबाधे च ' ( ८।१।१० ) या पुढील सूत्रानें द्वित्व होऊन गतागता असें झाल्यानंतर बहुव्रीहिवद्भावामुळें पूर्वभागामध्यें गता याचें ' स्त्रियाः पुंवत्' ( ६।१।३४ ) या सूत्रानें पुंवद्भाव होऊन गत असें रूप होतें.

४. नन करोति, सुसु जागर्ति, अशा प्रकारच्या वाक्यांतील पूर्वभाग येथें दाखविला आहे. ' काय शेवटीं तो नाहींच ना करीत,' 'अजूनही तो जागाच आहे ना ?' असा या वाक्यांचा अर्थ आहे. एकाद्यानें एकादें काम न केल्यामुळें तसेंच कोणी एकादा एकसारखा जागाच असल्यामुळें पीडित झालेल्या अशा दुसऱ्या मनुष्याच्या तोंडचीं हीं वाक्यें आहेत. येथें न आणि सु यांना ' आबाधे च ' ( ८।१।१० ) या सूत्रानें द्वित्व केलें आहे.

स्याद्बहुव्रीहिवद्भावेन यो बहुव्रीहिस्तत्र मा भूदिति। स्वरसमासान्तयोरपि प्रकृतं समासग्रहणमनुवर्तते तेनैव बहुव्रीहिं विशेषयिष्यामः। समासो यो बहुव्रीहिरिति ॥

## [ आबाधे च ॥ ८।१।१० ]

## कर्मधारयवदुत्तरेषु ॥ ८ । १ । ११

कर्मधारयवत्त्वे कानि प्रयोजनानि।

**कर्मधारयवत्त्वे प्रयोजनं सुब्लोपपुंवद्भावान्तोदात्तत्वानि ॥ १ ॥**

सुब्लोपः। पटुपटुः। पुंवद्भावः। पटुपट्वी। अन्तोदात्तत्वम्। पटुपटुः ॥

## प्रकारे गुणवचनस्य ॥ ८ । १ । १२

गुणवचनस्येति किमर्थम्। अग्निर्माणवकः। गौर्वाहीकः।

---

समासान्त याविषयीं देखील ( दोष नाहीं. कारण तेथें ) चालू असलेले समासग्रहण अनुवृत्त करून तें बहुव्रीहीला विशेषण देतों. त्यामुळे समाससंज्ञक जो बहुव्रीहि असा तेथें वाक्यार्थ होतो[६].

( सू. ११ ) कर्मधारयवद्भाव सांगण्याचे उपयोग कोणते ?

( वा. १ ) सुब्लोप, पुंवद्भाव आणि अन्तोदात्त हे कर्मधारयवद्भावाचे उपयोग होत. सुब्लोपाचें उदा० पटुपटुः; पुंवद्भावाचें उदा० पटुपट्वी; अन्तोदात्ताचें उदा० पटुपटुः.

( सू. १२ ) गुणवचनस्य असें कशाकरितां म्हटलें आहे ?

अग्निर्माणवकः, गौर्वाहीकः हीं उदाहरणें साधण्याकरितां.

---

५. 'वनं समासे' (६।२।१७८), आणि 'समासाच्च तद्विषयात्' ( ५।३।१२६ ), या सूत्रामध्ये समासग्रहण आहे.

६. बहुव्रीहीसारखा समजला तरी तो खरा समास नसल्यामुळें तेथे 'नञ्सुभ्याम्' ( ६।२।१७२ ) आणि 'ऋक्पूरब्धूः ०'( ५।४।७४ ) या सूत्रांची प्रवृत्ति होत नाहीं.

१. ( सू. १० ) पीडा अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें.

१. ( सू. ११ ) हें अधिकारसूत्र आहे. या सूत्राच्या पुढील सूत्रांनीं द्वित्व केल्यानंतर तेथे कर्मधारयाप्रमाणें कार्यें करावीं.

२. पटुः याला पुढील सूत्रानें द्वित्व केल्यानंतर पटुःपटुः असें होतें. तेथें कर्मधारयाप्रमाणें दोन्ही भागांतील सुप् प्रत्ययाचा 'सुपो धातु०' ( २।४।७१ ) या सूत्रानें लोप होऊन पटुपटु असें राहतें. नंतर त्या समुदायाला विभक्तिप्रत्यय लागून पटुपटुः असें रूप सिद्ध होतें. तसेंच पटुपटुः या समुदायाला कर्मधारयाप्रमाणे 'समासस्य' (६।१।२२३) यानें अंतोदात्त होतो. पट्वी शब्दाला द्वित्व केल्यानंतर त्यांतील पूर्वभाग पट्वी हा 'पुंवत्कर्मधारय०' ( ६।३।४२ ) या सूत्रानें पुंवद्भाव होऊन पुल्लिंगासारखा पटु असा होतो, आणि 'पटुपट्वी' असें रूप सिद्ध होतें.

१. ( सू. १२ ) प्रकार म्ह० सादृश्य. सादृश्य विवक्षित असतांना गुणवाचक शब्दाला द्वित्व होते. उदा० पटुपटुः. पटु म्ह० कुशल पटु हा शब्द कौशल्यगुणाचा वाचक आहे. जो मनुष्य कौशल्यात जरा कमी आहे, तो कुशल असल्यासारखाच असल्यामुळें त्याला पटुपटुः असें म्हणतात.

२. 'हा मुलगा अग्नि आहे' 'हा माणूस बैल आहे' असा या वाक्यांचा अर्थ आहे. अग्नीसारखा तेजस्वी आहे, बैलासारखा बुद्धीनें जड आहे, असें या वाक्यांचें तात्पर्य आहे. येथें सादृश्य प्रतीत होतें. परंतु अग्नि आणि गो हे शब्द गुणवाचक नसल्यामुळें त्यांना द्वित्व होत नाही.

**प्रकारे सर्वेषां गुणवचनत्वात्सर्वप्रसङ्गः ॥ १ ॥**

सर्वे हि शब्दाः प्रकारे वर्तमानाः गुणवचनाः संपद्यन्ते तेनेहापि प्राप्नोति । अग्निर्माणवकः । गौर्वाहीक इति ॥

**सिद्धं तु प्रकृत्यर्थविशेषणत्वात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रकृत्यर्थविशेषणत्वात् । प्रकृत्यर्थो विशेष्यते । नैवं विज्ञायते प्रकारे गुणवचनस्येति । कथं तर्हि । गुणवचनस्य शब्दस्य द्वे भवतः प्रकारे वर्तमानस्येति ॥ अथवा प्रकारे गुणवचनस्येत्युच्यते सर्वश्च शब्दः प्रकारे वर्तमानो गुणवचनः संपद्यते तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते । साधीयो यो गुणवचन इति । कश्च साधीयः । यः प्रकारे च प्राक्च प्रकारात् ॥ अथवा प्रकारे गुणवचनस्येत्युच्यते सर्वश्च शब्दः प्रकारे वर्तमानो गुणवचनः संपद्यते त एवं विज्ञास्यामः प्राक् प्रकाराद्यो गुणवचन इति ॥

**आनुपूर्व्ये ॥ ३ ॥**

आनुपूर्व्ये द्वे भवत इति वक्तव्यम् । मूले मूले स्थूलाः । अग्रेऽग्रे सूक्ष्माः ॥

**स्वार्थेऽवधार्यमाणेऽनेकस्मिन् ॥ ४ ॥**

---

( वा. १ ) प्रकार या अर्थी सर्व शब्दांना गुणवाचकत्वामुळे सर्व ठिकाणीं द्वित्वाचा प्रसंग येतो. सर्वच शब्द प्रकारार्थी असतील तेव्हां ते गुणवाचक होतात. त्यामुळें अग्निर्माणवकः, गौर्वाहीकः, या ठिकाणींही द्वित्व प्राप्त होतें.

( वा. २ ) हीं उदाहरणें द्वित्व झाल्याशिवाय ( योग्य तऱ्हेनें ) सिद्ध होतात.

तीं कशीं ?

प्रकृत्यर्थाचें विशेषण आहे म्हणून. गुणवचन हें प्रकृतीच्या मूळ अर्थाचे विशेषण आहे. तात्पर्य असें की, ' प्रकार या अर्थाला दाखविणारा होऊन गुणवाचक झालेल्या शब्दाला द्वित्व होतें' असें आम्ही मानीत नाहीं.

तर मग कसें मानतां ?

' मूळचा गुणवाचक शब्द जर प्रकार या अर्थाला दाखवीत असेल तर त्याला द्वित्व होतें ' असें.

अथवा ' प्रकारे गुणवचनस्य ' असें येथें म्हटलें आहे. आणि कोणताही शब्द प्रकारार्थी घेतला असतां गुणवाचक होतो; तेव्हां येथें ' खरा जो गुणवाचक आहे ' असा विशेष अर्थ पाणिनीच्या मनात आहे असें समजले जातें.

खरा गुणवाचक शब्द कसा बरें ओळखावा ?

जो शब्द प्रकार हा अर्थ घेतल्यानंतर आणि प्रकार हा अर्थ घेण्यापूर्वीही गुणवाचक असेल तो. अथवा ' प्रकारे गुणवचनस्य ' असें येथें म्हटलें आहे आणि सर्वच शब्द प्रकार या अर्थी घेतले असतां गुणवाचक होतात म्हणून येथें असें आम्ही मानतों कीं जो शब्द प्रकार हा अर्थ घेण्याच्या पूर्वी गुणवाचक आहे.

( वा. ३ ) आनुपूर्व्य गम्यमान असतांना द्वित्व होतें असें बोलावें. उदा० मूलेमूले स्थूलाः; अग्रे अग्रे सूक्ष्माः.

---

३. अग्नि आणि गो या शब्दांचे अग्नीसारखा व बैलासारखा असें तात्पर्य असल्यामुळे त्यापासून तेजस्वित्व व जाड्य हे गुण प्रतीत होतात.

४. आनुपूर्व्य म्हणजे एक विशेष प्रकारचा क्रम. हे वृक्ष जसें जसें मुळाकडे पाहावें तसें तसें क्रमानें अधिक अधिक स्थूल दिसतात; व जसें जसें अग्राकडे पाहावें तसें तसें क्रमानें अधिक अधिक बारीक दिसतात, असा या उदाहरणांचा अर्थ आहे.

स्वार्थेऽवधार्यमाणेऽनेकस्मिन्द्वे भवत इति वक्तव्यम् । अस्मात्कार्षापणादिह भवद्भ्यां माषं माषं देहि । अवधार्यमाण इति किमर्थम् । अस्मात्कार्षापणादिह भवद्भ्यां माषं देहि द्वौ देहि त्रीन्देहि । अनेकस्मिन्निति किमर्थम् । अस्मात्कार्षापणादिह भवद्भ्यां माषं देहि । माषमेव देहि ॥ किं पुनः कारणं न सिध्यति । अनवयवाभिधानं वीप्सार्थ इत्युच्यतेऽवयवाभिधानं चात्र गम्यते । आतश्चावयवाभिधानं यो ह्युच्यतेऽस्मात्कार्षापणादिह भवद्भ्यां माषं माषं देहीति माषं माषमसौ दत्त्वा शेषं पृच्छति किमनेन क्रियतामिति । यः पुनरुच्यत इमं कार्षापणमिह भवद्भ्यां माषं माषं देहीति माषं माषमसौ दत्त्वा तूष्णीमास्ते ॥

चापले ॥ ५ ॥

---

(वा. ४) वाक्याचा स्वार्थ निश्चित असतांना अनेक या अर्थी द्वित्व होतें असें बोलावें. उदा०— अस्मात्कार्षापणादिह भवद्भ्यां माषं माषं देहि[५].

'वाक्याचा अर्थ निश्चित असतांना' असें कशाकरता म्हटलें आहे ?

अस्मात्कार्षापणादिह भवद्भ्यां माषं माषं[६] देहि द्वौ देहि त्रीन् देहि.

'अनेक अर्थी असें कशाकरतां म्हटलें आहे ? अस्मात्कार्षापणादिह भवद्भ्यां माषं देहि.[७] 'एकच पैसा दे' असा अर्थ होय.

माषं माषं हें द्वित्व (नित्यवीप्सयोः याच) सूत्रानें सिद्ध होत नाहीं याचें काय बरें कारण ?

'द्रव्याचा क्रिया, गुण वगैरेंशीं साकल्यानें संबंध दाखविणें हा वीप्सार्थ' असें म्हटलें आहे (पृ. २६५ पं. १९). आणि येथें तर कांहीं भागाचाच फक्त संबंध प्रतीत होतो. येथें 'कांहीं भागाचाच फक्त संबंध प्रतीत होतो' असें म्हणण्याचें दुसरें कारण असें कीं 'या रुपयांतून ह्या दोघांना पैसा पैसा दे' असे ज्याला सांगितलें जातें तो त्या दोघांना पैसा पैसा देऊन नतर बाकीच्याबद्दल 'काय त्या पैशाचें करावयाचें' असें विचारतो. आणि जेथें 'हा रुपया ह्या लोकांना पैसा पैसा करून दे असें सागितलें जातें तेथे तो त्यांना पैसा पैसा देऊन स्वस्थ बसतो.[९]

---

५. 'या रुपयांतून ह्या दोघांना पैसा पैसा दे'. असा याचा अर्थ आहे. येथे पैसे दोन होत असल्यामुळे ते अनेक अर्थ होत. म्हणून त्या अर्थी 'माषं' याला द्वित्व होऊन 'माषं माषम्' असें होते.

६ 'या रुपयांतून ह्या दोघांना पैसा दे, दोन दे, तीन दे वाटेल तसें दे' असा याचा अर्थ आहे. येथें निश्चित कांहीच नाहीं. त्यामुळें माषं याला द्वित्व झालें नाहीं.

७. या रुपयांतून या दोघांना पैसा दे असा याचा अर्थ आहे. येथें पैसे अनेक नसल्यामुळें माषं याला द्वित्व झालें नाहीं.

८. जर पूर्वीच्या वाक्यावरून सर्व पैशांचा विनियोग झाला असता तर हा प्रश्न उद्भवलाच नसता. तेव्हां यावरून पूर्वीच्या वाक्यामध्यें कांही भागाचाच संबंध प्रतीत होतो असें सिद्ध होतें.

९. तेव्हां येथें वीप्सार्थ प्रतीत होत असल्यामुळें 'नित्यवीप्सयोः' ८।१।४) या सूत्रानें द्वित्व होतें.

चापले द्वे भवत इति वक्तव्यम् । अहिरहिः, बुध्यस्व बुध्यस्व ॥ न चावश्यं द्वे एव यावद्भिः शब्दैः सोऽर्थो गम्यते तावन्तः प्रयोक्तव्याः । अहिरहिरहिः, बुध्यस्व बुध्यस्व बुध्यस्वेति ॥

## क्रियासमभिहारे ॥ ६ ॥

क्रियासमभिहारे द्वे भवत इति वक्तव्यम् । स भवाँल्लुनीहि लुनीहीत्येवायं लुनाति ॥

## आभीक्ष्ण्ये ॥ ७ ॥

आभीक्ष्ण्ये द्वे भवत इति वक्तव्यम् । भुक्त्वा भुक्त्वा व्रजति । भोजं भोजं व्रजति ॥

## डाचि च ॥ ८ ॥

डाचि च द्वे भवत इति वक्तव्यम् । पटपटायति मटमटायति ॥

## पूर्वप्रथमयोरर्थातिशयविवक्षायाम् ॥ ९ ॥

पूर्वप्रथमयोरर्थातिशयविवक्षायां द्वे भवत इति वक्तव्यम् । पूर्वं पूर्वं पुष्प्यन्ति । प्रथमं प्रथमं पच्यन्ते ॥

---

(वा.५) चापल्य[10] अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें असें बोलावें. उदा०— [11]अहिरहिः, बुध्यस्व बुध्यस्व. शिवाय वरील प्रसंगीं नियमानें दोन वेळांच शब्दाचा उच्चार करावा असें नाहीं. तर जितका वेळ शब्दांचा उच्चार केला असतां तो मनांतील अर्थ प्रतीत होईल तितक्यानदा शब्दाचा उच्चार करावा[12]. उदा०—अहिरहिरहिः; बुध्यस्व बुध्यस्व बुध्यस्व.

(वा.६) क्रियासमभिहार हा अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें असें बोलावें. उदा०—स [13]भवान् लुनीहि लुनीहीत्येवायं लुनाति, पुनीहि पुनीहीत्येवायं पुनाति.

(वा.७) [14]आभीक्ष्ण्य हा अर्थ गम्यमान असतांना द्वित्व होतें असें बोलावें. उदा०—भुक्त्वा भुक्त्वा व्रजति; भोजं भोजं व्रजति.

(वा.८) डाच् प्रत्यय कर्तव्य असतांना द्वित्व होतें असें बोलावें. उदा०— [15]पटपटायति; मटमटायति.

(वा.९) पूर्व आणि प्रथम या शब्दांना त्यांच्या अर्थाच्या अतिशयाची विवक्षा असतांना

---

१०. चापल्य म्हणजे कांहीं कारणाने झालेली एक प्रकारची मनाची घाई. तशा अवस्थेमध्यें सहजच मनुष्याच्या तोंडांतून अरे 'साप साप', 'पहा पहा' असे द्वित्व केलेले शब्द निघतात. तेव्हां द्विरुच्चारण आपोआपच सिद्ध होत असल्यामुळे हे वचन अपूर्व समजूं नये.

११. अहि म्ह० साप. बुध्यस्व म्ह० जाण. मराठी भाषेमध्यें पहा पहा, ऐका ऐका, असे पाहणें व ऐकणें या अर्थी द्वित्व केलेले प्रयोग दिसतात.

१२. मनाची घाई झाली असतां दोहोंपेक्षां जास्त वेळां सुद्धा शब्दाचा प्रयोग झालेला लोकांमध्ये दृष्टोत्पत्तीस येतो.

१३. 'तोड तोड तोडतो' असा याचा अर्थ आहे. येथें तोडणें या क्रियेचा अतिशय गम्यमान होत आहे.

१४. आभीक्ष्ण्य म्हणजे पुनः पुनः क्रिया करणें. उदाहरणांमध्यें भोजनक्रिया आणि गमनक्रिया जरी पुनः पुनः होत आहे तरी मध्यें मध्यें विच्छिन्न होऊन पुनः पुनः केली जात आहे अशा तऱ्हेच्या आभीक्ष्ण्याचा 'नित्यवीप्सयोः' (८।१।४) या सूत्रामध्यें नित्य शब्दानें संग्रह होत नाहीं अशा अभिप्रायानें हे वचन केले आहे.

१५. पटत् या शब्दाला द्वित्व करून नंतर पटत् पटत् याहून 'अव्यक्तानुकरण०' (५।४।५७) या सूत्रानें येथें डाच् प्रत्यय होतो. पूर्वभागी तकार आणि त्याच्या पुढील पकार या दोहोंना मिळून 'नित्यमाम्रेडिते०' (६।१।१००) या सूत्रानें पररूप होऊन पकार होतो.

## डतरडतमयोः समसंप्रधारणायां स्त्रीनिगदे भावे ॥ १० ॥

डतरडतमयोः समसंप्रधारणायां स्त्रीनिगदे भावे द्वे भवत इति वक्तव्यम् । उभाविमावाढ्यौ कतरा कतरानयोराढ्यता । सर्वे इम आढ्याः कतमा कतमैषामिति ॥

## कर्मव्यतिहारे सर्वनाम्नः समासवच्च बहुलं यदा न समासवत्प्रथमैकवचनं तदा पूर्वपदस्य ॥ ११ ॥

कर्मव्यतिहारे सर्वनाम्नो द्वे भवत इति वक्तव्यं समासवच्च बहुलम् । यदा न समासवत्प्रथमैकवचनं भवति तदा पूर्वपदस्य। अन्योऽन्यमिमे ब्राह्मणा भोजयन्ति। अन्योऽन्यस्य भोजयन्ति । इतरेतरं भोजयन्ति । इतरेतरस्य भोजयन्ति ॥

## स्त्रीनपुंसकयोरुत्तरपदस्य वाम्भावः ॥ १२ ॥

स्त्रीनपुंसकयोरुत्तरपदस्य वाम्भावो वक्तव्यः । अन्योऽन्यमिमे ब्राह्मण्यौ

---

द्वित्व होतें असें बोलावें. उ०—[१६]पूर्वं पूर्वं पुष्प्यन्ति प्रथमं प्रथमं पच्यन्ते.

( वा. १० ) डतरप्रत्ययान्त व डतमप्रत्ययान्त अशा स्त्रीलिंगी भावप्रत्ययान्त शब्दाला अनेकांचें साम्यानें निरूपण कर्तव्य असतांना द्वित्व होतें असें बोलावे उदा०—[१७]उभाविमावाढ्यौ कतरा कतरा तयोश्चाढ्यता; सर्वे इमे आढ्याः कतमा कतमैषामाढ्यता.

(वा.११) क्रिया[१८]विनिमय गम्यमान असतांना सर्वनामसंज्ञक शब्दाला द्वित्व होते असें बोलावें. आणि तेथें समासवद्भाव बाहुल्येंकरून होतो. जेव्हां समासवद्भाव होत नाहीं तेव्हां पूर्व भागीं प्रथमेचें एकवचन होतें. उदा० [१९]अन्योन्यमिमे ब्राह्मणा भोजयन्ति, अन्योन्यस्य भोजयन्ति; इतरेतरं भोजयन्ति, इतरेतरस्य भोजयन्ति.

(वा.१२)स्त्रीलिंगीं आणि नपुसकलिंगीं उत्तरपदाच्या पुढील विभक्तीला आम् आदेश विकल्पानें होतो असें बोलावे. उदा०—[२०]अन्योन्यमिमे ब्राह्मण्यौ

---

१६. काही वृक्ष सर्वापेक्षां अगोदर पुष्पित होतात. तसेंच कांही अत्यंत सात्त्विक पदार्थ सर्वांपेक्षां अगोदर पचतात असा या उदाहरणाचा अर्थ आहे.

१७. हे दोघे संपन्न आहेत. यांची संपत्ति कशा कशा प्रकारची आहे, असा याचा अर्थ आहे. कांही लोक विद्येने संपन्न असतात, कांही लोक गुणाने संपन्न असतात तर काही लोक द्रव्याने संपन्न असतात. अशी संपत्ति अनेक प्रकारची असल्यामुळे त्यांपैकी कोणाची कशा प्रकारची आहे असा प्रश्नाचा अर्थ आहे. या प्रमाणेच ' सर्वे इमे ' या उदाहरणाचा अर्थ समजावा.

१८. क्रियाविनिमय म्ह० कोणतीहि एखादी क्रिया अनेक लोकांनीं एकमेकांसंबंधाने करणें.

१९. अन्य व इतर हे शब्द सर्वनामसंज्ञक आहेत. समासवद्भाव बाहुल्येंकरून सांगितला असल्यामुळें त्याचा प्रयोक्त्याच्या इच्छेप्रमाणें सर्व ठिकाणी विकल्प होत नाही. प्रामाणिक प्रयोगाला अनुसरून ठरवावें लागतें. तेव्हा अन्य शब्दाला समासवद्भाव होतच नाही. आणि इतर शब्दाला नित्य होतो. अन्यम् आणि अन्यस्य याना द्वित्व केल्यानंतर पूर्वभागी द्वितीयेचे एकवचनाला व षष्ठीचे एकवचनाला प्रथमा एकवचन सु असा आदेश होतो. नंतर संधि होऊन अन्योन्यम् आणि अन्योन्यस्य असें होते. तसेंच इतरम् आणि इतरस्य याला द्वित्व केल्यानंतर समासवद्भावानें दोन्ही भागांतील विभक्तिप्रत्ययाचा सुपो धातु० ( २।४।७१ ) या सूत्रानें लुक् होऊन संधीनें इतरेतर असे होतें. त्यानंतर पुनः समुदायाहून विभक्तिप्रत्यय उत्पन्न होतो.

२०. येथें स्त्रीलिंगाचा दर्शक टाप् प्रत्यय हा बाहुलकामुळें केला नाही.

भोजयतः ।अन्योऽन्यां भोजयतः । इतरेतरं भोजयतः । इतरेतरां भोजयतः । अन्योऽन्यमिमे ब्राह्मणकुले भोजयतः । अन्योऽन्यां भोजयतः । इतरेतरं भोजयतः । इतरेतरां भोजयतः ॥

[ अंकृच्छ्रे प्रियसुखयोरन्यतरस्याम् ॥ ८।१।१३॥

यथास्वे यथायथम् ॥८।१।१४ ॥]

द्वन्द्वं रहस्यमर्यादावचनव्युत्क्रमणयज्ञपात्रप्रयोगाभिव्यक्तिषु ॥ ८ । १ । १५ ॥

अत्यन्तसहचरिते लोकविज्ञाते द्वन्द्वमित्युपसंख्यानम् ॥ १ ॥

अत्यन्तसहचरिते लोकविज्ञाते द्वन्द्वमित्युपसंख्यानं कर्तव्यम् । द्वन्द्वं स्कन्दविशाखौ । द्वन्द्वं नारदपर्वतौ । अत्यन्तसहचरित इति किमर्थम् । द्वौ युधिष्ठिरार्जुनौ । लोकविज्ञात इति किमर्थम् । द्वौ देवदत्तयज्ञदत्तौ ॥

अथ द्वन्द्वमिति किं निपात्यते ।

द्वन्द्वमिति पूर्वपदस्य चाम्भाव उत्तरपदस्य चात्वं नपुंसकत्वं च ॥ २ ॥

पूर्वपदस्य चाम्भावो निपात्यत उत्तरपदस्य चात्वं नपुंसकत्वं च ॥

---

भोजयतः, अन्योन्यां भोजयतः; इतरेतरमिमे ब्राह्मण्यौ भोजयतः, इतरेतरां भोजयतः; [21]अन्योन्यमिमे ब्राह्मणकुले भोजयतः, अन्योन्यां भोजयतः; [21]इतरेतरमिमे ब्राह्मणकुले भोजयतः; इतरेतरां भोजयतः.

(सू.१५वा.१) [2]अत्यंत सहचरित असे जे दोन लोकप्रसिद्ध पदार्थ असतील त्या अर्थी द्वंद्वम् असें रूप होतें असे सांगावें. उदा०–द्वंद्वं स्कन्दविशाखौ. द्वंद्वं नारदपर्वतौ.

अत्यन्त सहचरित असे येथें कशाकरितां म्हटलें आहे ?

द्वौ युधिष्ठिरार्जुनौ येथें द्वंद्वम् असा प्रयोग होऊं नये म्हणून.

लोकप्रसिद्ध असें कशाकरतां म्हटले आहे ?

द्वौ देवदत्तयज्ञदत्तौ येथे द्वंद्वं असा प्रयोग होऊं नये म्हणून.

सूत्रामध्ये द्वंद्वम् असें उच्चारून कोणत्या कोणत्या कार्याचें निपातन केले आहे.

( वा. २ ) द्वंद्वम् हे द्विशब्दाला द्वित्व करून पूर्वभागीं अम् आदेशाचें आणि उत्तरभागीं इकाराला अकाराचें निपातन केलें आहे. तसेंच हा द्वंद्व शब्द नपुंसकलिंगीं चालावा असेंही येथें सांगितलें आहे.

---

२१. अड्डतरादिभ्यः ( ७।१।२५ ) या सूत्रानें विभक्तिप्रत्ययाला अद् हा आदेश प्राप्त होतो. परंतु बाहुलकामुळें केला नाही.

१. (सू. १३) दुःखाचा अभाव गम्यमान असतांना प्रिय आणि सुख या शब्दांना द्वित्व विकल्पानें होतें.

१. (सू. १४) यथा शब्दाला द्वित्व करून नपुंसकलिंगी यथायथम् असा शब्द सिद्ध करावा, परंतु ‘ जसें ज्याचें स्वरूप त्याप्रमाणें ’ हा अर्थ गम्यमान असतांना.

१. (सू. १५) ‘द्वंद्वम्’ हें निपातन ‘रहस्य’ या अर्थी आहे. तसेंच मर्यादोक्ति, भेद, यज्ञपात्रांचा प्रयोग, आणि प्रसिद्धि हे अर्थ ज्या दोघांच्या संबंधानें वाक्यामध्ये गम्यमान होतात त्या दोन या अर्थी द्वंद्वम् असें निपातन केले आहे.

२. सूत्रामध्यें प्रसिद्धि हा अर्थ गम्यमान असतांना द्वंद्वम् असें निपातन केलें आहे. त्याचाच या वचनानें संकोच केला आहे.

**उक्तं वा ॥ ३ ॥**

किमुक्तम् । लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्येति तत्र नपुंसकत्वमनिपात्यम् ॥

**पदस्य ॥ ८ । १ । १६ ॥**

**पदात् ॥ ८ । १ । १७ ॥**

आ कुतः पदाधिकारः ।

**पदाधिकारः प्रागपदान्ताधिकारात् ॥ १ ॥**

अपदान्तस्य मूर्धन्यः [ ८. ३. ५५ ] इत्यतः प्राक्पदाधिकारः ॥

अथ पदादित्यधिकार आ कुतः ।

**पदात्प्राक्सुपि कुत्सनात् ॥ २ ॥**

पदादित्यधिकारः प्राक्सुपि कुत्सनात् । कुत्सने च सुप्यगोत्रादौ [ ८. १. ६९ ] इत्यतः प्राक् ॥

**यणेकादेशस्वरस्तूर्ध्वं पदाधिकारात् ॥ ३ ॥**

यणेकादेशस्वरस्तूर्ध्वं पदाधिकारात्कर्तव्यः ॥

**इह वचने ह्यपदान्तस्याप्राप्तिः ॥ ४ ॥**

इह हि क्रियमाणेऽपदान्तस्याप्राप्तिः स्यात् । उदात्तस्वरितयोर्यणः स्वरितोऽनुदात्तस्य [ ८. २. ४ ] इतीहैव स्यात् कुमार्यौ किशोर्यौ इह न स्यात् कुमार्यः किशोर्यः । एकादेश उदात्तेनोदात्तः [८. २ ५] इहैव स्यात् वृक्षौ प्लक्षौ इह न स्यात् वृक्षाः प्लक्षाः ॥

---

(वा. ३) अथवा पूर्वी (२।१।३६ भाष्य) सांगितलेंच आहे.

काय बरं तें सांगितले आहे ?

लिंगाबद्दल कांहीं सांगावयाला नको. कारण लिंग हें लोकांच्या बोलण्यावर अवलबून आहे. एकंदरींत येथें नपुसकलिंगाचें निपातन आहे असें म्हणावयाला नको.

(सू. १६,१७) पदस्य हा अधिकार कोठपर्यंत आहे ?

( वा.१) अपदान्तस्य मूर्धन्यः (८।३।५५) असें पुढें सांगितलें आहे त्याच्या पूर्वीच्या सूत्रापर्यंत पदस्य हा अधिकार आहे.

आता पदात् हा अधिकार कोठपर्यंत आहे ?

(वा.२)पदात् हा अधिकार सुपि कुत्सनाच्या पूर्वी म्ह. ‘ कुत्सने च सुप्यगोत्रादौ ’ (८। १।६९ ) असें पुढे सागितलें आहे त्याच्या पूर्वीच्या सूत्रापर्यंत.

( वा. ३) यण् स्वर आणि एकादेश स्वर हे पदस्य अधिकार सपल्यानंतर सांगितले पाहिजेत.

( वा.४ ) ह्या अधिकारामध्ये सांगितले तर पदान्त नसेल तेथें त्याची प्रवृत्ति होणार नाहीं. ‘उदात्तस्वरितयोर्यणः स्वरितोऽनुदात्तस्य’(८।२।४) या सूत्रानें सांगितलेला स्वर कुमार्यौ किशार्यौ येथेंच होईल; कुमार्यः किशोर्यः येथे होणार नाहीं. तसेंच ‘एकादेश उदात्तेनोदात्तः ’(८।२।५) या सूत्रानें सागितलेला स्वर वृक्षौ प्लक्षौ येथेंच होईल; वृक्षाः प्लक्षाः येथे होणार नाहीं.

---

१. ( सू.१६-१७ ) ही दोन्ही अधिकारसूत्रें आहेत.

२. पदस्य या अधिकारामध्यें जी कार्यें सांगितलीं आहेत ती पदाला करावयाचीं आहेत. तेव्हा पदस्य ही स्थानषष्ठी आहे, म्हणजे त्या त्या कार्याच्या स्थानीची निदर्शक आहे. तेव्हां पदस्य हें सर्वत्र विशेष्य आहे. आणि त्या त्या सूत्रामध्यें जो षष्ठ्यन्त शब्द असेल तो पदस्य याचें विशेषण समजावा. जसें–नलोपः० ( ८।२।७ ) या सूत्रामध्यें न हें पदाचे विशेषण होऊन येन विधि० ( १।१।७२ ) या सूत्रानें तदन्तविधि होऊन नकारान्त पदाला तें कार्य करावें असा अर्थ होतो. तेव्हां त्यानें सांगितलेला नकाराचा लोप राजा यां ठिकाणी होतो. राजानौ येथें नकारान्त पद नसल्यामुळे होत नाहीं. तसें उदात्तस्वरित० ( ८।२।४ ) या सूत्रानें अनुदात्ताचें स्थानीं सांगितलेला स्वरित

**न वा पदाधिकारस्य विशेषणत्वात् ॥५॥**

न वोर्ध्वं पदाधिकारात्कर्तव्यो यणेकादेशस्वरः। किं कारणम्। पदाधिकारस्य विशेषणत्वात्। पदस्येति नैषा स्थानषष्ठी। का तर्हि। विशेषणषष्ठी। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। प्रत्याख्यायते स्थानषष्ठी ॥

**अन्तग्रहणाद्वा नलोपे ॥ ६ ॥**

अथवा यदयं नलोपः प्रातिपदिकान्तस्य [ ८. २. ७ ] इत्यन्तग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो विशेषणषष्ठ्येषा न स्थानषष्ठीति ॥

## अनुदात्तं सर्वमपादादौ ॥८।१।१८॥

**सर्ववचनं किमर्थम्।**

---

( वा.५ ) अथवा यण् स्वर आणि एकादेश स्वर हे पदस्य अधिकार संपल्यानंतर सांगितले पाहिजेत असें नाहीं.

कां बरें ?

पदस्य हा अधिकार विशेषण आहे म्हणून. पदस्य ही स्थानषष्ठी नव्हे.

तर मग कसली ?

ही विशेषणषष्ठी आहे.

कसें बरें असें बोलावें ? असें बोलूं नये. जें सूत्रांत सांगितलें नाहीं तें कसें बरें घेतां येईल ?

स्थानषष्ठी सांगणाऱ्या सूत्राचे ( १।१।४९ ) प्रत्याख्यान केलें आहे.

(वा. ६) अथवा हा आचार्य पाणिनि 'नलोपः प्रातिपदिकान्तस्य' (८।२।७) या सूत्रामध्यें जें अन्तग्रहण करतो त्यावरून तो असें सुचवितो कीं पदस्य ही विशेषणषष्ठी आहे स्थानषष्ठी नव्हे.

( सू. १८ ) सूत्रांतील सर्व शब्दाचा काय उपयोग ?

---

कुमार्यौ येथें यणाच्या पुढील औ हा अनुदात्त पदाच्या शेवटी असल्यामुळें त्याला होईल. कुमार्यः या विसर्गान्त पदामध्यें यणाच्या पुढील अ हा अनुदात्त पदाच्या शेवटीं नसल्यामुळें त्याला स्वरित होणार नाहीं. वृक्षौ या ठिकाणी औ हा एकादेश पदाच्या शेवटी असल्यामुळें त्याला 'एकादेश उदात्तेनो०' (८।२।५) या सूत्रानें सांगितलेला उदात्त होईल. वृक्षाः या विसर्गान्त पदामध्यें आ हा एकादेश पदाच्या शेवटी नसल्यामुळें त्याला उदात्त होणार नाही.

३. 'उदात्तस्वरित०' (८।२।४) या सूत्रामध्यें पदस्य हें सूत्रांतील अनुदात्तस्य याचें विशेषण आहे. तेव्हां पदाचा अवयव जो अनुदात्त त्याला स्वरित होतो असा अर्थ होत असल्यामुळें तो अनुदात्त पदाच्या शेवटी नसला तरी त्याला स्वरित होईल.

४. तेव्हां स्थानषष्ठीच घ्यावी असा नियम नसल्यामुळे ' पदस्य ' हें 'पदाचा अवयव' अशा अर्थानें सूत्रांतील अनुदात्तस्य वगैरेंना विशेषण देतां येते.

५. अन्तग्रहण न करतां ' नलोपः प्रातिपदिकस्य ' एवढेंच सूत्र करावें. पदस्य हें विशेष्य घेऊन तदन्तविधीनें ' नकारान्त प्रातिपदिकसंज्ञक पद ' असा अर्थ होईल व सर्व उदाहरणें साधतील. असें असतां ज्या अर्थी पाणिनि त्या सूत्रामध्ये अन्तग्रहण करतो, त्यावरून तो असें सुचवितो की पदस्य हे विशेषण करावें. तसें केलें असतां ' पदाचा अवयव नकार ' असा अर्थ होऊन राजानौ या ठिकाणी नलोप होऊं लागेल तो न व्हावा म्हणून ' पदाचा अन्तावयव जो नकार ' असा अर्थ होण्याकरतां सूत्रामध्यें पाणिनीने अन्तग्रहण केलें आहे.

१. ( सू. १८ ) हें अधिकारसूत्र आहे. हा पाद संपेपर्यंत हा अधिकार आहे.

**सर्ववचनमनादेरनुदात्तार्थम् ॥ १ ॥**

सर्वग्रहणं क्रियते ऽनादेरप्यनुदात्तत्वं यथा स्यादिति । तिङतिङः [ ८. १. २८ ] इहैव स्यात् देवदत्तः पचतीति इह न स्यात् देवदत्तः करोतीति ॥

**सर्ववचनमनादेरनुदात्तार्थमिति चेल्लुटि प्रतिषेधात्सिद्धम् ॥ २ ॥**

सर्ववचनमनादेरनुदात्तार्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । लुटि प्रतिषेधात्सिद्धम् । यदयं लुटि प्रतिषेधं शास्ति 'न लुट्' [ ८. १. २९ ] इति तज्ज्ञापयत्याचार्योऽनादेरप्यनुदात्तत्वं भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् । न हि लुडन्तमाद्युदात्तमस्ति ॥

**अलो ऽन्त्यविधिप्रसङ्गस्तु ॥ ३ ॥**

---

( वा. १ ) अनादीला देखील अनुदात्त झाला पाहिजे म्हणून सर्व शब्द घातला आहे. नाहीं तर ' तिङतिङः' ( ८।१।२८ ) या सूत्रानें सांगितलेला अनुदात्त स्वर ' देवदत्तः पचति ' येथेच होईल; 'देवदत्तः करोति' येथे होणार नाहीं.[२]

( वा. २) अनादीला देखील अनुदात्त झाला पाहिजे म्हणून सर्व शब्द उच्चारला आहे असेंच जर असेल तर तें कांहीं बरोबर नाहीं.

कां बरें ?

लुटामध्ये निषेध केला असल्यामुळें अनादीला अनुदात्त होतो हें सिद्ध होते. हा आचार्य ( पाणिनि ) लुटामध्यें जो ' तिङतिङः ' या अनुदात्ताचा निषेध करतो ( ८।१।२९ ) त्यावरूनच तो असे ज्ञापित करतो कीं ' अनादीला देखील अनुदात्त होतो. '

कसें बरें हें ज्ञापक जमतें ?

असें कीं लुट् प्रत्ययान्त क्रियापद आद्युदात्त कोठेंच दिसत नाहीं.[३]

(वा. ३) अलोऽन्त्यस्य (१।१।५२) हा विधि सूत्रानें अनुदात्त होणार नाही. सूत्रात सर्व शब्द घातला म्हणजे ' आदेः परस्य ' या परिभाषेचा बाध करून क्रियापदातील आदि अनादि सर्व अचांना अनुदात्त करता येतो.

---

२. ' तिङतिङः ' या सूत्रामध्ये पदात् हा अधिकार आहे. क्रियापदाशिवाय इतर जे पद त्याहून पुढील क्रियापदाला त्यानें अनुदात्त स्वर सांगितला आहे. तो आदेः परस्य ( १।१।५ ) या परिभाषेने पुढील क्रियापदाच्या आदि अचाला होईल. तेव्हां अर्थातच जेथें आदि मूळचा अनुदात्तच असेल तेथें त्यांतील अनादि अचांना अनुदात्त होणार नाही. पचति या ठिकाणी धातूमधील अकार धातोः ( ६।१।१४ ) या सूत्रानें उदात्त आहे. आणि पुढील शप् प्रत्ययाचा अकार आणि तिप् प्रत्ययाचा इकार हे दोन्ही 'अनुदात्तौ सुप्पितौ ' ( ३।१।४ ) या सूत्रानें अनुदात्त आहेत. तेव्हां तेथे ' तिङतिङः ' यानें आदीला अनुदात्त होईल. करोति यांतील उ या प्रत्ययाला ' प्रत्ययः ' ( ३।३।१ ) या सूत्रानें उदात्त झाला असल्यामुळें ओकार हा उदात्त आहे. त्याला ' तिङतिङः ' या

३. लुट् प्रत्ययान्त क्रियापदामध्यें मधला तास् हा विकरणप्रत्यय ' प्रत्ययः ' ( ३।१।१ ) या सूत्रानें उदात्त होत असल्यामुळे त्याच्या पूर्वीचा धातूमधील अच् ' अनुदात्तं पद० ' ( ६।१।१५८ ) या परिभाषेनें नियमानें अनुदात्त होत असतो. जर लुडन्त क्रियापदामध्यें एखाद्या ठिकाणी तरी आदि अच् उदात्त असता तर तेथे त्याला अनुदात्त होऊं नये असा उपयोग ' न लुट् ' ( ८।१।२९ ) या निषेधाचा सांगतां आला असता. एकंदरीत आदि उदात्त लुडन्तामध्यें नसल्यामुळें 'न लुट्' ( ८।१।२९ ) हें सूत्र व्यर्थ होऊन ज्ञापक होतें.

अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य विधिः प्राप्नोति । यत्र ह्यादिविधिर्नास्त्यलोऽन्त्यविधिना तत्र भवितव्यम् । तत्र को दोषः । तिङतिङ इतीहैव स्यात् देवदत्तयज्ञदत्तौ कुरुतः इह न स्यात् देवदत्तः करोतीति ॥

## लृटि प्रतिषेधात्सिद्धम् ॥ ४ ॥

यदयं लृटि प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्योऽनन्त्यस्याप्यनुदात्तत्वं भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् । न हि लृडन्तमन्तोदात्तमस्ति । ननु चेदमस्ति भोक्ष्य इति ॥

## उक्तं वा ॥ ५ ॥

किमुक्तम् । न वा पदाधिकारस्य विशेषणत्वादिति ॥

इदं तर्हि प्रयोजनं युष्मदस्मदोः षष्ठीचतुर्थीद्वितीयास्थयोर्वान्नावौ [ ८. १. २० ]

---

प्राप्त होतो. कारण ज्या ठिकाणीं ' आदेः परस्य' ( १।१।३४ ) हा विधि नसतो तेथें अलोऽन्त्यस्य हा विधि घेतला जातो.

मग तो घेतला असतां कोणता दोष येतो ?

तिङतिङः ( ८।१।२२ ) ह्यानें सांगितलेला अनुदात्त ' देवदत्तयज्ञदत्तौ कुरुतः' येथेंच होईल, देवदत्तः करोति येथें होणार नाहीं.

( वा. ४ ) तर मग हा आचार्य पाणिनी लृडन्त क्रियापदाला कांहीं ठिकाणीं अनुदात्त होत नाहीं ( ८।१।५१ ) असा ' तिङतिङः ' याचा निषेध सांगतो त्यावरून तो असें ज्ञापित करतो कीं, 'तिङतिङः' या सूत्रानें अनन्त्यालाही अनुदात्त होतो.

कसें बरें हें ज्ञापक जमतें ?

जमतें याचें कारण असें कीं लृट्प्रत्ययान्त क्रियापद अन्तोदात्त कोठेंच दिसत नाहीं.[5]

अहो पण ' भोक्ष्ये ' हें लृट्प्रत्ययान्त क्रियापद अन्तोदात्त दिसतें ना ?[6]

( वा. ५ ) त्याविषयीं सांगितलेंच आहे.

काय सांगितले आहे ?

न वा पदाधिकारस्य विशेषणत्वात् (८।१।१७ वा. ५ ) हे[7].

तर मग सर्व या शब्दाचा उपयोग असा कीं 'युष्मदस्मदोः षष्ठीचतुर्थीद्वितीयास्थयोर्वांनावौ '

---

४. कुरुतः येथे तस् या प्रत्ययांतील अकार 'प्रत्ययः' ( ३।१।१ ) या सूत्राने उदात्त झाला असल्यामुळे त्या अन्त्य अचाला 'तिङतिङः' यानें अनुदात्त होईल. करोति या ठिकाणी तिप् प्रत्ययातील इकार ' अनुदात्तौ सुप्पित्तौ ' ( ३।१।४ ) या सूत्रानें अनुदात्त झाला असल्यामुळें तेथे तिङतिङः हे सूत्र येणार नाही. आणि मधल्या ओ या अचाला अनुदात्त होणार नाही.

५. तास्यनुदात्तेत् ( ६।१।१८६ ) या सूत्रानें स्य प्रत्ययापुढील प्रत्ययाला अनुदात्त होणार आहे. जर लृट्प्रत्ययान्त क्रियापदामध्यें एखाद्या ठिकाणी अन्तोदान्त दृष्टीस पडला असता तर त्या ठिकाणी त्या अन्त्याला अनुदात्त न होण्याकरतां त्या निषेधाचा उपयोग झाला असता.

६. भोक्ष्ये येथें एकादेश उदात्त ( ८।२।५ ) झाला आहे. तेव्हां या लृट् प्रत्ययान्त क्रियापदामध्यें अन्त्य उदात्ताला अनुदात्त न होण्याकरतां तो निषेध (८।१।५१) उपयोगी पडत असल्यामुळें ' अलोऽन्त्यस्य हा विधि येथें येत नाहीं ' याविषयी तो ज्ञापक होत नाहीं. तेव्हां ' अलोऽन्त्यस्य ' याच्या निवृत्तीकरतां सर्व शब्द घातला पाहिजे. असा अभिप्राय आहे.

७. ज्याला कार्य सांगितलें असेल त्याचें पदस्य हें ' पदाचा अवयव ' अशा अर्थानें विशेषण करावें, असें ठरलें असल्यामुळें येथेंही पदाचा अवयव अशा आदि मध्य व अन्त्य सर्वच अचांना अनुदात्त होईल तेव्हां त्याकरतां सर्व शब्द नको असा अभिप्राय आहे.

इति वाम्नावादयः सविभक्तिकस्य यथा स्युरिति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। पदस्य [ १६ ] इति हि वर्तते विभक्त्यन्तं च पदं तत्रान्तरेण सर्वग्रहणं सविभक्तिकस्य भविष्यति। भवेत्सिद्धं यत्र विभक्त्यन्तं पदं यत्र तु खलु विभक्तौ पदं तत्र न सिध्यति। ग्रामो वां दीयते। ग्रामो नौ दीयते। जनपदो वां दीयते। जनपदो नौ दीयते। ननु च स्थग्रहणं क्रियते तेन सविभक्तिकस्यैव भविष्यति। अस्त्यन्यत्स्थग्रहणस्य प्रयोजनम्। किम्। श्रूयमाणविभक्तिविशेषणं यथा विज्ञायेत। यत्र विभक्तिः श्रूयते तत्र यथा स्यादिह मा भूत् इति युष्मत्पुत्रो ददाति इत्यस्मत्पुत्रो ददातीति॥

## समानवाक्ये निघातयुष्मदस्मदादेशाः ॥ ६ ॥

समानवाक्य इति प्रकृत्य निघातयुष्मदस्मदादेशा वक्तव्याः। किं प्रयोजनम्।

---

(८।१।२०) असें पुढे सूत्र आहे तेथे ते वां, नौ, वगैरे आदेश विभक्तिसहित समुदायाला झाले पाहिजेत.

हा देखील सर्व शब्दाचा उपयोग नाहीं. कारण 'पदस्य' असा तेथें अधिकार आहे. आणि पद संज्ञा तर विभक्तिसहितालाच आहे. तेव्हां सर्व शब्द नसला तरी विभक्तिसहितालाच आदेश होईल. ज्या ठिकाणीं विभक्तिसहितालाच पद संज्ञा आहे त्या ठिकाणीं पदस्य या अधिकारानें सिद्ध होईल. परंतु ज्या ठिकाणीं विभक्ति पुढें असतांना पूर्वीच्या भागालाही पद संज्ञा होत आहे त्या ठिकाणीं सिद्ध होत नाहीं. उदा०—ग्रामो वां दीयते, ग्रामो नौ दीयते; जनपदो वां दीयते, जनपदो नौ दीयते.

युष्मदस्मदोः. (८।१।२०) या सूत्रामध्यें स्थग्रहण केले आहे. त्यामुळे विभक्तिसहितालाच आदेश होईल.

पण तेथे स्थग्रहणाचा उपयोग निराळाच आहे?

तो कोणता?

तें स्थग्रहण श्रूयमाण अशा अर्थानें विभक्तीला विशेषण झाले पाहिजे. ते असें कीं ज्या ठिकाणीं षष्ठी चतुर्थी वगैरे विभक्ती लुप्त न होता कायम राहतील तेथेंच ते आदेश झाले पाहिजेत. '[1]इति युष्मत्पुत्रो ददाति, इत्यस्मत्पुत्रो ददाति' या उदाहरणांमध्यें होऊ नयेत.

(वा.६) पुढील विधी समानवाक्यामध्यें करावे असें सांगून नंतर अनुदात्त आणि युष्मद् व अस्मद् याचे आदेश सांगावे.

काय म्हणून?

---

८. युवयोः आवयो. या ठिकाणी षष्ठी द्विवचन ओस् प्रत्यय पुढे असताना पूर्वीच्या भागाला पद संज्ञा नाही. या सूत्राने पद संज्ञा होत आहे. तेव्हां त्या पदाला आदेश न होतां विभक्तिसहित समुदायालाच आदेश होण्याकरतां सर्व शब्द घातला पाहिजे असें सिद्ध झाले.

९. गांव तुम्हा दोघांना दिला आहे, गांव आम्हा दोघांना दिला आहे; असा अर्थ आहे. जनपद म्ह. देश. या ठिकाणी युवाभ्याम् आणि आवाभ्याम् या चतुर्थी द्विवचनान्त समुदायाला क्रमानें वां आणि नौ असे आदेश झाले आहेत. येथें भ्याम् हा प्रत्यय हलादि असल्यामुळें पूर्व भागाला स्वादिष्वसर्व० (१।४।१७)

१०. 'याप्रमाणें तुमचा पुत्र देतो, याप्रमाणें आमचा पुत्र देतो' असा अर्थ आहे. युष्मत्पुत्र अस्मत्पुत्र हे षष्ठीतत्पुरुष समास असल्यामुळे त्यांतील षष्ठी विभक्तीचा लुक् झाला आहे. म्हणून जरी हे युष्मद् व अस्मद् शब्द इति शब्दाच्या पुढें आहेत तरी त्यांना आदेश होत नाहीत.

नानावाक्ये मा भूवन्निति। अयं दण्डो हरानेन। ओदनं पच तव भविष्यति मम भविष्यति॥

## पश्यार्थैश्च प्रतिषेधः ॥७॥

पश्यार्थैश्च प्रतिषेधः समानवाक्य इति प्रकृत्य वक्तव्यः। इतरथा हि यत्रैव पश्यार्थानां युष्मदस्मदी साधनं तत्र प्रतिषेधः स्यात्। ग्रामस्त्वां संप्रेक्ष्य संदृश्य समीक्ष्य गतः। ग्रामो मां संप्रेक्ष्य संदृश्य समीक्ष्य गतः। इह न स्यात्। ग्रामस्तव स्वं संप्रेक्ष्य संदृश्य समीक्ष्य गतः। ग्रामो मम स्वं संप्रेक्ष्य संदृश्य समीक्ष्य गतः॥

## [ आमन्त्रितस्य च ॥ ८।१।१९ ॥ युष्मदस्मदोः षष्ठीचतुर्थीद्वितीया-

---

भिन्न वाक्यांमध्ये होऊं नयेत म्हणून. उदा०- [11]अयं दण्डः, हरानेन; ओदनं पच, तव भविष्यति; मम भविष्यति.

( वा. ७ ) तसेंच युष्मद् व अस्मद् शब्दांचे ठिकाणीं होणाऱ्या आदेशांचा जो ज्ञानार्थक धातूंचा योग असतांना निषेध सांगितला आहे ( ८।१।२५ ) तो देखील 'समानवाक्यामध्यें' असें म्हणूनच सागावा[12]. नाहीं तर ज्या ठिकाणीं युष्मद् व अस्मद् हे ज्ञानार्थक धातूंचें साधन असतील तेथेच तो निषेध होईल. उदा०— 'ग्रामस्त्वां[13] सप्रेक्ष्य संदृश्य समीक्ष्य गतः' येथें निषेध होईल आणि 'ग्रामस्तव [14]स्वं संप्रेक्ष्य समीक्ष्य गतः' या उदाहरणामध्ये होणार नाहीं.

---

११. हा दण्ड आहे, ह्याने ती वस्तु ओढून घे, अशा अर्थाची ही दोन निराळी वाक्यें आहेत. तसेच भात शिजीव, तुला होईल, मला होईल; अशा अर्थाचीं ओदनं पच इत्यादि तीन निराळी वाक्यें आहेत. येथे हर हें क्रियापद दण्डः या पदाहून पर जरी आहे तरी त्याला तिङतिङः ( ८।१।२८ ) या सूत्रानें अनुदात्त होत नाहीं. कारण ज्या पदामुळें ज्या पदाला अनुदात्त करावयाचा ती दोन पदें दण्डः आणि हर ही एका वाक्यांत नाहींत. तसेंच पच आणि तव ही दोन पदें एका वाक्यांत नसल्यामुळे तव याला तेमयावेक० ( ८।१।२२ ) या सूत्राने ते हा आदेश होत नाही. तसेंच मम याला ही मे आदेश होत नाहीं.

१२. याचा उपयोग 'भिन्न वाक्यांमध्यें निषेध न व्हावा' असा संभवत नाही. कारण भिन्न वाक्यांमध्यें आदेशच प्राप्त होत नाहीत. तेव्हां येथें 'समानवाक्ये' याचा उपयोग असा समजावा की युष्मद् व अस्मद् यांचा ज्ञानार्थक धातूशीं साक्षात् किंवा परंपरेनें कसाही संबंध असो फक्त एक वाक्य असलें म्हणजे झालें तशा सर्व ठिकाणीं निषेध व्हावा. नाही तर साक्षात् संबंध असेल तेथेंच निषेध होईल.

१३. येथें ग्राम शब्दाचा लक्षणेनें गांवकरी लोक असा अर्थ आहे. तुला जाणून गांवकरी लोक निघून गेले, असें या वाक्याचें तात्पर्य आहे. येथें त्वाम् याचा जाणणे या क्रियेशीं साक्षात् संबंध आहे. कारण त्वाम् हें त्या क्रियेचें कर्मच आहे. साधन म्ह. कारक.

१४. तुझ्या स्वभावाला जाणून गांवकरी लोक निघून गेले असे या वाक्याचें तात्पर्य. येथें तव याचा स्वम् याच्याशीं संबंध आहे आणि त्या स्वम् याचा जाणणें या क्रियेशी संबंध आहे म्हणून येथें तव याचा जाणणे या क्रियेशी परंपरा-संबंध होत आहे.

१. (सू. १९) पदाहून पर आणि पादाच्या आरंभीं नसणारें असें जें आमन्त्रित पद त्या सर्व पदाला अनुदात्त होतो.

१. (सू. २०) पदाहून पर आणि पादाच्या आरंभीं नसणारे जे युष्मद् आणि अस्मद् हे दोन शब्द त्यांना त्यांच्या पुढील षष्ठी चतुर्थी आणि द्वितीया या विभक्तिसहितांना क्रमानें वां आणि नौ असे दोन आदेश होतात.

**स्थयोर्वानावौ ॥ ८ । १ । २० ॥**
**बहुवचनस्य वस्नसौ ॥ ८ । १ । २१ ॥**
**तेमयावेकवचनस्य ॥ ८ । १ । २२ ॥**
**त्वामौ द्वितीयायाः ॥ ८ । १ । २३ ॥**
**न चवाहाहैवयुक्ते ॥ ८ । १ । २४ ॥**
**पश्यार्थैश्चानालोचने ॥ ८।१।२५ ॥ ]**
**सपूर्वायाः प्रथमाया विभाषा ॥ ८ । १ । २६ ॥**
**युष्मदस्मदोरन्यतरस्यामनन्वादेशे ॥१॥**

युष्मदस्मदोरन्यतरस्यामनन्वादेश इति वक्तव्यम्। ग्रामे कम्बलस्ते स्वम्। ग्रामे कम्बलस्तव स्वम्। ग्रामे कम्बलो मे स्वम्। ग्रामे कम्बलो मम स्वम्। अनन्वादेश इति किमर्थम्। अथो ग्रामे कम्बलस्ते स्वम्। अथो ग्रामे कम्बलो मे स्वम् ॥

अपर आह। सर्व एव वाम्नावादयोऽनन्वादेशे विभाषा वक्तव्याः। कम्बलस्ते

(सू. २६ वा. १) युष्मद् व अस्मद् या शब्दांना जे ह्या सूत्रानें आदेश विकल्पानें होतात असें सांगितलें आहे तें अन्वादेश नसतांना असें सांगावें. उदा०—ग्रामे कम्बलस्तव स्वं, ग्रामे कम्बलस्ते स्वम्. ग्रामे कम्बलो मम स्वं, ग्रामे कम्बलो मे स्वम्.

अन्वादेश नसतांना असें कशाकरितां सांगितलें पाहिजे?

अथो ग्रामे कम्बलस्ते स्वम्; अथो ग्रामे कम्बलो मे स्वम्. या उदाहरणांमध्यें हे आदेश विकल्पानें होऊं नयेत म्हणून.

येथें अन्य आचार्य असें म्हणतात कीं सर्वच ठिकाणचे हे वां नौ वगैरे आदेश अन्वादेश नसतांना विकल्पानें सांगावे. उदा०—कम्बलस्ते

१. (सू. २१) पूर्वीच्या सूत्रामध्ये जसे युष्मद् आणि अस्मद् हे शब्द गृहीत धरले आहेत तसेच ते असून फक्त ते जर बहुवचनान्त असतील तर त्यांना क्रमानें वस् आणि नस् असे आदेश होतात.

१. (सू. २२) तसेंच ते जर एकवचनान्त असतील तर त्यांना क्रमानें ते आणि मे असे आदेश होतात.

१. (सू. २३) त्यांत सुद्धां ते जर द्वितीयैकवचनान्त असतील तर त्यांना क्रमानें त्वा आणि मा असे आदेश होतात.

१. (सू. २४) च, वा, ह, अह, एव यांपैकी कोणाचाही योग असेल तर युष्मद् आणि अस्मद् या शब्दांना युष्मदस्मदोः (८।१।२०) इत्यादि चारी सूत्रांनी सांगितलेले कोणतेही आदेश करूं नयेत.

१. (सू. २५) ज्ञानार्थक धातूचा योग असतांना युष्मद् आणि अस्मद् या शब्दांना वर सांगितलेले आदेश करूं नयेत. परंतु तें ज्ञान चाक्षुष ज्ञानाशिवाय इतर ज्ञान असेल तर.

१. (सू. २६) वाक्यामध्यें ज्या प्रथमान्त पदाच्या पूर्वी दुसरें एखादें पद दिसत आहे अशा प्रथमान्त पदाच्या पुढील युष्मद व अस्मद् शब्दांना पूर्वी सांगितलेले आदेश विकल्पानें करावे.

२. कांहीं एक कार्य सांगण्याकरतां ज्याचा उल्लेख एका वाक्यांत केला आहे त्याचाच पुनः दुसऱ्या वाक्यांत निराळें कार्य सांगण्याकरतां जो उल्लेख केला जातो त्याला ‘ अन्वादेश ’ म्हणतात.

३. येथे कम्बलः या प्रथमान्त पदाच्या पूर्वी ग्रामे हें पद दिसत आहे. त्या प्रथमान्ताच्या पुढील तव हें युष्मद् शब्दाचें आणि मम हें अस्मद् शब्दाचें अशीं जीं रूपें आहेत त्यांना ते आणि मे हे आदेश विकल्पानें केले आहेत.

४ पूर्वी तूं नुसता येथें बसत होतास पण आतां हा कांबळा तुझ्या मालकीचा झाला आहे. अथो हें अव्यय ‘ पण आतां ’ अशा अर्थाचें अन्वादेशाचें निदर्शक आहे. कारण त्यामुळेंच त्याच्या पूर्वी कांहीं तरी एखादें वाक्य आहे असें सूचित होतें.

स्वम् । कम्बलस्तव स्वम् । कम्बलो मे स्वम् । कम्बलो मम स्वम् । अनन्वादेश इति किमर्थम् । अथो कम्बलस्ते स्वम् । अथो कम्बलो मे स्वम् ॥ न तर्हीदानीमिदं वक्तव्यं सपूर्वायाः प्रथमाया विभाषेति । वक्तव्यं च । किं प्रयोजनम् । अन्वादेशार्थम् । अन्वादेशे विभाषा यथा स्यात् । अथो ग्रामे कम्बलस्ते स्वम् । अथो ग्रामे कम्बलस्तव स्वम् । अथो ग्रामे कम्बलो मे स्वम् । अथो ग्रामे कम्बलो मम स्वम् ॥

**तिङो गोत्रादीनि कुत्सनाभीक्ष्णययोः ॥ ८ । १ । २७ ॥**

किमिदं तिङो गोत्रादिषु कुत्सनाभीक्ष्णयग्रहणं पाठविशेषणम् । कुत्सनाभीक्ष्णययोरर्थयोर्गोत्रादीनि भवन्ति तिङः पराण्यनुदात्तानीति । आहोस्विदनुदात्तविशेषणम् । तिङः पराणि गोत्रादीनि कुत्सनाभीक्ष्णययोरर्थयोरनुदात्तानि भवन्तीति ।

**तिङो गोत्रादिषु कुत्सनाभीक्ष्णयग्रहणं पाठविशेषणम् ॥ १ ॥**

तिङो गोत्रादिषु कुत्सनाभीक्ष्णयग्रहणं क्रियते पाठविशेषणम् । पाठो विशेष्यते ॥

---

स्वम् कम्बलस्तव स्वम्[५]; कम्बलो मे स्वम् कम्बलो मम स्वम्.

अन्वादेश नसतांना असें कशाकरतां म्हटलें आहे ?

अथो कम्बलस्ते स्वम्, अथो कम्बलो मे स्वम् या उदाहरणांमध्यें हे आदेश विकल्पानें होऊं नयेत म्हणून.

तर मग आतां ' सपूर्वायाः '० या सूत्रानें विकल्प सांगावयाला नको.

सांगितला पाहिजे.

कशाकरतां ?

अन्वादेशाकरतां[६]. अन्वादेश असतांना विकल्प झाला पाहिजे. उदा०— अथो ग्रामे कम्बलस्ते स्वम्, अथो ग्रामे कम्बलस्तव स्वम्. अथो ग्रामे कम्बलो मे स्वम्, अथो ग्रामे कम्बलो मम स्वम्.

(सू.२७) ह्या सूत्रामध्यें कुत्सनाभीक्ष्ण्य ग्रहण हें पाठाचें विशेषण समजावें कीं ज्यामुळें 'गोत्र वगैरे शब्द हे कुत्सन किंवा आभीक्ष्ण्य अर्थ गम्यमान होत असेल तरच ते गोत्रादि गणामध्यें पठित समजावेत आणि ते क्रियापदाच्या पुढें असतील तर त्यांना अनुदात्त होतो ' असा अर्थ होईल, अथवा कुत्सनाभीक्ष्ण्य ग्रहण हें अनुदात्ताचें विशेषण समजावें कीं ज्याच्या योगानें ' क्रियापदाच्या पुढील जे गोत्रादिगणपठित शब्द त्यांना कुत्सन किंवा आभीक्ष्ण्य अर्थ गम्यमान असतांना अनुदात्त होतो ' असा अर्थ होईल ?

(वा.१) तिङो गोत्रा० ह्या सूत्रामध्यें कुत्सनाभीक्ष्ण्य ग्रहण हे पाठाचें विशेषण केलें आहे. गणामध्यें पाठच विशेष प्रकारचा ठरविला जातो.

---

५. येथे कम्बलः या प्रथमान्त पदाच्या पूर्वी कांहींच नाहीं तरी येथें आदेश विकल्पानें झाला आहे.

६. ह्या अन्य आचार्यांच्या मती सपूर्वायाः०सूत्रानें अन्वादेश असला तरी विकल्प होतो. पूर्वीच्या मती अन्वादेशामध्यें केव्हांही विकल्प नाहीं.

१. (सू. २७) क्रियापदाच्या पुढें असलेल्या गोत्रादि गणपठित शब्दांना अनुदात्त होतो निंदा किंवा आभीक्ष्ण्य गम्यमान असेल तर.

२. तेव्हां ' ज्या वाक्यामध्यें कुत्सन किंवा आभीक्ष्ण्य यांपैकीं कोणताही अर्थ प्रतीत होत नसेल त्या वाक्यांतील गोत्र वगैरे शब्द हे गोत्रादि गणांतीलच नव्हेत ' असें ठरल्यामुळें गोत्रादि गणाला उद्देशून कोठेंहि कोणतेंही कार्य सांगितलेलें कुत्सन किंवा आभीक्ष्ण्य हा अर्थ प्रतीत होत असेल तरच करतां येतें.

**अनुदात्तविशेषणे ह्यन्यत्र गोत्रादिग्रहणे कुत्सनाभीक्ष्ण्यग्रहणम् ॥ २ ॥**

अनुदात्तविशेषणे हि सत्यन्यत्र गोत्रादिग्रहणे कुत्सनाभीक्ष्ण्यग्रहणं कर्तव्यं स्यात् । चनचिदिवगोत्रादितद्धिताम्रेडितेष्वगतेः [ ८. १. ५७ ] इति कुत्सनाभीक्ष्ण्ययोरिति वक्तव्यं स्यात् ॥

**अनुदात्तग्रहणं वा ॥ ३ ॥**

अथवा यान्यनुदात्तानीति वक्तव्यं स्यात् ॥ तस्मात्सुष्ठुच्यते तिङो गोत्रादिषु कुत्सनाभीक्ष्ण्यग्रहणं पाठविशेषणमनुदात्तविशेषणे ह्यन्यत्र गोत्रादिग्रहणे कुत्सनाभीक्ष्ण्यग्रहणमनुदात्तग्रहणं वेति ॥

**तिङ्ङतिङः ॥ ८ । १ । २८ ॥**[1]

अतिङ इति किमर्थम् । पचति करोति ।[2]

**अतिङ्ग्रहणमनर्थकं समानवाक्याधिकारात् ॥ १ ॥**

अतिङ्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । समानवाक्याधिकारात् । समानवाक्य इति वर्तते न च समानवाक्ये द्वे तिङन्ते स्तः ॥

**[ न लुट् ॥ ८।१।२९ ॥ ]**[1]

**निपातैर्यद्यदिहन्तकुविन्नेच्चण्कच्चिद्यत्रयुक्तम् ॥ ८ । १ । ३० ॥**[1]

निपातैरिति किमर्थम् । यत्कूजति शकटम् ।[2]

---

(वा २) कारण अनुदात्ताचें विशेषण केले तर दुसरीकडे गोत्रादि गणाचें ग्रहण केलें असेल तेथें कुत्सनाभीक्ष्ण्य ग्रहण करावे लागेल. उदा०— ' चनचिदिवगोत्रादितद्धिताम्रेडितेष्वगते: ' ( ८। १।५७ ) या सूत्रामध्ये कुत्सनाभीक्ष्ण्ययो: असें म्हणावें लागेल.

(वा.३) किंवा [3]तेथें 'जे गोत्रादिगणपठित-शब्द ते अनुदात्त आहेत ' असे तरी म्हणावे लागेल. एकदरीत तिङो गोत्रा० या सूत्रामध्यें कुत्सनाभीक्ष्ण्य ग्रहण हें पाठाचें विशेषण आहे असें जें सांगितलें आहे तेंच चांगलें आहे. कारण अनुदात्ताचें विशेषण केलें तर दुसरीकडे गोत्रादि गणाचें ग्रहण केलें असता तेथे कुत्सनाभीक्ष्ण्य ग्रहण किंवा अनुदात्त ग्रहण करावे लागणार आहे.

( सू. २८ ) अतिङ: असे कशाकरता म्हटलें आहे ?

' पचति करोति ' येथे करोति या क्रियापदाला अनुदात्त होऊं नये याकरता.

( वा. १) अतिङ: हें निरुपयोगी आहे.

कां बरे ?

समानवाक्ये अशा अधिकाराचा येथें संबध आहे; आणि एका वाक्यामध्ये तर दोन क्रियापदें असत नाहीत.

( सू. ३०) निपातै: असें कशाकरतां म्हटलें आहे ?

यत्कूजति शकटम्; यती कूजति शकटी; यन् होत नाहीं.

---

३. चनचिदिव० या सूत्रामध्यें.

१. (सू. २८ ) तिङन्त म्हणजे क्रियापद. क्रियापदाशिवाय इतर पदाच्या पुढील क्रियापदाला अनुदात्त होतो.

२. ( अन्न ) शिजवतो ( आणि भोजन ) करतो असा अर्थ आहे. ' अन्नं पचति, करोति भोजनम् ' या दोन वाक्यांतील 'पचति व करोति' यांचा अनुवाद केला आहे.

१. (सू. २९ ) लुट् प्रत्ययान्त क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं.

१. (सू. ३०) यत्, यदि, हन्त, कुवित्, नेत्, चेत्, चण्, कच्चिद् आणि यत्र या निपातांनीं युक्त जें क्रियापद त्याला अनुदात्त होत नाही.

२. या उदाहरणामध्यें यत् हें अव्यय नव्हे. हें शकटाचें विशेषण आहे. इण् धातुला शतृ प्रत्यय लागून यत् हा शब्द सिद्ध झाला आहे. एति गच्छति इति यत्, अशी याची व्युत्पत्ति आहे. गाडी चालतांना

यती कूजति शकटी। यन्नथः कूजति ॥ निपातैरिति शक्यमवक्तुम्। कस्मान्न भवति। यत्कूजति शकटम्। यती कूजति शकटी। यन्नथः कूजति। लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥ नैषा परिभाषेह शक्या विज्ञातुम्। इह हि दोषः स्यात्। यावद्यथाभ्याम् [ ३६ ] इह न स्यात्---यावदस्त्यत्रैषः सरो जनेभ्यः कृणवत् ॥

**चण्णिद्विशिष्टश्चेदर्थे ॥ १ ॥**

चण्णिद्विशिष्टश्चेदर्थे द्रष्टव्यः। अयं च वै मरिष्यति। अयं चेन्मरिष्यति। न च पितृभ्यः पूर्वेभ्यो दास्यति। अप्रायश्चित्तिकृतौ च स्याताम् ॥

**[नह[1] प्रत्यारम्भे ॥ ८।१।३१ ॥**

**सत्यं[1] प्रश्ने ॥ ८।१।३२ ॥**

**अङ्गाप्रातिलोम्ये[1] ॥ ८।१।३३ ॥**

---

रथः कूजति या उदाहरणांमध्यें निषेध होऊं नये, याकरतां.

निपातैः असे येथे नाहीं म्हटले तरी चालेल. तर मग यत्कूजति शकटम्, यती कूजति शकटी, यन् रथः कूजति या उदाहरणांमध्यें हा निषेध कां होत नाहीं ?

' लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त यापैकीं प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें ' या परिभाषेनें होत ना[3]हीं.

पण या प्रकरणामध्यें ही परिभाषा घेणें शक्य नाहीं. कारण कीं जर परिभाषा घेतली तर दोष येईल. तो असा--'या[4]वदस्य उषः सरो जनेभ्यः कृणवत् ' या उदाहरणामध्ये ' यावद्यथाभ्याम् ' ( ८।१।३६ ) हा निषेध येणार नाहीं.

(वा.१) सूत्रामध्यें चण् हा इत्संज्ञक णकारानें युक्त असा निपात उच्चारला आहे तो चेत्[5] या अव्ययाच्या अर्थी जाणावा. उदा०--'अयं च वै मरिष्यति' हा आतां जर मरेल असा अर्थ होय. ' न च[6] पितृभ्यः पूर्वेभ्यो दास्यति' 'अप्रा[7]यश्चित्तिकृतौ च स्याताम्. '

---

वाजते असा याचा अर्थ आहे. शकट शब्द स्त्रीलिंगी आणि नपुंसकलिंगी आहे. येथे यत् हे अव्यय नव्हे हे समजण्याकरता तिन्हीं लिंगांची उदाहरणें दिली आहेत.

३. अव्ययाच्या गणामध्यें यत् असे पाणिनीने उच्चारले असल्यामुळे तें प्रतिपदोक्त होय. इण् धातूला शतृ प्रत्यय लागून इकाराला यकार होऊन तयार झालेला यत् शब्द लाक्षणिक होय. लक्षण म्ह० शास्त्र. त्यानें तयार झालेला तो लाक्षणिक होय.

४. यत्तदेतेभ्यः ( ५।२।३९ ) या यत् शब्दाहून वतुप् प्रत्यय होऊन आ सर्वनाम्नः ( ६।३।९१ ) या सूत्रानें आकार होऊन यावत् हा शब्द तयार झाला असल्यामुळें लाक्षणिक होय. ' यावदस्य० ' हें वाक्य वेदांमध्यें कोठे आहे तें कळत नाहीं. डॉ. कीलहॉर्न यांनीं ' यावदस्त्यत्रैषः सरो जनेभ्यः कृणवत्' असा पाठ दिला आहे, व इतर दोनतीन पाठभेद दिले आहेत; ' यावदस्य उषः सरो० ' हा पाठ बरा दिसतो.

५. आशंका आणि अवधारण हे चेत् याचे अर्थ आहेत.

६. हा पितराना कांहीं देणार नाही असें वाटतें असा अर्थ आहे. येथें च याचा आशंका अर्थ आहे. येथें चेत् आणि च या दोहोंचा संभावना अर्थ आहे.

७. खात्रीनें हे प्रायश्चित्त न करणारेच आहेत. येथे च याचा अर्थ अवधारण आहे.

१. (सू.३१) मूळ उपक्रमच जर निषेधानें युक्त केला जात असेल तर तशा ठिकाणी नह याच्याशी युक्त क्रियापदाला अनुदात्त होत नाही. उदा०-- ' नह भोक्ष्यसे' काय आपण आतां येथें भोजन करणार नाहींच ना ? असा अर्थ आहे. अतिथि आल्याबरोबर त्याच्याशीं प्रास्ताविक भाषणातच वरील वाक्य आले आहे.

१. ( सू. ३२ ) प्रश्नदर्शक वाक्यामध्ये सत्य शब्दानें युक्त क्रियापदाला अनुदात्त होत नाही.

१. ( सू. ३३ ) ' अङ्ग ' यानें युक्त क्रियापदाला अनुदात्त होत नाही प्रातिकूल्य प्रतीत होत नसेल तर.

हि च ॥ ८।१।३४ ॥ ]

छन्दस्यनेकमपि साकाङ्क्षम् ॥ ८ । १ । ३५ ॥

अनेकमिति किमुदाहरणम्। यदा ह्यसौ मत्तो भवति अथ यत्तपति। नैतदस्ति। एकमत्र हियुक्तमपरं यद्युक्तं तत उभयोरप्य निघातः। इदं तर्हि। अनृतं हि मत्तो वदति पाप्मा एनं विपुनाति ॥ एकं खल्वपि। अग्निर्हि पूर्वमुदजयत्तमिन्द्रोऽनूदजयदिति ॥

[ यावद्यथाभ्याम् ॥ ८।१।३६ ॥

पूजायां नानन्तरम् ॥ ८।१।३७ ॥

उपसर्गव्यपेतं च ॥ ८।१।३८ ॥ ]

तुपश्यपश्यताहैः पूजायाम् ॥ ८ । १ । ३९ ॥

पूजायामिति वर्तमाने पुनः पूजाग्रहणं किमर्थम्। अनिघातप्रतिषेधाभिसंबद्धं तत्। यदि

---

( सू. ३५ ) या सूत्राचें उदाहरण कोणतें ? 'यदा हि असौ मत्तो भवति अथ यत्तपति' हें उदाहरण होय हे ह्या सूत्राचें उदाहरण नव्हे. कारण या उदाहरणामध्ये एक क्रियापद हि यानें युक्त आहे, आणि दुसरें यत् यानें युक्त आहे. तेव्हा दोघानाही पूर्वीच्या सूत्रानींच अनुदात्त होणार नाहीं.

तर मग 'अनृत हि मत्तो वदति पाप्मा एनं विपुनाति' हे उदाहरण घ्यावें. तसेंच अनेक क्रियापदांपैकीं एकाला अनुदात्त झाला नाहीं, याचें उदाहरण 'अग्निर्हि पूर्वमुदजयत् तमिन्द्रोऽनूदजयत्' हें घ्यावें.

( सू. ३९ ) पूजायाम् असें मागाहून अनुवृत्त येत असताना पुनः येथे पूजाग्रहण कशाकरितां केले आहे ?

ते पूजाग्रहण अनुदात्ताच्या निषेधाच्या निषे-

---

१. ( सू. ३४ ) हि यानें युक्त अशा क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं.

१. ( सू. ३५ ) वेदामध्ये हि या अव्ययाचा योग असताना परस्पर-संबद्ध अशा अनेक क्रियापदांमध्यें अनेकांना किंवा एकाला अनुदात्त होत नाहीं.

२. हा जेव्हा उन्मत्त होतो तेव्हां अगदी संतप्त झालेला असतो असा अर्थ आहे.

३. हि च ( ८।१।३४ ) आणि निपातैर्यद्यदि० ( ८।१।३० ) या सूत्रांनी.

४. मत्त झालेला मनुष्य खोटें बोलतो म्हणून त्याला पातक चिकटतें असा अर्थ आहे.

५. अग्नीने पूर्वी जिकलें आणि मागाहून त्याला इन्द्राने जिकलें असा अर्थ आहे पहिले अजयत् हे आद्युदात्त आहे. आणि दुसरें अजयत् हे अनुदात्त आहे. अनेक क्रियापदें असतील तेथें कोठें अनेकांना अनुदात्ताचा निषेध होतो आणि कोठें एकालाच अनुदात्ताचा निषेध होतो ते वेदांतील प्रयोग पाहून ठरवावें.

१. (सू. ३६) यावत् किंवा यथा यानी युक्त अशा क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं.

१. (सू. ३७) यावत् किंवा यथा यानीं युक्त आणि यावत् किंवा यथा याच्या जवळ असलेल्या क्रियापदाला पूर्व सूत्रानें सांगितलेला अनुदात्ताचा निषेध होत नाहीं, पूजा गम्यमान असतांना.

१. (सू. ३८) यावत् किंवा यथा यांपैकीं एक आणि क्रियापद यांमध्यें उपसर्गानें व्यवधान होत असेल तरी पूर्वसूत्रानें सांगितलेला जो अनुदात्ताच्या निषेधाचा निषेध तो करावा.

१. (सू. ३९) वाक्यामध्यें पूजा गम्यमान होत असून तु, पश्य, पश्यत आणि अह यांपैकीं कोणाचाही योग असेल तर त्या क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं.

२. पूजायां नानन्तरम् (८।१।३७) या सूत्रातून.

तदनुवर्ततेहाप्यनिघातप्रतिषेधः प्रसज्येत । इष्यते चात्र निघातप्रतिषेधः ॥ यथा पुनस्तत्र यावद्यथेत्येताभ्यामनिघाते प्राप्ते ऽनिघातप्रतिषेध उच्यत इहेदानीं केनानिघाते प्राप्तेऽनिघातप्रतिषेध उच्येत । इहापि यद्वृत्तान्नित्यम [८.१.६६] इत्येवमादिभिः ॥

**[ [1]अहो च ॥ ८ । १ । ४० ॥**

**[1]शेषे विभाषा ॥ ८।१।४१ ॥**

**[1]पुरा च परीप्सायाम् ॥ ८।१।४२॥**

**[1]नन्वित्यनुज्ञैषणायाम्॥८।१।४३॥**

**[1]किं क्रियाप्रश्नेनुपसर्गमप्रतिषिद्धम् ॥ ८।१।४४ ॥**

**[1]लोपे विभाषा ॥ ८।१।४५ ॥ ]**

**[1]एहि मन्ये प्रहासे लृट् ॥८।१।४६॥**

किमर्थमिदमुच्यते न गत्यर्थलोटा लृडित्येव सिद्धम् । नियमार्थोऽयमारम्भः । एहि

---

घाशीं सबद्ध झाले आहे. जर तेंच येथे अनुवृत्त होईल तर या सूत्रामध्येंही अनुदात्ताच्या निषेधाचा निषेध होऊ लागेल. आणि येथें अनुदात्ताचाच निषेध इष्ट आहे.

जसें त्या ठिकाणीं यावत् किंवा यथा याने युक्त अशा क्रियापदाला 'यावद्यथाभ्याम्' ( ८। १।३६ ) या सूत्रानें अनुदात्ताचा निषेध प्राप्त झाला असतां त्या अनुदात्ताच्या निषेधाचा निषेध सांगितला आहे तसे या ठिकाणीं कोणत्या सूत्रानें अनुदात्ताचा निषेध प्राप्त झाला असतां हा त्या अनुदात्ताच्या निषेधाचा निषेध सांगितला आहे असे म्हणतां येईल ?

येथेंही यद्वृत्तान्नित्यम् ( ८।१।६६ ) इत्यादि सूत्रांनीं अनुदात्ताचा निषेध प्राप्त होत आहे.

(सू. ४६) हे सूत्र कशाकरतां सांगितले आहे ? सांगावयास नको. कारण ' गत्यर्थलोटा लृट्० ' ( ८।१।५१ ) या सूत्रानेंच सिद्ध होत आहे.

नियम करण्याकरतां या सूत्राचा आरंभ आहे. नियम असा कीं— ' एहि मन्ये याचा योग असतांना जर क्रियापदाला गत्यर्थलोटा० या सूत्राने अनुदात्ताचा निषेध होईल तर प्रहास गम्यमान असेल तरच तो करावा अन्यत्र करूं नये.'

---

३. एकंदरींत ' तुपश्य० ' या सूत्राने अनुदात्ताच्या निषेधाचा निषेध होत नाही. तर 'तिङ्ङतिङः' ( ८।१।२८ ) या सूत्रानें प्राप्त झालेल्या अनुदात्ताचाच निषेध होतो असें सिद्ध झालें.

१. (सू. ४०) पूजा गम्यमान असतांना 'अहो' या अव्ययानें युक्त क्रियापदाला अनुदात्त होत नाही.

१. (सू. ४१) पूजा गम्यमान होत नसेल तर 'अहो' या अव्ययानें युक्त क्रियापदाला अनुदात्त विकल्पानें होत नाहीं.

१. (सू. ४२) त्वरा गम्यमान असतांना पुरा या अव्ययानें युक्त क्रियापदाला अनुदात्त विकल्पानें होत नाही.

१. (सू. ४३) अनुज्ञेची प्रार्थना गम्यमान असतांना ननु या अव्ययाने युक्त क्रियापदाला अनुदात्त होत नाही.

१. (सू. ४४) किं शब्दानें युक्त आणि उपसर्गरहित अशा क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं. परंतु त्या किं शब्दानें दाखविलेला प्रश्न क्रियेबद्दल असेल तर आणि त्या क्रियेचा निषेध गम्यमान होत नसेल तर.

१. (सू. ४५) पूर्व सूत्राच्या विषयामध्येंच जर किं शब्दाचा फक्त प्रयोग नसेल तर तेथें क्रियापदाला अनुदात्त विकल्पानें होत नाही.

१. (सू. ४६) 'एहि मन्ये' या पदसमुदायानें युक्त जें लृट्प्रत्ययान्त क्रियापद त्याला पण प्रहास गम्यमान असेल तरच अनुदात्त होत नाहीं.

२ कारण ' एहि मन्ये ' यांतील एहि इ गत्यर्थक धातूचें लोट्प्रत्ययान्त क्रियापद आहे.

मन्ये प्रहास एव यथा स्यात्। क मा भूत्। एहि मन्ये रथेन यास्यसीति ॥

## जात्वपूर्वम् ॥ ८ । १ । ४७ ॥

किमिदमपूर्वग्रहणं जातुविशेषणम् । जातुशब्दादपूर्वात्तिङन्तमिति । आहोस्वित्तिङन्तविशेषणम् । जातुशब्दात्तिङन्तमपूर्वमिति । जातुविशेषणमित्याह । कथं ज्ञायते । यदयं किंवृत्तं च चिदुत्तरम् [ ४८ ] इत्याह । कथं कृत्वा ज्ञापकम् । अत्राप्यपूर्वमित्येतदनुवर्तते न चास्ति संभवो यत्किंवृत्तं च चिदुत्तरं स्यात्तिङन्तं चापूर्वम् । अत्रापि तिङन्तविशषणमेव । कथम् । किंवृत्ताच्चिदुत्तरात्तिङन्तम-

कोठे निषेध होऊ नये म्हणून हा नियम केला आहे ? उदा०– 'एहि मन्ये रथेन यास्यसि ' या उदाहरणामध्यें.

(सू. ४७) हें अपूर्वग्रहण जातु याचें विशेषण आहे काय कीं ज्याच्या योगानें ज्याच्या पूर्वीं काहीं नाहीं अशा जातु शब्दाहून पुढील क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं असा अर्थ होईल, अथवा ते क्रियापदाचें विशेषण आहे कीं ज्यामुळें जातु शब्दाहून पर आणि ज्याच्या पूर्वीं काहीं नाहीं असें जे क्रियापद त्याला अनुदात्त होत नाहीं असा अर्थ होईल?

जातु याचें विशेषण आहे असे सांगतों. असे कशावरून समजतें ?

हा आचार्य पाणिनि 'किंवृत्त च चिदुत्तरम्' ( ८।१।४८ ) असे जें सांगतो त्यावरून.

हें ज्ञापक कसे जमतें ?

किंवृत्तम् ( ८।१।४८ ) या सूत्रामध्यें अपूर्वम् हे पद अनुवृत्त आहे आणि किंवृत्त हें चिदुत्तर व ज्याच्या पूर्वीं कांहीं नाहीं असें क्रियापद एका वाक्यामध्यें असण्याचा सभवच दिसत नाहीं.

' किंवृत्तम् ' या सूत्रामध्यें देखील अपूर्वम् हें क्रियापदाचेंच विशेषण होईल.

कसें ?

चिदुत्तर अशा किंवृत्ताहून पुढील अपूर्व म्ह० अव्यवहित असें जें क्रियापद असा अर्थ संभवतो.

---

१. (सू. ४७ जातु या अव्ययानें युक्त अशा क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं, परंतु त्या जातु या अव्ययाच्या पूर्वीं कोणताही एखादा शब्द नसेल तर. सूत्रामध्यें तृतीयार्थीं प्रथमा आहे.

२. किमा वृत्तं किंवृत्तम् । किंवृत्त म्हणजे किं या शब्दापासून तयार झालेले रूप. चित् उत्तरं यस्मात्तत् चिदुत्तरम्. चिदुत्तर म्ह० ज्याच्या पुढें चित् हें अव्यय आहे असें–किंचित्, कश्चित्, केनचित्, कतराश्चित्, कतमाश्चित् इत्यादि रूपें हीं चिदुत्तर किंवृत्त होत. चिदुत्तर किंवृत्ताच्या पुढील क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं, असा त्या सूत्राचा अर्थ आहे.

३. कारण, चिदुत्तर किंवृत्त हे क्रियापदाच्या पूर्वीं असल्यामुळें तेथें तें क्रियापद ज्याच्या पूर्वीं कांहीं नाहीं असें कसें होणार ? क्रियापदाच्या पुढें किंवृत्त असेल तर तसा योग मुळींच धरतां येत नाहीं. पुढें ( ८।१।५६ ) पहा.

पूर्वमिति ॥ यत्तर्ह्याहो उताहो चानन्तरम् [४९] इत्यनन्तरग्रहणं करोति । एतस्याप्यस्ति वचने प्रयोजनम् । किम् । शेषप्रक्लृप्त्यर्थमेतत्स्यात् । शेषे विभाषा [५०] कश्च शेषः । सान्तरं शेष इति । अन्तरेणाप्यनन्तरग्रहणं प्रक्लृप्तः शेषः । कथम् । अपूर्वे इति वर्तते । शेषे विभाषा । कश्च शेषः । सपूर्वः शेष इति ॥

**[किंवृत्तं च चिदुत्तरम् ॥ ८।१।४८ ॥**

**आहो उताहो चानन्तरम् ॥ ८।१।४९ ॥**

**शेषे विभाषा ॥ ८।१।५० ॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरण-महाभाष्ये ऽष्टमस्याध्यायस्य प्रथमे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

तर मग 'आहो उताहो चानन्तरम्' ( ८।१।४९ ) या सूत्रामध्यें पाणिनि जे अनन्तरग्रहण करतो, त्यावरून ( अपूर्वे हा शब्द जातु याचे विशेषण आहे असें समजतें ). त्या अनन्तर-ग्रहणाचाही अन्य तऱ्हेने उपयोग संभवतो.

अनन्तर-ग्रहणाचाही अन्य तऱ्हेनें उपयोग संभवतो.

कसा ?

शेष म्हणजे काय याची कल्पना मनात येण्याकरिता तें अनन्तरग्रहण उपयोगीं पडेल. ते असें कीं – 'शेषे विभाषा' ( ८।१।५० ) असे त्याच्या पुढे सत्र आहे. तेथें शेष म्हणजे काय? असा प्रश्न उपस्थित झाल्याबरोबर लगेच 'व्यवहित तो शेष' अशी कल्पना पूर्वसूत्रातील अनन्तर ग्रहणाच्या अनुसधानानें मनांत [५] येते.

अनन्तरग्रहणाशिवाय दखील शेष म्हणजे काय ती कल्पना करतां येते.

कशी ?

अपूर्वम् असे मागाहून चालू झालेलें आहे. त्यापुढे 'शेषे विभाषा' असे म्हटल्याबरोबर शेष म्हणजे काय असा प्रश्न उपस्थित झाला कीं जो सपूर्व तो शेष अशी कल्पना अपूर्वम् या पदाच्या अनुसधानाने करतां येईल.

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील आठव्या अध्यायाच्या पहिल्या पादातील पहिले आह्निक समाप्त झालें.

---

४ अनन्तर म्ह. अव्यवहित. आहो किंवा उताहो यांच्या अव्यवहित पुढे जें क्रियापद त्याला अनुदात्त होत नाहीं असा त्या सूत्राचा अर्थ आहे.

५. उक्तादन्यः शेषः म्ह. पूर्वीं सांगितलेल्यापेक्षां जो निराळा तो शेष असा शेष पदाचा अर्थ आहे. अनन्तर म्ह. अव्यवहित. त्यापेक्षा निराळा म्ह. व्यवहित हा तेथें शेषपदाचा अर्थ होतो.

६. तेव्हा शेष पदार्थाच्या कल्पनेकरतां अनतरग्रहण नको त्याचा उपयोग आहो अथवा उताहो यांपुढें अव्यवहित क्रियापदाला अनुदात्ताचा निषेध व्हावा, व्यवहिताला होऊं नये हाच होय. तोही उपयोग अपूर्वम् हे जर अव्यवहित अशा अर्थानें क्रियापदाचें विशेषण केलें तर संभवत नाहीं. तेव्हां त्याला वैयर्थ्य येईल. आतां अपूर्वं हे ' क्रियापदाचें विशेषण करूं नये ' असें गृहीत धरले तर व्यवहि ाची निवृत्ति करून अनन्तरग्रहण सार्थक होते. एकंदरींत ते ज्ञापक बरोबर जमते असें सिद्ध झालें.

१. (सू. ४८) सूत्र ४७ टीप २ पहा.

१. (सू. ४९) सूत्र ४७ टीप ४ पहा.

१. (सू. ५०) आहो किंवा उताहो यानें युक्त क्रियापद जर व्यवहित असेल तर त्या क्रियापदाला अनुदात्त विकल्पाने होत नाहीं.

**गत्यर्थलोटा लृण्न चेत्कारकं सर्वान्यत् ॥ ८ । १ । ५१ ॥**

**लृटः प्रकृतिभावे कर्तुरन्यत्व उपसंख्यानं कारकान्यत्वात् ॥ १ ॥**

लृटः प्रकृतिभावे कर्तुर्यत्कारकमन्यत्तस्यान्यत्व उपसंख्यानं कर्तव्यम् । आगच्छ देवदत्त ग्राममोदनं भोक्ष्यसे । किं पुनः कारणं न सिध्यति । कारकान्यत्वात् । न चेत्कारकं सर्वान्यदित्युच्यते सर्वान्यच्चात्र कारकम् ॥ किं पुनः कारणं सर्वान्यत्प्रतिषेधेनाश्रीयते न पुनरसर्वान्यद्विधानेनाश्रीयेत । कर्ता चात्रासर्वान्यस्ततः कर्तृसामान्यात्सिद्धम् ।

**कर्तृसामान्यात्सिद्धमिति चेत्तद्भेदेऽन्यसामान्ये प्रकृतिभावप्रसङ्गः ॥ २ ॥**

---

(सू ५१ वा. १) लृट् प्रत्ययान्त क्रियापदाला हा जो प्रकृतिभाव सांगितला आहे त्या ठिकाणीं कर्त्यापेक्षां जें निराळें कारक ते भिन्न असतानाही हा प्रकृतिभाव होतो असे सांगावें. उदा०—आगच्छ देवदत्त ग्राममोदन भोक्ष्यसे.

हें उदाहरण मूळ सूत्रानें सिद्ध होत नाहीं याचें काय बरें कारण असावे ?

कारक निराळे होत आहे म्हणून. 'सर्व कारक निराळे नसेल तर' असें सूत्रामध्यें म्हटले आहे. आणि येथे तर सर्व कारक निराळें होत आहे.

सर्व कारक म्हणजे कोणतेही कारक निराळें असेल तर ह्या निषेधाची प्रवृत्ति होत नाहीं असे येथें प्रतिबंध रूपानें कां बरें घ्यावें. सर्व-कारक निराळें नसेल तर ह्या निषेधाची प्रवृत्ति होते असे साधक रूपानेंच कां बरें येथें घेऊं नये. ? आणि असे घेतलें तर येथें कर्त्यामुळें सर्व कारक निराळे होत नाहीं. तेव्हां कर्ता एक असल्यामुळें हें उदाहरण सिद्ध होत आहे.

---

१. (सू ५१) गत्यर्थक धातूचे जें लोट्प्रत्ययान्त क्रियापद त्याने युक्त असे जें लृट्प्रत्ययान्त क्रियापद त्याला अनुदात्त होत नाहीं. लोट् प्रत्ययानें दाखविलेले जे कारक त्यापेक्षा लृट् प्रत्ययाने दाखविलेलें कारक सर्व निराळें नसेल तर. सूत्रामध्यें सर्व हा शब्द लुप्तविभक्त्यन्त असून तो कारकम् याचे विशेषण आहे (शे.) हा अर्थ आरंभीं मनात न घेता भाष्यकार विचार करीत आहेत.

२. प्रकृतिभाव म्हणजे येथें अनुदात्ताचा निषेध होय. प्रकृतिभाव म्ह मूळची स्थिति कायम ठेवणें. तिङतिङः (८।१।२८) यानें प्राप्त झालेल्या सर्वानुदात्ताचा निषेध केला म्हणजे मूळचे स्वर कायम राहतात.

३. येथें आगच्छ आणि भोक्ष्यसे या क्रियापदाचा कर्ता देवदत्त हा एकच आहे तरी ग्राम आणि ओदन हें कर्म निराळें आहे.

४. जरी कर्ता एक आहे तरी कर्म निराळें असल्यामुळें सर्व कारक निराळें होते. (म्ह. सर्व कारक एक होत नाहीं) असें म्हणतां येतें

५. सूत्रातील 'न चेत्कारकं सर्वान्यत्' या वाक्यामध्यें 'सर्वं कारकं अन्यच्चेन्न' असा अन्वय घेतला तर पूर्वीचा पक्ष सिद्ध होईल. परंतु त्यापेक्षां 'सर्वं कारकमन्यत् न चेत्' असा अन्वय घेणें बरें. सूत्रकारानी चेत् हें अव्यय न याच्यापुढें उच्चारलें आहे ते अन्वय लावतांना अन्यत् याच्या पुढे घेणें बरोबर नाहीं.

६ जसें कर्म निराळें असल्यामुळें 'सर्व कारक निराळें' असें येथें म्हणतां येतें तसें कर्ता निराळा नसल्यामुळें 'सर्व कारक निराळ नाहीं' असेंही येथें म्हणतां येतें.

कर्तृसामान्यात्सिद्धमिति चेत्तद्भेदे कर्तृभेदे ऽन्यस्मिन्कारकसामान्ये प्रकृतिभावः प्राप्नोति । आहर देवदत्त शालीन्यज्ञदत्त एनान्भोक्ष्यते ॥ एवं तर्हि व्यक्तमेव पठितव्यं न चेत्कर्ता सर्वान्य इति ।

न चेत्कर्ता सर्वान्य इति चेदन्याभिधाने प्रतिषेधमेके ॥ ३ ॥

न चेत्कर्ता सर्वान्य इति चेदन्याभिधाने प्रतिषेधमेक इच्छन्ति । उह्यन्तां देवदत्तेन शालयो यज्ञदत्तेन भोक्ष्यन्त इति प्राप्नोति भोक्ष्यन्त इति चेष्यते ॥

सिद्धं तु तिङोरेकद्रव्याभिधानात् ॥ ४ ॥

सिद्धमेतत् । कथम् । तिङोरेकद्रव्याभिधानात् । यत्र तिङ्भ्यामेकं द्रव्यमभिधीयते तत्रेति वक्तव्यम् ॥

[ लोट् च ॥ ८।१।५२ ॥

विभाषितं सोपसर्गमनुत्तमम् ॥ ८।१।५३ ॥

हन्त च ॥ ८।१।५४ ॥ ]

---

(वा. २) कर्ता एक असल्यामुळें हें उदाहरण सिद्ध होतें असें म्हटले तर कर्ता निराळा असताना व इतर कारक एक असताना ह्या सूत्रानें प्रकृतिभाव प्राप्त होतो. उदा०— आहर देवदत्त शालीन् यज्ञदत्त एतान् भोक्ष्यते.

तर मग येथें आतां 'कर्ता सर्व निराळा नसेल तर' असें स्पष्टच बोललें पाहिजे.

(वा. ३) 'कर्ता सर्व निराळा नसेल तर' असें म्हटले तर प्रत्ययाने दुसऱ्या अर्थाचे प्रतिपादन केले असता तेथ ( कर्ता निराळा असला तरी ह्या अनुदात्ताचा ) निषेध होतो असें कांहीं थोर लोक इच्छितात (ते सिद्ध होणार नाहीं. ) उदा० उह्यन्तां देवदत्तेन शालयः यज्ञदत्तेन भोक्ष्यन्ते. येथें भोक्ष्यन्ते असें प्राप्त होते. भोक्ष्यन्ते असें पाहिजे आहे.

(वा. ४) हे उदाहरण सिद्ध होतें.

कसें ?

दोन्ही तिङ् प्रत्ययाचा एकच द्रव्य अर्थ आहे म्हणून. तात्पर्य असें कीं, ज्या वाक्यामध्यें दोन्ही तिङ् प्रत्ययांनीं एकच वस्तु प्रतिपादिली जाते त्या ठिकाणीं ह्या सूत्राने निषेध होतो असें म्हणावें म्हणजे झाले.

---

७. येथे शालि हे कर्म एक असल्यामुळ ' सर्व कारक निराळे नाहीं ' असें म्हणतां येते.

८. कर्मणि प्रयोगामध्ये कर्ता निराळा जरी असला तरी कर्म निराळें नसलें तर तेथें ह्या सूत्राने अनुदात्ताचा निषेध होत असतो. सूत्रातील सर्व शब्दाचा उपयोग असा– ' आगच्छ देवदत्त ग्रामं, त्वं चाहं च द्रक्ष्यावः ' ह्या ठिकाणी आगच्छ याचा कर्ता जो देवदत्त त्यापेक्षां द्रक्ष्यावः याचा अहं हा एक कर्ता जरी निराळा आहे तरी सर्व कर्ता निराळा नाहीं. कारण त्वं या शब्दानें देवदत्त हा ही कर्ता तेथें आहेच. तेव्हां अशा ठिकाणीं सर्व शब्दामुळे हा अनुदात्ताचा निषेध होतो.

१. ( सू. ५२ ) गत्यर्थक धातूचे जे लोट्प्रत्ययान्त क्रियापद त्याने युक्त असें जे दुसरें लोट्प्रत्ययान्त क्रियापद त्याला अनुदात्त होत नाहीं, दोन्हीं लोट् प्रत्ययांनीं दाखविलेलें कारक परस्परापेक्षां सर्व निराळे नसेल तर.

१. ( सू. ५३ ) गत्यर्थक धातूचें जें लोट्प्रत्ययान्त क्रियापद त्यानें युक्त असें जें दुसरें लोट्प्रत्ययान्त क्रियापद त्याला उपसर्ग लावला असेल तर विकल्पानें अनुदात्त होत नाही; परंतु तें क्रियापद उत्तम पुरुषी नसावें.

१. ( सू. ५४ ) हन्त यानें युक्त असें जे लोट्प्रत्ययान्त क्रियापद त्याला उपसर्ग लावला असेल तर विकल्पानें अनुदात्त होत नाहीं, परंतु तें क्रियापद उत्तम पुरुषीं नसावें.

## [1]आम एकान्तरमामन्त्रितमनन्तिके ॥ ८ ॥ १ । ५५ ॥

कस्यायं प्रतिषेधः ।

**आम एकान्तर ऐकश्रुत्यप्रतिषेधः ॥ १ ॥**

आम एकान्तर ऐकश्रुत्यस्यायं प्रतिषेधः । कथं पुनरप्रकृतस्यासंशब्दितस्यैकश्रुत्यस्य प्रतिषेधः शक्यो विज्ञातुम् । अनन्तिक इत्युच्यते । अनन्तिकं च किम् । दूरम् । दूरात्संबुद्धावेकश्रुतिरुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**निघातप्रसङ्गस्तु ॥ २ ॥**

निघातस्तु प्राप्नोति । आं भो देवदत्ता३ । आमन्त्रितस्यानुदात्तत्वं प्राप्नोति ॥

**सिद्धं तु प्रतिषेधाधिकारे प्रतिषेधवचनात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रतिषेधाधिकारे प्रतिषेधवचनसामर्थ्यान्निघातो न भविष्यति॥ नैव वा पुनरत्रैकश्रुत्यं प्राप्नोति ।

---

(सू. ५५) कोणाचा हा निषध आहे ?

(वा. ५) आम् याहून पुढील 'एक' या पदानें व्यवहित सबोधनाला एकश्रुतीचा हा निषेध आहे.

तरी पण ज्याची अनुवृत्ति नाहीं व सूत्रामध्यें शब्दही नाहीं अशा एकश्रुतीचा हा निषेध कसा बरें घेतां येतो ?

सूत्रात अनन्तिके असा शब्द आहे. अनन्तिक म्हणजे काय ? दूर. आणि दूरात्संबोधन असतांनाच एकश्रुति सांगितली [2]आहे.

असा हा उपयोग संभावतो खरा. मग पुढें काय म्हणणें आहे.

(वा. २) अनुदात्त प्राप्त होत आहे ना ! उदा० 'आम् भो देवदत्त ३'. येथें देवदत्त या संबोधन पदाला आमन्त्रितस्य च (८।१।१९) या सूत्रानें अनुदात्त [3]प्राप्त होतो.

हें उदाहरण सिद्ध होतें.

कसे ?

अनुदात्ताच्या निषेधाच्या प्रकरणामध्यें हा निषेध सांगितला आहे. त्याच्या सामर्थ्यामुळें अनुदात्त होणार नाहीं.

[4]अथवा एकश्रुतीची मुळीं उपस्थितीच येथें होत नाहीं.

---

१. (सू. ५५) दूर नाहीं व जवळही नाही अशा अंतरावरून संबोधन-विषयक जें वाक्य त्यामध्यें आम् या अव्ययाहून पुढें एक पदानें व्यवहित जें सबोधन पद त्याला अनुदात्त होत नाही.

२. सूत्रांतील अनन्तिके हा शब्द निषेधबोधक आहे असें येथें भाष्यकारांनीं घेतलें आहे. अनन्तिके म्ह. दूर या निमित्तानें सांगितलेली एकश्रुति. तेव्हां अनन्तिके याचा लक्षितलक्षणेनें एकश्रुति असा अर्थ येथें घेतला आहे.

३. कारण हा एकश्रुतीचा निषेध मानला असल्यामुळें अनुदात्ताचा निषेध होणार नाहीं.

४. जर पाणिनीला एकट्या एकश्रुतीचाच हा निषेध इष्ट असता तर एकश्रुतीच्या प्रकरणामध्यें 'नाम एकान्तरम्' एवढेंच लहानसें सूत्र पाणिनीनें केलें असतें. तेव्हां ज्या अर्थीं अनुदात्ताच्या निषेधाच्या प्रकरणामध्यें हें सूत्र केलें आहे आणि त्यांत एकश्रुतीचें निमित्त दाखविणारा अनन्तिके हा शब्द मानला आहे त्या अर्थीं एकश्रुति आणि अनुदात्त या दोघांचा हा निषेध त्याला संमत आहे असें दिसतें.

५. सूत्रांतील अनन्तिके या शब्दानें या अनुदात्ताच्या निषेधाचें एक प्रकारचें निमित्तच दाखविलें आहे. तो शब्द निषेधबोधक नव्हे असा अभिप्राय आहे.

किं कारणम् । अनन्तिक इत्युच्यते ऽन्यच्च दूरमन्यदनन्तिकम् ॥ यद्येवं प्लुतो ऽपि तर्हि न प्राप्नोति प्लुतोऽपि हि दूरादित्युच्यते । इष्टमेवैतत्संगृहीतम् । आं भो देवदत्तेत्येव भवितव्यम् ॥

**यद्धितुपरं छन्दसि ॥ ८ । १।५६ ॥**

किमर्थमिदमुच्यते । यदाद्यैरेव सर्वैरेतैर निघातकारणैर्योगेऽनिघात उच्यते । यथैव पूर्वैर्योग एवं परैरपि ॥ अत उत्तरं पठति ।

**यद्धितुपरस्य च्छन्दस्यनिघातोऽन्यपरप्रतिषेधार्थः ॥ १ ॥**

यद्धितुपरस्य च्छन्दस्यनिघात उच्यते ऽन्यपरप्रतिषेधार्थः । अन्यपरस्य प्रतिषेधो मा भूदिति । जाये स्वो रोहावेहि ॥ अथेदानीं रोहावेत्यनेन युक्त एहीत्यस्य कस्मान्न भवति । लोट् च गत्यर्थलोटा युक्त इति

का बरें ?

अनन्तिके असे सूत्रांत म्हटले आहे. दूर निराळें आणि अनन्तिक[६] निराळें.

असेंच जर आहे तर मग प्लुत देखील येथें प्राप्त होणार नाहीं. कारण प्लुत देखील (एकश्रुती-प्रमाणे ) दूर या निमित्तानेच सांगितला आहे.

जे ( आम्हाला ) पाहिजे तेंच तुम्ही बोलत आहां. आम् भो देवदत्त ३ असेंच याचें उदाहरण इष्ट आहे.

(सू. ५६) हें सूत्र[१] कशाकरितां केलें आहे. कारण क्रियापदाच्या पूर्वी उच्चारलेले यत्, हि आणि तु हे सर्व अनुदात्ताच्या निषेधाचीं कारणें आहेत म्हणजे यांचा योग असतांना अनुदात्ताचा निषेध सांगितला[२] आहे. आणि जसे पूर्वीच्याशीं योग असतांना होतें तसें पुढल्याशीं योग असतांनाही होईल. यानंतर वार्तिककार म्हणतात —

(वा १) यत्, हि आणि तु यांपैकीं कोण तेंही अव्यय ज्याच्या पुढे आहे अशा क्रियापदाला वेदामध्ये जो हा अनुदात्ताचा निषेध सांगितला आहे तो यत्, हि आणि तु याशिवाय इतर कोणताही शब्द क्रियापदाच्या पुढें जर असेल तर त्या ठिकाणीं त्याचा योग समजू नये अशाकरितां. म्हणजे इतर कोणी पुढें असेल तर त्या ठिकाणीं अनुदात्ताचा निषेध होऊ नये याकरितां. उदा० जाये स्वो रोहावेहि.

आतां या ठिकाणीं रोहाव या पूर्वीच्या क्रियापदाशीं योग असल्यामुळे एहि या क्रियापदाला अनुदात्ताचा निषेध कां होत नाहीं ? एहि हें

६. अनन्तिक शब्दाचा ‘ अन्तिक नव्हे पण अन्तिकासारखें ’ असा अर्थ आहे अन्तिक म्ह. समीप, तें नसून त्याच्या सारखें म्हणजें समीप नाही आणि दूरही नाही असें म्ह. साधारण जवळ असल्यासारखें.

१. (सू. ५६) वेदामध्यें यत् हि तु यांपैकी कोणतेंही अव्यय क्रियापदाच्या पुढें येईल तर त्या क्रियापदाला अनुदात्त होत नाहीं.

२. निपातैर्यद्यदि० (८।१।३०) हि च (८।१।३४) तु पश्य० (८।१।३९) या सूत्रांनी सांगितला आहे.

३. या निषेध-प्रकरणामध्यें ज्यांचा योग असतांना क्रियापदाला अनुदात्ताचा निषेध सांगितला आहे त्यांपैकी यत् हि तु या तिघांशिवाय इतर कोणी.

४. ‘जाय एहि सुवो रोहाव’ असें वाक्य तैत्तिरीय संहितेमध्यें ( १।७।९ ) आढळतें. ‘ हे भार्ये चल ये आपण स्वर्गारोहण करूं ’ असा याचा अर्थ आहे. या ठिकाणी एहि हे गत्यर्थक धातूचें लोट् प्रत्ययान्त क्रियापद आहे त्याचा योग रोहाव या क्रियापदाला जरी आहे तरी तो पुढच्याशी योग होत असल्यामुळें ‘ रोहाव ’ याला लोट् च ( ८।१।५२ ) या सूत्रानें अनुदात्ताचा निषेध होत नाहीं.

प्राप्नोति । न रुहिर्गत्यर्थः । कथं ज्ञायते । यदयं गत्यर्थाकर्मकश्लिषशीङ्स्थासवसजनरुहजीर्यतिभ्यश्च [ ३. ४. ७२ ] इति पृथग्रुहिग्रहणं करोति । यदि न रुहिर्गत्यर्थ आरोहन्ति हस्तिनं मनुष्याः आरोहयति हस्ती स्थलं मनुष्यान् गतिबुद्धिप्रत्यवसानार्थशब्दकर्माकर्मकाणामणिकर्ता स णौ [१.४.५२] इति कर्मसंज्ञा न प्राप्नोति । तस्मान्नैतच्छक्यं वक्तुं न रुहिर्गत्यर्थ इति । कस्मात्तर्हि रोहा- वेत्यनेन युक्त एहीत्यस्य न भवति । छान्दसत्वात् ॥

## चनचिदिवगोत्रादितद्धिताम्रेडितेष्वगतेः ॥ ८ । १ । ५७ ॥

आम्रेडितेष्वगतेः सगतिरपि तिङिन्त्यत्र गतिग्रहण उपसर्गग्रहणम् ॥ १ ॥

आम्रेडितेष्वगतेः सगतिरपि तिङ् [६८] इत्यत्र गतिग्रहण उपसर्गग्रहणं द्रष्टव्यम् । इह मा भूत् । शुक्लीकरोति चन । कृष्णी-

लोट्प्रत्ययान्त क्रियापद आहे. आणि ते पूर्वीच्या 'रोहाव' या गत्यर्थक धातूच्या लोट्प्रत्ययान्त क्रियापदाने युक्त आहे म्हणून 'लोट् च' (८।१।५१) या निषेधाची प्राप्ति येते.

हा दोष येत नाहीं. कारण रुह् धातु गत्यर्थक नव्हे.

हें कशावरून समजावें ?

गत्यर्थाकर्मकश्लिषशीङ्स्थासवसजनरुहजीर्यतिभ्यश्च (३।४।७२) ह्या सूत्रामध्ये आचार्य पाणिनि 'गत्यर्थ' असे म्हणून त्यापेक्षां निराळे रुह् धातूचें ग्रहण करतात यावरून.

जर रुह् धातु गत्यर्थक नव्हे तर 'आरोहन्ति हस्तिन मनुष्याः । आरोहयति हस्ती स्थलं मनुष्यान्' या उदाहरणांमध्ये 'गतिबुद्धिप्रत्यवसानार्थशब्दकर्माकर्मकाणामणिकर्ता स णौ' (१।४।५२) या सूत्राने सांगितलेली कर्मसंज्ञा प्राप्त होणार नाहीं. तेव्हा 'रुह् धातु गत्यर्थक नव्हे' हें म्हणणें शक्य नाहीं.

तर मग रोहाव हें जे गत्यर्थक धातूचें लोट्प्रत्ययान्त क्रियापद त्याच्याशीं योग असल्यामुळें 'एहि' या क्रियापदाला अनुदात्ताचा निषेध कां होत नाहीं.

वेदांतील हा प्रयोग आहे म्हणून.

(सू. ५७ वा. १) ह्या सूत्रामध्यें 'आम्रेडितेष्वगतेः' असें म्हटले आहे. तसेंच 'सगतिरपि तिङ्' (८।१।६८)असें पुढे सूत्र आहे. या दोन्ही ठिकाणीं गतिग्रहण केले आहे तेथे उपसर्गग्रहण करावें. कारण शुक्ली करोति चन, 'कृष्णी करोति चन' या उदाहरणांमध्यें (ह्या सूत्राची) आणि 'यत्काष्ठा शुक्ली करोति', 'यत्काष्ठा कृष्णीकरोति' या उदाह-

५. मनुष्य हत्तीवर चढतात असा याचा अर्थ आहे. हें वाक्य अण्यन्तावस्थादर्शक आहे णि म्ह. प्रयोजक प्रत्यय. तो या वाक्यामध्यें रुह् धातूहून केलेला नाहीं.

६. हत्ती मनुष्याना आपल्या पाठीवर चढवितो. असा याचा अर्थ आहे. हें वाक्य ण्यन्तावस्थादर्शक आहे. येथें रुह् धातु गत्यर्थक आहे म्हणून त्याचा अण्यन्तावस्थेतील मनुष्य हा जो कर्ता त्याला ण्यन्तावस्थेमध्यें गतिबुद्धि० ( पा. सू १।४।५२ ) या सूत्राने कर्मसंज्ञा होत असल्यामुळें मनुष्यान् असें द्वितीयान्त पद झालें आहे.

१ (सू. ५७) गतीशिवाय दुसरे कोणतेंही पद क्रियापदाच्या पूर्वी असेल आणि चन चित् इव गोत्रादि गणांतील शब्द तद्धित-प्रत्यय आणि आम्रेडित यापैकीं कोणीही क्रियापदाच्या पुढें असेल तर त्या क्रियापदाला अनुदात्त होत नाही.

२. शुक्ली करोति वगैरे उदाहरणांमध्यें शुक्ली वगैरे शब्दांना ऊर्यादि० ( १।४।६१ ) वगैरे सूत्रांनीं गतिसंज्ञा सांगितली आहे. त्यांचे येथें गति शब्दानें ग्रहण होऊं नये; फक्त प्र परा वगैरे उपसर्गांचेंच ग्रहण झालें पाहिजे.

करोति चन । यत्काष्ठा शुक्लीकरोति । यत्काष्ठा कृष्णीकरोति ॥

अपर आह । सर्वत्रैवाष्टमिके गतिग्रहण उपसर्गग्रहणं द्रष्टव्यं गतिर्गतौतिङ्चोदात्तवतिवर्जमिति ॥

**[ चादिषु च ॥ ८।१।५८ ॥**

**चवायोगे प्रथमा ॥ ८।१।५९ ॥**

**हेति क्षियायाम् ॥ ८।१।६० ॥**

**अहेति विनियोगे च ८।१।६१ ॥**

**चाहलोप एवेत्यवधारणम् ॥ ८।१।६२ ॥**

**चादिलोपे विभाषा ॥ ८।१।६३॥**

**वैवावेति च च्छन्दसि॥८।१।६४॥**

**एकान्याभ्यां समर्थाभ्याम् ॥ ८।१।६५ ]**

**यद्वृत्तान्नित्यम् ॥ ८ । १ । ६६ ॥**

यद्वृत्तादित्युच्यते तत्रेदं न सिध्यति यः पचति यं पचतीति । वृत्तग्रहणेन तद्विभ-

---

रणामध्ये ( सगतिरपि० या सूत्राची ) प्रवृत्ति न झाली पाहिजे.

येथे दुसरा आचार्य असे म्हणतो कीं—या आठव्या अध्यायामध्यें सर्वच ठिकाणीं गतिग्रहण म्हणून [3]जथे केले असेल तेथें ते उपसर्गाचेंच ग्रहण केले आहे, असे समजावें, फक्त 'गतिर्गतौ' (८।१।७०) 'तिङि चोदात्तवति' (८।१।७१) हीं सूत्रे वर्ज्य करून.

( सू. ६६) यद्वृत्तात् असें येथे म्हटलें आहे तेव्हा यः करोति, य पचति, येन पचति हीं उदाहरणें सिद्ध होत नाहींत.

सूत्रामध्यें वृत्त शब्द घातला आहे त्यामुळें

---

३ चादिषु च ( ८।१।५८ ) या सूत्रामध्येंही गति शब्दानें नुसते उपसर्गच घेतले पाहिजेत.

१. ( सू. ५८ ) गतीशिवाय दुसरें कोणतेही पद क्रियापदाच्या पूर्वी असेल आणि च वा ह अह आणि एव यापैकी कोणीही क्रियापदाच्या पुढे असेल तर त्या क्रियापदाला अनुदात्त होत नाही

१. ( सू. ५९ ) च किंवा वा यांचा योग असतांना दोन क्रियापदापैकी पहिल्या क्रियापदाला अनुदात्त होत नाही.

१ (सू ६०) ह याचा योग असतांना दोन क्रियापदांपैकी पहिल्या क्रियापदाला अनुदात्त होत नाही पण योग्य आचार पाळला नसेल तर.

१. ( सू ६१ ) अह याचा योग असतांना दोन क्रियापदापैकी पहिल्या क्रियापदाला अनुदात्त होत नाही. अनेक विधि असतील तर किंवा योग्य आचार पाळला नसेल तर.

१. ( सू. ६२ ) च किंवा अह यांचा अर्थ गम्यमान असून त्यांचा प्रयोग नसतांना आणि त्याच वाक्यामध्यें निश्चयार्थक एव शब्दाचा प्रयोग असतांना दोन क्रियापदापैकी पहिल्या क्रियापदाला अनुदात्त होत नाही.

१ (सू ६३) च वा ह अह आणि एव यांचा अर्थ गम्यमान असून त्यांचा प्रयोग नसतांना दोन क्रियापदापैकी पहिल्या क्रियापदाला अनुदात्त विकल्पानें होत नाही.

१ (सू ६४ ) वै किंवा वाव यांचा योग असतांना दोन क्रियापदापैकीं पहिल्या क्रियापदाला वेदामध्यें विकल्पाने अनुदात्त होत नाहीं.

१. (सू ६५) अन्य या अर्थी जो एक शब्द किंवा अन्य शब्द त्यांचा योग असतांना दोन क्रियापदापैकीं पहिल्या क्रियापदाला वेदामध्यें विकल्पानें अनुदात्त होत नाही.

१. (सू ६६ ) ज्या पदामध्यें यच्छब्द आहे त्या पदाच्या पुढील क्रियापदाला अनुदात्त नियमानें होत नाही.

२ वृत्त म्ह. उच्चारित. उच्चारलेल्या यच्छब्दाच्या पुढील क्रियापदाला असा अर्थ मनांत घेऊन ही शंका केली आहे. येथें यच्छब्दाच्या पुढ प्रथमा द्वितीया वगैरे

त्त्यन्तं प्रतीयात । कथं यतरः पचति यतमः पचतीति । डतरडतमौ च प्रतीयात् । कथं यदा ददातीति । एषोऽपि विभक्तिसंज्ञः । कथं यावदस्योषः सरो जनेभ्यः कृणवत् । यावद्यथाभ्याम [३६] इत्येवं भविष्यति । कथं यद्र्यङ् वायुः पवते यत्कामास्ते जुहुम ॥ एवं तर्हि यदस्मिन्वर्तते यद्वृत्तम् यद्वृत्तादित्येवं भविष्यति ॥

**वा याथाकाम्ये ॥ १ ॥**

वा याथाकाम्य इति वक्तव्यम् । यत्र क्व चन यजते देवयजन एव यजते ॥

## पूजनात्पूजितमनुदात्तम् ॥ ८ । १ । ६७ ॥

**पूजितस्यानुदात्तत्वे काष्ठादिग्रहणम् ॥ १ ॥**

पूजितस्यानुदात्तत्वे काष्ठादिग्रहणं कर्तव्यम् । काष्ठादिभ्यः पूजनादिति वक्तव्यम् । इह मा भूत् । शोभनोऽध्यापकः ॥

---

येथें यच्छब्द विभक्तिप्रत्ययान्त घेतां येईल.

तरी पण 'यतरः पचति', 'यतमः पचति' हीं उदाहरणे कशीं साधतील ?

विभक्तीप्रमाणे डतर व डतम प्रत्ययही येथें घ्यावेत.

यदा ददाति हें उदाहरण कसें साधेल ?

येथें दा हा प्रत्यय विभक्तिसंज्ञक आहेच.

'यावदस्य उषः सरो जनेभ्यः कृणवत्' हें उदाहरण कसें साधेल ?

येथें यावद्यथाभ्याम् (८।१।३६) या सूत्रानें अनुदात्ताचा निषेध होईल.

' यद्र्यङ् वायुः पवते ' तसेंच ' यत्कामास्ते जुहुपः' हीं उदाहरणें कशीं साधतील ?

तर मग यच्छब्द ज्या पदामध्यें आहे तें पद येथे यद्वृत्त शब्दाने घ्यावें. त्या यद्वृत्त पदाहून पुढील क्रियापदाला अनुदात्ताचा निषेध होतो अशा अर्थाने सर्व साधेल

(वा.१) वाक्यामध्यें यथेच्छ प्रवृत्ति गम्यमान असताना हा अनुदात्ताचा निषेध विकल्पानें होतो असें सांगावें. उदा०— 'यत्र क्वचन यजते तद्देवयजन एव यजते.'

( सू. ६७ वा.१) पूज्यमान-वाचक शब्दाला अनुदात्त सांगतांना काष्ठादिग्रहण करावें. 'काष्ठादिभ्यः पूजनात्' असें सूत्रामध्यें उच्चारावें.

---

विभक्ती असल्यामुळे त्या विभक्तीने ' यच्छब्द आणि क्रियापद ' यांमध्यें व्यवधान येतें म्हणून ह्या सूत्राची प्रवृत्ति होणार नाही.

३. कारण, वृत्त शब्दाचा उच्चारित या अर्थाने कांहीच उपयोग नाहीं तेव्हां यद्वृत्त म्हणजे यच्छब्दापासून तयार झालेलें विभक्तिप्रत्ययान्त रूप असा अर्थ येथें यद्वृत्त शब्दाचा घेतला आहे.

४. आग्दिशो विभक्तिः ( ५।३।१ ) या अधिकारामध्यें तो सांगितला असल्यामुळें त्या दा प्रत्ययाला विभक्तिसंज्ञा आहे.

५. येथें डॉ. कीलहॉर्न यांनीं शुद्ध केलेल्या प्रतींत ' यावदस्यत्रैवैषः सरो जनेभ्यः कृणवत् ' असा पाठ आहे. परंतु ' यावदस्योषः सरो० ' हा पाठ ज्यास्त चांगला असल्यामुळें तो घेतला आहे. उपलब्ध वेदसंहितांमध्यें हें वाक्य सांपडत नाहीं.

६. यम् अञ्चतीति यद्र्यङ् अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. यद्र्यङ् म्हणजे ज्याची पूजा करणारा. तसेंच यत्कामाः म्ह. जशी इच्छा धारण करणारे. यः कामो येषां ते यत्कामाः अशी येथें यत्काम शब्दाची व्युत्पत्ति आहे. यद्रियङ् वायुर्वाति ( तै. सं. ५।५।१ ) व यत्कामास्ते जुहुमः ( तै. सं. १।८।१४ ) अशीं वाक्यें तैत्तिरीय संहितेंत आढळतात.

७. यदृच्छेनें कोठेंही याग केला तरी तो देवयजनामध्येंच याग केल्यासारखा होत आहे असा अर्थ आहे.

१. ( सू. ६७ ) अनुदात्ताच्या निषेधाचें प्रकरण संपलें म्हणूनच ह्या सूत्रामध्यें मुद्दाम पाणिनीनें अनुदात्त शब्द घातला आहे, ' काष्ठादिभ्यः ' हा शब्द पाणिनीनें घातलेला नाही. वार्तिक पाहून कांही लोकांनी तो शब्द मागाहून सूत्रामध्यें ढकलला आहे. पूजादर्शक जो काष्ठादिगणांतील शब्द त्याहून पुढें जो पूज्यमान-

**मलोपवचनं च ॥ २ ॥**

मलोपश्च वक्तव्यः । दारुणाध्यापकः दारुणाभिरूपः ॥

**सगतिरपि तिङ् ॥ ८।१।६८॥**

सगतिग्रहणं किमर्थम् ।

**सगतिग्रहणमपदत्वात् ॥ १ ॥**

सगतिग्रहणं क्रियतेऽपदत्वात् । पदस्य [१६] इति वर्तते न हि सगतिकं पदं भवति ॥

**उत्तरार्थं च ॥ २ ॥**

उत्तरार्थं च सगतिग्रहणं क्रियते । कुत्सने च सुप्यगोत्रादौ [६९] सगतिरपि । प्रपचति पूति ॥

अथापिग्रहणं किमर्थम् । अगतिकस्यापि यथा स्यात् । यत्काष्ठं पचति । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धं पूर्वेणागतिकस्य । न सिध्यति । मलोपाभिसंबद्धं तत् । यदि तदनुवर्तेतेहापि मलोपः प्रसज्येत । दारुणं पचतीति ॥ उत्तरार्थं चापिग्रहणं क्रियते । कुत्सने च सुप्यगोत्रादावगतिरपीति ।

---

कारण 'शोभनोध्यापकः' या उदाहरणामध्यें हा अनुदात्त न झाला पाहिजे.

(वा. २) तसेंच मकाराचा लोपही सांगावा. उदाः-दारुणाध्यापकः, दारुणाभिरूपः.

(सू ६८) सगतिग्रहण कशाकरितां ?

(वा. १) पदत्व नाहीं म्हणून सगतिग्रहण केलें आहे. पदस्य असें मागाहून अनुवृत्त येत आहे. आणि गतिसहित अशा क्रियापदाला पदसंज्ञा मुळींच नाहीं.

(वा २) शिवाय पुढील सूत्राकरतांहीं येथे सगतिग्रहण केलें आहे. त्यामुळें 'कुत्सने च सुप्यगोत्रादौ' (८।१।६९) हें सूत्र 'पचति पति' या ठिकाणीं आणि 'प्रपचति पूति' या ठिकाणींही प्रवृत्त होते.

आतां या सूत्रामध्यें अपि हा शब्द कशाकरितां ?

गति नसतांही अनुदात्त झाला पाहिजे याकरितां. उदा०- यत्काष्ठं पचति.

हा अपि शब्दाचा उपयोग संभवत नाहीं. कारण गतिरहिताला पूर्वसूत्रानें अनुदात्त सिद्ध होत आहे.

पूर्वसूत्राने सिद्ध होत नाहीं. कारण तेथें मलोप सांगितला आहे. ( आणि येथें मलोपाचा संबंध मुळींच नाहीं. ) जर येथें मलोपाची अनुवृत्ति घेतली तर दारुण पचति या उदाहरणामध्येंही मकाराचा लोप होऊं लागेल. शिवाय पुढील सूत्राकरितां येथें अपिशब्द घातला आहे. त्यामुळें कुत्सने च सुप्यगोत्रादौ ( ८।१।६९ ) हें पुढील सूत्र 'पचति पूति' या ठिकाणीं गति संज्ञा नसतांही

---

वाचक शब्द त्याला अनुदात्त होतो असा सूत्रार्थ आहे. काष्ठ शब्दाचा आश्चर्यकारक असा अर्थ आहे.

२. शोभन या शब्दानें अध्यापकाचा चांगलेपणा दाखविला जातो परंतु हा शोभन शब्द काष्ठादिगणामध्यें नसल्यामुळें येथे त्याच्यापुढील अध्यापक शब्दाला अनुदात्त होत नाही.

३. हा अध्यापक मोठा कडक आहे. ह्याचें सौन्दर्य फार जोराचें आहे. असा अर्थ आहे येथें 'दारुणम्' यांतील शेवटच्या मकाराचा लोप झाला आहे.

१. (सू. ६८) पूजार्थक जो काष्ठादिगणपठित शब्द त्याहून पुढें जें पूज्यमान वाचक क्रियापद त्याला अनुदात्त होतो; जर त्या क्रियापदाच्या मागें उपसर्ग असेल तर त्या उपसर्गासहित तो अनुदात्त होतो. पूर्वसूत्रानें क्रियापदाला अनुदात्त होईलच. तेव्हां हें सूत्र अशाकरतां केले आहे की क्रियापदाला पूर्वसूत्रानें अनुदात्त करतांना जर त्याच्यामागे उपसर्ग असेल तर त्यासुद्धां तो अनुदात्त व्हावा एकंदरीत हें सूत्र पूर्वसूत्राचा शेष आहे. दोन्ही सूत्रें मिळून हें अनुदात्ताचें विधान आहे, असें समजावें.

२. 'हें सूत्र कशाकरितां' असा या प्रश्नाचा अभिप्राय आहे.

पचति पूतीति ॥

**तिङ्निघातात्पूजनात्पूजितमनुदात्तं विप्रतिषेधेन ॥ ३ ॥**

तिङ्निघातात्पूजनात्पूजितमनुदात्तमित्येतद्भवति विप्रतिषेधेन । तिङ्निघातस्यावकाशः। देवदत्तः पचति। पूजनात्पूजितमनुदात्तमित्यस्यावकाशः । काष्ठाध्यापकः । इहोभयं प्राप्नोति। काष्ठा पचति । पूजनात्पूजितमित्येतद्भवति विप्रतिषेधेन॥ कः पुनरत्र विशेषस्तेन वा सत्यनेन वा । अयमस्ति विशेषः । सापवादकः स विधिरयं पुनर्निरपवादकः । यदि हि तेन स्यादिह न स्यात् । यत्काष्ठा पचति ॥

**कुत्सने च सुप्यगोत्रादौ ॥ ८ । १ । ६९ ॥**

**सुपि कुत्सने क्रियायाः ।**

क्रियायाः कुत्सन इति वक्तव्यम् । कर्तुः कुत्सने मा भूत् । पचति पूतिः ॥

---

प्रवृत्त होतें.

(वा. ३) 'तिङतिङः' (८।१।२८) याने सांगितलेला जो क्रियापदाला अनुदात्त त्यापेक्षा 'पूजनात्पूजितम्' (८।१।१६७) ह्यानें सांगितलेला अनुदात्त विप्रतिषेधामुळे अगोदर होतो. 'तिङतिङः' याने सांगितलेल्या अनुदात्ताला 'देवदत्तः पचति' या ठिकाणीं चारितार्थ्य आहे. तसेंच 'पूजनात्पूजितम्' यानें सांगितलेल्या अनुदात्ताला 'काष्ठाध्यापकः', 'काष्ठाभिरूपकः' या ठिकाणीं चारितार्थ्य आहे. आतां 'काष्ठा पचति' याठिकाणीं दोघेही प्राप्त होतात. तेव्हा तेथ 'पूजनात्पूजितम्' हें विप्रतिषेधामुळें बाधक होते.

पण येथें त्यानें अनुदात्त झाला काय आणि यानें अनुदात्त झाला काय यांत काय बरें विशेष आहे ?

विशेष इतकाच कीं त्याला अपवाद आहे आणि याला अपवाद नाहीं. जर त्यानें अनुदात्त करावा तर 'यत्काष्ठा पचति' येथें होणार नाहीं.

(सू. ६९) 'निंदाद्योतक सुबन्त पुढे असताना' असे जे येथे म्हटले आहे तेथें ती निंदा क्रियेची असली पाहिजे असें म्हणावें. कर्त्याची निंदा असताना हा अनुदात्त न झाला पाहिजे. उदा०— 'पचति पूतिः', 'गिरति पूतिः', यानें अनुदात्त होणार नाहीं

---

३. पूजनात्पूजितम्० (८।१।६७) या सूत्रासंबंधानें विचार करणें तो पूर्वीच केला पाहिजे. सगति० (८।१।६८) हें सूत्र चालू असतांना येथें मागील सूत्रासंबंधीं विचार कसा केला अशी शंका घेऊं नये. कारण सगतिरपि० (८।१।६८) हे सूत्र पूर्वसूत्राचाच शेष आहे अगदी निराळे नाही म्हणूनच पुढें 'इहोभय प्राप्नोति' असें म्हणून 'काष्ठा पचति' या ठिकाणी क्रियापद असतांनाही पूजनात्पूजितम्० (८।१।६७) याची प्राप्ति दाखविली आहे.

४. कारण 'तिङतिङः' (८।१।२८) याचा निपातैर्यद्यदि० (८।१।३०) हा अपवाद असल्यामुळे यच्छब्दाचा योग असतांना 'तिङतिङः'

१. ((सू. ६९) गोत्रादिगणपठित शब्द खेरीज करून कोणताही निंदाद्योतक सुबन्त शब्द पुढें असतांना पूर्वीच्या क्रियापदाला अनुदात्त होतो; त्या क्रियापदाच्या मागें उपसर्ग असल्यास त्या उपसर्गासहित अनुदात्त होतो.

२. पूति म्ह० दुष्ट येथें पचनक्रियेचा कर्ता दुष्ट आहे पचनक्रिया कांहीं वाईट नाहीं. पूति हें कर्त्याचें विशेषण आहे. सूत्राच्या उदाहरणामध्यें पचनक्रियेमध्येंच दोष — कच्चेपणा किंवा करपटपणा — प्रतीत होतो. तेथें पूति हें क्रियाविशेषण आहे.

**पूतिश्च चानुबन्धः**

पूतिश्च चानुबन्धो द्रष्टव्यः । पूचति पूति ॥

**विभाषितं चापि बह्वर्थम् ॥**

विभाषितं चापि बह्वर्थं द्रष्टव्यम् । पचन्ति पूति । पचन्ति पूति ॥

**सुपि कुत्सने क्रियाया मकारलोपो ऽतिङीति चोक्तार्थम् ।**

**पूतिश्च चानुबन्धो विभाषितं चापि बह्वर्थम् ॥**

**गतिर्गतौ ॥ ८ । १ । ७० ॥**

गताविति किमर्थम् । प्रपचति प्रकरोति ।

**गतेरनुदात्तत्वे गतिग्रहणानर्थक्यं तिङ्यवधारणात् ॥ १ ॥**

गतेरनुदात्तत्वे गतिग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । तिङ्यवधारणात् । तिङि चोदात्तवति[७१] इत्येतन्नियमार्थं भविष्यति । तिङ्युदात्तवत्येव गतिरनुदात्तो भवति नान्यत्रेति ॥ छन्दोऽर्थं तर्हि गतिग्रहणं कर्तव्यम् । छन्दसि गतौ परतोऽनुदात्तत्वं

---

शिवाय पूति हा शब्द चकारेत्संज्ञक आहे असें समजावें. पचति पूति.

शिवाय क्रियापद बहुवचनान्त असेल तर अनुदात्त विकल्पानें होतो असें समजावें. पचन्ति पूति, पचन्ति पूति.

'मकारलोपोऽतिङि' म्हणजे क्रियापदाशिवाय इतर शब्द पुढें असतांना गोत्रादिगणपठित शब्दाच्या शेवटच्या मकाराचा लोप होतो असें मागें 'मलोपवचनं च' (८।१।६७) येथें सांगितलेंच आहे.

(सू. ७०) गतौ असें कशाकरतां म्हटलें आहे ?

'प्रपचति', 'प्रकरोति' या ठिकाणीं प्र याला अनुदात्त होऊं नये याकरतां.

(वा. १) गतीला अनुदात्त सांगतांना 'गति पुढें असतांना' हें म्हणणें निरर्थक आहे.

कां बरें ?

क्रियापद पुढें असतांना नियम होत आहे म्हणून. 'तिङि चोदात्तवति' ( ८।१।७१ ) हें पुढील सूत्र नियमार्थ होईल. तें असें कीं—क्रियापद पुढें असतांना जर गतीला अनुदात्त होईल तर तें क्रियापद उदात्तस्वरानें युक्त असेल तरच होईल; अन्यत्र होणार नाहीं.

तर मग वेदाकरतां गतिग्रहण केलें पाहिजे.

---

३. पूतिशब्द चकारेत्संज्ञक असल्यामुळें त्याचा चितः ( ६।१।१६३ ) या सूत्रानें अन्त उदात्त होतो. कुत्सने च० ह्या प्रकृत सूत्रानें ज्या ठिकाणीं क्रियापदाला अनुदात्त होतो त्याच ठिकाणीं पूति हा शब्द चकारेत्संज्ञक समजून त्याचा अन्त उदात्त होतो. इतर ठिकाणीं पूति हा शब्द आद्युदात्तच असतो.

१. ( सू. ७० ) गतिसंज्ञक शब्द पुढें असतांना पूर्वीच्या गतिसंज्ञक शब्दाला अनुदात्त होतो.

२. वाक्यामध्यें गतिसंज्ञक शब्दाचा एकाचा किंवा अनेकांचा प्रयोग ते प्राग् धातोः ( १।४।८० ) या सूत्रानें धातूच्या पूर्वीच होतो असें सांगितलें आहे. तेव्हां अर्थातच गतीच्या पुढें गति किंवा धातु यांपैकींच कोणी तरी येणार आहे. त्यांत सुद्धां धातुसाधित नाम पुढें असेल तर तेथें त्याच्याशीं गतीचा नित्य समास होत असल्यामुळें समासाला समासाच्या निमित्तानें स्वर होणारच. तेव्हां तेथें त्यांतील गतीला 'गति०' ह्या प्रकृत सूत्रानें अनुदात्त झाला तरी त्यानंतर समासस्वरानें पुढें समासाचे स्वर बदलणारच असल्यामुळें दोष येत नाहीं. तेव्हां धातुसाधित क्रियापदच फक्त पुढें असतांना गतीला अनुदात्त न होण्याकरतां गतौ असें म्हटलें आहे.

३. कारण, व्यवहिताश्च ( १।४।८२ ) या सूत्रावरून वेदामध्यें गति आणि क्रियापद यांच्या मध्यें दुसरे कांहीं शब्द येतात असें सिद्ध होतें.

यथा स्यान्मन्द्रशब्दे मा भूत् । आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि मयूररोमभिः । ( ऋ. सं. ३।४५।१ )

छन्दोऽर्थमिति चेन्नागतित्वात् ॥ २ ॥

छन्दोऽर्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । अगतित्वात् । यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतो न चात्राङो मन्द्रशब्दं प्रति क्रियायोगः । किं तर्हि । याहिशब्दं प्रति ॥ इहापि तर्हि न प्राप्नोति । अभ्युद्धरति उपसमादधातीति । अत्रापि नाभेरुदं प्रति क्रियायोगः । किं तर्हि । हरतिं प्रति क्रियायोगः ॥ नैष दोषः । उदं प्रति क्रियायोगः । कथम् । उद्धरतिक्रियां विशिनष्टि । उदा विशिष्टामभिर्विशिनष्टि । तत्र यत्क्रियायुक्ता इति भवत्येव संघातं प्रति क्रियायोगः ॥ इहापि तर्हि मन्द्रसाधना क्रियाङा व्यज्यते । आ याहि मन्द्रैरिति ॥ ननु पूर्वं धातुरुपसर्गेण युज्यते पश्चात्साधनेन । नैतत्सारम् । पूर्वं धातुः साधनेन युज्यते

---

वेदामध्यें गतीला अनुदात्त गति पुढें असतांनाच झाला पाहिजे. मन्द्र शब्द पुढे असतांना होऊ नये. उदा०—आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि मयूररोमभिः (ऋ. स. ३।४५।१).

(वा.२) वेदाकरितां 'गतौ' असें म्हटलें आहे असे असेल तर तें बरोबर नाहीं.

कां बरें ?

गति संज्ञा नाहीं म्हणून. प्र परा वगैरे शब्द हे ज्या क्रियेशीं युक्त असतील त्या क्रियेमुळेंच ते गतिसंज्ञक आणि उपसर्गसंज्ञक होत असतात. आणि येथे तर 'आ' या गतीचा जो क्रियेशीं योग झाला आहे तो मन्द्र शब्दामुळें झालेला नाहीं.

तर मग कशामुळें ?

याहि या क्रियापदामुळें.

तर मग ' अभ्युद्धरति ', ' उपसमादधाति ' या उदाहरणांमध्येंहीं हा अनुदात्त होणार नाहीं. कारण अभि या गतीचा जो क्रियेशीं योग झाला आहे तो उद् शब्दामुळें झालेला नाहीं.

तर मग कशामुळें ?

हरति या क्रियापदामुळे ( त्याचा ) क्रियेशीं योग झालेला आहे[5]

हा दोष येत नाहीं. या ठिकाणीं अभि या गतीचा क्रियेशीं जो योग झालेला आहे तो उद् या शब्दामुळे झालेला आहे असें म्हणतां येतें.

कसे ?

येथें उद् हे हरति क्रियेचें विशेषण आहे. आणि उद् या विशषणाने युक्त अशा त्या क्रियेचें अभि हे विशेषण आहे. तेव्हां येथें अभि याचा 'उद्धरति' या समुदायामुळें क्रियेशीं जो योग होत आहे तो ' ज्या क्रियेशीं युक्त ' या नियमाप्रमाणेंच होत आहे.

तर मग 'आ मन्द्रै०' या उदाहरणामध्ये देखील मन्द्र या साधनानें युक्त अशी याहि ही क्रिया आङ् या गतीनें अभिव्यक्त केली जाते.[6]

पण धातूचा अगोदर उपसर्गाशीं योग होतो आणि मागाहून कारकाशीं योग होतो ना ?

हें खरें नव्हे. धातू हा अगोदर कारकाशीं युक्त होतो आणि मागाहून उपसर्गाशीं युक्त होतो.

---

४. आ याच्या पुढें येथें मन्द्र शब्द आलेला आहे. त्या मन्द्र शब्दामुळें आ याला गतिसंज्ञा झालेली नसल्यामुळें हा अनुदात्त होणार नाहीं.

५. आणि हरति हें जें क्रियापद त्याच्या पूर्वी उद् आहे, अभि नाहीं. म्हणून अभीला अनुदात्त होणार नाहीं, असा दोष येतो.

६. तेव्हा आ याला गतिसंज्ञा मन्द्रैर्याहि या समुदायामुळें होत असल्यामुळें त्यांतील मन्द्र शब्द पुढें असताना आ याला अनुदात्त होईल.

७. तेव्हां मन्द्रैर्याहि या समुदायाच्या अर्थाशीं आ याचा संबंध आहे असें म्हणतां येत नाहीं.

पश्चादुपसर्गेण । किं कारणम् । साधनं हि क्रियां निर्वर्तयति तामुपसर्गो विशिनष्ट्यभिनिर्वृत्तस्य चार्थस्योपसर्गेण विशेषः शक्यो वक्तुम् । सत्यमेवमेतत् । यस्त्वसौ धातूपसर्गयोरभिसंबन्धस्तमभ्यन्तरे कृत्वा धातुः साधनेन युज्यते । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । यो हि मन्यते पूर्वं धातुः साधनेन युज्यते पश्चादुपसर्गेणेति आस्यते गुरुणेत्यकर्मक उपास्यते गुरुरिति केन सकर्मकः स्यात् ॥

गतिना तु विशिष्टस्य गतिरेव विशेषकः ।
साधने केन ते न स्याद्बाह्यमाभ्यन्तरो हि सः ॥

## [1]तिङि चोदात्तवति ॥ ८।१।७१॥

तिङ्ग्रहणं किमर्थम् ।

**तिङ्ग्रणमुदात्तवतः परिमाणार्थम् ॥ १ ॥**

तिङ्ग्रहणं क्रियत उदात्तवतः परिमाणार्थम् । तिङ्युदात्तवति यथा स्यान्मन्द्रशब्दे मा भूत् । आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि ॥ यद्योगाद्गतिः । यत्क्रियायुक्तास्त प्रति गत्युपसर्ग-

---

का बरें ?

कारक हें क्रियेला उत्पन्न करतें. आणि उपसर्ग हा क्रियेचा विशेष दाखवितो. उत्पन्न झाल्यानंतरच त्याचा विशेष दाखविणें शक्य होतें.

हें जरी खरें आहें तरी जो धातु आणि उपसर्ग यांचा संबंध तो ( अर्थद्वारा ) मनांत घेऊनच धातु हा कारकाशीं युक्त होत असतो. आणि असें अवश्य मानलेच पाहिजे कारण ' धातु हा अगोदर कारकाशीं युक्त होतो आणि नतर उपसर्गाशीं ( म्ह. उपसर्गाच्या अर्थाशीं ) युक्त होतो, असे जो मानतो त्याच्या मतीं आस् धातु हा ' आस्यते गुरुणा ' या प्रयोगामध्ये अकर्मक आहे; आणि ' उपास्यते गुरुः ' या प्रयोगामध्यें सकर्मक आहे असा भेद कशामुळे बरें दाखवितां येईल.

( अभ्युद्धरति या ठिकाणीं उद् या ) गतीनें युक्त अशा प्रकारच्याच हरति या क्रियेचा विशेष दाखविणारा अभि हा गति आहे. तेव्हां तेथें अभि याला हा अनुदात्त होतो.

याप्रमाणेंच मन्द्र हे कारक पुढे असतांना कोणत्या कारणाने तुला अनुदात्त करतां येणार नाहीं ?

कारकाशीं क्रियेचा संबंध हा बाह्य आहे आणि उपसर्गाशीं सबध हा अन्तरंग आहे म्हणून.

( सू. ७१ ) तिङ्ग्रहण कशाकरितां ?

(वा. १) उदात्तस्वराने युक्त शब्द अमुक घ्यावा असें समजण्याकरिता तिङ् ग्रहण केले आहे. उदात्त स्वराने युक्त असें क्रियापदच पुढें असतांना हा अनुदात्त झाला पाहिजे. मन्द्र शब्द पुढें असतांना होऊं नये. उदा०— आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि.

प्र परा वगैरे शब्द हे ज्या क्रियेशीं युक्त असतील त्या क्रियेमुळेंच ते गतिसंज्ञक आणि उपसर्गसंज्ञक होत असतात. आणि येथें 'आ' याला अनुदात्त होत नाही.

---

८. एकंदरीत याहि या क्रियेशीं आ याच्या अर्थाचा संबंध अगोदर होतो आणि नंतर मन्द्र या कारकाचा संबंध होतो. तेव्हां ' मन्द्रैर्याहि ' या समुदायामुळें आ याला क्रियायोग आहे असें म्हणतां येत नाहीं. त्यामुळें मन्द्र शब्द पुढें असतांना आ

१. ( सू. ७१ ) उदात्त स्वर ज्यामध्ये आहे असें क्रियापद पुढें असतांना गतिसंज्ञक शब्दाला अनुदात्त होतो.

संज्ञे भवतो न चाङ्गो मन्द्रशब्दं प्रति क्रियायोगः। किं तर्हि। याहिशब्दं प्रति॥

यद्योगाद्गतिरिति चेत्प्रत्ययोदात्तत्वेऽप्रसिद्धिः॥ २॥

यद्योगाद्गतिरिति चेत्प्रत्ययोदात्तत्वेऽप्रसिद्धिः स्यात्। यत्प्रकरोति। तस्मात्तिङ्ग्रहणं कर्तव्यम्॥

यदि तिङ्ग्रहणं क्रियत आमन्ते न प्राप्नोति प्रपचतितराम् प्रजल्पतितराम्। असति पुनस्तिङ्ग्रहणे क्रियाप्रधानमाख्यातं तस्मादतिशये तरबुत्पद्यते तरबन्तात्स्वार्थे आम्तत्र यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवत इति भवत्येतं संघातं प्रति क्रियायोगः। तस्मान्नार्थस्तिङ्ग्रहणेन॥ कस्मान्न भवति। आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि मयूररोमभिः। (ऋ. सं. ३।४५।१) यद्योगाद्गतिरिति। ननु चोक्तं यद्योगाद्गतिरिति चेत्प्रत्ययो-

---

या गतीला जो क्रियेशीं योग आहे तो मन्द्र शब्दामुळें झालेला नाहीं.[2]

तर मग कशामुळें झाला आहे?

याहि या क्रियापदामुळें.

(वा.२) ज्याच्या संबंधानें गति संज्ञा झाली आहे तो उदात्त-स्वरानें युक्त असा पुढे असतांना अनुदात्त होतो असे असेल तर (क्रियापदांतील) प्रत्ययाला उदात्तस्वर असतांना पूर्वीच्या गतीला अनुदात्त सिद्ध होणार नाहीं. उदा० यत् प्रकरोति.[3] तेव्हां तिङ्ग्रहण केले पाहिजे.[4]

आतां जर तिङ्ग्रहण केलें तर आम्-प्रत्ययान्त शब्द पुढें असतांना गतीला अनुदात्त प्राप्त होणार नाहीं. उदा०— प्रपचतितराम्[5] प्रजल्पतितराम्. आणि जर तिङ्ग्रहण केलें नाहीं तर मात्र येथें अनुदात्त सिद्ध होईल. कारण क्रियापदामध्यें क्रियेला प्राधान्य असतें. त्याहून पुढे त्या क्रियेचा अतिशय दाखविणारा 'तर' हा प्रत्यय उत्पन्न होतो. त्या तरप्रत्ययान्ताहून पुढें स्वार्थीच आम् प्रत्यय उत्पन्न होतो. (एकंदरीत पचतितराम् यामध्यें क्रियेचे प्राधान्य कायमच राहत असल्यामुळे प्र, परा वगैरे शब्द हे) ज्या क्रियेशीं युक्त असतील त्या क्रियेमुळेंच ते गतिसंज्ञक आणि उपसर्गसंज्ञक होतात या नियमाला उपयुक्त असा प्र याला क्रियेचा योग पचतितराम् या समुदायाकडून येत आहे. तेव्हा सूत्रामध्यें तिङ् ग्रहण ठेवण्यांत कांहीं फायदा नाहीं.

पण तिङ्ग्रहण काढलें तर 'आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याहि मयूररोमभिः' या उदाहरणामध्ये आ याला अनुदात्त कां होत नाहीं.

प्र परा वगैरे शब्द हे ज्यांच्या[6] क्रियेच्या योगानें गति होतील त्याचेच ते गति किंवा उपसर्ग समजले जातात. आणि येथें आ या गतीला जो क्रियेशीं योग झाला आहे तो मन्द्र शब्दामुळें झालेला नाहीं.[7]

पण ज्याच्या संबंधानें गतिसंज्ञा झाली असेल तो उदात्त-स्वरानें युक्त असला पाहिजे असें

---

२. मन्द्र हा धातु नाही. तेव्हां अर्थातच तो क्रियावाचक नाही.

३. येथें प्र याला गतिसंज्ञा कृ धातूमुळें आहे. तो उदात्त स्वरानें युक्त नाही. कारण करोति यामध्यें ओकार उदात्त आहे, तो प्रत्ययाचा आहे, धातूचा नव्हे.

४. तिङ् याचा अर्थ तिङ्प्रत्ययान्त म्ह० क्रियापद. त्या क्रियापदामध्यें कोठेंही उदात्त असला तरी पूर्वीच्या गतीला अनुदात्त करितां येतो.

५. पचतितराम् ह्यामध्यें पचति हें तिङ्प्रत्ययान्त आहे. त्यांतील एकही स्वर उदात्त नाही. शेवटच्या आम् प्रत्ययाचा आकार तेवढा उदात्त आहे. तिङ् प्रत्ययान्तामध्यें उदात्त नाही.

६. ज्याच्या क्रियेच्या म्ह० ज्या शब्दानें दाखविलेल्या क्रियेच्या.

७. तेव्हां आ मन्द्रैः या उदाहरणामध्यें आ हा गति याहि शब्दाचा आहे. मन्द्र या शब्दाचा नव्हे.

दात्तत्वेऽप्रसिद्धिरिति । नैष दोषः । यत्क्रियायुक्ता इति नैवं विज्ञायते यस्य क्रिया यत्क्रिया यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवत इति । कथं तर्हि । या क्रिया यत्क्रिया यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवत इति ॥

**आमन्त्रितं पूर्वमविद्यमानवत्॥ ८।१।७२॥**

वत्करणं किमर्थम् । स्वाश्रयमपि यथा स्यात् । आं भो देवदत्तेत्यत्राम एकान्तरमामन्त्रितमनन्तिके [ ५५ ] इत्येकान्तरता यथा स्यात् ॥

**पूर्वं प्रति विद्यमानवत्त्वादुत्तरत्रानन्तर्याप्रसिद्धिः ॥ १ ॥**

पूर्वं प्रति विद्यमानवत्त्वादुत्तरत्रानन्तर्यस्याप्रसिद्धिः स्यात् । इमं मे गङ्गे यमुने सरस्वति । गङ्गेशब्दोऽयं यमुनेशब्दं प्रत्यविद्य-

---

असेल तर क्रियापदांतील प्रत्ययाला उदात्तस्वर असतांना पूर्वीच्या गतीला अनुदात्त सिद्ध होणार नाहीं, असें पूर्वीच सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण ' यत्क्रियायुक्त ' याचा अर्थ ज्यां (धातू–) ची क्रिया ती यत्क्रिया, तिने जें युक्त तें 'यत्क्रियायुक्त ' असा घेऊन त्या क्रियावाचक धातूचे ते गति आणि उपसर्ग होतात असें आम्ही समजत नाही.

तर मग कसें समजतां ?

जी क्रिया ती यत्क्रिया. तिने जे युक्त तें यत्क्रियायुक्त. त्यां क्रियेचे ते गति आणि उपसर्ग होतात, असें समजतों.

(सू. ७२) वत् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

आमन्त्रिताच्या स्वतःच्या संबंधानें प्राप्त होणारें जे कार्य तेंही झालें पाहिजे म्हणून. 'आम् भो देवदत्त' या उदाहरणामध्यें 'आम एकान्तरमामन्त्रितमनन्तिके ' ( ८।१।५५ ) या सूत्रानें एका पदाने व्यवहित अशा आमन्त्रिताला सांगितलेला अनुदात्ताचा निषेध झाला पाहिजे.

( वा. १ ) आमन्त्रित हें पूर्वीच्या पदाच्या मानानें विद्यमानच असल्यामुळें पुढील पदाला पूर्वीच्या पदाचें सामीप्य सिद्ध होत नाहीं. उदा०— 'इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि' या उदाहरणामध्यें गङ्गा शब्द हा जो अविद्यमाना-

---

८. ज्या क्रियेला जो धातु प्रतिपादन करतो ती क्रिया त्या धातूची होय.

९. एकंदरीत गति आणि उपसर्ग हे क्रियेचे आहेत; धातूचे नव्हेत. अमुक धातूचा अमुक उपसर्ग असें जें म्हणण्यांत येतें ते क्रियेच्या द्वारानें समजावे. आतां करोति वगैरे क्रियापदांमध्यें क्रियेला प्राधान्य असल्यामुळे त्या क्रियापदामध्यें कोठेंही उदात्त असला तरी पूर्वीच्या गतीला अनुदात्त करतां येतो. म्हणून कांही दोष येत नाहीं.

१. (सू ७२) आमन्त्रिताच्या पुढील पदाला कांही कार्य कर्तव्य असतांना पूर्वीचें आमन्त्रित पद अविद्यमानासारखें समजावें.

२. सूत्रामध्यें ' अविद्यमानम् ' इतकेंच जरी म्हटलें तरी त्याचा अर्थ ' अविद्यमानासारखें ' असा घेतां येईल. कारण परक्याला परका शब्द लावला म्हणजे तेथे ' त्यासारखा ' असा अर्थ विवक्षित आहे असें गृहीत धरतां येतें. उदा०—' हा माणूस वाघ आहे '. येथे वाघासारखा असा सहजच अर्थ होतो.

३. आमन्त्रित अविद्यमान आहे या दृष्टीनें.

४ वत् असें म्हटल्यामुळे अविद्यमानासारखें असा अर्थ होतो म्हणजे वस्तुतः तें कांहीं नाहींसें होत नाही. तेव्हां ' आम् भो देवदत्त ' या उदाहरणामध्यें भोः या आमन्त्रिताला अविद्यमानवद्भाव झाला तरी वस्तुतः तें ' आम् आणि देवदत्त ' या दोहोंमध्यें आहेच, असें घेऊन आम् यापुढें एका पदानें व्यवहित अशा देवदत्त याला ' आम एकान्तर० ' (८।१।५५) या सूत्रानें सांगितलेला अनुदात्ताचा निषेध सिद्ध होतो.

५. आमन्त्रितस्य च ( ८।१।१९ ) या सूत्रानें

मानवद्भवति । तत्रामन्त्रितस्य पदात्परस्येत्यनुदात्तत्वं न स्यात् ॥

**सिद्धं तु पदपूर्वस्येति वचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । पदपूर्वस्येति वचनात् । पदपूर्वस्य चामन्त्रितस्याविद्यमानवद्भावो भवतीति वक्तव्यम् ॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि ।

**अविद्यमानवत्त्वे प्रयोजनमामन्त्रितयुष्मदस्मत्तिङ्निघाताः ॥ ३ ॥**

आमन्त्रितस्य पदात्परस्यानुदात्तो भवतीतीहैव भवति पचसि देवदत्त । देवदत्त यज्ञदत्तेत्यत्र न भवत्यविद्यमानवत्त्वादामन्त्रितस्य ॥ युष्मदस्मदोः षष्ठीचतुर्थीद्वितीयास्थयोर्वान्नावौ [२०] इतीहैव भवति ग्रामो वां स्वम् जनपदो नौ स्वम् । देवदत्तयज्ञदत्तौ युवयोः स्वमित्यत्र न भवत्यविद्यमानवत्त्वादामन्त्रितस्य ॥ तिङतिङः [२८] इतीहैव भवति देवदत्तः पचति । देवदत्त पचसीत्यत्र न भवत्यविद्यमानवत्त्वादामन्त्रितस्य ॥

**पूजायामनन्तरप्रतिषेधः ॥ ४ ॥**

---

सारखा होतो, तो पुढील यमुना शब्दाच्या मानानेंच होतो. तेव्हा मागील पदाहून पर अशा आमन्त्रिताला सांगितलेला ( ८।१।१९ ) अनुदात्त यमुना शब्दाला होणार नाहीं.

( वा. २ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

पूर्वपदस्य या वचनावरून ज्याच्या पूर्वी पद आहे असेंही आमन्त्रित अविद्यमानासारखें होते असें म्हणावें.

आतां या सूत्राचीं कोणतीं बरें प्रयोजनें संभवतात ?

( वा. ३ ) आमन्त्रित, युष्मद्-अस्मद् , आणि तिङ्निघात हीं अविद्यमानवद्भावाचीं प्रयोजनें होत. तीं अशीं–पदाहून पर अशा आमन्त्रिताला अनुदात्त होतो (८।१।१९) हा अनुदात्त 'पचसि देवदत्त ' येथेंच होतो. ' देवदत्त यज्ञदत्त ' येथें होत नाहीं. कारण देवदत्त हे पूर्वीचे आमन्त्रित अविद्यमानासारखे होत आहे. तसेंच ' युष्मदस्मदोः षष्ठीचतुर्थीद्वितीयास्थयोर्वांनावौ' ( ८।१। २० ) या सूत्राने सांगितलेले आदेश 'ग्रामो वां स्वम्, जनपदो नौ स्वम् ' येथेच होतात. 'देवदत्तयज्ञदत्तौ युवयोः स्वम्' येथें होत नाहींत. कारण ' देवदत्तयज्ञदत्तौ ' हें आमन्त्रित अविद्यमानासारखें होत आहे. तसेच ' तिङ्ङतिङः ' ( ८।१।२८ ) या सूत्रानें सांगितलेला अनुदात्त ' देवदत्तः पचति ' येथेंच होतो. ' देवदत्त पचसि ' येथें होत नाहीं. कारण देवदत्त हें आमन्त्रित अविद्यमानासारखें होत आहे.

---

पदाहून पर अशा आमन्त्रिताला अनुदात्त सांगितला आहे. 'इमं मे गङ्गे यमुने' या मन्त्रामध्ये मे या पदाहून पर अशा गङ्गे या आमन्त्रिताला हा अनुदात्त होतो; तसाच यमुने या आमन्त्रितालाही अनुदात्त झाला पाहिजे. जरी यमुने हें पद गङ्गे या पदाहून पर आहे तरी त्या गङ्गे या पदाला अविद्यमानवद्भाव होत असल्यामुळें यमुने हें पद 'गङ्गे या पदाहून पर' असें धरतां येत नाही. आतां गङ्गे याला अविद्यमानवद्भाव झाल्यामुळेंच यमुने हें आमन्त्रित मे या पदाहून पर आहे असें म्हणावें तर तसेंही गृहीत धरतां येत नाहीं. कारण सूत्रामध्यें हा अविद्यमानवद्भाव पूर्वशब्द उच्चारून सांगितला असल्यामुळें ते पुढील पदाच्या पूर्वी आहे या दृष्टीनें पाहूं लागलो तर तें अविद्यमानासारखें होत नसल्यामुळें त्यानें व्यवधान होईलच. तेव्हा यमुने हें आमन्त्रित मे या पदाहून पर आहे असें म्हणतां येत नसल्यामुळें यमुने याला अनुदात्त होणार नाहीं.

६. तेव्हां मे या पूर्वीच्या पदाहून पर कोणतें पद आहे या दृष्टीनें पाहूं लागलों तरीही गङ्गे या आमन्त्रिताला अविद्यमानवद्भाव होतो असें सिद्ध झालें.

७. तेव्हां यज्ञदत्त हें आमन्त्रित पदाहून पर आहे असें म्हणतां येत नाही.

पूजायामनन्तरप्रतिषेधः प्रयोजनम् । यावत्पचति शोभनम् । यावद्देवदत्त पचसीत्यत्रापि सिद्धं भवति ॥

## जात्वपूर्वम् ॥ ५ ॥

जात्वपूर्वम् [४७] प्रयोजनम् । जातु पचति । देवदत्त जातु पचसीत्यत्रापि सिद्धं भवति ॥

## आहो उताहो चानन्तरविधौ ॥ ६ ॥

आहो उताहो चानन्तरविधौ प्रयोजनम् । आहो पचसि । आहो देवदत्त पचसीत्यत्रापि सिद्धं भवति । उताहो पचसि । उताहो देवदत्त पचसीत्यत्रापि सिद्धं भवति ॥

## आम एकान्तरविधौ ॥ ७ ॥

आम एकान्तरविधौ प्रयोजनम् । आं पचसि देवदत्त । आं भोः पचसि देवदत्त अत्रापि सिद्धं भवति ॥

## [१]नामन्त्रिते समानाधिकरणे ॥ ८ । १ । ७३ ॥

इह कस्मान्न भवति । अघ्न्ये देवि सरस्वति इडे काव्ये विहव्ये एतानि ते अघ्न्ये नामानि । योगविभागः करिष्यते । नामन्त्रिते समानाधिकरणे सामान्यवचनम् । ततो विभाषितं विशेषवचन इति ॥

---

(वा. ४) शिवाय पूजा गम्यमान असतांना यावत् किंवा यथा यांच्या जवळच्या क्रियापदाला जो निषेध (८।१।३७) तेथेंही या अविद्यमानवद्भावाचा उपयोग होतो. तो अनुदात्ताच्या निषेधाचा निषेध 'यावत्पचति शोभनम्' येथें होतो तसाच 'यावद्देवदत्त पचसि' येथेंहीं होतो.[८]

(वा. ५) तसेंच 'जात्वपूर्वम्' (८।१।४७) या सूत्राच्या उदाहरणामध्येंहीं या अविद्यमानवद्भावाचा उपयोग होतो. तो निषेध 'जातु पचति' येथें होतो, तसा 'जातु देवदत्त पचसि' येथेंही होतो.

(वा. ६) तसेंच 'आहो उताहो चानन्तरम्' (८।१।४९) या सूत्राच्या उदाहरणामध्येंही अविद्यमानवद्भावाचा उपयोग होतो. त्यानें सांगितलेला अनुदात्ताचा निषेध 'आहो पचति उताहो पचति' येथे होतो, तसाच 'आहो देवदत्त पचसि उताहो देवदत्त पचसि' येथेंहीं होतो.

(वा. ७) तसेंच 'आम एकान्तर०' (८।१।५५) या ठिकाणींही अविद्यमानवद्भावाचा उपयोग होतो. त्यानें सांगितलेला अनुदात्ताचा निषेध 'आम् पचसि देवदत्त' येथें होतो तसाच 'आम् भोः पचसि देवदत्त' येथेंहीं होतो.[९] कारण अशा ठिकाणीं आमन्त्रित हें अविद्यमानासारखें होत आहे.

(सू. ७३) '[२]अघ्न्ये देवि सरस्वति इडे काव्ये विहव्ये एतानि ते अघ्न्ये नामानि' या ठिकाणीं हा निषेध कां होत नाहीं?'

सूत्राचा विभाग असा करतों कीं—'नामन्त्रिते समानाधिकरणे [३]सामान्यवचनम्' एवढें हें पूर्वसूत्र समजावें. आणि त्यानंतर 'विभाषित विशेषवचने' असें दुसरें सूत्र समजावें.

---

८ कारण देवदत्त हें अविद्यमानासारखें होत असल्यामुळें पचसि हें क्रियापद यावत् याच्या जवळ आहे असें म्हणतां येतें.

९. भोः हें आमन्त्रित अविद्यमानासारखें होत अ॰ल्यामुळें आम् याच्या पुढें 'पचसि' या एकाच पदानें व्यवहित असें देवदत्त हे आमन्त्रित होतें. म्हणून त्याला अनुदात्ताचा निषेध सिद्ध होतो.

१. (सू. ७३) एकाच अर्थाचें प्रतिपादन करणाऱ्या अशा अनेक आमन्त्रितांपैकीं पूर्वीच्या आमन्त्रिताला अविद्यमानवद्भाव होत नाहीं.

२ अघ्न्ये देवि ही सहा संबोधनें एकाच अर्थाचीं आहेत. कारण हे अघ्न्ये तुझींच ही सर्व नावें आहेत असें येथन सांगितलें आहे.

३. सामान्यवचनम् हें पद पुढील सूत्रामध्यें आहे तें या सूत्रामध्ये घेतां येईलच असाच सूत्राचा विभाग समजावा. सामान्यवचन म्ह० विशेष्य. सामान्यम् उच्यते

## [१]सामान्यवचनं विभाषितं विशेषवचने ॥ ८ । १ । ७४ ॥

इह कस्मान्न भवति । ब्राह्मण वैयाकरण । बहुवचनमिति वक्ष्यामि ॥

सामान्यवचनमिति शक्यमवक्तुम् । कथम् । विभाषितं विशेषवचन इत्युच्यते तेन यत्प्रति विशेषवचनमित्येतद्भवति तस्य भविष्यति । किं च प्रत्येतद्भवति । सामान्यवचनम् ॥

अपर आह । विशेषवचन इति शक्यमवक्तुम् । कथम् । सामान्यवचनं विभाषितमित्युच्यते तेन यत्प्रति सामान्यवचनमित्येतद्भवति । किं च प्रत्येतद्भवति । विशेषवचनम् । सामान्यवचनं विभाषितं विशेषवचन इति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्येऽष्टमस्याध्यायस्य प्रथमे पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

( सू. ७४ ) 'ब्राह्मण वैयाकरण' या उदाहरणामध्ये हा विकल्प कां होत नाहीं.

बहुवचनम् असा अधिक शब्द या सूत्रामध्यें घालतों.

या सूत्रामध्यें सामान्यवचनम् हें नाहीं म्हटलें तरी चालेल.

तें कसें ?

'विभाषितं विशेषवचने' असें येथें म्हटलें आहे. तेव्हां 'हें विशेषवचन' असें ज्याच्यामुळें म्हणतां येत असेल त्यालाच हा विकल्प होईल.

विशेषवचन कोणामुळें होत असतें ?

सामान्यवचनामुळें.

दुसरा आचार्य असें म्हणतो कीं--या सूत्रामध्ये 'विशेषवचने' हें नाहीं म्हटलें तरी चालेल.

तें कसें ?

'सामान्यवचनं विभाषितम्' असें येथें म्हटलें आहे. तेव्हां 'हें सामान्यवचन' असें ज्याच्यामुळें म्हणतां येत असेल तें पुढें असतांनाच हा विकल्प होईल.

सामान्यवचन कोणामुळें होत असतें ?

विशेषवचनामुळें. तेव्हां विशेषवचन पुढें असतांनाच हा विकल्प होईल.

याप्रमाणें भगवान् पतजलींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्याच्या आठव्या अध्यायाच्या पहिल्या पादातील दुसरें आह्निक समाप्त झालें; व पहिला पाद समाप्त झाला.

---

अनेन तत् सामान्यवचनम्. विशेषवचन म्ह० विशेषण. विशेषः उच्यते अनेन तत् विशेषवचनम्. विशेष्य हें सामान्य अर्थाचें प्रतिपादन करणारें असतें आणि विशेषण हें त्यांतीलच विशेष दाखविणें. अध्ये देवि वगैरे नांवें हीं सर्व सारखींच असल्यामुळे त्यांत विशेष्य असें कोणालाच म्हणतां येत नाहीं. म्हणून तेथें हा निषेध येत नाहीं. अग्ने गृहपते हें या सूत्राचें उदाहरण होय. तेथें अग्ने हें विशेष्य आहे. गृहपते हे विशेषण आहे. तेथें अग्ने याला अविद्यमानवद्भाव होत नाहीं.

१. ( सू. ७४ ) विशेष्य आमन्त्रिताला विशेषण आम् आमन्त्रित पुढें असतांना अविद्यमानवद्भाव विकल्पानें होतो, असा सूत्रार्थ होय. ब्राह्मणाः वैयाकरणाः हें याचें उदाहरण आहे. येथें ब्राह्मणाः वैयाकरणाः हीं दोन्हीं संबोधनाचीं बहुवचनें आहेत.

२. विशेषवचन म्ह० विशेषण. विशेषण हें विशेष्यामुळेच म्हणतां येतें. तेव्हां 'विशेषण पुढें असतांना पूर्वीच्या आमन्त्रिताला' असें जरी मोघम म्हटलें तरी तें पूर्वीचें आमन्त्रित अर्थात विशेष्यच घेतां येतें. जसें 'बाप पुढें दृष्टीस पडला कीं अगदीं गप्प बसतो' असें म्हटलें असतां तो गप्प बसणारा मुलगाच घेतां येतो त्याप्रमाणेंच हें होय.

अध्याय ८ पाद १ समाप्त.

## पूर्वत्रासिद्धम् ॥ ८ । २ । १ ॥

येयं सपादसप्ताध्याय्यनुक्रान्तैतस्यामयं पादोनोऽध्यायोऽसिद्धो वेदितव्यः ॥ यदि सपादायां सप्ताध्याय्यामयं पादोनोऽध्यायोऽसिद्ध इत्युच्यते य इह सप्तमीनिर्देशाः पञ्चमीनिर्देशाः षष्ठीनिर्देशाश्चोच्यन्ते तेऽप्यसिद्धाः स्युः । तत्र को दोषः । झलो झलि (८. २. २६) ह्रस्वादङ्गात् (२७) संयोगान्तस्य लोपः (२३) इत्येतेषां निर्देशानामसिद्धत्वात्तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य (१.१.६६) तस्मादित्युत्तरस्य (६७) षष्ठी स्थानेयोगा (४९) इत्येताः परिभाषा न प्रकल्पेरन् ॥ नैष दोषः । यद्यपीदं तत्रासिद्धं तत्त्विह सिद्धम् । कथम् । कार्यकालं संज्ञापरिभाषं यत्र कार्यं तत्र द्रष्टव्यम् । झलो झलि । ह्रस्वादङ्गात् । संयोगान्तस्य लोपः । उपस्थितमिदं भवति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य तस्मादित्युत्तरस्य षष्ठी स्थानेयोगेति ॥ यदि कार्यकालं संज्ञापरि-

---

(सू. १) येथपर्यंत जीं हीं सव्वासात अध्यायामध्ये सूत्रें गेलीं त्यांच्या दृष्टीनें हीं पुढील पाऊण अध्यायांतील सूत्रें असिद्ध असल्यासारखीं समजावीं.

पण जर सपाद सप्ताध्यायीच्या दृष्टीनें पुढील त्रिपादी असिद्ध असें म्हटलें तर जे या त्रिपादीमध्यें सप्तमीनिर्देश, पंचमीनिर्देश आणि षष्ठीनिर्देश केले आहेत ते देखील असिद्ध होतील.

तसें झालें असतां कोणता दोष येतो ?

'झलो झलि' (८।२।२६) 'ह्रस्वादङ्गात्' (८।२।२७) 'संयोगान्तस्य लोपः' (८।२।२३) या सूत्रांमध्यें असलेले सप्तमीनिर्देश पंचमीनिर्देश व षष्ठीनिर्देश असिद्ध असल्यामुळे त्या ठिकाणीं 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य'(१।१।६६) 'तस्मादित्युत्तरस्य'(१।१।६७) 'षष्ठी स्थानेयोगा' (१।१।४९) या परिभाषा प्रवृत्त होणार नाहींत.

हा दोष येत नाहीं. जरी हें त्रिपादीमधील शास्त्र, सपादसप्ताध्यायीमधील शास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध असलें तरी पण तें सपादसप्ताध्यायीमधील शास्त्र या त्रिपादीमधील शास्त्राच्या दृष्टीनें सिद्धच आहे.

तरी पण काय झालें ?

संज्ञा आणि परिभाषा यांच्या विषयीं कार्यकालपक्ष आहे त्यामुळें ज्या ठिकाणीं कार्य सांगितलें असेल त्या ठिकाणीं त्या कार्यानें आकर्षण केल्यामुळें ह्या संज्ञा आणि परिभाषा उपस्थित होतात. तेव्हां 'झलो झलि' (८।२।२६) ह्रस्वादङ्गात् '(८।२।२७)' संयोगान्तस्य लोपः (८।२।२३) या ठिकाणीं 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' (१।१।६६) 'तस्मादित्युत्तरस्य' १।१।६७) आणि 'षष्ठी स्थानेयोगा' (१।१।४९) या परिभाषा उपस्थित होतात.

संज्ञा आणि परिभाषा यांविषयीं कार्यकालपक्ष

---

१. (सू.१) सपादसप्ताध्यायींतील शास्त्राच्या दृष्टीनें त्रिपादींतील सर्व शास्त्रें असिद्ध समजावीं व त्रिपादीमध्यें पूर्वशास्त्राच्या दृष्टीनें परशास्त्र असिद्ध समजावें.

२. ज्याप्रमाणें मनुष्याच्या दृष्टीने पिशाच दिसत नाहीं तरी पिशाचाला मनुष्य दिसत असल्यामुळें पिशाच हें आपल्या इच्छेप्रमाणें मनुष्याला वागवितें त्याप्रमाणें सपादसप्ताध्यायीतील परिभाषांच्या दृष्टीनें त्रिपादींतील शास्त्रें दिसत नसलीं तरीं त्रिपादीतील 'झलो झलि' वगैरे शास्त्रांना सपादींतील परिभाषा दिसत असल्यामुळें तीं त्रिपादीतील शास्त्रें संज्ञा आणि परिभाषा यांना आपल्या जवळ ओढून घेऊन आपलें काम भागवितात यालाच कार्यकालपक्ष म्हणतात.

भाषमित्युच्यत इयमपि परिभाषास्ति विप्रतिषेधे परमिति सापीहोपतिष्ठेत। तत्र को दोषः। विस्फोर्यम् अवगोर्यमिति गुणाद्दीर्घत्वं स्याद्विप्रतिषेधेन॥ अत उत्तरं पठति।

**पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधोऽभावादुत्तरस्य ॥ १ ॥**

पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधः। किं कारणम्। अभावादुत्तरस्य। द्वयोर्हि सावकाशयोः समवस्थितयोर्विप्रतिषेधो भवति न च पूर्वत्रासिद्धे परं पूर्वं प्रति भवति॥ यद्येवं दोग्धा दोग्धुम् घत्वस्यासिद्धत्वाड्ढत्वं प्राप्नोति। काष्ठतट् कूटतट् संयोगादिलोपस्यासिद्धत्वात्संयोगान्तलोपः प्राप्नोति।

**अपवादो वचनप्रामाण्यात् ॥ २ ॥**

अनवकाशावेतौ वचनप्रामाण्याद्भविष्यतः॥ ·तस्मात्कार्यकालं संज्ञापरिभाष-

---

आहे असें म्हटलें तर ‘ विप्रतिषेधे परं कार्यम् ’ (१।४।२)ही देखील एक परिभाषाच असल्यामुळें ती देखील त्रिपादीमध्यें उपस्थित होईल.

ती उपस्थित झाली असतां कोणता दोष येतो ?

विस्फोर्यम् अवगोर्यम् या उदाहरणांमध्यें गुण आणि दीर्घ यांमध्यें विरोध येत असल्यामुळें गुणापेक्षां परत्वास्तव अगोदर दीर्घ होईल.[3]

यानंतर आचार्य वार्तिककार म्हणतात—

(वा. १) पूर्व सूत्रांच्या दृष्टीनें असिद्ध अशा त्रिपादीमध्यें विप्रतिषेधच मुळीं संभवत नाहीं !

कां बरें ?

परशास्त्राचा अभाव आहे म्हणून. अन्य ठिकाणीं चरितार्थ असलेले दोन विधि जर एकाद्या उदाहरणामध्ये बरोबरीनें उपस्थित होतील तरच त्या दोहोंमध्यें विरोध आहे असें समजलें जातें. आणि या त्रिपादीमध्यें तर परशास्त्र हें पूर्वशास्त्राच्या दृष्टीनें नसल्यासारखेंच होत आहे.[4]

असेंच जर असेल तर दोग्धा दोग्धुम् या उदाहरणांमध्यें घत्व असिद्ध असल्यामुळें ढत्व प्राप्त होतें.[5] तसेंच काष्ठतट् या उदाहरणामध्यें संयोगादिलोप असिद्ध असल्यामुळें संयोगान्तलोप प्राप्त होतो.[6]

(वा. २) घत्व आणि संयोगान्तलोप या विधींना चारितार्थ्य नसल्यामुळें वचनसामर्थ्यास्तव

---

३. वि-उपसर्गपूर्वक स्फुर् धातु आणि अव-उपसर्गपूर्वक गुर् धातु यांहून ‘ ऋहलोर्ण्यत् ’ (३।१।१२३) या सूत्रानें ण्यत् प्रत्यय केल्यानंतर ‘हलि च’(८।२।७७) या सूत्राने दीर्घ प्राप्त झाला तरी तो असिद्ध असल्यामुळें ‘ पुगन्तलघूपधस्य ’ ( ७।३।८६ ) या सूत्रानें गुण होतो परंतु जर कार्यकालपक्ष घेऊन ‘विप्रतिषेधे परं कार्यम् ’( १।४।२ ) ही परिभाषा त्रिपादीमध्यें प्रवृत्त झाली तर गुणाचा बाध करून परत्वास्तव दीर्घ होऊन रूप बिघडेल.

४. तेव्हां दीर्घ असिद्ध असल्यामुळें गुण आणि दीर्घ यांची बरोबरी होत नाहीं. म्हणून कार्यकालपक्षीं ‘ विप्रतिषेधे परं कार्यम् ’ ही परिभाषा त्रिपादीमध्यें उपस्थित झाली तरी तिच्यापासून उपयोग होत नाहीं.

५. दुह् धातूहून तृच् प्रत्यय करून उकाराला गुण करून दोहृ अशी स्थिति असतांना ‘हो ढः’ (८।२।३१) यानें ढत्व प्राप्त होतें. आणि ‘दादेर्धातोर्घः’ (८।२।३२) यानें घत्व प्राप्त होते. येथें ‘दादेर्धातोर्घः’ हें शास्त्र जरी पर आहे तरी तें असिद्ध असल्यामुळें ढत्व होऊन रूप बिघडेल.

६. काष्ठतक्ष् शब्दामध्यें ‘ स्कोः संयोगा० ’ ( ८।२।२९ ) या सूत्रानें ककाराचा लोप होतो आणि शेवटच्या षकाराला जश्त्व आणि चर्त्व होऊन काष्ठतट् असें रूप होतें. येथें ‘ स्कोः संयोगा०’ हें शास्त्र असिद्ध असल्यामुळें ‘संयोगान्तस्य लोपः ’ ( ८।२।२३ ) या शास्त्रानें शेवटच्या षकाराचा लोप होऊन काष्ठतक् असें भलतें रूप होइल.

मिति न दोषः ॥

**पूर्वत्रासिद्धमधिकारः ॥ ३ ॥**

पूर्वत्रासिद्धमित्यधिकारोऽयं द्रष्टव्यः । किंप्रयोजनम् ।

**परस्य परस्य पूर्वत्र पूर्वत्रासिद्धविज्ञानार्थम् ॥ ४ ॥**

परः परो योगः पूर्वं पूर्वं योगं प्रत्यसिद्धो यथा स्यात् ॥

**अनधिकारे हि समुदायस्य समुदायेऽसिद्धविज्ञानम् ॥ ५ ॥**

अनधिकारे हि सति समुदायस्य समुदाये ऽसिद्धत्वं विज्ञायेत ॥ तत्र को दोषः ।

**तत्रायथेष्टप्रसङ्गः ॥ ६ ॥**

तत्रायथेष्टं प्रसज्येत । गोधुङ्मान् गुडलिण्मानिति । घत्वढत्वयोः कृतयोर्झयः [ ८. २. १० ] इति वत्वं प्रसज्येत ॥

**तस्मादधिकारः ॥ ७ ॥**

तस्मादधिकारोऽयं द्रष्टव्यः ॥

असिद्धवचनं किमर्थम् ।

**असिद्धवचन उक्तम् ॥ ८ ॥**

किमुक्तम् । तत्र तावदुक्तं षत्वतुकोरसिद्धवचनमादेशलक्षणप्रतिषेधार्थमुत्सर्गलक्षणभावार्थं चेति । एवमिहापि पूर्वत्रासिद्ध-

---

ते विधी होतील. एकंदरीत संज्ञा आणि परिभाषा यांच्या विषयीं कार्यकालपक्ष घेतला असतां येथें कांहीं दोष येत नाहीं.

( वा. ३) 'पूर्वत्रासिद्धम्' हा अधिकार आहे असें समजावें.

अधिकाराचा काय उपयोग ?

( वा. ४ ) पूर्व पूर्व शास्त्राच्या दृष्टीनें पुढील पुढील शास्त्र असिद्ध झाले पाहिजे.

( वा. ५ ) अधिकार मानला नाहीं तर फक्त पूर्वसमुदायाच्या म्हणजे सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें पुढील समुदायाला म्हणजे त्रिपादीला असिद्धत्व होईल.

तसें झालें असतां कोणता दोष येतो ?

(वा. ६) तसें झालें असतां अनिष्ट रूप होईल. गोधुङ्मान् गुडलिण्मान् या उदाहरणांमध्यें घत्व आणि ढत्व केल्यानंतर 'झयः' (८।२।१०) या सूत्रानें वत्व होऊं लागेल.

( वा. ७ ) तेव्हां पूर्वत्रासिद्धम् हा अधिकार आहे असेंच मानलें पाहिजे. आतां या असिद्ध सांगण्याचा काय बरें उपयोग ?

( वा. ८ ) असिद्ध–वचनाविषयीं पूर्वींच सांगितलें आहे की 'षत्वतुकोरसिद्धः' (६।१।८६) हें असिद्धवचन आदेशनिमित्तक कार्याचा निषेध व्हावा याकरितां आणि स्थानिनिमित्तक कार्य

---

७. घत्व आणि संयोगादिलोप हे विधी अचरितार्थ होत असल्यामुळें ते क्रमाने ढत्व आणि संयोगान्तलोप यांचे अपवाद आहेत. आणि म्हणूनच तेथे 'पूर्वत्रासिद्धम्' याची प्रवृत्ति होत नाही.

८. अधिकार असल्यामुळें 'पूर्वत्रासिद्धम्' याचा पुढील प्रत्येक सूत्रांत संबंध होतो. आणि ते तें शास्त्र आपापल्या मानानें जीं पूर्वशास्त्रें म्हणजे सपादसप्ताध्यायींतील सर्व आणि त्रिपादीतील त्याच्या पूर्वींचीं शास्त्रें त्यांच्या दृष्टीनें असिद्ध होतें.

९. अधिकार असल्यामुळे त्रिपादीमधील पूर्वशास्त्राच्या दृष्टीनें म्ह. येथे 'झयः' ( ८।२।१० ) या शास्त्राच्या दृष्टीनें गोधुङ्मान् या ठिकाणीं 'दादेर्धातोर्घः' ( ८।२।३२ ) या शास्त्रानें झालेलें घत्व तसेंच मधुलिण्मान् या ठिकाणी 'हो ढः' (८।२।३१) या शास्त्रानें झालेलें ढत्व असिद्ध होतें. तेव्हां 'झयः' याच्या दृष्टीनें हकारच दिसत असल्यामुळे मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार आदेश होत नाहीं. कारण हकार हा झय् प्रत्याहारात नाही.

वचनमादेशलक्षणप्रतिषेधार्थमुत्सर्गलक्षण - भावार्थं च । आदेशलक्षणप्रतिषेधार्थं तावत् । राजभिः तक्षभिः राजभ्याम् तक्षभ्याम् राजसु तक्षस्विति नलोपे कृते ऽत इत्यैस्भावादयः प्राप्नुवन्ति । असिद्धत्वान्न भवन्ति । उत्सर्गलक्षणभावार्थं च । अमुष्मै अमुष्मात् अमुष्य अमुष्मिन्नित्यत्र मुभावे कृते ऽत इति स्मायादयो न प्राप्नुवन्ति । असिद्धत्वाद्भवन्ति । सुपर्वाणौ सुपर्वाणः । णत्वे कृते नोपधाया इति दीर्घत्वं न प्राप्नोति । असिद्धत्वाद्भवति ॥

## [1]नलोपः सुप्स्वरसंज्ञातुग्विधिषु कृति ॥ ८ । २ । २ ॥

सुब्विधिं प्रति नलोपो ऽसिद्धो भवतीत्युच्यते । भवेदिह राजभिः तक्षभिरिति नलोपे कृते ऽत इत्यैस्भावो न स्यात् । इह तु खलु राजभ्याम् तक्षभ्याम् राजसु तक्षस्विति नलोपे कृते दीर्घत्वैत्त्वे प्राप्नुतः ॥ नैष दोषः । सुब्विधिरिति सर्वविभक्त्यन्तः समासः । सुपो विधिः सुब्विधिः सुपि विधिः

---

व्हावें याकरितां केलें आहे. त्याप्रमाणें येथें देखील असिद्धवचन हें आदेशनिमित्तक कार्याचा निषेध व्हावा याकरितां आणि स्थानिनिमित्तक कार्य व्हावें याकरितां केले आहे. त्यांपैकीं आदेशनिमित्तक कार्य होत नाहीं याचें उदाहरण--राजभिः तक्षभिः राजभ्याम् तक्षभ्याम् राजसु तक्षसु या उदाहरणांमध्यें नकाराचा लोप केल्यानंतर ह्रस्व अकाराच्या निमित्तानें सांगितलेले ऐस् वगैरे आदेश प्राप्त होतात. परंतु नकाराचा लोप असिद्ध असल्यामुळें ते होत नाहींत. स्थानिनिमित्तक कार्य होतें याचें उदाहरण--अमुष्मै अमुष्मात् अमुष्य अमुष्मिन् या उदाहरणांमध्यें मुत्व ( ८।२।८० ) केल्यानतर ह्रस्व अकाराच्या निमित्तानें सांगितलेले स्मै वगैरे आदेश प्राप्त होत नाहींत. परंतु मुत्व असिद्ध असल्यामुळें ते करता येतात. तसेंच सुपर्वाणौ सुपर्वाणः या उदाहरणामध्यें णत्व केल्यानंतर 'नकारान्ताच्या उपधेला' असें म्हणून सांगितलेला ( ६।४।८ ) दीर्घ प्राप्त होत नाहीं. परंतु णत्व असिद्ध असल्यामुळें करता येतो.

( सू. २ ) सुप्‌विधीच्या दृष्टीनें नलोप असिद्ध होतो असें येथें म्हटलें आहे. तेव्हा राजभिः तक्षभिः या उदाहरणांमध्यें नलोप केला असतां ह्रस्व अकाराच्या निमितानें सांगितलेला ऐस् आदेश होत नाहीं असें होईल. परंतु राजभ्याम् तक्षभ्याम् राजसु तक्षसु या उदाहरणांमध्यें नलोप केला असतां दीर्घ ( ७।३।१०२ ) आणि एकार ( ७।३।१०४ ) प्राप्त होतात.[2]

हा दोष येत नाहीं. सुप् या पदाचा विधिशब्दाशीं समास केला आहे, तो सर्व विभक्ती मनांत घेऊन आचार्यानें केलेला आहे. त्यामुळें सुपाचे स्थानीं होणारा जो विधि तो सुब्विधि, तसाच सुप् पुढें असतांना होणारा जो विधि तोही सुब्विधि, असें म्हणतां येते.

---

१. ( सू. २ ) नलोप जरी त्रिपादीमध्यें आहे तरी तो फक्त सुब्विधि, स्वरविधि, संज्ञाविधि आणि कृत्प्रत्ययनिमित्तक तुगागमविधि या चार विधींच्या दृष्टीनेंच असिद्ध होतो. इतर कोणत्याही विधीच्या दृष्टीनें असिद्ध होत नाहीं.

२. सुपः विधिः सुब्विधिः असा षष्ठीतत्पुरुष समास केला तर त्याचा अर्थ सुप् प्रत्ययाचे स्थानीं होणारा जो विधि तो सुब्विधि असा होतो. दीर्घ आणि एत्व हे विधी प्रत्यय पुढें असतांना त्याच्या मागील प्रकृतीला होत असल्यामुळें ते सुब्विधी नव्हेत. तेव्हां अर्थात् त्यांच्या दृष्टीनें नलोप सिद्धच असल्यामुळें ते विधी होतील असा दोष येतो.

सुब्विधिरिति ॥

अथ संज्ञाविधौ किमुदाहरणम् । पञ्च सप्त । पञ्च सप्तेत्यत्र नलोपे कृते ष्णान्ता षट् ( १. १. २४ ) इति षट्संज्ञा न प्राप्नोति। असिद्धत्वाद्भवति ।

## संज्ञाग्रहणानर्थक्यं च तन्निमित्तत्वाल्लोपस्य ॥ १ ॥

संज्ञाग्रहणं चानर्थकम् । किं कारणम् । तन्निमित्तत्वाल्लोपस्य । नाकृतायां षट्संज्ञायां जश्शसोर्लुग्न चाकृते लुकि पदसंज्ञा न चाकृतायां पदसंज्ञायां नलोपः प्राप्नोति । तदेतदानुपूर्व्या सिद्धं भवति ॥ इदं तर्हि प्रयोजनं पञ्चभिः सप्तभिरिति षट्त्रिचतुर्भ्यो हलादिर्झल्युपोत्तमम् [ ६.१.१७९;१८० ] इत्येष स्वरो यथा स्यात् ।

## स्वरेऽवधारणाच्च ॥ २ ॥

स्वरेऽवधारणाच्च संज्ञाग्रहणमनर्थकम् । स्वरेऽवधारणं क्रियते स्वरविधिं प्रतीति ॥ इदं तर्हि दण्डिदत्तौ दत्तदण्डिनौ ।

---

संज्ञाविधि कर्तव्य असतांना नलोप असिद्ध होतो असें जें येथें म्हटलें आहे त्याचें उदाहरण कोणतें ?

पञ्च सप्त या उदाहरणांमध्यें नकाराचा लोप केला असतां 'ष्णान्ता षट्' ( १।१।२४ ) या सूत्रानें षट्संज्ञा प्राप्त होत नाहीं. परंतु नकाराचा लोप असिद्ध असल्यामुळें करतां येते.[3]

(वा. १) या सूत्रामध्यें संज्ञा-ग्रहण केलें आहे तें निरर्थक आहे.

काय कारण?

कारण असें कीं नलोप हा त्या संज्ञेला निमित्त आहे. असें पहा कीं पञ्च सप्त या उदाहरणांमध्यें षट्संज्ञा जर केली नाहीं तर जस् व शस् यांचा लुक् ( ७।१।२१ ) प्राप्त होत नाहीं. आणि लुक् केला नाहीं तर पञ्चन् याला पदसंज्ञा ( १।४।४ ) प्राप्त होत नाही. आणि पदसंज्ञा केली नाहीं तर नलोप प्राप्त होत नाहीं. तेव्हां पञ्च सप्त हीं उदाहरणें क्रमानें आपोआपच सिद्ध होत आहेत.[4]

तर मग सज्ञाग्रहणाचा दुसरा उपयोग असा कीं—पञ्चभिः सप्तभिः या उदाहरणांमध्यें 'षट्त्रिचतुर्भ्यो हलादिः' ( ६।१।१७९ ) 'झल्युपोत्तमम्' ( ६।१।१८० ) या सूत्रांनीं सांगितलेला स्वर झाला पाहिजे.

(वा. २) 'स्वरविधि कर्तव्य असतांना नलोप असिद्ध होतो' असा स्वराविषयीं विशेष नियम या सूत्रामध्येंच केला आहे. त्यामुळे संज्ञाग्रहण निरर्थक होत आहे.[5]

तर मग संज्ञाग्रहणाचा उपयोग दण्डिदत्तौ दत्तदण्डिनौ हीं दोन रूपे सिद्ध होणे हा समजावा.[6]

---

३. कारण त्या सूत्रानें नकार शेवटी असलेल्या संख्यावाचक शब्दाला षट् संज्ञा सांगितली आहे.

४. तेव्हां नलोप झाल्यानंतर षट्संज्ञा करण्याचें कारणच कांही नाहीं. ती अगोदरच करावी लागते. कारण षट् संज्ञा झाल्यानंतरच पुढील प्रत्ययाचा लुक् होणार आणि लुक् झाल्यानंतरच पञ्चन् याला पदसंज्ञा होणार व त्याला पदसंज्ञा झाली तरच नलोपाची प्राप्ति येते.

५. येथें षट् संज्ञा स्वराकरितांच करावयाची असल्यामुळें सूत्रांतील स्वरग्रहणानेंच हें उदाहरण सिद्ध होत आहे.

६. दण्डिन् आणि दत्त या शब्दांचा द्वंद्वसमास केला असता हीं दोन रूपें होतात. दण्डिन् शब्दांतील नकाराचा लोप झाल्यानंतर दण्डि हें ऱ्हस्व इकारान्त होत असल्यामुळें 'शेषो घ्यसखि' ( १।४।७ ) या सूत्रानें त्याला घि संज्ञा प्राप्त होते. परंतु येथें संज्ञाग्रहण केलें असल्यामुळे घि संज्ञेच्या दृष्टीनें नलोप असिद्ध होतो, म्हणून घि संज्ञा होत नाहीं. जर घि संज्ञा झाली असती तर 'द्वन्द्वे घि' ( २।२।३२ ) या सूत्रानें दण्डि हा शब्द कायमचा पूर्वीच आला असता व दत्त-

तुग्विधौ किमुदाहरणम् । वृत्रहभ्याम् वृत्रहभिः । नलोपे कृते ह्रस्वस्य पिति कृति तुक् [ ६ १.७१ ] इति तुक्प्राप्नोति । असिद्धत्वान्न भवति ।

## तुग्विधौ चोक्तम् ॥ ३ ॥

किमुक्तम् । संनिपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति ॥ इदं तर्हि प्रयोजनम्। कृतीति वक्ष्यामि । इह मा भूत् । ब्रह्महच्छत्रम् भ्रूणहच्छाया । नैष संनिपातलक्षणः ॥

## न मु ने ॥ ८।२।३। ॥

इह ने यत्कार्यं प्राप्नोति तत्प्रति मुभावो नासिद्ध इत्युच्यते । नाभावश्चैव तावन्न प्राप्नोति । एवं तर्हि

## न मु टादेशे ॥ १ ॥

न मु टादेश इति वक्तव्यम् । किमिदं टादेश इति । टाया आदेशष्टादेश इति ।

---

( वा. ३ ) तुग्विधि कर्तव्य असतांना नलोप असिद्ध होतो असें येथें म्हटले आहे त्याचें उदाहरण कोणतें ?

वृत्रहभ्याम् वृत्रहभिः या उदाहरणांमध्यें नलोप केला असतां ' ह्रस्वस्य पिति कृति तुक्' ( ६।१।७१ ) या सूत्रानें तुक् आगम प्राप्त होतो. परंतु नलोप असिद्ध असल्यामुळें होत नाहीं.

तुक्-विधीविषयीं पूर्वीच सांगितलें आहे.

काय बरें तें ?

दोघांच्या सबंधाला मानून झालेला जो विधि तो त्या संबंधाचा विनाश करणाऱ्याला कारण होत नाहीं.

तर मग तुग्विधिग्रहणाचा असा उपयोग आहे कीं, त्या तुग्विधीच्या संबंधानें कृति असें येथें म्हटलें आहे. तेव्हां ब्रह्महच्छत्रम् भ्रूणहच्छाया या उदाहरणांमध्यें नलोप असिद्ध न झाला पाहिजे. कारण या उदाहरणांमध्यें नलोप आहे तो दोघांच्या सबंधाला मानून झालेला नाहीं.

( सू. ३ ) ना पुढें असतांना जे कार्य प्राप्त होतें त्या कार्याच्या दृष्टीनें मुत्व (८।२।८०) असिद्ध होत नाहीं, असें येथे म्हटलें आहे. परंतु विचार केला असतां येथें नाभावच अगोदर प्राप्त होत नाहीं.[२]

असें आहे तर मग—

( वा. १ ) टादेशे[३] पुढें असतांना मुत्व असिद्ध होत नाहीं, असें येथें म्हटलें पाहिजे.

---

दण्डिनौ असें दुसरें रूप झालें नसतें.

७. तेव्हां येथ जरी नलोप असिद्ध झाला नाही तरी संनिपात-परिभाषेनेंच येथें तुक् आगम होणार नाहीं. संनिपात-परिभाषेचें स्वरूप पूर्वी ( १।१।३९ ) येथें पहावें.

८. तेव्हां या ठिकाणी संनिपात-परिभाषा प्रवृत्त होत नाहीं. व ' छे च' ( ६।१।७३ ) या सूत्रानें तुक् आगम येथें होतो. कारण तो तुक् आगम कृत्प्रत्ययनिमित्तक नसल्यामुळे त्याच्या दृष्टीनें नलोप असिद्ध होत नाहीं. एकंदरींत या सूत्रामध्यें तुक्ग्रहणाचा उपयोग कांहीं संभवत नाहीं.

१. (सू.३) ना आदेश कर्तव्य असतांना व केल्यानतर सुद्धां मुत्व असिद्ध होत नाही. आरंभी हा अर्थ मनात न घेतां पुढील भाष्यग्रंथ आहे.

२. ह्या सूत्रामध्यें ना पुढें असतांना मुत्वाच्या असिद्धत्वाचा निषेध सांगितला आहे. तेव्हां अर्थातच ना आदेश होईपर्यंत हा निषेध प्रवृत्त होणार नाहीं. आणि अशा स्थितीत ना आदेशच मुळी सिद्ध होत नाही. कारण मुत्व सिद्ध मानलें तरच उकारान्त आहे असें समजून 'शेषो घ्यसखि' ( १।४।७ ) या सूत्रानें घि संज्ञा होणार आणि घि संज्ञा झाल्यानंतरच 'आङो नाऽस्त्रियाम् '( ७।३।१२० ) या सूत्रानें ना आदेश होणार आहे.

३. अदस् शब्दाहून तृतीयेचें एकवचन टा प्रत्यय

यदि तर्हि टाया आदेश इत्युच्यते टायामादेशेऽप्रसिद्धिः । तत्र को दोषः । अमुनेत्यत्र मुभावस्यासिद्धत्वादतो दीर्घो यञि सुपि च [ ७.३.१०१;१०२ ] इति दीर्घत्वं प्रसज्येत । नैष दोषः । सर्वविभक्त्यन्तः समासः । टाया आदेशष्टादेशः । टायामादेशष्टादेश इति । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं ने यत्कार्यं प्राप्नोति तस्मिन्मुभावो नासिद्ध इत्युच्यते नाभावश्चैव तावन्न प्राप्नोतीति । नैष दोषः । इङ्गितेन चेष्टितेन निमिषितेन महता वा सूत्रनिबन्धेनाचार्याणामभिप्रायो लक्ष्यते । एतदेव ज्ञापयति भवत्यत्र नाभाव इति यदयं ने परतोऽसिद्धत्वप्रतिषेधं शास्ति ॥ अथवा द्विगता अपि हेतवो भवन्ति । तद्यथा । आम्राश्च सिक्ताः पितरश्च प्रीणिता भवन्ति ।

---

टादेश म्हणजे काय ?

टा प्रत्ययाचे स्थानीं झालेला जो आदेश तो टादेश होय.

टा प्रत्ययाचा जो आदेश तो टादेश असें जर म्हटलें तर टा प्रत्यय पुढें असतांना जो आदेश तो कर्तव्य असतांना मुत्व असिद्ध होणार.

तसें झालें तर कोणता दोष येतो ?

अमुना या उदाहरणामध्यें मुत्व असिद्ध असल्यामुळें 'अतो दीर्घो यञि' 'सुपि च' (७।३।१०१-१०२ ) सूत्रांनीं सांगितलेला दीर्घ होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं.

टादेश या सामासिक शब्दामध्यें टा या शब्दाचा आदेश या शब्दाशीं जो समास केला आहे तो सर्व विभक्ती मनांत घेऊन केला आहे. त्यामुळें टादेश या शब्दाचा असा अर्थ होतो कीं, टा प्रत्ययाचे स्थानीं होणारा जो आदेश तोही टादेश आणि टा प्रत्यय पुढें असतांना होणारा जो आदेश तोही टादेश.

याप्रमाणें सूत्रामध्यें टादेश हा शब्द घातला असतां सर्व सिद्ध होतें हें खरें, परंतु 'न मु टादेशे' असें सूत्र निराळें करावें लागतें.

तर मग मूळचें सूत्र जसें आहे तसेंच म्ह० 'ने मु ने' असेंच असूं दे. पण मूळचेंच सूत्र ठेवलें तर त्यावर येणारा दोष पूर्वींच सांगितला आहे तो असा कीं– ना पुढें असताना जें कार्य प्राप्त होतें त्या कार्याच्या दृष्टीनें मुत्व असिद्ध होत नाहीं असें येथें म्हटलें आहे. परंतु विचार केला असतां ना आदेशच अगोदर प्राप्त होत नाहीं. हा दोष येत नाहीं. कारण इंगित[4] चेष्टित निमिषित आणि मोठा सूत्रप्रबंध यांवरून आचार्यांच्या मनांतील अभिप्राय ओळखावा लागतो. तेव्हां येथें ज्या अर्थीं पाणिनि ना पुढें असतांना असिद्धत्वाचा निषेध सांगतात त्या वरून ते असें सुचवितात कीं— या सूत्राच्या उदाहरणामध्यें ना आदेश अगोदर होतो.[5]

अथवा दोन्हीकडे लागू पडण्यासारखे मनांत हेतु असतात. असें पहा कीं– आंब्याच्या झाडाखालीं तर्पण करीत बसला म्हणजे आंब्याच्या झाडालाही पाणी मिळतें आणि

---

व 'त्यदादीनामः' ( ७।२।१०२ ) या सूत्रानें अत्व करून 'टाङसिङ०' ( ७।१।१२ ) या सूत्रानें टा प्रत्ययाला इन आदेश केल्यानंतर हें सूत्र प्रवृत्त होऊन मुत्व सिद्ध झालें म्हणजे घि संज्ञा होऊन ना आदेश होऊन रूप सिद्ध होईल असा अभिप्राय आहे.

४. इंगित वगैरे शब्दांचे अर्थ पूर्वी ( भाग १ पृष्ठ १ ) यांत दाखविले आहेत.

५. तेव्हां तो ना आदेश कसा रीतीनें अगोदर करतां येईल अशी कल्पना करावी असे आचार्य पाणिनि सुचवितात ती कल्पना येथें अशी करावी कीं, ना आदेश होण्याच्या पूर्वी देखील मुत्व असिद्ध होत नाहीं.

तथा वाक्यान्यपि द्विगतानि दृश्यन्ते । श्वेतो धावति । अलम्बुसानां यातेति ॥ अथवा वृद्धकुमारीवाक्यवदिदं द्रष्टव्यम् । तद्यथा । वृद्धकुमारीन्द्रेणोक्ता वरं वृणीष्वेति सा वरमवृणीत पुत्रा मे बहुक्षीरघृतमोदनं कांस्यपात्र्यां भुञ्जीरन्निति । न च तावदस्याः पतिर्भवति कुतः पुत्राः कुतो गावः कुतो धान्यम् । तत्रानयैकेन वाक्येन पतिः पुत्रा गावो धान्यमिति सर्वं संगृहीतं भवति । एवमिहापि नेऽसिद्धत्वप्रतिषेधं ब्रुवता नाभावोऽपि संगृहीतो भवति ॥

## [१]उदात्तस्वरितयोर्यणः स्वरितोऽनुदात्तस्य ॥ ८।२।४ ॥

### [२]यण्स्वरो यणादेशे स्वरितयणः स्वरितार्थम् ॥ १ ॥

यण्स्वरो यणादेशे सिद्धो वक्तव्यः । किं प्रयोजनम् । स्वरितयणः स्वरितार्थम् । स्वरितयणः स्वरितत्वं यथा स्यात् । खलप्व्य-

---

पितरही सतुष्ट होतात. तसेंच वाक्यें देखील दोन्हीकडे लागू पडणारीं दिसतात. उदा— श्वेतो धावति[६]; अलंबुसानां याता. अथवा वृद्धकुमारीच्या वाक्याप्रमाणें हें समजावें. तें असें— वृद्धकुमारीला इन्द्रानें ' वर माग ' असें सांगितलें. नंतर तिनें माझ्या पुत्रांनीं कांशाच्या ताटामध्यें दुधातुपांनीं मिश्रित असें चमचमीत अन्न खावें, असा वर मागितला. आतां विचार केला तर ती कुमारी असल्यामुळें ती अविवाहित, तेव्हा तिला पतीच नाहीं. पुत्राची तर गोष्टच नको. तसेंच तिच्या मालकीच्या गाई तरी कोठल्या व धान्य तरी कसें असणार. पण वर मागतांना एका वाक्यांतच पति पुत्र गाई धान्य हें सर्व तिनें मिळविलें. याप्रमाणे येथेंही आचार्यांनीं ' ना पुढें असतांना णत्व असिद्ध होत नाहीं' असें म्हणण्यांत ना याचाही संग्रह केल्यासारखा होतो.

( सू. ४ वा. १ ) यण्-रूप आदेश कर्तव्य असतांना यण्-स्वर सिद्ध होतो असें बोलावें !

कशाकरितां ?

स्वरितयणः स्वरितार्थम्. म्हणजे स्वरिताचे स्थानीं झालेल्या यणाच्या पुढील अनुदात्ताला स्वरित झाला पाहिजे याकरितां. उदा— खलप्व्यटति खलप्व्यश्नाति[३].

---

६. पूर्वी पहा ( भाग १ पृष्ठ ३१ टीप ६७ ) श्वेतो धावति याचा अर्थ.

१ ( सू. ४ ) उदात्त आणि स्वरित यांचे स्थानीं झालेला जो यण् त्याच्या पुढील अनुदात्ताला स्वरित होतो.

२. 'उदात्तस्वरितयो०' (८।२।४) या प्रकृत सूत्राने सांगितलेला जो यणाच्या पुढील अनुदात्ताला स्वरित स्वर तो यणाच्या निमित्तानें सांगितला असल्यामुळें त्याला यण्-स्वर असें म्हटले आहे.

३. खलपू या अन्तोदात्त शब्दाहून सप्तमी एकवचन ङि प्रत्यय करून ऊ या उदात्ताचे स्थानीं यणानें वकार झाल्यामुळें त्याच्या पुढील अनुदात्त इकाराला या प्रकृत सूत्रानें स्वरित होतो. नंतर त्या स्वरित इकाराचे स्थानीं यणाने यकार झाल्यामुळें त्याच्या पुढील अटति आणि अश्नाति या शब्दांतील अनुदात्त अकाराला पुनः या प्रकृत सूत्रानें स्वरित होऊन खलप्व्यटति असें रूप होतें. परतु हा त्रिपादीमध्यें सांगितलेला स्वरित असिद्ध असल्यामुळें हा स्वरित होण्यापूर्वीच अनुदात्त इकाराला यणानें यकार होईल व त्यामुळें तो यण् स्वरिताचें स्थानीं झाला नसल्यामुळें त्याच्या पुढील अकाराला स्वरित होणार नाहीं, असा दोष येतो. यण्-स्वर सिद्ध मानला म्हणजे यणापेक्षां अगोदर इकाराला स्वरित करतां येत असल्यामुळें रूप सिद्ध होतें.

टति खलप्यश्नाति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । आहायं स्वरितयण इति न चास्ति सिद्धः स्वरितस्तत्राश्रयात्सिद्धत्वं भविष्यति ।

**आश्रयात्सिद्धत्वमिति चेदुदात्तात्स्वरिते दोषः ॥ २ ॥**

आश्रयात्सिद्धत्वमिति चेदुदात्तात्स्वरिते दोषो भवति । दध्याशा । मध्वाशा ॥ एवं तर्हि योगविभागः करिष्यते । उदात्तयणः परस्यानुदात्तस्य स्वरितो भवति । ततः स्वरितयणः । स्वरितयणश्च परस्यानुदात्तस्य स्वरितो भवति । उदात्तयण इत्येव ॥

अथवा स्वरितग्रहणं न करिष्यते । केनेदानीं स्वरितयणः परस्यानुदात्तस्य स्वरितो भविष्यति । उदात्तयण इत्येव । ननु च स्वरितयणा व्यवहितत्वान्न प्राप्नोति ।

---

तर मग तसें बोललें पाहिजे.

तसें बोलावयास नको. कारण हा आचार्य पाणिनि ' स्वरिताचे स्थानीं झालेल्या यणाच्या पुढें' असें त्या स्वरित यणाच्या आश्रयानें पुढील अनुदात्ताला स्वरित सांगतो; आणि यणादेशाच्या दृष्टीनें स्वरित मुळींच सिद्ध नाहीं. तेव्हां अर्थातच तो आश्रय धरल्यामुळें सिद्ध होईल.

( वा. २ ) आश्रय धरल्यामुळें सिद्ध होत असेल तर ' उदात्तादनुदात्तस्य स्वरितः' ( ८।४।६६ ) या सूत्रानें उदात्ताच्या पुढील अनुदात्ताला स्वरित केला असतां दोष येतो. उदा० दध्याशा मध्वाशा. तर मग येथें असा योगविभाग म्ह० या सूत्राचे दोन भाग करतों. त्यांपैकीं प्रथम सूत्र ' उदात्तयणः स्वरितोऽनुदात्तस्य ' उदात्ताचे स्थानीं झालेल्या यणाच्या पुढील अनुदात्ताला स्वरित होतो. नंतर दुसरें सूत्र ' स्वरितयणः ' या सूत्रामध्यें प्रथम सूत्रांतून ' उदात्तयणः ' याचा संबंध होतो. ' उदात्तयणः० ' या प्रथम सूत्रानें झालेल्या स्वरिताचे स्थानीं झालेला जो यण् त्याच्या पुढील अनुदात्ताला स्वरित होतो.

अथवा या सूत्रामध्यें स्वरितग्रहण करीत नाहीं.

तें केलें नाहीं तर स्वरिताचे स्थानीं झालेल्या यणाच्या पुढील अनुदात्ताला कोणत्या सूत्रानें आतां स्वरित होईल ?

उदात्तयणः० या सूत्रानेंच होईल.

पण स्वरिताचे स्थानीं झालेल्या यणानें व्यवधान असल्यामुळें ' उदात्तयणः० ' या सूत्रानें स्वरित प्राप्त होत नाहीं.

---

४. ह्या सूत्रानें जो स्वरिताचे स्थानी झालेल्या यणाच्या पुढील अनुदात्ताला स्वरित सांगितला आहे त्याला उदाहरण मिळावें म्हणून यणाच्या दृष्टीनें त्रिपादींतील असूनही स्वरित सिद्ध मानला तर 'उदात्तादनुदात्तस्य० ' ( ८।४।६६ ) या सूत्रानें झालेला स्वरितही सिद्ध मानावा लागेल, आणि त्यामुळें दध्याशा या उदाहरणामध्यें दोष येतो. दधि शब्द आद्युदात्त आहे. आणि आशा शब्द अन्तोदात्त आहे. येथे दधि शब्दातील इकाराला ' उदात्ताद० ' ( ८।४।६६ ) या शास्त्रानें अगोदर स्वरित होईल. नंतर त्याला यण् झाला तर त्याला यणाच्या पुढील आशा शब्दांतील अनुदात्त अशा प्रथम आकाराला प्रकृत सूत्रानें ( ८।२।४ ) स्वरित होईल. हा दोष ' उदात्ता०' ( ८।४।६६ ) यानें सांगितलेला स्वरित असिद्ध असल्यामुळे येत नाही. कारण तो स्वरित होण्याच्या पूर्वीच यण् होतो म्हणून तो स्वरिताचे स्थानी यण् होत नाहीं. यण् झाल्यानंतर दधि शब्दांतील अकार उदात्त घेऊन त्याच्या पुढील आकाराला ' उदात्ता० '( ८।४।६६ ) यानें स्वरित होत नाहीं. कारण त्या स्वरिताचा ' नोदात्त० ' ( ८।४।६७ ) हा निषेध आहे.

स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवदिति नास्ति व्यवधानम् ॥ अथवा नैवं विज्ञायते स्वरितस्य यण्स्वरितयण् स्वरितयण इति। कथं तर्हि। स्वरिते यण्स्वरितयण स्वरितयण इति।

[ एकादेश उदात्तेनोदात्तः ॥ ८। २। ५॥]

स्वरितो वानुदात्ते पदादौ ॥ ८। २। ६ ॥

स्वरितग्रहणं शक्यमकर्तुम्। कथम्। अनुदात्ते परतः पदादौ वोदात्त इत्येव सिद्धम्। केनेदानीं स्वरितो भविष्यति । गाङ्गेऽनूप इति। आन्तर्यत उदात्तानुदात्तयोरेकादेशः स्वरितो भविष्यति। इदं तर्हि प्रयोजनं तेन वर्ज्यमानता मा भूत्। अथ क्रियमाणेऽपि स्वरितग्रहणे यः सिद्धः स्वरितस्तेन वर्ज्यमानता कस्मान्न भवति। कन्यानूप इति।

---

'स्वरविधि कर्तव्य असतांना व्यंजन नसल्यासारखें समजावें ' ही परिभाषा असल्यामुळें येथें व्यवधान आहे असें म्हणतां येणार नाहीं.

अथवा स्वरिताचे स्थानीं झालेला जो यण् तो स्वरितयण् असा अर्थ येथें घेऊं नये.

तर मग कसा अर्थ घ्यावा ?

स्वरित पुढें असतांना जो यण् तो स्वरित-यण्. त्या स्वरित यणाच्या पुढील स्वरित साधु होय असा अर्थ येथें घ्यावा.

(सू. ६) या सूत्रामध्यें स्वरित ग्रहण केलें नाहीं तरी चालेल ?

कसें बरें ?

पदाचा आदि अनुदात्त पुढें असतांना उदात्त विकल्पानें होतो एवढयानेंच सर्व सिद्ध होतें.

मग गाङ्गेऽनूपे या उदाहरणामध्यें गे हा स्वरित कशानें होईल ? उदात्त आणि अनुदात्त या दोघांचें स्थानीं होणारा जो एकादेश तो सादृश्यामुळेंच ' स्थानेऽन्तरतमः ' ( १।१।५०) या परिभाषेनें स्वरित होईल.

तर मग ह्या स्वरित ग्रहणाचा असा उपयोग संभवतो कीं— हा स्वरित असिद्ध असल्यामुळें ह्या स्वरितामुळें बाकींच्या अचांना ' अनुदात्तं पदमेकवर्जम् ' ( ६।१।१५८ ) ह्या सूत्रानें उदात्त होऊं नये.

पण या सूत्रामध्यें स्वरित ग्रहण केलें तरी गाङ्गेनूपे वगैरे उदाहरणांमध्यें जो सिद्ध स्वरित

---

५. लौकिक सिद्ध प्रयोगामध्यें जो स्वरित ऐकूं येतो त्याच्या पूर्वींचा यण् तो स्वरित-यण्. खलप्व्याशा येथें यकार तसा आहे. दध्याशा या सिद्ध प्रयोगामध्यें यकाराच्या पुढील आकार स्वरित नसल्यामुळें तेथें यकाराला स्वरित-यण् म्हणतां येत नाहीं. तेव्हां कांहीं दोष येत नाहीं.

१. (सू. ५) उदात्ताशीं सह-वर्तमान झालेला जो एकादेश तो उदात्त होतो.

१. (सू. ६) पदाच्या आरंभींच्या अनुदात्ताच्या पूर्वींच्या उदात्ताशीं सहवर्तमान झालेला जो एकादेश तो विकल्पानें स्वरित होतो. अर्थात् एकदा पूर्वसूत्रानें उदात्त होतो. गाङ्गे यांतील एकार पूर्वसूत्रानें उदात्त झालेला आहे. आणि अनूपे या पदाच्या आरंभींचा अकार अनुदात्त आहे त्या दोघांच्या स्थानीं 'एङः पदान्तादति' ( ६।१।१०९ ) या शास्त्रानें झालेला एकार एकदां स्वरित होतो आणि एकदा पूर्वसूत्राने उदात्त होतो म्हणून येथे गाङ्गेऽनूपे गाङ्गेऽनूपे अशीं दोन रूपें होतात.

२. ह्या सूत्रानें उदात्त विकल्पानें सांगितला असल्यामुळें जेव्हां हा उदात्त केला नाहीं त्या वेळीं स्थानीसारखा आपोआपच तो एकादेश स्वरित होईल. कारण एकादेशाच्या दोन स्थानींपैकीं एक उदात्त आणि एक अनुदात्त आहे. आणि उदात्त व अनुदात्त हे दोन स्वर एका अचांत असले म्हणजे त्यालाच स्वरित म्हणतात.

बहिरङ्गलक्षणत्वात् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्ग इत्येवं न भविष्यति । यथैव तर्हि क्रियमाणे स्वरितग्रहणे यः सिद्धः स्वरितस्तेन वर्ज्यमानता न भवत्येवमक्रियमाणेऽपि न भविष्यति । तस्मान्नार्थः स्वरितग्रहणेन । बहिरङ्गलक्षणत्वात्सिद्धम् ॥

**एकादेशस्वरोऽन्तरङ्गः ॥ १ ॥**

एकादेशस्वरोऽन्तरङ्गः सिद्धो वक्तव्यः । किं प्रयोजनम् ।

**अयवायावेकादेशशतृस्वरैकानुदात्तसर्वानुदात्तार्थम् ॥ २ ॥**

अय् । वृक्ष इदम् प्लक्ष इदम् । उदात्तानुदात्तयोरेकादेशः । तस्यैकादेश उदात्तेनोदात्तः [ ८.२.५ ] इत्येतद्भवति । तस्य सिद्धत्वं वक्तव्यमान्तर्यत उदात्तस्योदात्तोऽयादेशो यथा स्यात् ॥ अवादेशो नास्ति ॥

---

झालेला आहे[3] त्यामुळें त्या स्वरिताशिवाय बाकींच्या अचांना 'अनुदात्त पदमेकवर्जम्' (६।१।१५८) या सूत्रानें अनुदात्त कां बरें होत नाहीं ?

तो स्वरित बहिरंग आहे म्हणून. 'अंतरंग शास्त्र कर्तव्य असतांना बहिरंग शास्त्र असिद्ध होतें' या परिभाषेनें तो स्वरित 'अनुदात्त पदमेकवर्जम्' या शास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध होत असल्यामुळें बाकींच्या अचांना त्या शास्त्रानें अनुदात्त होत नाहीं.

असेच जर असेल तर मग येथें स्वरितग्रहण केले असता जो स्वर सिद्ध आहे त्याच्यामुळे बाकींच्या अचांना जसा 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' या शास्त्रानें कन्यानूपे या उदाहरणामध्यें अनुदात्त होत नाहीं तसा येथें स्वरितग्रहण केलें नाहीं तरी गाङ्गेनूपे या उदाहरणामध्यें 'अनुदात्त पदमेकवर्जम्' या शास्त्रानें अनुदात्त होणार नाहीं. एकंदरींत प्रकृत सूत्रामध्यें स्वरित ग्रहण करण्याचा कांहीं उपयोग नाहीं. अंतरंग शास्त्र कर्तव्य असतांना बहिरंग शास्त्र असिद्ध होतें या परिभाषेनें सर्व सिद्ध होत आहे.

( वा. १ ) अंतरंग जो एकादेशस्वर तो सिद्ध होतो असें वचन करावें.

या वचनाचा काय उपयोग ?

( वा. २ ) अय् अव् आय् आव् एकादेशस्वर शतृस्वर एकानुदात्त आणि सर्वानुदात्त यांविषयीं उपयोग आहे. यांपैकीं अयादेशाचें उदाहरण— वृक्ष इदम् प्लक्ष इदम्. या ठिकाणीं उदात्त आणि अनुदात्त यांचे स्थानीं झालेला जो एकादेश तो 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) या शास्त्राने उदात्त झाला आहे तो सिद्ध आहे असे वचन केलें पाहिजे. कारण कीं त्या उदात्ताचे स्थानीं होणारा जो अय् आदेश तो त्याच्यासारखा उदात्तच झाला पाहिजे. अवादेशाचें उदाहरण नाहीं. आयादेशाचें उदाहरण —

---

३. कन्या शब्द स्वरितान्त आहे आणि अनूप शब्द अन्तोदात्त आहे. येथें स्वरित आकार आणि अनुदात्त अकार या दोघांच्या स्थानी एकादेशानें झालेला आकार स्थानीसारखा स्वरित झाला आहे म्हणून अर्थातच हवे तसें रूप सिद्ध होत आहे.

४. कन्यानूपे या उदाहरणामध्यें दोन पदांना मानून एकादेश होत असल्यामुळें त्या एकादेशानें झालेला स्वरित बहिरंग आहे.

५. वृक्ष इदम् या उदाहरणामध्यें वृक्ष शब्दांतील शेवटचा उदात्त अकार आणि त्याच्या पुढील सप्तमी प्रत्ययाचा अनुदात्त इकार या दोघाचे स्थानीं झालेला जो एकार त्याला 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) या सूत्रानें उदात्त प्राप्त होतो आणि या एकाराला 'एचोऽयवायावः' (६।१।७८) या शास्त्रानें अयादेश प्राप्त होतो. या दोहोंमध्यें एकादेश स्वर अन्तरंग आहे. कारण त्याला इदम् या पुढील शब्दाची

आय् । कुमार्यां इदम् । उदात्तानुदात्तयोरेकादेशः । तस्यैकादेश उदात्तेनोदात्त इत्येतद्भवति । तस्य सिद्धत्वं वक्तव्यमान्तर्यत उदात्तस्योदात्त आयादेशो यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । एकादेशे कृत उदात्तयणो हल्पूर्वात् [ ६.१.१७४ ] इत्युदात्तत्वं भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । उदात्तत्वं क्रियतामेकादेश इति । किमत्र कर्तव्यम् । परत्वादुदात्तत्वम् । नित्य एकादेशः । कृतेऽप्युदात्तत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । एकादेशोऽप्यनित्यः । अन्यथास्वरस्य कृत उदात्तत्वे प्राप्नोत्यन्यथास्वरस्याकृते । स्वरभिन्नस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । अन्तरङ्गस्तर्ह्येकादेशः । कान्तरङ्गता । वर्णाश्रयत्वादेकादेशः पदस्योदात्तत्वम् ॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । आट् क्रियतामुदात्त-

---

कुमार्यां इदम्, किशोर्यां इदम्, या ठिकाणीं उदात्त आणि अनुदात्त यांचे स्थानीं झालेला एकादेश 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) या शास्त्रानें उदात्त झाला आहे. तो सिद्ध आहे असें वचन केले पाहिजे. कारण कीं, त्या उदात्ताचें स्थानीं होणारा आयादेश त्याच्यासारखा उदात्त झाला पाहिजे.

हा उपयोग संभवत नाहीं. कारण एकादेश केल्यानंतर 'उदात्तयणो हल्पूर्वात्' (६।१।१७४) या शास्त्रानें तो उदात्त होईल.

आतां येथें असा विचार केला पाहिजे कीं उदात्त पूर्वी करावा किंवा एकादेश पूर्वी करावा?

मग काय बरें पूर्वी करावें?

परत्वास्तव उदात्त पूर्वी करावा.

पण एकादेश नित्य आहे ना? कारण उदात्त केल्यानतरही एकादेश प्राप्त होतो आणि उदात्त करण्याच्या पूर्वीही एकादेश प्राप्त होतो.

एकादेश नित्य नाहीं. कारण एकादेश ज्या अचाचें स्थानीं प्राप्त होतो तो अच् उदात्त केल्यानंतर निराळ्या स्वराचा होतो आणि उदात्त करण्याच्या पूर्वी निराळ्या स्वराचा असतो. आणि स्वरामुळें निराळेपणा ज्या वर्णामध्यें येतो त्याला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो.

तर मग एकादेश अंतरंग आहे.

कसा बरें तो अंतरंग आहे?

वर्णांच्या निमित्तानें एकादेश प्राप्त होतो आणि पदाच्या आश्रयानें उदात्त स्वर प्राप्त होतो.

तर मग आतां येथें एक निराळ्याच प्रकारचा विचार उत्पन्न होतो कीं — आडागम पूर्वी

---

जरूर नाही. अयादेश हा बहिरंग आहे. कारण त्याला इदम् या शब्दांतील इकाराची जरूर आहे. तेव्हां एकादेश स्वर अंतरंग असल्यामुळें त्यानें पूर्वी एकाराला उदात्त होतो; आणि नंतर त्या उदात्त एकाराला त्याच्या सारखा उदात्त अयादेश होतो. नंतर पुढील इकाराला 'उदात्तादनुदा०' (८।४।६६) या शास्त्रानें स्वरित होऊन वृक्ष इदम् असें रूप होतें. परंतु हा एकादेश-स्वर जरी अंतरंग आहे तरी तो त्रैपादिक असल्यामुळें असिद्ध आहे. तेव्हा तो अयादेशाच्या पूर्वी करतां येणार नाहीं. याकरितां एकादेश-स्वर सिद्ध मानिला पाहिजे.

६. कुमारी शब्दाहून चतुर्थी एकवचन ङे प्रत्यय करून त्याला 'आण्नद्याः' (७।३।११२) या शास्त्रानें आडागम केला. नंतर मागील ईकाराला यण् केला असतां त्या यणाच्या पुढील आडागमाला 'उदात्तयणो०' (६।१।१७४) या सूत्रानें उदात्त केल्यानंतर तो उदात्त आकार आणि पुढील अनुदात्त एकार या दोघांचें स्थानीं झालेला एकादेश.

७. आणि हा उदात्त सिद्ध असल्यामुळें तो आयादेशाच्या पूर्वी होईल. नंतर स्थानीसारखा आयादेश उदात्त होऊन रूप सिद्ध होईल.

त्वमिति। किमत्र कर्तव्यम्। परत्वादाडागमः। नित्यमुदात्तत्वम्। कृतेऽप्याटि प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति। आडपि नित्यः। कृतेऽप्युदात्तत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति। अनित्य आट्। अन्यथास्वरस्य कृत उदात्तत्वे प्राप्नोत्यन्यथास्वरस्याकृते। स्वरभिन्नस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति। उदात्तत्वमप्यनित्यम्। अन्यस्य कृत आटि प्राप्नोत्यन्यस्याकृते प्राप्नोति। शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति। उभयोरनित्ययोः परत्वादाडागम आटि कृते ऽन्तरङ्ग एकादेशः॥ आव्। वृक्षाविदम्। उदात्तानुदात्तयोरेकादेशः। तस्यैकादेश उदात्तेनोदात्त इत्येतद्भवति। तस्य सिद्धत्वं वक्तव्यमान्तर्येत उदात्तस्योदात्त आवादेशो यथा स्यात्।[8] एकादेशस्वर। गाङ्गेऽनूप इति। उदात्तानुदात्तयोरेकादेशः। तस्यैकादेश उदात्तेनोदात्त इत्येतद्भवति। तस्य सिद्धत्वं वक्तव्यं स्वरितो

करावा का उदात्त पूर्वी करावा.

मग काय बरें पूर्वी करावें ?

परत्वास्तव आडागम पूर्वी करावा.

पण उदात्त नित्य आहे ना ? कारण आडागम केल्यानंतरही उदात्त प्राप्त होतो, आणि आडागम करण्याच्या पूर्वीही उदात्त प्राप्त होतो.

असें असेल तर आडागमही नित्य आहे. कारण उदात्त केल्यानंतरही आडागम प्राप्त होतो आणि उदात्त करण्याच्या पूर्वीही प्राप्त होतो.

पण आडागम नित्य नाहीं. कारण आडागम ज्या प्रत्ययाला करावयाचा तो प्रत्यय उदात्त केल्यानंतर निराळ्या स्वराचा होतो आणि उदात्त करण्याच्या पूर्वी निराळ्या स्वराचा असतो; आणि स्वरामुळें निराळेपणा ज्यामध्ये येतो त्याला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो.

तर मग उदात्त देखील नित्य नाहीं. कारण आडागम केल्यानंतर एकाला म्ह० आडागमाला उदात्त प्राप्त होतो आणि आडागम करण्याच्या पूर्वी दुसऱ्याला म्हणजे एकाराला उदात्त प्राप्त होतो. अशा रीतीनें निरनिराळ्या शब्दाला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो. तेव्हां येथें दोन्ही विधी अनित्य असल्यामुळें परत्वास्तव उदात्ताच्या पूर्वी आडागम होतो. आडागम केल्यानंतर अंतरग एकादेश उदात्ताच्या पूर्वी होईल.

आवादेशाचें उदा० वृक्षाविदम्. या ठिकाणीं उदात्त आणि अनुदात्त यांचे स्थानीं झालेला जो एकादेश तो ' एकादेश उदात्तेनोदात्तः ' ( ८ । २।५ ) या शास्त्रानें उदात्त झाला आहे, तो सिद्ध आहे असें वचन केलें पाहिजे. कारण त्या उदात्त औकाराचे स्थानीं होणारा आवादेश स्थानीसारखा उदात्त झाला पाहिजे.

एकादेश-स्वराचें उदाहरण—गाङ्गेऽनूपे. या ठिकाणीं उदात्त आणि अनुदात्त या दोघांचे स्थानीं झालेला एकार एकादेश स्थानीसारखा स्वरित झाला आहे. त्याला जो ' एकादेश उदात्तेनोदात्तः ' ( ८।२।५ ) या सूत्रानें उदात्त होतो तो सिद्ध आहे असें वचन करावें. कारण त्या एकाराचा अनूपे या पदांतील अकाराशीं जो ' एङः पदान्तादति ' ( ६।१।१०९ ) या सूत्रानें एकादेश एकार होतो त्याला ' स्वरितो

८. आणि त्यानंतर ' उदात्तयणो० ' (६।१।१७४) हा उदात्त होईल. आणि तो सिद्ध असल्यामुळें त्याच्या सारखा उदात्तच आयादेश होऊन रूप सिद्ध होईल एकंदरींत या उदाहरणाकरतां ' एकादेश-स्वर सिद्ध होतो ' असें म्हणण्याचें कारण नाहीं.

वानुदात्ते पदादौ [ ८.२.६ ] इत्येतद्यथा स्यात् ॥ शतृस्वर । तुदती नुदती । उदात्तानुदात्तयोरेकादेशः । तस्यैकादेश उदात्तेनोदात्त इत्येतद्भवति । तस्य सिद्धत्वं वक्तव्यं शतुरनुमो नद्यजादिरन्तोदात्तादित्येष स्वरो यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति सिद्ध एकादेशस्वरः शतृस्वर इति यदयमनुम इति प्रतिषेधं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । न ह्यन्तरेणोदात्तानुदात्तयोरेकादेशं शत्रन्तं सनुम्कमन्तोदात्तमस्ति । ननु चेदमस्ति यान्ती वान्ती । एतदपि निघाते कृते नान्तरेणोदात्तानुदात्तयोरेकादेशं शत्रन्तं

---

वाऽनुदात्ते०' ( ८।२।६ ) या सूत्रानें सांगितलेला वैकल्पिक स्वरित झाला पाहिजे.

शतृस्वराचें उदाहरण-तुदती नुदती या ठिकाणीं उदात्त आणि अनुदात्त[9] यांचे स्थानीं एकादेश झाला आहे. त्याला ' एकादेश उदात्तेनोदात्तः ' ( ८।२।५ ) यानें जो उदात्त होतो तो सिद्ध आहे असें म्हटलें पाहिजे. कारण ' शतुरनुमो नद्यजादी ' ( ६।१।१७३ ) या सूत्रानें अन्तोदात्ताच्या पुढील प्रत्ययाला[11] सांगितलेला उदात्त स्वर झाला पाहिजे.

हें उदाहरण संभवत नाहीं. कारण आचार्य पाणिनीची प्रवृत्तीच ' शतृस्वर कर्तव्य असतांना एकादेशस्वर सिद्ध होतो ' अशाविषयीं ज्ञापक आहे; कारण, असें पहा कीं हा आचार्य 'अनुमः' ( ६।१।१७३ ) असा प्रतिषेध करतो.

कसें बरें हें ज्ञापक जमतें ?

असें जमतें कीं, नुमागम झालेला शतृप्रत्ययान्त शब्द हा उदात्त आणि अनुदात्त यांचा एकादेश झाल्याशिवाय अन्तोदात्त मिळतच नाहीं.[12]

पण यान्ती वान्ती या उदाहरणांमध्यें तसा अन्तोदात्त शब्द मिळतो.[13]

त्या उदाहरणांमध्यें देखील धातूला अनुदात्त[14] होत असल्यामुळें तो केल्यानंतर नुमागम झालेला शतृप्रत्ययान्त शब्द हा उदात्त आणि अनुदात्त

---

९. ' एकादेश उदात्तेनोदात्तः ' ( ८।२।५ ) या सूत्रानें सांगितलेला उदात्त जर सिद्ध मानला नाही तर त्याच्या पूर्वी स्वरित एकारालाच पुढील आकाराबरोबर पूर्वरूप एकादेश होईल. तेव्हां हा पूर्वरूप एकादेश उदात्त आणि अनुदात्त या दोघांचें स्थानीं झालेला नसल्यामुळे ' स्वरितो वाऽनुदात्ते० ' ( ८।२।६ ) हें सूत्र प्रवृत्त होणार नाही.

१०. तुद् धातूहून शतृ प्रत्यय केल्यानंतर 'तुदादिभ्यः शः ' ( ३।१।७७ ) या सूत्रानें मध्ये विकरण श प्रत्यय होतो. त्या श प्रत्ययाचा अकार 'आद्युदात्तश्च' ( ३।१।३ ) यानें उदात्त झालेला आहे. व पुढील शतृ प्रत्ययाचा अकार ' तास्यनुदात्तेत्० ' ( ६।१।१८६ ) या सूत्रानें अनुदात्त झालेला आहे.

११. तुदत् याहून ' उगितश्च ' ( ४।१।६ ) या सूत्रानें जो ङीप् प्रत्यय केला आहे त्याला.

१२. एकादेशाला ' एकादेश उदात्ते० ' (८।२।५ ) यानें उदात्त झाला म्हणजेच तो अंतोदात्त शब्द होतो. जर हा उदात्त असिद्ध असेल तर अंतोदात्त नसल्यामुळेंच ' शतुरनुमो० ' ( ६।१।१७३ ) हा स्वर होणार नाहीं. म्हणून ' अनुमः ' हें व्यर्थ होतें.

१३. ' या ' धातूचा आकार धातुस्वरानें ( ६।१।१६२ ) उदात्त आहे. आणि शतृ प्रत्ययाचा अकार प्रत्ययस्वरानें ( ३।१।३ ) उदात्त आहे. तेव्हां अर्थातच त्या दोघांचे स्थानीं झालेला एकादेश स्थानीसारखा उदात्त असल्यामुळें ' एकादेश उदात्तेनो० ' ( ८।२।५ ) याशिवाय हें अन्तोदात्त मिळतें असा अभिप्राय आहे.

१४. शतृ प्रत्ययाच्या अकाराला प्रत्ययस्वरानें उदात्त केला कीं लगेच ' अनुदात्तं पदम्० ' ( ६।१।१५७ ) या शेष-निघातानें धातूच्या आकाराला अनुदात्त होतो.

सनुम्कमन्तोदात्तमस्ति ॥ इदमिह संप्रधार्यम् । निघातः क्रियतामेकादेश इति । किमत्र कर्तव्यम् । परत्वान्निघातः । नित्य एकादेशः । कृतेऽपि निघाते प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । एकादेशोऽप्यनित्यः । अन्यथास्वरस्य कृते निघाते प्राप्नोत्यन्यथास्वरस्याकृते निघाते । स्वरभिन्नस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । अन्तरङ्गस्तर्ह्येकादेशः । कान्तरङ्गता । वर्णावाश्रित्यैकादेशः पदस्य निघातः । निघातोऽप्यन्तरङ्गः । कथम् । उक्तमेतत्पदग्रहणं परिमाणार्थमिति । उभयोरन्तरङ्गयोः परत्वान्निघातो निघाते कृत एतदपि नान्तरेणोदात्तानुदात्तयोरेकादेशमन्तोदात्तं भवति । शतृस्वर ॥ एकाननुदात्त । तुदन्ति लिखन्ति । उदात्तानुदात्तयोरेकादेशः । तस्यैकादेश उदात्तेनोदात्त इत्येतद्भवति । तस्य सिद्धत्वं वक्तव्यं तेन वर्ज्यमानता यथा स्यात् ॥ सर्वानुदात्त । ब्राह्मणा-

---

यांचा एकादेश झाल्याशिवाय अन्तोदात्त मिळत नाहीं.

आतां येथें असा विचार केला पाहिजे कीं— अनुदात्त अगोदर करावा कां एकादेश अगोदर करावा.

मग यांत काय अगोदर करावें ?

परत्वास्तव अनुदात्त करावा.

पण एकादेश नित्य आहे ना ? कारण अनुदात्त केल्यानंतरही तो प्राप्त होतो आणि अनुदात्त करण्याच्या पूर्वींही प्राप्त होतो. तेव्हा अनित्य असलेल्या अनुदात्ताच्या पूर्वी तो होईल.

एकादेश देखील अनित्यच आहे. कारण ज्याला एकादेश करावयाचा तो वर्ण अनुदात्त केल्यानंतर निराळ्या स्वराचा होतो.[15] आणि अनुदात्त करण्याच्या पूर्वी निराळ्या स्वराचा[16] असतो. आणि अशा रीतीनें भिन्न भिन्न स्वराच्या वर्णाला प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो.

तर मग एकादेश अंतरंग आहे म्हणून तो पूर्वी केला पाहिजे.

तो अंतरंग कसा ?

एकादेशाला फक्त वर्णांचा आश्रय आहे. आणि अनुदात्ताला पदाचा आश्रय आहे. म्हणून एकादेशाला अंतरंग म्हणतां येतें.

अनुदात्त देखील अंतरंग आहे.

कसा बरे ?

त्या सूत्रांतील पदग्रहण परिमाणार्थ[17] आहे असें पूर्वी (६।१।१५८) सांगितलेंच आहे. तेव्हा दोन्ही अंतरंग असल्यामुळें त्यांमध्यें परत्वास्तव अनुदात्त पूर्वी होतो. आणि तो पूर्वी झाला म्हणजे यान्तौ, वान्तौ या उदाहरणांमध्यें देखील शतृ प्रत्ययान्त शब्द हा उदात्त आणि अनुदात्त यांचा एकादेश झाल्याशिवाय अंतोदात्त मिळत नाहीं. याप्रमाणें शतृ स्वराच्या उदाहरणाचा विचार झाला.

एकाननुदात्त म्हणजे शेष निघात. त्याचें उदाहरण तुदन्ति लिखन्ति. या ठिकाणीं उदात्त आणि अनुदात्त या दोघांचे स्थानीं एकादेश होतो. त्याला जो 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) या सूत्रानें उदात्त होतो तो सिद्ध आहे असें म्हटलें पाहिजे. कारण त्या उदात्तामुळें बाकीच्या अचांना अनुदात्त झाला पाहिजे.

---

१५ धातूचा आकार अनुदात्त होतो.

१६. धातूचा आकार मूळचा उदात्त आहे

१७. अनुदात्ताला पदसंज्ञेची जरूर नाहीं. पदसंज्ञा होण्याची ज्याला योग्यता त्यालाच पदसंज्ञेच्या पूर्वींच अनुदात्त करावा असा त्याचा अर्थ आहे.

स्तुदन्ति। ब्राह्मणा लिखन्ति। उदात्तानुदात्तयोरेकादेशः। तस्यैकादेश उदात्तेनोदात्त इत्येतद्भवति। तस्य सिद्धत्वं वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। तिङ्ङतिङः [८. १. २८] इति निघातो यथा स्यात्॥

किमुच्यते ऽन्तरङ्ग इति। यो हि बहिरङ्गोऽसिद्ध एवासौ भवति। प्रपचतीति। सोमसुत्पचतीति॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। सर्वत्रैव नुम्प्रतिषेधो ज्ञापकः सिद्ध एकादेशस्वरोऽन्तरङ्ग इति॥

## संयोगान्तलोपो रोरुत्त्वे हरिवो मेदिनं त्वा॥ ३॥

संयोगान्तलोपो रोरुत्त्वे सिद्धो वक्तव्यः। किं प्रयोजनम्। हरिवो मेदिनं त्वा। संयोगान्तलोपस्यासिद्धत्वाद्धशीत्युत्त्वं न प्राप्नोति॥

---

सर्वानुदात्ताचीं उदाहरणें ब्राह्मणास्तुदन्ति, ब्राह्मणा लिखन्ति. या ठिकाणीं उदात्त आणि अनुदात्त या दोघांचे स्थानीं एकादेश होतो त्याला 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) या सूत्रानें जो उदात्त होतो तो सिद्ध आहे असे म्हटलें पाहिजे.

कशाकरितां ?

'तिङ्ङतिङः' (८।१।२८) या सूत्रानें अनुदात्त झाला पाहिजे यांकरितां.[18]

'अंतरंग जो एकादेश तो सिद्ध होतो असें वचन करावें' असें जे पूर्वी म्हटलें आहे तेथें अंतरग हें काय म्हटलें आहे ?

जो एकादेशस्वर बहिरंग आहे तो असिद्धच असतो अशाकरितां तसें म्हटलें आहे. उदा० प्रपचतीति.[19] सोमसुत्पचतीति.

तर मग हीं अनेक उदाहरणें साधण्याकरितां एकादेश-स्वर सिद्ध होतो असें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण अनुमः हा प्रतिषेध ज्ञापक आहे; त्याच ज्ञापकानें सर्व ठिकाणीं अतरंग एकादेश स्वर सिद्ध होईल.

(वा. ३) 'रु' ला उत्व कर्तव्य असतांना संयोगान्तलोप सिद्ध होतो असें म्हणावें.

कशाकरिता ?

हरिवो मेदिनं त्वा हे उदाहरण साधण्याकरितां. येथें संयोगान्तलोप असिद्ध असल्यामुळें हशि च (६।१।११४) या सूत्रानें सांगितलेलें उत्व प्राप्त होत नांहीं.[20]

---

१८. 'एकादेश उदा०' हा स्वर सिद्ध असल्यामुळें परत्वास्तव अगोदर तो उदात्त होतो. नंतर तिङ्ङतिङः (८।१।२८) ह्यानें तुदन्ति या सर्व क्रियापदाला अनुदात्त होतो.

१९. या ठिकाणीं इति शब्दांतील इकाराबरोबर एकादेश होत असल्यामुळें एकादेश स्वर बहिरंग आहे तेव्हा तो असिद्धच असतो म्हणून पचति या क्रियापदाला तिङ्ङतिङः (८।१।२८) या सूत्रानें अनुदात्त केल्यानंतर मागून एकादेश स्वरानें ईकार उदात्त होतो.

२०. हरि शब्दाहून मतुप् प्रत्यय करून त्याच्या मकाराला 'छन्दसीरः' (८।२।२५) यानें वकार करून हरिवत् शब्द तयार होतो. नंतर त्याहून संबोधनाचें एकवचन सु प्रत्यय केला असतां 'उगिदचाम्' (७।१।७०) या सूत्रानें नुमागम 'हल्ङ्याप्०' (६।१।६८) या सूत्रानें प्रत्ययाचा लोप, संयोगान्तस्य लोपः' (८।२।२३) या सूत्रानें तकाराचा लोप व 'मतुवसो०' (८।३।१) या सूत्रानें नकाराला रुत्व व मेदिनम् या शब्दातील मकार हश् पुढें आहे म्हणून 'हशि च' (६।१।११४) या सूत्रानें रुला उत्व अशी कार्यें होतात. संयोगान्त–लोप असिद्ध असल्यामुळें मध्यें तकारानें व्यवधान येऊन अव्यवहित हश् पुढें मिळत नाहीं, यामुळें उत्व होणार नाहीं.

## प्लुतिश्च ॥ ४ ॥

प्लुतिश्चोत्त्वे सिद्धा वक्तव्या । सुस्रोता३ अत्र न्वसीत्यत्र प्लुतेरसिद्धत्वादतोऽतीत्युत्त्वं प्राप्नोति । अप्लुतादप्लुत इत्येतन्न वक्तव्यं भवति । नैतदस्ति प्रयोजनम् । क्रियते न्यास एव ॥

## सिज्लोप एकादेशे ॥ ५ ॥

सिज्लोप एकादेशे सिद्धो वक्तव्यः । अलावीत् । अपावीत् । सिज्लोपस्यासिद्धत्वात्सवर्णदीर्घत्वं न प्राप्नोति ॥ यदि पुनरिडादेः सिचो लोप उच्येत । नैवं शक्यम् । इह हि मा हि लावीत् मा हि पावीत् यत्रत्रेण्न स्यादनुदात्तस्य ईटः श्रवणं प्रसज्येत । इटि पुनः सत्युक्तमेतदर्थवत्तु

( वा. ४ ) प्लुत देखील रुला उत्व कर्तव्य असतांना सिद्ध होतो असें म्हणावें. उदा०–सुस्रोता ३ अत्र न्वसि. या उदाहरणामध्यें प्लुत असिद्ध असल्यामुळें ' अतो रोर० ' ( ६।१।११३ ) या सूत्रानें उत्व प्राप्त होतें. तें प्लुत सिद्ध मानल्यामुळें होत नाहीं. तेव्हां ' अतो रोर० ' (६।१।११३) या सूत्रामध्यें ' अप्लुतादप्लुते ' हें म्हणावयास नको.[21] सुस्रोता ३ अत्र न्वसि हें उदाहरण बरोबर नाहीं. कारण या उदाहणाकरितां 'अतो रोर०' (६।१।११३) या सूत्रामध्ये पाणिनीनें 'अप्लुतादप्लुते' असें म्हटलेंच आहे.

(वा. ५) एकादेश कर्तव्य असताना सिचाचा लोप सिद्ध होतो असें म्हणावें उदा०–अलावीत्[22] अपावीत् येथें सिचाचा लोप असिद्ध असल्यामुळें सवर्ण-दीर्घ प्राप्त होत नाहीं.

आतां येथें जर इडागमासकट सिचाचा लोप होतो असें म्हणावें[23] तर तसे म्हणतां येत नाहीं. कारण, मा हि लावीत्, मा हि पावीत् या उदाहरणांमध्यें जर इडागम नसेल तर अनुदात्त अशा ईडागमाचें श्रवण होईल.[24] आणि इडागम असेल तर मात्र हा दोष येत नाहीं. कारण पूर्वी ( ३।१।४४ वा. २ ) ' सिच् प्रत्ययाला जें चित्करण केलें आहे, त्या चित्करण-सामर्थ्यास्तव इडागम उदात्त होतो ' असें सांगितलेंच आहे.

---

२१. अतः या तपर–करणानेंच प्लुताच्या पुढील रुत्व होणार नाहीं.

२२. लू या धातूहून लुङ् प्रत्यय, त्याला तिप् आदेश, ' इतश्च ' ( ३।४।१०० ) या सूत्रानें इकाराचा लोप, च्लि लुङि ( ३।१।४३ ) यानें च्लि, आणि त्याला च्लेः सिच् ( ३।१।४४ ) ह्यानें सिच् आदेश, सिचाला ' आर्धधातुकस्येड् वलादेः ' ( ७।२।३५ ) यानें इडागम, लू याच्या ऊकाराला सिचि वृद्धिः (७।२।१) यानें वृद्धि, एचोऽयवायावः ( ६।१।७८ ) यानें आव् आदेश, इट ईटि ( ८।२।१ ) ह्यानें सिचाचा लोप आणि त्यानंतर ' अकः सवर्णे०' ( ६।१।१०१ ) यानें सवर्णदीर्घ अशीं कार्यें होतात.

२३. इट ईटि ( ८।२।२८ ) या सूत्रामध्यें इटः ही पञ्चमी न घेतां षष्ठी घ्यावी. आणि इट् आदि ज्याला झाला अशा सिचाचा लोप होतो असा वाक्यार्थ केला म्हणजे इस् याचा लोप होऊन रूप साधेल. सवर्णदीर्घ करण्याचें कारण नाहीं.

२४. सिचाच्या चित्त्वामुळें त्याचा इडागम 'चितः' ६।१।१६३ ) यानें उदात्त होतो. आणि त्या उदात्त इकाराबरोबर पुढील अनुदात्त ईकाराचा एकादेश झाला म्हणजे तो ' एकादेश उदा० ' ( ८।२।५ ) या सूत्रानें उदात्त होतो. येथें मा हें अव्यय असल्यामुळें ' न माङ्योगे ' ( ६।४।७४ ) या सूत्रानें अडागमाचा निषेध होतो. जर अडागम झाला असता तर अडागम ' लुङ्लङ्लृङ्क्षु. ' ( ६।४।७१ ) यानें उदात्त असाच होत असल्यामुळें अलावीत् हें पद आद्युदात्त होतें. तेव्हां येथें वरील दोष देतां येत नाहीं म्हणून मा हें अव्यय लावून उदाहरण दिलें आहे.

चित्करणसामर्थ्यादीट उदात्तत्वमिति तत्रैकादेश उदात्तेनोदात्तः [८. २. ५] इत्युदात्तत्वं सिद्धं भवति ॥

## संयोगादिलोपः संयोगान्तलोपे ॥६॥

संयोगादिलोपः संयोगान्तस्य लोपे सिद्धो वक्तव्यः। काष्ठतट् कूटतट्। संयोगादिलोपस्यासिद्धत्वात्संयोगान्तलोपः प्राप्नोति ॥ नैष दोषः। उक्तमेतदपवादो वचनप्रामाण्यादिति ॥

## निष्ठादेशः षत्वस्वरप्रत्ययेड्विधिषु ॥ ७ ॥

निष्ठादेशः षत्वस्वरप्रत्ययेड्विधिषु सिद्धो वक्तव्यः। वृक्णः वृक्णवान्। निष्ठादेशस्यासिद्धत्वाज्झलीति षत्वं प्राप्नोति। स्वर। क्षीबः। निष्ठादेशस्यासिद्धत्वान्निष्ठा च द्व्यजनात् [६. १.२०५] इत्येष स्वरो न प्राप्नोति। प्रत्यय। क्षीबेण तरति क्षीबिकः। निष्ठादेशस्यासिद्धत्वाद् द्व्यचष्ठनिति ठन्

आणि इडागम उदात्त झाला म्हणजे त्याचे स्थानीं झालेल्या एकादेशाला 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) या सूत्राने उदात्त सिद्ध होत आहे.

(वा. ६) संयोगाच्या अंताचा लोप कर्तव्य असताना संयोगादिलोप सिद्ध होतो असें म्हणावें. उदा० काष्ठतट्[२५], कूटतट्. संयोगादि लोप असिद्ध असल्यामुळे त्याच्या पूर्वी संयोगान्त-लोप प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. कारण अपवाद हा वचनप्रामाण्यास्तव सिद्ध मानावा लागतो असें पूर्वी (८।२।१ वा. २) सांगितलेंच आहे.

(वा. ७) षत्व, स्वर, प्रत्यय आणि इडागम हे विधी कर्तव्य असतांना निष्ठादेश सिद्ध होतो असें म्हणावें. षत्वाचें उदा०—वृक्णः[२६], वृक्णवान्. निष्ठादेश असिद्ध असल्यामुळें 'व्रश्चभ्रस्ज०' (८।२।३६) या सूत्रानें झल् पुढे असतांना सांगितलेलें षत्व होऊं लागेल.

स्वराचें उदाहरण—क्षीबः. येथें सूत्रकारांनीं (८।२।५५) क्षीब असें निपातन केलें असल्यामुळें निष्ठा प्रत्ययाच्या तकाराचा इडागमासहित लोप होतो. हा निष्ठादेश असिद्ध असल्यामुळें 'निष्ठा च द्व्यजनात्' (६।१।२०५) ह्या सूत्रानें सांगितलेला आद्युदात्त स्वर प्राप्त होत नाहीं[२७]. प्रत्ययाचें उदा०—क्षीबेन तरति क्षीबिकः. येथें निष्ठादेश असिद्ध असल्यामुळें 'नौद्व्यचष्ठन्' (४।४।७) या सूत्रानें द्व्यच्क प्रातिपदिकाहून

२५. पूर्वी (८।२।१) टीप ६ वी पहा.

२६. व्रश्च धातूहून निष्ठासंज्ञक प्रत्यय क्त किंवा क्तवतु केले असतां 'ग्रहिज्या०' (६।१।१६) या सूत्रानें संप्रसारण, 'स्कोः संयोगा०' (८।२।२९) या सूत्रानें सकाराचा लोप, चोः कुः (८।२।३०) या सूत्रानें चकाराला कुत्व, त प्रत्ययाच्या आदि तकाराला 'ओदितश्च' (८।२।४४) या सूत्रानें नत्व, आणि नंतर णत्व होऊन वृक्ण आणि वृक्णवत् असे शब्द सिद्ध होतात.

२७. कारण, निष्ठा च द्व्यजनात् (६।१।२०५) याच्या दृष्टीनें क्षीब शब्दामध्यें तीन अच् असल्यामुळें त्याला द्व्यच् म्हणतां येत नाहीं. क्षीब् धातूहून निष्ठासंज्ञक क्त प्रत्यय केला असतां आर्धधातुकस्येड् वलादेः (७।२।३५) यानें इडागम, आणि 'अनुपसर्गात्०' (८।२।५५) या सूत्रामध्यें 'क्षीब' असें निपातन केलें असल्यामुळें इकार आणि तकार या दोन वर्णांचा लोप होऊन क्षीब शब्द सिद्ध होतो. या निपातनानें नुसत्या तकाराचाच लोप होतो असा तेथें एक पक्ष आहे. त्या वेळीं याच वार्तिकानें इड्-विधि कर्तव्य असतांना तो तकारलोप सिद्ध असल्यामुळें इडागमाच्या अगोदर होतो, नंतर वलादि प्रत्यय नसल्यामुळें इडागम होत नाहीं.

प्राप्नोति । इड्विधि । निष्ठादेशस्यासिद्धत्वाद्वलादिलक्षण इट् प्राप्नोति ॥ ननु च यः प्रत्ययविधौ सिद्धः सिद्धोऽसाविड्विधौ । इदं तर्हि प्रयोजनम् । ओलस्जी लग्नः । निष्ठादेशः सिद्धो वक्तव्यो नेड् वशि कृति [७. २. ८] इतीट्प्रतिषेधो यथा स्यात् । ईदित्करणं न कर्तव्यं भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । क्रियत एतन्न्यास एव ॥

## वस्वादिषु दत्वं सौ दीर्घत्वे ॥ ८ ॥

वस्वादिषु दत्वं सौ दीर्घत्वे सिद्धं वक्तव्यम् । उखास्रत् पर्णध्वत् । दत्वस्यासिद्धत्वादत्वसन्तस्येति दीर्घत्वं प्राप्नोति । अधातोरिति न वक्तव्यं भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । क्रियते न्यास एव ॥

---

सांगितलेला ठन् प्रत्यय प्राप्त होत नाहीं. इडागमाचें उदाहरण–क्षीबः. येथें निष्ठादेश असिद्ध असल्यामुळें वलादि प्रत्ययाच्या निमित्तानें होणारा इडागम प्राप्त होतो.[२८]

हें उदाहरण बरोबर नाहीं. कारण जो निष्ठादेशप्रत्यय-विधीच्या दृष्टीनें सिद्ध होतो तो अर्थातच इडागम विधीच्या दृष्टीनें सिद्ध होत आहे.[२९]

तर मग ओलस्जी या धातूचें लग्नः असें जें रूप होतें तें इडागमाचें उदाहरण घ्यावें. येथें निष्ठादेश सिद्ध होतो असें म्हटलें पाहिजे. कारण निष्ठादेश सिद्ध असल्यामुळें ' नेड् वशि कृति ' ( ७।२।८ ) या सूत्रानें इडागमाचा निषेध झाला पाहिजे. आणि अशा रीतीनें हें रूप सिद्ध होत असल्यामुळें या ओलस्जी धातूला जो ' श्वीदितो० ' ( ७।२।१४ ) या इडागमाच्या निषेधाकरितां दीर्घ ईकार इत्संज्ञक लावला आहे तो लावावयास नको.

हें देखील उदाहरण बरोबर नाहीं. कारण पाणिनीनें त्याकरितां दीर्घ ईकार इत्संज्ञक लावलाच आहे.

(वा. ८) सु प्रत्ययाच्या निमित्तानें दीर्घ कर्तव्य असताना ' वसुस्रंसु० ' (८।२।७२) या सूत्रानें वसु वगैरेंना सांगितलेलें दत्व सिद्ध होतें असें म्हणावें. उदा० उखास्रत् पर्णध्वत्. येथे दत्व असिद्ध असल्यामुळें 'अत्वसन्तस्य०' (६।४।१४) या सूत्रानें दीर्घ प्राप्त होतो. ( तो दत्व सिद्ध असल्यामुळें होत नाहीं. अशा रीतीने हें उदाहरण सिद्ध होत असल्यानें त्या सूत्रामध्यें ) ' अधातोः ' असें म्हणावयास नको.

हें उदाहरण बरोबर नाहीं. कारण तेथें सूत्रकारांनीं ' अधातोः ' असे म्हटलेच आहे.

---

२८. मागील टीप २७ पहा.

२९. जर येथें इडागमाच्या दृष्टीनें तकार–लोप ( असिद्ध ) असेल तर इडागम होऊन त्र्यच्क होत असल्यामुळे ' नौद्व्यचष्ठन् ' ( ४।४।७ ) यानें सांगितलेला ठन् प्रत्यय होणारच नाही. तेव्हां प्रत्ययविधीच्या दृष्टीने निष्ठादेश सिद्ध मानण्याचा कांहींच उपयोग होणार नाहीं.

३०. ओलस्जी धातूचे ओकार आणि ईकार इत्संज्ञक आहेत. त्यांचा लोप झाल्यानंतर लज् धातूहून निष्ठासंज्ञक क्त प्रत्यय झाल्यानंतर त्याच्या तकाराला ' ओदितश्च ' ( ८।२।४४ ) यानें नकार होतो. परंतु तो असिद्ध असल्यामुळें इडागम होईल असा दोष येतो. तकार हा वश् प्रत्याहारामध्यें नसल्यामुळें 'नेड् वशि० ' हा इडागमाचा निषेध होणार नाहीं. निष्ठादेश सिद्ध मानला म्हणजे मात्र इडागमाच्या पूर्वीच परत्वास्तव निष्ठादेश नकार होतो. इडागम नित्य आहे असें मात्र समजूं नये. कारण नकार केल्यानंतर ' नेड् वशि० ' ( ७।२।७ ) हा निषेध प्राप्त होत असल्यामुळें इडागमाची प्रवृत्ति होत नाही.

अदस ईत्त्वोत्वे स्वरे बहिष्पदलक्षणे ॥ ९ ॥

अदस ईत्त्वोत्वे स्वरे बहिष्पदलक्षणे सिद्धे वक्तव्ये। अमी अत्र। अमी आसते। अमू अत्र। अमू आसाते। ईत्त्वोत्वयोरसिद्धत्वादेच इत्ययावेकादेशाः प्राप्नुवन्ति। किमुच्यते बहिष्पदलक्षण इति। यो ह्यन्योऽसिद्ध एवासौ भवति। अमुया अमुयोरिति ॥

प्रगृह्यसंज्ञायां च ॥ १० ॥

प्रगृह्यसंज्ञायां च सिद्धे वक्तव्ये। अमी अत्र। अमी आसते। अमू अत्र। अमू आसाते। ईत्त्वोत्वयोरसिद्धत्वाददसो मात् [१. १. १२] इति प्रगृह्यसंज्ञा न प्राप्नोति॥ किमर्थमिदमुभयमुच्यते न प्रगृह्यसंज्ञायामित्येव स्वरेऽपि बहिष्पदलक्षणे चोदितं स्यात्। पुरस्तादिदमाचार्येण दृष्टं स्वरे बहिष्पदलक्षण इति तत्पठितम्। तत उत्तरकालमिदं दृष्टं प्रगृह्यसंज्ञायां चेति तदपि पठितम्। न चेदानीमाचार्याः सूत्राणि

---

(वा. ९) बाहेरच्या दुसऱ्या पदाच्या निमित्ताने संधिकार्य कर्तव्य असताना अदस् शब्दाला 'एत ईत्' (८।२।८१) या सूत्राने सांगितलेलें ईत्त्व आणि 'अदसोऽसे०' (८।२।८०) या सूत्रानें सांगितलेले उत्व सिद्ध होतें असें म्हणावें. उदा०—अमी आसते, अमी अत्र, अमू आसाते, अमू अत्र. येथें ईत्त्व आणि उत्व असिद्ध असल्यामुळें 'एचोऽयवायावः' (६।१।७८) या सूत्रानें सांगितलेले अय् आणि आव् हे आदेश प्राप्त होतील. 'बाहेरच्या दुसऱ्या पदाच्या निमित्तानें' असें कशाकरिता म्हटलें आहे? जें दुसऱ्या पदाच्या निमित्तानें प्राप्त झालेलें नव्हे असें जें संधिकार्य ते ईत्त्व आणि उत्व असिद्ध असताना पूर्वीच होतें. उदा० अमुया[३१], अमुयोः.

(वा. १०) प्रगृह्य-संज्ञा कर्तव्य असतांना अदस् शब्दाला सांगितलेलें ईत्त्व आणि उत्व सिद्ध होतें असे म्हणावें. उदा०—अमी अत्र, अमू आसाते. येथें ईत्त्व आणि उत्व असिद्ध असल्यामुळें 'अदसो मात्' (१।१।१२) या सूत्राने सांगितलेली प्रगृह्यसंज्ञा प्राप्त होणार नाहीं.

हीं दोन निराळीं वचनें कशाकरितां केलीं आहेत? तशीं करावयास नकोत. 'प्रगृह्य-संज्ञा कर्तव्य असतांना' या एका वचनानेंच दुसऱ्या पदाच्या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या संधिकार्याविषयींही सांगितल्यासारखेंच[३२] होईल.

बाहेरच्या दुसऱ्या पदाच्या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या संधिकार्याच्या दृष्टीने मुत्व सिद्ध होतें हें आचार्य वार्तिककाराच्या पूर्वी नजरेस आलें. तेव्हां लगेच त्यांनीं तसें वचन केलें. नतर मागून प्रगृह्य संज्ञेच्या दृष्टीनेंही तें सिद्ध होतें असें त्यांच्या नजरेस आलें. त्या वेळीं त्यांनीं तसेंही वचन केलें. आणि महात्मे आचार्य हे एकदां

---

३१. स्त्रीलिंगी अदस् शब्दाहून तृतीया एकवचन टा प्रत्यय, 'त्यदादीनामः' (७।२।१०२) अत्व, 'अतो गुणे' (६।१।९७) पररूप, 'अजाद्यतः०' (४।१।४) टाप् प्रत्यय. 'अकः सवर्णे०' (६।१।१०१) सवर्ण दीर्घ, 'आङि चापः' (७।३।१०५) एकार. 'एचोऽयवा०' (६।१।७८) अयादेश हे सर्व विधि मुत्व असिद्ध असल्यामुळें त्याच्या पूर्वी क्रमानें होतात. नंतर अदया अशी स्थिति असतां त्यांतील द याला मुत्व होऊन अमुया हें रूप सिद्ध होतें.

३२. प्रगृह्य-संज्ञेच्या दृष्टीनें मुत्व आणि मीत्व सिद्ध मानिले याचा उपयोग संधिकार्य न व्हावें हा होय. तें संधिकार्य जर मुत्व आणि मीत्व असिद्ध समजून त्या मुत्व आणि मीत्वाचे जे स्थानी एकार वगैरे त्यांच्या बुद्धीनें होऊं लागेल तर प्रगृह्यसंज्ञा करण्याचा कांहींच उपयोग नाहीं असें होईल. तेव्हां अर्थातच संधिकार्याच्या दृष्टीनें मुत्व व मीत्व सिद्ध होतील.

कृत्वा निवर्तयन्ति ॥

**प्लुतिस्तुग्विधौ छे ॥ ११ ॥**

प्लुतिस्तुग्विधौ छे सिद्धा वक्तव्या । अग्ना३इ च्छत्त्रम् । पटा३उ च्छत्त्रम् । प्लुतेरसिद्धत्वाच्छे च [६. १. ७३] इति तुग्न प्राप्नोति ॥ किमुच्यते छ इति । यो ह्यन्यो ऽसिद्ध एवासौ भवति । अग्निची३त् सोमसु३त् ॥

**श्चुत्वं धुट्त्वे ॥ १२ ॥**

श्चुत्वं धुट्त्वे सिद्धं वक्तव्यम् । अट् श्च्योतति । पट् श्च्योतति । श्चुत्वस्यासिद्धत्वाड्डः सि धुट् [८. ३. २९] इति धुट् प्रसज्येत ॥

**अभ्यासजश्त्वचर्त्वमेत्त्वतुकोः ॥१३॥**

अभ्यासजश्त्वचर्त्वमेत्त्वतुकोः सिद्धं वक्तव्यम् । बभणतुः बभणुः । अभ्यासादेशस्यासिद्धत्वादेत्त्वं प्राप्नोति । उचिच्छिषति । अभ्यासादेशस्यासिद्धत्वाच्छे च

---

सूत्र केले कीं ते मागून परत घेत नसतात.

(वा. ११) छकाराच्या निमित्तानें सांगितलेला जो तुगागम तो कर्तव्य असतांना प्लुत सिद्ध होतो असें म्हणावें. उदा०—अग्ना३ इ च्छत्रम् पटा३ उ च्छत्रम्. येथें प्लुत असिद्ध असल्यामुळें 'छे च' (६।१।७३) या सूत्रानें सांगितलेला तुगागम[३३] होणार नाहीं.

'छकाराच्या निमित्तानें सांगितलेला' असें कशाकरितां म्हटलें आहे?

दुसरा जो तुगागम (६।१।७१) सांगितला आहे तो प्लुत असिद्ध असतांना त्याच्या पूर्वीच होतो. उदा०— अग्निचि३त् सोमसु३त्.

(वा. १२) धुडागम कर्तव्य असतांना श्चुत्व सिद्ध होतें असें म्हणावें. उदा०—अट् श्च्योतति. पट् श्च्योतति. येथें श्चुत्व असिद्ध असल्यामुळें 'डः सि धुट्' (८।३।२९) या सूत्रानें सांगितलेला धुडागम होऊं लागेल.[३४]

(वा. १३) अभ्यासाला सांगितलेलें जें जश्त्व तसेंच चर्त्व तीं क्रमानें एत्व आणि तुगागम कर्तव्य असतांना सिद्ध होतात असें म्हणावें. उदा०—'बभणतुः', 'बभणुः'. येथें 'अभ्यासे चर्च' (८।४।५४) या सूत्रानें अभ्यासांतील भकाराला आदेश झालेला जो बकार तो असिद्ध असल्यामुळें 'अत एक०' (६।४।१२०) या सूत्रानें सांगितलेलें एत्व होऊं लागेल. तसेंच उचिच्छिषति[३५] या उदाहरणामध्यें 'अभ्यासे चर्च' (८।४।५४) या सूत्रानें अभ्यासांतील छकाराला आदेश झालेला जो चकार तो असिद्ध असल्यामुळें 'छे च'

---

३३. अग्ने छत्रम् या ठिकाणीं अग्ने यांतील एकाराला 'एचोऽप्रगृह्यस्य०' (८।२।१०७) या सूत्रानें 'आ३इ' असा प्लुत घटित आदेश होतो. तो सिद्ध मानिला म्हणून त्यांतील ह्रस्व इकाराला 'छे च' (६।१।७३) या सूत्रानें तुगागम होऊन अग्ना३ इ च्छत्रम् असें रूप होतें.

३४. श्च्युत् हा धातु मूळचा शकारादि नव्हे. सकारादि आहे. व त्या सकाराला 'स्तोः श्चुना श्चुः' (८।४।४०) या सूत्रानें श्चुत्व होऊन शकार झाला आहे. तें श्चुत्व सिद्ध मानलें म्हणून धुडागम होत नाहीं. कारण तो सांगितला आहे.

३५ उच्छ् धातूहून सन् प्रत्यय, त्याला इडागम, 'सन्यङोः' (६।१।९) या सूत्रानें छिस् या भागाला द्वित्व, अभ्यासांतील छकाराला 'अभ्यासे चर्च' (८।४।५४) यानें चकार, 'हलादिः शेषः' (७।४।६०) यानें सकाराचा लोप, अभ्यासांतील इकाराला छे च (६।१।७३) यानें तुगागम, व त्याला श्चुत्वानें चकार अशीं कार्यें होतात. छकाराला चकार झाला तो असिद्ध आहे. म्हणून तो छकारच आहे असें समजून इकाराला 'छे च' (६।१।७३) यानें तुगागम होईल असा दोष येतो.

[६. १. ७३] इति तुक्प्राप्नोति ॥

**द्विर्वचने परसवर्णत्वम् ॥ १४ ॥**

द्विर्वचने परसवर्णत्वं सिद्धं वक्तव्यम् । सय्यँन्ता, सव्वँत्सरः, तल्ँलोकम्, यल्ँलोकमिति परसवर्णस्यासिद्धत्वाद्यर इति द्विर्वचनं न प्राप्नोति ॥

**पदाधिकारश्चेल्लत्वघत्वनत्वरुत्वषत्वणत्वानुनासिकछत्वानि ॥ १५ ॥**

पदाधिकारश्चेल्लत्वघत्वनत्वरुत्वषत्वणत्वानुनासिकछत्वानि सिद्धानि वक्तव्यानि ॥ लत्व । गरो गरः । गलो गलः । लत्व ॥ घत्व । द्रोग्धा द्रोग्धा । द्रोढा द्रोढा । घत्व ॥ नत्व । नुन्नो नुन्नः । नुत्तो नुत्तः । नत्व ॥ रुत्व । अभिनोऽभिनः । अभिनदभिनत् । रुत्व ॥ षत्व । मातुःष्वसा मातुःष्वसा । मातुःस्वसा मातुःस्वसा । पितुःष्वसा पितुःष्वसा । पितुःस्वसा पितुःस्वसा । षत्व ॥ णत्व । माषवापाणि माषवापाणि । माषवापानि माषवापानि । णत्व ॥ अनुनासिक । वाङ्नयनं वाङ्नयनम् । वाम्नयनं वाम्नयनम् । अनुनासिक ॥ छत्व । वाक्छयनं वाक्छयनम् । वाक्शयनं वाक्श-

---

(६।१।७३) या सूत्रानें सांगितलेला तुगागम होऊं लागेल.

(वा. १४) द्वित्व कर्तव्य असतांना परसवर्ण सिद्ध होतो असें म्हणावें. उदा०—सय्यँन्ता[36], सव्वँत्सरः, तल्ँलोकम्, यल्ँलोकम्. येथे परसवर्ण असिद्ध असल्यामुळें यराला सांगितलेलें द्वित्व होणार नाहीं.

(वा.१५) लत्व, घत्व, नत्व, रुत्व, षत्व, णत्व, अनुनासिक आणि छत्व, हे विधि जर 'पदस्य' या अधिकारामध्यें सांगितलेले असतील तर[37] ते सर्व द्वित्व कर्तव्य असतांना सिद्ध होतात असें म्हटले पाहिजे. सिद्ध मानल्यामुळे हे विधी द्वित्वाच्या पूर्वी होतात आणि नंतर द्वित्व होऊन उदाहरणे सिद्ध होतात. त्यापैकीं लत्वाचें उदा०—गरोगरः, गलोगलः[38]. घत्वाचें उदाहरण द्रोग्धाद्रोग्धा[39], द्रोढाद्रोढा. नत्वाचें उदा० नुन्नोनुन्नः, नुत्तोनुत्तः. रुत्वाचें उदा०—अभिनोऽभिनः, अभिनदभिनत्. षत्वाचें उदा०—मातुःष्वसा मातुःष्वसा, मातुःस्वसा मातुःस्वसा, पितुःष्वसा पितुःष्वसा-पितुःस्वसा पितुःस्वसा. णत्वाचें उदा०—माषवापाणि माषवापाणि, माषवापानि माषवापानि. अनुनासिकाचें उदा०—वाङ्नयनम् वाङ्नयनम्; वाम्नयनं वाम्नयनम्. छत्वाचे उदा०—वाक्छयनं वाक्छयनम्, वाक्शयनं वाक्शयनम्. या उदाहरणांमध्यें जर द्वित्व पूर्वी होऊन नतर हे विधी होतील तर द्वित्वानें झालेल्या दोन भागांमध्यें सारखेच होतील, असा नियम राह-

---

३६. सम् यन्ता या ठिकाणीं मकाराला 'मोऽनुस्वारः' (८।३।२३) यानें अनुस्वार होतो. त्याला 'वा पदान्तस्य' (८।४।५९) यानें परसवर्ण सानुनासिक यकार होतो. तो सिद्ध मानला म्हणून त्याला 'अनचि च' (८।४।४७) यानें द्वित्व होऊन दोन सानुनासिक यकार व एक निरनुनासिक यकार असें तीन यकाराचें रूप होते.

३७. लत्व वगैरे विधी पदस्य या अधिकारामध्यें सांगितले नसते तर ते अंतरंगत्वास्तव पूर्वीच झाले असते. आणि नंतर सुप् तिङ् हे प्रत्यय होऊन पदसंज्ञा झाल्यानंतर द्वित्व झालें असतां इष्ट रूपें सिद्ध झाली असतीं.

३८. जर येथें लत्वाच्या पूर्वी द्वित्व झालें तर गरो गरः असें द्वित्वानें रूप झाल्यानंतर 'अचि विभाषा' (८।२।२१) हें लत्व प्राप्त झालें, तें लत्व वैकल्पिक असल्यामुळें दोन्ही भागांमध्यें सारखेंच होईल असा नियम नाहीं, तेव्हां कदाचित् गलो गरः असें, किंवा गरो गलः असेंही रूप होईल.

३९. मागील टीप (८।१।२४) पहा.

यनम् ॥ उभयथा चायं दोषो यद्यपि स्थाने द्विर्वचनमथापि द्विःप्रयोगः । कथम् । यदि तावत्स्थाने द्विर्वचनं संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य लत्वाद्यभावः । अथ द्विःप्रयोगोऽसिद्धत्वाल्लत्वादीनि निवर्तेरन् ॥

**नलोपः प्रातिपदिकान्तस्य ॥ ८ । २ । ७ ॥**

अन्तग्रहणं किमर्थम् ।

**नलोपेऽन्तग्रहणं पदाधिकारस्य विशेषणत्वात् ॥ १ ॥**

नलोपेऽन्तग्रहणं क्रियते । किं कारणम् । पदाधिकारस्य विशेषणत्वात् । पदाधिकारो विशेषणम् । कथम् । पदस्येति नैषा स्थानषष्ठी । का तर्हि । विशेषणषष्ठी ॥

**अह्नो नलोपप्रतिषेधः ॥ २ ॥**

अह्नो नलोपप्रतिषेधो वक्तव्यः । अहोभ्याम् अहोभिरिति ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । रुरत्र बाधको

---

णार नाहीं, म्हणून दोष येईल. आतां द्वित्वाविषयीं स्थानेद्विर्वचनपक्ष घेतला काय आणि द्विःप्रयोगरूपद्विर्वचनपक्ष घेतला काय, दोन्ही पक्षीं वरील उदाहरणांमध्यें दोष येतोच.

कसा ?

जर स्थानेद्विर्वचनपक्ष घेतला तर द्वित्व केल्यानंतर त्यामध्यें प्रकृति कोणती आणि प्रत्यय कोणता वगैरे विभागांचें ज्ञान नीट होत नसल्यामुळें लत्व वगैरे विधी होणार नाहींत. त्यामुळें दोष सिद्ध होतो. जरी द्विःप्रयोगरूप द्विर्वचन पक्ष घेतला तरी लत्व वगैरे विधी असिद्ध असल्यामुळें द्वित्वाच्या पूर्वी होणार नाहींत.

( सू. ७ ) नकाराचा लोप सांगणाऱ्या या सूत्रामध्यें अन्तग्रहण कशाकरितां केलें आहे ?

(वा. १) या सूत्रामध्यें अन्तग्रहण केलें आहे. कां बरें ?

पदस्य हा अधिकार विशेषण आहे म्हणून केलें आहे. पदस्य असा जो अधिकार चालू आहे तो नकाराचा येथें विशेषण केला आहे.

कसा ?

पदस्य ही स्थानार्थी षष्ठी घ्यावयाची असा नियम नाहीं.

तर ही दुसरी कशा प्रकारची षष्ठी घेतां येईल ?

ही विशेषणषष्ठी आहे.

( वा. २ ) अहन् शब्दाच्या नकाराचा लोप होत नाहीं असें म्हणावें. उदा०—अहोभ्याम्, अहोभिः.

तर मग तसा निषेध केला पाहिजे.

---

१. ( सू. ७ ) या सूत्रामध्यें न, लोपः, प्रातिपदिक, आणि अन्तस्य अशी चार पदें आहेत. त्यापैकीं न आणि प्रातिपादिक हीं दोन पदें लुप्तषष्ठ्यन्त आहेत प्रातिपदिकाचा आणि पदाचा अंत जो नकार त्याचा लोप होतो असा अर्थ आहे.

२. पदस्य हें विशेष्य व न हें त्याचें विशेषण; ' येन विधिस्तद० ' ( १।१।७२ ) या सूत्रानें तदन्तविधि होऊन प्रातिपदिक-संज्ञक व नकारान्त असें जें पद त्याचा लोप होतो असा अर्थ झाला तरी ' अलोऽन्त्यस्य ' ( १।१।५२ ) या परिभाषेनें नकाराचाच लोप होऊन इष्ट सिद्ध होईल.

३. पदस्य हें नकाराचें विशेषण केलें म्हणजे पदाचा अवयव जो नकार त्याचा लोप होतो असा अर्थ होईल. आणि नामनी या ठिकाणीं नकाराचा लोप होऊं लागेल. अन्तग्रहण केलें म्हणजे पदाचा अन्त नकार पाहिजे असल्यामुळें हा दोष येत नाहीं. अन्तग्रहण करण्यानेंच आचार्यांनें 'पदस्य ही विशेषण-षष्ठीही घेतां येते ' असें ज्ञापित केलें.

४. अहन् शब्दाहून भ्याम् प्रत्यय केला असतां तेथें नकाराचा लोप न होतां त्याला ' अहन् ' (८।२।६८) यानें रुत्व होतें. नंतर रूला 'हशि च ' ( ६।१।११४ ) यानें उत्व व ' आद् गुणः ' (६।१।८७) यानें गुण होऊन अहोभ्याम् असें रूप होतें.

भविष्यति । असिद्धो रुस्तस्यासिद्धत्वान्नलोपः प्राप्नोति । अनवकाशो रुर्नलोपं बाधिष्यते । सावकाशो रुः । कोऽवकाशः । अनन्त्योऽकारः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानन्त्यस्य रुर्भवतीति यदयमहन्ग्रहणं करोति ॥

अहन्ग्रहणादिति चेत्संबुद्ध्यर्थं वचनम् ॥ ३ ॥

अहन्ग्रहणादिति चेत्संबुद्ध्यर्थमेतत्स्यात् । हेऽहरिति ॥ यत्तर्हि रुत्वं शास्ति । एतदपि संबुद्ध्यर्थमेव स्यात् । हे दीर्घाहोऽत्र । यत्तर्हि

---

तसा निषेध करावयास नको. कारण अहोभ्याम् वगैरे उदाहरणांमध्यें रु हा नलोपाचा बाधक होईल.

पण रु असिद्ध आहे. तेव्हां त्याच्या असिद्धत्वास्तव त्याच्या पूर्वी नलोप होईल .

‘ रु ’ ( आदेशा ) ला चारितार्थ्य नसल्यामुळें तो नलोपाचा बाध करील.

पण रु ला चारितार्थ्य आहे ना ?

कोणत्या ठिकाणीं त्याला चारितार्थ्य आहे.

मधल्या अकाराचा रु होईल.[5]

असें म्हणतां येणार नाहीं. कारण, हा आचार्य पाणिनि रु सांगणाऱ्या सूत्रामध्यें ‘ अहन् ’ असा नकारान्त शब्द ज्या अर्थी उच्चारतो त्यावरून तो असें सुचवितो कीं, नकाराशिवाय मधल्या कोणत्याही वर्णाला रु होत नाहीं. ( कारण सर्वत्र नकाराचा लोप होत असल्यामुळें नकारान्त अहन् शब्द कोठेंच मिळणार नाहीं. )

( वा. ३ ) ‘ अहन् असा नकारान्त शब्द उच्चारला आहे त्यावरून ’ असें म्हणाल तर तसें म्हणतां येत नाहीं. कारण तसें उच्चारण्याचा संबुद्धीकरतां उपयोग होईल. उदा०— हे अहः.[6]

तर मग ( अहन् शब्दाला रत्व न सांगतां ) रुत्व जें सांगतो त्यावरूनच तो वरील गोष्ट सुचवितो.[7] परंतु हें देखील बरोबर नाहीं. कारण

---

५. नकाराचा लोप झाला तरी त्यानंतर त्या नकाराच्या मागील अकाराला रुत्व करितां येईल.

६. येथें न ङिसंबुद्ध्योः ( ८।२।८ ) या निषेधामुळें नकाराचा लोप होत नाहीं. तेव्हां येथें नकाराला रुत्व करतां येतें.

७. अहन् शब्दाच्या पुढील विभक्तिप्रत्यय ज्या ठिकाणीं लुकानें लुप्त होतो, तेथें त्याच्या नकाराला ‘ रोऽसुपि ’ ( ८।२।६९ ) यानें रुत्व होतें. उदा० अहः, अहर्गणः. ज्या ठिकाणी तो विभक्तिप्रत्यय लोपानें लुप्त होतो किंवा भ्याम् वगैरे हलादि-प्रत्यय कायम राहतात तेथें त्याच्या नकाराला अहन् ( ८।२।६८ ) यानें रुत्व होतें. उदा०–दीर्घाहा निदाघः, हे दीर्घाहो निदाघ, दीर्घाहोभ्याम्. समासामध्यें विभक्ति-प्रत्ययाचा ‘ सुपो धातु०’ ( २।४।६१ ) यानें लुक् होतो. तसेंच नपुंसकलिंगामध्यें प्रथमा आणि संबोधन यांचाही लुक् होतो. ज्या ठिकाणीं रुत्व होतें त्या ठिकाणीं त्या रूच्या पूर्वी ह्रस्व अकार असल्यास त्या रूला ‘ अतो रो०’ ( ६।१।११३ ) ‘ हशि च ’ ( ६।१।११४ ) या सूत्रांनीं उत्व, आणि दीर्घ आकार पूर्वी असल्यास त्याला ‘भोभगो०’ ( ८।३।१७ ) यानें यत्व होतें. आणि ज्या ठिकाणीं रत्व होतें त्या ठिकाणीं उत्व किंवा यत्व हें कांहीं होत नाहीं. कारण तें रूलाच सांगितलें आहे. हा जो रुत्व आणि रत्व करण्यात फरक होतो तो त्याच्या पाठीमागें अकार असेल तर होतो. कारण यत्व आणि उत्व आकाराच्या पुढील रूलाच सांगितलें आहे. आतां जर नकाराचा लोप झाल्यानंतर त्याच्या मागील अकारालाच रुत्व आणि रत्व होईल तर त्या ठिकाणीं त्याच्या पूर्वी हकार असल्यामुळें उत्व आणि यत्व यांचीं प्राप्ति येत नाहीं. म्हणून तेथें रु केला काय आणि र केला काय सारखेंच रूप होणार. तेव्हा ज्या अर्थी आचार्य पाणिनि मुद्दाम कांहीं ठिकाणीं रुत्व सांगतात त्या अर्थी तें रुत्व आणि रत्व नकारालाच होतें असें ते सुचवितात.

रूपरात्रिरथंतरेषूपसंख्यानं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो नानन्त्यस्य रुर्भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् । न ह्यस्ति विशेषो रूपरात्रिरथंतरेष्वनन्त्यस्य रौ वा रे वा ॥

## न ङिसंबुद्ध्योः ॥ ८ । २ । ८ ॥

## न ङिसंबुद्ध्योरनुत्तरपदे ॥ १ ॥

न ङिसंबुद्ध्योरनुत्तरपद इति वक्तव्यम् । इह मा भूत् । चर्मणि तिला अस्य चर्मतिल इति । राजन्वृन्दारक राजवृन्दारकेति ॥

## वा नपुंसकानाम् ॥ २ ॥

वा नपुंसकानामिति वक्तव्यम् । हे चर्म हे चर्मन् । हे वर्म हे वर्मन् ॥

तत्तर्ह्यनुत्तरपद इति वक्तव्यम् । न वक्तव्यम् । न ङिसंबुद्ध्योरित्युच्यते न चात्र ङिसंबुद्धी पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणस्य प्रतिषेधः । न कचिन्ङिर्लोपेन लुप्यते सर्वत्र लुमतैव । यथैवेह भवति आर्द्रे चर्मन् लोहिते

---

रुत्व सांगण्याचाही उपयोग सबुद्धीमध्यें होईल. उदा०– हे दीर्घाहोऽत्रे. तर मग आतां आचार्य वार्तिककार रूप रात्रि आणि रथंतर हे शब्द पुढें असतांना अहन् शब्दाला जें रुत्व सागतात त्यावरून ते सुचवितात की– अहन् शब्दांतील नकाराच्या मागील वर्णाला रुत्व होत नाही.

कसें बरें हें ज्ञापक जमते ?

अशा रीतीनें जमतें कीं रूप रात्रि आणि रथंतर हे शब्द पुढें असतांना अहन् शब्दाच्या नकाराचा लोप झाल्यानंतर त्याच्या मागील वर्णाला रुत्व केले काय किंवा रत्व केले काय त्यांत कांहीं फरकच होत नाहीं.

(सू. ८ वा. १) 'न ङिसंबुद्ध्योः' हा निषेध उत्तरपद पुढें नसतांना होतो असें म्हणावें. कारण चर्मणि तिला अस्य चर्मतिलः, राजन् वृन्दारक राजवृन्दारक येथें हा निषेध न झाला पाहिजे.

( वा. २ ) नपुंसकलिंगामध्यें संबुद्धि पुढें असतांना नलोप विकल्पानें होतो असें म्हणावें. उदा०– हे चर्म, हे चर्मन्. हे वर्म, हे वर्मन्.

तर मग 'उत्तरपद पुढें नसतांना' असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण 'ङि आणि संबुद्धि हे प्रत्यय पुढें असतांना' असें येथें म्हटलें आहे. आणि उत्तरपद पुढें असलेल्या ठिकाणीं हें प्रत्ययच दिसत नाहींत.

प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) ते प्रत्यय आहेत असें मानता येईल.

न लुमता तस्मिन् ( १।१।५३ ) या सूत्रानें प्रत्ययलक्षणाचा निषेध होत आहे. (असें पहा कीं उत्तरपद पुढे असताना) ङि प्रत्यय हा कोठेंही लोपानें लुप्त होत नाही. तर लु हें अक्षर ज्यामध्यें आहे अशा शब्दानेंच तो सर्वत्र लुप्त होत आहे.

---

८. मागील टीप ६ पहा.

९. रूप, रात्रि व रथंतर हे शब्द पुढें असतांना 'न ङिसंबुद्ध्योः' ( ८।२।८ ) या निषेधाची प्राप्ति मुळीच येत नाहीं. तेव्हां तेथें नकाराचा लोप होणारच असल्यानें रुत्व आणि रत्व यांमध्यें फरक येत नाही.

१. ( सू. ८ ) ङि किंवा संबुद्धि हे प्रत्यय पुढे असतांना नकाराचा लोप होत नाहीं.

२. राजन् आणि वृन्दारक या दोन्ही शब्दांहून निरनिराळा संबुद्धि सु प्रत्यय करून नंतर त्या दोन संबुद्धि प्रत्ययान्त शब्दाचा कर्मधारय समास होतो असें येथें गृहीत धरलें आहे.

३. समासामध्यें 'सुपो धातु०' ( २।४।७१ ) यानें विभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो.

४. 'न लुमताऽङ्गस्य' ( १।१।६३ ) या सूत्रामध्यें 'न लुमता तस्मिन्' असा पाठ पूर्वी (१।१।६३ भाष्य ) सांगितला आहे. त्याला अनुसरून येथें तसें म्हटलें आहे.

चर्मन्नित्येवमिहापि स्यात् चर्मणि तिला अस्य चर्मतिल इति । तस्मादुपसंख्यानं कर्तव्यम् ॥ एवं तर्हि ङ्यर्थेन तावन्नार्थः ।

**भत्वात्तु ङौ प्रतिषेधानर्थक्यम् ॥ ३ ॥**

ङौ प्रतिषेधोऽनर्थकः । किं कारणम् । भत्वात् । भसंज्ञात्र भविष्यति ॥ यदि तर्हि भसंज्ञात्र भवति रथंतरे सामन्नित्यत्राल्लोपोऽनः [६. ४. १३४] इत्यल्लोपः प्राप्नोति । नैष दोषः । उक्तमुभयसंज्ञान्यपि च्छन्दांसि दृश्यन्ते तद्यथा स सुष्टुभा स ऋक्वता गणेनः (ऋ. सं. ४।५०।५) पदत्वात्कुत्वं भत्वाज्जश्त्वं न भवति । एवमिहापि पदत्वादल्लोपो न भत्वान्नलोपो न भविष्यति । तस्मान्नार्थो ङिग्रहणेन ॥

संबुद्ध्यर्थेन चापि नार्थः । कथम् । संबुद्ध्यन्तानामसमासः । राजवृन्दारकेति । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । इह समानार्थेन वाक्येन भवितव्यं समासेन च । यश्चेहार्थो वाक्येन गम्यते नासौ जातुचित्समासेन गम्यते । अवयवसंबो-

---

तेव्हां आर्द्रे चर्मन्, लोहिते चर्मन् या उदाहरणांमध्यें हा नलोपाचा निषेध जसा साधावा लागतो तसा[5] चर्मणि तिला अस्य चर्मतिलः ह्या उदाहरणामध्यें देखील तो होईल. तेव्हां उत्तरपद पुढें नसतांना हा निषेध होतो असें म्हटलें पाहिजे.

तर मग येथें आतां असें दिसतें कीं ' उत्तरपद पुढे नसतांना ' या म्हणण्याचा ङिकरितां कांहीं उपयोग नाहीं. कारण—

( वा. ३ ) ङि पुढे असतांना जो नलोपाचा निषेध केला आहे तोच मुळीं निरर्थक आहे.

कां बरें ?

भसंज्ञा आहे म्हणून. त्या ठिकाणीं भसंज्ञा आहे[6].

जर तशा ठिकाणीं भसंज्ञा असेल तर ' रथंतरे सामन् ' या उदाहरणामध्यें ' अल्लोपोऽनः ' ( ६।४।१३४ ) या सूत्रानें अकाराचा लोप प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. कारण भसंज्ञा आणि पदसंज्ञा या दोन्ही संज्ञा झालेले[7] असे वैदिक शब्द दृष्टीस पडतात. उदा० स सुष्टुभा स ऋक्वता गणेन (ऋ. स. ४।५०।५) येथें ऋक्वता या पदामध्यें पदसंज्ञेमुळे कुत्व झालें आहे; आणि भसंज्ञेमुळें जश्त्व झालें नाहीं. त्याप्रमाणेच रथंतरे सामन् या उदाहरणामध्यें देखील पदसंज्ञा असल्यामुळें अल्लोपोऽनः ( ६।४।१३४ ) हा लोप होणार नाहीं. एकंदरीत प्रकृत सूत्रामध्यें ङि-ग्रहणाचा कांहीं उपयोग नाहीं.

तसेंच ' उत्तरपद पुढे नसतांना ' या वचनाचा संबुद्धीकरिता देखील उपयोग नाहीं.

कसा बरें ?

राजवृन्दारक, असा संबुद्ध्यन्त पदांचा समासच होत नाहीं.

काय म्हणत आहांत हें ? असें म्हणूं नका. पाणिनीनें जें सांगितलें नाहीं तें कसें बरें समजावें ?

असें पहा कीं वाक्य आणि समास हे दोन्ही समानार्थक असले पाहिजेत असा साधारण नियम आहे. पण येथें संबुद्ध्यन्त पदाविषयीं

---

५. ' न ङिसंबुद्ध्योः ' हा निषेध आपल्याला उदाहरण मिळावें म्हणून ' न लुमता० ' (१।१।६३) या निषेधाला बाजूला सारून होतो.

६. ' अयस्मयादीनि छन्दसि ' ( १।४।२० ) या सूत्रानें येथें भ संज्ञा होते.

७. उभयसंज्ञान्यपि ( १।४।२० वार्तिक ) या वार्तिकानें एकालाच दोन संज्ञा सांगितल्या आहेत.

धनं वाक्येन गम्यते समुदायसंबोधनं समासेन ॥ वा नपुंसकानामित्येतद्वक्तव्यमेव ॥

**मादुपधायाश्च मतोर्वोऽयवादिभ्यः ॥ ८ । २ । ९ ॥**

**( रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः ॥ ८ । २ । ४२ ॥ )**

**अनन्त्ययोरपि निष्ठामतुपोरादेशः ॥१॥**

निष्ठामतुपोरादेशो ऽनन्त्ययोरपीति वक्तव्यम् । भिन्नवन्तौ भिन्नवन्तः । वृक्षवन्तौ वृक्षवन्तः ॥ न वक्तव्यम् । वचनाद्भविष्यति । अस्ति वचने प्रयोजनम् । किम् । भिन्नवान् छिन्नवान् । वृक्षवान् प्लक्षवान् ॥

**नार्मते प्रतिषेधः ॥ २ ॥**

नार्मते प्रतिषेधो वक्तव्यः । नृमतोऽपत्यं नार्मत इति ॥

---

पहावें तर वाक्यापासून जो अर्थ गम्यमान होतो तो समासापासून केव्हाही गम्यमान होत नाहीं. कारण, वाक्यापासून प्रत्येक पदाच्या अर्थाचें संबोधन मनांत येतें. आणि समासापासून समुदायाचें संबोधन मनांत येतें. तेव्हां ' उत्तर-पद पुढें नसतांना ' हें म्हणण्याचें कांहीं कारण नाहीं. ' नपुंसकलिंगामध्यें नलोप विकल्पानें होतो ' हें मात्र म्हटलेंच पाहिजे.

( सू. ९ वा. १ ) निष्ठा प्रत्यय आणि मतुप् प्रत्यय यांच्या आदि वर्णाला जे हे वकार आणि नकार आदेश सांगितले आहेत ते पदाच्या अंतीं ते प्रत्यय जरी नसतील तरी होतात, असे म्हणावें.[३] उदा०-भिन्नवन्तौ, भिन्नवन्तः; वृक्षवन्तौ वृक्षवन्तः.

अथवा तसें म्हणण्याचे कारण नाहीं. कारण सूत्रकारांनी ते आदेश सांगितले आहेत त्याना वैयर्थ्य येत असल्यामुळें ते तेथे होतील.

( हे बरोबर नाहीं. ) कारण सूत्रकारांनीं जे ते आदेश सांगितले आहेत त्यांचा दुसरीकडे उपयोग होत आहे.

कोणता ?

भिन्नवान्[४], छिन्नवान्; वृक्षवान्, प्लक्षवान्.

( वा. २ ) नार्मत या शब्दामध्यें मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार आदेश[५] होत नाहीं असें म्हणावें उदा०— नृमतः अपत्यं नार्मतः.

---

८. हे राजन् आणि हे वृन्दारक या वाक्यांमध्यें अभिमुख करण्याकरतां दोन्ही शब्दांपुढें निरनिराळा संबुद्धि प्रत्यय केला आहे अशी विवक्षा असेल तर त्या दोन पदांचा परस्पर संबंध नसल्यामुळें समास होतच नाहीं. जेव्हां राजन् आणि वृन्दारक या दोघांचा परस्पर संबंध करून नंतर विशिष्ट शब्दापुढें अभिमुख करण्याकरतां संबुद्धि प्रत्यय लावावा तेव्हांच समास करतो. तो अर्थातच संबुद्धि प्रत्ययान्ताचा नव्हे. प्रथमान्त पदांचाच होतो.

१. ( सू. ९ ) मकारान्त अकारान्त मकारोपध किंवा अकारोपध अशा शब्दाच्या पुढील मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार होतो परंतु तो शब्द यवादि गणांतील नसावा.

२. हें सूत्र ( ४२ ) या ठिकाणीं सर्व प्रतींमध्यें आढळतें. वास्तविक पाहतां हें सूत्र पुढें दिलें आहे व त्यावर भाष्यही आहे. परंतु वार्तिक (१) मध्यें 'निष्ठामतुपोः ' येथे 'मतुप् प्रत्ययाबरोबर निष्ठा प्रत्ययाचाही विचार केला असल्यामुळें त्या वार्तिकाकरितां हें सूत्र लिहिलें असावे.

३. पदस्य हा अधिकार चालू असल्यामुळें मतुप्-प्रत्ययान्त आणि निष्ठा-प्रत्ययान्त जें पद त्यामध्ये हें आदेश होतात, असा अर्थ होईल. भिन्नवन्तः वृक्षवन्तः हीं पदे आहेत. त्यांतील निष्ठा-प्रत्ययान्त भिन्नवत् हें पद नव्हे. तसेंच मतुप्-प्रत्ययान्त वृक्षवत् हें पद नव्हे.

४. येथें प्रथमा एकवचनाचा ' हल्ङ्याब्भ्यो० ' ( ६।१।६८ ) याने लोप झाला असल्यामुळें भिन्नवत् या निष्ठा-प्रत्ययान्ताला प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) पदसंज्ञा आहे.

५. नृमत् शब्दाहून अपत्यार्थीं अण् प्रत्यय करून 'तद्धितेष्वचा० ' (७।२।११७) या सूत्रानें ऋकाराला

उक्तं वा ॥ ३ ॥

किमुक्तम् । निष्ठामतुपोस्तावदुक्तं न वा पदाधिकारस्य विशेषणत्वादिति । नार्मते ऽप्युक्तं न वा बहिरङ्गलक्षणत्वादिति ॥

[ झयः ॥ ८।२।१० ॥ ]

संज्ञायाम् ॥ ८ । २ । ११ ॥

आसन्दीवदष्ठीवच्चक्रीवत्कक्षीवद्रुमण्वच्चर्मण्वती ॥ ८ । २ । १२ ॥

किमयमेकयोग आहोस्विन्नानायोगौ । किं चातः । यद्येकयोगोऽहीवती कपीवती अत्र न प्राप्नोति । अथ नानायोगाविक्षुमती द्रुमती अत्रापि प्राप्नोति । यथेच्छसि तथास्तु ॥ अस्तु तावदेकयोगः । कथमहीवती कपीवती । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येवंजातीयकानां वत्वमिति यदयमन्तोऽवत्या ईवत्याः [ ६. १. २२०; २२१ ] इत्याह ॥

---

(वा. ३) अथवा हें पूर्वी सांगितलेंच आहे.

काय बरें तें सांगितलें आहे ?

निष्ठा प्रत्यय आणि मतुप् प्रत्यय यांविषयीं तर असें सांगितलें आहे कीं–' ते प्रत्यय पदाच्या अंतीं नसतांना त्यांना आदेश होण्याकरतां विशेषवचन करण्याचें कारण नाहीं. कारण पदस्य हा अधिकार विशेषण होत आहे.' तसेंच नार्मत शब्दाविषयींही पूर्वी सांगितलेंच आहे कीं–' तेथें विशेषवचन करण्याचें कारण नाहीं; कारण, वृद्धि बहिरंग असल्यामुळें असिद्ध होत आहे.'

( सू. ११।१२ ) हीं दोन्ही सूत्रें मिळून एकच सूत्र आहे किंवा 'संज्ञायाम्' हें एक आणि 'आसन्दीवत्' येथून दुसरें अशीं दोन सूत्रें आहेत ?

यांत काय फरक होईल ?

फरक असा होईल कीं जर हें एकच सूत्र असेल तर अहीवती कपीवती या संज्ञा-शब्दांमध्यें वकार आदेश होणार नाहीं. आणि जर दोन सूत्रें असतील तर इक्षुमती द्रुमती या ठिकाणींही वकार आदेश होऊं लागेलें.

तुला वाटेल तसें समज. एकच सूत्र असलें तरी हरकत नाहीं.

पण एकच सूत्र केले तर अहीवती कपीवती या ठिकाणीं वकार आदेश कसा होईल ?

हा आचार्य पाणिनी 'अन्तोऽवत्याः' ( ६।१।२२० ) 'ईवत्याः' ( ६।१।२२१ ) अशीं जीं सूत्रें करतो तीं तशीं सूत्रें करण्यानेच तो असें सूचित करतो कीं अशा-तऱ्हेच्या शब्दांमध्यें वकार आदेश होतो.[५]

---

वृद्धीनें आर् आदेश केल्यानंतर ' छन्दसीरः ' ( ८।२।१५ ) या सूत्रानें मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार प्राप्त होतो.

५. तेव्हां मतुप् प्रत्ययान्त पद असा अर्थ न होतां पदाचा अवयव जो मतुप् प्रत्यय असा अर्थ होतो.

१. ( सू. १० ) ज्या शब्दाचा शेवटचा वर्ण झय् असेल त्या शब्दाच्या पुढील मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार होतो.

१. ( सू. ११ ) कोणत्याही संज्ञा शब्दांतील मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार होतो.

१. (सू. १२) आसन्दीवत् वगैरे शब्दांतील मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार होतो. शिवाय हे शब्द सूत्रामध्यें जसे उच्चारले आहेत तसे सिद्ध होण्याकरतां जीं जी कार्यें करावी लागतील तीं ती कार्यें करावी.

२. आसन्दीवत् वगैरे जे संज्ञाशब्द असा अर्थ होईल. त्यामुळे अहीवती वगैरे जे इतर संज्ञा-शब्द त्यांमध्यें वत्व होणार नाही.

३. कारण संज्ञायाम् या पहिल्या सूत्रानें कोणत्याही संज्ञा-शब्दांमध्यें वत्व सांगितलें आहे

४. कारण अहीवती वगैरे शब्दांमध्यें वकार झाला नाहीं तर ' ईवत्याः ' ( ६।१।२२० ) यानें सांगितलेल्या अन्तोदात्त स्वराला उदाहरणच मिळणार नाहीं. आसन्दीवत् वगैरे शब्द स्त्रीलिंगी नसल्यामुळें तेथें ' ईवती ' असें शब्दस्वरूप होत नाहीं.

५. तेव्हां या ज्ञापकानेंच काम भागत असल्यामुळें

अथवा पुनरस्तु नानायोगौ । ननु चोक्तमिक्षुमती द्रुमती अत्रापि प्राप्नोतीति । यवादिषु पाठः करिष्यते ॥

[ उदन्वानुदधौ च ॥ ८।२।१३ ॥
राजन्वान्सौराज्ये ॥ ८।२।१४ ॥ ]
छन्दसीरः ॥ ८ । २ । १५ ॥

छन्दसीर इत्युच्यते तत्र ते विश्वकर्माणं ते सप्तर्षिमन्तमित्यत्रापि प्राप्नोति । नैष दोषः । नैवं विज्ञायते छन्दसि इर इति । कथं तर्हि । छन्दसि ईर इति ॥ एवमपि त्विषीमान् पतीमानित्यत्रापि प्राप्नोति । नैष दोषः । विहितविशेषणमीकारग्रहणम् । ईकारान्ताद्यो विहित इति ॥ एवमपि सूर्यं ते द्यावापृथिवीमन्तमित्यत्रापि प्राप्नोति । इह च न प्राप्नोति त्रिवतीर्याज्यानुवाक्या भवन्तीति ॥ एवं तर्हि परिगणनं कर्तव्यम् । त्रिहर्य्यधिपत्यग्निरे ।

---

तसेंच दोन सूत्रे असलीं तरी हरकत नाहीं.

इक्षुमती द्रुमती या ठिकाणींही वकार आदेश होऊं लागेल असें आतांच सांगितलें आहे ना ?

त्या शब्दांचा यवादिगणामध्ये पाठ करितां येईल.

( सू. १५ ) या सूत्रामध्यें छन्दसि इरः असें म्हटलें आहे तेव्हां पुढील उदाहरण सिद्ध होत नाहीं; ते हें कीं–तत्र ते विश्वकर्माणं ते सप्तर्षिमन्तं या ठिकाणीं देखील सप्तर्षि शब्दाच्या पुढील मकाराला वत्व प्राप्त होतें.

हा दोष येत नाहीं. कारण या सूत्रामध्यें 'छन्दसि इरः' असा पदच्छेद नाहीं.

तर मग येथें कसा पदच्छेद आहे ?

'छन्दसि ईरः' असा पदच्छेद आहे.

असा पदच्छेद केला तरी दुसरीकडे दोष येतोच. त्विषीमान् पतीमान् या ठिकाणींही वत्व होईल.

हा दोष येत नाहीं कारण ईकारग्रहण हें मतुप् प्रत्ययाचें विहित-विशेषण आहे. त्यामुळें 'इकारान्त शब्दाहून केलेला जो मतुप् प्रत्यय' असा येथें अर्थ होतो.

तरी पण दोष येतोच. 'सूर्यं ते द्यावापृथिवीमन्तम्' या ठिकाणींही वत्व प्राप्त होतें. आणि 'त्रिवतीर्याज्यानुवाक्या भवन्ति' या ठिकाणीं वत्व होणार नाहीं

तर मग येथें आतां कांहीं विशेष शब्दच ठरविले पाहिजेत म्हणजे इष्ट असेल तेथें वत्व होईल आणि भलतीकडे होणार नाहीं. त्रि, हरि,

---

संज्ञायाम् या निराळ्या सूत्रानें वत्व सांगण्याची जरूर नाहीं.

१. ( सू. १३ ) समुद्र अर्थ असतांना किंवा संज्ञा गम्यमान असतांना उदक शब्दाच्या पुढील मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार होतो आणि उदक शब्दाला उदन् असा आदेश होतो. उदन्वत् ही एका ऋषीची संज्ञा आहे.

१. ( सू. १४ ) ज्या देशाचा राजा चांगला आहे असा देश हा अर्थ असेल तर राजन् शब्दाच्या पुढील मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार होतो, आणि राजन् शब्दाचा नकार कायम राहतो.

१. ( सू. १५ ) वेदामध्यें इकारान्त किंवा रेफान्त शब्दाच्या पुढील मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वकार होतो.

२. इ आणि र् यांचा द्वंद्व करून त्याचें इरः हें पंचमी एकवचन आहे.

३. येथें ई असा दीर्घ ईकार पाणिनीनें उच्चारला आहे असा अभिप्राय आहे.

४. त्विषि आणि यति अशा ह्रस्व इकारान्त शब्दाहून मतुप् प्रत्यय केल्यानंतर 'अन्येषामपि॰' ( ६।३।१३७ ) या सूत्रानें इकाराला दीर्घ झाला आहे.

५. कारण येथें पृथिवी या दीर्घ ईकारान्त शब्दाहून मतुप् प्रत्यय केला आहे.

६. कारण त्रि हा शब्द दीर्घ ईकारान्त नाहीं.

त्रिवतीर्याज्यानुवाक्या भवन्ति । त्रि । हरि । हरिवो मेदिनं त्वा । हरि । अधिपति । अधिपतिवतीर्जुहोति । अधिपति । अग्नि । चरुरग्निवानिव । अग्नि । रे । आ रेवानेतु नो विश इति ॥ यदि तर्हि परिगणनं क्रियते सरस्वतीवान्भारतीवान् अपूपवान्दधिवांश्चरुरित्यत्र न प्राप्नोति । एवं तर्हि च्छन्दसीरो बहुलमिति वक्तव्यम् ॥

## अनो नुट् ॥ ८ । २ । १६ ॥

यदि पुनरयं नुट् पूर्वान्तः क्रियेत ।

**अनो नुकि विनामरुविधिप्रतिषेधः ॥ १ ॥**

अनो नुकि सति विनामो विधेयः । अक्षण्वान् । पदान्तस्य नेति प्रतिषेधः प्राप्नोति । रुश्च प्रतिषेध्यः । सुपथिन्तरः । नश्छव्यप्रशान् [ ८. ३. ७. ] इति रुः प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि परादिः ।

**परादौ वत्वप्रतिषेधोऽवग्रहश्च ॥ २ ॥**

यदि परादिर्वत्वस्य प्रतिषेधो वक्तव्यः । अक्षण्वान् । मादुपधायाश्च मतोर्वोऽयवादिभ्यः [ ८. २. ९. ] इति वत्वं प्राप्नोति । अवग्रहश्चानिष्टे देशे प्राप्नोति । अक्षण्वान् ॥ अस्तु तर्हि पूर्वान्तः । ननु चोक्तमनो नुकि विनामरुविधिप्रतिषेध इति ।

---

अधिपति, अग्नि आणि रे हे ते शब्द होत.

त्रिवतीर्याज्यानुवाक्या भवन्ति हें त्रि शब्दाचें उदाहरण होय. हरि शब्दाचें उदा०- हरिवो मेदिनं त्वा ( तै. सं. ४।७।१४।४ ). अधिपति शब्दाचें उदा० अधिपतिवतीर्जुहोति. अग्नि शब्दाचें उदा०- चरुरग्निवानिव. रे शब्दाचें उदा०- आ रेवानेतु नो विशः.

हे ठराविक शब्द असतील तरच वत्व होतें असें म्हटलें तर सरस्वतीवान् दधिवान् चरुः या ठिकाणीं वत्व होणार नाहीं. तर मग ‘ छन्दसीरो बहुलम् ’ असें म्हणावें म्हणँजे झालें.

(सू. १६) हा नुडागम जर पूर्वाचा अंतावयव नुक् असा केला तर—

(वा. १) अन् अंतीं असलेल्या शब्दाला नुक् आगम सांगितला तर णत्वाचें विधान केलें पाहिजे. उदा० अक्षण्वान्. नुक् आगम हा पूर्व शब्दाचा अंतावयव होत असल्यामुळें ‘ पदान्तस्य ’ ( ८।४।३७ ) या सूत्रानें णत्वाचा निषेध होऊं लागेल. तसाच रूचा निषेध केला पाहिजे. उदा०- सुपथिन्तरः- येथें ‘ नश्छव्यप्रशान् ’ (८।३।७) या सूत्रानें रुत्व होऊं लागेल.

तर मग परादि ( म्ह. नुट् असा मूळचा पाणिनीनें केला आहे तसाच ) असूं दे.

( वा. २) जर नुट् असा परादि केला तर वत्वाचा निषेध केला पाहिजे. उदा०- अक्षण्वान्. या ठिकाणीं ‘ मादुपधायाश्च० ’ ( ८।२।९ ) या सूत्रानें ( नुडागमाच्या नकाराला ) वत्व होऊं लागेल. शिवाय अक्षण्वान् येथें अवग्रह[२] भलत्या ठिकाणीं ( म्ह. अक्ष येथें ) प्राप्त होतो.

तर मग नुक् असा पूर्वाचाच अंतावयव असूं दे.

पण अन्नन्त शब्दाला नुक् आगम सांगितला तर णत्वाचें विधान केलें पाहिजे आणि रुत्वाचा

---

७. बहुल शब्द उच्चारून जें कार्य सांगितलें जातें तें कार्य इष्ट स्थलीं होतें आणि अनिष्ट स्थलीं होत नाहीं.

१. ( सू. १६ ) अन् अंतीं असलेल्या शब्दाच्या पुढील मतुप् प्रत्ययाच्या मकाराला वेदामध्यें वत्व होतें.

२. वृत्तीमध्यें पूर्वीचे पद केवढें आहे तें दाखविण्याकरितां तें पूर्वीचें पद उच्चारून नंतर थोड्या अवकाशानें पुढील भाग उच्चारतात त्याला अवग्रह म्हणतात. तो येथें अक्षन् याच्या पुढें पाहिजे असा शंकाकाराचा अभिप्राय आहे.

भत्वात्सिद्धम् ॥ ३ ॥

भसंज्ञा वक्तव्या ॥ यदि तर्हि भसंज्ञाल्लोपोऽनः [ ६. ४. १३४ ] इत्यल्लोपः प्राप्नोति।

अनस्तु प्रकृतिभावे मतुब्ग्रहणं छन्दसि ॥ ४ ॥

अनस्तु प्रकृतिभावे मतुब्ग्रहणं छन्दसि वक्तव्यम् ॥ इह तर्हि सुपथिन्तरः नान्तस्य टिस्तद्धिते लुप्यत इति लोपः प्राप्नोति।

घग्रहणं च ॥ ५ ॥

घग्रहणं च कर्तव्यम् ॥

तत्तर्हीदं बहु वक्तव्यम्। नुग्वक्तव्यः। भसंज्ञा च वक्तव्या। अनस्तु प्रकृतिभावे मतुब्ग्रहणं छन्दसि वक्तव्यम्। घग्रहणं च कर्तव्यमिति। न कर्तव्यम्। यत्तावदुच्यते नुग्वक्तव्य इति नुक एष परिहारो भत्वात्सिद्धमिति। भसंज्ञा वक्तव्येति क्रियते न्यास एवायस्मयादीनि च्छन्दसि [ १ .४. २० ] इति। यदप्युच्यतेऽनस्तु प्रकृतिभावे मतुब्ग्रहणं छन्दसि घग्रहणं च कर्तव्यमिति न कर्तव्यम्। उभयसंज्ञान्यपि हि च्छन्दांसि दृश्यन्ते। तद्यथा। स सुष्टुभा स ऋक्वता गणेन।

---

निषेध केला पाहिजे, असें आतांच सांगितलें आहे ना ?

( वा. ३ ) भसंज्ञेमुळें अक्षण्वान् हें उदाहरण सिद्ध होईल. तेथें भसंज्ञा सांगावी.

जर तेथे भसंज्ञा केली तर 'अल्लोपोऽनः' (६।४। १३४ ) या सूत्राने अकाराचा लोप प्राप्त होतो.

( वा. ४ ) जेथें अन् याला प्रकृतिभाव सांगितला आहे त्या ठिकाणीं ( ६।४।१६७ ) 'अनाला मतुप् प्रत्यय पुढें असतांना वेदामध्यें प्रकृतिभाव होतो' असें सांगावें.

तरी पण सुपथिन्तरः या उदाहरणाची वाट काय ? कारण येथें 'नकारान्ताच्या टीचा तद्धित पुढें असताना लोप होतो' ( ६।४।१४४ ) असा सांगितलेला लोप प्राप्त होतो.

(वा.५) घ संज्ञक प्रत्यय पुढें असतांना नकारान्ताला प्रकृतिभाव होतो असे सांगावें.

तर मग एकंदरीत हें बरेंचसें बोलावें लागतें. अगोदर सूत्रामध्यें नुक् असें केलें पाहिजे. नंतर भसंज्ञाही सांगितली पाहिजे. अन् याला मतुप् प्रत्यय पुढें असतांना वेदामध्यें प्रकृतिभाव सांगितला पाहिजे आणि घग्रहण तेथें केलें पाहिजे.

यावर आमचें म्हणणें असें आहे कीं यांपैकीं कांहीं करावयाला नको. अगोदर सूत्रामध्यें नुक् केला पाहिजे असें जें म्हटलें आहे तें कबूल करूनच त्याचा परिहार 'भसंज्ञेमुळें सिद्ध होईल' असा पूर्वीच केला आहे. आतां 'भसंज्ञा सांगितली पाहिजे' असें जें म्हटलें आहे ती भसंज्ञा निराळी सांगावयास नको. कारण आचार्यांनीं 'अयस्मयादीनि च्छन्दसि' ( १।४।२० ) असें सूत्र केलेच आहे. आणखीही जें म्हटलें आहे कीं 'अन् याला मतुप् प्रत्यय पुढें असतांना वेदामध्यें प्रकृतिभाव सांगितला पाहिजे आणि घग्रहणही तेथें केले पाहिजे' तें देखील कांहीं करावयाला नको. कारण भसंज्ञा आणि पदसंज्ञा या दोनही संज्ञा झालेले असे वैदिक प्रयोग दृष्टीस पडतात. उदा०— स सुष्टु-

---

३. अक्षन् याला भ संज्ञा झाली म्हणजे त्या भ संज्ञेनें पदसंज्ञेचा बाध होतो म्हणून 'पदान्तस्य' ( ८।४।३७ ) हा णत्वाचा निषेध होत नाहीं.

४. त्याप्रमाणेंच सुपथिंतरः या उदाहरणामध्यें सुपथिन् याच्या नकाराचा लोप न होण्याकरितां भ संज्ञा मानली तर 'नस्तद्धिते' ( ६।४।१४४ ) या सूत्रानें इन् या टीचा लोप प्राप्त होतो.

५. वैदिक प्रयोगामध्यें जशीं कार्यें झालेलीं दृष्टीस पडतील त्याला अनुसरून त्या त्या कार्यापुरत्याच त्या त्या संज्ञा मानतां येतात.

पदत्वात्कुत्वं भत्वाज्जश्त्वं न भवति । एव- मिहापि पदत्वादल्लोपटिलोपौ न भत्वाद्विना- मरुविधिप्रतिषेधौ भविष्यतः । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं परादौ वत्वप्रतिषेधो ऽवग्रहश्चेति । यत्तावदुच्यते वत्वप्रतिषेध इति निर्दिश्यमा- नस्यादेशा भवन्तीत्येवं न भविष्यति । यस्तर्हि निर्दिश्यते तस्य न प्राप्नोति । किं कारणम् । नुटा व्यवहितत्वात् । असिद्धो नुट् तस्यासिद्धत्वाद्भविष्यति । अवग्रहेऽपि न लक्षणेन पदकारा अनुवर्त्याः पदकारैर्नाम लक्षणमनुवर्त्यम् । यथालक्षणं पदं कर्तव्यम् ॥

## नाद्धस्य[1] ॥ ८ । २ । १७ ॥

### ईद्रथिनः ॥ १ ॥

रथिन ईद्वक्तव्यः । रथीतरः ॥

### भूरिदाव्नस्तुट् ॥ २ ॥

भूरिदाव्नस्तुड्वक्तव्यः । भूरिदावत्तरो जनः ॥

---

भा स ऋक्कता गणेन (तै. सं. २।३।१४।४) येथें ऋक्कता या पदामध्यें पदसंज्ञेमुळें कुत्व झालें आहे, आणि भसंज्ञेमुळें[6] जश्त्व झालें नाहीं. त्या- प्रमाणे येथेंही पदसंज्ञेमुळें[7] अकाराचा लोप आणि टिलोप होणार नाहींत. आणि भसंज्ञे- मुळें णत्व होईल व रुत्वाचा निषेध होईल.

याप्रमाणें सर्वच सिद्ध होतें हें खरें आहे. परंतु सूत्र फिरवावें लागणार आहे.

तर मग ' अनो नुट् ' असें मूळचें सूत्र जसें आहे तसेंच असूं दे.

नुट् असा परादि केला तर त्या नका- राला वत्व होईल त्याचा निषेध केला पाहिजे, आणि अवग्रह भलत्या ठिकाणीं होईल त्याचा परिहार केला पाहिजे.

वत्वाचा निषेध केला पाहिजे असें जें म्हटलें आहे तें म्हणावयास नको. कारण ' निर्दिश्य- मानस्याऽऽदेशा भवन्ति '[9] या परिभाषेनें नका- राला वत्व होणार नाहीं.

तर मग सूत्रामध्यें जो निर्दिष्ट म्ह. मकार त्यालाही वत्व होणार नाहीं.

कां बरें ?

नुटानें व्यवधान येत आहे म्हणून.

वत्वाच्या दृष्टीनें नुट् आगम असिद्ध आहे. तो असिद्ध असल्यामुळें त्याच्या पूर्वीच मका- राला वत्व होईल. अवग्रहासंबधानें सुद्धां विचार केला असतां असें सिद्ध होतें कीं शास्त्रानें पद- कारांचें अनुसरण केलें पाहिजे असें नाहीं. उलट पदकारांनींच शास्त्राचें अनुसरण केलें पाहिजे. तेव्हां शास्त्र संभाळूनच पदकारांनीं अवग्रहामध्यें पद दाखविलें[10] पाहिजे.

(सू.१७ वा.१) घसंज्ञक प्रत्यय पुढें असतांना रथिन् शब्दाच्या नकाराला ईकार आदेश होतो असें म्हणावें. उदा०— रथीतरः

(वा.२) भूरिदावन् शब्दाच्या पुढील घसंज्ञक प्रत्ययाला तुट् असा आगम होतो असें बोलावें. उदा०—भूरिदावत्तरो[2] जनः.

---

६. जश्त्वाचे वेळी भ संज्ञेनें पदसंज्ञेचा बाध होत असल्यामुळें.

७. अकाराचा लोप आणि टिलोप कर्तव्य असतांना पदसंज्ञेची बाधक भ संज्ञा न मानल्यामुळें.

८. भ संज्ञेनें पदसंज्ञेचा बाध केल्यामुळें.

९. ' निर्दिश्यमानस्य०' या परिभाषेचा अर्थ पूर्वी ( ६।४।१३० ) पहावा.

१०. अक्षण्वान् या उदाहरणामध्यें अवग्रह कर- तांना पदकारांनी ' अक्ष ' हें अकारान्तच पद दाख- वावें असें सिद्ध झालें.

१. ( सू. १७ ) नकारान्त शब्दाच्या पुढील घ- संज्ञक म्ह० तरप् आणि तमप् या प्रत्ययांना नुट् असा आगम होतो. उदा० सुपथिन्तरः.

२. येथें तरप् प्रत्ययाला तुट् आगम झाल्यानंतर

## कृपो रो लः ॥ ८ । २ । १८ ॥

कृपणादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । कृपणः कृपाणः कृपीटम् ॥

वालमूललघ्वलमङ्गुलीनां वा लो रमापद्यत इति वक्तव्यम् । अश्ववालः अश्ववारः । मूलदेवः मूरदेवः । वरुणस्य लघुस्यदः वरुणस्य रघुस्यदः । अलं भक्ताय अरं भक्ताय । सुबाहुः स्वङ्गुलिः सुबाहुः स्वङ्गुरिः ॥

संज्ञाछन्दसोर्वा कपिलकादीनामिति वक्तव्यम् । कपिरकः कपिलकः । तिल्विरीकः तिल्विलीकः । रोमाणि लोमानि । पांसुरम् पांसुलम् । कर्म कल्म । शुक्रः शुक्लः ॥

## उपसर्गस्यायतौ ॥ ८ । २ । १९ ॥

किमिदमयतिग्रहणं रेफविशेषणम् । अयतिपरस्य रेफस्य लो भवति स चेदुपसर्गस्य भवतीति । आहोस्विदुपसर्गविशेषणम् । अयतिपरस्योपसर्गस्य यो रेफस्तस्य लो भवतीति । कश्चात्र विशेषः ।

### रेफस्यायताविति चेत्परेरुपसंख्यानम् ॥ १ ॥

रेफस्यायताविति चेत्परेरुपसंख्यानं कर्तव्यम् । पल्ययते । वचनाद्भविष्यति । अस्ति

---

( सू. १८ ) कृपण वगैरे शब्दांमध्यें लत्व होत नाहीं असें म्हणावें. उदा०— कृपणः कृपाणः कृपीटम्.

वाल, मूल, लघु, अलम्, अङ्गुलि या शब्दांमधील लकाराला रेफ आदेश विकल्पानें होतो असें म्हणावें. वाल शब्दाचें उदा०— अश्ववालः अश्ववारः. मूल शब्दाचें उदा०—मूलदेवः मूरदेवः. लघु शब्दाचें उदा०—वरुणस्य लघुस्यदः, वरुणस्य रघुस्यदः. अलम् शब्दाचे उदा०— अलं भक्ताय अरं भक्ताय. अङ्गुलिशब्दाचें उदा० सुबाहुः स्वङ्गुलिः सुबाहुः स्वङ्गुरिः.

संज्ञा गम्यमान असतांना किंवा वेदामध्यें कपिलक वगैरे शब्दांमध्यें लकाराला रेफ आदेश विकल्पानें होतो असें सांगावें. उदा०— कपिलकाः कपिरकाः, तिल्पिलिकम् तिल्पिरिकम्, कल्मषम् कर्मषम् , लोमानि रोमाणि, पांसुलम् पांसुरम्, कल्म कर्म, शुक्लः शुक्रः.

(सू. १९) या सूत्रामध्यें अयतौ हें जें पद आहे तें काय रेफाचे विशेषण आहे कीं जे केल्यानें 'अय् धातू ज्याच्या पुढें आहे अशा रेफाला लकार होतो तो रेफ उपसर्गाचा असेल तर ' असा अर्थ होईल ? अथवा तें उपसर्गाचें विशेषण आहे कीं जें केल्यानें ' अय् धातु ज्याच्या पुढें आहे असा जो उपसर्ग त्याच्या रेफाला लकार होतो ' असा अर्थ होईल ?

काय बरें या दोन अर्थांमध्ये फरक आहे ?

(वा. १) अयतौ हे रेफाचे विशेषण केले तर परि या उपसर्गांतील रेफाला लत्व होतें असें म्हणावें लागेल. उदा०— पल्ययते.

सूत्राला उदाहरण मिळालें पाहिजे म्हणून येथें लत्वं होईल.

सूत्राला उदाहरण दुसरीकडे मिळते. उदा०

---

हरिदावन् शब्दाच्या नकाराचा ' नलोपः० ' ( ८।२।७ ) यानें लोप होतो.

१. ( सू. १८ ) कृप् धातूच्या रेफाला लकार होो आणि कृप् धातूच्या ऋकारामध्यें जो रेफासारखा भाग आहे त्याला लकारासारखा भाग होतो.

१. ( सू. १९ ) अय् धातू पुढें असतांना उपसर्गाच्या रेफाला लकार होतो.

२. परि अयते या ठिकाणीं परि या उपसर्गांतील इकाराला ' इको यणचि ' ( ६।१।७७ ) यानें यकार झाला आहे. रेफ आणि अय् धातू यांमध्यें त्या यकारानें व्यवधान होत असल्यामुळें लत्व होणार नाहीं.

३. सूत्रसामर्थ्यास्तव एका वर्णानें व्यवधान असलें तरी चालेल.

वचने प्रयोजनम् । किम् । प्लायते पलायते ॥ अस्तु तर्ह्युपसर्गविशेषणम् ।

**उपसर्गस्येति चेदेकादेशेऽप्रसिद्धिः ॥२॥**

उपसर्गस्येति चेदेकादेशेऽप्रसिद्धिर्भवति । प्लायते पलायते । एकादेशे कृते व्यपवर्गाभावान्न प्राप्नोति । अन्तादिवद्भावेन व्यपवर्गः । उभयत आश्रये नान्तादिवत् । एवं तर्ह्येकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद्व्यपवर्गः । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावः पूर्वत्रासिद्धे न स्थानिवदिति । दोषा एवैते तस्याः परिभाषायास्तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेष्विति ॥

अथवा पुनरस्तु रेफविशेषणम् । ननु चोक्तं रेफस्यायताविति चेत्परेरुपसंख्यानमिति । वचनाद्भविष्यति । ननु चोक्तमस्ति वचने प्रयोजनम् किम् प्लायते पलायत इति । अत्राप्यकारेण व्यवहितत्वान्न प्राप्नोति । एकादेशे कृते नास्ति व्यवधानम् । एका-

---

प्लायते, पलायते.

तर मग अयतौ हें उपसर्गाचें विशेषण असूं दे.

(वा. २) उपसर्गाचें विशेषण केलें तर ज्या ठिकाणीं एकादेश होतो तेथें लत्व सिद्ध होणार नाहीं. उदा० – प्लायते, पलायते. येथे एकादेश केल्यानंतर उपसर्ग आणि धातु यामध्यें पौर्वापर्य बरोबर दाखवितां येत नसल्यामुळें ' अय् धातु पुढें असतांना ' असें निमित्त धरून सांगितलेलें लत्व होणार नाहीं.

वास्तविक पौर्वापर्य नसलें तरी ' अन्तादिवच्च ' ( ६।१।८५ ) या अतिदेशानें ' पौर्वापर्य आहे ' असें मानतां येईल.

' अन्तादिवच्च ' ह्या अतिदेशाची एकदम दोन्ही भागामध्यें जरूर असेल तर तो अतिदेश प्रवृत्त होत नाहीं.

तर मग एकादेश हा पूर्वाला विधि कर्तव्य असतांना स्थानीसारखा समजला जातो ( १।१।५१ ) असा हा स्थानीसारखा समजला गेल्यामुळें उपसर्ग आणि अय् धातु यांमध्यें पौर्वापर्य आहे असें मानतां येईल.

पण येथे 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' म्ह. त्रिपादींतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा निषेध आहे ना ?

हा निषेध येथे प्रवृत्त होत नाहीं. कारण ' तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु ' असें हे त्या परिभाषेचे संयोगादिलोप लत्व आणि णत्व या तीन ठिकाणीं दोष येतातच. तेव्हां येथें स्थानिवद्भाव होतो असेंच मानावें लागतें.

किंवा आता अयतौ हें रेफाचें विशेषण केलें तरी हरकत नाहीं.

' अयतौ हें रेफाचें विशेषण केलें तर परि या उपसर्गांतील रेफाला लत्व होतें असें म्हणावें लागेल ' असें पूर्वी सांगितलें आहे ना ?

पण सूत्राला उदाहरण मिळालें पाहिजे म्हणून तेथें लत्व होईल.

' सूत्राला उदाहरण प्लायते, पलायते येथें मिळतें ' असेंही पूर्वी सांगितलें आहे.

तेथेंहीं रेफ आणि अय् धातु यांमध्यें अकारानें व्यवधान होत असल्यामुळें लत्व प्राप्त होत नाहीं.

एकादेश केल्यानंतर व्यवधान नाहीं.

---

४. येथें प्र अयते अशी स्थिति असतांना ' अकः सवर्णे०' ( ६।१।१०१ ) यानें दीर्घ एकादेश झाल्यानंतर ' अन्तादिवच्च ' ( ६।१।८५ ) यानें परादिवद्भावानें आय् हा अय् धातु समजला जातो. तेव्हां तेथें रेफ आणि अय् धातु यांमध्यें व्यवधान नाहीं.

५. तेव्हां प्लायते येथें लत्व कर्तव्य असतांना 'अचः परस्मिन्०' ( १।१।५७ ) या सूत्राने एकादेश हा स्थानीसारखा समजल्यामुळें उपसर्ग आणि अय् धातु, यांमध्यें एकादेश करण्यापूर्वी जसें पौर्वापर्य होतें तसें एकादेश झाल्यानंतरही मानतां येतें. तेव्हां लत्व सिद्ध होईल.

देशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावः पूर्वत्रासिद्धे न स्थानिवदिति । दोषा ह्येते तस्याः परिभाषायास्तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेष्विति ॥

**[ ग्रो यङि ॥ ८ । २ । २० ॥ ]**

**अचि विभाषा ॥ ८ । २ । २१ ॥**

णावुपसंख्यानं कर्तव्यम् । इहापि यथा स्यात् । निगार्यते निगाल्यते । किं पुनः कारणं न सिध्यति । अचीत्युच्यते । न चात्राजादिं पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् । एवं तर्हि स्थानिवद्भावाद्भविष्यति । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावः पूर्वत्रासिद्धे न स्थानिवदिति ॥ अत उत्तरं पठति ।

**गिरतेर्लत्वे णावुक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेष्विति ॥

---

एकादेश हा पूर्वाला विधि कर्तव्य असतांना स्थानीसारखा समजला जातो (१।१।५७) असा तो स्थानीसारखा समजल्यामुळें व्यवधान आहेच.

पण येथें ' त्रिपादीमधील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं ' असा स्थानिवद्भावाचा निषेध आहे ना ?

हा निषेध येथें प्रवृत्त होत नाहीं. कारण ' तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु ' असें हे या परिभाषेचे संयोगादिलोप लत्व आणि णत्व या तीन ठिकाणीं दोषच आहेत. तेव्हां येथें स्थानिवद्भाव होतो असेंच मानावें लागतें.[१]

( सू. २१ ) णिच् प्रत्यय पुढें असतांना गॄ धातूच्या रेफाला लत्व विकल्पानें होतें असें सांगावें. कारण निगार्यते निगाल्यते या उदाहरणांमध्येंही लत्व झालें पाहिजे.

पण येथें सूत्रानें लत्व सिद्ध होत नाहीं याचें काय बरें कारण असावें ?

सूत्रामध्यें ' अचि ' असें म्हटलें आहे आणि येथें तर अजादिप्रत्यय मुळींच दिसत नाहीं.[२] प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) अजादिप्रत्यय पुढें आहे असें म्हणतां येईल.

वर्णाच्या निमित्तानें कार्य कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं, असा त्याचा निषेध आहे.

तर मग येथें स्थानिवद्भावानें ( १।१।५७ ) लत्व होईल.

' त्रिपादींतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं ' असा त्याचा येथें निषेध प्राप्त होत आहे ना ?

यानंतर ( वार्तिककार ) म्हणतात—

( वा. १ ) णिच् प्रत्यय पुढें असतांना गॄ धातूच्या रेफाला लत्वाविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

संयोगादिलोप लत्व आणि णत्व या तीन ठिकाणीं ' त्रिपादीतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं ' याला दोष येतो तेव्हां त्या तीन ठिकाणीं तो स्थानिवद्भावाचा निषेध प्रवृत्त होत नाहीं.

---

१. तेव्हां पल्ययते या उदाहरणामध्यें रेफ आणि अय् धातु यांमध्यें यकारानें व्यवधान आहे. आणि प्लायते येथें स्थानिवद्भाव झाल्यामुळें अकारानें व्यवधान होत आहे. तेव्हां सूत्राला उदाहरण मिळावें म्हणून फाइलाजास्तव एका वर्णानें व्यवधान खपतें असें सांगितल्यानें सर्व उदाहरणें सिद्ध होतील.

१. ( सू. २० ) यङ् प्रत्यय पुढें असतांना गॄ धातूच्या रेफाला लत्व होतें.

१. ( सू. २१ ) अजादि प्रत्यय पुढें असतांना गॄ धातूच्या रेफाला विकल्पानें लत्व होतें.

२. कारण णिच् प्रत्ययाचा ' णेरनिटि ' ( ६।४।५१ ) यानें लोप झाला आहे.

**परेश्च घाङ्कयोः ॥ ८ । २ । २२ ॥**

योगे चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । परियोगः पलियोगः ॥

**सङि लत्वसलोपसंयोगादिलोपकुत्वदीर्घत्वानि ॥ १ ॥**

सङीति प्रकृत्य लत्वसलोपसंयोगादिलोपकुत्वदीर्घत्वानि वक्तव्यानि ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं गिरौ गिरः पयो धावति द्विष्टराम् दृषत्स्थानम् काष्ठशक्स्थाता क्रुञ्चा धुर्य इति ॥ २ ॥**

गिरौ गिर इत्यत्राचि विभाषा [८.२.२१] इति लत्वं प्राप्नोति सङीति वचनान्न भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । उक्तमेतद्धातोः स्वरूपग्रहणे तत्प्रत्यये कार्यविज्ञानात्सिद्धमिति ॥ पयो धावतीत्यत्र धि च [२५] इति सलोपः प्राप्नोति सङीति वचनान्न भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । वक्ष्यत्येतद्धि सकारे सिचो लोप इति ॥ द्विष्टरामित्यत्र ह्रस्वादङ्गात् [२७] इति सलोपः प्राप्नोति सङीति वचनान्न भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अत्रापि सिच इत्येवानु-

---

( सू. २२ ) योग शब्द पुढें असतांना परि शब्दांतील रेफाला लत्व विकल्पानें होतें असें सांगावें. कारण परियोगः पलियोगः येथें विकल्पानें लत्व झालें पाहिजे.

(वा. १) लत्व, सलोप, संयोगादि लोप, कुत्व आणि दीर्घ हे विधी 'सङि'² असें म्हणून सांगावेत.

तसें म्हणण्याचें प्रयोजन काय ?

गिरौ गिरः, पयो धावति, द्विष्टराम्, द्विषत्स्थानम्, काष्ठशक्स्थाता, क्रुञ्चा, धुर्यः इत्यादि ठिकाणीं त्याचा उपयोग आहे. गिरौ गिरः या उदाहरणामध्यें 'अचि विभाषा' ( ८।२।२१ ) या सूत्रानें रेफाला लत्व प्राप्त होतें. तें सङि असें म्हटल्यामुळें होत नाहीं.

वास्तविक विचार केला तर येथें 'सङि' याचा कांहीं उपयोग नाहीं. पूर्वी ( ७।२।१४ ) सांगितलेंच आहे कीं धातूचें विशेष स्वरूप उच्चारून सांगितलेलें कार्य धातूला लागणारा प्रत्यय पुढें असतानाच होतें, त्यामुळें हें सिद्ध होतें.

पयो धावति या उदाहरणामध्यें 'धि च' ( ८।२।२५ ) या सूत्रानें सकाराचा लोप प्राप्त होतो. तो सङि असें म्हटल्यामुळें होत नाहीं.

हा देखील उपयोग आहे असें म्हणतां येत नाहीं. 'कारण 'धि च' या सूत्रानें सिचाचाच लोप होतो' असें तेथे म्हटलेंच आहे.

द्विष्टराम् या उदाहरणामध्यें 'ह्रस्वादङ्गात्' ( ८।२।२७ ) या सूत्रानें सुच् प्रत्ययाचा लोप प्राप्त होतो, तो सङि असें म्हटल्यामुळें होत नाहीं.

हा देखील उपयोग आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण तेथेंही 'धि च' ( ८।२।२५ ) या सूत्रांतून 'सिचः' या पदाचा संबंध करतां येईल.

---

१. ( सू. २२ ) घ शब्द किंवा अङ्कशब्द पुढें असतांना परि या शब्दांतील रेफाला विकल्पानें लत्व होतें.

२. 'गुप्तिज्किद्भ्यः सन्' ( ३।१।५ ) या सूत्रांतील सन् प्रत्ययाच्या 'स' या अक्षराला प्रारंभ करून 'तिप्तस्झि०' (३।४।७८ ) या सूत्रांतील महिङ् प्रत्ययाच्या ङकारापर्यंत 'सङ्' हा प्रत्याहार आहे. या प्रत्याहारामध्यें धातूहून सांगितलेले सर्व प्रत्यय येतात. प्रातिपदिकाहून सांगितलेले सुप्-प्रत्यय स्त्री-प्रत्यय आणि तद्धित-प्रत्यय हे या प्रत्याहारामध्यें येत नाहीत.

३. प्रथमा द्वितीया वगैरे विभक्ति प्रत्यय हे सङ् प्रत्याहारापैकी नव्हेत. ते प्रातिपदिकाहून सांगितले आहेत.

वर्तिष्यते ॥ दृषत्स्थानमित्यत्र झलो झलि [२६] इति सलोपः प्राप्नोति सङीति वचनान्न भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अत्रापि सिच इत्येवानुवर्तिष्यते ॥ काष्ठशक्स्थातेत्यत्र स्कोः संयोगाद्योरन्ते च [ २९ ] इति ककारलोपः प्राप्नोति सङीति वचनान्न भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । काष्ठशगेव नास्ति कुतो यः काष्ठशकि तिष्ठेत् ॥ क्रुञ्चेत्यत्र चोः कुः [ ३० ] झलीति कुत्वं प्राप्नोति सङीति वचनान्न भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । ऋत्विग्दधृक्स्रग्दिगुष्णिगञ्चुयुजिक्रुञ्चाम् [ ३. २. ५९ ] इति ॥ धुर्य इत्यत्र हलि च [ ८. २. ७७ ] इति दीर्घत्वं प्राप्नोति सङीति वचनान्न भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । न भकुर्छुराम् [ ७९ ] इति प्रतिषेधो भविष्यति ॥

## [१]संयोगान्तस्य लोपः ॥ ८ । २ । २३ ॥

### संयोगान्तस्य लोपे यणः प्रतिषेधः ॥ १ ॥

संयोगान्तस्य लोपे यणः प्रतिषेधो

---

दृषत्स्थानम् या उदाहरणामध्यें ‘ झलो झलि ’ ( ८।२।२६ ) या सूत्रानें स्था धातूच्या सकाराचा लोप प्राप्त होतो तो ‘ सङि ’ असें म्हटल्यामुळे होत नाहीं.

हा देखील उपयोग आहे असे म्हणतां येत नाही. कारण येथे देखील ‘ सिचः ’ या पदाची अनुवृत्ति करतां येईल.

काष्ठशक्स्थाता येथें शक् धातूंतील ककाराचा ‘ स्कोः संयोगाद्योः० ’ ( ८।२।२९ ) यानें लोप प्राप्त होतो तो सङि असें म्हटल्यामुळें होत नाहीं.

हा देखील उपयोग आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण काष्ठशकच अगोदर नाहीं. मग त्या काष्ठशकामध्यें दुसरा कसा राहील ?

क्रुञ्चा या उदाहरणामध्यें ‘ चोः कुः ’ ( ८।२।३० ) या सूत्रानें चकार हा झल् पुढें असल्यामुळें ञकाराला कुत्व प्राप्त होतें तें ‘ सङि ’ असें म्हटल्यामुळें होत नाहीं.

हा देखील उपयोग आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण निपातनामुळेंच हें उदाहरण सिद्ध होत आहे.

निपातन कोणतें ?

‘ ऋत्विग्दधृक्स्रग्दिगुष्णिगञ्चुयुजिक्रुञ्चां च ’ ( ३।२।५९ ) या सूत्रामध्यें पाणिनीनें क्रुञ्च असें कुत्व न करतां उच्चारलें आहे, तें निपातन होय.

धुर्यः या उदाहरणामध्यें ‘ हलि च ’ ( ८।२।७७ ) या सूत्राने दीर्घ प्राप्त होतो, तो सङि असें म्हटल्यामुळे होत नाहीं.

हा देखील उपयोग आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण तेथें ‘न भ कुर्छुराम् ’ (८।२।७९ ) या सूत्रानें दीर्घाचा निषेध होईल.

(सू. २३ वा. १) हा जो संयोगाच्या अंताचा

---

४. शक् वगैरे ककारान्त धातूंहून क्विप् प्रत्यय केलेले असे प्रयोग दृष्टीस पडत नाहींत. तेव्हां काष्ठशक् हाच शब्द जर सिद्ध होत नाही तर मग त्या काष्ठशकामध्यें राहणारा या अर्थी त्या काष्ठशक् शब्दाचा स्थाना या शब्दाशीं संबंध कसा संभवेल ?

५. धातूचा उपदेश करतांना क्रुन्च् असा नकारघटित च धातू पाणिनीनें उच्चारला आहे. तेथें ‘मूळचा नकार असून त्याला अनुस्वार व परसवर्ण होऊन ञकार झाला आहे’ असें समजूं नये. कारण तसें मानलें तर क्रुञ्च्यात या उदाहरणामध्यें ‘ अनिदिताम्० ’ ( ६।४।२४ ) या सूत्रानें त्या नकाराचा लोप होऊं लागेल.

१. (सू.२३) ज्या पदाच्या अंतीं संयोग आहे त्या

वक्तव्यः । दध्यत्र मध्वत्रेति ॥

संयोगादिलोपे च यणः प्रतिषेधो वक्तव्यः । काक्यर्थम् वास्यर्थम् ॥

**न वा झलो लोपात् ॥ २ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । झलो लोपात् । झलो लोपः संयोगान्तलोपो वक्तव्यः ॥

**बहिरङ्गलक्षणत्वाद्वा ॥ ३ ॥**

अथवा बहिरङ्गो यणादेशोऽन्तरङ्गो लोपोऽसिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**संयोगान्तलोपे सग्रहणम् ॥ ४ ॥**

संयोगान्तलोपे सग्रहणं कर्तव्यम् । संयोगान्तलोपः सस्य चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । श्रेयान् भूयान् ज्यायान् ॥ किं पुनः कारणं न सिध्यति । परत्वाद्रुः प्राप्नोति । असिद्धो रुस्तस्यासिद्धत्वाल्लोपो भविष्यति । न सिध्यति । किं कारणम् ।

**रुविधानस्यानवकाशत्वात् ॥ ५ ॥**

अनवकाशो रुर्लोपं बाधेत ॥ सावकाशो

---

लोप सांगितला आहे तो यणाचा होत नाहीं असा निषेध सांगावा. उदा० दध्यत्र मध्वत्र.

संयोगाच्या आदीचा जो लोप सांगितला[2] आहे तो देखील त्या संयोगाच्या शेवटीं यण् असेल तर होत नाहीं, असा निषेध सांगावा.

कशाकरितां ?

काक्यर्थम् वास्यर्थम् या उदाहरणांमध्यें ककार आणि सकार यांचा लोप न व्हावा याकरितां.

(वा. २) अथवा हा निषेध सांगण्याचें कारण नाहीं.

कां बरें ?

संयोगाच्या अंताचा जो लोप सांगितला आहे तो झलाचाच[3] सांगावा.

(वा. ३) अथवा दध्यत्र वगैरे उदाहरणांमध्यें जो अत्र वगैरे दुसऱ्या पदाच्या निमित्तानें यण् आदेश झाला आहे तो बहिरंग आहे आणि लोप अंतरंग[4] आहे. तेव्हां अंतरंग शास्त्र कर्तव्य असतांना बहिरंगशास्त्र असिद्ध होतें म्हणून लोप होणार नाहीं.

(वा. ४) संयोगान्त-लोप सांगितला आहे तेथें स-ग्रहण करावें, म्ह. संयोगाच्या अंताचा लोप होतो, आणि संयोगाचा अंत अशा सकाराचा लोप होतो असें निराळें सांगावें. कारण श्रेयान् भूयान् ज्यायान् या ठिकाणींही सकाराचा लोप झाला पाहिजे.

पण या उदाहरणामध्यें सकाराचा लोप कां बरें होणार नाहीं ?

सकाराच्या लोपाचा परत्वास्तव बाध करून रुत्व प्राप्त होतें.

रुत्व असिद्ध आहे. तेव्हां तें असिद्ध असल्यामुळें अगोदरच सकाराचा लोप होईल.

अगोदर सकाराचा लोप होणार नाहीं.

का बरें ?

(वा. ५) रुत्वाला कोठेंही चारितार्थ्य नाहीं म्हणून अचरितार्थ असें हे रुत्व लोपाचा बाध करील.

पण रुत्वाला दुसरीकडे चारितार्थ्य आहे ना ?

---

पदांतील शेवटच्या व्यंजनाचा लोप होतो.

२. ' स्कोः संयोगाद्योः० ' ( ८।२।२९ ) या सूत्रानें.

३. झलो झलि ( ८।२।२६ ) या पुढील सूत्रांतील ' झलः ' या पदाचा येथें संबंध करून संयोगाच्या शेवटीं असलेल्या झलाचा लोप होतो असा सूत्रार्थ केला म्हणजे अर्थात् यणाचा लोप होणारच नाहीं.

४. ' अत्र ' या पुढील पदाची लोपाला गरज नसल्यामुळें लोप अंतरंग आहे.

रुः । कोऽवकाशः । पयः शिरः । ननु चात्रापि जश्त्वं प्राप्नोति । स यथैव रुर्जश्त्वं बाधत एवं लोपमपि बाधेत । न बाधते । किं कारणम् । येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्ते जश्त्वे रुरारभ्यते लोपे पुनः प्राप्ते चाप्राप्ते च ॥

योगविभागात्सिद्धम् ॥ ६ ॥

अथवा योगविभागः करिष्यते । एवं वक्ष्यामि । संयोगान्तस्य लोपोऽरात् । संयोगान्तस्य लोपो भवत्यरात् । ततः सस्य । सस्य च लोपो भवति संयोगान्तस्य । किमर्थं पुनरिदमुच्यते । प्रतिषिद्धार्थं रुबाधनार्थं च ॥ अथवा यदेतद्रात्सस्येति सग्रहणं तत्पुरस्तादपकक्ष्यते । संयोगान्तस्य लोपः । ततः सस्य । सस्य च संयोगान्तस्य लोपो भवति । ततो रात् । रात्सस्यैव संयोगान्तस्य

---

तसें उदाहरण कोणतें ?

पयः[५], शिरः.

येथें देखील सलोपाच्या ऐवजीं जश्त्व प्राप्त होत आहे. तेव्हां येथें जसें रुत्व हें जश्त्वाचा बाध करतें तसे श्रेयान् वगैरे उदाहरणांमध्यें सलोपाचा बाध करील.

पण रुत्वानें सलोपाचा बाध होत नाहीं.

कां बरें ?

ज्या कार्याची अपवादस्थलीं सर्वत्र प्राप्ति येते त्या कार्याचा अपवादशास्त्रानें बाध होतो. येथें रुत्वाच्या सर्व उदाहरणांमध्यें जश्त्व प्राप्त होत असून तेथें मुद्दाम रुत्व सांगितलें आहे. सकाराचा लोप हा जश्त्वाप्रमाणेंच सर्वत्र प्राप्त होत नाहीं. रुत्वाच्या उदाहरणामध्यें कांहीं ठिकाणीं तो प्राप्त होतो व कांहीं ठिकाणीं तो प्राप्त होत नाहीं[६].

( वा. ६ ) अथवा सकाराचा लोप मुद्दाम निराळा सांगावयास नको. पुढें दिल्याप्रमाणें सूत्रांचा विभाग करतों. 'संयोगान्तस्य लोपोऽरात्' असें एक सूत्र करावें. त्याचा अर्थ—संयोगाच्या शेवटच्या वर्णाचा लोप होतो, तो शेवटचा वर्ण रेफाच्या[७] पुढें नसावा. त्यानंतर 'सस्य' हें दुसरें सूत्र करावें. त्याचा अर्थ—संयोगाच्या शेवटच्या सकाराचा लोप होतो.

हें दुसरें सूत्र कशाकरितां ?

अशाकरितां हें दुसरें सूत्र केलें आहे कीं—पूर्व-सूत्रामध्यें रेफाच्या पुढील वर्णाच्या लोपाचा निषेध केला आहे. परंतु तो वर्ण सकार असेल तर त्या निषेधाला बाजूला सारून त्याचा लोप झाला पाहिजे आणि रुत्वाचा बाध झाला पाहिजे.

अथवा सूत्राचा विभाग निराळ्या प्रकारचा करूं नये. 'रात्सस्य' ( ८।२।२४ ) या पुढील सूत्रांत जें सस्य हें पद आहे त्याचा या सूत्रामध्यें संबंध करावा. आणि संयोगान्तस्य लोपः याचा एक वाक्यार्थ करून 'सस्य' याचा स्वतंत्र वाक्यार्थ करावा. तो असा कीं—संयोगाच्या अंतीं असलेल्या सकाराचा लोप होतो.[८] त्यानंतर 'रात्सस्य' याचा अर्थ रेफाच्या पुढें आणि संयोगाच्या अंतीं असलेल्या वर्णाचा जर लोप होईल तर फक्त सकाराचाच करावा.

---

५. पयस् शब्दाच्या पुढील प्रथमा एकवचन सु प्रत्ययाचा 'स्वमोर्नपुं०' ( ७।१।२३ ) यानें लुक् झाल्यानंतर एकच सकार असल्यामुळे तेथें संयोग होत नाहीं. त्यामुळें 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्राची प्राप्ति येत नाहीं. म्हणून तेथें रुत्वाला चारितार्थ्य येतें.

६. तेव्हां रुत्वानें सलोपाचा बाध होत नसल्यामुळें श्रेयान् वगैरे उदाहरणें सिद्ध होतील. तेव्हां सकाराचा निराळा लोप सांगण्याचें कारण नाहीं.

७. तेव्हां 'रात्सस्य' या नियमाचा उपयोग 'अरात्' या म्हणण्यानेंच भागत आहे.

८. हा सकाराचा लोप मुद्दाम निराळा सांगितला असल्यामुळें श्रेयान् वगैरे उदाहरणांमध्यें रुत्वाचा बाध करून हा लोप होईल.

लोपो भवति ॥ अथवा रात्सस्येत्यत्र संयोगान्तस्य लोप इत्येतदनुवर्तिष्यते ॥

[ रात्सस्य ॥ ८।२।२४ ॥ ]

धि च ॥ ८ । २ । २५ ॥

धि सकारे सिचो लोपः

धि सकारे सिचो लोपो वक्तव्यः । किं प्रयोजनम् ।

चकाद्धीति प्रयोजनम् ।

इह मा भूत् । चकाद्धि पलितं शिरः ॥ यदि तर्हि सिचो लोप इत्युच्यत

आशाध्वं तु कथं ते स्यात्

आशाध्वमित्यत्र न प्राप्नोति ॥

जश्त्वं सस्य भविष्यति ॥ १ ॥

जश्त्वमत्र सकारस्य भविष्यति ॥

सर्वत्रैवं प्रसिद्धं स्यात्

सर्वत्रैव जश्त्वेन सिद्धं स्यात् । इहापि

---

अथवा 'रात्सस्य' या सूत्रामध्यें 'संयोगान्तस्य लोपः' याचा संबंध करावा आणि त्याचा 'संयोगाच्या अंतीं असलेल्या सकाराचा लोप होतो' असा स्वतंत्र वाक्यार्थ करावा.

(सू. २५ वा. १) धकार पुढें असतांना जो हा सकाराचा लोप सांगितला आहे तो सिच् प्रत्ययाचाच होतो असें म्हणावें.

त्याचा काय उपयोग ?

चकाद्धि येथें सकाराचा लोप न झाला पाहिजे. उदा० चकाद्धि पलितं शिरः ।

जर सिच् प्रत्ययाच्याच सकाराचा लोप होतो असें म्हटलें तर आशाध्व हें उदाहरण कसें साधेल ? आशाध्वम् येथें शास् धातूच्या सकाराचा लोप होणार नाहीं.

आशाध्वम् या उदाहरणामध्यें सकाराला 'झलां जश् झशि' (८।४।५३) या सूत्रानें जश्त्व होईल.

(वा. २) याप्रमाणें सर्व ठिकाणींच जश्त्वानें इष्ट रूप सिद्ध होईल.

आयन्ध्वम् अरन्ध्वम् हीं उदाहरणें देखील जश्त्वानेंच सिद्ध होतात.

---

१. (सू. २४) रेफाच्या पुढें असलेल्या वर्णाचा जर 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप होईल तर तो फक्त सकाराचाच करावा. म्हणजे रेफाच्या पुढें असलेल्या इतर वर्णाचा करूं नये.

१. (सू. २५) धकार आरंभीं असलेला असा प्रत्यय पुढें असतांना सकाराचा लोप होतो.

२. 'हे मस्तका' पिकलेल्या केसाचें असें तूं झळकत आहेस.' असा या वाक्याचा अर्थ आहे. चकास् धातूहून लोट् प्रत्यय, त्याचें स्थानीं मध्यमपुरुष एकवचन सिप् प्रत्यय, त्याला 'सेर्ह्यपिच्च' (३।४।८७) यानें 'हि' आदेश, आणि त्याला 'हुझल्भ्यो हेर्धिः' (६।४।१०१) यानें धि आदेश केल्यानंतर त्या धकाराच्या पूर्वीचा सकार धातूचा आहे सिच् प्रत्ययाचा नव्हे म्हणून 'धि च' या सूत्रानें सकाराचा लोप होत नाहीं. नंतर त्या सकाराला 'झलां जश्०' (८।४।५३) या सूत्रानें दकार होऊन चकाद्धि असें रूप होतें.

३. 'धि च' यानें सकाराचा लोप जरी येथें झाला नाहीं तरी हरकत नाहीं. कारण सकाराला जश्त्व होत असल्यामुळें सकार कांहीं राहणार नाहीं. आशाद्ध्वम् असें रूप होऊं दे असा अभिप्राय आहे.

४. सिचाचा लोप सांगण्याकरितां सुद्धां 'धि च' या सूत्राची जरूर राहणार नाहीं. कारण तेथेही जश्त्व होऊन सकार राहणार नाहीं.

५. आङ् उपसर्गपूर्वक यम् आणि रम् या धातूंचीं लुङ् मध्यमपुरुष बहुवचनाचीं हीं रूपें आहेत. 'आङो यम०' (१।३।२८) आणि 'व्याङ्परिभ्यो०' (१।३।८३) या सूत्रांनीं येथें आत्मनेपद ध्वम् प्रत्यय झाला आहे. मध्यें सिच् प्रत्यय होतो. परंतु तो सकार धि च या लोपामुळें दिसत नाहीं. आतां जश्त्वानें तो दिसणार नाहीं.

आयन्ध्वम् अरन्ध्वमिति जश्त्वेनैव सिद्धम् ।

**श्रुतिश्चापि न भिद्यते ।**

श्रुतिकृतश्चापि न कश्चिद्भेदो भवति ॥

**लुङश्चापि न मूर्धन्ये ग्रहणम्**

तत्रायमप्यर्थ इणः षीध्वंलुङ्लिटां धोऽङ्गात् [८. २. ७८] इत्यत्र लुङ्ग्रहणं न कर्तव्यम् । इहापि अच्योढ्वम् अप्लोढ्वमिति षत्वे सिचो धस्य ष्टुत्वे च कृते जश्त्वेन सिद्धम् ॥

**सेटि दुष्यति ॥ २ ॥**

सेटि दोषो भवति । इदमेव रूपं स्यात् अलविढ्वम् इदं न स्यात् अलविध्वमिति । तस्मात्सिचो ग्रहणं कर्तव्यम् ॥ यदि तर्हि सिचो ग्रहणं क्रियते

**घसिभसोर्न सिध्येत्तु**

घसिभसोर्न सिध्यति । सग्धिश्च मे

---

ऐकण्यांत देखील कांहीं तर्सा[६] फरक होत नाहीं.

जश्त्व करण्यांत आणखीही एक गोष्ट सिद्ध होते कीं–' इणः षीध्वं लुङ्लिटां धोऽङ्गात्' (८।३।७८) या मूर्धन्य–विधायक शास्त्रामध्यें लुङ्ग्रहण करावयास नको. कारण अच्योड्ढ्वम् अप्लोड्ढ्वम् या उदाहरणांमध्यें देखील सिच् प्रत्ययाच्या सकाराला षत्व, पुढील प्रत्ययाच्या धकाराला ष्टुत्व आणि षकाराला जश्त्व केलें म्हणजे रूपें सिद्ध[७] होतील.

लुङ्ग्रहण केलें नाहीं तर इडागम होणाऱ्या उदाहरणांमध्यें दोष येतो. अलविड्ढ्वम् असें एकच रूप होईल. अलविध्वम् असें होणार नाहीं. तेव्हा सिचाचें ग्रहण केलें पाहिजे.

आतां जर सिचाचे ग्रहण केलें तर–

( वा. ३ ) घस् आणि भस् या धातूंचीं रूपें सिद्ध होणार नाहीत. सग्धिश्च[९] मे सपीतिश्च

---

६. आयन्ध्वम् येथें नकार आणि धकार यांच्यामध्यें दकार अधिक असला काय आणि नसला काय उच्चारांत फारसा फरक दिसत नाहीं.

७. ' धि च ' हें सूत्र आहे त्यावेळी त्या सूत्रानें अच्योड्ढ्वम् येथे सिचाचा लोप झाला असतां पुढील ध्वम् प्रत्ययाच्या धकाराला ढकार होण्याकरितां ' इणः षीध्वम्० ' ( ८।३।७८ ) या सूत्रामध्ये लुङ्ग्रहण केलें आहे. आतां 'धि च' हे सूत्र न करतां सर्वत्र जश्त्वाने उदाहरणें साधावीं असा पक्ष घेतला तर अच्योड्ढ्वम् येथें जश्त्व असिद्ध असल्यामुळे त्याच्या पूर्वी ' आदेश-प्रत्यययोः ' ( ८।३।५९ ) या सूत्रानें षत्व होईल. नंतर त्या षकाराला जश्त्वानें डकार होऊन पुढील ध्वम् प्रत्ययाच्या धकाराला ष्टुत्वानें ढकार होऊन रूप सिद्ध होत आहे.

८. कारण ' धि च ' हें सूत्र नसले तर सिचाच्या सकाराला षत्व, त्याला जश्त्व व धकाराला ष्टुत्व हे होणारच. तेव्हां ' धि च ' हें सूत्र केलें पाहिजे व तेथें सिच्-ग्रहणहीं केलें पाहिजे.

९. सग्धि म्हणजे सहभोजन. अद् धातूहून क्तिन् प्रत्यय 'बहुलं छन्दसि ' ( २।४।४० ) यानें अद् धातूला घस् आदेश, ' घसिभसोर्हलि च ' ( ६।४।१०० ) यानें घस् यातील अकाराचा लोप. ' झलो झलि ' ( ८।२।२६ ) याने सकाराचा लोप. ' झषस्तथोः० ' ( ८।२।४० ) याने तकाराला धकार आणि ' झलां जश्० ' ( ८।४।५३ ) याने घकाराला गकार होऊन ' ग्धि ' शब्द सिद्ध होतो. नंतर ' समाना ' शब्दाचा 'ग्धि' शब्दाबरोबर कर्मधारय समास, समाना शब्दाला पुंवद्भाव आणि ' समानस्य० ' ( ६।३।८४ ) यानें स आदेश होऊन 'सग्धि' शब्द सिद्ध होतो. तसेंच बब्धाम् येथें भस् धातूहून लोट् प्रत्यय, त्याला तस् आदेश, त्याला ' तस्थस्थ० ' ( ३।४।१०१ ) यानें ताम् आदेश, शप्, श्लु, द्वित्व करून नंतर ' घसि-भसोर्हलि० ' ( ६।४।१०० ) यानें अकाराचा लोप, सकाराचा लोप वगैरे कार्यें पूर्वींप्रमाणें होतात. सिचा-च्याच सकाराचा लोप होतो असा पक्ष घेतला तर या दोन्ही उदाहरणांमध्यें ' झलो झलि ' ( ८।२।२६ ) यानें सकाराचा लोप होणार नाहीं.

सपीतिश्च मे बब्धां ते हरी धाना इत्यत्र न प्राप्नोति ॥

## तस्मात्सिज्ग्रहणं न तत्

तस्माद्धि चेत्यत्र सिचो ग्रहणं न कर्तव्यम् । कथं चकाद्धि पलितं शिर इति । एवं तर्हि सिज्ग्रहणं कर्तव्यम् । कथं सग्धिश्च मे सपीतिश्च मे बब्धां ते हरी धाना इति । इह तावत्सग्धिरिति नैतद्घसे रूपम् । किं तर्हि । सघेरेतद्रूपम् । बब्धां ते हरी धाना इति नैतद्भसे रूपम् । किं तर्हि । बन्धेरेतद्रूपम् ॥

## छान्दसो वर्णलोपो वा

## यथेष्कर्तारमध्वरे ॥ ३ ॥

अथवा छान्दसो वर्णलोपो भविष्यति यथेष्कर्तारमध्वरे । तद्यथा । तुभ्येदमग्ने । तुभ्यमिदमग्न इति प्राप्ते । आम्बानां चरुः । नाम्बानां चरुरिति प्राप्ते । आव्याधिनी-रुगणाः । आव्याधिनीः सुगणा इति प्राप्ते । इष्कर्तारमध्वरस्य । निष्कर्तारमिति प्राप्ते । शिवा उद्रस्य भेषजी । शिवा रुद्रस्य भेषजीति प्राप्ते ॥ तस्मात्सिज्ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । यदेतद्रात्सस्य [ ८. २. २४ ] इति सकारग्रहणं तत्सिचो ग्रहणं विज्ञास्यते । कथम् । रात्सस्येत्युच्यते

---

मे ( तै सं. ४।७।४।१ ) बब्धां ते हरी धानाः या उदाहरणांमध्यें सकाराचा लोप होणार नाहीं.

एकंदरीत धि च या सूत्रामध्यें सिचाचे ग्रहण करूं नयें असें ठरतें.

पण सिचाचें ग्रहण केलें नाहीं तर ' चकाद्धि पलितं शिरः ' हें उदाहरण कसें सिद्ध होईल ?

तर मग सिचाचें ग्रहण करावें.

सिचाचें ग्रहण केलें तर 'सग्धिश्च मे सपीतिश्च मे,' 'बब्धां ते हरी धानाः' हीं उदाहरणें कशीं सिद्ध होतील ?

हा दोष येत नाहीं. कारण 'सग्धिः' हें रूप घस् धातूचें नव्हेच.

तर मग कोणत्या धातूचें तें रूप आहे ?

सघ् धातूचें तें रूप आहे. तसेंच बब्धां ते हरी धानाः येथें बब्धाम् हें रूप भस् धातूचें नव्हे.

तर मग कोणत्या धातूचें तें रूप आहे ?

बन्ध् धातूचें तें रूप आहे.

अथवा वैदिक रूप आहे म्हणून तें वर्णाचा लोप करून साधता येईल. जसें निष्कर्तारमध्वरस्य असें उच्चारावयाचे असतां इष्कर्तारमध्वरस्य असे वेदामध्यें उच्चारलें आहे. अथवा जसें तुभ्यमिदमग्ने असें उच्चारावयाचें असतां तुभ्येदमग्ने असें वेदामध्यें उच्चारलें आहे. तसेंच नाम्बानां चरुः असें म्हणावयाचें असतां आम्बानां चरुः (तै. सं. १।८।१०।१) असें म्हटलें आहे. तसेंच आव्याधिनी सुगणाः असें म्हणावयाचें असतां आव्याधिनी रुगणाः (तै. सं. ४।१।१०।२ ) असें म्हटलें आहे. तसेंच शिवा रुद्रस्यः भेषजीः (तै. सं. ४।५।१०।१) असें म्हणावयाचें असतां शिवा उद्रस्य भेषजीः असें म्हटलें आहे. [१०]एकंदरीत येथें सिचाचें ग्रहण केलें पाहिजे.

सिचाचें ग्रहण [११]करूं नये. कारण रात्सस्य या सूत्रामध्यें जें सकार-ग्रहण केलें आहे तें सिचाचेंच ग्रहण आहे.

तसें कसें समजावें ?

रात् सस्य असें येथें म्हटलें आहे. आणि

---

१०. सिचाचें ग्रहण केलें असतां जे सग्धिः वगैरे दोष दाखविले ते दूर केले. आणि सिचाचें ग्रहण केलें नाहीं तर चकाद्धि येथें दोष येतो, तो दूर होत नाहीं या वरून.

११ चकाद्धि हें रूप साधण्याकरितां सिचाचें ग्रहण केलें पाहिजे. परंतु त्याकरितां ' धि च ' या सूत्रामध्यें तशा अर्थाचा शब्द घालण्याचें कारण नाहीं, असा अभिप्राय आहे.

न चान्यो रेफात्परः सकारोऽस्त्यन्यदतः सिचः। ननु चायमस्ति मातुः पितुरिति। तस्मात्सिचो ग्रहणं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम्। कस्मान्न भवति चकाद्धि पलितं शिर इति। इष्टमेवैतत्संगृहीतम्। चकाधीत्येव भवितव्यम् ॥

धि सकारे सिचो लोप-
श्चकाद्धीति प्रयोजनम्।
आशाध्वं तु कथं ते स्या-
ज्जश्त्वं सस्य भविष्यति ॥ १ ॥
सर्वत्रैवं प्रसिद्धं स्या-
च्छ्रुतिश्चापि न भिद्यते।
लुङश्चापि न मूर्धन्ये
ग्रहणं सेटि दुष्यति ॥ २ ॥
घसिभस्योर्न सिध्येत्तु
तस्मात्सिज्ग्रहणं न तत्।
छान्दसो वर्णलोपो वा
यथेष्कर्तारमध्वरे ॥ ३ ॥

[ झलो झलि ॥ ८ । २ । २६ ॥[1]

ह्रस्वादङ्गात् ॥ ८ । २ । २७ ॥[1]

इट ईटि ॥ ८ । २ । २८ ॥[1]

स्कोः संयोगाद्योरन्ते च ॥ ८ । २ । २९ ॥[1]

चोः कुः ॥ ८ । २ । ३० ॥[1]

हो ढः ॥ ८ । २ । ३१ ॥[1] ]

दादेर्धातोर्घः ॥ ८ । २ । ३२ ॥[1]

इह दोग्धा दोग्धुमिति घत्वस्यासिद्धत्वाड्ढत्वं प्राप्नोति। नैष दोषः। उक्तमे-

---

रेफाच्या पुढील जो सकार तो सिचांवाचून दुसरा कोणी संभवतच नाहीं.

मातुः पितुः या उदाहरणामध्यें रेफाच्या पुढें असणारा सिचावाचून दुसरा सकार संभवतो.

मग एकंदरीत सिचाचें ग्रहण करावें[12] असेंच ठरलें ना ?

तसें नाहीं.

सिचाचें ग्रहण करण्याचें कारण नाहीं.

जर सिचाचें ग्रहण केलें नाहीं तर चकाद्धि पलितं शिरः येथें सकाराचा लोप कां होत नाहीं ? येथें लोप होऊं लागेल.

'लोप होऊं लागेल' असा जो दोष दिला जात आहे तो दोष नव्हे. इष्ट असेंच तुम्ही बोलत आहां. कारण 'चकाधि' असेंच रूप होतें.

(सू. ३२) दोग्धा दोग्धुम् या उदाहरणांमध्यें ढत्वाच्या दृष्टीनें घत्व असिद्ध असल्यामुळें घत्वाच्या पूर्वींच हकाराला ढत्व होईल.

हा दोष येत नाहीं. कारण अपवादशास्त्र हें वचन-प्रामाण्यास्तव सिद्ध मानलें जातें असें पूर्वीं सांगितलेंच आहे.

---

१२. धि च या सूत्रामध्यें सिचः असें पद घालावें.

१. (सू. २६) झलाच्या पुढील सकाराचा लोप होतो झल् पुढें असतांना.

१. (सू. २७) ह्रस्वान्त अंगाच्या पुढील सकाराचा लोप होतो झल् पुढें असतांना.

१. (सू. २८) इडागमाच्या पुढील सकाराचा लोप होतो ईट् हा आगम पुढें असतांना.

१. (सू. २९) पदाच्या शेवटीं असलेला किंवा झलाच्या पूर्वीं असलेला जो संयोग त्या संयोगामध्यें पहिला वर्ण सकार किंवा ककार असेल तर त्याचा लोप होतो.

१. (सू. ३०) पदाच्या शेवटीं असलेला किंवा झलाच्या पूर्वीं असलेला जो चवर्ग त्याला कवर्ग आदेश होतो.

१. (सू. ३१) पदाच्या शेवटीं असलेला किंवा झलाच्या पूर्वीं असलेला जो हकार त्याला ढकार आदेश होतो.

१. (सू. ३२) पदाच्या शेवटीं असलेला किंवा झलाच्या पूर्वीं असलेला जो दकारादि धातूचा हकार त्याला घकार होतो.

तदपवादो वचनप्रामाण्यादिति ॥ अथवैवं वक्ष्यामि। हो ढो ऽदादेः। हो ढो भवत्यदादेः। ततो धातोर्घ इति । दादेरित्यनुवर्तते नेति निवृत्तम् ॥

दादेरित्युच्यते तत्रेदं न सिध्यति । अधोक्। क्व तर्हि स्यात्। मा स्म धोक् । नैष दोषः। धातोरिति नैषा दादिसमानाधिकरणा षष्ठी। दादेर्धातोरिति। का तर्हि। अवयवयोगैषा षष्ठी। धातोर्यो दादिरवयव इति ॥ सा चावश्यमवयवयोगा षष्ठी विज्ञेयोत्तरार्था । किं प्रयोजनम्। एकाचो बशो भष्झषन्तस्य स्ध्वोः [ ८. २. ३७ ] इतीहापि यथा स्यात् । गर्दभयतेरप्रत्ययो गर्धबिति ॥ यद्यवयवयोगा षष्ठी दोग्धा

---

अथवा ‘ होढोऽदादेः’ असा सूत्राचा विभाग करतों. त्याचा अर्थ–हकाराला ढकार होतो, परंतु तो हकार दकारादि धातूचा नसावा.

त्यानंतर दुसरें सूत्र ‘ धातोर्घः ’. पूर्वसूत्रांतील ‘ अदादेः ’ या सामासिक पदापैकीं ‘ दादेः ’ एवढ्या भागाचा येथें संबंध आहे. त्यांतील ‘ न ’ याचा येथें संबंध नाहीं.

असा सूत्रविभाग केला तरी हा घकार दकारादि धातूला होतो असें येथें म्हटलें आहे त्यामुळें अधोक् या उदाहरणामध्यें घत्व होणार नाहीं. तर मग कोठें बरें घत्व होईल ?

माँ स्म धोक् या उदाहरणामध्यें होईल.

हा दोष येत नाहीं. धातोः ही ‘ दादि ’ या पदाशी संबद्ध असलेली षष्ठी आहे; ती समानाधिकरण षष्ठी नव्हे कीं जिच्या योगानें ‘ धातु जो दकारादि’ असा अर्थ होईल.

तर मग कशा प्रकारची ती षष्ठी आहे ?

अवयवाचा संबंध दाखविणारी ती षष्ठी आहे. त्यामुळें ‘ धातूचा अवयव जो दकारादि भाग ’ असा अर्थ होतो.

आणि ‘ही षष्ठी अवयवाचा संबंध दाखविणारी षष्ठी आहे ’ असें पुढील सूत्राकरितां अवश्य मानलेंच पाहिजे.

तशा प्रकारच्या षष्ठीचा पुढें कोठें उपयोग होत आहे ?

गर्दभयति याहून क्विप् प्रत्यय केला असतां गर्धप् असें रूप होतें त्या ठिकाणीं ‘ एकाचो बशो भष् झषन्तस्य स्ध्वोः ’ ( ८।२।३७ ) या

---

२. दुह् धातूहून लङ् प्रत्यय, त्याच्या स्थानीं तिप् प्रत्यय, त्याच्या इकाराचा ‘ इतश्च ’ ( ३।४।१०० ) यानें लोप, शप् प्रत्यय, त्याचा लुक्, ‘ लुङ्लुङ्लृङ्० ’ ( ६।४।७१ ) यानें अट् आगम, ‘ पुगन्त० ’ ( ७।३।८६) यानें उकाराला ओकार, ‘हल्ङ्याब्भ्यो०’ ( ६।१।६८ ) यानें प्रत्ययाच्या तकाराचा लोप, प्रकृत ‘दादेर्धातोर्घः०’ या सूत्रानें हकाराला घकार, ‘एकाचो०’ ( ८।२।३७ ) यानें दकाराला धकार, आणि शेवटच्या घकाराला ‘ वाऽवसाने ’ ( ८।४।५६ ) यानें ककार होऊन अधोक् असें रूप सिद्ध होतें. येथें दुह् धातूला अट् आगम झाल्यामुळें तो धातू अकारादि झाला आहे, त्याला दकारादि असें म्हणतां येत नाहीं.

३. येथें माङ् या अव्ययाचा योग असल्यामुळें ‘ न माङ्योगे ’ ( ६।४।७४ ) या सूत्रानें अडागमाचा निषेध झाला आहे. त्यामुळें येथें धातू दकारादि कायम राहिला आहे.

४. गर्दभ शब्दाहून ‘प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च ’ या गणसूत्रानें णिच् प्रत्यय, गर्दभ शब्दांतील टीचा लोप. शेवटच्या अकाराचा लोप, नंतर गर्दभि या णिजन्त धातूहून क्विप् प्रत्यय, ‘ णेरनिटि ’ ( ६।४।५१ ) यानें णिच् प्रत्ययाचा लोप, पुढें प्रथमा एकवचन सु प्रत्यय, त्याचा ‘हल्ङ्याप्०’ (६।१।६८) यानें लोप, ‘ एकाचो बशो० ’ (८।२।३७) यानें दकाराला धकार आणि शेवटच्या भकाराला ‘ वाऽवसाने ’ (८।

दोग्धुमित्यत्र न प्राप्नोति । एषोऽपि व्यपदेशिवद्भावेन धातोर्दादिरवयवो भवति ॥

हृग्रहोर्भश्छन्दसि हस्य ॥ १ ॥

हृग्रहोश्छन्दसि हस्य भत्वं वक्तव्यम् । गर्दभेन संभरति । मरुदस्य ग्रभीता । सामिधेन्यो जभ्रिरे । उद्ग्राभं च निग्राभं च ब्रह्म देवा अवीवृधन् ॥

[ वा द्रुहमुहष्णुहष्णिहाम् ॥ ८ । २ । ३३ ॥

नहो धः ॥ ८ । २ ३४ ॥

आहस्थः ॥ ८ । २ । ३५ ॥

व्रश्चभ्रस्जसृजमृजयजराजभ्राजच्छशां षः ॥ ८ । २ । ३६ ॥

एकाचो बशो भष् झषन्तस्य स्ध्वोः ॥ ८ । २ । ३७ ॥ ]

दधस्तथोश्च ॥ ८ । २ । ३८ ॥

---

सूत्रानें धकार झाला पाहिजे.

जर धातोः ही षष्ठी अवयवाचा संबंध दाखविणारी असेल तर दोग्धा, दोग्धुम् या उदाहरणांमध्यें घत्व होणार नाहीं.

दुह् हा देखील व्यपदेशिवद्भावानें धातूचा दकारादि अवयव म्हणतां येतो.

(वा. १) वेदामध्यें हृ आणि ग्रह् या धातूंच्या हकाराला भकार होतो असें म्हणावें. उदा० गर्दभेन संभरति ( तै. सं. ५।१।५।५ ) मरुदस्य ग्रभीता सामिधेन्यो जभ्रिरे उद्ग्राभं च निग्राभं च ब्रह्म देवा अवीवृधन् ( तै. सं. १।१।१३।१ )

---

४।५६ ) यानें भकार होऊन गर्धप् असें रूप होतें. येथें गर्दभ् हा धातु एकाच् नाहीं. तेव्हां येथें एकाचो-बशो० या सूत्राचा 'एकाच् जो धातु०' असा अर्थ केला तर त्यानें धकार होणार नाही. आणि 'धातोः' ही अवयव–षष्ठी घेऊन धातूचा अवयव जो एकाच् झषन्त भाग असा अर्थ केला म्हणजे गर्दभ् या धातूमध्यें दभ् हा तसा भाग आहे म्हणून त्यांतील दकाराला धकार होतो.

५. कारण, दुह् हा जो दकारादि भाग तोच धातु असल्यामुळें त्याला धातूचा अवयव असें म्हणतां येत नाहीं.

६. पूर्वी अ. १ पा. १ सूत्र २१ पहा.

७. सम् उपसर्गपूर्वक हृ धातूचें संहरति असें क्रियापद लोकामध्यें होतें. तेथें या वार्तिकानें हकाराला भकार झाला आहे याप्रमाणें ग्रभीता, जभ्रिरे, उद्ग्राभम् आणि निग्राभम् यांतील हकाराला वेदामध्यें भकार झाला आहे.

१. ( सू. ३३ ) पदाच्या शेवटीं असलेला किंवा झलाच्या पूर्वी असलेला जो द्रुह् मुह् ष्णुह् आणि ष्णिह् या धातूंचा हकार त्याला विकल्पानें घकार होतो.

१. ( सू. ३४ ) पदाच्या शेवटीं असलेला किंवा झलाच्या पूर्वी असलेला जो नह् धातूचा हकार त्याला धकार होतो.

१. ( सू. ३५ ) ब्रू धातूच्या स्थानी झालेला जो आह् आदेश त्यांतील हकाराला थकार होतो झल् पुढें असतांना.

१. ( सू. ३६ ) पदाच्या शेवटीं असलेला किंवा झलाच्या पूर्वी असलेला जो व्रश्च् भ्रस्ज् सृज् मृज् यज् राज् आणि भ्राज् या धातूंच्या शेवटचा वर्ण व तसाच कोणत्याही धातूचा शेवटचा जो छकार किंवा शकार त्याला षकार होतो.

१. ( सू. ३७ ) पदाच्या शेवटीं असलेला किंवा सकाराच्या किंवा ध्वशब्दाच्या पूर्वीचा जो धातूचा अवयव एकाच् झषन्त भाग त्यांतील बशाला भष् होतो.

१. ( सू. ३८ ) धा धातूला द्वित्व केलें असतां तेथें पूर्वभागामध्यें आकाराला ह्रस्व, धकाराला दकार, आणि पुढील भागामध्यें आकाराचा लोप हे आदेश करून जें दध् असें स्वरूप होतें त्यांतील दकाराला धकार होतो तकार, थकार, सकार किंवा ध्वशब्द पुढें असतांना.

किमर्थश्चकारः । स्ध्वोरित्येतदनुकृष्यते । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धं स्ध्वोः पूर्वेणैव । न सिध्यति । किं कारणम् । अबशादित्वात् । ननु च जश्त्वे कृते बशादिः । असिद्धं जश्त्वं तस्यासिद्धत्वान्न बशादिः । एवं तर्हि सिद्धकाण्डे पठितमभ्यासजश्त्वचर्त्वमेत्त्वतुकोरिति । एत्त्वतुकोर्ग्रहणं न करिष्यते । अभ्यासजश्त्वचर्त्वं सिद्धमित्येव । एवमप्यझषन्तत्वान्न प्राप्नोति । लोपे कृते झषन्तः । स्थानिवद्भावान्न झषन्तः ॥ अत उत्तरं पठति ।

**दधस्तथोरनुकर्षणानर्थक्यं स्थानिवत्प्रतिषेधात् ॥१॥**

दधस्तथोरनुकर्षणमनर्थकम् । किं कारणम् । स्थानिवत्प्रतिषेधात् । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावः पूर्वत्रासिद्धे न स्थानिवदिति ॥ स चावश्यं प्रतिषेध आश्रयितव्यः ।

**इतरथा ह्यलोपे प्रतिषेधः ॥ २ ॥**

यो हि मन्यतेऽनुकर्षणसामर्थ्यान्मेऽत्र भवत्यलोपे तेन प्रतिषेधो वक्तव्यः स्यात् ।

---

(सू. ३८) या सूत्रामध्यें च शब्द कशाकरितां घातला आहे ?

पूर्वसूत्रांतील ' स्ध्वोः ' या पदाचा येथें संबंध आहे हें दाखविण्याकरिता घातला आहे.

हा उपयोग संभवत नाहीं. कारण सकार किंवा ध्वशब्द पुढें असतांना पूर्वसूत्रानेंच धकार सिद्ध होत आहे.

धकार पूर्वसूत्रानें सिद्ध होत नाहीं.

कां बरें ?

एकाच् भागाच्या आरंभीं बश् नाहीं म्हणून.

पण जश्त्वानें दकार केल्यानंतर एकाच् भागाच्या आरंभीं बश् आहे.

जश्त्व असिद्ध आहे तेव्हां त्याच्या असिद्धत्वास्तव एकाच् भागाच्या आरंभीं बश् नाहीं.

तर मग आतां पूर्वी सिद्ध-काण्डामध्यें जें 'अभ्यासजश्त्वचर्त्वमेत्वतुकोः' (८।२।६ वा. १३) असें म्हटलें आहे तेथें 'एत्वतुकोः' हा शब्द घालूं नये. ' अभ्यासजश्त्वचर्त्वं सिद्धम् ' एवढेंच वचन करावें. म्ह. जश्त्व सिद्ध होऊन एकाच् भागाच्या आरंभीं बश् आहे असें म्हणतां येईल आणि पूर्वसूत्रानें धकार आदेश करतां येईल.

असें म्हटलें तरी त्या एकाच् भागाच्या शेवटीं झष्[२] नसल्यामुळें पूर्वसूत्राची प्राप्ति येत नाहीं.

आकाराचा लोप झाल्यानंतर त्या एकाच् भागाच्या शेवटीं झष् आहे असें म्हणतां येतें ?

आकाराच्या लोपाला स्थानिवद्भाव (१।१।५७) होत असल्यामुळें एकाच् भागाच्या शेवटीं झष् नाहीं.

यानंतर वार्तिककार असें म्हणतात—

(वा. १) ' दधस्तथोः० ' या सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतील स्ध्वोः या पदाचा संबंध करणें निरर्थक आहे.

कां बरें ?

स्थानिवद्भावाचा निषेध आहे म्हणून. त्रिपादीमधील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा येथें स्थानिवद्भावाचा निषेध होत आहे. आणि तो स्थानिवद्भावाचा निषेध तर अवश्य स्वीकारलाच पाहिजे.

(वा. २) नाहीं तर ज्या उदाहरणामध्यें आकाराचा लोप होत नाहीं तेथें ' दधस्तथोः० ' या भष्भावाचा निषेध केला पाहिजे. म्ह. येथें स्ध्वोः या पदाचा संबंध केला आहे त्या जोरावर स्थानिवद्भाव

---

२. धा असा आकारान्त धातु असल्यामुळें धकार शेवटीं नाहीं.

दधाति दधासि ॥

तथोश्चापि ग्रहणं शक्यमकर्तुम् । कथम् । झलि झषन्तस्येत्युच्यते तथोश्चायं झलि झषन्तो भवति नान्यत्र ॥

अथाप्येतन्नास्ति पूर्वत्रासिद्धे न स्थानिवदित्येवमपि नैवार्थोऽनुकर्षणार्थेन चकारेण नापि तथोर्ग्रहणेन । आनन्तर्यमिहाश्रीयते झलि झषन्तस्येति । क्वचिच्च संनिपातकृतमानन्तर्यं शास्त्रकृतमनानन्तर्यं क्वचिन्नैव संनिपातकृतं नापि शास्त्रकृतम् । लोपे संनिपातकृतमानन्तर्यं शास्त्रकृतमनानन्तर्यमलोपे नैव संनिपातकृतं नापि शास्त्रकृतम् । यत्र कुतश्चिदेवानन्तर्यं तदाश्रयिष्यामः ॥

झाला तरी एका वर्णानें व्यवधान सहन होतें अशी कल्पना करून मला भष्भाव करतां येईल असें जो मानतो त्यानें अकाराचा लोप ज्या ठिकाणीं होत नाहीं अशा दधाति दधासि या उदाहरणांमध्यें ' दधस्तथोः० ' याचा निषेध सांगितला पाहिजे. ( एकंदरीत स्थानिवद्भावाचा निषेध होत असल्यामुळें सकार किंवा ध्वशब्द पुढें असतांना पूर्वसूत्रानेंच भष्भाव सिद्ध होतो. तेव्हां येथें ' स्ध्वोः ' या पदाचा संबंध दाखविण्याकरितां च शब्द घालण्याचें कारण नाहीं. )

तसेंच येथें ' तथोः ' हा शब्द देखील काढून टाकला तरी चालेल.

कसें ?

येथें झलि याचा संबंध करून झल् पुढें असतांना जें झषन्त ( म्ह० दध् ) त्याच्या दकाराला धकार होतो असें म्हटलें आहे. आणि दध् असें झषन्त जें होतें तें तकार किंवा थकार हेच झल् पुढें असतांना होतें; त्यांशिवाय इतर झल् पुढें असतांना दध् असें झषन्त रूपच होत नाहीं.

आतां ' त्रिपादींतील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं ' हा निषेध मानला नाहीं तरी देखील या सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतील ' स्ध्वोः ' या पदाचा संबंध दाखविणाऱ्या 'च' शब्दाचा कांहीं उपयोग नाहीं, आणि ' तथोः ' या शब्दाचाही उपयोग नाहीं. कारण झल् पुढें असतांना जो झषन्त भाग असें येथें झल् आणि झषन्त भाग यांचें आनंतर्य 'भष्भावाचें निमित्त' म्हणून गृहीत धरलें आहे. उदाहरणामध्यें जसे वर्ण पडले आहेत त्या मानानें पाहिलें असतां कांहीं उदाहरणांमध्यें त्या दोहोंचें आनंतर्य असतें; शास्त्रानें मात्र तेथें आनंतर्य नाहीं असें कल्पिलें जातें. आणि कांहीं उदाहरणांत पाहिलें तर वर्ण जसे पडले आहेत त्या मानानेंही आनंतर्य नसतें, आणि शास्त्रानेंही आनंतर्य कल्पिलें जात नाहीं. ज्या ठिकाणीं आकाराचा लोप होतो अशा धत्तः वगैरे उदाहरणांमध्यें वर्ण जसे पडले आहेत त्या मानानें झल् आणि झषन्त यांचें आनंतर्य असतें. फक्त तेथें स्थानिवद्भाव सांगणाऱ्या शास्त्रानें त्यांचें आनंतर्य नाहीं असें कल्पिलें जातें. आणि ज्या ठिकाणीं आकाराचा लोप होत नाहीं अशा दधाति वगैरे उदाहरणांमध्यें जसे वर्ण पडले आहेत त्या मानानेंही आनंतर्य नाहीं आणि शास्त्रानेंही तेथें आनंतर्य कल्पिलें जात नाहीं. आतां येथें झल् आणि झषन्त-भाग यांचें [1] आनंतर्य स्वीकारलें आहे ते कसेंही असलें तरी आम्हांला चालेल.

१. कारण, आकाराचें व्यवधान हें आकार नसतांना स्थानिवद्भावानें आकार मानल्यामुळें झालें काय आणि प्रत्यक्ष आकार असतांना त्यामुळें झालें काय एका वर्णानें व्यवधान हें दोन्ही ठिकाणीं सारखेंच होणार आहे.

**[झलां जशोऽन्ते॥८।२।३९॥]**

**झषस्तथोर्धोऽधः॥८।२।४०॥**

**[षढोः कः सि॥८।२।४१॥]**

अध इति किमर्थम्। धत्तः धत्थः॥ अध इति शक्यमकर्तुम्। कस्मान्न भवति धत्तः धत्थ इति। जश्त्वे योगविभागः करिष्यते। इदमस्ति दधस्तथोश्च [८.२.३८] इति। ततो वक्ष्यामि झलां जशः। झलां जशो भवन्ति दधस्तथोः। ततोऽन्ते। अन्ते च झलां जशो भवन्तीति। तत्र जश्त्वे कृतेऽझषन्तत्वान्न भविष्यति॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये अष्टमस्याध्यायस्य द्वितीये पादे प्रथममाह्निकम्॥

---

(सू. ४०) या सूत्रामध्यें 'अधः' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

धत्तः धत्थः या उदाहरणांमध्यें तकाराला आणि थकाराला धकार होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

अधः हें पद काढून टाकलें तरी चालेल.

धत्तः धत्थः या उदाहरणांमध्यें (तकार आणि थकार यांना) धकार कां होत नाहीं ?

जश्त्व सांगणाऱ्या पूर्वसूत्रामध्यें सूत्राचा विभाग असा करावा. 'दधस्तथोश्च' हें त्याच्या पूर्वीचें सूत्र आहे. त्यानंतर 'झलां जशः' इतकेंच सूत्र करतों. त्याचा अर्थ — दध् यांतील झलाला जश् होतो, तकार किंवा थकार पुढें असतांना. त्यानंतर दुसरें सूत्र 'अन्ते'. त्याचा अर्थ — पदाच्या शेवटीं असलेल्या झलाला जश् होतो. तेव्हां धत्तः धत्थः या उदाहरणांमध्यें 'झलां जशः' या सूत्रानें दध् यांतील शेवटच्या धकाराला जश्त्वानें दकार केल्यानंतर धद् हें झषन्त नसल्यामुळें त्याच्या पुढील तकार किंवा थकार याला 'झषस्तथोः०' या प्रकृत सूत्रानें धकार होणार नाहीं.

याप्रमाणें भगवान् पतञ्जलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील आठव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

१. (सू. ३९) पदाच्या शेवटीं असलेल्या झलाला जश् होतो.

१. (सू. ४०) धा धातू सोडून इतर ठिकाणीं झषाच्या पुढील तकार किंवा थकार यांना धकार आदेश होतो.

१. (सू. ४१) षकार किंवा ढकार याला सकार पुढें असतांना ककार आदेश होतो.

अध्याय ८ पाद २ आह्निक १ समाप्त.

**रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः ॥ ८ । २ । ४२ ॥**

रदाभ्यामिति किमर्थम् । चरितम् मुदितम् । ननु च रदाभ्यामित्युच्यमाने ऽप्यत्र प्राप्नोति । अत्रापि रेफदकाराभ्यां परा निष्ठा । न रेफदकाराभ्यां निष्ठा विशेष्यते । किं तर्हि । तकारो विशेष्यते । रेफदकाराभ्यामुत्तरस्य तकारस्य नो भवति स चेन्निष्ठाया इति ॥

अथ पूर्वग्रहणं किमर्थम् ।

**निष्ठादेशे पूर्वग्रहणं परस्यादेशप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

निष्ठादेशे पूर्वग्रहणं क्रियते परस्यादेशो मा भूदिति । भिन्नवद्भ्याम् भिन्नवद्भिः ॥

**पञ्चमीनिर्दिष्टाद्धि परस्य ॥ २ ॥**

पञ्चमीनिर्दिष्टाद्धि परस्येति परस्य प्राप्नोति ॥

**वृद्धिनिमित्तात्प्रतिषेधः ॥ ३ ॥**

वृद्धिनिमित्तात्प्रतिषेधो वक्तव्यः ।

---

(सू. ४२) ह्या सूत्रामध्यें ' रदाभ्यां ' हें पद कशाकरितां घातलें आहे ?

चरितं मुदितं या उदाहरणांमध्यें इकाराच्या पुढील तकाराला नकार होऊं नये याकरितां घातलें आहे.

या सूत्रामध्यें ' रदाभ्याम् ' हें पद घातलें तरी देखील चरितं मुदितं या उदाहरणामध्यें नकार प्राप्त होतोच. कारण या ठिकाणीं रेफ आणि दकार यांच्या पुढें निष्ठाप्रत्यय आहेच[2].

रेफ आणि दकार हे निष्ठाप्रत्ययाचें विशेषण नव्हे[3].

तर मग तें कोणाचें विशेषण आहे ?

तकाराचें ते विशेषण आहे. म्हणजे सूत्राचा अर्थ असा समजावा कीं – रेफ किंवा दकार यांहून पर जो तकार त्याला नकार होतो, तो तकार निष्ठाप्रत्ययाचा अवयव असेल तर.

आतां या सूत्रामध्यें ' पूर्वस्य ' हें पद कशाकरितां घातले आहे ?

( वा. १ ) निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला नकार सांगणाऱ्या सूत्रामध्यें ' पूर्वस्य ' असें पद घातलें आहे ते पुढील दकाराला नकार आदेश न व्हावा याकरितां घातलें आहे. उदा० – भिन्नवद्भ्याम्[4] भिन्नवद्भिः.

( वा. २ ) कारण पंचमीचें उच्चारण करून सांगितलेलं कार्य पराला करावें, ( १।१।६६ ) या परिभाषेला अनुसरून वरील उदाहरणामध्यें पुढील दकाराला नत्व प्राप्त होतें.

( वा. ३ ) वृद्धि या निमित्तामुळें प्राप्त

---

१. ( सू. ४२ ) रेफ आणि दकार यांहून पुढे असलेल्या निष्ठाप्रत्ययांतील तकाराला, आणि त्या निष्ठाप्रत्ययाच्या मार्गे असलेल्या दकारालाही नकार आदेश होतो.

२. रेफ आणि दकार ( रदाभ्यां ) हें, 'निष्ठातः' या सामासिक पदांतील अप्रधान अशा निष्ठाप्रत्ययाचें विशेषण आहे असा या शंकाकाराचा समज आहे.

३. 'गुणानां च परार्थत्वात्' या न्यायानें किंवा 'पदार्थः पदार्थेनान्वेति' या न्यायानें सामासिक पदांतील उपसर्जनीभूत म्ह. अप्रधान अशा निष्ठाप्रत्ययाचें रेफ व दकार हें विशेषण होऊं शकत नाहीं. तर प्रधानीभूत अशा निष्ठातकाराचेंच रेफ व दकार हें विशेषण होय असें तात्पर्य.

४. ' भिदिर् विदारणे' या धातूहून क्तवतु प्रत्यय, तदन्ताहून भ्याम् प्रत्यय, भिद्–तवत्–भ्याम् असें असतां पूर्वग्रहण नसेल तर रेफ किंवा दकार यांहून पुढील निष्ठातकाराला नकार होतो आणि दकारालाही नकार होतो असा अर्थ झाला असतां प्रत्यासत्तिन्यायानें निष्ठाप्रत्ययाच्याच दकाराला नकार सांगितला गेल्यानें जश्त्व केलें असतां पुढील दकारालाच नत्व होईल आणि पूर्वीच्या म्ह. धातूच्या दकाराला नत्व होणार नाहीं.

किं प्रयोजनम् ॥

**प्रयोजनं कार्तिक्षैतिफौल्लयः ॥ ४ ॥**

कार्तिरिति वृद्धौ कृतायां रदाभ्यामिति नत्वं प्राप्नोति । क्षैतिरिति वृद्धौ कृतायां क्षियो दीर्घात [८.२.४६] इति नत्वं प्राप्नोति। फौल्लिरिति वृद्धौ कृतायामुदुपधत्वसंनियोगेन लत्वमुच्यमानं न प्राप्नोति ॥ अथोच्यमानेऽपि प्रतिषेधे वृद्धिनिमित्तादिति कथमिदं विज्ञायते । वृद्धिरेव निमित्तं वृद्धिनिमित्तम् वृद्धिनिमित्तादिति । आहोस्विद् वृद्धिर्निमित्तमस्य सोऽयं वृद्धिनिमित्तः वृद्धिनिमित्तादिति । किं चातः । यदि विज्ञायते वृद्धिरेव निमित्तं वृद्धिनिमित्तम् वृद्धिनिमित्तादिति क्षैतिः संगृहीतः कार्तिरसंगृहीतः । अथ विज्ञायते वृद्धिर्निमित्तमस्य सोऽयं वृद्धिनिमित्तः वृद्धिनिमित्तादिति कार्तिः संगृहीतः । क्षैतिरसंगृहीतः । उभयथा च फौल्लिरसंगृहीतः । यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावद्

---

झालेल्या नत्व वगैरेंचा निषेध सांगावा.

या निषेधाचा काय उपयोग ?

( वा. ४ ) कार्ति क्षैति आणि फौल्लि हीं उदाहरणें साधणें हा त्याचा उपयोग होय. कार्तिः या उदाहरणामध्यें वृद्धि केली असतांना ' रदाभ्याम्० ' या प्रकृत सूत्रानें नत्व प्राप्त होतें. क्षैतिः या उदाहरणामध्यें वृद्धि केली असताना ' क्षियो दीर्घात् ' ( ८।२। ४६ ) या सूत्रानें नत्व प्राप्त होतें. — फौल्लिः या उदाहरणामध्यें वृद्धि केली असतांना ' अनुपसर्गात्० ' ( ८।२।५५ ) या सूत्रानें फल् धातूच्या उपधेला उत्व सांगून त्याच्या बरोबर प्रत्ययाच्या तकाराला सांगितलेलें लत्व प्राप्त होत नाहीं.

आतां ' वृद्धिनिमित्तात् ' हा निषेध सांगितला तरीही अडचण राहतेच. कारण, ' वृद्धिनिमित्तात् ' या पदाचा अर्थ कसा समजावा ? ' वृद्धि हेंच जें निमित्त तें वृद्धिनिमित्त, त्या वृद्धिनिमित्ताहून पर ' असा समजावा किंवा वृद्धि आहे निमित्त ज्याची असा जो वर्ण तो वृद्धिनिमित्त, त्या ' वृद्धिनिमित्ताहून पर ' असा समजावा ?

या दोन अर्थांमध्यें फरक काय ?

फरक असा कीं—जर वृद्धि हेंच जें निमित्त तें वृद्धिनिमित्त, त्या वृद्धिनिमित्ताहून पर असा अर्थ घेतला तर क्षैतिः हें उदाहरण साधतें, परंतु कार्तिः हें उदाहरण साधत नाहीं. आतां वृद्धि ज्याची निमित्त आहे असा जो वर्ण तो वृद्धिनिमित्त त्याहून पर असा अर्थ समजला तर कार्तिः हें उदाहरण साधतें, परंतु क्षैतिः हें उदाहरण साधत नाहीं. शिवाय दोन्ही प्रकारापैकीं कसाही अर्थ घेतला तरी फौल्लिः हें उदाहरण साधत नाहींच.

येथें वृद्धिनिमित्तात् या पदाचा वाटेल तसा

---

५. क्षि धातूहून क्त प्रत्यय. तदन्ताहून अपत्यार्थी 'अत इञ् ' ( ४।१।९५ ) यानें इञ्. 'तद्धितेष्वचा० ' ( ७।१।११७ ) यानें आदिवृद्धि, क्षैतिः; असेंच कार्तिः येथेंही समजावें. 'ञिफला विशरणे' या धातूहून क्त प्रत्यय, आदितश्च ( ७।२।१६ ) यानें इडागमाचा निषेध, ' अनुपसर्गात्० ' ( ८।२।५५ ) यानें फल धातूच्या उपधेला उत्त्व आणि निष्ठातकाराला लत्व. अत इञ् वगैरे पूर्वीप्रमाणें.

६. ' क्षियो दीर्घात्' ( ८।२।४६ ) यानें क्षि धातूंतील दीर्घ वर्णाच्या पुढील निष्ठातकाराला नत्व सांगितलें असल्यानें क्षैतिः येथें वृद्धीच नत्वाला निमित्त असल्यामुळें प्रथम ( 'वृद्धिरेव निमित्तं' या ) पक्षीं नत्वनिषेध साधत आहे. पण कार्तिः येथें रेफ हा नत्वाला निमित्त आहे व तो रेफ वृद्धिसंज्ञक नसल्यानें तेथें

वृद्धिरेव निमित्तं वृद्धिनिमित्तम् वृद्धिनिमित्तादिति । ननु चोक्तं क्षैतिः संगृहीतः कार्तिरसंगृहीत इति । कार्तिश्च संगृहीतः । कथम् । वृद्धिर्भवति गुणो भवतीति

अर्थ घेतला तरी हरकत नाहीं. असें पहा कीं वृद्धि हेंच जें निमित्त तें वृद्धिनिमित्त, त्या वृद्धिनिमित्ताहून जें पर असा अर्थ असूं दे.

पण आतांच सांगितलें ना कीं तसा अर्थ घेतला असतां क्षैतिः हें उदाहरण साधेल पण कार्तिः हें उदाहरण साधणार नाहीं म्हणून. कार्तिः हेंहीं उदाहरण त्या अर्थानें साधतां येईल.

तें कसें ?

वृद्धि होते गुण होतो असें जेथें सांगितलें आहे तेथें त्या वृद्धीनें आणि गुणानें होणाऱ्या वर्णापुढें त्याच्या मस्तकासारखा त्याला रेफ लावून अर् किंवा आर् असा गुणवृद्धिसंज्ञक आदेश एकदम होत असतो.

---

णत्व-निषेध प्राप्त होत नाहीं. ' वृद्धि आहे निमित्त ज्याला त्या वर्णाहून पर ' हा दुसरा पक्ष घेतला असतां 'उरण् रपरः' (१।१।५१) यानें ऋवर्णाचे स्थानीं प्रसक्त झालेल्या अणाला रेफरूप परावयवाचें विधान केलें असल्यानें कार्तिः येथें वृद्धिनिमित्तकत्व रेफाला असल्यामुळें त्याहून पुढील निष्ठातकाराला नत्वनिषेध करतां येतो. पण क्षैतिः येथें ऐकार वृद्धीच आहे; वृद्धिनिमित्तक नव्हे. म्हणून तेथें नत्वनिषेध प्राप्त होत नाहीं. फौल्लिः येथें वृद्धि ही लत्वाला निमित्त नाहीं. किंवा वृद्धिनिमित्तक वर्णाहून पर–( पुढें ) ही निष्ठातकार पडत नाहीं तेव्हां कोणत्याही पक्षीं फौल्लिः हें उदाहरण ' वृद्धिनिमित्तात्प्रतिषेधः ' या वचनाचें प्रयोजन होऊं शकत नाहीं. अर्थात् वृद्धि केली असतां उदुपधत्व नष्ट झाल्यामुळें ' अनुपसर्गात्फुल्ल० ' ( ८।२।५५ ) यानें फल् धातूच्या उपधेला उत्व सांगून त्याच्या जोडीनें निष्ठातकाराला सांगितलेलें लत्व प्राप्त होत नाहीं.

७. याचा असा अभिप्राय–' सार्वधातुकार्ध० ' ( ७।३।८४ ) 'अचो ञ्णिति' ( ७।२।११५ ) इत्यादि स्थलीं ' प्रतिलक्ष्यं लक्षणोपप्लवः ' या न्यायानें ऋवर्णविषयक सार्वधातुकार्ध० इत्यादि गुणवृद्धिविधायक शास्त्रांचा 'इगन्त अंगाला गुण होतो सार्वधातुकादि प्रत्यय पुढें असतांना' 'अजन्त अंगाला वृद्धि होते ञित् णित् प्रत्यय पुढें असतांना' असा वाक्यार्थ झाला असतां तेथें व्यवस्थापक 'अलोन्त्य' परिभाषेनें तो गुण किंवा ती वृद्धि त्या अंगाच्या अन्त्य अकाला करावी असें सांगितलें असल्यानें ऋवर्णाच्या स्थानीं अणाचें विधान होत होतें व त्यामुळें 'उरण् रपरः' ही परिभाषा तेथें प्रवृत्त होते. तिचा अर्थ—रपरः येथें अवयववाचक परशब्दाशीं षष्ठ्यर्थी बहुव्रीहि. (' रेफः परावयवो यस्य ' या अर्थी. ) एक स्थानेग्रहण 'षष्ठी स्थानेयोगा' या परिभाषेनें उपलब्ध होतें. आणि दुसरें प्रसङ्गार्थक स्थानेग्रहण एकदेशानुवृत्तीनें 'षष्ठी स्थानेयोगा' येथून उपलब्ध होतें. रपरः यानें प्राप्ताप्राप्तविवेकन्यायाने केवळ रेफपरावयवत्वाचें विधान केलें जातें. तेव्हां ऋकाराचें स्थानीं विधीयमान जो अण् त्याचे पुढें लक्ष्यांत प्रवृत्त होण्याच्या पूर्वावस्थेमध्यें जणुं काय त्या अणाचा अवयवच असा रेफ उत्पन्न होतो असा या सूत्राचा अर्थ असल्यानें अलोन्त्यपरिभाषेप्रमाणें ऋवर्णस्थानिक गुणवृद्धिविधायक शास्त्राशीं ' उरण् रपरः ' याची ही वाक्यैकवाक्यता करावयाची. तिघांचा मिळून एक-लक्ष्य-संस्कारक महावाक्यार्थ असा होतो–अंगाचा अन्त्य जो ऋवर्ण त्याचे स्थानीं अर् आर् असा गुणवृद्धिसंज्ञक आदेश होतो. येथें प्रसंगावस्थेमध्यें ( लक्ष्यांत प्रवृत्त होण्याचे पूर्वींच ) त्या अणाचें पुढें अवयवासारखा ( आरोपित अवयवत्वविशिष्ट असा ) रेफ फुटतो असें सांगिल्यामुळें यदागमन्यायानें रेफ-परावयव-विशिष्ट अर् किंवा आर् या समुदायाला गुण, किंवा वृद्धि असा व्यवहार होतो. आणि मागून लक्ष्यांत प्रवृत्त होत असल्यानें ऋकाराला गुण व वृद्धि अर् व आर् होतात, हा भाष्योक्त नियम उपपन्न होतो. याच नियमपर भाष्यावरून उरण् रपरः याचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ करावयाचा.

रेफशिरा गुणवृद्धिसंज्ञकोऽभिनिर्वर्तते । अथवा पुनरस्तु वृद्धिर्निमित्तमस्य सोऽयं वृद्धिनिमित्तः वृद्धिनिमित्तादिति । ननु चोक्तं कार्तिः संगृहीतः क्षैतिरसंगृहीत इति । क्षैतिश्च संगृहीतः । कथम् । यत्तद् वृद्धिशास्त्रं तस्मिन्वृद्धिशब्दो वर्तते ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः ।

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ५ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गा वृद्धिः । अन्तरङ्गं नत्वम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे । एवं च कृत्वा ळत्वमपि सिद्धं भवति फौल्लिरिति ॥

**[ संयोगादेरातो धातोर्यण्वतः ॥ ८ । २ । ४३ ॥ ]**

**ल्वादिभ्यः ॥ ८ । २ । ४४ ॥**

---

अथवा वृद्धि आहे निमित्त ज्याची असा जो वर्ण तो वृद्धिनिमित्त, त्या वृद्धिनिमित्ताहून पर असाही अर्थ असूं दे.

पण तो अर्थ घेतला असतां कार्तिः हें उदाहरण साधतें परंतु क्षैतिः हे उदाहरण साधत नाहीं असें आतांच सांगितलें आहे ना ?

तसा अर्थ घेतला तरी क्षैतिः हें उदाहरण साधतां येतें.

तें कसें ?

वृद्धिनिमित्तात् यांतील वृद्धि शब्दाचा अर्थ वृद्धिरूप आदेश सांगणारें जें शास्त्र तें घ्यावयाचें असा आहे.

तर मग एकंदरीत वृद्धिनिमित्तात् हा प्रतिषेध सांगितला पाहिजे असें दिसतें.

(वा. ५) तो प्रतिषेध सांगण्याचें कारण नाहीं.

कां बरें ?

बहिरंग आहे म्हणून. वृद्धि ही बहिरंग आहे आणि नत्व अंतरंग आहे. आणि अतरंग शास्त्र कर्तव्य असतांना बहिरंग शास्त्र असिद्ध होतें, अशी तर परिभाषा आहे. तेव्हां येथें कांहीं दोष येणार नाहीं. शिवाय या परिभाषेच्याच योगानें फौल्लिः या उदाहरणामध्यें ळत्वही सिद्ध होतें.

---

एकंदरीत वृद्धि हेंच जें निमित्त त्याहून पुढील निष्ठातकाराला प्राप्त झालेल्या नत्व वगैरेंचा निषेध, असा वृद्धिनिमित्तात्, या पदाचा अर्थ समजला असता क्षैतिः येथें वृद्धि या निमित्तानें प्राप्त झालेल्या 'क्षियो दीर्घात्' ( ८।२।४६ ) या नत्वाचा निषेध झाल्यामुळें क्षैतिः हें उदाहरण साधतें. तसें कार्तिः हेंही उदाहरण साधतें. कारण आर् या समुदायाला यदागमन्यायानें वृद्धि हा व्यवहार होत असल्यानें रेफाच्या द्वारानें वृद्धि या निमित्तानें प्राप्त झालेल्या निष्ठानत्वाचा निषेध होत आहे म्हणून, असें तात्पर्य.

८. इन्द्रार्था स्थूणा इन्द्रः । इन्द्र देवतेला उद्देशून सांगितलेल्या पूजा वगैरेंकरितां कल्पिलेली जी स्थूणा ( स्तम्भविशेष ) तेथें इन्द्र देवतेची भावना करून इन्द्र म्हणून पूजा वगैरे केली जाते, या भावनेला तादर्थ्यलक्षणा असें म्हटलें जातें. त्याप्रमाणें 'तद्धितेष्वचामादेः'

( ७।२।११७ ) हें शास्त्र वृद्धिविधानाकरतां असल्यामुळे त्या शास्त्राला तादर्थ्यलक्षणेनें वृद्धि असें म्हटलें आहे. तेव्हां वृद्धिशास्त्र आहे निमित्त म्ह० उत्पादक ज्याचें अशा वर्णाहून पुढील निष्ठातकाराला नत्व वगैरेंचा प्रतिषेध होतो असा 'वृद्धिनिमित्तात्' या वचनाचा अर्थ विवक्षित असल्यामुळे क्षैतिः येथें वृद्धिशास्त्रजन्य ऐकारनिमित्तक नत्वप्रतिषेध सिद्ध होत आहे असें तात्पर्य.

१ ( सू. ४३ ) आरंभीं संयोग असलेला असा असून य, र, ल, व यांनीं युक्त जो आकारान्त धातु त्याच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश होतो.

१ ( सू. ४४ ) 'लूञ् छेदने' याला आरंभ करून क्र्या दिगणांतील एकवीस धातूंच्या पुढील निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश होतो.

**ऋकारल्वादिभ्यः क्तिन्निष्ठावत् ॥१॥**

ऋकारल्वादिभ्यः क्तिन्निष्ठावद्भवतीति वक्तव्यम् । कीर्णिः गीर्णिः । लूनिः धूनिः ॥

**दुग्वोर्दीर्घश्च ॥ २ ॥**

दुग्वोर्दीर्घश्चेति वक्तव्यम् । आदूनः विगूनः ॥

**पूञो विनाशे ॥ ३ ॥**

पूञो विनाश इति वक्तव्यम् । पूना यवाः । विनाश इति किमर्थम् । पूतं धान्यम् ॥

**सिनोतेर्ग्रासकर्मकर्तृकस्य ॥ ४ ॥**

सिनोतेर्ग्रासकर्मकर्तृकस्येति वक्तव्यम् । सिनो ग्रासः । ग्रासकर्मकर्तृकस्येति किमर्थम् । सिता पाशेन सूकरी ॥

---

(सू. ४४ वा.१) दीर्घ ऋकार आणि लू वगैरे धातू यांहून पर जो क्तिन् प्रत्यय तो निष्ठाप्रत्ययासारखा[2] होतो. उदा० [3]कीर्णिः गीर्णिः लूनिः धूनिः.

( वा. २ ) दु आणि गु यांच्या पुढील निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला नकार होतो आणि त्याच्या बरोबरच दु आणि गु या धातूंमधील उकाराला दीर्घ होतो. उदा०–आदूनः विगूनः

( वा. ३ ) पूञ् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार होतो परंतु पूञ् धातूचा अर्थ विनाश असला पाहिजे उदा० [4]पूनाः यवाः ?

या वार्तिकामध्यें विनाशे हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

पूतं धान्यम् या ठिकाणीं तकाराला नकार होऊं नये म्हणून विनाशे हा शब्द घातला आहे.

(वा. ४) पांचव्या गणांतील बन्धनार्थक जो सि धातु त्याच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार होतो कर्मकर्तरि प्रयोगामध्यें. म्हणजे सि धातूचें ग्रास हें जें कर्म तोच कर्ता समजून प्रयोग केला असेल तर. उदा० सिनो [5]ग्रासः स्वयमेव.

ह्या वार्तिकामध्यें ग्रास हें जें कर्म तोच कर्ता असला पाहिजे असें कशाकरतां म्हटलें आहे ?

सिता पाशेन सूकरी या कर्मणि प्रयोगामध्यें नत्व न व्हावें याकरतां तसें म्हटलें आहे.

---

२ नत्व-प्रकरणामध्यें या वचनाचा पाठ असल्यामुळें 'निष्ठावत्' या वचनानें नत्वाचाच अतिदेश केला जातो. त्यामुळें पूनिः येथें 'पूङश्च' (७।२।५१) या इडागमाच्या विकल्पाचा अतिदेश होत नाही.

३ 'कॄ विक्षेपे' क्तिन्. निष्ठात्वाचा अतिदेश केला असल्यानें क्तिन् प्रत्ययाच्या तकाराला निष्ठेला सांगितलेलें नत्व होतें. कीर्णिः, गीर्णिः.

४ 'कुर्द खुर्द गुर्द गुद क्रीडायामेव' येथील एव-कारानें धातूंना अनेक अर्थ असल्याचें सुचविल्यावरून येथें पूञ् धातूचा निवाडा असा अर्थ विवक्षित आहे असें समजावें.

५ सिनो ग्रासः स्वयमेव-बन्धनानुकूलव्यापार हा षिञ् धातूचा अर्थ होय. येथें बंधन म्हणजे पिण्डीकरण समजावें. तो व्यापार देवदत्तरूप कर्त्याचें ठिकाणींही आहे; व ग्रासरूप कर्माचें ठिकाणींही आहे. जेव्हां धातूनें देवदत्तावरीलच व्यापार दाखविणें विवक्षित असेल तेव्हां देवदत्त हा व्यापाराचा आश्रय असल्यामुळें तो कर्ता होतो, आणि व्यापारजन्य फलाचा आश्रय असल्यामुळें ग्रास हें कर्म होतें. व जेव्हां षिञ् धातूनें ग्रासरूप कर्मावरीलच व्यापार दाखविणें विवक्षित असतें तेव्हां कर्माला व्यापाराचा आश्रय होण्यामुळें कर्तृत्वही येतें. म्हणून अशा तऱ्हेच्या कर्त्याला कर्मकर्ता असें म्हणतात. तात्पर्य—जेव्हां ग्रासरूप कर्माला कर्तृत्व विवक्षित असेल तेव्हां या वचनानें नत्वाचें विधान केलें जातें. ग्रासाला पिण्डाकृति देण्याकरितां हातानें फारसा प्रयत्न न करतां दध्यादि व्यंजनामुळें अनायासानेंच तो आकार प्राप्त होत आहे असें विवक्षित असतां हा वरील प्रयोग केला आहे असें समजावें.

[ ओदितश्च[1] ॥ ८ । २ । ४५ ]
क्षियो[1] दीर्घात् ॥ ८ । २ । ४६ ॥

दीर्घादिति किमर्थम् । अक्षितमसि मा मे क्षेष्ठाः( )॥ दीर्घादिति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति अक्षितमसि मा मे क्षेष्ठा इति । निर्देशादेवेदमभिव्यक्तं दीर्घस्य ग्रहणमिति । यदि ह्रस्वस्य ग्रहणं स्यात्क्षेरित्येव ब्रूयात् ॥ नात्र निर्देशः प्रमाणं शक्यं कर्तुम् । यथैवात्राप्राप्ता विभक्तिरेवमियङादेशोऽपि । नात्राप्राप्ता विभक्तिः । सिद्धात्र विभक्तिः प्रतिपदिकादिति । कथं प्रातिपदिकसंज्ञा । अर्थवत्प्रातिपदिकमिति । ननु चाधातुरिति

(सू. ४६ ) या सूत्रांत दीर्घात् हें पद कशाकरतां घातलें आहे ?

अक्षितमसि[2] मा मे क्षेष्ठाः या वाक्यामध्यें अक्षितम् येथें निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार होऊं नये म्हणून घातलें आहे.

या सूत्रामध्यें दीर्घात् हें पद घातलें नाहीं तरी चालेल.

तें घातलें नाहीं तर अक्षितमसि येथें तकाराला नकार कां होत नाहीं ?

क्षियः असें जें पाणिनीनें उच्चारण केलें त्यावरूनच येथें 'क्षी' असें दीर्घाचें ग्रहण केलें आहे हें स्पष्ट होत आहे. कारण जर येथें ऱ्हस्व 'क्षि' याचें ग्रहण हवें असतें तर पाणिनीनें 'क्षेः' असेंच म्हटलें असतें.

पाणिनीनें जे क्षियः असें उच्चारण केलें आहें तें 'या ठिकाणीं क्षी असा दीर्घाचा निर्देश केला आहे' याविषयीं प्रमाण धरणें बरोबर नाहीं. कारण पाणिनीनें जशी 'क्षियः' ही पंचमी विभक्ति प्राप्त नसूनच उच्चारली आहे तसा क्षि या ऱ्हस्वाला इयङ् आदेश प्राप्त नसूनही तो पाणिनीनें केला असेल असें म्हणतां येतें.

या ठिकाणीं क्षियः येथें पंचमी विभक्तीची प्राप्ति नाहीं हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण क्षी या प्रातिपदिकाहून येथें पंचमी विभक्ति सामान्य नियमावरूनच सिद्ध होत आहे.

येथें क्षि याला प्रातिपदिकसंज्ञा कशी होते ?

अर्थवदधातु० ( १।२।४५ ) या सूत्रानें अर्थयुक्त अशा शब्दस्वरूपाला प्रातिपदिक संज्ञा सांगितली आहे ती करतां येईल.

पण त्याच सूत्रांत धातूला प्रातिपदिक संज्ञा होत नाहीं असा निषेध केला आहे ना ?

---

१ ( सू० ४५ ) ओकार इत्संज्ञक असलेल्या धातूपुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश होतो.

१ ( सू० ४६ ) क्षि धातूंतील दीर्घ वर्णाच्या पुढील निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश होतो.

२ अक्षितम् येथें क्षि धातूहून भावार्थी क्त प्रत्यय होतो. भाव हा ण्यदर्थ असल्यामुळें 'निष्ठायामण्यदर्थे' (६।४।६० ) यानें दीर्घ होत नाहीं व दीर्घ नसल्यामुळे निष्ठा-तकाराला नत्व होत नाहीं.

३ क्षियः, हा ह्रस्व 'क्षि' धातूचा निर्देश असेल तर इयङादेशापेक्षां पर असल्यामुळें 'घेर्ङिति' ( ६।४।६७ ) या सूत्रानें गुण करणें रास्त होतें. असें असूनही ज्यापेक्षां गुण केला नाहीं त्यापेक्षां दीर्घ 'क्षी' धातूचा क्षियः हा निर्देश आहे असें तात्पर्य.

४ क्षियः हा धातूचा निर्देश आहे हें निर्विवाद आहे. अधातुः ( १।२।४५ ) या पर्युदासामुळें धातूला प्रातिपदिक संज्ञा करतां येत नाहीं. व प्रातिपदिक संज्ञा नसल्यामुळें पंचमी विभक्ति प्राप्त होत नाहीं. अर्थात् सौत्रत्वास्तव क्षियः ही विभक्ति आहे असें म्हणणें भाग आहे. तसें सौत्रत्वास्तवच ह्रस्वालाही इयङ् आदेश केला आहे असें म्हणणें सयुक्तिक असल्यामुळें इयङ् आदेश केल्यावरून 'क्षी' असा दीर्घाचा निर्देश ठरवितां येणें शक्य नाहीं.

प्रतिषेधः प्राप्नोति । नैष धातुर्धातोरेषोऽनुकरणः । यद्यनुकरण इयङादेशो न प्राप्नोति । प्रकृतिवदनुकरणं भवतीत्येवमियङादेशो भविष्यति । यदि प्रकृतिवदनुकरणं भवतीत्युच्यते स्वाद्युत्पत्तिर्न प्राप्नोति । एवं तर्ह्यातिदेशिकानां स्वाश्रयाण्यपि न निवर्तन्ते ॥ अथाप्येतन्नास्त्यातिदेशिकानां स्वाश्रयाण्यपि न निवर्तन्त

येथें क्षि हा धातू नव्हे, तर हें धातूचें अनुकरण पाणिनीनें केलें आहे.[5]

जर हें अनुकरण म्हणून धातू नसेल तर इयङ् आदेशही प्राप्त होत नाहीं. कारण तो धातूलाच सांगितला आहे.

अनुकरण हें मूळ प्रकृतीसारखेंच समजावें या परिभाषेवरून क्षि हें जरी अनुकरण आहे तरी तें आपल्या मूळ प्रकृतीसारखें धातू आहे असें समजून इयङ् आदेश करतां येईल.[6]

जर अनुकरण हें मूळ प्रकृतीसारखें होतें असें म्हणावें तर त्या अनुकरणाहून सु वगैरे विभक्तिप्रत्ययांची उत्पत्ति होणार नाहीं. कारण धातूचें अनुकरण धातूच आहे असें समजल्यामुळें प्रातिपदिक संज्ञा होणार नाहीं.[7]

तर मग येथें आम्ही असें म्हणतों कीं—अनुकरणाला मूळ प्रकृतीसारखें असें मानलें तरी त्याच्या स्वतःच्या स्वरूपावर अवलंबून असणारीं कार्यें हीं करतां येतात; तीं दूर सारतां येत नाहींत.[8]

शिवाय 'अनुकरणाला मूळ प्रकृतीसारखें असें मानलें तरी त्याच्या स्वतःच्या स्वरूपावर अवलंबून असणारीं कार्यें हीं करतां येतात तीं दूर सारतां येत नाहींत' असें जरी गृहीत धरलें नाहीं तरी देखील येथें दोष येत नाहीं. कारण

५ क्रियावाचकाला धातु संज्ञा सांगितली आहे. आणि अनुकरणाला तर केवळ अनुकार्य जो शब्द तद्वाचकत्वच आहे. अनुकार्याचा जो क्रिया हा अर्थ तद्वाचकत्व नाही. तेव्हां क्रियावाचकत्व नसल्यामुळें अनुकरणाला धातु म्हणतां येत नाहीं. अर्थात् अधातुः हा प्रतिषेध येऊं शकत नसल्यामुळें 'अर्थवत्' (१।२।४५) यानें येथें प्रातिपदिक संज्ञा होत आहे.

६ अनुकार्य क्षि धातूचा अर्थ क्रिया आणि अनुकरणाचा अर्थ क्षि धातू असा अर्थाचा भेद असल्यामुळें अनुकार्य आणि अनुकरण यांमध्यें जरी भेद आहे तरी 'प्रकृतिवदनुकरणं भवति' या वचनानें 'अनुकरण हें अनुकार्यासारखें समजावें' असा अतिदेश सांगितला आहे.

७ अनुकरणाच्या मूळ प्रकृतीला म्हणजे अनुकार्याला 'अधातुः' यानें प्रातिपदिक संज्ञेचा निषेध होत असल्यामुळें त्यांच्या अनुकरणालाही अतिदेशामुळें निषेध प्रसक्त होत आहे.

८ ज्यांना अतिदेशामुळें कार्यनिष्पत्ति होते, त्या शब्दांच्या स्वतःच्या स्वरूपावर अवलंबून असलेलें कार्य करण्यास हरकत नाहीं. प्रकृतस्थळीं इयङादेश होण्याकरितां अनुकरणाचे ठिकाणीं धातुत्वाचा अतिदेश मानला तरी अनुकरण स्वतः धातुभिन्न असल्यानें स्वाश्रयधातुभिन्नत्वप्रयुक्त प्रातिपदिक संज्ञा होईल.

९. अधातुः हा 'धातुः न' धातू प्रातिपदिकसंज्ञक होत नाहीं, अशा अर्थाचा प्रसज्यप्रतिषेध स्वीकारला असतां प्रातिपदिकसंज्ञा-निषेधाच्या प्रवृत्तीला कारण धातुत्व होत असल्यामुळें तो निषेध कर्तव्य असतां धातुत्वाचा अतिदेश प्रवृत्त झाल्यामुळें संज्ञानिषेध होईल. अर्थात् अतिदेशविषय–धातुत्वाशीं प्रातिपदिकसंज्ञा विरोधी होत असल्यामुळें स्वाश्रय (अनुकरणाच्या स्वतःच्या स्वरूपावर अवलंबून असलेल्या) कार्यांची निवृत्ती ठरत असल्यामुळें 'स्वाश्रय कार्यांची निवृत्ति होत नाहीं' असें म्हणतां येत नाहीं.

इत्येवमपि न दोषः । अवश्यमत्र सर्वतो नैर्देशिकी विभक्तिर्वक्तव्या । तद्यथा । नेर्विशः [१. ३. १७] परिव्यवेभ्यः क्रियः [१८] विपराभ्यां जेः [१९] इति ॥ अथाप्येतन्नास्ति प्रकृतिवदनुकरणं भवतीत्येवमपि न दोषः । धातोरादौ यद्रूपं तदनुक्रियते ॥

[ईयोऽस्पर्शे ॥ ८ । २ । ४७]
अञ्चोऽनपादाने ॥ ८ । २ । ४८ ॥
अञ्चेर्नत्वे व्यक्तप्रतिषेधः ॥ १ ॥

---

सूत्रामध्यें उच्चारण करणें झालें म्हणजे तेथें सर्वच ठिकाणीं विभक्ति अवश्य उच्चारावी लागतेच[10]. म्हणजे ज्याला विभक्ति लावतां येत नाहीं त्याला देखील सूत्रामध्यें विभक्ति लावावी लागतेच. असें पहा कीं– 'नेर्विशः' (१।३।१७) 'परिव्यवेभ्यः क्रियः' (१।३।१८) 'विपराभ्यां जेः' (१।३।१९) असें म्हणावें लागतेंच. या सूत्रांमध्यें पाणिनीनें वि वगैरे उपसर्गांना आणि विश् वगैरे धातूंना विभक्ति लावलीच आहे.

आणखीही[11] येथें असें म्हणतां येईल कीं 'अनुकरण हें आपल्या मूळ प्रकृतीसारखें असतें' असें जरी मानलें नाहीं तरी देखील येथें दोष येत नाहीं. कारण अजादि प्रत्यय पुढें असतांना क्षि धातूचें जसें रूप म्हणजे इयङ् झालेलें अन्यत्र दृष्टीस पडतें तसेंच येथें पाणिनीनें उच्चारलें आहे असें म्हणतां येईल.

---

१०. 'अपदं न प्रयुञ्जीत' असा कायदा असल्यामुळें प्रातिपदिक संज्ञेचा निषेध असल्याकारणानें ज्याहून विभक्ति प्राप्त होत नाहीं, आणि ज्याहून विभक्तीचा लुक् होतो असें अव्यय, या सर्व ठिकाणीं 'नेर्विशः' या निर्देशावरून अप्राप्त विभक्ति करावयाची असें सिद्ध होत असल्यामुळें क्षियः येथें विभक्त्यनुत्पत्तीचा दोष येत नाही. परंतु विभक्तीप्रमाणें इयङादेशाची स्थिति नसल्यानें 'क्षियः' येथें जशी विभक्ति अप्राप्त तसा इयङादेशही अप्राप्त असून केला आहे असे म्हणतां येत नाहीं, तर जेथें इयङादेश सरळ रीतीनें संभवेल तेथेंच करावयाचा. तो इयङादेश दीर्घालाच संभवत असल्यामुळें 'क्षियः' हा दीर्घ क्षी धातूचाच निर्देश ठरतो. म्हणून अक्षितम् येथें नत्व येऊं शकत नसल्यामुळें दीर्घात् हा शब्द अनर्थक होत आहे असें तात्पर्य आहे.

११. चिक्षियतुः इत्यादि स्थलीं अजादि प्रत्यय पुढें असतां दृष्ट जें 'क्षिय्' असें इयङ्–विशिष्ट शब्दस्वरूप त्याचें क्षियः येथें अनुकरण केलें आहे. 'प्रकृतिवदनुकरणम्' ही परिभाषा अनित्यत्वास्तव सोडून दिल्यानें सामान्य नियमानेंच प्रातिपदिक संज्ञा होते आणि अनायासानेंच विभक्त्युत्पत्ति साधते; आणि इयङ्निर्देशही उपपन्न होतो. आतां येथें अशी शंका येते की इयङ्–विशिष्टाचें अनुकरण म्हटलें असतां क्षिय् या शब्दाहून पुढच्या निष्ठातकाराला नत्व होतें, असा 'क्षियो दीर्घात्' या सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें व निष्ठा प्रत्यय पुढें असतांना क्षि धातुला इयङ् होण्याचा संभव नसल्यामुळें हें सूत्र अपार्थक होतें असें म्हणणें असेल तर तें बरोबर नाहीं. कारण इयङ् निर्देश हा उपलक्षण मानल्यानें क्वचित् स्थलीं अजादि प्रत्यय पुढें असतांना ज्याचें क्षिय् असें स्वरूप दृष्ट आहे तो धातु अर्थात् अनुकार्याचेंही मूळ स्वरूप घ्यावयाचें. तें मूळ स्वरूप ह्रस्वान्त क्षि धातु व दीर्घान्त क्षी धातु हे दोन्हीही संभवत असल्यामुळें अक्षितम् येथें नत्वव्यावृत्तीकरतां हें विशेषणच चरितार्थ होत आहे. तेव्हां इयङ् निर्देश दीर्घान्तच क्षी धातु घेण्याविषयीं प्रमाण होऊं शकत नसल्यामुळें दीर्घात् हें विशेषण दिलें पाहिजे.

१. (सू. ४७) इयैङ् धातू स्पर्शार्थक नसेल तर त्याचे पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार होतो.

१. (सू. ४८) अपादान-वाचकाचा प्रयोग नसेल तर अञ्च् धातूच्या पुढील निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला नकार होतो.

अञ्जेर्नत्वे व्यक्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । व्यक्तमनृतं कथयतीति ॥

आञ्जिविज्ञानात्सिद्धम् ॥ २ ॥

नैतदञ्चे रूपम् । अञ्जेरेतद्रूपम् ॥ अञ्जत्यर्थो वै गम्यते । कः पुनरञ्जत्यर्थः । अञ्जतिः प्रकाशने वर्तते । अञ्चितं गच्छति । प्रकाशयत्यात्मानमिति गम्यते । न वै लोके ऽञ्चितं गच्छतीति प्रकाशनं गम्यते । किं तर्हि । समाधानं गम्यते । समाहितो भूत्वा गच्छतीति । एवं तर्ह्यञ्जतेरङ्को ऽङ्कश्च प्रकाश-

---

( सू. ४८ वा. १ ) अञ्च्[२] धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला जो या सूत्रानें नकार सांगितला आहे तो व्यक्त या शब्दामध्यें होत नाहीं असें म्हणावें. उदा०-व्यक्तमनृतं कथयति.

हा निषेध सांगण्याचें कारण नाहीं.

(वा. २) कारण व्यक्त हें अञ्च् धातूपासून साधलेलें रूप नव्हे. हें अञ्ज् धातूचें रूप आहे.

व्यक्त या शब्दामध्यें अञ्च् धातूचा अर्थ प्रतीत होत आहे त्याची वाट काय ?

कोणता बरें अञ्च् धातूचा अर्थ येथें प्रतीत होत आहे ?

अञ्च् धातू प्रकाशन या अर्थी आहे. उदा० -अञ्चितं गच्छति. ज्या रीतीनें आपण लोकांच्या नजरेस येऊं अशा रीतीनें तो जात आहे असा अर्थ येथें मनांत येतो.

अञ्चितं गच्छति या प्रयोगापासून लोकामध्यें तो आपल्याला प्रकाशित करीत जातो असा अर्थ प्रतीत होत नाहीं.

तर मग या वाक्याचा काय अर्थ आहे ?

येथें समाधान हा अर्थ प्रतीत होत आहे. म्हणजे गडबड वगैरे कांहीं एक न करतांना स्वस्थ रीतीनें जातो असा या वाक्याचा अर्थ स्पष्ट रीतीनें मनांत येतो.

तर मग प्रकाशन करणें हा अञ्च् धातूचा अर्थ आहे याचें उदाहरण अङ्क हाच शब्द घ्या. अङ्क म्हणजे प्रकाशन करणें. अङ्किता गावः असा

---

२. अङ्कः किंवा अङ्कितः इत्यादि शब्द अञ्च् धातूपासूनच बनलेले असून त्यांपासून प्रकाशन हा अर्थ प्रतीत होत आहे. त्याप्रमाणें व्यक्त शब्दापासूनही प्रकाशन हा अर्थ प्रतीत होत असल्यामुळें व्यक्त शब्दही अञ्च् धातूपासूनच बनविला पाहिजे. असें आहे तर व्यक्त या शब्दामध्यें प्रकृत सूत्रानें निष्ठा-नत्व प्रसक्त होत आहे.

३. अञ्चितं गच्छति, येथें अञ्च् धातूचा प्रकाशन हा अर्थ असेल तर पूजा हा अर्थ नसल्यामुळें 'नाञ्चेः पूजायाम्' (६।४।३०) यानें नलोपाचा निषेध होणार नाहीं. व 'अञ्चेः पूजायाम्' (७।२।५३) यानें इडागमही होणार नाहीं. तेव्हां. 'पूज्य गमन' असा अर्थ विवक्षित असल्यानें पूजार्थकच अञ्च् धातू ठरत आहे. ती गमनाला पूज्यता प्रकाशितपणें किंवा स्वस्थपणें जाण्यानें असल्यामुळें 'आपल्याला प्रकाशित करीत जातो' किंवा 'स्वस्थ रीतीनें जातो' असें फलित म्हटलें आहे.

४. अङ्कः येथें अञ्च् धातूहून 'हलश्च' (३।३।१२१) या सूत्रानें करणीं घञ् प्रत्यय. ज्यानें प्रकाशन केले जातें तो अङ्क होय. यावरून येथें अञ्च् धातूचा प्रकाशन हा अर्थ स्पष्ट होत आहे. अञ्च् धातूहून करणार्थी घञ् प्रत्यय करून अङ्कः हा शब्द साधणें शक्य नाहीं. 'चजोः कुघिण्यतोः' (७।३।५२) या सूत्राने कुत्वानें गकार होऊन अङ्कः असा शब्द बनतो म्हणून. तेव्हां व्यक्त या शब्दापासून प्रकाशन हा अर्थ प्रतीत होत असल्यामुळें अञ्च् धातूपासूनच व्यक्त शब्द साधला पाहिजे. अञ्ज् धातूपासून व्यक्त शब्द बनविला तर तेथें प्रतीत होणारा अर्थ प्रकाशन हा जुळणार नाहीं.

नम् । अङ्किता गाव इत्युच्यते ऽन्याभ्यो गोभ्यः प्रकाश्यन्ते ॥

**अञ्चत्यर्थ इति चेदञ्जेस्तदर्थत्वात्सिद्धम् ॥ ३ ॥**

अञ्चत्यर्थ इति चेदञ्जिरप्यञ्चत्यर्थे वर्तते । कथं पुनरन्यो नामान्यस्यार्थे वर्तते । कथमञ्जिरञ्चत्यर्थे वर्तते । अनेकार्था अपि धातवो भवन्ति । अस्ति पुनः क्वचिदन्यत्राप्यञ्जिरञ्चत्यर्थे वर्तते । अस्तीत्याह । अञ्जेरञ्जनमञ्जनं च प्रकाशनम् । अङ्क्तेऽक्षिणी इत्युच्यते यत्तत्सितं चासितं चैतत्प्रकाशयति । तथाञ्जेर्व्यञ्जनं व्यञ्जनं च प्रकाशनम् । यत्तत्स्नेहेन मधुरेण च जडीकृतानामिन्द्रियाणां स्वस्मिन्नात्मनि व्यवस्थापनं स राग<sup></sup>स्तद्व्यञ्जनम् । अन्वर्थं खल्वपि निर्वचनम् । व्यज्यतेऽनेनेति

जो प्रयोग केला जातो त्याचा अर्थ अङ्किताः[५] म्ह० इतर गायींपेक्षां त्या गायी ज्यास्त प्रकाशित आहेत असा अर्थ मनांत येतो.

(वा. ३) व्यक्त या शब्दामध्यें अञ्च् धातूचा अर्थ प्रकाशित होणें हा प्रतीत होतो असें म्हणाल तर आम्ही असें म्हणतों कीं अञ्च् धातूचा प्रकाशित करणें हा अर्थ अञ्ज् धातूलाही आहे.

अञ्च् धातु निराळा आणि अञ्ज् धातु निराळा; तेव्हां अञ्ज् धातूला अञ्च् धातूचा अर्थ आहे असें कसें बरें म्हणतां येईल ?

धातू हे अनेक अर्थांचेही असूं शकतात.

पण असें एकादें उदाहरण लोकामध्यें दृष्टोत्पत्तीस येतें काय कीं जेथें अञ्ज् धातूचा प्रयोग अञ्च् धातूच्या अर्थी केला आहे ?

तसा प्रयोग आहे[६] असें आम्ही म्हणतों. अञ्जन हें रूप अञ्ज् धातूपासूनच सिद्ध होतें आणि अञ्जन शब्दाचा प्रकाशन हा अर्थ स्पष्टच आहे. अङ्क्ते[७] अक्षिणी असा लोकामध्यें प्रयोग होतो तेथें काळेपणा आलेला आहे असे जे नेत्र ते मूळच्या आपल्या पांढऱ्या रंगापेक्षां निराळे स्पष्टच दिसून येतात. तसेच व्यञ्जन हा शब्दही अञ्ज् धातूपासूनच साधला आहे. आणि व्यञ्जन शब्दाचा प्रकाशन हा अर्थ स्पष्टच आहे. जेव्हां चिकणपणामुळें किंवा माधुर्यानें इन्द्रियांमध्यें जाडय उत्पन्न होतें तेव्हां त्या इन्द्रियांना स्वतःच्या आपल्या मूळ स्वरूपावर आणून ठेवणें यालाच राग म्हणतात. आणि हेंच व्यंजन होय. आणि व्यञ्जन या शब्दाची निरुक्तीही

५. अङ्किता गावः अङ्कयुक्ताः कृता इत्यर्थः । मतुप् प्रत्ययान्त अङ्कवत् शब्दाहून 'तत्करोति०' (चुरा० ग. सू.) यानें णिच् केला असतां इष्टवद्भावामुळें 'विन्मतोः'० (५।३।६५) यानें मतुप् प्रत्ययाचा लुक्, टिलोप, निष्ठा क्त प्रत्यय, इडागम, आणि 'निष्ठायां सेटि' (६।४।५२) यानें णिलोप केला असतां अङ्कित हें रूप साधलें जातें.

६. व्यक्त शब्दामध्यें प्रकाशन हा अर्थ प्रतीत होत आहे. तेव्हां तो व्यक्त शब्द अञ्च् धातूपासून तयार करावा तर प्रकृत सूत्रानें निष्ठाप्रत्ययाच्या तकाराला नत्व प्रसक्त होतें. बरें, अञ्ज् धातूपासून बनवावा तर नत्व दूर होतें पण अञ्ज् धातूला प्रकाशन करणें हा अर्थ नसल्यानें त्या शब्दापासून प्रतीत होणारा प्रकाशन हा अर्थ मनांत येत नाहीं. अशी अडचण आली असतां ती दूर व्हावी म्हणून अञ्ज् धातु प्रकाशन या अर्थीही आहे, असें लौकिक प्रयोगावरून सप्रमाण ठरविण्यांत येत आहे.

७. अङ्क्ते. म्ह. मूळच्या पांडुरवर्ण नेत्राचें ठिकाणीं कृष्णवर्ण प्रकाशित करतो, असा अर्थ मनांत येतो. यावरून अञ्ज् धातू प्रकाशन करणें या अर्थी आहे हें स्पष्ट होत आहे.

८. ज्याच्यामुळें जिह्वेला रस कळूं लागतात तें व्यंजन होय. म्हणजे चटणी, कोशिंबीर, भाजी वगैरे.

व्यञ्जनमिति ॥

[ दिवोऽविजिगीषायाम् ॥ ८ । २ । ४९ ॥ ]

निर्वाणोऽवाते ॥ ८ । २ । ५० ॥

अवाताभिधाने ॥ १ ॥

अवाताभिधान इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । निर्वाणोऽग्निर्वातेन । निर्वाणः प्रदीपो वातेनेति ॥

[ शुषः कः ॥ ८ । २ । ५१ ॥

पचो वः ॥ ८ । २ । ५२ ॥

क्षायो मः ॥ ८ । २ । ५३ ॥

प्रस्त्योन्यतरस्याम् ॥ ८ । २ । ५४ ॥ ]

अनुपसर्गात् फुल्लक्षीबकृशोल्लाघाः ॥ ८ । २ । ५५ ॥

अनुपसर्गादित्युच्यते तत्रेदं न सिध्यति परिकृशमिति ।

कृशेः क एष विहित इगुपधात्

नैतन्निष्ठान्तम् । किं तर्हि । कृश एष इगुपधात्को विहितः ॥

---

अशीच होत आहे. व्यज्यते अनेन तद् व्यञ्जनम्. ज्याच्या योगानें एखादी गोष्ट प्रकाशित केली जाते त्याला व्यञ्जन म्हणतात. असा हा व्यञ्जन शब्द येथें अन्वर्थच जुळतो.

( सू. ५० वा. १ ) निर् उपसर्गपूर्वक वा धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला हा जो नकार सांगितला आहे तो त्या निष्ठाप्रत्ययान्त शब्दानें वात या अर्थाचें प्रतिपादन केलें नसेल तर होतो असें म्हणावें. कारण निर्वाणोऽग्निर्वातेन; निर्वाणः प्रदीपो वातेन येथें नकार झाला पाहिजे.

( सू. ५५ ) येथें अनुपसर्गात् असें म्हटलें आहे; म्हणून परिकृश हें उदाहरण सिद्ध होत नाहीं.

परिकृश हा शब्द कृश् धातूला निष्ठा प्रत्यय लागून तयार झाला आहे असें समजूं नये.

तर मग येथें कोणता प्रत्यय केला आहे ?

इगुपध० ( ३।१।१३५ ) या सूत्रानें सांगितलेला क प्रत्यय येथें कृश् धातूहून केला आहे.

---

तेलकट तुपट किंवा गोड गोड पदार्थ भक्षण केल्यानें जिभेवर एक प्रकाराचा साका ( लेप ) बसतो. तो प्रतिबंधक झाल्यानें जिभेला अन्न-रस कळून येत नाहीं. अशा स्थितींत चटणी वगैरे व्यंजन पदार्थांचें भक्षण केल्यानें साका दूर होऊन पुनः स्पष्टपणें अन्नरस कळून येऊं लागतात. अशा प्रकारच्या व्यंजन शब्दाच्या व्युत्पत्तीवरूनही अञ्ज् धातूचा प्रकाशित करणें हा अर्थ ठरत आहे.

१. ( सू. ४९ ) दिव् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश होतो, पण जिंकण्याची इच्छा हा अर्थ तेथें मनांत येत नसेल तर.

१. (सू. ५०) निस् उपसर्ग असलेल्या वा धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकारादेशाचें निपातन केलें आहे. पण तेथें वात हा कर्ता नसावा.

१. (सू. ५१) शुष् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला ककार आदेश होतो. जसें-शुष्कः

१. ( सू. ५२ ) पच् धातूच्या पुढील निष्ठातकाराला वकार होतो. जसें-पक्वः.

१. (सू. ५३) क्षै धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला मकार आदेश होतो. जसें- क्षामः.

१. (सू. ५४) प्र शब्द पूर्वी असलेल्या स्त्यै धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला मकार आदेश विकल्पेंकरून होतो. जसें- प्रस्तीमः, प्रस्तीतः.

१. ( सू. ५५ ) फुल्ल, क्षीब, कृश, आणि उल्लाघ या शब्दांचें निपातन केलें आहे. पैकी फुल्ल शब्दामध्यें फल् धातूच्या पुढील निष्ठा तकाराला लकार, व क्षीब्, कृश् आणि उद् शब्द पूर्वी असलेला लाघ् या धातूंच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराचा लोप, आणि निष्ठा प्रत्ययाला इडागमाचा अभाव, अशीं कार्यें निपातनानें या धातूंना उपसर्ग मागें नसतांना केलीं आहेत.

**स्वरे हि दोषो भवति परिक्रुशे ।**

नैवं शक्यम् । इह हि परिक्रुश इति स्वरे दोषः स्यात् । अन्तस्थाथघक्ताजबित्रकाणाम् [ ६. २. १४३; १४४ ] इत्येष स्वरः प्रसज्येत ।

**पदस्य लोपो विहित इति मतम्**

एवं तर्हि पदस्य लोपो द्रष्टव्यः । पर्यागतः कार्श्येन परिक्रुशः ॥

**जगत्यनूना भवति हि रुचिरा ॥**

**फलेर्लत्व उत्पूर्वस्योपसंख्यानम् ॥१॥**

फलेर्लत्व उत्पूर्वस्योपसंख्यानं कर्तव्यम् । उत्फुल्लोऽनृतं कथयति ॥

अत्यल्पमिदमुच्यते उत्पूर्वादिति । उत्फुल्लसंफुल्लयोरिति वक्तव्यम् । उत्फुल्लः संफुल्लः ॥

**क्रुशेः क एष विहित इगुपधा-**
**त्स्वरे हि दोषो भवति परिक्रुशे ।**
**पदस्य लोपो विहित इति मतं**
**जगत्यनूना भवति हि रुचिरा ॥**

---

परिक्रुश हा शब्द क प्रत्यय लागून साधतो असें म्हणतां येणार नाहीं. कारण क प्रत्यय केला असतां परिक्रुश या उदाहरणामध्यें स्वराविषयीं दोष येईल. तो असा कीं, अन्तः ( ६।२।१४३ ) या सूत्राच्या पुढील 'थाथघञ्क्ताजबित्रकाणाम्' (६।२।१४४) या सूत्रानें कप्रत्ययान्त शब्दाला सांगितलेला अन्तोदात्त स्वर परिक्रुश शब्दामध्यें होऊं लागेल.

तर मग परिक्रुश या शब्दामध्यें मधल्या पदाचा लोप झाला आहे असें समजावें: पर्यागतः कार्श्येन परिक्रुशः म्ह० कृशपणानें सर्व बाजूंनीं व्यापलेला जो मनुष्य तो परिक्रुश होय.

ही जी परिक्रुश शब्दाची व्युत्पत्ति जगापुढें मांडली आहे ती फार चांगली आहे. कारण तिच्यामध्यें कोणत्याच प्रकारचा कमीपणा नाहीं. परिक्रुश हा शब्दही साधतो आणि त्यामधील इष्ट स्वरही साधतो. जगामध्यें परिपूर्णत्व म्हणजेच सौंदर्य.

( वा. १ ) या सूत्रामध्यें फल् धातूच्या निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला जो लकार सांगितला आहे, तो त्या फल् धातूच्या मागें उद् उपसर्ग असतांनाही होतो असें म्हणावें. उदा०-उत्फुल्लोऽनृतं कथयति.

उत् उपसर्ग असतांना होतो हें म्हणणें फारच थोडें आहे. उत्फुल्ल आणि संफुल्ल या दोन्ही ठिकाणीं निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला लकार होतो असें म्हटलें पाहिजे. उदा०-उत्फुल्लः, संफुल्लः.

---

२. आद्युदात्त परिक्रुशः हा शब्द परिशब्द मागें असलेल्या 'कृश तनूकरणे' या धातूहून कर्मणि क्त प्रत्यय करून निपातनानें निष्ठा तकाराचा लोप करून साधावा तर अनुपसर्गात् असें म्हटलें असल्यामुळें तकाराचा लोप होऊं शकत नाहीं. बरें, कर्तृव्यापाराची अविवक्षा करून तनूभवन या अर्थाच्या कृश् धातूहून 'इगुपधज्ञा०' ( ३।१।१३५ ) या सूत्रानें कर्तरि क प्रत्यय करून साधावा तर 'थाथघञ्क्ताजबि०' ( ६।२।१४४ ) यानें अन्तोदात्त स्वर होईल तो इष्ट नाहीं; तर आद्युदात्त पद इष्ट आहे. ही अडचण दूर करण्याकरतां पर्यागतः कार्श्येन परिक्रुशः अशी याची व्युत्पत्ति समजावी. म्हणजे परि हा गम् धातूचा उपसर्ग होतो. कृश् धातूचा होत नाहीं. त्यामुळें कृश् धातु उपसर्गरहितच असल्यानें निष्ठा प्रत्ययाच्या तकाराचा लोप साधतो. मात्र कृशः हा भावप्रधान निर्देश विवक्षित असल्यामुळें कार्श्य हा त्याचा अर्थ समजावा. 'तत्पुरुषे तुल्यार्थ०' ( ६।२।२ ) यानें अव्ययपूर्वपद प्रकृतिस्वर झाल्यामुळें आद्युदात्त स्वरही साधतो. म्हणून 'पर्यागतः कार्श्येन' ही व्युत्पत्ति चांगली आहे. 'जगामध्यें परिपूर्णत्व म्हणजेच सौंदर्य' असाही अर्थ येथें भाष्यकारांना अभिप्रेत असावा. व त्यांनीं त्या अर्थाची 'जगत्यनूना०' ही ओळ म्हण ( आभाणक ) म्हणून त्या वेळीं प्रसिद्ध असलेली फारच खुबीनें या श्लोकांत अर्थान्तरन्यासानें घातली आहे.

**नुदविदोन्दत्राघ्राह्रीभ्योऽन्यतरस्याम् ॥ ८ । २ । ५६ ॥**

किमयं विधिराहोस्वित्प्रतिषेधः । किं चातः । यदि तावद्विधिर्नकारग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः [ ४२ ] इति । तद्वा अनेकेन निपातनेन व्यवच्छिन्नं न शक्यमनुवर्तयितुम् । अथ प्रतिषेधो ह्रीग्रहणमनर्थकं न ह्येतस्माद्विधिरस्ति ॥ यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावद्विधिः । ननु चोक्तं नकारग्रहणं कर्तव्यम् न कर्तव्यम् प्रकृतमनुवर्तते क्व प्रकृतम् रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च द इति तद्वा अनेकेन निपातनेन व्यवच्छिन्नं न शक्यमनुवर्तयितुमिति । संबन्धमनुवर्तिष्यते । अथवा क्रियते न्यास एव । द्विनकारको निर्देशः । नुदविदोन्दत्रा-

(सू. ५६) या सूत्रानें नुद विद् वगैरे धातूंच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला जो नकार सांगितला आहे त्याचा या सूत्रानें विधि केला आहे किंवा निषेध केला आहे. ?

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

फरक असा कीं जर हा नकाराचा विधि आहे असें मानलें तर या सूत्रामध्यें नकार उच्चारावा लागेल.[2]

नकार उच्चारण्याचें कारण नाहीं. कारण मागाहून नकार अनुवृत्त होत आहे.

मागें कोणत्या सूत्रामध्यें नकार उच्चारला आहे ?

'रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः' (७।२।४२) या सूत्रामध्यें.

'रदाभ्याम्०' या सूत्रामध्यें जरी 'नः' असें म्हटलें आहे तरी त्याच्या अनुवृत्तीला मध्ये बरींच निपातनें केलीं असल्यामुळें खंड पडला आहे. तेव्हां त्या नकाराचा येथें संबंध करणें शक्य नाहीं. आतां सूत्रामध्यें नत्वाचा निषेध केला आहे असें म्हणावें तर या सूत्रांतील ह्री-ग्रहण निरर्थक होतें. कारण ह्री धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला कोणत्याही सूत्रानें नकार प्राप्त झालेला नाहीं.

तर मग या सूत्रामध्यें वाटेल तसें असूं दे. नत्वाचा विधि केला आहे असें कां होईना; कांहीं हरकत नाहीं.

पण आतांच सांगितलें आहे ना कीं—" या सूत्रामध्यें नकार ग्रहण करावें लागेल. नकाराचा उच्चार करण्याचें कारण नाहीं. कारण मागाहून नकार अनुवृत्त होत आहे. मागें कोणत्या सूत्रांत नकार उच्चारला आहे ? 'रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः' या सूत्रामध्यें. 'रदाभ्याम्०' या सूत्रामध्यें जरी नः असें म्हटलें आहे तरी त्याच्या अनुवृत्तीला मध्यें बरींच निपातनें केलीं असल्यामुळें खंड पडलें आहे. तेव्हां त्या नकाराचा येथें संबंध करणें शक्य नाहीं. "

तर मग प्रकृत सूत्रामध्यें 'रदाभ्याम्०' या सूत्रातून नकाराची संबंधानुवृत्ति[3] करतां येईल. अथवा ह्या प्रकृत सूत्रामध्यें पाणिनीनें नकार[4]

१. (सू. ५६) नुद्, विद्, उन्द्, त्रा, घ्रा आणि ह्री या धातूंच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश विकल्पानें होतो.

२. ह्या सूत्रामध्यें निषेध सांगितला आहे असें मानलें तर ह्या प्रकरणामध्यें जें सांगितलें आहे त्याचा निषेध होईल व तेवढ्यानेंच काम भागेल; नकाराचें प्रत्यक्ष उच्चारण करावयास नको.

३. संबंधानुवृत्ति म्हणजे मध्यें नुसता संबंध मात्र करावयाचा असतो. वाक्यार्थामध्यें त्याचा प्रवेश होत नाहीं. अनुवृत्ति कायमच राहते.

४. 'अन्यतरस्यां न ध्याख्या०' असा संहिता-पाठ आहे. तेथें नकाराच्या मागें अनुस्वार असल्यामुळें एक नकार किंवा दोन अथवा तीन नकार यांच्या उच्चारणांत कांहीं फरक होत नाहीं. तेव्हां येथें दोन नकार नाहींत असें म्हणण्याविषयीं सबळ पुरावा नसल्यामुळें पाणिनीनें येथें

घ्राह्रीभ्योऽन्यतरस्यां न ध्याख्यापॄमूर्छिमदाम् [ ५७ ] इति । अथवा पुनरस्तु प्रतिषेधः । ननु चोक्तं ह्रीग्रहणमनर्थकं न ह्येतस्माद्विधिरस्तीति । नानर्थकम् । एतदेव ज्ञापयत्याचार्यो भवत्येतस्माद्विधिरिति यदयं ह्रीग्रहणं करोति ॥

## [ न[१] ध्याख्यापॄमूर्छिमदाम् ॥ ८ । २ । ५७ ॥]

## वित्तो[१] भोगप्रत्यययोः ॥ ८ । २ । ५८ ॥

बहव इमे विदयः पठ्यन्ते । तत्र न ज्ञायते कस्य नित्यं नत्वं कस्य विभाषा कस्य प्रतिषेधः कस्येडिति ॥ अत उत्तरं पठति ।

**यस्य विदेः श्नशकौ तपरत्वे तनवचने तदु वाप्रतिषेधौ ।**

---

उच्चारला आहेच. म्हणजे ' नुदविदोन्दत्राघ्राह्रीभ्योऽन्यतरस्यांन्न ध्याख्यापॄमूर्छिमदाम् ' असा हा दोन नकारांचा येथें निर्देश केला आहे.

किंवा ह्या सूत्रानें नत्वाचा निषेध केला आहे असें म्हटलें तरी चालेल. पण त्यासबंधानें आतांच म्हटलें आहे कीं नत्वाचा निषेध मानला तर ह्री-ग्रहण निरर्थक होईल. कारण ह्री धातूच्या पुढील निष्ठा तकाराला नकार कोणींच सांगितला नाहीं.

या सूत्रांतील ह्री-ग्रहण निरर्थक आहे असें समजूं नये.

कारण हा आचार्य पाणिनि या सूत्रामध्यें जें हें ह्री ग्रहण करतो त्यावरूनच तो असें सुचवितो कीं ह्री धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकाराचा विधि आहे.

(सू. ५८) हे विद् धातू धातुपाठामध्यें बरेचसे दृष्टीस पडतात. तेव्हां त्यांपैकीं कोणत्या विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार नित्य होतो, तसेंच कोणत्या विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार विकल्पानें होतो, तसेंच कोणत्या विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकाराचा निषेध होतो आणि कोणत्या विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराच्या मागें इट् आगम होतो हें कांहींच निश्चित समजत नाहीं.

हा सर्व विचार मनांत घेऊन त्याच्या उत्तरा-दाखल म्हणतात—श्न प्रत्यय विकरण ज्या विद् धातूच्या पुढें लागतो त्या विद् धातूच्या पुढें त प्रत्यय केला असता त्या प्रत्ययाच्या तकाराला नकार कर्तव्य असतांना 'नुदविद०' ( ८।२।५६ ) या सूत्रानें तो नकार विकल्पानें होतो[२]. आणि ज्या धातूला

---

दोन नकार उच्चारले आहेत असें बेधडक विधान करितां येतें. 'वा पदान्तस्य' ( ८।४।५९ ) यानें परसवर्ण केला नाहीं त्या पक्षीं हें आहे. परसवर्ण केला त्या पक्षीं 'झलो यमाम्०'(८।४।६४) यानें मध्यम नकाराचा लोप झाला आहे असें समजावें; पैकीं एक नकार पूर्वसूत्रांतील आहे, व दुसरा उत्तरसूत्रांतील आहे. तेव्हां नकार-ग्रहणाची अनुवृत्ति नसली तरीही विधिपक्ष उपपन्न होण्यास कांहीं अडचण नाहीं.

१. ( सू. ५७ ) ध्या, ख्या, पॄ, मूर्छ्, आणि मद् या धातूंच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश होत नाहीं.

१. ( सू. ५८ ) वित्त शब्दामध्यें विद् धातूच्या पुढील क्त प्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश होत नाही, असें निपातन केलें आहे, भोग आणि प्रत्यय हे अर्थ असतांना.

२. 'नुदविदो०' या सूत्रामध्यें विद् धातूच्या पुढें पडलेल्या उन्द् धातूच्या साहचर्यास्तव ' विद विचारणे' हा रौधादिकच धातू घ्यावयाचा आहे.

अविकरणस्य विभाषा शविकरणस्य प्रतिषेधः ॥

श्यन्विकरणाच्च विधिश्छिदितुल्यः

श्यन्विकरणाद्विदेर्नविधिश्छिदिना तुल्यः ॥

लुग्विकरणो वलि पर्यवपन्नः ॥

लुग्विकरणो विदिर्वलादौ पर्यवपन्नः ॥

एष एवार्थः ।

ययोर्विदोः श्नशावुक्तौ तयोर्नत्वस्य वानञौ ।

ययोस्तु श्यँल्लुकौ ताभ्यां छिदिवच्चेड्वलीष्यते ॥

अपर आह ।

वेत्तेस्तु विदितो निष्ठा विद्यतेर्विन्न इष्यते ।

विन्तेर्विन्नश्च वित्तश्च वित्तो भोगेषु विन्दतेः ॥

---

श प्रत्यय विकरण लागतो त्या धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला प्रकृत सूत्रानें नकाराचा निषेध[3] होतो.

ज्या विद् धातूला श्यन् प्रत्यय विकरण लागतो त्या विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार नित्य[4] होतो. ज्याप्रमाणें छिद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार नित्य होतो त्याप्रमाणेंच हें होय.

ज्या विद् धातूच्या पुढील विकरण प्रत्ययाचा लुक् होतो त्या विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्यय वलादीच कायम राहून त्याला इडागम होत असतो.[5]

हीच गोष्ट पुढील श्लोकांत नमूद केली आहे.

ययोर्विदोः श्नशावुक्तौ तयोर्नत्वस्य वानञौ ।

ययोस्तु श्यन्लुकौ ताभ्यां छिदिवच्चेड्वलीष्यते ॥

ज्या विद् धातूच्या पुढें श्न आणि श हे विकरण होतात त्या विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला जो नकार प्राप्त होत आहे त्याचा क्रमानें विकल्प आणि निषेध होत असतो. परंतु ज्या विद् धातूला श्यन् प्रत्यय विकरण लागतो आणि ज्या विद् धातूच्या विकरण प्रत्ययाचा लुक् होतो, त्या विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला क्रमानें छिद् धातूप्रमाणें नित्य नकार होतो आणि त्याला इट् होतो असें इष्ट आहे. याविषयींच पुढील श्लोकांत उदाहरणें देऊन सांगितलें आहे.

वेत्तेस्तु विदितो निष्ठा विद्यतेर्विन्न इष्यते ।

विन्तेर्विन्नश्च वित्तश्च वित्तो भोगेषु विन्दतेः ॥

अदादि गणातील विद् धातूला निष्ठा प्रत्यय लागून विदितः असें रूप होतें. दिवादि गणांतील विद् धातूचें विन्नः असें रूप होतें. रुधादि गणांतील विद् धातूची विन्नः वित्तः अशीं दोन रूपें होतात. आणि तुदादि गणांतील विद् धातूचें भोग वगैरे अर्थ गम्यमान असतांना वित्तः असें रूप होतें.

---

३. ज्ञान या अर्थाच्या अदादि गणांतील विद् धातूच्या पुढील निष्ठा प्रत्ययाला इट् आगम होतो. सत्तार्थक दिवादि गणांतील विद् धातु आणि विचारणार्थक रुधादि गणांतील विद् धातु यांची भोग आणि प्रत्यय या अर्थीं वृत्ति संभवत नाहीं. अर्थात् ' वित्तो भोग० ' ( ८।२।५८ ) या सूत्रामध्यें ' विद लाभे ' हा तुदादि गणांतीलच धातु घ्यावयाचा आहे.

४. सत्ता या अर्थाचा दिवादि गणांतील विद् धातु अनिट् असल्यामुळें निष्ठा प्रत्ययाला इडागम होत नाहीं. त्या विद् धातूविषयीं ' वित्तो भोग० ' किंवा ' नुदविदो० ' हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं. अर्थात ' रदाभ्याम्० ' ( ८।२।४२ ) या सूत्रानें निष्ठा प्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश नित्य होतो.

५. अदादि गणांतील ज्ञान या अर्थाचा विद् धातु उदात्त असल्यामुळें त्याच्या पुढील निष्ठा प्रत्ययाला इडागम होतो. तेव्हां निष्ठा तकार व्यवहित झाल्यामुळें तेथें ' रदाभ्याम्० ' या नत्वाची प्राप्ति येऊं शकत नाहीं. आणि म्हणूनच ' वित्तो भोग० ' किंवा ' नुदविदो० ' यांचीही तेथें प्राप्ति येऊं शकत नाहीं. येथें डॉ. कीलहॉर्न यांनीं छापिलेल्या प्रतींत ' छिदिवच्चेट् च इष्यते ' असा पाठ आहे. तो वरील पान ३७१ मधील 'कस्येट्' या प्रश्नास धरून आहे.

भित्तं शकलम् ॥ ८ । २ । ५९ ॥

भित्तं शकलमित्युच्यते तत्रेदं न सिध्यति भित्तं भिन्नमिति । नैष दोषः । सर्वत्रैवात्र भिदिर्विदारणसामान्ये वर्तते तत्रावश्यं विशेषार्थिना विशेषोऽनुप्रयोक्तव्यः । भिन्नम् किम् भित्तमिति ॥

तत्वमभिधायकं चेच्छकलस्यानर्थकः प्रयोगः स्यात् । शकलेन चाप्यभिहिते न भवति तत्वं निगमयामः ॥

[ऋणमाधमर्ण्ये ॥ ८ । २ । ६० ॥

नसत्तनिषत्तानुत्तप्रतूर्तसूर्तगूर्तानि च्छन्दसि ॥ ८ । २ । ६१ ॥]

---

(सू. ५९) शकल अर्थ असतांना भिद् धातूला निष्ठा प्रत्यय लागून नकार न होतां भित्त असें रूप होतें असें येथें म्हटलें आहे. त्यामुळें भित्तं भिन्नं हें उदाहरण साधत नाहीं.[2]

हा दोष येत नाहीं. कारण शकल अर्थ असो किंवा दुसरा कांहीं अर्थ असो सर्व ठिकाणीं भिद् धातू हा सामान्य विदारण करणें या अर्थाला दाखवितो. तेव्हां ती विदारण केली जाणारी वस्तु कोणती अशी विशेष समजण्याची इच्छा असेल तर त्या विशेष वस्तूला दाखविणाऱ्या शब्दाचा अवश्य प्रयोग करावा. भिन्न म्हणजे विदारण केलेली वस्तु कोणती तर त्याचें उत्तर भित्त म्ह० शकल असें सांगितलें जातें. या अर्थी भित्तं भिन्नं असा प्रयोग केला आहे.

भित्त असें तकारघटित रूप शकल या अर्थाला जर दाखवीत आहे तर त्या ठिकाणीं शकल शब्दाचा प्रयोग करणें निरर्थक होय. ज्या ठिकाणीं शकल शब्दानेंच शकल अर्थ दाखविला जात असेल त्या ठिकाणीं तकार-घटित भित्त शब्दाचा प्रयोग होत नाहीं असें आम्ही समजतों.

---

१. (सू. ५९) भिद् धातूच्या पुढील क्त प्रत्ययाच्या तकाराला नकार आदेश होत नाहीं असें निपातनानें सुचविलें आहे, शकल हा अर्थ वाच्य असतांना.

२. शकल हा अर्थ असतां भित्त असें निपातन केलें आहे. म्हणजे भित्त शब्दामध्यें नत्वाचा अभाव करण्यास शकल हा अर्थ निमित्त म्हणून धरला आहे. तेव्हां विदारण-विषय वस्तू असा मोघम अर्थ असतां भिन्न असें रूप होतें म्हणजे तेथें निष्ठानत्व होतें. आतां भिन्नशब्दवाच्यविदारण-विषय वस्तू कोणती तें दाखविण्याकरतां शकल-वाचक भित्त शब्द घालून भिन्नम् असें वाक्य मांडलें, तेव्हां शकल-वाचक भित्त शब्दाशीं समानाधिकरण असल्यामुळें भिन्न शब्दही या अर्थाचा प्रतिपादक होत असल्यानें भित्त शब्दाप्रमाणें भिन्न शब्दामध्येंही नत्वाचा अभाव प्रसक्त होत आहे. तेव्हां भित्तं भित्तं असाच प्रयोग करणें उचित असल्यानें भित्तं भिन्नम् हें उदाहरण साधत नाहीं.

३. भित्त शब्द हा अवयवार्थ-निरपेक्ष असा शकल या अर्थी रूढ आहे. अवयवार्थ विदारण हें केवळ शब्द साधण्यापुरतेंच आहे. तेव्हां भित्त शब्द शकल शब्दाचा पर्याय होत आहे. जसा शकल शब्द हा क्रिया-शब्द नव्हे तर जाति-शब्द आहे तसाच भित्त शब्दही होय. तेव्हां पर्याय शब्दांचा जसा घटकलशौ असा युगपत् प्रयोग होत नाहीं तसा भित्त आणि शकल या दोन्ही शब्दांचा एकदम प्रयोग होत नाहीं; म्हणून भित्त शब्द असेल तेथे शकल शब्द प्रयोगांत येऊं शकत नाहीं, आणि शकल शब्द असेल तेथें भित्त शब्द येऊं शकत नाहीं.

१. (सू. ६०) ऋण शब्दामध्यें ऋ धातूच्या पुढील क्त प्रत्ययाच्या तकाराला नकारादेशाचें निपातन केलें आहे, ऋणकोचा व्यवहार असतांना म्हणजे तुझ्याकडून घेतलेलें द्रव्य अमुक कालानें अमुक वाढीनें परत देईन इत्यादि व्यवहार असतांना. असल्या व्यवहाराला विषय झालेलें जें द्रव्य तें ऋणवाच्य होय.

१. (सू. ६१) नसत्त, निषत्त अनुत्त, प्रतूर्त, सूर्त, आणि गूर्त या शब्दांचें वेदामध्यें निपातन केलें आहे. म्हणजे नसत्त येथें नञ्पूर्वक सद् धातूच्या पुढील निष्ठा तकाराला नत्वाचा अभाव. निषत्त येथें नि पूर्वक सद् धातूच्या पुढील क्त प्रत्ययाच्या तकाराला

## क्विन्प्रत्ययस्य कुः ॥ ८।२।६२॥

प्रत्ययग्रहणं किमर्थं न क्विनः कुरित्येवोच्येत । क्विनः कुरितीयत्युच्यमाने वकारस्यैव कुत्वं प्रसज्येत । ननु च लोपे कृते न भविष्यति । अनवकाशं कुत्वं लोपं बाधेत । सावकाशं कुत्वम् । कोऽवकाशः । अनन्त्यः । कथं पुनः सत्यन्त्येऽनन्त्यस्य कुत्वं स्यात् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नान्त्यस्य कुत्वं भवतीति यदयं क्विनः कुरिति कवर्गेनिर्देशं करोति । इतरथा हि तद्गुणमेवायं निर्दिशेत् ॥ इदं तर्हि प्रयोजनं येभ्यः क्विन्प्रत्ययो

---

(सू. ६२) या सूत्रामध्यें प्रत्ययस्य हें पद कशाकरिता घातलें आहे? तें न घालतां क्विनः कुः असेंच सूत्र करावें.

क्विन: कुः इतकेंच सूत्र केलें तर क्विन् प्रत्ययाच्या वकारालाच कुत्व होऊं लागेल.

पण क्विन् प्रत्ययाचा लोप झाल्यानंतर अर्थातच त्यांतील वकाराला कुत्व होणार नाहीं.

कुत्वाला अन्य ठिकाणीं कोठेंही चारितार्थ्य नसल्यामुळें तें लोपाचा बाध करील.

कुत्वाला चारितार्थ्य आहे.

तें कोठें चारितार्थ्य आहे?

अन्त्याच्या मागील वर्णाला कुत्व करतां येईल. म्हणजे क्विन् प्रत्ययाचा लोप झाल्यानंतर त्याच्या मागील वर्णाला कुत्व करता येईल.

लोप करण्याच्या पूर्वी क्विन् प्रत्ययातील वकार अंतीं असतांना अन्त्य नव्हे अशा मागील वर्णाला कुत्व कसें बरें करतां येईल?

ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'क्विनः कुः' या सूत्रामध्यें कु शब्दानें संपूर्ण क-वर्गाचा निर्देश करतो त्या अर्थी याच आचार्याच्या कृतीवरून असें सूचित होतें कीं अन्त्याला म्हणजे क्विन् प्रत्ययाच्या वकाराला कुत्व होत नाहीं. नाहींतर म्हणजे जर क्विन् प्रत्ययाच्या वकारालाच कुत्व हवें असेल तर त्या वकाराच्या गुणांचा[६] जो क-वर्गातील एक घकार त्या घकाराचाच त्यानें निर्देश केला असता. म्हणजे 'क्विनो घः' असेंच

---

नत्वाचा अभाव. अनुत्त शब्दामध्यें नञ् पूर्वी असलेल्या उन्द धातूच्या पुढील क्त प्रत्ययाच्या तकाराला 'नुदविदो०' (८।२।५६) यानें नत्व विकल्पाचा अभाव. प्रतूर्त येथें त्वर् किंवा तुर्व् धातूच्या पुढील क्त प्रत्ययाच्या तकाराला नत्वाचा अभाव. सूर्त येथें स्र धातूच्या ऋकाराला उत्व आणि क्त प्रत्ययाच्या तकाराला नत्वाभाव. गूर्त येथें 'गुरी उद्यमने' या धातूच्या पुढील क्त प्रत्ययाच्या तकाराला नत्वाचा अभाव. हे सर्व नत्वाभाव निपातनानें केले आहेत.

१. (सू. ६२) क्विन् प्रत्यय ज्या धातूहून इष्ट आहे तो धातु पदान्तीं असतांना त्याला कवर्ग अन्तादेश होतो.

२. क्विन् हा प्रत्ययच असल्यानें प्रत्यय नव्हे असा क्विन् कोठेंच नसल्यामुळें त्याच्या निवृत्तीकरितां प्रत्यय शब्द घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं, म्हणून हा प्रश्न केला आहे.

३. 'प्रत्ययाचें ग्रहण केलें असतां तेथें तो प्रत्यय ज्याहून केला तो शब्द आरंभीं व तो प्रत्यय शेवटीं असलेल्या अशा समुदायाचें ग्रहण करावें' अशी परिभाषा असल्यामुळें क्विन् प्रत्ययाच्या वकारालाच कुत्व होऊं लागेल.

४. क्विन् प्रत्यय करण्याबरोबर लगेच त्याचा लोप प्राप्त होत असल्यानें लोप हा अंतरंग आहे. आणि पदाला कुत्व सांगितलें असल्यामुळें क्विन् प्रत्ययानंतर स्वादि प्रत्यय केला असताना कुत्व प्राप्त होणार असल्यामुळें तें बहिरंग आहे. तेव्हां अन्तरंगत्वास्तव प्रथमतः क्विन् प्रत्ययाचा लोप होईल.

५. क्विबादि प्रत्ययाविषयीं वेरपृक्तलोप सावकाश असल्यानें विशेषविहित कुत्व लोपाचा अपवाद होईल.

६. घोष संवार नाद व अल्पप्राण हे चार बाह्य प्रयत्न वकार आणि घकार या दोघांचे सारखे आहेत म्हणून वकाराला आपल्या गुणाचा कवर्गातील घकार होय.

७. ज्यापेक्षां तसा अर्थ केला नाही त्यापेक्षां वकाराला कुत्व करूं नये असें पाणिनीच्या मनांत आहे असें ठरतें.

विधीयते तेषामन्यप्रत्ययान्तानामपि पदान्ते कुत्वं यथा स्यात्। मा नो अस्राक्। मा नो अद्राक् ॥

क्विनः कुरिति वक्तव्ये प्रत्ययग्रहणं कृतम्।
क्विन्प्रत्ययस्य सर्वत्र पदान्ते कुत्वमिष्यते॥

[ [1]नशेर्वा ॥ ८ । २ । ६३ ॥

[1]मो नो धातोः ॥ ८ । २ । ६४ ॥

[1]म्वोश्च ॥ ८ । २ । ६५ ॥

[1]ससजुषो रुः ॥ ८ । २ । ६६ ॥

[1]अवयाः श्वेतवाः पुरोडाश्च ॥ ८ । २ । ६७ ॥]

[1]अहन् ॥ ८ । २ । ६८ ॥

रुविधावह्नो रूपरात्रिरथंतरेषूपसंख्यानम् ॥ १ ॥

रुविधावह्नो रूपरात्रिरथंतरेषूपसंख्यानं

---

पाणिनीनें म्हटलें असतें.

तर मग या सूत्रांतील प्रत्यय शब्दाचा उपयोग असा समजावा कीं ज्या धातूंहून क्विन् प्रत्यय सांगितला आहे त्या धातूंहून क्विन् न करतां त्यासारखा दुसरा प्रत्यय केला तरी तेथेंही कुत्व झालें पाहिजे.[८] उदा०—मा नो अस्राक्[९], मा नो अद्राक्.

क्विनः कुः एवढेंच सूत्र करून भागत असतां जो मुद्दाम पाणिनीनें प्रत्यय शब्द घातला आहे त्यावरून असें समजतें कीं ज्या धातूहून क्विन् प्रत्यय सांगितला आहे त्या धातूला सर्व ठिकाणीं म्हणजे क्विन् प्रत्यय नसताही पदान्तीं कुत्व इष्ट आहे.

(सू. ६८ वा. १) अहन् शब्दाच्या नकाराला जें हें रुत्व सांगितलें आहे तेथें रूप रात्रि आणि रथंतर हे शब्द पुढें असतांना अहन् शब्दाच्या

---

८. प्रत्यय-ग्रहण केलें त्या जोरावर क्विन् प्रत्ययो यस्मात् असा येथें बहुव्रीहि समास समजावा. तो बहुव्रीहि समास उपलक्षणस्थलींही होतो. जसें 'चित्रा गावो यस्य स चित्रगुरानीयताम्' असें सांगितलें असतां गायी त्याच्या बरोबर नसतांही गायी या खुणेवरून ओळखलेला मनुष्य आणिला जातो तसें येथें क्विन् प्रत्यय केला नसतांही त्या खुणेवरून ओळखलेल्या धातूला क्विप् प्रत्यय केला असतांही कुत्व करावयाचें म्ह० 'क्विन्प्रत्ययस्य' हा अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि आहे.

९. सृज् आणि दृश् या धातूंहून 'माङि लुङ्' तिप्, च्लि, सिच् 'बहुलं छन्दसि' (७।३।९७) यानें ईडभाव. हल्ङ्यादिलोप 'सृजिदृशोर्झ०' (६।१।५८) यानें अमागम. वदव्रज० (७।२।३) यानें वृद्धि. बहुलं छन्दस्यमाङ्० (६।४।७५) यानें अडागम. व्रश्चभ्रस्ज० (८।२।३६) यानें षत्व प्राप्त झालें असतां कुत्वानें जकाराला गकार. व शकाराला खकार. चर्त्वानें एकदां ककार. अस्राक् अद्राक्.

१. (सू. ६३) नश् धातूला पदान्ती क-वर्ग अन्तादेश विकल्पानें होतो.

१. (सू. ६४) धातूच्या मकाराला नकार होतो, तो मकार पदाच्या शेवटीं असतांना.

१. (६५) मकार शेवटीं असलेल्या धातूच्या मकाराला नकार होतो, मकार आणि वकार पुढें असतांना.

१. (सू. ६६) पदाच्या शेवटीं असलेल्या सकाराला व सजुष् शब्दाला रुत्व होतें.

१. (सू. ६७) अवयास् श्वेतवास् पुरोडास् हे तीन शब्द संबुद्धि पुढें असतांना कृतदीर्घ असे उच्चारले आहेत. अवयज्, श्वेतवाह्, आणि पुरोडाश् या शब्दांहून ण्विन् प्रत्यय केला असतां, आणि 'ङस्पदस्य' या वचनानें ङस् प्रत्यय केला असतां हीं निपातनें आहेत असें समजावें.

१. (सू. ६८) अहन् शब्दाला रु आदेश होतो, त्या अहन् शब्दावर पदाचा शेवट होत असतांना.

कर्तव्यम् । अहोरूपम् अहोरात्रः अहोरथंतरं साम ॥

रोऽसुपि ॥ ८ । २ । ६९ ॥

अमुपि रादेश उपसर्जनसमासे प्रतिषेधोऽलुकि ॥ १ ॥

असुपि रादेश उपसर्जनसमासे ऽलुकि प्रतिषेधो वक्तव्यः । दीर्घाहा निदाघ इति ॥

सिद्धं तु सुपि प्रतिषेधात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । सुपि प्रतिषेधात् । प्रसज्यायं प्रतिषेधः सुपि नेति ॥ इहापि तर्हि न प्राप्नोति । अहर्ददाति । अहर्भुङ्क्त इति ।

लुकि चोक्तम् ॥ ३ ॥

किमुक्तम् । अहो रविधौ लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवतीति ॥

---

नकाराला रुत्व होतें असें मुद्दाम निराळें वचन करावें. उदा० अहोरूपम् अहोरात्रः अहोरथंतरं साम. या उदाहरणांमध्यें पुढील सूत्रानें रत्व प्राप्त झालें आहे त्याचा बाध करून रुत्व झालें पाहिजे याकरितां मुद्दाम निराळें वचन केलें आहे.

(सू. ६९) सुप् पुढें नसतांना अहन् शब्दाच्या नकाराला जो हा रेफ आदेश सांगितला आहे त्या ठिकाणीं अहन् शब्दाला गौणत्व देऊन समास केला असतांना व त्याच्या पुढील सुप् प्रत्ययाचा लुक् केला नसतांना रेफ आदेश होत नाहीं असें म्हणावें. उदा०—दीर्घाहो निदाघः.

( वा. २ ) दीर्घाहा निदाघः हें उदाहरण सहजच सिद्ध होत आहे.

तें कसें ?

सुप् पुढें असतांना रेफ आदेश होत नाहीं असा हा सूत्रकारांनीं रेफादेशाचा निषेध केला आहे म्हणून. कारण सूत्रामध्यें असुपि या पदामध्यें जो निषेध दाखविला आहे तो प्रसज्यप्रतिषेध आहे. म्हणजे सुप् पुढें असतांना रेफ आदेश होत नाहीं असा त्याचा अर्थ आहे.

तर मग अहर्ददाति अहर्भुङ्क्ते या उदाहरणांमध्येंही रेफ आदेश होणार नाहीं असा दोष येईल.

(वा. ३) सु प्रत्ययाचा लुक् झाला असतांना रेफादेशाचा निषेध होत नाहीं याचें कारण मागें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

अहन् शब्दाला रेफ आदेश कर्तव्य असतांना जर त्याच्या पुढील सु प्रत्यय लुक् वगैरे शब्दांनीं लुप्त झाला तर तेथें प्रत्ययलक्षण होत नाहीं असें मागें सांगितलें आहे.

---

१. सू. ( ६९ ) अहन् शब्दाला रेफ आदेश होतो. परंतु सु औजस् इत्यादि सुप् प्रत्यय पुढें असतां त्याला रेफादेश होत नाहीं.

२. दीर्घाणि अहानि यस्मिन् स दीर्घाहाः निदाघः असा निदाघ शब्दार्थाचा अंतर्भाव करून बहुव्रीहि करून दीर्घाहन्–स्–निदाघ असें असतां परत्वास्तव प्रथमतः ' सर्वनामस्थाने० ' (६।४।८) यानें उपधादीर्घ. नंतर हल्ङ्यादिलोप. प्रत्ययलक्षणानें सुप् पुढें असल्यामुळें सिद्धान्तीं रेफाचा निषेध झाल्यामुळें रुत्व होतें. नंतर ' भोभगो०' यानें यत्व; आणि यकाराचा लोप झाल्यानें दीर्घाहा निदाघः असा प्रयोग होतो. तेथें ' असुपि ' हा पर्युदास घेतला तर सुप्–भिन्न सुप्–सदृश हल् पुढें असतां रेफ आदेश होतो असा अर्थ झाल्यानें दीर्घाहान्-निदाघ येथें हल् पुढें असल्यामुळें नकाराला रुत्वाचा अपवाद रेफादेश होईल. आणि रु आदेशाला सांगितलेलें यत्व येथें होणार नाहीं. तेव्हां दीर्घाहानिंदाघः असा अनिष्ट प्रयोग होईल. म्हणून रेफादेशाचा प्रतिषेध सांगावा, असें वार्तिकाचें तात्पर्य आहे.

३. असुपि हा प्रसज्यप्रतिषेध गृहीत धरला असल्यामुळें अहः या उदाहरणामध्यें प्रत्ययलक्षणाचा निषेध असल्यानें सुप् पुढें आहे असें म्हणतां येत नाहीं, म्हणून तेथें रुत्वाचा अपवाद असलेला रेफादेशच

**[1]अम्नरूधरवरित्युभयथा छन्दसि ॥ ८ । २ । ७० ॥**

**छन्दसि भाषायां च प्रचेतसो राजन्युपसंख्यानम् ॥ १ ॥**

छन्दसि भाषायां च प्रचेतसो राजन्युपसंख्यानं कर्तव्यम् । प्रचेतो राजन् । प्रचेता राजन् ॥

अहरादीनां पत्यादिषूपसंख्यानं कर्तव्यम्। अहर्पतिः अहःपतिः । अहर्पुत्रः अहःपुत्रः । गीर्पति : गीःपतिः ॥

**[ [1]भुवश्च महाव्याहृतेः ॥ ८ । २ । ७१ ॥ ]**

**[1]वसुस्रंसुध्वंस्वनडुहां दः ॥ ८ । २ । ७२ ॥**

इह कस्मान्न भवति । पपिवान् तस्थिवानिति । सस्येति वर्तते । एवमप्यत्र प्राप्नोति ।

---

(सू. ७० वा. १) वेदामध्यें आणि लोकामध्यें प्रचेतस् शब्दाच्या सकाराला राजन् शब्द पुढें असतांना रेफ आदेश विकल्पानें होतो असें वचन करावें. उदा०—प्रचेतो [2]राजन्, प्रचेता राजन्.

अहरादिगणपठित शब्दांच्या शेवटच्या रेफाला पति वगैरे शब्द पुढें असतांना रेफादेश विकल्पानें होतो असें करावें. उदा०—अहर्पतिः, अहᳵपतिः, अहःपतिः. अहर्पुत्रः, अहᳵपुत्रः, अहःपुत्रः. गीर्पतिः, गीᳵपतिः, गीःपतिः. धूर्पतिः, धूᳵपतिः, धूःपतिः.

( सू. ७२ ) या सूत्रानें सांगितलेला दकार आदेश पपिवान् तस्थिवान् या उदाहरणामध्यें कां नाहीं ?

या सूत्रामध्यें मागाहून सस्य या पदाचा संबंध होत आहे.

सस्य या पदाचा संबंध केला तरी वरील उदाहरणांमध्यें दकार आदेश प्राप्त होत आहेच.

---

होतो. आणि दीर्घाह्वा निदाघः या ठिकाणीं प्रत्ययलक्षणानें सुप् पुढें असल्यामुळें रेफाचा निषेध होऊन रुत्व होतें.

१. ( सू. ७० ) अम्नस् ऊधस् आणि अवस् या शब्दांना वेदामध्यें रुत्वही होतें आणि रेफादेशही होतो.

२. प्रचेतो राजन्. संबुद्धीचा हल्ङ्यादि-लोप. असंबुद्धौ या पर्युदासामुळें 'अत्वसन्तस्य०' यानें दीर्घ होत नाही. सकाराला रुत्व. त्याला 'हशि च' यानें उत्व. रेफादेश केल्यावेळीं त्या रेफाचा 'रो रि' यानें लोप. आणि 'ढ्रलोपे०' यानें दीर्घ होऊन प्रचेता राजन् असें होतें.

३. अहर्पतिः इत्यादि स्थळीं प्राप्त असलेल्या विसर्गाचा पक्षीं बाध करण्याकरितां रेफाला रेफाचेंच पक्षीं विधान या वचनानें केलें आहे. त्यामुळें पक्षीं विसर्ग व उपध्मानीय होतो.

१. ( सू. ७१ ) महाव्याहृति असा जो भुवस् शब्द त्याच्या सकाराला वेदामध्यें रुत्व किंवा रेफादेश होतो.

१. ( सू. ७२ ) सकारान्त अशा वसुप्रत्ययान्ताला आणि स्रंसु ध्वंसु व अनडुह् या शब्दांना दकार आदेश होतो पदान्त असतांना.

२. पपिवस्-स् असें असतां 'अत्वसन्तस्य०' ( ६।४।१४ ) यानें उपधादीर्घ 'उगिदचाम०' यानें नुमागम-हल्ङ्यादि लोप. आणि सकाराचा संयोगान्त लोप केल्यानें पपिवान् असें रूप होतें. या सूत्रामध्यें 'ससजुषोः०' ( ८।२।६६ ) येथून सकाराची अनुवृत्ति येते. तेव्हां सकारान्त अशा वस्वन्त पदाला दकार आदेश होतो असा अर्थ झाल्यामुळें पपिवान् येथें दत्वाला त्रैपादिकासिद्धत्व असल्यामुळें अगोदर संयोगान्तलोप झाल्यानें सकार नाहींसा झाल्यामुळें दकार होत नाहीं.

३. दकार आदेश हा पर असल्यामुळें संयोगान्तलोपाला मागें सारून अगोदरच येत आहे. असिद्धत्व मनांत न घेतां हें लिहिलें आहे.

लोपे कृते न भविष्यति। अनवकाशं दत्वं लोपं बाधेत। सावकाशं दत्वम्। कोऽवकाशः। पपिवद्भ्याम् पपिवद्भिरिति। अत्रापि रुः प्राप्नोति। तद्यथैव रुं बाधत एवं लोपमपि बाधेत। न बाधते। किं कारणम्। येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्ते रौ दत्वमारभ्यते लोपे पुनः प्राप्ते चाप्राप्ते च॥ यदि तर्हि सस्येति वर्तते अनडुद्भ्याम् अनडुद्भिरित्यत्र न प्राप्नोति। वचनादनडुहि भविष्यति यद्येवम्

- अनडुहो दत्वे नकारप्रतिषेधः ॥ १ ॥

अनडुहो दत्वे नकारस्य प्रतिषेधं वक्तव्यः। अनड्वान्॥

सिद्धं तु प्रतिपदविधानान्नुमः ॥ २ ॥

सिद्धमेतत्। कथम्। नुमः प्रतिपदविधा

---

सकाराला लोप केल्यानंतर सकार नाहीं म्हणून दकार होणार नाहीं. दत्वाला चारितार्थ्य नसल्यामुळें निरवकाश असें हें दत्व 'संयोगान्तस्य लोपः' (८।२।२३) या सूत्रानें प्राप्त झालेल्या सकाराच्या लोपाचा बाध करील.

पण दत्वाला अन्य ठिकाणीं चारितार्थ्य आहे ना ?

कोठें बरें चारितार्थ्य आहे ?

पपिवद्भ्या पपिवद्भिः या उदाहरणांमध्यें दत्वाला चारितार्थ्य आहे. या ठिकाणीं दत्वाला चारितार्थ्य आहे असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण येथे देखील लोप नाहीं तरी रुत्व प्राप्त होत आहे. तेव्हां जसें येथें रुत्वाचा बाध करून दत्व होतें तसें पपिवान् या ठिकाणीं लोपाचाही बाध करून दत्व होईल.

दत्व हें लोपाचा बाध करणार नाहीं.

कां बरें ?

दत्वाच्या विषयामध्यें सर्व ठिकाणीं ज्या कार्याची प्राप्ति येत असेल त्याच कार्याचा तें दत्व बाध करूं शकेल. प्रकृत स्थलीं रुत्व हें दत्वाच्या सर्व उदाहरणांमध्यें कोठेंहीं प्राप्त हो नाहीं असें नाहीं. असें असतां मुद्दाम सांगितले दत्व रुत्वाचा बाध करतें हें बरोबर आहे. प लोपाविषयीं तसें नाहीं. कारण लोप हा दत्वाच्य उदाहरणांपैकीं कांहीं ठिकाणीं प्राप्त होतो आणि कांहीं ठिकाणीं प्राप्त होत नाहीं.[5]

जर या सूत्रामध्यें सस्य या पदाचा संबं केला तर अनडुद्भ्याम् अनडुद्भिः या ठिकाण हकाराला दत्व होणार नाहीं.

अनडुह् शब्दाला मुद्दाम निराळें दत्व सांगित आहे म्हणून वरील उदाहरणांमध्यें सकार नस तांही दत्व करतां येईल.[6]

जर असें मानलें तर —

(वा. १) अनडुह् शब्दाविषयीं सस्य य पदाचा संबंध केला नाहीं तर अनड्वान् ये नकाराला दत्व होऊं लागेल त्याचा निषेध केल पाहिजे.

(वा. २) अनड्वान् हें उदाहरण सिद्ध हो आहे.

तें कसें ?

---

४. दकार आदेशाला 'पूर्वत्रासिद्धम्' (८।२।१) यानें असिद्धत्व असल्यामुळें प्रथमतः संयोगान्तलोप होतो.

५. 'येन नाप्राप्ते' या न्यायानें दकार आदेशाच्या सर्व उदाहरणांमध्यें प्राप्त असलेल्या रुत्वाचेंच तें बाधक होतें. कचित्स्थलीं प्राप्त असलेल्या संयोगान्तलोपाचे तें अपवादक होत नाहीं. तेव्हां दत्वाला संयोगान्त-लोपाच्या दृष्टीनें असिद्धत्व असल्यामुळें पूर्व संयोगान्त-लोप झाल्यानें सकार नसल्यामुळें पपिवा येथें दकार आदेश होत नाहीं.

६. अनडुह् शब्दाचे शेवटीं सकार मुळींच नसल्या मुळें त्याला 'सस्य' हें विशेषण लागूं करतां ये नाहीं.

नसामर्थ्याद्दत्वं न भविष्यति ॥ यदि तर्हि यद्यदनडुहः प्राप्तं तत्तन्नुमःप्रतिपदविधानसामर्थ्याद्बाध्यते रुत्वमपि न प्राप्नोति । अनड्वांस्तत्रेति । नैष दोषः । यं विधिं प्रत्युपदेशोऽनर्थकः स विधिर्बाध्यते यस्य तु विधेर्निमित्तमेव नासौ बाध्यते । दत्वं च प्रति नुमः प्रतिपदविधिरनर्थको रोः पुनर्निमित्तमेव ॥

[ तिप्यनस्तेः[1] ॥ ८।२।७३ ॥

सिपि धातो रुर्वा[1] ॥ ८।२।७४ ॥

दश्च[1] ॥ ८।२।७५ ॥

र्वोरुपधाया दीर्घ इकः[1] ॥ ८।२।७६ ॥

हलि च[1] ॥ ८।२।७७ ॥ ]

उपधायां च[1] ॥ ८ । २ । ७८ ॥

किमर्थमिदमुच्यते न हलीत्येव सिद्धम् । न सिध्यति । धातोरिति तत्र वर्तते तत्र रेफवकाराभ्यां धातुर्विशेष्यते । रेफवकारान्तस्य धातोरिति । किं पुनः कारणं पूर्व-

---

अनडुह् शब्दाला 'सावनडुहः' (७।१।८२) या सूत्रानें मुद्दाम नुमागम सांगितला आहे म्हणून. ज्या अर्थी अनडुह् शब्दाला मुद्दाम नुमागम सांगितला आहे त्या अर्थी त्या नुमागमानें झालेल्या नकाराला दत्व होणार नाहीं.

असेंच जर असेल तर अनडुह् शब्दाला जें जें कार्य प्राप्त होत असेल त्या त्या कार्याचा अनडुह् शब्दाला मुद्दाम सांगितलेल्या नुमागमाच्या जोरावर बाध होईल आणि अनड्वांस्तत्र या उदाहरणामध्यें 'नश्छव्यप्रशान्' (८।३।७) या सूत्रानें जें नकाराला रुत्व होत असतें तेंही होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण जें कार्य झालें असतां नुमागमाचें विधान निरर्थक होतें त्याच कार्याचा नुमागमानें बाध होईल. पण हा नुमागम ज्या कार्याला कारणीभूतच होत असेल त्या कार्याचा तो कधींही बाध करणार नाहीं. प्रकृत स्थलीं अनडुह् शब्दाला मुद्दाम सांगितलेला नुमागम त्या नकाराला दत्व होईल तर निरर्थक होत आहे. पण रुत्वाला तर तो निमित्तच आहे.

(सू. ७८) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? तें करण्याचें कारण नाहीं. कारण 'हलि च' (८।२।७७) या पूर्वसूत्रानेंच उदाहरणें सिद्ध होत आहेत.

या सूत्राचीं उदाहरणें 'हलि च' या पूर्वसूत्रानें सिद्ध होणार नाहींत. कारण पूर्वसूत्रामध्यें धातोः या पदाचा संबंध आहे. आणि त्या धातूला रेफ आणि वकार (र्वोः) हें विशेषण दिलें आहे. त्यामुळें रेफान्त किंवा वकारान्त जो धातू असा तेथें अर्थ होत आहे.

---

१. (सू. ७३) पदाच्या शेवटच्या सकाराला दकार आदेश होतो तिप् प्रत्यय पुढें असतांना; मात्र अस् धातूला हा दकार करूं नये.

१. (सू. ७४) पदाच्या शेवटीं असलेल्या धातूच्या सकाराला विकल्पानें रु आदेश होतो, सिप् प्रत्यय पुढें असतांना; रुत्वाचे अभावपक्षीं दकार होतो.

१. (सू. ७५) पदाच्या शेवटीं असलेल्या धातूच्या दकाराला विकल्पानें रुत्व होतें सिप् प्रत्यय पुढें असतांना.

१. (सू. ७६) रेफ किंवा वकार अंतीं असलेला जो धातु त्याच्या उपधासंज्ञक इकाला दीर्घ होतो पदान्त असतांना.

१. (सू. ७७) रेफान्त किंवा वकारान्त धातूच्या उपधाभूत इकाला दीर्घ होतो हल् पुढे असतांना.

१. (सू. ७८) हल् आहे पुढें ज्याच्या असा जो धातूचा उपधाभत रेफ किंवा वकार तो पुढें असतांना मागील इकाला दीर्घ होतो.

२. 'र्वोरुपधाया०' या पूर्वसूत्रामध्यें.

स्मिन्योगे रेफवकाराभ्यां धातुर्विशेष्यते । इह मा भूत् । अग्निर्वायुरिति ॥ एवं तर्हि पूर्वस्मिन्योगे यद्धातुग्रहणं तदुत्तरत्र निवृत्तम् । एवमपि कुर्कुरः मुर्मुर इत्यत्रापि प्राप्नोति ॥ एवं तर्ह्यनुवर्तते तत्र धातुग्रहणं न तु रेफवकाराभ्यां धातुर्विशेष्यते । किं तर्हि । इग्विशेष्यते । रेफवकारान्तस्येको धातोरिति ॥ एवमपि कुर्कुरीयति मुर्मुरीयतीत्यत्र प्राप्नोति । तस्माद्धातुरेव विशेष्यो धातौ च विशेष्यमाण उपधायां चेति वक्तव्यम् ॥

**उपधादीर्घत्वेऽभ्यासजिव्रिचतुर्णां प्रतिषेधः ॥ १ ॥**

उपधादीर्घत्वेऽभ्यासजिव्रिचतुर्णां प्रतिषेधो वक्तव्यः । रिर्यतुः रिर्युः । संविव्यतुः

पूर्वसूत्रामध्यें रेफवकार ( र्वोः ) हें धातूचेंच विशेषण केलें आहे आणि पदाचें विशेषण केलें नाहीं याचें काय बरें कारण असावें ?

कारण असें कीं अग्निः वायुः या उदाहरणांमध्यें रुत्व केल्यावर विसर्ग करण्याच्या पूर्वी अग्निर् वायुर् अशी स्थिति असतांना ‘ हलि च ’ (८।२।७७) या सूत्रानें दीर्घ होऊं लागेल तो न झाला पाहिजे.

असें असेल तर मग ‘ र्वोरुपधाया० ’ ( ८।२।७६ ) या सूत्रामध्यें जें धातुग्रहण अनुवृत्त आलें आहे त्याचा पुढील हलि च ( ८।२।७७ ) या सूत्रामध्यें संबधच केला नाहीं म्हणजे झालें.

असें केलें तरी कुर्कुरः मुर्मुरः येथें देखील दीर्घ होऊं लागेल.

तर मग ‘हलि च’ या सूत्रामध्यें धातुग्रहणाचा संबंध होऊं दे; परंतु रेफवकार हें मात्र त्या धातूचें विशेषण करूं नये.

तर मग तें विशेषण कोणाचें करावें ?

तें विशेषण इकाचें करावें म्हणजे असा अर्थ होतो कीं–रेफ किंवा वकार यांच्या मागील जो इक् त्याला दीर्घ होतो तो इक् धातुसंबंधीं असला म्हणजे झालें.

असें केलें तरी कुर्कुरीयति मुर्मुरीयति या ठिकाणींही दीर्घ होऊं लागेल. याकरितां रेफवकार (र्वोः) हे धातूचेंच विशेषण केलें पाहिजे. आणि तें धातूचेंच विशेषण केलें म्हणजे अर्थातच ‘ उपधायां च ’ ( ८।२।७८ ) हें सूत्र केलें पाहिजे

( वा. १ ) हा जो या सूत्रानें उपधेला दीर्घ सांगितला आहे तो दीर्घ अभ्यास, जिव्रि, आणि चतुर् या तीन ठिकाणीं होत नाहीं असा त्याचा निषेध सांगितला पाहिजे. उदा०—रिर्यतुः रिर्युः[६],

३. ‘ हलि च ’ या सूत्रामध्यें धातुग्रहणाचा संबध केला नसतां, हल् पुढें असतांना रफान्त किंवा वकारान्त जो शब्द त्याच्या उपधाभूत इकाला दीर्घ होतो असा त्या सूत्राचा अर्थ झाल्यामुळें मुर्छा–मूर्छिता धुर्वी–धूर्विता इत्यादि उदाहरणें हलि च यानेंच साधत आहेत.

४. कुर् इत्यव्यक्तं शब्दं कुरुते कुर्कुरः कुक्कुरः (कुतरा) इत्यर्थः. मुर्मुरः–तुषाग्निः तथा च माघे–स्मरहुताशनमुर्मुरचूर्णताम्, इति.

५. कुर्कुरमात्मन इच्छति कुर्कुरीयति. कुर्कुर शब्दाहून ‘ सुप् आत्मनः क्यच्’ ( ३।१।८ ) यानें क्यच्. ‘क्यचि च’ ( ७।४।३३ ) यानें मागील अकाराला ईकार आदेश. याचप्रमाणें मुर्मुरीयति.

६. ‘ रि गतौ ’, ‘वी गत्यादिषु०’ लिट्. अतुस्. द्विर्वचन ‘ एरनेकाचो०’ ( ६।४।८२ ) यानें यणादेश. रिर्यतुः विव्यतुः. येथें यण् केला असतां धातूचे उपधाभूत रेफवकार होत आहेत म्हणून अभ्यासांतील इकाराला दीर्घ प्रसक्त होत आहे. तो दीर्घ झाला असतां त्याला असिद्धत्व असल्यामुळें ऱ्हस्व होणार नाहीं. ‘जीर्यतेः क्रिन् रश्च वः ’ ( उणा. ५।४९ ) या सूत्रानें जॄ धातूहून क्रिन् प्रत्यय. धातूच्या ऋकाराला इर् आदेश. रेफाला वकार. जिव्रिः. येथें ‘ हलि च ’

संविव्युः । जिव्रिः । चतुर्यिता चतुर्यितुम् ॥

**उणादिप्रतिषेधश्च ॥ २ ॥**

उणादीनां च प्रतिषेधो वक्तव्यः । किर्योः गिर्योरिति ॥

अभ्यासप्रतिषेधस्तावन्न वक्तव्यः । हलीत्युच्यते न चात्र हलादिं पश्यामः । यणादेशे कृते प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भविष्यति । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावो दीर्घविधिं प्रति न स्थानिवदिति । नैषोऽस्ति प्रतिषेधः । उक्तमेतत्प्रतिषेधे स्वरदीर्घयलोपेषु लोपाजादेश इति ॥ जिव्रिप्रतिषेधश्च न वक्तव्यः । उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि ॥ चतुर्यिता चतुर्यितुमिति सुपि नेति वर्तते । यद्येवं गीर्भ्याम् गीर्भिरित्यप्रसिद्धिः ।

---

संविव्यतु संविव्युः जिव्रिः. चतुर्यिता चतुर्यितुम्.

(वा. २) उणादि प्रत्यय केले असतांना या दीर्घाचा निषेध सांगितला पाहिजे. उदा०—[७]किर्योः गिर्योः.

या निषेधांपैकीं अभ्यासाला जो निषेध सांगितला आहे त्याचा तर कांहीं उपयोग दिसत नाहीं. कारण येथें हलि या पदाचा संबंध केला आहे आणि रिर्यतुः विव्यतुः या उदाहरणांमध्यें तर हलादि प्रत्ययच दिसत नाहीं.

परंतु तेथें शेवटच्या इकाराला यण् आदेश केल्यानंतर तोच हल् आहे असें समजून दीर्घ प्राप्त होत आहे.

यण् झाल्यानंतर देखील अचः परस्मिन् (१।१।५७) या सूत्रानें तो यकार स्थानीसारखा समजला जात असल्यामुळें दीर्घ होणार नाहीं.

पण या ठिकाणीं 'न पदान्त०' (१।१।५८) या सूत्रानें दीर्घविधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा स्थानिवद्भावाचा निषेध सांगितला आहे ना ?

त्या निषेधाची येथें प्राप्ति येत नाहीं. कारण स्वर दीर्घ आणि यलोप हे कर्तव्य असतांना जर 'न पदान्त०' (१।१।५८) या सूत्रानें स्थानिवद्भावाचा निषेध होत असेल तर तो निषेध लोपरूपी अजादेश झाला असेल तरच करावा, नाहीं तर करूं नये, असें मागेंच सांगितलें आहे.

तसेंच 'जिव्रि' शब्दामध्यें दीर्घ होत नाहीं हा निषेध देखील सांगण्याचें कारण नाहीं. कारण उणादि प्रत्यय लागून सिद्ध होणारे शब्द अव्युत्पन्नच आहेत म्हणजे त्यांत अमुक धातु व अमुक प्रत्यय अशी कल्पनाच करतां येणार नाहीं. तसेंच चतुःशब्दाविषयींही निषेध करण्याचें कारण नाहीं, कारण सुपि न या पदांचा मागाहून येथें संबंध होत आहे.

जर सुपि न या पदांचा संबंध केला तर गीर्भ्याम् गीर्भिः या उदाहरणांमध्यें दीर्घ होणार नाहीं.

---

यानें दीर्घ प्रसक्त होत आहे. चतुर् शब्दाहून 'आत्मनः इच्छति' या अर्थी क्यच्. तदन्ताहून तृच्. इट्. 'क्यस्य विभाषा' (६।४।५०) यानें अकाराचा लोप. चतुर्यिता चतुर्यितुम् येथें अल्लोप केला असतां रेफ हा क्यजन्त धातूचा उपधाभूत होत आहे म्हणून उकाराला दीर्घ प्रसक्त होतो.

७. कॄ, गॄ, या धातूंहून 'कॄगॄशॄपॄकुटि०' (उणा. ४।१४२) यानें इ प्रत्यय. त्याला कित्त्वाचा अतिदेश असल्यामुळें गुणाचा निषेध. 'ॠत इद्धातोः' (७।१।१००) यानें इर् आदेश. किरि गिरि या शब्दाहून ओस् प्रत्यय यण्. किर्योः, गिर्योः येथें 'हलि च' यानें दीर्घ प्रसक्त होत आहे.

८. रोऽसुपि (८।२।६८) येथून 'असुपि' या पदाची अनुवृत्ति करावयाची. असुपि हा प्रसज्यप्रतिषेध असल्यामुळें 'सुपि न' या दोन पदांचा संबंध आहे असें येथें म्हटलें आहे.

न सुपो विभक्तिविपरिणामाद्गीर्भ्याम् गीर्भिरित्यदोषः ॥ उणादिप्रतिषेधो वक्तव्य इति परिहृतमेतदुणादयो ऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानीति ॥

[ न भकुर्छुराम् ॥ ८।२।७९ ॥ ]

अदसोऽसेर्दादु दो मः ॥ ८ । २ । ८० ॥

अदसोऽनोस्रेः ॥ १ ॥

अदसोऽनोस्रेरिति वक्तव्यम् । किमिदमनोस्रेरिति । अनोकारस्यासकारस्यारेफकस्येति । अनोकारस्य । अदोऽत्र । असकारस्य । अदस्यति । अरेफकस्य । अदः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । क्रियते न्यास एव । अविभक्तिको निर्देशः । अदस् ओ इति । ओकारात्परः प्रतिषेधः पूर्वभूतः । ततः सकारः । ततो रेफ इति ॥ अथवा नैवं

हा दोष येत नाहीं. कारण सुपि या सप्तम्यन्त पदाचा पंचमीमध्यें विपरिणाम करून सुपाहून पर जो हल् त्या हलाच्या निमित्तानें त्याच्या मागील रेफान्त किंवा वकारान्त धातूमधील इकाला दीर्घ होत नाहीं असा वाक्यार्थ केला म्हणजे गीर्भ्याम् गीर्भिः या ठिकाणीं दोष येत नाहीं.

आतां 'उणादिप्रतिषेधो वक्तव्यः' असा जो वार्तिककारांनीं निषेध केला आहे त्याच्या संबंधानें विचार करणें अवशिष्ट राहिलें. परंतु त्याचाही परिहार झालाच आहे. कारण उणादि प्रत्यय लागून सिद्ध होणारे शब्द अव्युत्पन्नच आहेत. म्हणजे त्यांत अमुक धातु व अमुक प्रत्यय अशी कल्पनाच करतां येत नाहीं.

( सू. ८० वा. १ ) या सूत्रामध्यें पाणिनीनें असेः असें जें पद घातलें आहे त्याच्या ऐवजीं अनोस्रेः असें म्हटलें पाहिजे.

अनोस्रेः यावरून आम्हीं काय समजावें ?

ओकारान्त सकारान्त आणि रेफान्त अशा अदस् शब्दाला हें मुत्व होत नाहीं, असा अनोस्रेः या पदाचा अर्थ आहे. ओकारान्ताला मुत्व होत नाहीं याचें उदाहरण— अदोत्र. सकारान्ताला मुत्व होत नाहीं याचें उदाहरण—अदस्यति. आणि रेफान्ताला मुत्व होत नाहीं याचें उदाहरण— अदः.

तर मग तसें म्हणजे अनोस्रेः असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण पाणिनीनें या सूत्रामध्यें तशा अर्थाचे शब्द घातलेच आहेत. सूत्रामध्यें अदस् शब्दाचा जो निर्देश केला आहे तो विभक्तीवाचून केला आहे. म्हणजे अदस् ओ असेः अशीं पदें आहेत. निषेधवाचक जो असेः यांतील अशब्द त्याचा मागील ओकाराबरोबर संधि म्ह. पूर्वरूप झालें आहे. आतां तो ओकाराच्या पुढें जरी पाणिनीनें उच्चारला आहे तरी तो त्याच्या पूर्वी आहे असें समजून अन्वय करावा आणि नंतर सेर् यामध्यें सकार आणि रेफ हे उच्चार दिले[2] आहेत.

अथवा असेः या पदाचा अर्थ सकारान्तभिन्न अदस् शब्द असा समजूं नये.

१. ( सू. ७९ ) भसंज्ञक आणि कुर् व छुर् यांच्या उपधेला दीर्घ होत नाहीं.

१. ( सू. ८० ) ज्याच्या शेवटीं सकार नाहीं अशा अदस् शब्दांतील दकाराच्या पुढील वर्णाला उकार किंवा ऊकार होतो, आणि दकाराला मकार होतो.

२. तेव्हां अदोऽत्र अदस्यति आणि अदः या तीन उदाहरणामध्यें सूत्रानेंच मुत्व-निषेध केला असल्यानें त्या बाबतींत वार्तिक करावयास नको. अदः येथें विसर्गाला असिद्धत्व असल्यानें रेफान्तता समजावी.

विज्ञायते अदसोऽसकारस्येति । कथं तर्हि । अकारोऽस्य सकारस्य सोऽयमसिः असेरिति ॥ यद्येवममुमुयङ्ङिति न सिध्यति अद्र्यङ्ङिति प्राप्नोति । अदमुयङ्ङिति भवितव्यमनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति ॥ अदसोऽद्रेः पृथङ्मुत्वं केचिदिच्छन्ति लत्ववत्। केचिदन्त्यसदेशस्य नेत्येके ऽसेर्हि दृश्यते ॥

तर मग असेः याचा अर्थ कसा समजावा ? अकार हा सस्य म्हणजे सकाराचें स्थानीं जेथें झाला असेल तो तसा झालेला अद हा शब्द तो असि पदानें येथें घेतां येतो. त्या असि म्ह०—सकारान्त नसणाऱ्या अदस् शब्दाला या सूत्रानें मुत्व होतें.

असा अर्थ केला तर अमुमुयङ् हें उदाहरण सिद्ध होत नाहीं. तेथें मुत्व न होतां अदद्र्यङ् असें रूप होऊं लागेल. खरें म्हणाल तर अदमुयङ् असें उदाहरण इष्ट आहे. कारण एकच कार्य एका उदाहरणामध्यें अंत्याच्या मागें दोन ठिकाणीं प्राप्त होत असेल तर तें दोन ठिकाणीं न करितां फक्त एकच ठिकाणीं म्ह. अन्त्याच्या जवळच्याला करावें, अशी परिभाषा आहे.

अदसोऽद्रेः पृथङ्मुत्वं केचिदिच्छन्ति लत्ववत् ।
केचिदन्त्यसदेशस्य नेत्येकेऽसेर्हि दृश्यते ॥

अदस् शब्दाला अद्रि आदेश केला असतांना त्या ठिकाणीं द आणि द्र् या दोन्ही ठिकाणीं मुत्व होतें; जसें चलीक्लृप्यते या क्रियापदामध्यें दोन्ही ठिकाणीं लत्व होतें त्या प्रमाणेच हें होय असें कांहीं लोक समजतात. दुसरे काहीं लोक अन्त्याच्या म्हणजे इकाराच्या जवळच्या द्र यालाच फक्त मुत्व होतें असें समजतात. आणि इतर कांहीं लोक दोन्ही ठिकाणीं मुत्व होत नाहीं, असें म्हणतात. कारण सूत्रामध्यें असेः असें पद दृष्टीस पडतें.

तत्र पदाधिकारादपदान्तस्याप्राप्तिः ॥ २ ॥

तत्र पदाधिकारादपदान्तस्य न प्राप्नोति । अमुया अमुयोरिति ॥

(वा. २) या सूत्रामध्यें पदस्य हा अधिकार मागाहून चालूं असल्यामुळें पदाच्या अंतीं नव्हे अशा ठिकाणीं हें मुत्व होणार नाहीं. उदा०— अमुया अमुयोः.

सिद्धं तु सकारप्रतिषेधात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । सकारप्रतिषेधात् । यदयमसेरिति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्या-

( वा. ३ ) हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

पाणिनीनें सकाराचा प्रतिषेध केला आहे म्हणून. ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि सका-

---

३. जेथें सकाराला 'त्यदादीनामः०' (७।२।१०२) यानें अकार आदेश केला जातो तेथेंच मुत्व होतें अन्य ठिकाणीं होत नाहीं, असें ठरल्यानें वरील तीन उदाहरणांमध्यें अकार आदेश झाला नसल्यानें मुत्व होत नाहीं.

४. अमुमञ्चति असा विग्रह विवक्षित असतां अदस् अन्च् या स्थितींत ' विष्वग्देवयोश्च० ' ( ६।३।९२ ) यानें टिसंज्ञक भागाचे स्थानीं अद्रि आदेश व यण्—येथें अदस् शब्द सकारान्त नसल्यामुळें दकार अकार आणि दकार रेफ अशा दोन ठिकाणीं मुत्व होऊन अमुमुयङ् असें रूप होतें. आतां ' सकाराला अकार आदेश झालेला अदस् शब्द' असा 'असेः' याचा अर्थ समजला असतां प्रकृत स्थलीं त्यदाद्यत्व झालें नसल्यामुळें मुत्व होणार नाहीं तेव्हां अदद्र्यङ् असें रूप प्राप्त होत आहे.

५. त्यदाद्यत्व झालें असतांच तेथें मुत्व प्रवृत्त होतें एरवीं होत नाहीं. असा 'असेः' याचा अर्थ ते घेतात.

६. अदस् शब्द तृतीयैकवचन टा प्रत्यय. त्यदाद्यत्व. टाप्. 'आङि चापः' ( ७।३।१० ) यानें एकार. त्याला अय् आदेश. द शब्दाला मुत्व. अमुया अमुयोः वगैरे. येथें पदान्त नसल्यामुळें मुत्व येऊं शकत नाहीं.

म्भावोऽपदान्तस्यापि भवतीति ॥

अथ दादग्रहणं किमर्थम् ।

**दाद्ग्रहणमन्त्यप्रतिषेधार्थम् ॥ ४ ॥**

दाद्ग्रहणं क्रियतेऽन्त्यप्रतिषेधार्थम् । अलोऽन्त्यस्य मा भूदिति । अमुया अमुयोरिति ॥

## एत ईद्बहुवचने ॥ ८ । २ । ८१ ॥

**ईत्त्वं बहुवचनान्तस्य ॥ १ ॥**

ईत्त्वं बहुवचनान्तस्येति वक्तव्यम् । बहुवचन इतीयत्युच्यमान इहैव स्यात् । अमीभिः अमीषु । इह न स्यात् । अमी अत्र । अमी आसते ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नेदं पारिभाषिकस्य बहुवचनस्य ग्रहणम् । किं तर्हि । अन्वर्थग्रहणमेतत् । बहूनामर्थानां वचनं बहुवचनम् बहुवचन इति ॥

## वाक्यस्य टेः प्लुत उदात्तः ॥ ८ । २ । ८२ ॥

वाक्याधिकारः किमर्थः ।

**वाक्याधिकारः पदनिवृत्त्यर्थः ॥ १ ॥**

वाक्याधिकारः क्रियते पदनिवृत्त्यर्थः । पदाधिकारो निवर्त्यते ॥ न हि काको

---

रान्त अदस् शब्दाला मुत्व न व्हावें म्हणून असेः असा निषेध सांगतो त्यावरूनच तो असें सुचवितो कीं पदाच्या अंतीं नसलेल्या वर्णालाही हें मुत्व होतें.

आतां या सूत्रांत दात् असें पद कशाकरितां घातलें आहे ?

(वा. ४) दात् हें पद पाणिनीनें अशाकरितां घातलें आहे कीं अमुया अमुयोः या उदाहरणांमध्यें अन्त्याला मुत्व होऊं नये म्हणून.

(सू. ८१ वा. १) या ईत्वविधायक सूत्रामध्यें पाणिनीनें जे बहुवचने असें म्हटलें आहे त्याच्या ऐवजीं बहुवचनान्तस्य असें म्हटलें पाहिजे. कारण बहुवचने असेंच जर म्हटलें तर अमीभिः अमीषु अशाच उदाहरणांमध्यें ईत्त्व होईल परंतु अमी अत्र, अमी आसते या ठिकाणीं ईत्त्व होणार नाहीं.[२]

तर मग तसें म्हणजे बहुवचनान्तस्य असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण पाणिनीनें बहुवचन ही संज्ञा ज्या प्रत्ययांना ठरविलेली आहे तशा अर्थाचा बहुवचने हा शब्द पाणिनीनें येथें घातला नाहीं.

तर मग येथें बहुवचने हा शब्द कोणत्या अर्थानें घातला आहे ?

हा बहुवचने शब्द अन्वर्थ आहे. म्हणजे बहुतांचें म्हणजे अनेक अर्थांचें जें वचन म्हणजे प्रतिपादन तें बहुवचन होय. आणि तसें बहुवचन म्हणजे बहुत अर्थांची उक्ति असतांना हें ईत्त्व होतें असें म्हटलें म्हणजे कांहीं दोष येत नाहीं.

(सू. ८२) या सूत्रामध्यें वाक्यस्य हा अधिकार कशाकरितां केला आहे ?

(वा. १) येथें जो वाक्यस्य असा अधिकार केला आहे तो पदाच्या निवृत्तीकरितां केला आहे. म्हणजे मागाहून चालू असलेला जो पदस्य अधिकार तो येथें बंद होतो.

---

१. (सू. ८१) अदस् शब्दाच्या दकारापुढील एकाराला ईकार होतो व दकाराला मकार होतो, बहुत्व संख्या विवक्षित असतांना.

२. 'तस्मिन्निति' या परिभाषेनें बहुवचन असतांना एकाराला ईकार आदेश होतो असा या सूत्राचा अर्थ ठरत असल्यामुळें अमीभिः इत्यादि स्थलींच ईकार होईल आणि अमी आसते येथें होणार नाहीं.

१. (सू. ८२) 'प्रत्यभिवादेऽशूद्रे' इत्यादि पुढील सूत्रात वाक्यस्य टेः वगैरे चार पदें उपस्थित होतात. हा अधिकार चालू पाद संपेपर्यंत चालू राहील.

वाक्यत इत्यधिकारा निवर्तन्ते । दोषः खल्वपि स्याद्यदि वाक्याधिकारः पदाधिकारं निवर्तयेत् । इष्यन्त एवोत्तरत्र पदकार्याणि तानि न सिध्यन्ति । नश्छव्यप्रशान् [ ८.३. ७ ] इति ॥ पदनिवृत्त्यर्थमिति नैवं विज्ञायते पदस्य निवृत्त्यर्थं पदनिवृत्त्यर्थमिति । किं तर्हि । पदे निवृत्त्यर्थं पदनिवृत्त्यर्थमिति । वाक्ये यावन्ति पदानि तेषां सर्वेषां टेः प्लुतः प्राप्नोति । इष्यते च वाक्यपदयोरन्त्यस्य स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीत्येवमर्थो वाक्याधिकारः ॥

अथ टिग्रहणं किमर्थम् ।

---

हें काय हो असें कांहीं तरी तुम्ही सांगतां ? कारण कावळा काव काव करतो म्हणून कांहीं अधिकार बद पडतें नसतात. शिवाय पदस्य हा अधिकार बंद झाला तर खरोखरच दोषही येतो. जर येथें वाक्यस्य हा अधिकार केल्यामुळें मागाहून चालूं असलेला पदस्य हा अधिकार बंद पडेल तर जीं पुढें सांगितलेलीं कार्यें पदालाच झालीं पाहिजेत तीं तशीं सिद्ध होणार नाहींत. उदा०—' नश्छव्यप्रशान् ' हें सूत्र घ्या.

पदनिवृत्त्यर्थम् याचा अर्थ पदस्य या अधिकाराच्या निवृत्तीकरितां असें समजूं नये.

तर मग त्याचा अर्थ कसा समजावा ?

पद पुढें असतांना मागच्या पदाला प्लुत होऊं नये असा पदनिवृत्त्यर्थम् याचा अर्थ आहे. तात्पर्य असें कीं, वाक्यामध्यें जीं कांहीं पदें असतील त्या सर्व पदांच्या ' टि 'ला प्लुत प्राप्त होतो आणि आम्हांला तर पदाचा अन्त्य असून जो वाक्याचा अन्त्य होतो त्यालाच म्हणजे शेवटच्या पदामध्येंच फक्त प्लुत झाला पाहिजे. आणि ही गोष्ट तर त्याकरितां कांहीं विशेष यत्न केल्यावाचून सिद्ध होणार नाहीं. म्हणून त्या करितांच येथें वाक्यस्य हा अधिकार केला आहे.

आतां या सूत्रामध्यें टेः हें पद कशाकरितां घातलें आहे ?

---

२. ज्याचा ज्याच्याशीं कांहीं संबंध नाही अशांतलें हें कारण तुम्हीं दाखविलें आहे. जसें कावळा ओरडण्याचा आणि अधिकार बंद होण्याचा कांहींच संबंध नाहीं, त्यासारखेंच हें आहे. कारण, ज्या विभक्तीचें व ज्या अर्थाचें पद चालूं केलें त्या विभक्तीचेंच पण त्याच्या उलट ( विरोधी ) अर्थाचें पद पुढील सूत्रांत घातलें असल्यास पहिलें चालूं केलेलें पद तेथें बंद होतें अशी पाणिनीची वहिवाट आहे. जसें—' इको यणचि ' येथून ' अचि ' हें पद चालूं करून पुढें ' वान्तो यि प्रत्यये ' येथें ' यि प्रत्यये ' असें म्हटलें आहे म्हणून ' वान्तो० ' येथें अचि हें पद बंद झालें. प्रकृत स्थलीं तिङन्त व सुबन्त पदें मिळूनच वाक्य बनत असल्यामुळें जी वाक्याची टि ती पदाची टि नव्हे असें असणें कधींहि संभवनीय नाहीं. तर वाक्याची टि ही पदाची टि असावयाचीच. तेव्हां अच् आणि हल् यांप्रमाणें पद व वाक्य हे शब्द परस्पर-विरोधी नसल्यानें ' वाक्यस्य ' या ग्रहणानें चालूं असलेल्या ' पदस्य ' या अधिकाराची निवृत्ति होणें शक्य नाहीं.

३. पदस्य हा अधिकार वाक्यस्य या अधिकारानें बंद होईल तर ' नश्छव्यप्रशान् ' ( ८।३।७ ) यानें सांगितलेलें रुत्व हन्ति, भवन्तौ वगैरे ठिकाणींही करण्याची पाळी येईल.

४. याचें असें तात्पर्य—वाक्यस्य हा अधिकार न केला तर पदस्य हा अधिकार चालू असल्यानें पदाच्या टीला प्लुत होतो असा अर्थ ठरतो. त्या पदाचा एकट्याचा प्रयोग होऊं शकत नाहीं. कारण कांहीं अर्थ कळविण्यासाठी शब्दप्रयोग केला जातो. अर्थ कळविणें हें एकट्या पदानें पुरें होत नाहीं. फक्त रामः असें उच्चारलें तर त्याचें पुढें काय होतें असा प्रश्न येऊन गच्छति तिष्ठति निद्राति इत्यादि अर्थाची आकांक्षा उद्भवते. किंवा केवळ अस्ति एवढेंच उच्चारिलें तर कोण ? अशी आकांक्षा उद्भवते. तेव्हां एकच पद उच्चारिलें तर तें अपुऱ्या अर्थाचें असतें. तो अर्थ परिपूर्ण करण्याकरितां कमींत कमी निदान रामः अस्ति अशीं दोन पदें उच्चारावीं लागतात.

**टिग्रहणमलोऽन्त्यनियमे व्यञ्जनान्तार्थम् ॥ २ ॥**

टिग्रहणं क्रियतेऽलोऽन्त्यनियमे व्यञ्जनान्तस्यापि यथा स्यात् । अग्निची३त् सोमसू३त् ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**सर्वादेशप्रसङ्गस्तु ॥ ३ ॥**

सर्वादेशस्तु टेः प्लुतः प्राप्नोति । किं कारणम् । अच इति वचनादन्त्यस्य नान्त्यस्येति वचनादचो नोच्यते च प्लुतः स सर्वादेशः प्राप्नोति ॥

**उक्तं वा ॥ ४ ॥**

किमुक्तम् । ह्रस्वो दीर्घः प्लुत इति यत्र ब्रूयादच इत्येतत्तत्रोपस्थितं द्रष्टव्यमिति ॥

---

(वा. २) प्रस्तुत सूत्रानें अचाला सांगितलेला जो प्लुत तो अलोऽन्त्यस्य (१।१।५२) हा नियम असल्यामुळें व्यंजन शेवटीं असलेल्या शब्दाला होणार नाहीं; तो तेथेंही झाला पाहिजे याकरितां सूत्रांत टेः असें म्हटलें आहे. उदा०—अग्निची३त् सोमसू३त्.

टेः याचा हा तर उपयोग आहेच.

मग पुढें काय तुमचें म्हणणें आहे ?

(वा. ३) टेः असें म्हटल्यानें सर्व टीच्या जागीं प्लुत आदेश होऊं लागेल.

कां बरें ?

अग्निची३त् वगैरे उदाहरणांमध्यें इत् हा जो टिसंज्ञक भाग त्याच्या अन्त्याला म्हणजे तकाराला प्लुत करतां येणार नाहीं; कारण, 'अचश्च' (१।२।२८) या परिभाषेनें प्लुत अचांलाच करावा, असें सांगितलें आहे. तसेंच त्या इत् या भागांतील अचाला म्हणजे इकारालाही प्लुत करतां येणार नाहीं; कारण, 'अलोऽन्त्यस्य' (१।१।५२) हा नियम त्याच्या आड येतो. आणि प्रकृत सूत्रानें प्लुत तर करावा असें सांगितलेंच आहे. तेव्हां अर्थातच परस्परविरुद्ध अशा 'अचश्च' आणि 'अलोऽन्त्यस्य' या दोन्ही परिभाषा बाजूला सारून अग्निची३त् या उदाहरणामध्यें सर्व टि भागाला म्हणजे इत् एवढ्या भागाला प्लुत होऊं लागेल.

(वा. ४) याविषयीं मागें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

" ह्रस्व होतो, दीर्घ होतो, प्लुत होतो, असें ज्या सूत्रामध्यें सांगितलें असेल त्या सूत्रामध्यें अचः असें षष्ठयन्त पद उपस्थित होतें" असें मागें सांगितलें आहे. तेव्हां टिसंज्ञक भागातील जो अच् त्याला प्लुत होतो असा वाक्यार्थच होत असल्यामुळें कांहीं दोष[६] येत नाहीं.

---

जेथें एकच पद उच्चारलेलें दिसतें तेथें अध्याहारानें दुसरें पद घ्यावें लागतेंच. म्हणून वाक्यांत सांपडलेल्याच पदांचा प्रयोग होतो. एकट्या पदाचा प्रयोग होत नाहीं. तेव्हां वाक्यामध्यें जितकीं पदें असतील त्या सर्वांना प्लुत प्रसक्त होतो. आणि आम्हांला तर शेवटच्या पदालाच प्लुत होणें इष्ट आहे. सबब वाक्यस्य असें म्हटलें आहे आणि तसें म्हटलें असल्यामुळें त्या पदाच्या टीला प्लुत होतो कीं ज्या पदाची टि ही वाक्याची टि असें म्हणतां येतें. तसलें पद अर्थात् वाक्याच्या शेवटचेंच होय.

५. 'ह्रस्व दीर्घ आणि प्लुत हे अचाला होतात' अशा अर्थानें अलोन्त्यपरिभाषेप्रमाणें लक्ष्यामध्यें व्यवस्था करणारी 'अचश्च' ही परिभाषा आहे या समजुतीनें सर्वादेशप्रसंग लिहिला आहे.

६. अचश्च ही परिभाषा अलोऽन्त्यपरिभाषेप्रमाणें लक्ष्यामध्यें व्यवस्था करणारी नाहीं. तर अचः असें षष्ठयन्त पद ऱ्हस्वादिविधायक शास्त्रांमध्यें उत्पन्न करून देणारी आहे.

**प्रत्यभिवादेऽशूद्रे ॥ ८ । २ । ८३ ॥**

अशूद्र इति किमर्थम् । कुशल्यसि तुषजक ॥ अत्यल्पमिदमुच्यतेऽशूद्र इति ।

**अशूद्रस्त्र्यसूयकेषु ॥ १ ॥**

अशूद्रस्त्र्यसूयकेष्विति वक्तव्यम् । तत्र शूद्र उदाहृतम् । स्त्रियाम् । गार्ग्यहं भोः आयुष्मती भव गार्गि । असूयके । स्थाल्यहं भोः आयुष्मानेधि स्थाली३न् । नैषा मम

---

(सू. ८३) या सूत्रामध्यें अशूद्रे असें कशाकरितां म्हटलें आहे?

कुशल्यसि तुषजक[2] या वाक्यामध्यें प्लुत होऊं नये याकरितां अशूद्रे असें म्हटलें आहे.

अशूद्रे असें म्हटलें आहे खरें; परंतु तें फार कमी आहे. कारण शूद्र, स्त्री आणि असूयक या तिघांविषयीं प्लुत होत नाहीं असें म्हटलें पाहिजे. त्यांपैकीं शूद्राविषयीं उदाहरण आतांच सांगितलें आहे. स्त्रीविषयीं उदाहरण—गार्ग्यहं भोः, आयुष्मती भव गार्गि[3] हें घ्यावें. असूयक म्हणजे असूया करणारा. त्याविषयींचें उदाहरण[4]—स्थाल्यहं भोः, आयुष्मान् एधि स्थाली३न्. हे प्लुत केलेलें

---

१. (सू. ८३) शिष्यादिकानें नमस्कार केला असतां त्याच्या मंगलादाखल जें गुरु वगैरे लोक वाक्य उच्चारतात तें प्रत्यभिवाद-वाक्य होय. तें प्रत्यभिवाद-वाक्य शूद्राला उद्देशून नसेल तर त्याच्या टीला प्लुत होतो.

२. खुशाल आहेस ना कोंडिबा? तुषजक (कोंडिबा) असें शूद्राचें नांव आहे. तेव्हां शूद्राला उद्देशून हें प्रत्यभिवाद-वाक्य असल्यामुळें त्याच्या टीला प्लुत होत नाही.

३. ज्यांच्या मतीं स्त्रियांनाही नामगोत्रोल्लेखपूर्वक अभिवाद आणि प्रत्यभिवाद यांचा अधिकार आहे त्यांच्या मतीं प्लुताच्या निषेधाकरितां हें वचन केलें आहे असें समजावें.

४. असूयतीत्यसूयकः अविनीत इत्यर्थः । गुरूनें स्थाली शब्द हा शिष्याचें नांव आहे असें समजून त्याच्या टीला प्लुत केला असतां गुरूचा उपहास करण्याच्या बुद्धीनें शिष्य म्हणतो कीं स्थाली हें माझें रूढ नांव नव्हे. तर दण्डिन्यायानें मला हा शब्द लागू केला आहे. दण्डिन् हें रूढ नांव नसून अवयवार्थानें तें लागू केलें जातें; अर्थात् दण्डिन् शब्द केवळ यौगिकच घेतला जातो. यालाच दण्डिन्याय म्हणतात. या न्यायानें मला केवळ यौगिक स्थाली हें नांव आहे. आणि प्लुत तर रूढ संज्ञा-शब्दालाच इष्ट आहे यौगिक शब्दाला प्लुत करणें बरोबर नाहीं. तेव्हां गुरूनें प्लुत न करतां प्रत्यभिवाद-वाक्य योजलें. पण छलक शिष्य म्हणतो कीं—स्थाली हें माझें रूढ नांव दण्डिन् शब्दाप्रमाणें यौगिक नव्हे; तेव्हां प्लुत न करणें हें बरोबर नाही. अशा तऱ्हेनें दोहीकडून विरुद्ध बोलणारा हा शिष्य छलक (म्ह. दुबोल्या) असल्यानें प्रत्यभिवादास योग्यच नाहीं असें पाहून 'चल जा, येथून नाहींसा हो' असें गुरूनें रागावून सांगितलें. या एकंदर प्रसंगावरून पाहतां जोंपर्यंत असूयकत्व जाणलें गेलें नाहीं तोंपर्यन्त प्लुत होणारच. जेव्हां असूयकत्व समजण्यांत येतें तेव्हां त्याला आशीर्वाद (ऊर्फ) प्रत्यभिवाद दिला जातच नाहीं. प्रत्यभिवाद नसल्यानें अर्थात् प्लुतही नाहीं. तेव्हां असूयकाविषयीं आपोआपच प्लुत-प्रतिषेध सिद्ध होत असल्यानें तेथें असूयकाला प्लुत-प्रतिषेध वचनाचा काय उपयोग? तसेंच, असूयकत्व कळण्याचे पूर्वी प्रतिषेध-वचन असूनही काय उपयोग? त्या वेळीं प्लुत केला जाणारच. एतावता असूयकाविषयीं प्लुताचा प्रतिषेध करण्याचा कांहीं उपयोग होत नसल्यामुळें तो करावयास नको असेंच ठरतें. परंतु नमस्कार केल्यानंतर गुरु जें कांहीं परत बोलतो तो प्रत्यभिवाद होय, आशीर्वादालाच प्रत्यभिवाद म्हणावयाचें असा नियम नाहीं. तेव्हां आशीर्वादाचे ऐवजीं शाप दिला तरी तो प्रत्यभिवादच म्हणावयाचा असल्यानें तेथें प्लुत होऊं लागेल, या आशयानें वार्तिककारानें निषेध केला आहे.

संज्ञा स्थालीति । किं तर्हि । दण्डिन्यायो मम विवक्षितः । स वक्तव्यः । स्थाल्यहं भोः आयुष्मानेधि स्थालिन् । न मम दण्डिन्यायो विवक्षितः । किं तर्हि । संज्ञा ममैषा । असूयकस्त्वमसि जाल्म न त्वं प्रत्यभिवाद-मर्हसि भिद्यस्व वृषल स्थालिन् ॥

**भोराजन्यविशां वा ॥ २ ॥**

भोराजन्यविशां वेति वक्तव्यम् । देवद-त्तोऽहं भोः आयुष्मानेधि देवदत्त भो३ः । देवदत्त भोः । भोः ॥ राजन्य । इन्द्रवर्माहं भोः आयुष्मानेधीन्द्रवर्मा३न् । इन्द्रवर्मन् । राजन्य ॥ विट् । इन्द्रपालितोऽहं भोः आयुष्मानेधीन्द्रपालिता३ । इन्द्रपालित ॥

अपर आह । सर्वस्यैव नाम्नः प्रत्यभिवादे भोःशब्द आदेशो वक्तव्यः । देवदत्तोऽहं भोः आयुष्मानेधि भो३ः । आयुष्मानेधि देवदत्ता३ इति वा ॥

इह कस्मान्न भवति । देवदत्त कुशल्य-

---

उदाहरण ऐकून मस्करी करणारा म्हणतो कीं— स्थालिन् हें कांहीं माझें नांव नव्हे. एकाद्याला दंड हातामध्यें घेतला असल्यामुळें जसा दण्डी शब्द लागतो त्याच तऱ्हेनें मला स्थाली असें म्हणतात. स्थाल म्हणजे थाळा, तो ज्याच्या जवळ आहे तो स्थाली. त्यानतर त्या मस्करी कर-णाऱ्याला पुढें पुनः प्रतिवचन देतांना प्लुत न करतांच प्रतिवचन द्यावें तें असें— स्थाल्यहं भोः, आयुष्मान् एधि स्थालिन्.

या प्रतिवचनामध्यें प्लुत केला नाहीं हें पाहून पुनः तो मस्करी करणारा म्हणतो कीं मला जें स्थालिन् असें म्हणतात तें दण्डिशब्दा-सारखें आहे असें समजूं नका. स्थालिन् असें माझें कायमचें नावच आहे. यानंतर प्रतिवचन देणाऱ्याकडून असें म्हटलें जातें कीं अरे अविचारी मनुष्या, बिनाकारण तूं मस्करी करीत आहेस; प्रत्याभिवाद देण्याला तूं मुळीं योग्यच नाहींस. हे स्थालिन् जा तिकडे कोठें तरी आणि छिन्न भिन्न होऊन पड.

(वा.२) भो शब्द, क्षत्रियवाचक शब्द, आणि वैश्यवाचक शब्द हे प्रतिवचनामध्यें वाक्याच्या शेवटीं असतील तर त्यांच्या टीला प्लुत विक-ल्पानें होतो असें म्हणावें. उदा०—देवदत्तोऽहं भोः; आयुष्मान् एधि देवदत्त भो ३ः, आयुष्मान् एधि देवदत्त भोः. क्षत्रियवाचकशब्दाचें उदाहरण— इन्द्रवर्माऽहं भोः; आयुष्मान् एधीन्द्रवर्मा ३ न्, आयुष्मान् एधीन्द्रवर्मन्. वैश्यवाचक शब्दाचें उदाहरण — इन्द्रपालितोऽहं भोः; आयुष्मान् एधीन्द्रपालिता ३, आयुष्मान् एधीन्द्रपालित.

येथें दुसरा कोणी असें म्हणतो कीं प्रतिवच-नामध्यें वाक्याच्या शेवटीं कोणाचेंही नांव असो, त्या नांवाच्या ऐवजीं एकदा भोः असा शब्द योजावा. उदा०—देवदत्तोऽहं भोः याचें प्रतिव-चन आयुष्मान् एधि भोः असें द्यावें; किंवा आयुष्मान् एधि देवदत्ता ३ असें द्यावें.

आतां देवदत्त कुशल्यसि असा जर प्रतिवचन-

---

५. ( देवदत्त कुशल्यसि ) म्ह. देवदत्ता खुशाल आहेस ना ? हें प्रत्यभिवाद– ( प्रतिवचन– ) वाक्य ( नमस्कार केल्यानंतर स्वानुग्रहसूचक शिष्यास बोला-वयाचें वाक्य ) होय. यांत दोन अंश आहेत. एक देवदत्त व दुसरी खुशाली. खुशाली हें प्रतिवचन, आणि देवदत्त हा ज्याला प्रतिवचन द्यावयाचें तो म्हणजे खुशालीचा उद्देश्य होय. ज्याला उद्देशून खुशाली बोलावयाची तो प्रधान व जी बोलावयाची ती खुशाली अप्रधान. प्रधान प्रथमतः योजलें आहे आणि अप्रधान शेवटीं घातलें आहे. अशी स्थिति असतां प्रतिवचनवाक्यांतील पदाच्या टीला सांगितलेला प्लुत ‘ प्रधान आणि अप्रधान यांमध्यें प्रधानालाच कार्य-संबंध करावा’ या परिभाषेनें प्रधानार्थ-प्रतिपादक अशा देवदत्त शब्दालाच केला पाहिजे. परंतु वाक्यस्य टेः० या सूत्रानें वाक्याच्या टीला प्लुत करावा असें सांगितलें असल्यामुळें व वाक्यांतील शेवटच्या पदाची जी टी तीच

सीति । इह किंचिदुच्यते किंचित्प्रत्युच्यते । अप्रधानमुच्यते प्रधानं प्रत्युच्यते । तत्र प्रधानस्थस्य टिसंज्ञकस्य प्लुत्या भवितव्यं न चात्र प्रधानस्थं टिसंज्ञम् ॥ इहापि तर्हि न प्राप्नोति । आधेयोऽग्नी३र्नाधेया३ इति । नैतद्विचार्यत आधेयो नाधेयोऽग्निश्चेद्भव- तीति । किं तर्हि । इहाग्निसाधना क्रिया विचार्यत आधेयोऽग्निर्नाधेय इति । यद्येवं

वाक्याचा प्रयोग केला तर त्या वाक्याच्या शेवटीं प्लुत प्राप्त होतो तो कां करीत नाहींत ?

येथें एकानें कांहीं भाषण केलें. दुसऱ्यानें त्याचें कांहीं प्रत्युत्तर दिले. विचारतांना प्रधा- नाचा निर्देश केला आहे. आणि प्रतिवचन देतांना वाक्याच्या शेवटीं अप्रधानाचा निर्देश केला आहे. तेव्हां वाक्याची जी टि ती प्रधान शब्दामध्यें असेल तर तेथें प्लुत करणें रास्त आहे. आणि येथें तर कुशल्यसि यांतील टि- संज्ञक जो इकार तो प्रधान शब्दामध्यें नाहीं. कारण, येथें देवदत्त हा प्रधान शब्द धरला जातो. असें असेल तर 'आधेयोऽग्नि ३ र्नाऽऽधेय ३ इति' या विचारद्योतक वाक्यामध्यें 'नाऽऽधेय ३:' येथें प्लुत होणार नाहीं. कारण येथें अग्नि हा प्रधान शब्द आहे.

येथें मूळचा अग्नि आहेच. परंतु तो आधा- नानें सिद्ध झालेला आहे किंवा आधानानें सिद्ध झालेला नाहीं असा अग्नीसंबंधीं येथें प्रश्न विचारला आहे असें समजूं नये.

तर मग येथें काय विचारलें आहे ?

अग्नि या साधनानें सिद्ध होणारी जी आधान- क्रिया तिच्या संबंधानें येथे 'आधेयोऽग्नि ३ र्ना- धेय ३:' असा आधान करावें किंवा न करावें अशा तात्पर्याचा प्रश्न विचारला आहे.

---

वाक्याची टी होत असल्यामुळें ज्या प्रधानार्थक पदाच्या टीला प्लुत करावयाचा असेल ती त्या वाक्याची टि असेल तरच प्लुत करावयाचा. त्या प्रधानार्थक पदाच्या टीला वाक्याची टि असें केव्हां म्हणतां येतें ? तें पद वाक्याच्या शेवटी योजिलें असतां. अर्थात् ज्या प्रधा- नार्थक पदाला प्लुत होणें इष्ट असेल तें पद वाक्याच्या शेवटी पाहिजे असें ठरतें. प्रकृत स्थलीं वाक्याची टि कुशल्यसि येथील सकाराच्या पुढील इकार आहे. व प्रधानार्थक पदाची टि म्ह. देवदत्त येथील तकाराच्या पुढील अकार आहे. तेव्हां वाक्याची जी टि तिला प्रधानार्थक पदाची टि असें म्हणतां येत नाहीं आणि जी प्रधानार्थक पदाची टि तिला वाक्याची टि असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां प्रधानार्थक पदाची टि आणि वाक्याची टि या दोहोंचें सामानाधिकरण्य होत नसल्यामुळें प्रकृत उदाहारणामध्यें प्लुत करतां येत नाहीं.

६. आधेयोऽग्नि३र्नाधेय३ इति । येथें दोन्ही ठिकाणीं 'विचार्यमाणानाम्' (८।२।९७) यानें प्लुत होत असतो. कोटिद्वयाचें विज्ञानाला विचार म्हण- तात. किंवा प्रमाणानें कोटिद्वयाच्या खरेपणाबद्दल परीक्षा करणें याला विचार म्हणतात. जसें-आधेयोऽ- ग्निः हें प्रमाणानें खरें ठरतें किंवा नाधेयः हें प्रमाणानें खरें ठरतें याची चिकित्सा करणें हा विचार होय. दृश्यमान हा अग्नि आधानसंस्कार-संस्कृत आहे किंवा आधानसंस्कार-संस्कृत नाहीं असा या वाक्याचा अर्थ शंकाकारानें घेतला आहे. तेव्हां या विचारामध्यें अग्नि हा उद्देश्य धरला असल्यामुळें तो प्रधान आहे. आणि आधान हें विचार-विषय नसल्यामुळें तें अप्रधान आहे. तेव्हां विचार्यमाण वाक्यांतील प्रधानपदाला प्लुत करावयाचा असल्यानें प्रधानार्थक अग्निपदालाच प्लुत होईल; नाधेयः३ येथें होणार नाहीं.

७. धातुवाच्य क्रियेविषयींच विचार या वाक्यांत विवक्षित आहे. तेव्हां विचार-विषय या नात्यानें प्रधान असलेली जी आधानक्रिया तद्वाचक नाधेयः या वाक्यांतील आधेयपदाच्या टीला प्लुत होण्यास हरकत नाहीं.

द्वितीयोऽग्निशब्दस्य प्रयोगः प्राप्नोति । उक्तार्थानामप्रयोग इति न भविष्यति । यद्येवमाधेयशब्दस्यापि तर्हि द्वितीयस्य प्रयोगो न प्राप्नोत्युक्तार्थानामप्रयोगो नाम भवतीति । नैष दोषः । उक्तार्थानामपि प्रयोगो दृश्यते । तद्यथा । अपूपौ द्वावानय । ब्राह्मणौ द्वावानयेति ॥

## दूराद्धूते च ॥ ८ । २ । ८४ ॥

दूराद्धूत इत्युच्यते दूरशब्दश्चायमनवस्थितपदार्थकः । तदेव हि कंचित्प्रति दूरं कंचित्प्रत्यन्तिकं भवति । एवं हि कश्चित्कंचिदाह । एष पार्श्वतः करकस्तमानयेति । स आह । उत्थाय गृहाण दूरं न शक्ष्यामीति । अपर आह । दूरं मथुरायाः पाटलिपुत्रमिति । स आह । न दूरमिदमन्तिकमिति । एवमेष दूरशब्दोऽनवस्थितपदार्थकस्तस्यानवस्थितपदार्थकत्वान्न ज्ञायते कस्यामवस्थायां प्लुत्या भवितव्यमिति ॥ एवं तर्हि ह्वयतिनायं निर्देशः क्रियते । ह्वयतिप्रसङ्गे यद्दूरम् । किं पुनस्तत् । यत्र प्राकृतात्प्रयत्ना-

---

असें जर असेल तर जसा 'आधेयोऽग्नि ३:' या पहिल्या वाक्यामध्यें अग्नि शब्दाचा प्रयोग केला आहे तसा 'नाधेय ३:' या दुसऱ्या वाक्यामध्यें अग्नि शब्दाचा प्रयोग प्राप्त होतो.

ज्या शब्दाचा प्रयोग केल्यावांचून त्याचा अर्थ आपोआपच म्हणजे मागील वाक्याच्या घोरणानें लक्षांत येतो तेथें त्या शब्दाचा प्रयोग करूं नये असा न्याय असल्यामुळें पुनः अग्नि शब्दाचा प्रयोग केला नाहीं.

तर मग आधेय हा शब्द दुसऱ्यांदा घातला आहे तोही वरील न्यायामुळें घालतां येणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण केव्हां केव्हां शब्दाचा प्रयोग केल्यावांचून अर्थ गम्यमान होत आहे अशा ठिकाणीं देखील पुन्हां शब्दाचा प्रयोग झालेला दृष्टीस पडतो. अशींही उदाहरणें दृष्टीस पडतात कीं, अपूपौ द्वावानय । ब्राह्मणौ द्वावानाय । येथें द्विवचनानें द्वित्व संख्या दाखविली जात असूनही द्वि शब्दाचा प्रयोग केलेला दृष्टीस पडतो.

(सू.८४) दूर प्रदेशांतून हाक मारली असतांना असें येथें म्हटलें आहे. परंतु अमुक एक वस्तूला दूर म्हणावें असा दूर शब्दाचा निश्चित अर्थ कांहींच ठरलेला नाहीं. कारण एकच वस्तुकोणाच्या एका दृष्टीनें दूर समजली जाते व तीच दुसऱ्या कोणाच्या दृष्टीनें जवळची समजली जाते. असें पहा कीं कोणी एक मनुष्य दुसऱ्या कोणाला असें म्हणतो कीं हा तुझ्या जवळच बाजूला कमंडलु आहे तो आण. त्यानंतर तो दुसरा त्याला उत्तर देतो कीं तूंच घेऊन जा. हा कमंडलु दूर असल्यामुळें मला आणतां येणार नाहीं. तसेंच दुसरें उदाहरण—असें पहा कीं पाटलिपुत्र म्हणजे पाटणा शहर. हें मथुरेपासून दूर आहे असें कोणीं एकानें म्हटलें असतां दुसरा त्यानंतर असें म्हणतो कीं हें मथुरेपासून दूर कशाचें ? दूर नव्हे; जवळच आहे. एकंदरीत या दूर शब्दाचा निश्चितार्थ कांहींच ठरलेला नाहीं आणि तो निश्चितार्थ कांहींच ठरला नसल्यामुळें कशा प्रकारची स्थिति असतांना प्लुत करावा हें कांहींच समजत नाहीं.

तर मग आम्ही असें म्हणतों कीं या सूत्रामध्यें हूते असा हांक मारणें अशा अर्थाचा ह्वे धातूचा निर्देश केला आहे. तेव्हां हांक मारण्याचे वेळीं जें दूर वाटतें तें येथें दूर पदानें घ्यावयाचें आहे.

तें तरी दूर कोणतें समजावें ?

---

१. (सू. ८४) दूरवर असलेल्याला एखादी गोष्ट कळविण्याकरितां योजलेल्या वाक्याच्या टिसंज्ञक भागाला प्लुत होतो आणि तो उदात्त होतो.

स्प्रयत्नविशेष उपादीयमाने संदेहो भवति श्रोष्यति न श्रोष्यतीति तद् दूरमिहावगम्यते ॥

## हैहेप्रयोगे हैहयोः ॥ ८। २। ८५ ॥

हैहेग्रहणं किमर्थम् ।

**हैहेप्रयोगे हैहेग्रहणं हैहयोः प्लुत्यर्थम् ॥ १ ॥**

हैहेप्रयोगे हैहेग्रहणं क्रियते हैहयोः प्लुतिर्यथा स्यात् । देवदत्त है३ । देवदत्त हे३ । अक्रियमाणे हि हैहेग्रहणे तयोः प्रयोगेऽन्यस्य स्यात् ॥ अथ प्रयोगग्रहणं किमर्थम् ।

**प्रयोगग्रहणमर्थवद्ग्रहणेऽनर्थकार्थम् ॥ २ ॥**

प्रयोगग्रहणं क्रियतेऽर्थवद्ग्रहणेऽनर्थकयोरपि यथा स्यात् । देवदत्त है३ । देवदत्त हे३ ॥ अथ पुनर्हैहेग्रहणं किमर्थम् ।

---

ज्या ठिकाणीं शब्द उच्चारतांना जो स्वाभाविक प्रयत्न होतो त्यापेक्षां अधिक प्रयत्न न[२] करतांना हाक मारली तर ही हाक ऐकूं जाईल किंवा नाहीं असा संशय उत्पन्न होतो इतक्या अंतरावर मनुष्य असेल तर त्याला दूर असें येथें म्हणावें.

( सू. ८५ ) ह्या सूत्रामध्यें हैहयोः हें पद कशाकरितां घातलें आहे ?

( वा. १ ) 'हैहेप्रयोगे०' या सूत्रामध्यें जें हें हैहयोः असें म्हटलें आहे तें है आणि हे यांनाच प्लुत झाला पाहिजे याकरितां म्हटलें आहे. उदा०— देवदत्त है ३, देवदत्त हे ३. जर हैहयोः असें म्हटलें नाहीं तर त्या है व हे यांचा प्रयोग असतांना जर वाक्याच्या शेवटीं दुसरें एकादें पद असेल तर त्याच्या टीला प्लुत होऊं लागेल.

आतां या सूत्रामध्यें प्रयोगे असें कशाकरितां म्हटलें आहे.

( वा. २ ) या सूत्रामध्यें जें प्रयोगे असें म्हटलें आहे तें अशाकरितां म्हटलें आहे कीं ज्या वाक्यामध्यें कांहीं अर्थाचा बोध व्हावा अशा उद्देशानें है किंवा हे हे शब्द उच्चारले असतील तेथें त्यांना प्लुत होईलच. परंतु तशा उद्देशानें उच्चारले नसतांही फक्त त्यांचा प्रयोग केला असला म्हणजे तेथेंही त्यांना प्लुत झाला[२] पाहिजे. उदा० देवदत्त है ३. देवदत्त हे ३.

आतां या सूत्रामध्यें 'हैहे' असें दुसऱ्यांदा कशाकरितां म्हटलें आहे ?

---

२. येथें मूळ संस्कृतपाठ 'उपादीयमाने' असा डॉ. कीलहॉर्न यांच्या प्रतीत आढळतो. 'अनुपादीयमाने' असा पाठ इतर प्रतींत आढळतो त्यास अनुसरून भाषांतर केलें आहे. 'उपादीयमाने' पाठ घेतला असतां 'ज्यास्ती प्रयत्न करून हांक मारली असतां सुद्धां ऐकूं येईल किंवा न येईल असा संशय जेथें येईल तें दूर' असा अर्थ होतो तोही चांगला आहे.

१. ( सू. ८५ ) दूरवर असलेल्याला कांहीं कळविण्यासाठीं योजलेल्या वाक्यांमध्यें है किंवा हे या शब्दांचा प्रयोग केला असतां तेथें है किंवा हे यांनाच प्लुत होतो.

२. जेव्हां संबोधनाच्या मागें है व हे हे शब्द योजले जातात तेव्हां त्यांना आभिमुख्यद्योतकत्व असल्यानें अर्थवत्त्व निर्विवाद आहे, पण जेव्हां ते शब्द संबोधनाच्या पुढें योजले जातात तेव्हां संबोधनानेंच आभिमुख्याचें द्योतन झाल्यानें द्योत्याचे अभावामुळें आभिमुख्यद्योतकत्व है व हे या शब्दांना नाहीं. म्हणून त्यांना अर्थवत्त्व नाहीं. तेव्हां अर्थवद्ग्रहण परिभाषेनें वाक्याच्या शेवटीं असलेल्या अनर्थक है व हे या शब्दांना प्लुत होत नाहीं. तथापि प्रयोगग्रहणावरून आणि प्रथम 'हैहे' शब्दग्रहणावरून अर्थवत्परिभाषेचा आणि वाक्यस्य या अधिकाराचा बाध केला गेल्यानें अनर्थक व अनन्त्य अशा है व हे या शब्दांना प्लुत सिद्ध होतो.

**पुनर्हैंहेग्रहणमनन्त्यार्थम् ॥ ३ ॥**

पुनर्हैंहेग्रहणं क्रियतेऽनन्त्ययोरपि यथा स्यात्। है३ देवदत्त। हे३ देवदत्तेति ॥

**गुरोरनृतोऽनन्त्यस्याप्येकैकस्य प्राचाम् ॥ ८।२।८६ ॥**

**गुरोः प्लुतविधाने लघोरन्त्यस्य प्लुतप्रसङ्गोऽन्येन विहितत्वात् ॥ १ ॥**

गुरोः प्लुतविधाने लघोरन्त्यस्य प्लुतः प्राप्नोति। दे३वदत्त। किं कारणम्। अन्येन विहितत्वात्। अन्येन हि लक्षणेन लघोरन्त्यस्य प्लुतो विधीयते दूराद्धूते च [ ८.२.८४ ] इति ॥

**न वानन्त्यस्यापीति वचनमुभयनिर्देशार्थम् ॥ २ ॥**

न वैष दोषः। किं कारणम्। अनन्त्यस्यापीति वचनमुभयनिर्देशार्थं भविष्यति। अनन्त्यस्यापि गुरोरन्त्यस्यापि टेरिति। ननु चैतद् गुर्वपेक्षं स्यात्। अनन्त्यस्यापि गुरोरन्त्यस्यापि गुरोरिति। नेत्याह। व्यपेक्षमेतत्। अनन्त्यस्यापि गुरोरन्त्यस्यापि टेरिति ॥ अथ

---

(वा. ३) है व हे हे शब्द वाक्यामध्यें शेवटीं जरी नसतील तरी देखील त्यांना प्लुत झाला पाहिजे याकरितां म्हटलें आहे. उदा०— है३ देवदत्त. हे ३ देवदत्त.

( सू. ८६ वा. १ ) हा जो या सूत्रामध्यें गुरु वर्णाला प्लुत सांगितला आहे तो केला असतां त्या ठिकाणीं जर शेवटचा वर्ण लघु असेल तर त्याला देखील प्लुत प्राप्त होत आहे.[2] उदा०— दे३वदत्त.

असा दोन ठिकाणीं प्लुत कां बरें होईल ?

दुसऱ्यानें सांगितला आहे म्हणून ' दूराद्धूते च ' ( ८।२।८४ ) या निराळ्या सूत्रानें शेवटच्या लघुवर्णाला प्लुत प्राप्त होत आहे.

( वा. २ ) हा दोष येत नाहीं. कां बरें ?

सूत्रामध्यें अनन्त्यस्यापि असा जो अपि शब्द घातला आहे त्यानें शेवटच्या लघु आणि गुरु या दोन्ही वर्णांचा समुच्चय[3] करतां येईल. म्हणजे अंतीं नसणाऱ्या गुरु वर्णालाही प्लुत होतो आणि अन्त्यालाही टिसंज्ञकाला प्लुत होतो.

पण हा समुचय शेवटीं नसणाराही गुरु व शेवटीं असणाराही गुरु अशा दोन्ही गुरु वर्णांचाच पाहिजे; खरें ना ?

तसेंच कांहीं नाहीं; आम्ही म्हणतों कोणत्यातरी दोघांचा समुच्चय व्हावा याकरितां अपिशब्द आहे. व त्यामुळें अंतीं नसणाऱ्या गुरु वर्णालाही प्लुत होतो आणि अन्त्यालाही टिसंज्ञकाला प्लुत होतो.

---

१. ( सू. ८६ ) दूरवर असलेल्याला कांही कळविण्यासाठी योजलेल्या वाक्याच्या शेवटीं असलेलें जें संबोध्यमानार्थवाचक पद त्याच्या टीला व ऋकारभिन्न आणि अनन्त्य अशाही गुरूला पाळीपाळीनें प्लुत विकल्पानें होतो.

२. अनन्त्यस्यापि येथील अपि-शब्दानें गुरूचें संनिधान असल्यामुळें अन्त्य गुरूचा समुच्चय केला आहे. तेव्हां जेथें अन्त्य वर्ण गुरुसंज्ञक असेल तेथेंच पर्यायानें प्लुत होईल आणि जेथें अन्त्यवर्ण लघुसंज्ञक असेल तेथें त्या लघूला ' दूराद्धूते च ' ( ८।२।८४ ) यानें प्लुत होईल; आणि अनन्त्य गुरूलाही प्रकृत सूत्रानें प्लुत होईल तसें झाल्यानें प्लुतद्वयाचा युगपत्-प्रसंग येत आहे.

३. अपि शब्दानें लक्ष्यानुरोधास्तव चालू असलेल्या अन्त्य टीचाच समुच्चय करावयाचा, तो अन्त्य टिसंज्ञक गुरू किंवा लघु कसाही असो. त्यामुळें अनन्त्य गुरूला व अन्त्याला तर गुरुसंज्ञक किंवा लघुसंज्ञक टीला प्लुत होतो असा अर्थ झाल्यानें अन्त्य वर्ण लघु असतांही पर्याय होत असल्यामुळें प्लुतद्वयाचा युगपत्-श्रवणप्रसंग येत नाहीं.

प्राग्वचनं किमर्थम् ।

**प्राग्वचनं विभाषार्थम् ॥ ३ ॥**

प्राग्वचनं क्रियते विभाषार्थम् । विभाषा यथा स्यात् ॥

**प्राग्वचनानर्थक्यं चैकैकस्येति वचनात् ॥ ४ ॥**

प्राग्वचनमनर्थकम् । किं कारणम् । एकैकस्येति वचनात् । एकैकग्रहणं क्रियते तद्विभाषार्थं भविष्यति ॥ अस्त्यन्यदेकैकग्रहणस्य प्रयोजनम् । किम् । युगपत्प्लुतो मा भूदिति ॥ अनुदात्तं पदमेकवर्जम् [ ६. १. १५८ ] इति वचनान्नास्ति यौगपद्ये संभवः । असिद्धः प्लुतस्तस्यासिद्धत्वान्नियमो न प्राप्नोति । नैष दोषः । यद्यपीदं तत्रासिद्धं तत्त्विह सिद्धम् । कथम् । कार्यकालं संज्ञापरिभाषमिति यत्र कार्यं तत्रोपस्थितं द्रष्टव्यम् । गुरोरनृतोऽनन्त्यस्याप्येकैकस्य प्राचाम् । उपस्थितमिदं भवत्यनुदात्तं पदमेकवर्जमिति । इहापि तर्हि समावेशो न प्राप्नोति । देवदत्ता३ । सिद्धासिद्धावेतौ । यौ हि

---

आतां या सूत्रामध्यें प्राचाम् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

( वा. ३ ) या सूत्रामध्यें प्राचाम् असें म्हटलें आहे तें प्लुत विकल्पानें व्हावा याकरितां म्हटलें आहे.

( वा. ४ ) या सूत्रामध्यें प्राचां याचा कांहीं उपयोग नाहीं.

कां बरें ?

सूत्रामध्यें पाणिनीनें एकैकस्य असें म्हटलें आहे म्हणून. एकेकटयाला प्लुत होतो असें जें येथे पाणिनीनें सांगितलें आहे त्यावरून अर्थातच प्लुताचा विकल्प होईल.

पण त्या एकैकस्य या म्हणण्याचा उपयोग निराळा आहे ना ?

तो कोणता ?

एकदम अनेकांना प्लुत होऊं नये असा त्याचा उपयोग आहे.

हा त्याचा उपयोग येत नाहीं. कारण 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' ( ६।१।१५८ ) या शास्त्रानें दोन प्लुत एकदम करतां येणें शक्यच नाहीं. कारण प्लुत हा उदात्त सांगितला आहे आणि 'अनुदात्तं पद०' या शास्त्रावरून एका उदाहरणामध्यें एकदम दोन उदात्त येत नसतात.

हा प्लुत 'अनुदात्तं पदम्०' (६।१।१५८) या शास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध आहे. तेव्हां तो असिद्ध असल्यामुळें तेथें 'अनुदात्तं पदम्०' या शास्त्रानें सांगितलेला 'एक सोडून बाकीचे सर्व अनुदात्त करावे' हा नियम प्राप्त होत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण जरी हा प्लुत 'अनुदात्तं पदम्०' याच्या दृष्टीनें असिद्ध आहे तरी पण तें 'अनुदात्तं पदम्०' हें शास्त्र या प्लुताच्या दृष्टीनें सिद्धच आहे.

तेवढयानें कसें भागेल ?

अशा रीतीनें भागेल कीं संज्ञा आणि परिभाषा यांविषयीं कार्यकालपक्ष आहे. म्हणजे कार्याच्या दृष्टीनें त्या सिद्ध असल्या तर कार्य त्यांचें आकर्षण करतें. म्हणजे कार्य ज्या ठिकाणीं असेल त्या ठिकाणीं त्या उपस्थित होतात. तेव्हां प्रकृत स्थलीं कार्यकालपक्षाच्या जोरावर असें होईल कीं 'गुरोरनृतोऽनन्त्यस्य०' या प्रकृत ठिकाणीं 'अनुदात्त पदम्०' ही परिभाषा उपस्थित होईल आणि ती परिभाषा उपस्थित झाल्यामुळें एकदम दोन ठिकाणीं उदात्त ( प्लुत ) करतां येणार नाहीं.

तर मग देवदत्त३ येथेंही ती परिभाषा प्राप्त होईल आणि आदि व अन्त असे एकदम दोन उदात्त राहणार नाहींत.

सिद्धावेवासिद्धावेव वा तयोर्नियमः । यस्तर्हि स्वरितप्लुतस्तेन समावेशः प्राप्नोति । स्वरितमाम्रेडितेऽसूयासंमतिकोपकुत्सनेषु [ ८. २. १०३ ] इति । स्वरितेऽप्युदात्तोऽस्ति । यस्तर्ह्यनुदात्तप्लुतस्तेन समावेशः प्राप्नोति । अनुदात्तं प्रश्नान्ताभिपूजितयोः [१००] इति ॥ तस्मात्प्राग्वचनं कर्तव्यम् ॥

**[ ओमभ्यादाने ॥ ८ । २ । ८७॥ ]**

**ये यज्ञकर्मणि ॥ ८ । २ । ८८ ॥**

**ये यज्ञकर्मणीत्यतिप्रसङ्गः ॥ १ ॥**

ये यज्ञकर्मणीत्यतिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । ये देवासो दिव्येकादश स्थेति [ ऋ. सं. १।१३९।११ ] ॥

**सिद्धं तु ये यजामह इति ब्रूह्यादिषूपसंख्यानात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । येयजामहेशब्दो

---

ह्या दोन उदात्तांपैकीं पहिला उदात्त त्या परिभाषेच्या दृष्टीनें सिद्ध आहे आणि शेवटचा प्लुत उदात्त असिद्ध आहे. ज्या ठिकाणीं दोन्ही उदात्त सिद्धच आहेत किंवा दोन्ही उदात्त असिद्धच आहेत त्या ठिकाणीं ' अनुदात्तं पदम्' या परिभाषेनें केलेला नियम लागू पडतो.

असें आहे तर मग ' स्वरितमाम्रेडितेऽसूयासंमतिकोपकुत्सनेषु ' ( ८।२।१०३ ) या पुढील सूत्रानें सांगितलेला जो स्वरित प्लुत त्याच्या बरोबर या प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या उदात्त प्लुताचा समावेश होऊं लागेल.

पण स्वरितामध्यें तर उदात्त आहेच ना ? तेव्हां त्या परिभाषेनें तेथें समावेश होणार नाहीं.

तर मग ' अनुदात्तं प्रश्नान्ताभिपूजितयोः ' ( ८।२।१०० ) या सूत्रानें सांगितलेला जो अनुदात्त प्लुत त्याच्या बरोबर प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या उदात्त प्लुताचा समावेश होऊं लागेल. एकंदरीत प्लुतांचा समावेश न होण्याकरितां सूत्रामध्यें एकैकस्य हा शब्द अवश्य घातला पाहिजे. तेव्हां अर्थातच एकैकस्य या शब्दानें प्लुताचा विकल्प सिद्ध होत नाहीं, म्हणून प्लुताचा विकल्प सिद्ध होण्याकरितां सूत्रामध्यें प्राचाम् असें म्हटलें पाहिजे.

( सू. ८८ वा. १ ) ये यज्ञकर्मणि असें सामान्य सूत्र केल्यामुळें अतिप्रसंग होतो. तो असा कीं ये देवासो दिव्येकादश स्थ या मंत्रांतील ये या शब्दामध्यें प्लुत होऊं लागेल.

( वा. २ ) ये देवासो या ठिकाणीं प्लुत न होतां सिद्धि करतां येईल.

---

४. देवदत्ता३ येथें 'आमन्त्रितस्य च' (६।१।१९८) यानें आद्युदात्त, व ' गुरोरनृतो०' ( ८।२।८६ ) यानें प्लुत उदात्त असा युगपत् दोन उदात्तांचा समावेश झाला आहे. कार्यकालपक्ष घेतला असतां 'अनुदात्तं पद०' ( ६।१।१५८ ) या परिभाषेची ' गुरोरनृतो० ' येथें उपस्थिति झाल्यामुळें प्लुत होण्याबरोबर त्या पदांतील बाकीचे सर्व अनुदात्त झाल्यानें आद्युदात्ताची निवृत्ति होईल अशी कार्यकालपक्ष घेऊन शंका केली आहे. त्यावर उत्तर देतांना असें सांगितलें आहे कीं देवदत्ता३ येथें दोन उदात्तांपैकीं एक उदात्त सपाद सप्ताध्यायींतील असल्यानें तो परिभाषेच्या दृष्टीनें सिद्ध आहे. आणि दुसरा उदात्त त्रैपादिक असल्यानें तो परिभाषेच्या दृष्टीनें असिद्ध आहे. यावरून 'अनुदात्त पद० ' ( ६।१।१५८ ) या परिभाषेविषयीं कार्यकालपक्ष अशा ठिकाणीं घ्यावयाचा नाहीं असें म्हटलें पाहिजे.

५. कारण, स्वरितामध्यें अनुदात्त असल्यामुळें त्याची शेषनिघातानें निवृत्ति होणार नाहीं.

१. ( सू. ८७ ) आरंभद्योतक जो ओम् शब्द त्याला प्लुत होतो.

१. ( सू. ८८ ) यज्ञकर्म चालू असतांना म्हणण्यांत येणाऱ्या मन्त्र ब्राह्मण वगैरेंतील 'ये' या शब्दाला प्लुत होतो.

ब्रूह्यादिषूपसंख्येयः ॥

**प्रणवष्टेः ॥ ८ । २ । ८९ ॥**

प्रणव इत्युच्यते कः प्रणवो नाम । पादस्य वार्धर्चस्य वान्त्यमक्षरमुपसंहृत्य तदाद्यक्षरशेषस्य स्थाने त्रिमात्रमोंकारं त्रिमात्रमोकारं वा विदधति तं प्रणव इत्याचक्षते ॥

अथ टिग्रहणं किमर्थम् ।

**टिग्रहणं सर्वादेशार्थम् ॥ १ ॥**

यदा ओकारस्तदा सर्वादेशो यथा स्यात् । यदा ओंकारस्तदानेकाल्शित्सर्वस्य [ १. १. ५५ ] इति सर्वादेशो भविष्यति ॥

**याज्यान्तः ॥ ८ । २ । ९० ॥**

अन्तग्रहणं किमर्थम् । याज्या नामर्चो वाक्यसमुदायस्तत्र यावन्ति वाक्यानि सर्वेषां टेः प्लुतः प्राप्नोति । इष्यते चान्त्यस्य स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीत्येवमर्थमन्तग्रहणम् ॥

**[ब्रूहिप्रेष्यश्रौषड्वौषडावहानामादेः ॥ ८ । २ । ९१ ॥]**

---

ती कशी ?

ये यजामहे हा शब्द 'ब्रूहिप्रेष्य०' (८।२।९१) या सूत्रामध्यें घालावा. (एकंदरीत हें सूत्रच करावयास नको. म्हणजे ये देवासो येथें दोष येत नाहीं. )

( सू. ८९ ) या सूत्रामध्यें प्रणव असे म्हटलें आहे. तरी प्रणव म्हणजे कोणाला म्हणावें ?

ऋचेच्या पादाचे किंवा ऋचेच्या अर्धाचें जें शेवटचें अक्षर त्याला त्याच्या पुढील अवशिष्ट राहिलेल्या भागासकट जो आदेश म्हणून तीन मात्रांचा ओकार किंवा ओंकार होतो त्याला प्रणव असें म्हणतात.

आतां या सूत्रामध्यें टेः असें कशाकरितां म्हटले आहे ?

(वा. १) प्रणव आदेश होतो असें समजून जेव्हां आपण ओकार आदेश करण्याचें मनात आणूं त्यावेळीं तो ओकार आदेश सर्व टीचे स्थानीं झाला पाहिजे. आतां ज्या वेळीं आपण ओंकार आदेश करण्याचें मनांत आणूं त्या वेळीं तो ओंकार आदेश अनेकाल् असल्यामुळें 'अनेकाल्शित्सर्वस्य' (१।१।५५) या परिभाषेनें टीला सर्वादेश होईलच. तेव्हां ओकार आदेश सर्वाचे स्थानीं होण्याकरितां टेः असें म्हटलें आहे.

( सू. ९० ) या सूत्रामध्यें अन्तः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

याज्या नावाच्या ज्या ऋचा आहेत म्हणजे ज्या ठिकाणीं अनेक वाक्यांच्या समुदायाला याज्या असें नांव असेल त्या ठिकाणीं त्या सर्व वाक्यांच्या टीला प्लुत होऊं लागेल. आणि आम्हांला तर फक्त शेवटच्या वाक्यामध्येंच टीला प्लुत इष्ट आहे. ही गोष्ट कांहींतरी विशेष केल्यावांचून सिद्ध होणार नाहीं म्हणून सूत्रामध्यें अन्तः असें म्हटलें आहे.

---

१. ( सू. ८९ ) यज्ञकर्म चालू असतां तेथें म्हणण्यांत येणाऱ्या मन्त्र वगैरेंच्या टिसंज्ञक भागाचे स्थानी ओ किंवा ओम् असा आदेश होतो.

२. कारण 'वाक्यस्य टेः०' असा अधिकार चालूच आहे.

३. नाहीं तर, टेः या पदाची अनुवृत्ति आली तरी 'अलोऽन्त्यस्य' ( १।१।५२ ) या परिभाषेनें अन्त्याला होईल, किंवा 'अचश्च' ( १।२।२८ ) या परिभाषेनें 'टि' पैकीं अचाला होईल.

४. ओम् हा सर्व आदेश प्लुत नसल्यामुळें अचश्च या परिभाषेनें अचाला होईल ही शंका या वेळीं येत नाहीं.

१. ( सू. ९० ) यज्ञकर्म चालू असतां तेथें म्हटलें जाणारे जे याज्या नांवाचे मंत्र त्यांच्या शेवटच्या टीला प्लुत होतो.

१. ( सू. ९१ ) यज्ञकर्म चालू असतां तेथें उपयोगांत आणिलेल्या ब्रूहि, प्रेष्य, श्रौषट्, वौषट् आणि आवह या शब्दांच्या आदीला प्लुत होतो.

**अग्नीत्प्रेषणे परस्य च ॥ ८ । २ । ९२ ॥**

**अग्नीत्प्रेषण इत्यतिप्रसङ्गः ॥ १ ॥**

अग्नीत्प्रेषण इत्यतिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । अग्नीदग्नीन्विहर ॥

**सिद्धं त्वोश्रावये परस्य चेति वचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । ओश्रावये परस्येति वक्तव्यम् । ओ३ श्रा३वय ॥

अपर आह । ओश्रावयाश्रावययोरिति वक्तव्यम् । ओ३ श्रा३वय । आ३ श्रा३वय ॥

बहुलमन्यत्रेति वक्तव्यम् । उद्धरा३ उद्धर । आहरा३ आहर ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । योगविभागः करिष्यते । अग्नीत्प्रेषणे परस्य च विभाषा । ततः पृष्टप्रतिवचने हेः । विभाषेत्येव ॥

अपर आह । सर्व एव प्लुतः साहसमनिच्छता विभाषा वक्तव्यः ॥

**[ विभाषा पृष्टप्रतिवचने हेः ॥ ८ । २ । ९३ ॥**

**निगृह्यानुयोगे च ॥ ८ । २ । ९४ ॥]**

**आम्रेडितं भर्त्सने ॥ ८ । २ । ९५ ॥**

---

(सू. ९२ वा. १) होता नांवाच्या ऋत्विजाला प्रेष देतांना असें येथें सामान्य म्हटलें आहे त्यामुळें अतिप्रसंग होतो. तो असा कीं, अग्नीदग्नीन् विहर या प्रेष-वाक्यामध्यें सुद्धां प्लुत होऊं लागेल.

(वा. २) हें उदाहरण सिद्ध होईल. म्हणजे येथें प्लुत होणार नाहीं.

तें कसें ?

'अग्नीत्प्रेषणे' या प्रकृत सूत्राच्या ऐवजीं 'ओ श्रावये परस्य च' असें म्हणावें. म्हणजे फक्त ओ३ श्रा३वय येथेंच प्लुत होईल.

येथें दुसरा कोणी असें म्हणतो कीं ओश्रावय आणि आश्रावय या दोन प्रकारच्या प्रेषांमध्यें प्लुत होतो असें म्हणावें उदा. ओ३ श्रा३ वय, आ३ श्रा३वय.

हा प्लुत इतर ठिकाणींही बाहुल्येकरून होतो असें म्हणावें. उदा. उद्धरा३ उद्धर. आहरा ३ आहर.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें करावयास नको. कारण सूत्रांचा विभाग आम्ही असा करतों— 'अग्नीत्प्रेषणे परस्य च विभाषा' एवढें एक सूत्र करून त्यानंतर 'पृष्टप्रतिवचने हेः' इतकेंच दुसरें सूत्र समजावें. त्या दुसऱ्या सूत्रामध्यें पहिल्या सूत्रांतून विभाषा या पदाचा संबंध आहे.

येथें दुसरा कोणी म्हणतो कीं या प्रकरणामध्यें कोणत्याही सूत्रानें सांगितलेला प्लुत असो तो सर्वच प्लुत साहस न करणाऱ्यानेंही विकल्पानें करावा.

---

१. (सू. ९२) यज्ञकर्म चालू असतां तेथें आग्नीध्र नांवाच्या ऋत्विजाला प्रेष देतांना अध्वर्यु जें वाक्य योजतो त्या वाक्याच्या आद्याक्षराला आणि त्याहून पुढच्या अर्थात् द्वितीय अक्षरालाही प्लुत होतो.

२. योगविभाग करून विभाषा या पदानें सांगितलेली व्यवस्थित—विभाषा मानावयाची. व्यवस्थित—विभाषेच्या जोरावरच उद्धरा३ उद्धर येथें आदीला प्लुत होत नाहीं व आदीहून पुढच्याला होत नाहीं; तर फक्त अन्त्यालाच होतो.

३. विचार न करतां बोलणें.

१. (सू. ९३) उत्तरादाखल योजलेल्या वाक्यांतील 'हि' या शब्दाला प्लुत विकल्पानें होतो.

१. (सू. ९४) एकाचें मत युक्तिप्रयुक्तीनें खोडण्यानें त्याला अडवून अवहेलना-बुद्धीनें (टोंचून बोलण्याचें हेतूनें) त्याच्या मताचा उल्लेख करण्यादाखल जें वाक्य योजिलें जातें त्या वाक्याच्या टिला प्लुत विकल्पानें होतो.

१. (सू. ९५) भर्त्सनद्योतक जें द्विर्वचन त्यांतील पूर्व आणि पर अशा दोन्ही भागांच्या टीला प्लुत होतो.

भर्त्सने पर्यायेण ॥ १ ॥

भर्त्सने पर्यायेणेति वक्तव्यम् । चौरा३ चौर । चौर चौरा३ । कुशीला३ कुशील । कुशील कुशीला३ ॥

[ अङ्गयुक्तं तिङाकाङ्क्षम् ॥ ८ । २ । ९६ ॥

विचार्यमाणानाम् ॥ ८ । २ । ९७ ॥

पूर्वं तु भाषायाम् ॥ ८ । २ । ९८ ॥

प्रतिश्रवणे च ॥ ८ । २ । ९९ ॥

अनुदात्तं प्रश्नान्ताभिपूजितयोः ॥ ८ । २ । १०० ॥

चिदिति चोपमार्थे प्रयुज्यमाने ॥ ८ । २ । १०१ ॥

उपरिस्विदासीदिति च ॥ ८ । २ । १०२ ॥ ]

स्वरितमाम्रेडितेऽसूयासंमतिकोपकुत्सनेषु ॥ ८ । २ । १०३ ॥

असूयादिषु वावचनम् ॥ १ ॥

असूयादिषु वेति वक्तव्यम् । कन्ये३ कन्ये । कन्ये कन्ये । शक्तिके३ शक्तिके । शक्तिके शक्तिके ॥

[ क्षियाशीःप्रैषेषु तिङाकाङ्क्षम् ॥ ८ । २ । १०४ ॥

अनन्त्यस्यापि प्रश्नाख्यानयोः ॥ ८ । २ । १०५ ॥ ]

प्लुतावैच इदुतौ ॥ ८ । २ । १०६ ॥

---

(सू. ९५ वा. १) भर्त्सन हा अर्थ गम्यमान असतांना हा जो प्लुत सांगितला आहे तो पर्यायानें होतो असें म्हणावें. उदा०—चौरा३ चौर; चौर चौरा३. कुशीला३ कुशील; कुशील कुशीला३.

१. (सू. ९६) अङ्ग या शब्दानें युक्त असून दुसऱ्या अर्थाविषयीं साकांक्ष असलेलें जे तिङन्त त्याच्या टीला प्लुत होतो, भर्त्सन अर्थ गम्यमान असतांना.

१. (सू. ९७) कांहीं एक गोष्ट विचारण्याकरितां योजलेल्या वाक्यांच्या टीला प्लुत होतो.

१. (सू. ९८) कांही एक गोष्ट विचारण्याकरितां योजलेल्या वाक्यांपैकीं पहिल्या वाक्याच्या टीला प्लुत होतो, त्या वाक्याचा प्रयोग लोकांतील असतांना.

१ (सू. ९९) अङ्गीकार, प्रतिज्ञा, आणि श्रवणाभिमुख्य हे अर्थ गम्यमान असतांना वाक्याच्या टीला प्लुत होतो.

१. (सू. १००) प्रश्नाकरितां योजलेल्या वाक्यांतील शेवटच्या पदाच्या टीला किंवा अभिपूजन या अर्थाचा बोध करण्याकरितां योजलेल्या वाक्याच्या टीला अनुदात्त असा प्लुत होतो.

१ (सू. १०१) चिद् याचा उपमा या अर्थी म्हणजे इव अव्ययासारखा उपयोग केला असतां त्याच्या टीला अनुदात्त असा प्लुत होतो.

१. (सू. १०२) उपरिस्विदासीत् या वाक्याच्या टीला अनुदात्त असा प्लुत होतो.

१. (सू. १०३) वाक्याच्या आरंभीं असलेल्या आमन्त्रिताच्या टीला स्वरित असा प्लुत होतो, आम्रेडित पुढें असून असूया, संमति, कोप, आणि कुत्सन हे अर्थ गम्यमान असतांना.

(सू. १०३ वा. १) असूया वगैरे अर्थ गम्यमान असतांना जो हा प्रकृत सूत्रानें प्लुत सांगितला आहे तो विकल्पानें होतो असें म्हणावें. उदा०— कन्ये३, कन्ये. शक्तिके३, शक्तिके.

१. (सू. १०४) क्षिया म्ह० आचारोल्लंघन, आशीः म्ह० इष्टाशंसन, तसेंच प्रैष म्ह० प्रेरणा; हे अर्थ गम्यमान असतांना इतर अर्थाविषयीं साकांक्ष असलेल्या तिङन्ताच्या टीला स्वरित असा प्लुत होतो.

१. (सू. १०५) प्रश्न आणि त्याचें उत्तर हे अर्थ गम्यमान असतांना शेवटीं नसलेल्याही व शेवटीं असलेल्याही पदाच्या टीला स्वरित असा प्लुत होतो.

१. (सू. १०६) 'दूराद्धूते च' इत्यादि शास्त्रानें सांगितलेला प्लुत हे व औ यांचे स्थानीं प्रसक्त झाला

किमर्थमिदमुच्यते ।

**ऐचोरुभयविवृद्धिप्रसङ्गादिदुतोः प्लुतवचनम् ॥ १ ॥**

ऐचोरुभयविवृद्धिप्रसङ्गादिदुतोः प्लुत उच्यते ॥ किमुच्यत उभयविवृद्धिप्रसङ्गादिति यदा नित्याः शब्दा नित्येषु च शब्देषु कूटस्थैरविचालिभिर्वर्णैर्भवितव्यमनपायोपजनविकारिभिः । नैष दोषः । उभयविवृद्धिप्रसङ्गादिति नैवं विज्ञायत उभयोर्विवृद्धिरुभयविवृद्धिः उभयविवृद्धिप्रसङ्गादिति । कथं तर्हि । उभयोर्विवृद्धिरस्मिन्सोऽयमुभयविवृद्धिः उभयविवृद्धिप्रसङ्गादिति । इमावैचौ समाहारवर्णौ मात्रावर्णस्य मात्रेवर्णोवर्णयोरिति तयोः प्लुत उच्यमान उभयविवृद्धिः प्राप्नोति । तद्यथा । अभिवर्धमानो गर्भः सर्वाङ्गपरिपूर्णो वर्धते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

**तत्रायथेष्टप्रसङ्गः ॥ २ ॥**

तत्रायथेष्टं प्रसज्येत । चतुर्मात्रः प्लुतः प्राप्नोति ॥

---

(सू.१०६) मागील सूत्रांनीं सामान्यतः सर्व अचांना प्लुत सांगितला आहे. त्यानेंच काम भागेल. मुद्दाम येथें ऐ व औ या दोन वर्णांकरिता प्लुत सांगण्याचें प्रयोजन काय?

(वा.१) ऐ आणि औ या दोन वर्णांना पूर्वसूत्रांनीं प्लुत होईल हे खरें. परंतु तो प्लुत होतांना ऐ आणि औ हीं संध्यक्षरें असल्यामुळें त्यांतील दोनही वर्णांची वाढ होईल ती न होतां फक्त त्यांतील इकार व उकार यांचीच वाढ व्हावी याकरितां हा मुद्दाम ह्रस्व इकाराला व उकाराला प्लुत सांगितला आहे.

दोघांची वाढ होईल हें काय हो तुम्ही म्हणत आहांत? कारण, शब्द हे नित्यच आहेत; व त्यामुळें त्या नित्य शब्दांमधील वर्ण कायमच्या स्वरूपाचे काहीं एक अवयव न बदलणारे असे म्हणजे ज्यांना उत्पत्ति, विनाश वगैरे कोणताही विकार होत नाहीं असेच असले पाहिजेत.

हा दोष येत नाहीं. कारण, दोघांची जी वाढ ती उभयविवृद्धि; अशा प्रकारची उभयविवृद्धि होऊं लागेल असा वार्तिकांतील ‘उभयविवृद्धिप्रसङ्गात्’ या सामासिक पदाचा अर्थ समजूं नये.

दोघांची वाढ ज्या शब्दामध्यें झालेली आहे असा जो शब्द तो उभयविवृद्धि होय. आणि अशा प्रकारच्या उभयविवृद्धि शब्दांच्या म्हणजे अशी वाढ झाल्यासारख्या शब्दाच्या उच्चारणाचा प्रसंग येईल असा वार्तिकांत ‘उभयविवृद्धिप्रसङ्गात्’ या सामासिक पदाचा अर्थ आहे.

ऐ आणि औ हे दोन्ही वर्ण संध्यक्षर आहेत. त्यांतील पूर्वभाग जो अवर्ण त्याची एक मात्रा; आणि पुढील भाग जो इ वर्ण किंवा उ वर्ण त्याची एक मात्रा. तेव्हां प्लुत होतांना त्या दोन्ही वर्णांची वाढ झाल्यासारखी होईल. जसें गर्भ वाढूं लागला असतां हात पाय वगैरे सर्व बाजूंनीं सारखाच वाढत जातो त्याप्रमाणें हें होय.

हा या सूत्राचा उपयोग आहे खरा पण—

पण काय?

(वा. २) पण असें कीं हा इकाराला अथवा उकाराला प्लुत केला असतां जें इष्ट नाहीं तें भलतेंच कांहींतरी होईल. म्हणजे अवर्णाची एक मात्रा आणि इकाराला किंवा उकाराला प्लुत केल्यामुळें त्यांच्या तीन मात्रा मिळून हा प्लुत चार मात्रांचा होऊं लागेल.

---

असतांना ऐकारादिक संध्यक्षरांचे अवयव जे इकार उकार त्यांना तो प्लुत होतो.

१. म्हणजे तशा प्रकारचा निराळाच शब्द उच्चारण्याचा प्रसंग येईल.

सिद्धं त्विदुतोर्दीर्घवचनात् ॥ ३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । इदुतोर्दीर्घो भवतीति वक्तव्यम् ॥ तदेतत्कथं कृत्वा सिद्धं भवति । यदि समः प्रविभागो मात्रावर्णस्य मात्रेवर्णोवर्णयोः । अथ ह्यर्धमात्रावर्णस्याध्यर्धमात्रेवर्णोवर्णयोरर्धतृतीयमात्रः प्राप्नोति । अथ ह्यध्यर्धमात्रावर्णस्यार्धमात्रेवर्णोवर्णयोरर्धचतुर्थमात्रः प्राप्नोति । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं तत्रायथेष्टप्रसङ्ग इति । तत्र सौर्यभगवतोक्तमनिष्टिज्ञो वाडवः पठति । इष्यत एव चतुर्मात्रः प्लुतः ॥

ऐचोऽप्रगृह्यस्यादूराद्धूते पूर्वस्यार्धस्यादुत्तरस्येदुतौ ॥ ८ । २ । १०७ ॥[1]

एचः प्लुतविकारे पदान्तग्रहणम् ॥१॥

एचः प्लुतविकारे पदान्तग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । भद्रं करोषि गौ३रिति ॥

(वा. ३) हा दोष येत नाहीं. त्रिमात्र प्लुत सिद्ध करतां येईल.

तो कसा ?

या सूत्रामध्यें प्लुत न सांगतांना इकार आणि उकार यांना दीर्घ होतो असें सांगावें.

असें म्हटलें तरी आपणांला इष्ट तें कसें बरें सिद्ध होतें ? जर ऐ व औ या संध्यक्षरांमध्यें सारखाच विभाग असेल म्हणजे अ वर्णाची एक मात्रा व इ वर्ण आणि उ वर्ण यांची एक मात्रा मिळून ऐ औ हे दोन मात्रेचे आहेत, असें जर असेल तर हें सिद्ध होईल. परंतु जर ऐ व औ या संध्यक्षरांमधील अवर्णाची फक्त अर्धीच मात्रा आणि इ वर्ण व उ वर्ण यांची दीड मात्रा असा विभाग मानला तर प्रकृत सूत्रानें त्या इ वर्णाला व उ वर्णाला दीर्घ म्हणजे द्विमात्र केला असतां अ वर्णाची अर्धी मात्रा धरून एकंदर ऐ व औ यांची अर्धी तिसरी म्हणजे अडीच मात्रा होतील. तसेंच जर अ वर्णाची दीड मात्रा आणि इ वर्ण व उ वर्ण यांची अर्धी मात्रा असा विभाग मानला तर त्यांतील इ वर्णाला व उ वर्णाला प्रकृत सूत्रानें दीर्घ म्हणजे द्विमात्र केला असतां अ वर्णाची दीड मात्रा धरून एकंदर अर्धी चवथी म्हणजे साडेतीन मात्रा होतील. शिवाय, प्लुताच्या ऐवजीं दीर्घ सांगितला असतां सूत्र तर फिरवावें लागणारच.

तर मग सूत्रकारांनीं मूळचें जसें सूत्र केलें आहे तसेंच असूं दे.

पण आतांच सांगितलें आहे ना कीं—प्लुत सांगितला तर जें इष्ट नाहीं असें भलतेच कांहीं तरी होईल म्हणजे एकंदर चार मात्रांचे हे ऐ आणि औ होतील.

वस्तुतः हा दोषच नव्हे. कारण खरें कसें पाहिजे ते त्या ब्राह्मणाला समजत नाहीं असें सौर्य नगरामधील आचार्यांनींच सांगितलें आहे. तेव्हां येथें इकाराला व उकाराला प्लुत करून ऐ व औ हे वर्ण चार मात्रेचे बनतात हें इष्टच आहे.

(सू. १०७ वा. १) एचाला प्लुत कर्तव्य असताना हा जो प्रकृत सूत्रानें एक प्रकारचा विकार सांगितला आहे तो ज्या ठिकाणीं पदाच्या शेवटीं एच् असेल तेथेंच होतो असें म्हणावें. कारण, भद्रं करोषि[2] गौ ३ : । या उदाहरणामध्यें हा विकार न झाला पाहिजे. म्हणजे तेथें साधाच प्लुत झाला पाहिजे.

---

१. (सू. १०७) प्रगृह्यसंज्ञक नव्हे असा असून 'दूराद्धूते च' एतद्व्यतिरिक्त शास्त्रानें सांगिलेल्या प्लुताचा विषय असलेल्या एचांतील पूर्व अर्धभागाला अकार आदेश होतो व तो प्लुत होतो. आणि पुढील अर्ध्या भागाला इकार व उकार आदेश होतात.

२. येथें 'अनुदात्तं प्रश्नान्ताभि०' (८।२।१००) यानें अनुदात्त प्लुत झाला आहे. परंतु पदान्तीं विसर्ग असल्यामुळें प्लुत विकार होत नाहीं.

## विषयपरिगणनं च ॥ २ ॥

विषयपरिगणनं च कर्तव्यम् । प्रशान्ताभिपूजितविचार्यमाणप्रत्यभिवादयाज्यान्तेष्विति वक्तव्यम् । प्रशान्त । अगमा३ः पूर्वा३न्ग्रामा३नग्निभूता३इ । पटा३उ । प्रशान्त ॥ अभिपूजित । सिद्धोऽसि माणवकाग्निभूता३इ । पटा३उ । अभिपूजित ॥ विचार्यमाण । होतव्यं दीक्षितस्य गृहा३इ । विचार्यमाण ॥ प्रत्यभिवाद । आयुष्मानेध्यग्निभूता३इ । प्रत्यभिवाद ॥ याज्यान्त । उक्षान्नाय वशान्नाय सोमपृष्ठाय वेधसे स्तोमैर्विधेमाग्नया३इ (ऋ. सं. ८ । ४३ । ११ )॥

## आमन्त्रिते छन्दस्युपसंख्यानम् ॥३॥

आमन्त्रिते छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । अग्ना३इ पत्नीवा३ः सजूर्देवेन त्वष्ट्रा सोमं पिब ( वा. सं ८ । १० )॥

## तयोर्य्वावचि संहितायाम् ॥ ८ । २ । १०८ ॥

अथ कयोरिमौ य्वावुच्येते । इदुतोरित्याह । तदिदुतोर्ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । पूर्वस्याधेस्यादुत्तरस्येदुताविति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । अचीत्येषा सप्तमीदुताविति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयि-

---

(वा. २) आणि हा प्लुताचा विकार अमुकच ठिकाणीं होतो असें विषयाचें परिगणनही केलें पाहिजे. तें असें कीं— प्रशान्त, अभिपूजित ( ८।२।१०० ) विचार्यमाण ( ८।२।९७ ) प्रत्यभिवाद ( ८।२।८३ ) आणि याज्यान्त ( ८।२।९० ) इतक्याच ठिकाणीं हा प्लुताचा विकार होतो असें म्हणावें. त्यांपैकीं प्रशान्ताचें उदा०— अगमा३ः पूर्वा३न् ग्रामा३न् अग्निभूता३इ । पटा३उ । अभिपूजिताचें उदा०—सिद्धोऽसि माणवकाग्निभूता ३ इ । पटा ३ उ । विचार्यमाणाचें उदा० होतव्यं दीक्षितस्य गृहा३इ । प्रत्यभिवादाचें उदा०—आयुष्मानेध्यग्निभूता ३ इ । याज्यान्ताचें उदा०— उक्षान्नाय वशान्नाय सोमपृष्ठाय वेधसे स्तोमैर्विधेमाग्नया३ इ.

(वा. ३) वेदामध्यें आमन्त्रित पदाच्या टीला अशाच प्रकारचा प्लुत होतो असें म्हणावें उदा०— अग्ना३इ पत्नीवा३ः सजूर्देवेन त्वष्ट्रा सोमं पिब।

( सू. १०८ ) या सूत्रानें हे जे यकार आणि वकार आदेश सांगितले आहेत ते कोणाला बरें करावयाचे आहेत ?

ह्रस्व इकार आणि उकार यांना हे यकार आणि वकार आदेश करावे असें म्हणतों.

तर मग सूत्रामध्यें इदुतोः असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण पूर्वसूत्रांतून इकाराचा व उकाराचा संबंध होत आहे.

मागें कोणत्या सूत्रांत इकाराचा व उकाराचा निर्देश केला आहे ?

पूर्वस्यार्धस्यादुत्तरस्येदुतौ असा मागच्याच सूत्रामध्यें इदुतौ असा इकार आणि उकार यांचा निर्देश केला आहे ना ?

पण तेथें इदुतौ असा इकाराचा व उकाराचा जो निर्देश केला आहे तो प्रथमा विभक्तीमध्यें केलेला आहे. आणि येथें तर षष्ठी विभक्तीमध्यें त्यांचा निर्देश जरूर आहे.

या सूत्रामध्यें अचि ही सप्तमी दृष्टीस पडते. ती येथें अनुवृत्त झालेल्या इदुतौ या पदांतील प्रथमा विभक्ति ही षष्ठीच्या ऐवजी धरावी अशी कल्पना 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' (१।१।६६) या परिभाषेच्या जोरावर करील. ( एकंदरीत

---

१. येथें प्लुताची प्राप्ति नसतांनाच हा अपूर्व प्लुतविकार सांगितला आहे.

१. ( सू. १०८ ) प्लुत-विकाराच्या संनियोगानें विहित जे इकार व उकार त्यांचे स्थानीं क्रमानें यकार आणि वकार आदेश होतात अच् पुढें असतांना आणि संहिता-विषय असतांना.

ष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १. १. ६६ ] इति ॥

किमर्थमिदमुच्यते नेको यणचि [ ६. १. ७७ ] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । असिद्धः प्लुतः प्लुतविकारौ चेमौ ॥ सिद्धः प्लुतः स्वरसंधिषु । कथं ज्ञायते । यदयं प्लुतः प्रकृत्येति प्लुतस्य प्रकृतिभावं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । सतो हि कार्यिणः कार्येण भवितव्यम् ॥ इदं तर्हि प्रयोजनं दीर्घशाकलप्रतिषेधार्थम् । दीर्घत्वं शाकलं च मा भूदिति । अग्ना३यिन्द्रम् । पटा३वुदकम् ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । आरभ्यते प्लुतपूर्वस्य यणादेशः प्लुतपूर्वस्य दीर्घशाकलप्रतिषेधार्थमिति ॥ तन्न वक्तव्यं भवति ॥ अवश्यं तद्वक्तव्यं यौ प्लुतपूर्वाविदुतावप्लुतविकारौ तदर्थम् । भो३यिन्द्र । भो३यिडेति ॥ यदि तर्हि तस्य निबन्धनमस्ति तदेव वक्तव्यमिदं न वक्तव्यम् ॥ इदमप्यवश्यं वक्तव्यं स्वरार्थम् । तेन हि सत्युदात्तस्वरितयोर्यणः स्वरितोऽनुदात्तस्य [ ८. २. ४ ] इत्येष स्वरः

---

सूत्रामध्यें इकार आणि उकार यांचा परामर्श करण्याकरितां जें तयोः हें पद उच्चारलें आहे तें काढून टाकलें तरी चालेल. )

पण हें सूत्र मुळीं कशाकरितां केलें आहें ? तें करावयास नको. कारण ' इको यणचि ' ( ६।१।७७ ) या सूत्रानेंच सिद्धि होईल.

' इको यणचि ' यानें सिद्धि होणार नाहीं. कारण, प्लुत असिद्ध आहे. आणि हे इकार आणि उकार तर प्लुताचेच विकार आहेत.

' इको यणचि ' याच्या दृष्टीनें प्लुत असिद्ध होणार नाहीं. कारण स्वरसंधि कर्तव्य असतांना प्लुत सिद्ध आहे असें मानलें आहे.

असें कशावरून समजावें ?

अशावरून समजावें कीं, हा आचार्य पाणिनि ' प्लुतप्रगृह्या अचि० ' ( ६।१।१२५ ) या सूत्रानें प्लुताला प्रकृतिभाव सांगतो.

हें ज्ञापक कसें जमतें ?

ज्ञापक असें जमतें कीं उद्देश्य सिद्ध आहे असें समजूनच त्याला प्रकृतिभावरूप कार्य पाणिनीनें सांगितलें आहे.

तर मग ह्या प्रकृत सूत्राचा असा उपयोग समजावा कीं दीर्घ आणि शाकल यांच्या प्रतिषेधाकरितां म्हणजे ' अकः सवर्णे दीर्घः ' (६।१।१०१) या सूत्रानें सांगितलला दीर्घ आणि ' इकोऽसवर्णे ' ( ६।१।१२७ ) या सूत्रानें सांगितलेला प्रकृतिभाव हे दोन विधी ' इको यणचि ' याचा बाध करून होऊं लागतील ते होऊं नयेत. उदा०—अग्ना३यिन्द्रम्. पटा३वुदकम्.

हा देखील सूत्राचा उपयोग आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण, ज्या इकाराच्या व उकाराच्या पूर्वीं प्लुत आहे त्याला मुद्दाम स्वतन्त्र यणादेश सांगितलाच (६।१।७७ वा. १ ) आहे. आणि तो याचकरितां आहे कीं प्लुताच्या पुढील इकार व उकार यांना दीर्घ आणि शाकल यांचा निषेध व्हावा म्हणून. (६।१।७७ वा. २).

हें सूत्र केलें म्हणजे तें मुद्दाम निराळें वचन करावयास नको.

तें वचन तर अवश्य केलेंच पाहिजे. कारण ज्या इकार व उकाराच्या पूर्वीं प्लुत आहे आणि जे इकार व उकार स्वतः प्लुताचे विकार नव्हेत त्यांकरितां तें स्वतंत्र आणि अवश्य केलेंच पाहिजे. उदा०— भो३यिन्द्रे[२]. भो३यिडेति.

तें स्वतंत्र वचन करण्याचें कारण जर असें आहे तर तें वचनच असूं दे; हें सूत्र करूं नये.

पण स्वराकरितां हें सूत्रही अवश्य केलेंच पाहिजे. कारण त्या स्वतन्त्र वचनानें यणादेश

---

२. भो इ इन्द्र असें इ हें स्वतंत्र अव्यय आहे.

प्रसज्येत । अनेन पुनः सत्यसिद्धत्वान्न भविष्यति ॥ यदि तर्ह्यस्य निबन्धनमस्तीदमेव वक्तव्यं तन्न वक्तव्यम् । ननु चोक्तं तदप्यवश्यं वक्तव्यं यौ प्लुतपूर्वाविदुतावप्लुतविकारौ तदर्थं भो३यिन्द्र भो३यिडेति । छान्दसमेतद्दृष्टानुविधिश्छन्दसि भवति । यत्तर्हि न च्छान्दसम् । भो३यिन्द्रं साम गायति । एषोऽपि च्छन्दसि दृष्टस्यानुप्रयोग इति ॥

किं नु यणा भवतीह न सिद्धं
य्वाविदुतोर्यदयं विदधाति ।
तौ च मम स्वरसंधिषु सिद्धौ
शाकलदीर्घविधी तु निवर्त्यौ ॥ १ ॥
इक्तु यदा भवति प्लुतपूर्व
स्तस्य यणं विदधात्यपवादम् ।
तेन तयोश्च न शाकलदीर्घौ
यण्स्वरबाधनमेव तु हेतुः ॥ २ ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये ऽष्टमस्याध्यायस्य द्वितीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

केला तर तो सिद्ध असल्यामुळें 'उदात्तस्वरितयोर्यणः०' (८।२।४) या सूत्रानें सांगितलेला स्वरित स्वर होऊं लागेल. आणि या प्रकृत सूत्रानें यकार व वकार हे आदेश केले तर मात्र ते असिद्ध असल्यामुळें स्वरित स्वर होणार नाहीं.

आतां असें जर हें सूत्र करण्याचें कारण असेल तर हेंच सूत्र करावें; तें स्वतन्त्र वचन करूं नये.

पण आतांच सांगितलें आहे ना कीं ज्या इकाराच्या व उकाराच्या पूर्वी प्लुत आहे आणि जे इकार आणि उकार स्वतः प्लुताचे विकार नव्हेत त्यांकरितां तें स्वतंत्र वचन अवश्य केलेंच पाहिजे ! उदा०—भो३ यिन्द्र. भो३ यिडेति. हीं उदाहरणें तर वेदामधील आहेत. आणि वेदामध्यें तर विधीला अनुसरून प्रयोग केले जात नाहींत. तर उलट वैदिक प्रयोग पाहून त्याला अनुसरूनच तेथें विधी होतात असें म्हणावें लागतें. तर मग जो वैदिक प्रयोग नव्हे त्याकरितां तें स्वतंत्र वचन अवश्य केलें पाहिजे उदा०— भो३ यिन्द्रं साम गायति.

हें जरी लौकिक उदाहरण आहे तरी हें वेदामध्यें दृष्ट प्रयोगाचेंच अनुकरण आहे.

ह्या प्रकृत सूत्रानें आचार्य पाणिनीनें जे हे ह्रस्व इकार व उकार याचे स्थानीं यकार व वकार आदेश सांगितले आहेत ते 'इको यणचि' यानें सिद्ध होत नाहींत अशा समजुतीनें सांगितले आहेत कीं काय ? हे ह्रस्व इकार व उकार असिद्ध असल्यामुळें त्यांना यण् होणार नाहीं असेंही म्हणता येत नाहीं. कारण स्वरसंधि कर्तव्य असतांना ते सिद्ध आहेत असें खरें; परंतु 'इको यणचि' याचा बाध करून 'इकोऽसवर्णे०' आणि 'अकः सवर्णे०' हे होतील ते न व्हावेत याकरितां येथें यकार आणि वकार आदेश सांगितले पाहिजेत.

(१.) तरी पण ज्या ठिकाणीं प्लुताच्या पुढें इक् असेल त्या ठिकाणीं प्रकृतिभावाचा अपवाद म्हणून मुद्दाम वार्तिककारांनीं यण् सांगितला आहे. त्या वचनानेंच 'इकोऽसवर्णे०' आणि 'अकः सवर्णे०' हे होणार नाहींत. तथापि 'उदात्तस्वरितयोः' यानें सांगितलेला यण् स्वर होऊं नये हाच येथें यकार व वकार सांगण्याचा खरा हेतु होय.

(२.) याप्रमाणें भगवान् पतञ्जलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील आठव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें; व दुसरा पाद समाप्त झाला.

## मतुवसो रु संबुद्धौ छन्दसि ॥ ८ । ३ । १ ॥

### मतुवसो रादेशे वन उपसंख्यानम् ॥ १ ॥

मतुवसो रादेशे वन उपसंख्यानं कर्तव्यम्। यस्त्वायन्तं वसुना प्रातरित्वः (ऋ. सं. १।१२५।२ )॥

### विभाषा भवद्भगवदघवतामोच्चावस्य ॥ २ ॥

छन्दसि भाषायां च भवत् भगवत् अघवदित्येतेषां विभाषा रुर्वक्तव्य ओश्चावस्य वक्तव्यः । भोः भवन् । भगोः भगवन् । अघोः अघवन्निति ॥ संबुद्धाविल्युच्यते तत्रेदं न सिध्यति । भो ब्राह्मणा इति । तथा विभक्तौ लिङ्गविशिष्टग्रहणं नेतीह न प्राप्नोति । भो ब्राह्मणि ॥ नैष दोषः । अव्ययमेष भोःशब्दो नैषा भवतः प्रवृत्तिः । कथमव्ययत्वम् । विभक्तिस्वरप्रतिरूपकाश्च निपाता भवन्तीति निपातसंज्ञा निपातोऽव्ययमित्यव्ययसंज्ञा ॥

## [ अत्रानुनासिकः पूर्वस्य तु वा ॥ ८ । ३ । २ ॥

---

( सू.१ वा.१ )वेदामध्यें मतुप्रत्ययान्त आणि वसुप्रत्ययान्त शब्दाच्या शेवटच्या वर्णाला हा जो रु सांगितला आहे तो वन्-प्रत्ययान्त शब्दालाही सांगितला पाहिजे. उदा०- यस्त्वायन्तं वसुनाः प्रातरित्वः.

(वा.२)वेदामध्ये भवत् भगवत् आणि अघवत् या शब्दांच्या शेवटच्या वर्णाला संबुद्धि प्रत्यय पुढें असतांना रुत्व विकल्पानें होतें आणि त्याच्या बरोबर त्याच शब्दांतील अव या भागाला ओकार होतो असें सांगावें. उदा०- भोः, भवन्. भगोः, भगवन्. अघोः, अघवन्.

येथे संबुद्धि प्रत्यय पुढें असतांना असें म्हटलें आहे. तेव्हां भो ब्राह्मणाः हें उदाहरण साधत नाहीं. कारण येथें एकवचन नसल्यामुळें संबुद्धि प्रत्यय पुढें नाहीं. तसेंच भो ब्राह्मणि हें स्त्रीलिंगीं उदाहरण सिद्ध होणार नाहीं. कारण विभक्ति प्रत्ययाच्या निमित्तानें जें कोणत्याही शब्दाला सांगितलेलें कार्य तें तो शब्द स्त्रीलिंगी असतांना होत नाहीं अशी परिभाषा असल्यामुळें भवती या स्त्रीलिंगी शब्दाला रुत्व होणार नाहीं. तेव्हा तेथेंही भोः असें रूप सिद्ध होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. भो ब्राह्मणाः, भो ब्राह्मणि या उदाहरणांमध्ये संबोधन प्रत्ययाचा प्रकृतिभूत असा जो भोस् हा शब्द तो भवत् शब्दापासून सिद्ध झालेला आहे असें समजूं नये. या ठिकाणीं भोस् हें स्वतंत्र अव्यय आहे.

भोस् याला अव्यय संज्ञा कोणत्या सूत्रानें होते ?

विभक्तिप्रत्ययान्तासारखे दिसणारे आणि स्वरासारखे दिसणारे जे शब्द ते निपातसंज्ञक होतात ( १।४।५७ ) असें सांगितलें असल्यामुळें येथे भोस् याला निपातसंज्ञा होते. आणि निपाताला अव्ययसंज्ञा होते ( १।१।३७ ) असें सांगितलें असल्यामुळें भोस् याला अव्ययसंज्ञा होईल.

---

१. ( सू. १ ) मतुप्रत्ययान्त आणि वसुप्रत्ययान्त अशा पदाला संबुद्धि-प्रत्यय पुढें असतांना वेदामध्यें रुत्व होतें.

२. प्रातरेतीति प्रातरित्वः । प्रातर् उपपदपूर्वक इ धातूहून क्वनिप् (३।२।७५) प्रत्यय. तुक् ( ६।१।७१ ) आगम होऊन प्रातरित्वन् शब्द सिद्ध होतो.

१. ( सू. २ ) या रु प्रकरणामध्यें ज्याचें स्थानीं रु किंवा लोप वगैरेंचें विधान केलें आहे त्याच्या मागील वर्णाला अनुनासिक विकल्पानें होतो.

[१]आतोऽटि नित्यम् ॥ ८ । ३ । ३ ॥
अनुनासिकात्परोऽनुस्वारः ॥ ८ । ३ । ४ ॥
समः सुटि ॥ ८ । ३ । ५ ॥
पुमः खय्यम्परे ॥ ८ । ३ । ६ ॥
नश्छव्यप्रशान् ॥ ८ । ३ । ७ ॥
उभयथर्क्षु ॥ ८ । ३ । ८ ॥
दीर्घादटि समानपादे ॥ ८ । ३ । ९ ॥
नॄन्पे ॥ ८ । ३ । १० ॥
स्वतवान् पायौ ॥ ८ । ३ । ११ ॥]
कानाम्रेडिते ॥ ८ । ३ । १२ ॥
संपुंकानां सत्वम् ॥ १ ॥
संपुकानां सत्वं वक्तव्यम् । सँस्स्कर्ता

(सू.१२वा.१)सम् पुम् आणि कान् या शब्दांच्या शेवटच्या वर्णाला जो रु ह्या तीन सूत्रांनी रु आदेश सांगितला आहे तो न सांगतां सकार आदेश सांगावा. उदा०— सँस्कर्ता,

१. ( सू. ३ ) अट् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असतांना रु आदेशाच्या मागील आकाराला नित्य अनुनासिक होतो.

१. ( सू. ४ ) रु आदेशाच्या मागील वर्णाला जेव्हां अनुनासिक करण्यांत येत नाहीं तेव्हां त्या वर्णाच्या पुढें अनुस्वार आगम होतो.

१. ( सू. ५ ) सम् या शब्दाला रु आदेश होतो सुडागमाचा सकार पुढें असतांना आणि संहिता-विषय असतांना.

१. ( सू. ६ ) अम् प्रत्याहारांतील वर्ण ज्याच्या पुढें आहे असा खय् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असतांना पुम् या शब्दाला रु आदेश होतो.

१. ( सू. ७ ) अम् या प्रत्याहारांतील वर्ण ज्याच्या पुढें आहे असा छव् प्रत्याहारांतील वर्ण पुढे असतांना प्रशान् शब्द खेरीज करून नकारान्त पदाला रु आदेश होतो.

१. ( सू. ८ ) अम् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असलेला असा छव् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असतांना नकारान्त पदाला ऋचेमध्यें विकल्पानें रु आदेश होतो.

१. ( सू. ९ ) दीर्घ वर्णाच्या पुढें असून पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराला रु आदेश विकल्पानें होतो, अट् प्रत्याहारांतीलच वर्ण पुढें असतांना, पण नकार आणि अट् हे दोन्ही वर्ण मंत्राच्या एका पादामध्यें असतील तर.

१. ( सू. १० ) नॄन् या शब्दाच्या नकाराला विकल्पानें रु आदेश होतो पकार पुढें असतांना.

१. ( सू. ११ ) स्वतवान् या शब्दाच्या नकाराला रु आदेश विकल्पानें होतो पायु शब्द पुढें असतांना.

१. ( सू. १२ ) कान् या शब्दाच्या नकाराला रु आदेश होतो आम्रेडित पुढें असतांना.

२. सम् उपसर्गपूर्वक कृ धातूहून तृच् प्रत्यय. गुण. ' सपरिभ्याम् ० ' ( ६।१।१३७ ) यानें सुट् आगम. सम् स्कर्ता असें असतां ' समः सुटि ' ( ८।३।५ ) यानें मकाराला रु आदेश. सर् स्कर्ता असें असतां ' अत्रानुनासिकः० ' ( ८।३।२ ) या सूत्रानें रु आदेशाच्या मागील अकाराला अनुनासिक. अनुनासिक केला नाहीं त्या वेळी ' अनुनासिकात्परो० ' ( ८।३।४) यानें अनुस्वार. सँर् स्कर्ता असें असतां 'खरवसानयो०' ( ८।३।१५ ) यानें रेफाला विसर्ग. ' विसर्जनीयस्य सः' ( ८।३।३४ ) या सकार आदेशाचा बाध करून ' वा शरि ' ( ८।३।३६ ) यानें पाक्षिक विसर्ग प्राप्त झाला असतां त्याचा बाध करून ' संपुंकानाम् ' या वार्तिकानें नित्य सकार आदेश केल्यानें सँस्स्कर्ता व संस्स्कर्ता अशीं दोन दोन सकार असलेली रूपें तयार होतात. ' समो वा लोपमेके ' या वचनावरून सम्-शब्दाच्या मकाराचा लोप केला असतां, लोपही रु-प्रकरणस्थच असल्यामुळें अनुनासिक व अनुस्वार केल्यानें सँस्कर्ता व संस्कर्ता अशीं दोन एक सकार असलेलीं रूपें होतात. द्विसकारपक्षीं ' अनचि च ' ( ८।४।४७ ) या सूत्रानें सकाराला द्वित्व केलें असतां सँस्स्स्कर्ता व संस्स्स्कर्ता अशीं दोन रूपें तीन सकार असलेलीं होतात.

पुँस्कामा काँस्कानिति ॥

**रुविधौ ह्यनिष्टप्रसङ्गः ॥ २ ॥**

रुविधौ हि सत्यनिष्टं प्रसज्येत । इह तावत्सँस्स्कर्तेति वा शरि [ ८. ३. ३६ ] इति प्रसज्येत । पुँस्कामेतीदुदुपधस्येति षत्वं प्रसज्येत । काँस्कानिति कुप्वोः ᳲकः प्रसज्येत ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । क्रियते न्यास एव । समः स्सुटीति द्विसकारको निर्देशः । समः सुटि सकारो भवति । तत्प्रकृतमुत्तरत्रानुवर्तिष्यते ॥ यदि तदनुवर्तते नश्छव्यप्रशान् [८. ३. ७] इत्यत्रापि प्राप्नोति । संबन्धमनुवर्तिष्यते । समः सुटि । पुमः खय्यम्परे सो भवति । नश्छव्यप्रशान्त्रुर्भवति पुमः खय्यम्परे सकारः । उभयथर्क्षु [८] दीर्घादटि समानपादे [९]

---

पुँस्कामा[३] काँस्कान्[४].

(वा. २) जर या सूत्रांनीं रु आदेश केला तर भलतेंच रूप होईल. असें पहा कीं सँस्कर्ता या उदाहरणामध्यें 'वा शरि' (८।३।३६) या सूत्रानें विकल्पानें विसर्ग होऊं लागेल. तसेंच पुँस्कामा या उदाहरणामध्यें 'इदुदुपधस्य०' ( ८।३।४१) या सूत्रानें षत्व होऊं लागेल. तसेंच काँस्कान् या उदाहरणामध्यें ' कुप्वोः ᳲ क ᳲ पौ च ' ( ८।३।३७ ) या सूत्रानें ᳲक असा जिव्हामूलीय आदेश होऊ लागेल.

तर मग ह्या तीन सूत्रांनीं सकार आदेश सांगितला पाहिजे.

तसें निराळें सांगावयास नको. कारण सूत्रकारांनीं तसेंच उच्चारिलें आहे. समःस्सुटि असे दोन सकार सूत्रामध्यें घातलेच आहेत. तेव्हां सम् शब्दाला सुट् पुढें असतांना सूत्रानेंच सकार आदेश होत आहे. आणि त्याच सकाराची अनुवृत्ति 'पुमः खय्यम्परे' आणि 'कानाम्रेडिते' या सूत्रांमध्यें होईल.

जर सकाराची अनुवृत्ति समः सुटि या सूत्रापासून चालू होईल तर ' नश्छव्यप्रशान् ' वगैरे सूत्रांमध्यें सकाराचा संबंध होईल आणि भवांस्त्रत्र वगैरे उदाहरणांमध्यें सकारच आदेश होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण सकाराची संबंधानुवृत्ति केली जाते. ती अशी कीं—समः सुटि या सूत्राच्या पुढें पुमः खय्यम्परे या सूत्रानें पुम् शब्दाला सकार आदेश सांगितला आहे. त्याच्या पुढें नश्छव्यप्रशान् या सूत्राचा अर्थ नकारान्त पदाला रु आदेश होतो, आणि अम्परक खय् पुढें असतांना पुम् शब्दाला सकार होतो. अशा रीतीनें त्याच्या पुढील ' उभयथर्क्षु ', ' दीर्घादटि समानपादे, ' ' नॄन्पे, ' ' स्वतवान् पायौ, ' याही सूत्रांचा अर्थ असा समजावा कीं—त्या त्या ठिकाणीं रु आदेश होतो आणि अम्-परक खय् पुढें असतांना पुम् शब्दाला

---

३. 'पुंसि कामो यस्याः सा' असा अन्य पदार्थी बहुव्रीहि केला असतां ' सुपो धातु० ' ( २।४।७१ ) यानें सुप् प्रत्ययाचा लुक्. ' संयोगान्तस्य० ' ( ८।२।२३ ) यानें सकाराचा लोप. पुम्-कामा असें असतां मकाराला रुत्व, अनुस्वार व अनुनासिक यांचा विकल्प. रेफाला विसर्ग. आणि संपुंकानाम्०' या वचनानें सत्व केलें असतां पुँस्कामा व पुंस्कामा अशीं रूपें होतात.

४. कान् या पदाला वीप्सार्थी द्वित्व केल्यानंतर कान् कान् असें असतां प्रथम नकाराला रुत्व, अनुनासिकविकल्प, पक्षीं अनुस्वार०रेफाला विसर्ग०विसर्गाला प्राप्त झालेल्या सत्वाचा बाध करून ' कुप्वोः०' (८।३।३७) हें सूत्र प्राप्त झालें असतां त्याचा बाध करून 'संपुंकानां०' यानें सत्व केल्यानें काँस्कान् कांस्कान् अशी रूपें तयार होत आहेत.

नृन्पे [१०] स्वतवान्पायौ [११] रुर्भवति पुमः खय्यम्परे सकारः । कानाम्रेडिते सकारः । पुमः खय्यम्पर इति निवृत्तम् ॥

समो वा लोपमेक इच्छन्ति । संस्कर्ता सँस्कर्ता ॥

### ढो ढे लोपः ॥ ८ । ३ । १३ ॥

### ढलोपेऽपदान्तग्रहणम् ॥ १ ॥

ढलोपेऽपदान्तग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । श्वलिड्ढौकते । गुडलिड्ढौकते ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । जश्त्वमत्र बाधकं भविष्यति ॥

### जश्भावादिति चेदुत्तरत्र ढस्याभावादपवादप्रसङ्गः ॥ २ ॥

जश्भावादिति चेदुत्तरत्र ढकारस्याभावादसिद्धत्वादपवादोऽयं विज्ञायते । कस्य । जश्त्वस्य ॥

### तस्मात्सिद्धवचनम् ॥ ३ ॥

तस्मात्सिद्धत्वं वक्तव्यम् । कस्य । ष्टुत्वस्य ॥

---

सकार होतो. अशा रीतीनें पुम् शब्दाशीं संबंध पावलेल्याच सकाराची मध्यें अनुवृत्ति होत आहे. त्याच्या पुढें ' कानाम्रेडिते ' या सूत्रामध्यें फक्त सकाराचीच अनुवृत्ति केली जाते. ' अम् परक खय् पुढे असतांना पुम् शब्दाला ' या शब्दाचा संबंध तेथें करू नये.

सम् शब्दाच्या मकाराचा सुट् पुढे असताना विकल्पानें लोप होतो असें कांहीं लोक समजतात. उदा०– संस्कर्ता, सँस्कर्ता.

( सू. १३ वा. १ ) ह्या सूत्रानें[1] हा जो ढकाराचा लोप सांगितला आहे तो पदाच्या शेवटीं नसलेल्या ढकाराचा होतो असें म्हटलें पाहिजे. कारण श्वलिड्[2] ढौकते, गुडलिड् ढौकते या उदाहरणांमध्यें ढकाराचा लोप न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण श्वलिड् ढौकते वगैरे उदाहरणांमध्यें ' झलां जशोन्ते. ' ( ८।२।३९ ) यानें सांगितलेलें जश्त्व या ढकाराच्या लोपाचा बाध करील.

( वा. २ ) श्वलिड् ढौकते वगैरे उदाहरणांमध्यें हा ढलोप असिद्ध असल्यामुळें त्याचा बाध करून जश्त्व होईल असें म्हणाल तर तसें म्हणतां येणार नाहीं. कारण पदान्ताशिवाय अन्य ठिकाणीं 'ष्टुना ष्टुः'(८।४।४१) या पुढील सूत्रानें झालेला ढकार असिद्ध असल्यामुळें या लोपाला उदाहरण मिळत नाहीं. आणि म्हणूनच हा लोप अपवाद समजला जाईल.

कोणाचा अपवाद समजला जाईल ?

झलां जशोऽन्ते ( ८।२।३९ ) या सूत्रानें सांगितलेल्या जश्त्वाचा.

(वा. ३)तेव्हां ह्या लोपाच्या दृष्टीनें तें सिद्धच आहे असें सांगितलें पाहिजे.

कोणतें सिद्ध म्हणून सांगितलें पाहिजे. ?

ष्टुना ष्टुः या सूत्रानें सांगितलेलें ष्टुत्व म्हणजे ढकार हा ह्या प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या

---

१. ( सू. १३ ) ढकाराचा लोप होतो ढकार पुढें असतांना.

२. श्वानं लेढीति श्वलिट्. श्वन् शब्द उपपद असतांना ' लिह् आस्वादने ' या धातूहून क्विप् प्रत्यय. उपपद समास. सुब्–लुक्. समासाहून सुप्रत्यय. हल्ङ्यादिलोप. 'हो ढः' ( ८।२।३१ ) यानें हकाराला ढकार आदेश. श्वलिढ् ढौकते येथें ढकाराचा लोप न व्हावा याकरितां ' अपदान्तस्य ' असें या सूत्रामध्यें म्हटलें पाहिजे.

३. श्वलिढ् ढौकते असें असतां येथें ' पूर्वत्रासिद्धम् ' ( ८।२।१ ) यानें ढलोपाला असिद्धत्व असल्यामुळें प्रथमतः जश्त्व होईल व मागाहून ढकार नसल्यामुळें ढकार–लोप प्राप्तच होत नाहीं हाच येथें ढलोपाचा बाध होय.

सङ्ग्रहणं वा ॥ ४ ॥

सङ्ग्रहणं वा कर्तव्यम् । सङि ढ इति वक्तव्यम् ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । आनन्तर्येमिहाश्रीयते ढकारस्य ढकार इति । कचिच्च संनिपातकृतमानन्तर्यं शास्त्रकृतमनानन्तर्यं कचिच्च नैव संनिपातकृतं नापि शास्त्रकृतम् । ष्टुत्वे संनिपातकृतमानन्तर्यं शास्त्रकृतमनानन्तर्यं जश्त्वे नैव संनिपातकृतं नापि शास्त्रकृतम् । यत्र कुतश्चिदेवानन्तर्यं तदाश्रयिष्यामः ॥

[ रो रि ॥ ८ । ३ । १४ ]

खरवसानयोर्विसर्जनीयः ॥ ८ । ३ । १५ ॥

विसर्जनीयोऽनुत्तरपदे ॥ १ ॥

विसर्जनीयोऽनुत्तरपद इति वक्तव्यम् ।

---

लोपाच्या दृष्टीनें सिद्ध आहे असे सांगितलें पाहिजे.

( वा. ४ ) अथवा या सूत्रामध्यें सङ् असा शब्द घालावा. म्हणजे सङ् नावाचे जे प्रत्यय त्यांतील ढकार पुढें असताना ढकाराचा लोप होतो असें म्हणावें. तेव्हां श्वलिड् ढौकते या ठिकाणीं लोप होणार नाहीं.

तर मग तसें सूत्रांत म्हटलें पाहिजे.

तसें म्हणण्याचें कारण नाहीं.

कारण ढकाराचा ढकार पुढें असतांना लोप होतो असें येथें त्या दोन ढकाराचें सामीप्य निमित्त म्हणून धरलें आहे. तें सामीप्य उदाहरणामध्यें दोन ढकार जवळ येत असल्यामुळें कांहीं ठिकाणीं घडून येतें. परंतु तेथें 'पूर्वत्रासिद्धम्' या शास्त्राच्या जोरावर तें सामीप्य नाहीं असें मानलें जातें. आणि कांहीं ठिकाणीं तर दोन ढकार जवळ येतच नाहींत आणि शास्त्रानेंही ते जवळ आहेत असें मानलें जात नाहीं. तेव्हां लीढः वगैरे उदाहरणांमध्यें ष्टुना ष्टुः ( ८।४।४१ ) यानें ष्टुत्व केल्यानंतर दोन ढकार जवळ येतात म्हणून त्यांचें सामीप्य आहे. फक्त तेथें 'पूर्वत्रासिद्धम्' या शास्त्राच्या जोरावर तें दोन ढकारांचें सामीप्य नाहीं असें मानावें लागतें. आणि श्वलिड् ढौकते वगैरे उदाहरणांमध्यें जश्त्व केल्यानंतर दोन ढकार जवळ येत नाहींत. त्यामुळें त्यांचें सामीप्य नाहीं. आणि तेथें शास्त्रानेंही त्यांचें सामीप्य मानलें जात नाहीं. आतां प्रकृत सूत्राविषयीं म्हणाल तर दोन ढकारांमध्यें कशाही प्रकारचें सामीप्य असलें तरी तें कबूल करूं. आणि त्यामुळें तेथें लोपही करतां येईल.

(सू.१५ वा.१) हा जो प्रकृत सूत्रानें रेफाला विसर्ग सांगितला आहे तो उत्तरपदामुळें उत्पन्न झालेला जो पूर्वपदाच्या शेवटचा रेफ त्याला

---

४. ढलोप-शास्त्राच्या दृष्टीनें त्रिपादींतील पुढील ष्टुत्व-शास्त्राला सिद्धत्व सांगितल्यानें लीढः इत्यादि स्थलीं ढलोपाला चारितार्थ्य मिळत असल्यामुळें श्वलिड् ढौकते इत्यादि स्थलीं सिद्ध अशा जश्त्वाचा असिद्ध अशा ढलोपानें बाध करता येत नाहीं. तेव्हां पूर्वी जश्त्व झाल्यानें उद्देश्यभूत ढकारच नसल्यामुळें श्वलिड् ढौकते या उदाहरणामध्यें ढलोप होऊं शकत नाहीं. सबब अपदान्त-ग्रहण करण्याचें कारण दिसत नाहीं.

५. 'गुप्तिज्किद्भ्यः सन्' ( ३।१।५ ) येथील सनाच्या स शब्दापासून 'तिप्तस्झि ... वहि-महिङ्' ( ३।४।७८ ) या ङकारापर्यंत 'सङ्' असा प्रत्याहार बांधला आहे. तेव्हां ढकारादि असा सङ् नांवाचा प्रत्यय पुढें असतांना ढकाराचा लोप सांगितला असल्यामुळें वरील उदाहरणामध्यें ढलोप होणार नाहीं.

१. ( सू. १४ ) रेफाचा लोप होतो रेफ पुढें असतांना.

१. ( सू. १५ ) पदाच्या शेवटच्या रेफाला विसर्ग होतो खर् पुढें असतांना किंवा अवसान असताना.

इह मा भूत् । नार्कुटः नार्पत्य इति ॥

न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ २ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गो रेफः । अन्तरङ्गो विसर्जनीयः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ नैष युक्तः परिहारः । अन्तरङ्गं बहिरङ्गमिति प्रतिद्वन्द्वभाविनावेतौ पक्षौ । सत्यन्तरङ्गे बहिरङ्गं सति बहिरङ्गे ऽन्तरङ्गम् । न चात्रान्तरङ्गबहिरङ्गयोर्युगपत्समवस्थानमस्ति । किं कारणम् । असिद्धत्वात् । न चानभिनिर्वृत्ते बहिरङ्गे ऽन्तरङ्गं प्राप्नोति । तत्र निमित्तमेव बहिरङ्गमन्तरङ्गस्य ॥ अनिमित्तं बहिरङ्गमन्तरङ्गस्य । किं कारणम् । असिद्धत्वात् ॥ कथमसिद्धत्वं यावता पूर्वत्रासिद्धम्

---

होत नाहीं असें म्हणावें. कारण नार्कुटः नार्पत्यः या उदाहरणांमध्यें विसर्ग न झाला पाहिजे.

तर मग उत्तरपदाच्या निमित्तानें झालेल्या रेफाला विसर्ग होत नाहीं असें म्हटलें पाहिजे.

(वा. २) विसर्गाचा मुद्दाम निषेध करण्याचें कारण नाहीं.

कां बरें ?

रेफ हा बहिरंग आहे म्हणून. रेफ हा बहिरंग आहे आणि विसर्ग हा अंतरंग आहे. आणि अंतरंग कर्तव्य असतांना बहिरंग असिद्ध समजावें अशी तर परिभाषाच आहे.

नार्कुटः वगैरे उदाहरणांमध्यें या परिभाषेनें समाधान करणें बरोबर होणार नाहीं. कारण अंतरंग आणि बहिरंग हे दोन शब्द एकमेकाच्या उलट आणि एकमेकाच्या अपेक्षेनें आपापल्या अर्थाला दाखविणारे आहेत. अंतरंग असेल तरच त्याच्यामुळें दुसऱ्याला बहिरंग म्हणतां येतें. आणि बहिरंग असेल तरच त्याच्यामुळें दुसऱ्याला अंतरंग म्हणतां येतें. आणि प्रकृत स्थळीं तर अंतरंग व बहिरंग हीं दोन्ही शास्त्रें एकदम बुद्ध्यारूढ होत नाहींत.

कां बरें ?

असिद्धत्व आहे म्हणून.

तें असिद्धत्व कसें ?

पूर्वत्रासिद्धम् (८।२।१) या शास्त्रानें वृद्धीच्या दृष्टीनें त्रिपादीमध्यें सांगितलेला विसर्ग असिद्ध आहे असें मानलें जातें. त्यामुळें वृद्धि आणि विसर्ग हीं दोन्ही शास्त्रें एकदम मनांत घेतां येत नाहींत. तेव्हां अर्थातच त्यांमध्यें अमुक अंतरंग आहे आणि अमुक बहिरंग आहे असें म्हणतां येणार नाहीं.

शिवाय येथें वस्तुस्थिति पाहिली तर ज्याला तुम्ही बहिरंग म्हणत आहां ती बहिरंग वृद्धि ही अंतरंग अशा विसर्गाचें निमित्तच होत आहे. (तेव्हां अर्थात् तो विसर्ग येथें होणारच.)

बहिरंग वृद्धि ही अंतरंग विसर्गाचें निमित्त आहे असें येथें म्हणतां येत नाहीं.

कां बरें ?

वृद्धीला असिद्धत्व आहे म्हणून.

तें असिद्धत्व कसें ? तें असिद्धत्व जमत नाहीं. कारण कीं 'पूर्वत्रासिद्धम्' (८।२।१) या शास्त्रानें वृद्धीच्या दृष्टीनें अंतरंग परिभाषाच

---

२. नृकुट्यां भवः नार्कुटः । 'तत्र भवः' (४।३।५३) यानें अण्, आदि-वृद्धि. नृपतेरपत्यं नार्पत्यः । 'दित्यदित्यादित्यपत्युत्तरपदाण्ण्यः' (४।१।८५) यानें ण्यप्रत्यय, आदिवृद्धि.

३. तद्धित प्रत्ययाच्या निमित्तानें होणाऱ्या वृद्धीमुळें रेफ झाला आहे म्हणून तो बहिरङ्ग आहे. आणि केवळ पदान्तत्वामुळें प्राप्त होणारा विसर्ग हा अन्तरङ्ग आहे.

[ ८. २. १ ] इत्यसिद्धा परिभाषा ॥ असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे । कथम् । कार्यकालं संज्ञापरिभाषमिति खरवसानयोर्विसर्जनीय उपस्थितमिदं भवत्यसिद्धं बहिरङ्गमन्तरङ्ग इति । एवमेषा सिद्धा परिभाषा भवति ॥ कुतो नु खल्वेतद् द्वयोः परिभाषयोः सावकाशयोः समवस्थितयोः पूर्वत्रासिद्धमिति चासिद्धं बहिरङ्गमन्तरङ्ग इति च पूर्वत्रासिद्धमित्येतामुपमृद्यासिद्धं बहिरङ्गमन्तरङ्ग इत्येतया व्यवस्था भविष्यति न पुनरसिद्धं बहिरङ्गमन्तरङ्ग इत्येतामुपमृद्य पूर्वत्रासिद्धमित्येतया व्यवस्था स्यात् । अतः किम् । अतोऽयुक्तः परिहारो न वा बहिरङ्गलक्षणत्वादिति ॥

## रोः सुपि ॥ ८ । ३ । १६ ॥

किमर्थमिदमुच्यते न खरवसानयोर्विसर्जनीयः [ ८. ३. १५ ] इत्येव सिद्धम् । नियमार्थोऽयमारम्भः । रोरेव सुपि नान्यस्य

---

मुळीं असिद्ध होत आहे. त्यामुळें ती परिभाषा येथें प्रवृत्त होणार नाहीं.

परिभाषा असिद्ध कशी मानली जाते ? कारण ती त्रिपादीमधील नव्हे.

संज्ञा आणि परिभाषा यांच्याविषयीं कार्यकालपक्ष आहे. त्यामुळें 'खरवसानयो०' (८।३।१५) हें कार्य अंतरंग असल्यानें त्या कार्यानें आपल्याजवळ परिभाषेचें आकर्षण केलें जातें. म्हणजे अंतरंग परिभाषा या विसर्ग सांगणाऱ्या शास्त्रामध्ये उपस्थित होते. तेव्हां अर्थातच ही परिभाषा त्रिपादीमधील आहे असें समजलें जात असल्यामुळें पूर्वत्रासिद्धम् या शास्त्रानें वृद्धीच्या दृष्टीनें ही परिभाषा सिद्ध होत आहे.

आतां सपादीमधील शास्त्राच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध होते अशा अर्थाची पूर्वत्रासिद्धम् ही परिभाषा आणि अतरंग शास्त्र कर्तव्य असतांना बहिरंग शास्त्र असिद्ध होतें अशा अर्थाची अंतरंग परिभाषा या दोन परिभाषा निरनिराळया ठिकाणीं चरितार्थ होऊन नार्कुटः वगैरे ज्या ठिकाणीं एकदम उपस्थित होतील त्या ठिकाणीं पूर्वत्रासिद्धम् या परिभाषेला बाजूला सारून 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेनेंच व्यवस्था करावी आणि याच्या उलट म्हणजे 'असिद्धं बहिरङ्ग०' या परिभाषेला बाजूला सारून पूर्वत्रासिद्धम् या परिभाषेनें व्यवस्था करूं नये असा नियम तरी आम्हीं कोठून गृहीत धरावा ?

मग तसें झाले तर पुढें काय म्हणतां ?

इतकेंच आम्ही म्हणतों कीं नार्कुटः या उदाहरणामध्यें बहिरंग वृद्धि असिद्ध असल्यामुळें विसर्ग होत नाहीं हें समाधान योग्य नाहीं.

(सू. १६) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

हें सूत्र करावयास नको. कारण 'खरवसानयो०' यानें सिद्ध होत आहे.

हें सूत्र नियमार्थ केलें आहे, तो नियम असा कीं–सप्तमी बहुवचन सु प्रत्यय पुढें असतांना जर पूर्वसूत्रानें रेफाला विसर्ग करावयाचा असेल तर विसर्ग व रुत्व होऊन झालेल्याच रेफाला करावा म्हणजे मूळच्या रेफाला करूं नये.

असा नियम केल्यामुळें कोठें बरें विसर्ग होत नाहीं ?

---

४. अंतरंग परिभाषा ही 'वाह ऊठ्' ( ६।४।१३२ ) येथें ज्ञापित असल्यामुळें ती सपादींतली आहे. तेव्हां यथोद्देशपक्षीं तर त्रिपादीमध्यें ती जाणार नाहीच. फक्त कार्यकालपक्षीं त्रिपादीमध्यें ती जाण्याचा संभव आहे. पण तोही जमत नाहीं.

१. ( सू. १६ ) सप्तमी–बहुवचन पुढें असतांना रु आदेशाच्याच रेफाला विसर्ग होतो.

सुपि । क्व मा भूत् । गीर्षु धूर्षु ॥

## भोभगोअघोअपूर्वस्य योऽशि ॥ ८ । ३ । १७ ॥

**अश्ग्रहणमनर्थकमन्यत्राभावात् ॥१॥**

अश्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अन्यत्राभावात् । न ह्यन्यत्र रुरस्त्यन्यदतोऽशः ॥ ननु चायमस्ति । छन्दःसु पयःस्विति । किं पुनः कारणं सुकारपर एवोदाह्रियते न पुनरयं वृक्षस्तत्र प्लक्षस्तत्रेति । अस्त्यत्र विशेषः । विसर्जनीये कृते न भविष्यति । इहापि तर्हि विसर्जनीये कृते न भविष्यति । छन्दःसु पयःस्विति । स्थानिवद्भावात्प्राप्नोति । ननु चेहापि स्थानिवद्भावात्प्राप्नोति । वृक्षस्तत्र प्लक्षस्तत्रेति । अनल्विधौ स्थानिवद्भावः । अथायमल्विधिः स्याच्छक्यमश्ग्रहणमवक्तुम् । बाढं शक्यम् ।

---

गीर्षु धूर्षु या उदाहरणांमध्यें पूर्वसूत्रानें प्राप्त झालेला विसर्ग होत नाहीं.

( सू. १७ वा. १ ) या सूत्रामध्यें जें अश्ग्रहण केलें आहे त्याचा कांहीं उपयोग नाहीं.

कां बरें ?

इतर ठिकाणीं नाहीं म्हणून. म्हणजे पुढें अश् असल्याशिवाय इतर ठिकाणीं 'रु'च असत नाहीं.

पण छन्दःसु पयःसु या उदाहरणांमध्यें सु प्रत्ययाच्या मागें रु दृष्टीस पडत आहे ना ?

अश् वर्णाशिवाय इतर वर्ण पुढें असतांना मागें रु संभवतो या तऱ्हेचें उदाहरण छन्दःसु अथवा पयःसु-हें सु पुढें असतांना जें दाखविलें तेंच कां दाखविलें ? वृक्षस्तत्र, प्लक्षस्तत्र वगैरे उदाहरणांमध्यें तकार पुढें असतांना मागें रु संभवत आहे; तेव्हां तशा तऱ्हेचीं येथें उदाहरणें कां दाखविलीं नाहींत ?

वृक्षस्तत्र वगैरे उदाहरणें न दाखविण्याचा हेतु इतकाच कीं तेथें 'रु'ला विसर्ग केला असतांना रु नाहींसा होतो, हा विशेष आहे.

तर मग छन्दःसु पयःसु या उदाहरणांमध्यें देखील 'रु'ला विसर्ग केला असतांना रु नाहींसा होतच आहे.

पण छन्दःसु पयःसु या उदाहरणांमध्यें विसर्ग झाला तरी स्थानिवद्भावानें तो रु आहे असें समजून प्रकृत सूत्राची प्राप्ति येते.

तर मग वृक्षस्तत्र प्लक्षस्तत्र या उदाहरणांमध्यें देखील विसर्ग झाला असतांना स्थानिवद्भावानें रु आहे असें समजून प्रकृत सूत्राची प्राप्ति येत आहे. परंतु स्थानिवद्भाव हा अल्विधि कर्तव्य असतांना होत नसतो. तेव्हां वृक्षस्तत्र वगैरे उदाहरणांमध्ये खरवसानयो० या सूत्रानें विसर्ग झाला असल्यामुळें तेथें अल्विधि आहे असें म्हणतां येतें. कारण, त्या सूत्रानें रेफाला विसर्ग सांगितला आहे. छन्दःसु पयःसु या उदाहरणामध्यें ' रोः सुपि ' यानें विसर्ग होत आहे. तो 'रु'ला सांगितला असल्यामुळें तेथें अनल्विधौ हा निषेध येत नाहीं. तेव्हां छन्दःसु वगैरे उदाहरणांमध्यें विसर्ग झाल्यानंतरही स्थानिवद्भावानें तो रु आहे असें समजून प्रकृत सूत्रानें यत्व होऊं लागेल याकरितां अशि असें म्हटलें पाहिजे.

आतां छन्दःसु पयःसु या ठिकाणीं अल्विधि आहे असें जर तुम्हांला म्हणतां येईल तर मात्र प्रकृत सूत्रामध्यें अश् ग्रहण केलें नाहीं तरी चालेल.

---

१. ( सू. १७ ) भो, भगो, अघो आणि अकार यांच्या पुढील रु आदेशाच्या रेफाला यकार आदेश होतो, अश् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असतांना.

२. कारण, रोः ही रु शब्दाची षष्ठी आहे. पण, रः ही रेफाची षष्ठी असल्यामुळें 'रः' हा अलाचा निर्देश आहे; त्याला ' अलाचा निर्देश ' म्हणतां येईल. रोः याला तसें म्हणतां येणार नाहीं.

अल्विधिस्तर्हि भविष्यति । कथम् । इदमस्ति रो रि [ ८. ३. १४ ] इति । ततो वक्ष्यामि खरवसानयोर्विसर्जनीयो रः । ततो रोः सुपि विसर्जनीयो र इत्येव ॥ उत्तरार्थं तर्ह्यश्ग्रहणं कर्तव्यं हलि सर्वेषाम् [ ८ ३. २२ ] हल्यशीति यथा स्यात् । इह मा भूत् । वृक्षवयतेरप्रत्ययो वृक्षव्करोति ॥

[ व्योर्लघुप्रयत्नतरः शाकटायनस्य ॥ ८ । ३ । १८ ॥

लोपः शाकल्यस्य ॥८।३।१९॥ ]

ओतो गार्ग्यस्य ॥ ८ । ३ । २० ॥

किमर्थमिदमुच्यते न लोपः शाकल्यस्य [ ८. ३. १९ ] इत्येव सिद्धम् ।

ओकाराल्लोपवचनं नित्यार्थम् ॥ १ ॥

ओकाराल्लोपवचनं क्रियते नित्यार्थम् । नित्यार्थोऽयमारम्भः ॥

---

असेंच जर आहे तर ही गोष्ट चागलीच शक्य आहे. छन्दःसु पयःसु या ठिकाणीं रोः सुपि (८।३।१६) यानें विसर्ग केला तरी अल्विधि आहे असें म्हणतां येईल.

तें कसें ?

तें असें कीं– 'रो रि' हें मागें सूत्र आहे. त्यानंतर खरवसानयो० ( ८।३।१५ ) या सूत्रानें रेफाला म्हणजे अलालाच विसर्ग सांगितला आहे. त्यानंतर 'रोः सुपि' यानेंही 'रु'संबंधी रेफालाच म्हणजे अलालाच विसर्ग सांगितला आहे. अशा रीतीनें छन्दःसु पयःसु या उदाहरणांमध्यें देखील अल्विधि होत असल्यामुळें अनल्विधौ या निषेधानें स्थानिवद्भाव होणार नाहीं. तेव्हां अर्थातच प्रकृत सूत्राची प्राप्ति येत नसल्यामुळें अश्-ग्रहण टाकतां येईल.

तर मग हें अश्-ग्रहण पुढील सूत्रामध्यें अनुवृत्ति करण्याकरितां केलें पाहिजे. तें असें कीं– 'हलि सर्वेषाम्' या पुढील सूत्रानें हल् पुढें असतांना जो यकाराचा व वकाराचा लोप सांगितला आहे तो लोप 'अश्'वर्णांपैकींच हल् पुढें असतांना झाला पाहिजे. वृक्षवि या णिच्प्रत्ययान्त नामधातूहून क्विप् प्रत्यय केला असतां जें वृक्षव्[3] असें नाम तयार होतें त्याच्या पुढें करोति हा शब्द लावला असतांना तेथें वृक्षव् शब्दांतील शेवटच्या वकाराचा हलि सर्वेषाम् यानें लोप न झाला पाहिजे.

( सू. २० ) हे सूत्र कशाकरितां केलें आहे ? करावयास नको. कारण 'लोपः शाकल्यस्य' या पूर्व सूत्रानेंच उदाहरणें सिद्ध होत आहेत.

(वा. १) हा जो ओकाराहून पुढील यकाराचा लोप सांगितला आहे तो कशाकरितां म्हणाल तर नित्य लोप होण्याकरितां आहे. म्हणजे ओका-

---

३. वृक्ष वेतीति वृक्षवीः । क्विप् । वृक्षव्यमाचष्टे वृक्षव् । वृक्ष उपपदपूर्वक असलेल्या वी धातूहून 'क्विप् च' (३।२।७६) या सूत्रानें क्विप् प्रत्यय. वृक्षवी शब्दाहून 'तत्करोति तदाचष्टे' ( ३।१।२५) या वार्तिकानें णिच्-तदन्ताहून विच्. टिलोप व णिलोप केले असतां वृक्षव् असें रूप बनतें.

१. (सू. १८) भो भगो अघो आणि अकार यांच्या पुढें असून पदाच्या शेवटीं असलेल्या यकार आणि वकार यांना क्रमानें लघूच्चारण असे यकार आणि वकार आदेश विकल्पानें होतात अश् वर्ण पुढें असतांना. लघूच्चारण म्हणजे जे उच्चारतांना जिव्हेची अग्र उपाग्र मूल वगैरे साधनें शिथिल होतात अशा प्रकारचे.

१. ( सू. १९ ) अ वर्णाच्या पुढें असून पदाच्या शेवटीं असलेल्या यकार किंवा वकार यांचा लोप विकल्पानें होतो, अश् वर्ण पुढें असतांना.

१. ( सू. २० ) ओकाराच्या पुढें असून पदाच्या शेवटीं असलेल्या अलघूच्चारण अशा यकाराचा नित्य लोप होतो.

**उञि च पदे ॥ ८ । ३ । २१ ॥**

पद इति किमर्थम् । तन्त्रे उतम् तन्त्रयुतम् तन्त्र उतम् ॥ पद इति शक्यमवक्तुम् । कस्मान्न भवति तन्त्रे उतम् तन्त्रयुतम् तन्त्र उतमिति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥ उत्तरार्थं तर्हि पदग्रहणं कर्तव्यं ङमो ह्रस्वादचि ङमुण्नित्यम् [ ८ .३. ३२ ] इत्यपदे मा भूत् । दण्डिना शकटिना ॥

**[ हलि सर्वेषाम् ॥ ८ । ३ । २२ ॥**

**मो[1] ऽनुस्वारः ॥ ८ । ३ । २३ ॥**

**[1]नश्चापदान्तस्य झलि ॥ ८ । ३ । २४ ॥**

**मो[1] राजि समः क्वौ ॥८।३।२५॥]**

---

राच्या पुढील यकाराचा लोप नित्य व्हावा अशाकरितांच पाणिनीनें[2] हें मुद्दाम सूत्र आरंभिलें आहे.

(सू. २१) या सूत्रामध्यें पदे असें कशाकरितां म्हटलें आहे ? तन्त्रे उतम्[2] अशी स्थिति असतां तेथें अयादेश होऊन यकाराचा लोप विकल्पानें होतो आणि तन्त्रयुतम् तन्त्रउतम् अशीं दोन रूपें होतात. त्या ठिकाणीं प्रकृत सूत्रानें नित्य लोप होऊं नये म्हणून पदे असें म्हटलें आहे.

पदे असें न म्हटलें तरी चालेल.

पदे असें म्हटलें नाहीं तर तन्त्रे उतम् अशी स्थिति असतांना तेथें जीं तन्त्रयुतम् तन्त्रउतम् अशीं दोन रूपें होतात तेथें प्रकृत सूत्रानें यकाराचा नित्य लोप कां होत नाहीं ?

एकादें कार्य लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त या दोघांना जर संभवत असेल तर तें प्रतिपदोक्तालाच करावें लाक्षणिकाला करूं नये. या परिभाषेनें तन्त्रयुतम् या उदाहरणामध्यें उञि च पदे या सूत्रानें नित्य लोप होणार नाहीं. कारण उतम् यांतील जो उञ् तो लाक्षणिक आहे.

तर मग या सूत्रामध्यें पदे असें जें म्हटलें आहे तें पुढील सूत्रामध्यें अनुवृत्त होण्याकरितां म्हटलें पाहिजे. तें असें कीं—'ङमो ह्रस्वादचि०' (८।३।३२) ह्या सूत्रानें सांगितलेला ङमुट् आगम पद पुढें असतांनाच झाला पाहिजे. पद पुढें नसतांना दण्डिना शकटिना वगैरे उदाहरणांमध्यें ङमुट् आगम न झाला पाहिजे.

---

२. गार्ग्य ऋषि आपल्या स्मृतीमध्यें ओकाराच्या पुढील यकाराचा लोप नित्य होतो असें म्हणतो. आणि पाणिनी आचार्यही तशीच इच्छा करीत आहे. यावरून लोप नित्य होतो असें ठरतें.

१. ( सू. २१ ) अवर्णाच्या पुढें असून पदाच्या शेवटीं असलेल्या यकार किंवा वकार याचा लोप होतो, उञ् हें पद पुढें असतांना.

२. 'वेञ् तन्तुसंताने' ह्या धातूहून क्त प्रत्यय 'वचिस्वपि०' ( ६।१।१५ ) यानें संप्रसारण व पूर्वरूप केल्यामुळें उतम् असें रूप बनलें आहे. येथें संप्रसारण केलें असतां पूर्वी असलेला जो इत्संज्ञक अकार तो सध्यांही आहे असें गृहीत धरल्यानें 'स उ एकाग्निः' येथील प्रमाणें उतम् यांतील उकारही उञ् शब्द होय असें म्हणतां येणें शक्य आहे.

१. ( सू. २२ ) भो, भगो, अघो, आणि अकार यांच्या पुढें असून पदाच्या शेवटीं असलेल्या यकाराचा लोप होतो, हल् पुढें असतांना; मग तो यकार लघूच्चारण किंवा अलघूच्चारण कसाही असो. असें सर्व आचार्यांचें मत आहे.

१. ( सू. २३ ) पदाच्या शेवटीं असलेल्या मकाराला अनुस्वार होतो हल् पुढें असतांना.

१. (सू. २४) पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराला किंवा मकाराला अनुस्वार होतो झल् पुढें असतांना.

१. ( सू. २५ ) क्विप् प्रत्यय ज्याहून करण्यांत आला असेल असा राज् धातु पुढें असतांना सम् शब्दाच्या मकाराला मकारच होतो, म्हणजे अनुस्वार होत नाहीं.

[1]हे मपरे वा ॥ ८ । ३ । २६ ॥

यवलपरे यवला वा ॥ १ ॥

यवलपरे हकारे यवला वेति वक्तव्यम् । किँय्ह्यः किं ह्यः । किँव्ह्वलयति किं ह्वलयति । किँल्ह्लादयति किं ह्लादयति ॥

[[1]नपरे नः ॥ ८ । ३ । २७ ॥]

[1]ङ्णोः कुक्टुक्शरि ॥ ८ । ३ । २८ ॥

डः सि धुट् ॥ ८ । ३ । २९ ॥

नश्च ॥ ८ । ३ । ३० ॥

शि तुक् ॥ ८ । ३ । ३१ ॥

इह धुडादिषु केचित्पूर्वान्ताः केचित्परादयः । यदि पुनः सर्व एव पूर्वान्ताः स्युः सर्व एव परादयः । कश्चात्र विशेषः ।

धुगादिषु ष्टुत्वणत्वप्रतिषेधः ॥ १ ॥

धुगादिषु सत्सु ष्टुत्वणत्वयोः प्रतिषेधो वक्तव्यः॥ ष्टुत्वस्य तावत्। श्वलिट्त्साये । मधुलिट्त्साये ष्टुना ष्टुः [ ८.४.४१ ] इति ष्टुत्वं

(सू. २६ वा. १) ज्या हकाराच्या पुढें य व किंवा ल हे वर्ण आहेत त्या हकाराच्या मागें असलेल्या पदाच्या शेवटच्या मकाराला क्रमानें य व ल हे आदेश विकल्पानें होतात, असें सांगावें. उदा०—किँय्ह्यः किंह्यः. किँव्ह्वलयति किंह्वलयति. किँल्ह्लादयति किंह्लादयति.

(सू. २८, २९, ३०, ३१) नश्च०, शि तुक्०, ङ्णोः कुक्०, ङमो ह्रस्वा० या सूत्रांनीं जे हे धुट् वगैरे आगम सांगितले आहेत त्यांपैकीं कांहीं म्ह० धुट्, ङमुट् हे पूर्वाचे अन्तावयव सांगितले आहेत. आणि कांही आगम म्हणजे तुक् टुक् कुक् हे पराचे आद्यावयव सांगितले आहेत. जर सगळेच हे आगम पूर्वाचे अन्तावयव केले म्हणजे सगळेच कित् केले तर, किंवा सगळेच हे आगम पराचे आदि केले म्हणजे टित् केले तर, ह्यांत फरक काय होईल ?

(वा.१) जर हे सगळेच आगम पूर्वाचे अन्तावयय म्हणजे धुक् असे कित् केले तर ष्टुत्व आणि णत्व याचा निषेध सांगितला पाहिजे. त्यांपैकीं ष्टुत्वाचें उदा०—श्वलिट्त्साये मधुलिट्त्साये. या उदाहरणामध्यें 'ष्टुना ष्टुः' (८।४।४१) या सूत्रानें

१. (सू. २६) ज्याच्या पुढें मकार आहे असा हकार पुढें असतांना मागील मकाराला विकल्पेकरून मकारच होतो.

१. (सू. २७) ज्याच्या पुढें नकार आहे असा हकार पुढें आला असतांना त्याच्या मागील मकाराला नकार विकल्पेकरून होतो.

१. (सू. २८) पदाच्या शेवटच्या ङकाराला आणि णकाराला क्रमानें कुक् व टुक् असे आगम विकल्पानें होतात, शर् पुढें असतांना.

१. (सू. २९) पदाच्या शेवटींच्या डकाराच्या पुढील पदाच्या आरंभींच्या सकाराला धुट् असा आगम विकल्पेंकरून होतो.

१. (सू. ३०) पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराच्या पुढील सकाराला धुट् असा आगम होतो.

१. (सू. ३१) पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराला तुक् असा आगम विकल्पानें होतो, शकार पुढें असतांना.

२. श्वन् शब्द उपपद असतांना लिह् धातूहून 'क्विप् च' (३।२।७६) या सूत्रानें घञ् प्रत्यय. उपपदसमास. 'षोऽन्तकर्मणि' या धातूहून 'भावे' (३।३।१८) या सूत्रानें घञ् प्रत्यय केला असतां साय शब्द बनतो. श्वलिट्त्साये. धुक् असा कित् आगम केला तर सकार पुढें असतांना डकाराला धुक् असा आगम होतो असा 'डः सि०' (८।३।२९) याचा अर्थ झाल्यामुळें श्वलिड् साये असें असतां होणारा धुक् आगम 'आद्यन्तौ०' (१।१।४६) 'या परिभाषेनें डकारान्त पदाचा अन्तावयव झाल्यामुळें डकाराला पदान्तत्व नसल्यानें 'न पदान्ताट्टोः' (८।४।४२) हा ष्टुत्वाचा निषेध प्राप्त होणार नाहीं.

प्राप्नोति । परादौ पुनः सति न पदान्ताट्टोरनाम् [४२] इति प्रतिषेधः सिद्धो भवति ॥ णत्वस्य । कुर्वन्नास्ते । कृषन्नास्ते । रषाभ्यां नो णः समानपदे [ ८. ४. १ ] इति णत्वं प्राप्नोति । परादौ पुनः सति पदान्तस्य नेति प्रतिषेधः सिद्धो भवति ॥ सन्तु तर्हि परादयः ।

**परादौ छत्वषत्वविधिप्रतिषेधः ॥ २ ॥**

यदि परादयश्छत्वं विधेयं षत्वं च प्रतिषेध्यम् ॥ छत्वं विधेयम् । कुर्वञ्च्छेते । कृषञ्च्छेते । यद्धि तच्छश्छोऽटि [ ८. ४. ६३ ] इति झयः पदान्तादित्येवं तत् । किं पुनः कारणं झयः पदान्तादित्येवं तत् । इह मा भूत् । पुरा क्रूरस्य विसृपो विरप्शिन् [तै.सं.१.१.९.३] इति॥ षत्वं च प्रतिषेध्यम् । प्रत्यङ्क्सिञ्च । उदङ्क्सिञ्च । आदेशप्रत्यययोः [८.३.५९] इति षत्वं प्राप्नोति । पूर्वान्ते पुनः सति सात्पदाद्योः [ १११ ]

---

छुत्व होऊं लागेल. आणि धुट् असा पुढील वर्णाचा आद्यावयव केला म्हणजे 'न पदान्ताट्टो०' ( ८।४।४२ ) या सूत्रानें ष्टुत्वाचा निषेध सिद्ध होतो. णत्वाचें उदा०—कुर्वन्नास्ते, कृषन्नास्ते. या उदाहरणांमध्यें 'रषाभ्यां नो णः०' ( ८।४।१ ) या सूत्रानें दोन नकारांपैकीं पूर्वीच्या नकाराला णत्व होऊं लागेल आणि ङमुट् असा पुढील वर्णांचा आद्यावयव केला म्हणजे पूर्वीच्या नकाराला प्राप्त झालेल्या णकाराचा पदान्ताला णत्व होत नाहीं असा सांगितलेला निषेध सिद्ध होतो.

तर मग हे सगळेच आगम पराचे आद्यावयव असूं देत.

( वा. २ ) जर हे सर्व आगम पुढील वर्णांचे आद्यावयव केले तर छत्वाचा विधि केला पाहिजे आणि षत्वाचा निषेध केला पाहिजे. त्यांपैकीं छत्वाचें उदा०—कुर्वञ्च्छेते, कृषञ्च्छेते. या उदाहरणांमध्यें 'शश्छोऽटि' ( ८।४।६३ ) या सूत्रानें जें छत्व सांगितलें आहे तें छत्व शकाराला तुट् आगम केला असतां होणार नाहीं. कारण पदाच्या शेवटीं असलेला जो झय् त्याच्या पुढील शकाराला त्यानें छत्व सांगितलें आहे.

पदाच्या शेवटीं असलेल्या झयाच्या पुढील शकाराला त्यानें छत्व होतें असें सांगण्याचें कारण काय ?

"पुरा क्रूरस्य विसृपो विरप्शिन्" या वाक्यामध्यें विरप्शिन् येथें शकाराला छत्व होऊं नये म्हणून तसें म्हटलें आहे. विरप्शिन् येथें पकार हा झय् पदाच्या शेवटीं नाहीं.

तसेंच हे आगम पुढील वर्णांचे आद्यावयव केले असतां षत्वाचा निषेध सांगितला पाहिजे. उदा० प्रत्यङ्क्सिञ्च उदङ्क्सिञ्च. या उदाहरणांमध्यें 'आदेशप्रत्यययोः' (८।३।५९) या सूत्रानें सिञ्च यांतील सकाराला षत्व होऊं लागेल. आतां कुक् असा आगम पूर्वीच्या वर्णाचा म्हणजे नकाराचा अन्तावयव केला असतां 'सात्पदाद्योः' ( ८।३।१११ ) या सूत्रानें षत्वाचा निषेध सिद्ध होतो.

---

३. कुर्वन् शेते असें असतां तुक् आगम हा पुढच्याचा आद्यावयव म्हणजे तुट् असा आगम केला असतां शकाराचा आद्यावयव झाल्यानें कुर्वन्-तशेते येथें पूर्वपदाच्या शेवटीं झय् नसल्यामुळें 'शश्छोऽटि' (८।४।६३ ) यानें शकाराला छत्व होणार नाहीं.

४. वि उपसर्गपूर्वक 'रप व्यक्तायां वाचि' या धातूहून औणादिक शिन् प्रत्यय. किंवा विरपणं विरप्. संपदादित्वास्तव भावीं क्विप्. शब्द हा त्याचा अर्थ होय. सोऽस्यास्तीति विरपृशः. 'लोमादिपामादि०' ( ५।२।१०० ) यानें श प्रत्यय आणि 'अत इनि०' ( ५।२।११५ ) या सूत्रानें इन् प्रत्यय.

इति प्रतिषेधः सिद्धो भवति ॥ तस्मात्सन्तु यथान्यासमेव केचित्पूर्वान्ताः केचित्परादयः॥ अयं तु खलु शि तुक्छत्वार्थं नियोगतः पूर्वान्तः कर्तव्यस्तत्र कुर्वञ्च्छेते कृषञ्च्छेते इति रषाभ्यां नो णः समानपद इति णत्वं प्राप्नोति । नैष दोषः । श्चुत्वे योगविभागः करिष्यते । इदमस्ति क्षुभ्नादिषु न णकारो भवति । ततः स्तोः श्चुना । स्तोः श्चुना संनिपाते न णकारो भवति । ततः श्चुः । श्चुश्च भवति स्तोः श्चुना संनिपाते ॥

## ङमो ह्रस्वादचि ङमुण्नित्यम् ॥ ८ । ३ । ३२ ॥

ङमुटि पदादिग्रहणम् ॥ १ ॥

ङमुटि पदादिग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । दण्डिना शकटिनेति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । पदादिति वर्तते । एवमपि परमदण्डिना परमच्छत्त्रिणेति प्राप्नोति । नैष दोषः । उक्तमेतदुत्तरपदत्वे

---

एकंदरींत हे आगम पाणिनीनें जसे सांगितले आहेत—म्हणजे धुट् ङमुट् हे पूर्वाचे अन्तावयव सांगितले आहेत आणि कुक् टुक् तुक् हे पुढील वर्णाचे आद्यावयव सांगितले आहेत—तसेच असूं देत.

आतां यासंबंधानें असा एक विचार करावा लागतो कीं 'शि तुक्' (८।३।३१) या सूत्रानें सांगितलेला तुक् आगम कुर्वञ्छेते या उदाहरणामध्यें शकाराला छत्व होण्याकरितां पूर्व वर्णाचा अन्तावयव अवश्य केला पाहिजे हें खरें, परंतु तसें केलें असतां कुर्वञ्च्छेते कृषञ्छेते या उदाहरणांमध्यें 'रषाभ्यां नो णः०'(८।४।१) या सूत्रानें नकाराला णत्व होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण श्चुत्व सांगणाऱ्या सूत्रामध्यें सूत्राचा विभाग आम्ही निराळ्या तऱ्हेचा करितों, तो असा कीं श्चुत्व सांगणारें जें 'स्तोः श्चुना श्चुः' (८।४।४०) हें सूत्र त्याच्या पूर्वी 'क्षुभ्नादिषु च' (८।४।३९) असें सूत्र आहे. त्या सूत्रानें णत्वाचा निषेध सांगितला आहे. त्यानंतर 'स्तोः श्चुना' एवढेंच निराळें सूत्र समजावें. त्याचा अर्थ असा कीं—सकार किंवा तवर्ग यांना शकार किंवा चवर्ग यांचा योग असतांना णत्व होत नाहीं. त्यानंतर दुसरें श्चुः असे सूत्र समजावें. त्याचा अर्थ सकार किंवा तवर्ग यांना शकार किंवा चवर्ग यांचा योग असतांना क्रमानें शकार आणि चवर्ग आदेश होतात.

(सू. ३२ वा. १) हा जो या सूत्रानें अचाला ङमुट् असा आगम सांगितला आहे तो पदाच्या आरंभीं असलेल्याच अचाला होतो असें म्हणावें. कारण दण्डिना शकटिना या उदाहरणांमध्यें आकाराला हा आगम होऊं नये.

तर मग तसें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण पदात् असा अधिकार येथें अनुवृत्त होत आहे. दण्डिना वगैरे उदाहरणांमध्यें दण्डिन् हें पद नसल्यामुळें पुढील आकाराला ङमुट् आगम होणार नाहीं.

असें म्हटलें तरी परमदण्डिना परमच्छत्रिणा या सामासिक उदाहरणांमध्यें समासांतील उत्तरपद जें दण्डिन् वगैरे त्याला प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) पदसंज्ञा असल्यामुळें पुढील आकाराला ङमुट् आगम होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण मागें (१।१।६३ वा० ६) असें सांगितलें आहे कीं समासांतील उत्तरपदाला 'सात्पदाद्योः' (८।३।१११) या सूत्रानें सांगितलेला जो पदाच्या आदीला षत्वाचा निषेध त्याशिवाय इतर

---

१. (सू. ३२) ह्रस्व वर्णाच्या पुढील जो ङम् तो शेवटीं असलेल्या पदाच्या पुढील अचाला नित्य ङमुट् आगम होतो.

चापदादिविधौ लुकता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवतीति ॥ एवमपि पदादिति वक्तव्यम् । यद्धि तत्प्रकृतं प्राक्सुपि कुत्सनादित्येवं तत् ॥ एवं तर्हि ङम एवायं ङमुट् क्रियते । कथम् । पदस्येति वर्तते ङम इति च नैषा पञ्चमी । का तर्हि । संबन्धषष्ठी । पदान्तस्य ङमो ङमुड्भवति ह्रस्वादुत्तरस्याचीति । यदि ङम एव ङमुट्क्रियते कुर्वन्नास्ते कृषन्नास्ते रषाभ्यां नो णः समानपदे [ ८. ४. १ ] इति णत्वं प्राप्नोति । पदान्तस्य नेति प्रतिषेधो भविष्यति । पदान्तस्येत्युच्यते नैष पदान्तः । पदान्तभक्तः पदान्तग्रहणेन ग्रहिष्यते ॥ एवमपि न सिध्यति । किं कारणम् । उक्तमेतन्न वा पदाधिकारस्य विशेषणत्वादिति ॥ एवं तर्हि पद इति वर्तते । क्व प्रकृतम् । उञि च पदे [ ८. ३. २१ ] इति ॥

---

कोणताही पदसंज्ञेमुळें होणारा विधि कर्तव्य असतांना लुक् शब्दाने प्रत्ययाचा लोप झाला असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं.

तरी पण पदात् असें येथें म्हटलें पाहिजे. कारण मागाहून जो पदात् ( ८।१।१७ ) असा अधिकार चालू होता तो 'कुत्सने च सुपि' ( ८।१।६९ ) या सूत्राच्या पूर्वींपर्यंतच चालू होता. म्हणजे अर्थात् तो 'कुत्सने च सुपि' येथेंच बंद झालेला आहे.

तर मग या प्रकृत सूत्रानें सांगितलेला ङमुट् आगम तो पुढील अचाला न करतांना मागील ङमालाच केला जाईल.

तसा कसा करतां येईल ?

अशा रीतीनें करतां येईल कीं मागाहून पदस्य ( ८।१।१६ ) हा अधिकार येथें चालू आहे. आणि त्या पदस्य याच्याशीं संबंध होण्याकरितां सूत्रांतील ङमः ही पंचमी विभक्ति आम्ही घेत नाहीं.

तर मग ती कोणती विभक्ति तुम्ही समजत आहां ?

ङमः ही संबंधाला दाखवणारी षष्ठी विभक्ति आहे असें आम्ही समजतों. त्यामुळें सूत्राचा वाक्यार्थ असा होतो कीं–ह्रस्वाच्या पुढें असलेला आणि पदाच्या शेवटीं असलेला असा जो ङम् त्याला अच् पुढें असतांना ङमुट् असा आगम होतो.

अशा रीतीनें जर हा ङमुट् आगम ङमालाच केला तर कुर्वन्नास्ते कृषन्नास्ते या उदाहरणांमध्यें 'रषाभ्यां नो णः०' (८।४।१) या सूत्रानें पूर्वीच्या नकाराला णत्व होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'पदान्तस्य' ( ८।४।३७ ) या सूत्रानें णत्वाचा निषेध होईल.

पण तो णत्वाचा निषेध पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराला सांगितलेला आहे. आणि कुर्वन्नास्ते येथें तर पूर्वीचा नकार हा पदाच्या शेवटीं नाहीं. पदाच्या शेवटीं असलेला जो पुढचा नकार त्याच्या पूर्वीचा नकार हा त्याचा अवयव झाल्यामुळें तो पदाच्या शेवटीं आहे असें समजलें जाईल.

इतकें झालें तरी सिद्ध होत नाहीं.

कां बरें ?

पदस्य हा चालू असलेला अधिकार सर्व ठिकाणीं पदाचा अवयव अशा अर्थानें दुसऱ्याला विशेषण होतो असें मागेंच सांगितलें आहे. तेव्हां दण्डिना शकटिना येथें नकार हा पदाच्या शेवटीं जरी नाहीं तरी तो नकार दण्डिना वगैरे पदाचा अवयव असल्यामुळें त्याला ङमुट् आगम होऊं लागेलच.

तर मग आतां हा दोष जाण्याकरितां पदे अशी आम्ही अनुवृत्ति करतों.

पदे हें सप्तम्यन्त पद मागें कोठून चालू झालेलें आहे ?

'उञि च पदे' ( ८।३।२१ ) येथें पदे असें म्हटलें आहे तेथून त्याची अनुवृत्ति करतां येईल.

## मय उञो वो वा ॥ ८ । ३ । ३३ ॥

किमर्थं मय उत्तरस्योञो वो वेत्युच्यते नेको यणचि [ ६. १. ७७ ] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । प्रगृह्यः प्रकृत्येति प्रकृतिभावः प्राप्नोति ॥ यदि पुनस्तत्रैवोच्येतेको यणचि मय उञो वेति । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । किम्वावपनं महत् । मोऽनुस्वारः [ ८. ३. २३ ] हलीत्यनुस्वारः प्रसज्येत । वत्वे पुनः सत्यसिद्धत्वान्न भविष्यति ॥

## विसर्जनीयस्य सः ॥ ८।३।३४ ॥

इह कस्मान्न भवति । वृक्षः प्लक्ष इति । संहितायामिति वर्तते । एवमप्यत्र प्राप्नोति । किं कारणम् । परः संनिकर्षः संहिता [ १. ४. १०९ ] इत्युच्यते स यथैव परेण परः संनिकर्ष एवं पूर्वेणापि । एवं तर्ह्यनवकाशावसानसंज्ञा संहितासंज्ञां बाधिष्यते ।

---

(सू. ३३) हा या सूत्रानें मयाच्या पुढील उञ् या अव्ययाला जो विकल्पानें वकार आदेश सांगितला आहे तो कशाकरितां सांगितला आहे ? तो सांगावयास नको. कारण 'इको यणचि' ( ६।१।७७ ) या सूत्रानेंच उकाराला वकार आदेश होऊन काम भागेल.

तशा रीतीने काम भागणार नाहीं. कारण उञ् या निपाताला प्रगृह्य संज्ञा आहे. त्यामुळें त्याला प्रकृतिभाव होईल आणि यण् होणार नाहीं. याकरितां मुद्दाम हें सूत्र केलें आहे.

आतां जर हें मुद्दाम केलें जाणारें सूत्र 'इको यणचि' ( ६।१।७७ ) या सूत्राच्या पुढें 'मय उञो वा' एवढेंच केलें तर काय होईल ?

असें करणें शक्य नाहीं. कारण किम्वावपनं महत् या उदाहरणामध्यें दोष येईल. तो असा कीं, 'मोऽनुस्वारः' ( ८।३।२३ ) या सूत्रानें हल् पुढें असतांना मकाराला सांगितलेला अनुस्वार किम् शब्दाच्या मकाराला होऊं लागेल. आणि त्रिपादीमध्यें हें प्रकृत सूत्र करून त्यानें उकाराला वकार आदेश केला म्हणजे हा वकार असिद्ध असल्यामुळें मागील मकाराला अनुस्वार होणार नाहीं.

( सू. ३४ ) वृक्षः प्लक्षः या उदाहरणांमध्यें प्रकृत सूत्रानें विसर्गाला सकार आदेश कां होत नाहीं ?

'संहितायाम्' असा अधिकार चालू आहे म्हणून. आणि वृक्षः याच्या पुढें कांहींच नसल्यामुळें त्या विसर्गाला सकार होणार नाहीं.

'संहितायाम्' याचा संबंध केला तरी देखील वृक्षः वगैरे उदाहरणांमध्यें दोष येतोच.

कां बरें ?

'परः संनिकर्षः संहिता' (१।४।१०९) या सूत्रानें वर्णांचें सामीप्य असतांना संहिता संज्ञा सांगितली आहे. तें वर्णांचें सामीप्य जसें विसर्गाला पुढील वर्णाशीं संभवतें तसें मागील वर्णाशींही संभवत आहे.

मग तर आम्ही असें म्हणतों कीं पुढें कोणताही वर्ण नसेल तर त्या ठिकाणीं 'विरामोऽवसानम्' यानें सांगितलेली जी अवसान संज्ञा ती निरवकाश होत असल्यामुळें तशा ठिकाणीं ती संहिता संज्ञेचा बाध[2] करील.

दुसऱ्या तऱ्हेनेंही येथें असें उत्तर देतां येतें

---

१ (सू.३३) मयाच्या पुढील उञ् या निपाताला वकार आदेश होतो विकल्पेकरून अच् पुढें असतांना.

१. ( सू. ३४ ) खर् वर्ण पुढें असतांना त्याच्या मागील विसर्गाला सकार आदेश होतो.

२. संहिता आणि अवसान या दोन्ही संज्ञा 'आकडारादेका०' ( १।४।१ ) या अधिकारामधील असल्यामुळें त्यांचा बाध्यबाधकभाव होतो.

अथवा संहितासंज्ञायां प्रकर्षगतिर्विज्ञास्यते। गाधीयो यः परः संनिकर्ष इति। कश्च गाधीयः। यः पूर्वपरयोः॥ यद्येवानवकाशावसानसंज्ञा संहितासंज्ञां बाधतेऽथापि संहितासंज्ञायां प्रकर्षगतिर्विज्ञायत उभयथा दोषो भवति। इष्यन्त इत उत्तरमवसाने संहिताकार्याणि तानि न सिध्यन्ति। अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः [ ८. ४. ५७ ] इति॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न सर्वस्य विसर्जनीयस्य सत्वं भवतीति यदयं खरवसानयोर्विसर्जनीयः [ ८. ३. १५ ] इत्याह। इतरथा खरवसानयोः सो भवतीत्येव ब्रूयात्। तच्च लघु भवति विसर्जनीयस्य स इत्येतच्च न वक्तव्यं भवति॥

कीं, 'परः सनिकर्षः संहिता' या सूत्रानें जी संहिता संज्ञा सांगितली आहे ती वर्णांचें विशेष प्रकारचें सामीप्य असतानाच होते. म्हणजे जें उत्तम प्रकारचें सामीप्य तेथेंच ती होते. तें कोणतें म्हणाल तर जें पुढच्या वर्णाबरोबर असतें तें. तेव्हां अर्थातच पुढें कांहीं वर्ण नसेल तर तेथें संहिता संज्ञा प्राप्तच होत नाहीं.

अशा रीतीनें अनवकाश असलेल्या अवसान संज्ञेनें संहिता संज्ञेचा बाध केला किंवा विशेष प्रकारचें सामीप्य असेल तरच संहिता संज्ञा प्राप्त होते असें म्हटलें तरी देखील म्हणजे या दोन्ही तऱ्हा घेतल्या तरी दोष येतोच. कारण अवसान असतांना म्हणजे पुढें कोणताही वर्ण नसताना जी संहिताधिकारामध्यें सांगितलेलीं कार्यें इष्ट आहेत तीं सिद्ध होणार नाहींत. दधि या ठिकाणीं पुढें कांहीं वर्ण नसतांना 'अणोऽप्रगृह्यस्य' ( ८।४।५७ ) या सूत्रानें संहिता असतांना शेवटच्या वर्णाला सांगितलेला अनुनासिक होणार नाहीं.

तर मग वृक्षः प्लक्षः या उदाहरणांमध्यें सत्व न होण्याचें कारण आम्ही निराळेंच सांगतों. तें असें कीं ज्या अर्थी हा आचार्य पाणिनी 'खरवसानयो०' असा रेफाला विसर्ग आदेश सांगतो त्या अर्थी तो असें सुचवितो कीं विसर्गाला सर्व ठिकाणीं सकार आदेश होत नाहीं. नाहीं तर—म्हणजे सर्व ठिकाणीं सकार आदेश होईल तर—खर् पुढें असतांना किंवा अवसान असतांना रेफाला विसर्ग आदेश न सांगतां एकदम सकारच आदेश होतो असेंच पाणिनीनें सांगितलें असतें. आणि तें तर म्हणजे रेफाला विसर्ग करून त्याला सकार करण्यापेक्षां एकदमच रेफाला सकार करणें हें लघु होतें. आणखी तसें केलें असता 'विसर्जनीयस्य०' हें प्रकृत सूत्र मुळींच नकोसें होतें.

३. 'संनिकर्षः संहिता' ( १।४।१०९ ) वर्णांचें सामीप्य असतां संहिता संज्ञा होते, एवढ्या सूत्रानेंच काम भागत असतां परः असा शब्द घातला आहे तो तें वर्णांचें सामीप्य विशेष प्रकारचें विवक्षित आहे असें कळविण्याकरितां घातला आहे. तो विशेष म्हणजे कार्याला म्ह. कार्य ज्याला करावयाचें त्याला आपल्या पुढील वर्णांचें सामीप्य असणें हा होय. तेव्हां ज्या वर्णाला संहिताधिकारांतील कार्य करावयाचें असेल त्या वर्णाला पुढील वर्णांचें सामीप्य असतां त्या सामीप्याला संहिता संज्ञा होते.

४. 'अणोऽप्रगृह्यस्य०' (८।४।५७) येथें 'वाऽवसाने' याची अनुवृत्ति आहे. 'तोर्लि' (८।४।६०) यानें सांगितलेला परसवर्ण अग्निचित् लुनाति या उदाहरणामध्यें संहितेची विवक्षा नसतां न व्हावा म्हणून तेथें संहिताधिकाराची अनुवृत्ति केली पाहिजे. तेव्हां अर्थातच त्याच्या पूर्वी म्ह० 'अणोऽप्रगृह्यस्य' येथें संहिताधिकार आहेच. तेव्हां संहिता व अवसान या उभयतांवर अवलंबून असलेला अनुनासिक दधिँ येथें होणार नाहीं.

अवश्यं शर्परे विसर्जनीयः [ ८. ३. ३५ ] इत्यत्र प्रकृतिनिर्देशार्थं विसर्जनीयग्रहणं कर्तव्यम् । अथेदानीमेतदपि रसांनिध्यार्थं पुरस्तादपकक्ष्यते खरवसानयोः स इत्यत्रै-वैवमपि कुप्वोः ≍क ≍ पौ च [ ८. ३. ३७ ] इत्येवमादिनानुक्रमणेन व्यवच्छिन्नं भोभगो-अघोअपूर्वस्य योऽशि [ ८. ३. १७ ] इत्यत्र रुग्रहणं कर्तव्यं स्यात् ॥ एवमप्येकं विसर्ज-नीयग्रहणं व्याजो भवति । सोऽयमेवं लघीयसा न्यासेन सिद्धे सति यद्गरीयांसं यत्नमारभते तज्ज्ञापयत्याचार्यो न सर्वस्य विसर्जनीयस्य सत्वं भवतीति ॥ एवमप्यनै-कान्तिकं ज्ञापकम् । एतावज्ज्ञाप्यते न सर्वस्य विसर्जनीयस्य सत्वं भवतीति तत्र कुत एतदिह भविष्यति वृक्षस्तत्र प्लक्षस्तत्रेतीह न भविष्यति वृक्षः प्लक्ष इति ॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नास्य विसर्जनीयस्य सत्वं भवतीति यदयं शर्परे

---

आतां ' विसर्जनीयस्य सः ' हें सूत्र केलें नाहीं तर त्याच्या पुढील ' शर्परे विसर्जनीयः ' ( ८।३।३५ ) इत्यादि सूत्रांनीं सांगितलेले आदेश कोणाला करावे तें समजण्याकरितां तेथें विसर्ज-नीय ग्रहण करावें लागेल.

तर मग ' शर्परे विसर्जनीयः ' वगैरे सूत्रें देखील याच्याजवळ म्हणजे खर् पुढें असतांना किंवा अवसान असतांना रेफाला सकार होतो हें सांगून त्यानंतर ' रोः सुपि ' या सूत्राच्या पुढें करावीं, म्हणजे विसर्जनीयस्य सः याच्या पुढें केलेलीं सूत्रें तेथून काढून मागें आणावीं म्हणजे त्या सूत्रांनीं सांगितलेले आदेश कोणाला करावे ही अडचण दूर होईल; कारण— तेथें ' रः ' या पदाचा संबंध करून रेफालाच ते आदेश होतात असें समजतां येईल.

असें केलें तरी पण ' भोभगोअघोअपूर्वस्य० ' (८।३।१७) या सूत्रामध्यें रोः असें पद घालावेंच लागेल. कारण ' रोः सुपि ' या सूत्रांतून रोः या पदाचा संबंध ' भोभगो ' या सूत्रामध्यें आतां करतां येणार नाहीं. 'रोः सुपि' या सूत्राच्या पुढें 'कुप्वोः≍ क≍ पौ च' ( ८।३।३७ ) इत्यादि बरींच सूत्रें मध्यें घातलीं जात असल्यामुळें 'रोः' या पदाच्या संबंधाला मोठाच खंड पडत आहे.

'भोभगो०'( ८।३।१७ ) या सूत्रामध्यें रोः हें पद जरी आतां निराळें घालावें लागलें तरी देखील एक पद कमीच होतें. म्हणजे हल्लीं नवीन केलेल्या सूत्रक्रमापेक्षां पाणिनीनें केलेल्या सूत्रक्रमामध्यें एक विसर्जनीय पद अधिक होत आहे. तेव्हां एकंदरीत अशा तऱ्हेच्या लहानशा सूत्रक्रमानें सर्व काम भागत असतांना जो हा पाणिनीनें मोठा यत्न आरंभिला आहे त्या वरूनच तो असें सुचवितो कीं विसर्गाला सर्व ठिकाणीं सत्व होत नाहीं.

असें झालें तरी देखील हें ज्ञापक फिरून संशयितच होत आहे. कारण विसर्गाला सर्व ठिकाणीं सत्व होत नाहीं एवढेंच फक्त ज्ञापन केलें जात आहे. त्या ज्ञापकावरून वृक्षस्तत्र प्लक्षस्तत्र वगैरे उदाहरणांमध्येंच विसर्गाला सत्व होतें आणि वृक्षः प्लक्षः वगैरे उदाहरणांमध्यें होत नाहीं असेंच निश्चित कशावरून समजावें ? उलट कां समजूं नये ?

तर मग आम्ही असें म्हणतों कीं ज्या खराच्या पुढें शर् आहे त्या खराच्या मागील विसर्गाला विसर्ग होतो ( ८।३।३५ ) असें

---

५. ' खरवसानयोः० ' ( ८।३।३५ ) येथें 'सः' हा शब्द आणि ' भोभगो० ' ( ८।३।१७ ) येथें 'रोः' हा शब्द असे दोन शब्द नवीन घातल्यानें ' खरवसा-नयोः० ' या सूत्रांतील विसर्जनीयः हा शब्द आणि ' विसर्जनीयस्य सः ' ( ८।३।३४ ) हें सूत्र मिळून तीन शब्द कमी करावयास सांपडतात.

विसर्जनीय इत्याह । अथवा हलीति वर्तते । क प्रकृतम् । हलि सर्वेषाम् [ ८. ३. २२ ] इति । यदि तदनुवर्तते मय उञो वो वा [ ८ ३. ३३ ] हलि चेति हल्यपि वत्वं प्राप्नोति । शमु नः । शमु योरस्तु । एवं तर्हि विसर्जनीयस्य स इत्यत्र खरीत्यनुवर्तिष्यते । अथवा संबन्धमनुवर्तिष्यते ॥

[ शर्परे विसर्जनीयः ॥ ८ । ३ । ३५ ॥ ]

वा शरि ॥ ८ । ३ । ३६ ॥

वाशर्प्रकरणे खर्परे लोपः ॥१॥

वाशर्प्रकरणे खर्परे लोपो वक्तव्यः । वृक्षा स्थातारः । वृक्षाः स्थातारः ॥

---

आचार्य पाणिनी ज्या अर्थी सांगतो त्या अर्थी आम्ही असें समजतों कीं— वृक्षस्तत्र प्लक्षस्तत्र अशा तऱ्हेच्याच उदाहरणांमध्ये विसर्गाला सत्व होतें आणि वृक्षः प्लक्षः अशा तऱ्हेच्या उदाहरणांमध्यें विसर्गाला सत्व होतें नाहीं.

किंवा ' विसर्जनीयस्य सः ' या सूत्रामध्यें हलि या पदाचा संबंध होत आहे. त्यामुळें वृक्षः प्लक्षः वगैरे उदाहरणांमध्यें सत्व होणार नाहीं.

हलि हें पद मागें कोणत्या सूत्रामध्यें उच्चारिलें आहे ?

'हलि सर्वेषाम्' ( ८।३।२२ ) या सूत्रामध्यें हलि असें पद घातलें आहे. त्यातून हलि या पदाचा संबंध 'विसर्जनीयस्य सः' येथे करता येईल.

अशा तऱ्हेनें जर या सूत्रामध्यें हलि या पदाचा संबंध केला तर त्याच्या मागील ' मय उञो वो वा' ( ८।३।३३ ) या सूत्रामध्यें देखील हलि या पदाचा संबंध होईल. आणि हल् पुढें असतांना देखील उ या निपाताला वकार आदेश करावा लागेल. उदा०— शमु नः, शमु योरस्तु.

तर मग 'विसर्जनीयस्य सः' या सूत्रामध्यें खरि या पदाचा संबंध करतां येईल. त्या पदाचा संबंध मंडूकप्लुतीसारखा म्हणजे मध्यें कोठें संबंध न करतां एकदम येथें संबंध करतां येईल. अथवा संबंधानुवृत्ति करतां येईल.

( सू. ३६वा. १ ) शर् पुढें असतांना जेथें प्रकृत सूत्रानें विसर्गाला विसर्गच आदेश सांगितला आहे त्या याच प्रकरणामध्यें शराच्या पुढें खर् असेल तर त्या शराच्या मागील विसर्गाचा विकल्पानें लोप होतो असें म्हणावें. उदा०— वृक्षा स्थातारः; वृक्षाः स्थातारः.

---

६. खर् वर्णाच्या निमित्तानें झालेल्या विसर्गाला सत्व होणेंच वगैरे व्यवस्था गृहीत धरली असतां कः त्सरुः इत्यादि स्थलीं खर् वर्णाच्या निमित्तानें झालेल्या विसर्गाला सत्व प्राप्त झालें असतां त्याचें निवारणासाठीं विसर्जनीयाचें विधान केलें आहे तें बरोबर होईल. पण उलट व्यवस्था गृहीत धरली तर वरील उदाहरणांत सत्व करावयाचें नसल्यानें तेथें विसर्गच कायम आहे. तेव्हां तेथें विसर्जनीयाचें विधान करण्याचा कांहीं उपयोग होत नाहीं; आणि तें तर केलें आहे. यावरून ज्या रीतीनें विसर्जनीयाचें विधान उपयोगीं होईल अशा रीतीनें म्हणजे खर् वर्णाच्या निमित्तानें झालेल्या विसर्गाला सत्व होतें आणि तद्भिन्न विसर्गाला होत नाहीं अशीच व्यवस्था सुचविली जात असल्यामुळें वृक्षः वगैरे स्थलीं अवसानाच्या निमित्तानें झालेल्या विसर्गाला सत्व होत नाहीं.

७. मधल्या सूत्रामध्यें खरि या पदाचा फक्त संबंध मात्र करावयाचा; वाक्यार्थामध्यें त्याचा प्रवेश नाहीं.

१. ( सू. ३५. ) ज्याच्या पुढें शर् वर्ण आहे अशा खर् वर्ण पुढें असतांना विसर्गाला विसर्गच होतो, सत्व किंवा जिव्हामूलीय वगैरे होत नाहींत.

१. ( सू. ३६ ) शर् वर्ण पुढें असतांना विसर्गाला विसर्गच विकल्पानें होतो.

**कुप्वोः ≍क ≍पौ च ॥८।३।३७॥**

**सस्य कुप्वोर्विसर्जनीयजिह्वामूलीयोपध्मानीयाः ॥१॥**

सस्य कुप्वोर्विसर्जनीयजिह्वामूलीयोपध्मानीया वक्तव्याः ॥

**विसर्जनीयादेशे हि शर्परयोरेवादेशप्रसङ्गः ॥ २ ॥**

विसर्जनीयादेशे हि सति शर्परयोरेव कुप्वोः ≍क ≍पौ स्याताम्। अद्भिः ≍प्सातम्। वासः क्षौमम् ॥ वचनान्न भविष्यतः। अस्ति वचने प्रयोजनम्। किम्। पुरुषः त्सरुकः ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। यदेतद्विसर्जनीयस्य सः [ ८. ३. ३४ ] इत्यत्र विसर्जनीयग्रहणमेतदुत्तरत्रानुवर्तिष्यते तस्मिंश्च शर्परे विसर्जनीयोऽसिद्धः ॥ नासिद्धः। कथम्। अधिकारो नाम त्रिप्रकारः। कश्चिदेकदेशस्थः सर्वं शास्त्रमभिज्व-

---

( सू. ३७ वा. १ ) कवर्ग अथवा पवर्ग यांतील व्यंजन पुढें असतांना जे हे विसर्गाचे स्थानीं विसर्ग जिह्वामूलीय आणि उपध्मानीय आदेश या सूत्रानें सांगितले आहेत ते विसर्गाचे स्थानीं न सांगतां सकाराचे स्थानीं होतात असें म्हणावें.

( वा. २ ) जर हे आदेश विसर्गाचे स्थानीं होतील तर ज्या कवर्ग व पवर्गाच्या पुढें शर् आहे अशा कवर्ग व पवर्गाच्या मागील जो विसर्ग त्यालाच[2] हे जिह्वामूलीय व उपध्मानीय होतील. उदा०— अद्भिः ≍प्सातम्; वासः क्षौमम्.

हा दोष येत नाहीं. कारण अशा ठिकाणीं 'शर्परे विसर्जनीयः' (८।३।३५) या सूत्रानें मुद्दाम विसर्गाला विसर्ग सांगितला आहे तो व्यर्थ होईल. तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तव त्या सूत्रानें केलेल्या विसर्गाला जिह्वामूलीय आदेश होणार नाहीं.

त्या सूत्राचा उपयोग इतर उदाहरणांमध्यें सांगतां येतो.

तीं उदाहरणें कोणतीं ?

जेथें कवर्ग आणि पवर्ग नाहींत अशीं. उदा०— पुरुषः; त्सरुः.

तर मग एकंदरींत सकारालाच हे आदेश सांगितले पाहिजेत.

तसें सांगावयास नकोत. कारण 'विसर्जनीयस्य सः' (८।३।३४) या सूत्रामध्यें जो विसर्जनीय शब्द आहे तोच पुढें 'कुप्वोः≍क≍पौ च' या प्रकृत सूत्रामध्यें अनुवृत्त होत आहे. आणि तो विसर्जनीयः हा शब्द 'खरवसानयोर्विसर्जनीयः' (८।३।१५) या सूत्रानें केलेल्या विसर्गाचाच बोध करून देणारा आहे. कारण 'शर्परे विसर्जनीयः' (८।३।३५) या पुढील सूत्रानें केलेला विसर्ग 'विसर्जनीयस्य सः' (८।३।३४) या सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध आहे.

तो असिद्ध आहे असें म्हणतां येत नाहीं.

तें कसें ?

तें असें कीं— या शास्त्रामध्यें अधिकार हा तीन प्रकारचा आहे. त्यांपैकीं पहिल्या प्रकारचा म्हणजे परिभाषारूपी अधिकार अष्टाध्यायीमध्ये पाणिनीने ज्या ठिकाणीं उच्चारला असेल त्या एकादेशामध्येंच स्थित असून सर्व शास्त्र प्रकाशित करतो. ज्याप्रमाणें चांगला

---

१. ( सू. ३७ ) कवर्ग किंवा पवर्ग पुढें असतांना त्यांच्या मागील विसर्गाला अनुक्रमानें जिव्हामूलीय व उपध्मानीय नांवाचे अर्ध-विसर्ग होतात आणि विसर्गही होतो.

२. इतर ठिकाणी 'कुप्वोः≍क≍पौ च' याच्या असिद्धत्वास्तव 'विसर्जनीयस्य०' या सूत्रानें सत्व होईल.

लयति यथा प्रदीपः सुप्रज्वलितः सर्वं वेश्माभिज्वलयति । अपरो यथा रज्ज्वायसा वा बद्धं काष्ठमनुकृष्यते तद्वत् । अपरोऽधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति योगे योग उपतिष्ठते । तद्यदैष पक्षोऽधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति तदा हि यदेतद्विसर्जनीयस्य स इत्यत्र विसर्जनीयग्रहणमेतदुत्तरत्रानुवृत्तं सदन्यत्संपद्यते तस्मिंश्च शर्परे विसर्जनीयः सिद्धः । एवं च कृत्वा शर्परयोरेव कुप्वोः ≍क ≍पौ स्याताम् । अद्भिः प्सातम् । वासः क्षौममिति ॥

एवं तर्हि योगविभागः करिष्यते । शर्परे विसर्जनीयः [ ३५ ] । वा शरि [ ३६ ] । ततः कुप्वोः । कुप्वोश्च शर्परयोर्विसर्जनीयस्य विसर्जनीयो भवतीति । किमर्थमिदम् । कुप्वोः ≍क ≍पौ वक्ष्यति तद्बाधनार्थम् । ततः

---

प्रज्वलित केलेला दिवा सर्व घर प्रकाशित करतो त्याप्रमाणेंच हे होय. दुसऱ्या प्रकारचा अधिकार म्हणजे जसें दोरीनें किंवा लोखंडाचे तारेनें बांधून एकादें लाकूड ओढलें जातें त्या प्रकारचा होय. उदा०—एका सूत्रामध्यें उच्चारलेलें पद त्याच्या पुढील सूत्रामध्यें उच्चारलेल्या 'च' शब्दानें त्या पुढील सूत्रामध्यें अधिकृत केलें जातें. तिसऱ्या प्रकारचा अधिकार म्हणजे—जो एकादा शब्द प्रत्येक सूत्रामध्यें निरनिराळा उच्चारावा लागूं नये याच उद्देशानें आरंभीं सांगितला जातो तो. जसें— अङ्गस्य, भस्य वगैरे. तेव्हां अर्थातच तें अधिकृत केलेलें पद पुढील प्रत्येक सूत्रामध्यें निरनिराळें उपस्थित होतें. तेव्हां प्रत्येक सूत्रामध्यें तोच तोच शब्द उच्चारावा लागूं नये याकरितां आरंभींच एकादा शब्द उच्चारून जो अधिकार केला जातो असा तिसरा पक्ष येथें घेतला तर जें हें 'विसर्जनीयस्य सः' या सूत्रामधील विसर्जनीय हें पद तें पुढील प्रत्येक सूत्रामध्यें अनुवृत्त होतांना निरनिराळेंच होत असतें. तेव्हां 'विसर्जनीयस्य सः' या सूत्रामध्यें विसर्जनीयस्य हें पद 'खरवसानयोर्वि०' या सूत्रानें केलेल्याच विसर्गांचा बोध करून देतें. तरी देखील येथें तें पद अधिकृत झालें असतां तें पद 'शर्परे विसर्जनीयः' ( ८।३।३५ ) या सूत्रानें केलेल्या विसर्गांचाही बोध करून देईल. आणि तसें झालें म्हणजे ज्या कवर्ग व पवर्गाच्या पुढें शर् आहे अशा कवर्ग व पवर्गाच्या मागील विसर्गालाच म्ह० 'शर्परे विसर्जनीयः' यानें केलेल्या विसर्गालाच हे जिव्हामूलीयादि आदेश होतील. उदा० अद्भिः प्सातम्; वासः क्षौमम्. आणि इतर ठिकाणीं म्ह० वासः परिधत्ते अशा तऱ्हेच्या उदाहरणांमध्यें 'विसर्जनीयस्य सः' ( ८।३।३४ ) या सूत्रानें विसर्गाला सकार आदेशच होईल. तेथें जरी या प्रकृत सूत्रानें सांगितलेले जिव्हामूलीयादि प्राप्त होतात तरी ते करतां येणार नाहींत. कारण 'विसर्जनीयस्य सः' ( ८।३।३४ ) या सूत्राच्या दृष्टीनें 'कुप्वोः ≍क ≍पौ च' ( ८।३।३७ ) हें शास्त्र असिद्ध आहे.

तर मग हा दोष जाण्याकरितां आम्ही सूत्राचा विभाग निराळ्या तऱ्हेचा करतों. तो असा कीं—'शर्परे विसर्जनीयः' या सूत्राच्या पुढें 'वा शरि' असें सूत्र आहे. त्यानंतर 'कुप्वोः' एवढेंच निराळें सूत्र करतों. त्याचा अर्थ ज्या कवर्ग व पवर्गाच्या पुढें शर् आहे त्या कवर्ग व पवर्गाच्या मागील विसर्गाला विसर्गच आदेश होतो.

हें एवढेंच सूत्र निराळें केलें तें कशाकरितां ?

तें अशाकरितां कीं, कवर्ग व पवर्ग पुढें असतांना पुढील सूत्रानें जे विसर्गाला जिव्हामूलीय

---

३. जसें प्रकृत सूत्रीं 'कुप्वोः ≍क≍पौ च' या चकारानें मागील विसर्ग ओढून येथें आणिला गेला आहे.

ᳲक ᳲपौ भवतः कुप्वोरित्येव । शर्परयोरिति निवृत्तम् ॥ अथवा शर्परे विसर्जनीय इत्येतत्कुप्वोः ᳲक ᳲपौ चेत्यत्रानुवर्तिष्यते ॥

## सोऽपदादौ[1] ॥ ८ । ३ । ३८ ॥

## सोऽपदादावनव्ययस्य ॥ १ ॥

सोऽपदादावनव्ययस्येति वक्तव्यम् । इह मा भूत् । प्रातःकल्पम् पुनःकल्पम् ॥

## रोः काम्ये नियमार्थम् ॥ २ ॥

रोः काम्य इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । नियमार्थम् । रोरेव काम्ये नान्यस्य । पयस्काम्यति । क्व मा भूत् । गीः काम्यति । पूः काम्यति ॥

उपध्मानीयस्य च सत्वं वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । अयमुब्जिरुपध्मानीयोपधः पठ्यते तस्य सत्वे कृते जश्भावे चाभ्युद्रः समुद्र इत्येतद्रूपं यथा स्यात् ॥ यद्युपध्मानीयोपधः

---

व उपध्मानीय सांगितलें आहेत त्यांचा बाध करण्याकरितां. त्या 'कुप्वोः' या सूत्रानंतर 'ᳲक-ᳲपौ च' एवढें निराळें सूत्र समजावें. त्या सूत्रामध्यें कवर्ग व पवर्ग पुढें असतांना एवढ्याच पदाचा संबंध आहे. त्या कवर्ग व पवर्गांच्या पुढें शर् पाहिजे असें तेथे समजू नये.

अथवा अशा तऱ्हेचा सूत्राचा विभाग न करतां देखील येथें समाधान करतां येईल तें असें कीं– 'कुप्वोः ᳲक ᳲपौ च' या प्रकृत सूत्रामध्यें 'शर्परे विसर्जनीयः' हे संबंध सूत्र अनुवृत्त आणन त्याचा येथें निराळा पुनः स्वतंत्र वाक्यार्थ करावा. म्ह० जेथें कवर्ग व पवर्गाच्या पुढें शर् असेल तेथें त्या कवर्ग व पवर्गाच्या मागील विसर्गाला या वाक्यार्थाच्या जोरावर विसर्गच आदेश होईल. जिव्हामूलीय व उपध्मानीय हे होणार नाहींत.

( सू. ३८ वा. १ ) सोऽ पदादौ या सूत्रानें सांगितलेला जो विसर्गाचे स्थानीं सकार तो अव्ययातील विसर्गाला होत नाहीं, असें म्हणावें, कारण प्रातःकल्पम्, पुनःकल्पम् या उदाहरणांमध्यें प्रकृत सूत्रानें विसर्गाला सकार न झाला पाहिजे.

( वा. २ ) काम्य प्रत्यय पुढें असतां रु-संबंधी विसर्गाला सकार होतो असं म्हणावें.

कशाकरितां ?

नियम करण्याकरितां. तो नियम असा कीं– काम्य प्रत्यय पुढें असतांना मागील विसर्गाला जर या प्रकृत सूत्रानें सकार होईल तर तो विसर्ग रु-संबंधी असेल तरच होईल. इतर विसर्गाला होणार नाहीं. असा नियम केल्यानें पयस्काम्यति अशा तऱ्हेच्या उदाहरणांमध्यें विसर्गाला सकार होतो, आणि होत नाहीं कोठें म्हणाल तर तशीं उदाहरणें गीः काम्यति पूः काम्यति हीं होत.

उपध्मानीयाला सकार होतो अपदादि कवर्ग अथवा पवर्ग पुढ असतांना असें म्हणावें.

कशाकरितां ?

अशाकरितां कीं–उब्ज् हा धातु मूळचा पाणिनीनें उᳲज् असा म्हणजे उपधास्थानीं उपध्मानीय घालून उच्चारला आहे. त्याला ह्या प्रकृत वार्तिकानें सकार आदेश करून त्या सकाराला 'झलां जश् झशि' ( ८।४।५३ ) या सूत्रानें जश्त्व करून दकार केला म्हणजे अभ्युद्रः समुद्रः अशीं रूपें झालीं पाहिजेत.

---

१. ( सू. ३८ ) विसर्गाला सकार आदेश होतो, पदाच्या आरंभीं नसलेला असा कवर्ग किंवा पवर्ग पुढें असतांना. अशा तऱ्हेचे कवर्ग व पवर्ग प्रायः पाश, कल्प, क आणि काम्य या प्रत्ययाचेच दृष्टीस पडतात.

२. उपध्मानीय हा पकारावांचून स्पष्ट उच्चारतां येत नसल्यामुळें उब्ज येथें पकार पढला गेला आहे. प्रयोगामध्यें त्याचें श्रवण व्हावें म्हणून पढला गेला नाहीं. म्हणजे पकाराच्या मागें अर्धविसर्गासारखा उपध्मानीय म्हणून जो उच्चारण्यांत येतो तो येथें उकार व जकार यांच्यामध्यें पाणिनीनें उच्चारला आहे असें समजावें.

पठ्यत उब्जिजिषतीत्युपध्मानीयस्य द्विर्वचनं प्राप्नोति । दकारोपधे पुनः सति न न्द्राः संयोगादयः [ ६. १. ३ ] इति प्रतिषेधः सिद्धो भवति । यदि दकारोपधः पठ्यते का रूपसिद्धिः उब्जिता उब्जितुमिति । असिद्धे भ उदूजेः । इदमस्ति स्तोः श्चुना श्चुः [८. ४. ४०] । ततो वक्ष्यामि । भ उद्जेः । उदूजेश्च श्चुना संनिपाते भो भवतीति । तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । भुजन्युब्जौ पाण्युपतापयोः [ ७. ३. ६१ ] इति । इहापि प्राप्नोति । अभ्युद्गः समुद्गः । अकुत्वविषये निपातनम् । अथवा नैतदुब्जे रूपम् । किं तर्हि । गमेर्ड्युपसर्गाड्डो विधीयते ।

---

पण जर उब्ज् धातु उᳵज् असा पाणिनीनें मूळचा उपध्मानीय घालून उच्चारला असेल तर उब्जिजिषति या उदाहरणामध्यें त्या उपध्मानीयाला द्वित्व होऊं लागेल. आणि उद्ज् असा मूळचा पाणिनीनें दकार घालून उच्चारला आहे असें गृहीत धरलें म्हणजे ' न न्द्राः संयोगादयः ' ( ६।१।३ ) या सूत्रानें दकाराला द्वित्वाचा निषेध सिद्ध होतो

पण उब्ज् धातु जर पाणिनीनें मूळचा दकार घालून उच्चारला आहे असें गृहीत धरलें तर उब्जिता उब्जितुम् हीं बकार-घटित रूपें कशीं साधतील ?

अशा तऱ्हेनें साधतील कीं— या असिद्ध प्रकरणामध्यें उब्ज् धातूमधील दकाराला भकार सांगतों. तो असा— ' स्तोः श्चुना श्चुः ' ( ८।४।४४ ) या सूत्रानंतर ' भ उद्जेः ' असें स्वतत्र सूत्र करतों. त्याचा अर्थ असा— उद्ज धातूमधील दकाराला शकार किंवा च-वर्ग यांचा योग असतांना भकार आदेश होतो.

तर मग तसें भकार सांगणारें सूत्र केलें पाहिजे.

तसें करावयास नको. कारण निपातनावरून काम भागेल.

तें निपातन कोणतें ?

' भुजन्युब्जौ पाण्युपतापयोः ' ( ७।३।६१ ) या सूत्रामध्यें पाणिनीनें न्युब्ज असें जें उच्चारलें आहे त्यावरूनच भकार आदेश होईल.

तर मग अभ्युद्गः या उदाहरणामध्येंही दकाराला भकार आदेश होऊं लागेल असा दोष येतो.

हा दोष येत नाहीं. कारण ' भुजन्युब्जौ ' या सूत्रामध्यें धातूच्या जकाराला कुत्व होऊं नये याकरितां न्युब्ज असें निपातन केलें आहे. तेव्हां अर्थात् त्याच निपातनावरून होणारा दकाराला भकार आदेश ज्या ठिकाणीं धातूच्या जकाराला कुत्व होत नाहीं त्याच ठिकाणीं समजला जाईल.

किंवा अभ्युद्गः समुद्गः हीं रूपें उब्ज् धातूपासून साधलेलीं नव्हेतच.

तर मग हीं कोणत्या धातूचीं रूपें आहेत ?

अभि आणि उत् या दोन उपसर्गांच्या पुढें गम् धातूला[३] ड प्रत्यय लागून हीं रूपें साधतात.

---

तेव्हां उपध्मानीयाला उपधात्व येत आहे. ' कुप्वोः ' या प्रकरणामध्यें उपध्मानीयाला सकाराचें विधान केलें गेलें असल्यामुळें जेथें जकाराला कुत्व होतें तेथेंच हा सकार आदेश होतो आणि जेथें जकाराला कुत्व होत नाहीं तेथें उपध्मानीयाचा शरामध्यें पाठ असल्यामुळें जश्त्वानें बकार होतो. अभ्युद्गः येथें घञ्. ' चजोः कु० ' ( ७।३।५२ ) यानें जकाराला कुत्व, उपध्मानीयाला सकार, त्याला जश्त्वानें दकार. उब्जिता येथें कुत्व होत नसल्यामुळें उपध्मानीयाला ' झलां जश् झशि ' ( ८।४।५३ ) यानें जश्त्वानें बकार होतो.

३. गम् धातूहून ' अन्तात्यन्ताध्व० ' (३।२।४८) या सूत्रावरील ' अन्यत्रापि दृश्यते ' या वार्तिकानें ड प्रत्यय करावयाचा.

अभ्युद्गतोऽभ्युद्गः । समुद्गतः समुद्गः ॥

## इणः षः ॥ ८ । ३ । ३९ ॥

किमविशेषेण सत्वमुक्त्वा तत इण उत्तरस्य सकारस्य षत्वमुच्यत आहोस्विदिण उत्तरस्य विसर्जनीयस्यैव षत्वं विधीयते । किं चातः । यद्यविशेषेण सत्वमुक्त्वेण उत्तरस्य सकारस्य षत्वमुच्यते निष्कृतम् निष्पीतमित्यत्र सत्वस्यासिद्धत्वात्षत्वं न प्राप्नोति ॥ अथेण उत्तरस्य विसर्जनीयस्यैव षत्वं विधीयते सत्वमप्यनुवर्तेत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तते सत्वमपि प्राप्नोति । अथ निवृत्तं नमस्पुरसोर्गत्योः [ ८. ३. ४० ] इत्यत्र सकारग्रहणं कर्तव्यम् ॥ तस्मिंश्च क्रियमाणे षत्वमप्यनुवर्तेत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तते षत्वमपि प्राप्नोति । अथ निवृत्तमिदुदुपधस्य चाप्रत्ययस्य [ ४१ ] इत्यत्र षकारग्रहणं कर्तव्यम् ॥ तस्मिंश्च क्रियमाणे सत्वमप्यनुवर्तेत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तते सत्वमपि प्राप्नोति ।

---

तेव्हां अभ्युद्गत म्ह० सामोरा आलेला तो अभ्युद्ग होय. तसाच जो समुद्गत म्हणजे चांगला उदयाला आलेला तो समुद्ग होय.

( सू. ३९ ) या प्रकरणामध्यें सामान्यतः सर्व सूत्रांनीं विसर्गाला सकार आदेश सांगून फक्त त्या सकाराच्या मागें इण् असेल तर त्या सकाराला इणः षः या प्रकृत सूत्रानें षकार होतो असें समजावें किंवा इणाच्या पुढील विसर्गालाच ह्या सूत्रानें सकार आदेशाचा बाध करून षकार आदेश सांगितला आहे असें समजावें.

यांत काय बरें फरक होतो ?

फरक असा होतो कीं जर सामान्यतः सर्व सूत्रांनीं विसर्गाला सकार आदेश सांगून फक्त तो सकार इणाच्या पुढें असेल तर त्याला या प्रकृत सूत्रानें षत्व होतें असें समजलें तर निष्कृतं निष्पीतम् वगैरे उदाहरणांमध्यें ह्या प्रकृत सूत्रानें सकाराला षकार होणार नाहीं. कारण तेथें इदुदुपधस्य ( ८।३।४१ ) या पुढील सूत्रानें जो विसर्गाला सकार आदेश झालेला आहे तो प्रकृत इण: ष: या सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध आहे.

बरें तर इणाच्या पुढील विसर्गालाच ह्यानें षकार आदेश सांगितला आहे असें समजलें तर इण: षः या प्रकृत सूत्रामध्यें पूर्वसूत्रांतून सकाराची अनुवृत्ति होत आहे किंवा नाहीं ?

यांत काय फरक होत आहे ?

फरक असा कीं जर प्रकृत इणः ष: या सूत्रामध्यें स: याची अनुवृत्ति होते असें गृहीत धरलें तर इणाच्या पुढील विसर्गाला जसा या सूत्रानें षकार होतो तसा सकारही आदेश होऊं लागेल. आतां जर ह्या सूत्रामध्यें स: या पदाची अनुवृत्ति केली तर पुढील ' नमस्पुरसोर्गत्योः ' ( ८।३।४४ ) या सूत्रामध्यें सः असें पद उच्चारावें लागेल आणि फिरून तेथें सः असें पद उच्चारलें असतां त्या सूत्रामध्यें ' इणः षः' या सूत्रांतील षः या पदाची अनुवृत्ति होत आहे कीं नाहीं ?

यांत काय फरक आहे ?

फरक असा कीं 'नमस्पुरसोर्गत्योः' या सूत्रामध्यें ष: या पदाचा संबंध न करावा तर त्याच्या पुढील ' इदुदुपधस्य० ' ( ८।३।४१ ) या सूत्रामध्यें ष: असें उच्चारावें लागेल.

बरें, तेथें षः असें पद उच्चारलें असतां तेथें मागून सः या पदाची अनुवृत्ति होत आहे किंवा नाहीं ?

यांत काय फरक आहे ?

फरक असा कीं, जर ' इदुदुपधस्य चाप्र०' या सूत्रामध्यें स: याची अनुवृत्ति होते असें गृहीत धरलें तर निष्कृतम् वगैरे उदाहरणांमध्यें

---

१. ( सू. ३९ ) इणाच्या पुढील विसर्गाला षकार होतो, पदाच्या आरंभीं असलेले कवर्ग व पवर्ग पुढें असतांना.

अथ निवृत्तं तिरसोऽन्यतरस्याम् [ ४२ ] इत्यत्र सकारग्रहणं कर्तव्यम् ॥ तस्मिंश्च क्रियमाणे षत्वमप्यनुवर्तेत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तते षत्वमपि प्राप्नोति । अथ निवृत्तं द्विस्त्रिश्चतुरिति कृत्वोऽर्थे [४३] इसुसोः सामर्थ्ये [४४] नित्यं समासेऽनुत्तर पदस्थस्य [४५] इति षकारग्रहणं कर्तव्यम् ॥ तस्मिंश्च क्रियमाणे सत्वमप्यनुवर्तेत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तते सत्वमपि प्राप्नोति । अथ निवृत्तमतः कृकमिकंसकुम्भपात्रकुशाकर्णीष्वनव्ययस्य [ ४६ ] इति सकारग्रहणं कर्तव्यम् ॥

यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावदविशेषेण सत्वमुक्त्वेण उत्तरस्य सकारस्य षत्वमुच्यते । ननु चोक्तं निष्कृतम् निष्पीतमित्यत्र सत्वस्यासिद्धत्वात्षत्वं न प्राप्नोतीति । नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न योगे योगोऽसिद्धः । किं तर्हि । प्रकरणे प्रकरण-

---

जसा त्या सूत्रानें षकार आदेश होतो तसा सकार आदेशही होऊं लागेल.

बरें, आतां इदुदुपधस्य या सूत्रामध्यें सः या पदाची अनुवृत्ति होत नाहीं असें गृहीत धरावें तर त्याच्या पुढील 'तिरसोऽन्यतरस्याम्' (८।३।४२) या सूत्रामध्यें सः असें पद उच्चारावें लागेल. तेथें तसें केलें असतां फिरून त्या सूत्रामध्यें मागून षः या पदाची अनुवृत्ति होत आहे किंवा नाहीं.

यांत काय फरक होतो ?

फरक असा कीं जर तिरसोऽन्यतरस्याम् या सूत्रामध्यें षः या पदाची अनुवृत्ति होत असेल तर जसें त्या सूत्रानें तिरस्कर्ता वगैरे उदाहरणांमध्यें विसर्गाला सकार आदेश होतो तसा षकार आदेश त्या सूत्रानें होऊं लागेल.

बरें, आतां तिरसोऽन्यतरस्याम् या सूत्रामध्यें षः या पदाची अनुवृत्ति होत नाहीं असें म्हटलें तर त्याच्या पुढे ' द्विस्त्रिश्चतुरिति॰ ' ( ८।३।४३ ) ' इसुसोः सामर्थ्ये ' (८।३।४४) ' नित्यं समासेऽनुत्तर॰' ( ८।३।४५ ) हीं तीन सूत्रें विसर्गाला षकार आदेश सांगणारीं आहेत तेव्हां तेथें षः असें पद उच्चारावें लागेल.

तेथें षः असें पद उच्चारलें असतां त्या तीन सूत्रांमध्यें मागून सः या पदाची अनुवृत्ति होत आहे किंवा नाहीं ?

यांत काय फरक आहे ?

फरक असा कीं— जर त्या तीन सूत्रांमध्यें सः या पदाची अनुवृत्ति होत असेल तर दुष्करोति सर्पिष्करोति वगैरे उदाहरणामध्यें जसा त्या सूत्रांनीं विसर्गाला षकार आदेश होतो तसा तेथें त्या सूत्रांनीं विसर्गाला सकार आदेश देखील होऊं लागेल. आतां त्या तीन सूत्रांमध्यें सः या पदाची अनुवृत्ति होत नाहीं असें गृहीत धरलें तर ' अतः कृकमिकंसकम्भपात्रकुशाकर्णी॰ ' ( ८।३।४६ ) या विसर्गाला सकार आदेश सांगणाऱ्या सूत्रामध्य 'सः' असें पद उच्चारावें लागेल.

तर मग आतां आम्ही असें सांगतों कीं, येथें तुला वाटेल तसें घे. या प्रकरणामध्यें सामान्यतः सर्व सूत्रांनीं विसर्गाला सकार आदेश सांगून फक्त इणः षः या प्रकृत सूत्रानें तो सकार इणाच्या पुढें असेल तर त्याला षकार होतो असें मानलें तरी हरकत नाहीं.

पण आतांच सांगितलें ना, कीं हा पक्ष घेतला असतां निष्कृतं व निष्पीतम् या उदाहरणांमध्यें ' इदुदुपधस्य ' या पुढील सूत्रानें विसर्गाला झालेला सकार असिद्ध असल्यामुळें तेथें प्रकृत सूत्रानें षकार होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं.

कारण ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि

मसिद्धमिति यदयमुपसर्गाददसमासेऽपि णोपदेशस्य [ ८. ४. १४ ] इत्यसमासेऽपिग्रहणं करोति ॥ अथवा पुनरस्त्विण उत्तरस्य विसर्जनीयस्य षत्वं विधीयते । ननु चोक्तं सत्वमप्यनुवर्तेत उताहो न किं चातः यद्यनुवर्तते सत्वमपि प्राप्नोतीति । नैष दोषः । संबन्धमनुवर्तिष्यते । सोऽपदादौ [३८]। इणः षः [ ३९ ]। नमस्पुरसोर्गत्योः [ ४० ]

'उपसर्गादसमासेऽपि णो०,' (८।४।१४) या सूत्रामध्यें असमासे असे शब्द घालतो त्या अर्थी तो असें सुचवितो कीं एकाच प्रकरणामध्ये पूर्वशास्त्राला परशास्त्र असिद्ध होत नाहीं. निराळ्या प्रकरणांतील शास्त्राला पुढील निराळ्या प्रकरणांतीलच शास्त्र फक्त असिद्ध समजावें.[२]

अथवा इण: षः या प्रकृत सूत्रानें इणाच्या पुढील विसर्गाला स्वतंत्र रीतीनें षत्व सांगितलें आहे असें का होईना.

असा पक्ष घेतला तरी हरकत नाहीं.

पण तसा पक्ष घेतला असतां इणः षः या प्रकृत सूत्रामध्ये सः या पदाची अनुवृत्ति होत आहे किंवा नाहीं ? आणि जर ती अनुवृत्ति होत असेल तर इण: षः या सूत्रानें विसर्गाला सकार आदेश देखील होऊं लागेल असा दोष आतांच वरती दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण सः या पदाची अनुवृत्ति केली तरी ती नुसती संबंधानुवृत्ति आहे असें समजावें. म्हणजे सोऽपदादौ या पदांचा इणः षः येथें संबंध होऊन स्वतंत्र वाक्यार्थ, त्याचा

२. 'उपसर्गाद०' (८।४।१४) येथें 'पूर्वपदात्संज्ञा:०' ( ८।४।३ ) येथून पूर्वपदात् हा अधिकार अनुवृत्त होत असल्यामुळें समासामध्येंच 'उपसर्गाद०' (८।४।१४) याची प्रवृत्ति होईल. आणि असमासस्थलीं होणार नाही. म्हणून 'असमासेऽपि' असें म्हटलें आहे. त्यामुळें प्रणयति प्रणायकः या दोन्ही ठिकाणीं णत्व साधतें. अधिकाराची अनुवृत्ति किंवा निवृत्ति ही व्याख्यानावरूनच ठरवावयाची बहुशः वहिवाट असमुळें त्या वहिवाटीला अनुसरून येथें पूर्वपदात् या अधिकाराची निवृत्ति ठरविली असतां असमासेऽपि असें म्हटल्यावांचूनच समास आणि असमास या दोन्ही ठिकाणींही 'उपसर्गाद०' या णत्वाची प्रवृत्ति साधत असल्यामुळें 'असमासेऽपि' हा शब्द तेथे घातला तो व्यर्थ होत आहे. पण पूर्वपदांतील रेफ किंवा षकार यांच्या पुढील उत्तरपदांतील नकाराला णत्व करणें झाल्यास संज्ञा असतांनाच करावें एरवीं करूं नये, असा 'पूर्वपदात्संज्ञायामगः' ( ८।४।३ ) यानें नियम केला असल्यामुळें जसें चार्मनासिकः येथें 'अट्कुप्वा०' ( ८।४।२ ) हें णत्व होत नसतें तसें प्रणायकः येथेंही 'उपसर्गाद०' हें णत्व होणार नाहीं. आणि असमासेऽपि असें म्हटलें असतां त्या जोरावर 'उपसर्गाद०' या सूत्रापुरता तो नियम झुगारून द्यावयाचा असें म्हणणें असेल तर 'पूर्वपदात्सं०' या सूत्राच्या दृष्टीनें 'उपसर्गाद०' हें सूत्र असिद्ध असल्यामुळें तेथें तो नियम प्रवृत्त होऊं शकत नसल्यानें असमासेऽपि हा शब्द व्यर्थ होत आहे. त्यावरून असें सूचित होतें की–'पूर्व शास्त्राच्या दृष्टीनें परशास्त्र असिद्ध' हा नियम एकाच प्रकरणांतील म्हणजे गटांतील पूर्वपरशास्त्रांना लागू करावयाचा नाहीं. तर निरनिराळ्या गटांतील पूर्वपरशास्त्रांनाच फक्त लागू करावयाचा. तेव्हां निष्कृतम् वगैरे स्थलीं पुढील 'इदुदुपधस्य चा०' या सूत्रानें झालेला सकार 'इणः षः' या पूर्वसूत्राच्या दृष्टीनें असिद्ध होत नाहीं; कारण, तीं दोन्ही पूर्वपरशास्त्रें एका गटांतील आहेत अर्थात् त्याही सकाराला 'इणः षः' यानें षकार होणार असल्यामुळें दोष येत नाहीं.

३. 'इणः षः' येथें सः या पदाची जरूर नाहीं तरी पुढें 'नमस्पुरसो०:' येथें त्या सः या पदाची जरूर आहे. त्याकरितांच येथें तें सः हें पद अनुवृत्त करावयाचें. तें अशा रीतीनें करावें:- सः हें पद पूर्वसूत्रामध्यें इतर पदाशीं संबंध पावून ज्या वाक्यार्थांत प्रविष्ट

सकारः इण उत्तरस्य षकारः । इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य [ ४१ ] षकारः नमस्पुरसोर्गत्योः सकारः । तिरसोऽन्यतरस्याम् [४२] सकारः इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य षकारः । द्विस्त्रिश्चतुरिति कृत्वोऽर्थे [ ४३ ] इसुसोः सामर्थ्ये [ ४४ ] नित्यं समासेऽनुत्तरपदस्थस्य [४५] इति षकारः तिरसोऽन्यतरस्यां सकारः । अतः कृकमिकंसकुम्भपात्रकुशाकर्णीष्वनव्ययस्य [४६] सकारोऽनुवर्तते षकारग्रहणं निवृत्तम् ॥

नमस्पुरसोर्गत्योः ॥ ८ । ३ । ४०

इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य ॥ ८ । ३ । ४१ ॥

इदुदुपधस्य चाप्रत्ययस्येति चेत्पुम्मुहुसोः प्रतिषेधः ॥ १ ॥

इदुदुपधस्य चाप्रत्ययस्येति चेत्पुम्मुहुसोः प्रतिषेधो वक्तव्यः । पुँस्कामा मुहुःकाम इति ॥ वृद्धिभूतानां षत्वं वक्तव्यम् । दौष्कुल्यम् नैष्पुरुष्यम् ॥

---

उपयोग नसला तरी, करावयाचा. त्यातील सः पदाची अनुवृत्ति 'नमस्पुरसोर्गत्योः' येथें होते व त्या सूत्रानें सकार आदेश होतो. तेथेंही इणः षः या पदांची अनुवृत्ति होऊन इणाच्या पुढील विसर्गाला असा स्वतंत्र वाक्यार्थ होतोच. परंतु तेथ त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. षः हें पद पुढें 'इदुदुपधस्य०' येथें अनुवृत्त होतेंच. तसेंच पुढें 'इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य' येथेंही नमस्पुरसोर्गत्योः यांचा संबंध होत आहेच. त्यांतील सः याचा संबंध पुढें होत आहेच. तेव्हां 'तिरसोऽन्यतरस्याम्' या सूत्रानें विसर्गाला सकार आदेश सांगितला आहे तेथेंही इदुदुपधस्य यानें सांगितलेल्या षकाराचा स्वतंत्र रीतीनें संबंध होत आहे. त्याच्या पुढें 'द्विस्त्रिश्चतुरिति कृत्वोर्थे' ( ८।३।४३ ) 'इसुसोः सामर्थ्ये' ( ८।३।४४ ) 'नित्यं समासेऽनुत्तरपदस्थस्य' ( ८।३४५ ) या तीन सूत्रांनीं विसर्गाला षकार आदेश सांगितला आहे तेथेंही 'तिरसोऽन्यतरस्याम्' या सूत्रानें सांगितलेल्या सकाराचा स्वतंत्र रीतीनें संबंध होत आहे. त्याच्या पुढें 'अतः कृकमि०' (८।३।४६) या सूत्रामध्यें सकाराची अनुवृत्ति होत आहे. पुढें जरूर नसल्यामुळें येथें षकाराचा स्वतंत्र रीतीनें संबंध करण्याचें कारण नाहीं.

( सू. ४१ वा. १) प्रत्ययासंबंधी नव्हे अशा आणि ह्रस्व इकार किंवा उकार यांच्या पुढें असणाऱ्या अशा विसर्गाला कवर्ग अथवा पवर्ग पुढें असतांना जो ह्या सूत्रानें षकार आदेश सांगितला आहे तो आदेश पुम् शब्दाला आणि मुहुस् शब्दाला होत नाहीं असें म्हणावें. उदा०- पुंस्कामाः, मुहुःकामः .

( वा. २ ) तसेंच विसर्गाच्या मागील ह्रस्व इकार किंवा उकार यांना वृद्धि झाली असतांनाही त्या विसर्गाला षकार आदेश होतो, असें म्हणावें. उदा०—दौष्कुल्यम् नैष्पुरुष्यम्[2].

---

झालें त्याप्रमाणेंच 'इणः षः' येथें तीं पदें आणून पूर्वीप्रमाणेंच पुनः येथें स्वतंत्र वाक्यार्थ पूर्वीच्याच वाक्यार्थाचा अनुवाद म्हणून करून ठेवावयाचा. तेव्हां येथें आलेल्या त्या पदांपैकीं सः हें पद पुढें जाण्यास हरकत नाहीं. यालाच संबंधानुवृत्ति म्हणतात.

१. ( सू. ४० ) गतिसंज्ञक असा जो नमस् किंवा पुरस् शब्द त्याच्या विसर्गाला सकार आदेश होतो कवर्ग किंवा पवर्ग पुढें असतांना.

१. ( सू. ४१ ) उपधासंज्ञक असा जो ऱ्हस्व इकार किंवा ऱ्हस्व उकार त्याच्या पुढील—प्रत्ययाचा नव्हे असा- जो विसर्ग त्याला षकार आदेश होतो, कवर्ग अथवा पवर्ग पुढें असतांना.

२. दुष्टं कुलं दुष्कुलम्. निर्गतः पुरुषो निष्पुरुषः. या दोन्ही ठिकाणीं 'कुगतिप्रादयः' ( २।२।१८ ) यानें समास. 'गुणवचनब्राह्मणादिभ्यः' (५।१। १२४ ) यानें ष्यञ् प्रत्यय.

## प्लुतानां तादौ च ॥ २ ॥

प्लुतानां तादौ च कुप्वोश्चेति वक्तव्यम् । सर्पी३ष्टर बर्ही३ष्टर । नी३ष्कुल दू३ष्पुरुष ॥

## न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ३ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वाद्वृद्धेः । बहिरङ्गलक्षणा वृद्धिः ॥ इह कस्मान्न भवति । पितुः करोति । मातुः करोति । अप्रत्ययविसर्जनीयस्येति षत्वं प्रसज्येत । अप्रत्ययविसर्जनीयस्येत्युच्यते प्रत्ययविसर्जनीयश्चायम् । लुप्यतेऽत्र प्रत्ययविसर्जनीयो रात्सस्य [ ८. २. २४ ] इति । एवं तर्हि

## भ्रातुष्पुत्रग्रहणं ज्ञापकमेकादेशनिमित्तात्षत्वप्रतिषेधस्य ॥ ४ ॥

यदयं कस्कादिषु भ्रातुष्पुत्रशब्दं पठति तज्ज्ञापयत्याचार्यो नैकादेशनिमित्तात्षत्वं भवतीति ॥

---

(वा. ३) तसेंच विसर्गाच्या मागील ह्रस्व इकार व उकार याना प्लुत झाला असतांही त्या विसर्गाला तकारादि प्रत्यय पुढें असतांना किंवा कवर्ग व पवर्ग पुढें असतांना षकार आदेश होतो, असें म्हणावें. उदा.—सर्पी३ष्टर. बर्ही३ष्टर. नी३ष्कुल. दू३ष्पुरुष.

(वा. ४) अथवा हीं दोन वार्तिकें करावयास नकोत.

का बरें ?

वृद्धि आणि प्लुत हे बहिरंग आहेत म्हणून. म्हणजे वृद्धि वगैरे शास्त्र बहिरंग असल्यामुळें तीं या प्रकृतशास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध आहेत. तेव्हां प्रकृत शास्त्राला वरील उदाहरणामध्यें विसर्गाच्या मागें ह्रस्व इकार व उकार आहेतच असें भासत असल्यामुळें षत्व होईल.

आतां पितुः करोति मातुः करोति वगैरे उदाहरणांमध्यें प्रकृत सूत्रानें विसर्गाला षकार आदेश कां होत नाहीं.

कारण जो विसर्ग प्रत्ययाचा नव्हे त्याला प्रकृत सूत्रानें षकार आदेश सांगितला आहे. तेव्हां येथें त्याची प्राप्ति येत आहे.

परंतु सूत्रामध्यें प्रत्ययसंबंधी विसर्ग नसावा असें म्हटलें आहे ना ? आणि हा तर प्रत्ययाचाच विसर्ग आहे.

हा प्रत्ययाचा विसर्ग नव्हे, कारण 'रात्सस्य' (८।२।२४) या सूत्रानें लोप झाल्यामुळें प्रत्ययाचा विसर्ग गेलाच आहे.

तर मग येथें आम्ही असें समाधान करतों कीं हा आचार्य पाणिनि कस्कादिगणामध्यें जो भ्रातुष्पुत्र असा शब्द घालतो त्यावरूनच एकादेशानें झालेल्या वर्णाच्या पुढील विसर्गाला प्रकृत सूत्रानें षत्व होत नाहीं असें तो सुचवितो.

---

३. सर्पि३ष्टर, बर्हि३ष्टर. 'द्विवचनविभज्योप०' (५।३।५७) या सूत्रानें तरप् प्रत्यय. 'गुरोरनृतो०' (८।२।८६) यानें प्लुत. नि३ष्कुल, दु३ष्पुरुष. पूर्वीप्रमाणेंच प्लुत समजावा.

४. बहिर्भूत तद्धित प्रत्ययामुळें वृद्धि झाली असल्यामुळें ती बहिरंग आहे. व प्लुतालाही वाक्याची अपेक्षा असल्यामुळें तो बहिरंग आहे.

५. भ्रातुः येथील उकाराच्या पुढील विसर्गाला षत्व व्हावें म्हणून कस्कादिगणामध्यें भ्रातुष्पुत्र शब्दाचा पाठ केला आहे. परंतु मातुः करोति याप्रमाणें भ्रातुष्पुत्रः येथेंही 'इदुदुपधस्य०' यानेंच षत्व होत असल्यामुळें तो पाठ व्यर्थ होत आहे. त्यावरून असें अनुमान काढतां येतें कीं एकादेशशास्त्रामुळें झालेल्या उकारापुढील विसर्गाला 'इदुदुपधस्य चा०' या सूत्रानें षत्व होत नाहीं. तेव्हां षत्व होण्याकरितां कस्कादिगणामध्यें भ्रातुष्पुत्र शब्द घालीत आहे. त्यामुळें मातुः करोति अशा तऱ्हेच्या उदाहरणामध्यें षत्व होत नाहीं.

[ तिरसोऽन्यतरस्याम् ॥ ८ । ३ । ४२ ॥ ]

द्विस्त्रिश्चतुरिति कृत्वोऽर्थे ॥ ८ । ३ । ४३ ॥

द्विस्त्रिश्चतुर्ग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । पञ्चकृत्वः करोति ॥ अथ कृत्वोऽर्थग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । चतुष्कपालः चतुष्कण्टक इति । नैतदस्ति । अस्त्वेतेन विभाषा पूर्वेण नित्यो विधिर्भविष्यति । नाप्राप्ते पूर्वेणेयं विभाषारभ्यते सा यथैवेह बाधिका भवति चतुः करोति चतुष्करोतीत्येवं चतुष्कपालेऽपि बाधिका स्यात् । नात्र

---

( सू. ४३ ) या सूत्रामध्यें द्विस्त्रिश्चतुः असें विशेषतः तीनच शब्द मुद्दाम कां उच्चारले आहेत ?

पञ्चकृत्वः करोति या उदाहरणामध्यें प्रकृत सूत्राची प्रवृत्ति होऊं नये याकरितां ते शब्द मुद्दाम घातले आहेत.

आतां या सूत्रामध्यें कृत्वोर्थे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

चतुष्कपाल: चतुष्कण्टकः या उदाहरणांमध्यें प्रकृत सूत्रानें विसर्गाला षकार आदेश विकल्पानें होऊं नये म्हणून कृत्वोर्थे असें म्हटलें आहे.

हा उपयोग संभवत नाहीं. कारण चतुष्कपालः वगैरे उदाहरणांमध्यें प्रकृत सूत्रानें विसर्गाला षकार आदेश विकल्पानें झाला तरी होऊं दे. ज्या वेळेला यानें होणार नाहीं, त्या वेळेला पूर्व सूत्रानें म्हणजे 'इदुदुपधस्य' ( ८।३।४१ ) या सूत्रानें नित्य षकार आदेश सांगितला आहे तो होईलच.

पण असें म्हणतां येणार नाहीं. कारण प्रकृत सूत्राच्या सर्व उदाहरणांमध्येंच पूर्वसूत्रानें नित्य षकार आदेश अवश्यच प्राप्त होत आहे. असें असतांना हें मुद्दाम विकल्पाकरितांच सूत्र केलें आहे. तेव्हां जसें चतुःकरोति चतुष्करोति या उदाहरणांमध्यें पूर्वसूत्राचा बाध करून विकल्पानें षकार आदेश होतो त्याप्रमाणें चतुष्कपालः वगैरे उदाहरणांमध्यें देखील पूर्वसूत्राचा बाध करून विकल्पानें षकार आदेश होऊं लागेल.

चतुष्करोति या उदाहरणामध्यें पूर्वसूत्रानें षत्व प्राप्त होत नाहीं ना ?

कां बरें ?

---

१. ( सू. ४२ ) कवर्ग किंवा पवर्ग पुढें असतांना तिरस् शब्दाच्या विसर्गाला सकार आदेश विकल्पानें होतो.

१. ( सू. ४३ ) दोन वेळ, तीन वेळ आणि चार वेळ या अर्थाचे जे द्विस् त्रिस् आणि चतुर् हे शब्द त्यांच्या विसर्गाला विकल्पानें षकार आदेश होतो कवर्ग किंवा पवर्ग पुढें असताना.

२ क्रियेची आवृत्ति या अर्थाला दाखविणाऱ्या पञ्चन् शब्दाहून ' संख्यायाः क्रियाभ्यावृत्तिगणने कृत्वसुच् ' ( ५।४।१७ ) या सूत्रानें स्वार्थी कृत्वसुच् प्रत्यय. ' पांच वेळा ' असा अर्थ आहे.

३. चतुर्षु कपालेषु संस्कृतः पुरोडाशः ( चार परळांमध्यें शिजविलेला ) या अर्थी ' संस्कृतं भक्षाः ' ( ४।२।१६ ) याने अण् प्रत्यय कर्तव्य असतांना प्रथमतः ' तद्धितार्थोत्तर० ' ( २।१।५१ ) या सूत्रानें चतुर् आणि कपाल या शब्दांचा द्विगु समास करून त्याच्या पुढें संस्कृत या अर्थी केलेल्या अण् प्रत्ययाचा ' द्विगोर्लुगनपत्ये ' ( ४।१।८८ ) या सूत्रानें लुक् केला असतां चतुष्कपालः असा शब्द तयार होतो. त्या प्रमाणेंच चतुष्कण्टकः येथेंही प्रक्रिया समजावी. येथील चतुर् शब्द 'चार वेळां ' या अर्थाला दाखवीत नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें षत्वाचा विकल्प होत नाहीं. ' इदुदुपधस्य० ' या सूत्रानें नित्यच षत्व होतें.

पूर्वेण षत्वं प्राप्नोति । किं कारणम् । अप्रत्ययविसर्जनीयस्येत्युच्यते प्रत्ययविसर्जनीयश्चायम् । लुप्यते प्रत्ययविसर्जनीयो रात्सस्य [ ८. २. २४] इति तस्मात्कृत्वोऽर्थग्रहणं कर्तव्यम् ॥

द्वित्रिश्चतुर्ग्रहणं शक्यमवक्तुम् । कस्मान्न भवति पञ्चकृत्वः करोतीति । इदुदुपधस्येति वर्तते ॥ नैवं शक्यम् । अक्रियमाणे द्वित्रिश्चतुर्ग्रहणे कृत्वोऽर्थग्रहणेन विसर्जनीयो विशेष्येत । तत्र को दोषः । इहैव स्यात् द्विष्करोति द्विः करोति । इह न स्यात् चतुष्करोति चतुः करोतीति । द्वित्रिश्चतुर्ग्रहणे पुनः क्रियमाणे कृत्वोऽर्थग्रहणेन द्वित्रिश्चतुरो विशेष्यन्ते । द्वित्रिश्चतुर्णां कृत्वोऽर्थे वर्तमानानां यो विसर्जनीय इति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । पदस्येति वर्तते तत्कृत्वोऽर्थग्रहणेन विशेषयिष्यामः । पदस्य कृत्वोऽर्थे वर्तमानस्य यो विसर्जनीय इति ॥

---

पूर्व सूत्रामध्यें प्रत्ययसंबंधी विसर्ग नसावा असें म्हटलें आहे आणि चतुःकरोति या उदाहरणामध्यें तर सुच् प्रत्यय केला असल्यामुळें हा प्रत्ययाचा विसर्ग आहे.

या ठिकाणीं प्रत्ययाचा विसर्ग नाहीं. कारण सुच् प्रत्ययाच्या सकाराचा 'रात्सस्य' (८।२।२४) या सूत्राने लोप झाला आहे.

एकंदरीत चतुष्कपालः वगैरे उदाहरणांमध्यें पूर्वसूत्रानें लोप झाला आहे. तेव्हां चतुष्कपालः वगैरे उदाहरणांमध्यें पूर्व सूत्रानें सांगितलेला नित्य षत्वाचा बाध करून विसर्गाला विकल्पानें षत्व होऊं लागेल तें न व्हावें याकरितां प्रकृत सूत्रामध्यें कृत्वोर्थे असें म्हटलें पाहिजे

असें असेल तर या सूत्रामध्यें द्वित्रिश्चतुः असें म्हटलें नाहीं तरी चालेल.

द्वित्रिश्चतुः हे शब्द घातले नाहींत तर पञ्चकृत्वः करोति या उदाहरणामध्यें प्रकृत सूत्रानें विसर्गाला षकार आदेश कां होणार नाहीं ?

पूर्व सूत्रांतून इदुदुपधस्य या पदाची अनुवृत्ति प्रकृत सूत्रामध्यें होत आहे. आणि पञ्चकृत्वः येथें तर विसर्गाच्या मागें ऱ्हस्व इकार किंवा उकार यांपैकीं कोणीच नाहीं.

हें म्हणणें शक्य ( बरोबर ) दिसत नाहीं. कारण सूत्रामध्यें द्वित्रिश्चतुः हे शब्द घातले नाहींत तर कृत्वोर्थे या पदाचा विसर्गाशीं संबंध होऊं लागेल.

तसें झालें असतां कोणता दोष येतो ?

दोष असा येतो कीं द्विःकरोति द्विष्करोति त्रिःकरोति त्रिष्करोति या उदाहरणांमध्येंच प्रकृत सूत्रानें षत्व होणार नाहीं. कारण तेथें कृत्वोर्थी केलेल्या सुच् प्रत्ययाचा लोप झाला असल्यामुळें कृत्वोर्थाला दाखविणारा विसर्ग नाहीं. आतां सूत्रामध्यें द्वित्रिश्चतुः असे शब्द उच्चारले म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. कारण ते शब्द उच्चारले असतां कृत्वोर्थे या पदाचा संबंध द्वित्रिश्चतुः यांच्याशींच होत आहे. तो असा कीं कृत्वोर्थाला दाखविणारे जे द्वि त्रि आणि चतुर् हे शब्द त्यांच्या विसर्गाला विकल्पानें षकार आदेश होतो असा या प्रकृत सूत्राचा वाक्यार्थ करतां येतो.

पण अशा तऱ्हेनेंही द्वित्रिश्चतुः याचा उपयोग सांगतां येत नाहीं. कारण मागून पदस्य असा अधिकार चालू आहे. तेव्हां कृत्वोर्थे याचा संबंध पदस्य याशीं करतां येईल. तेव्हां या सूत्राचा अर्थ असा होईल कीं-कृत्वोर्थाला दाखविणारें जें पद त्यांतील जो ऱ्हस्व इकार अथवा उकार त्याच्या पुढील विसर्गाला विकल्पानें षकार होतो.

कृत्वसुजर्थे षत्वं ब्रवीति कस्माच्चतुष्कपाले मा ।
षत्वं विभाषया भून्ननु सिद्धं तत्र पूर्वेण ॥ १ ॥
सिद्धे ह्ययं विधत्ते चतुरः षत्वं यदापि कृत्वोऽर्थे ।
लुप्ते कृत्वोऽर्थीये रेफस्य विसर्जनीयो हि ॥ २ ॥
एवं सति त्विदानीं द्विस्त्रिश्चतुरित्यनेन किं कार्यम् ।
अन्यो हि नेदुदुपधः कृत्वोऽर्थे कश्चिदप्यस्ति ॥ ३ ॥
अक्रियमाणे ग्रहणे विसर्जनीयस्तदा विशेष्येत ।
चतुरो न सिध्यति तदा रेफस्य विसर्जनीयो हि ॥ ४ ॥
तस्मिंस्तु गृह्यमाणे युक्तं चतुरो विशेषणं भवति ।
प्रकृतं पदं तदन्तं तस्यापि विशेषणं न्याय्यम् ॥ ५ ॥

## [ इसुसोः सामर्थ्ये ॥८।३।४४॥[1] ]
## नित्यं समासेऽनुत्तरपदस्थस्य ॥ ८ । ३ । ४५ ॥[1]

अनुत्तरपदस्थस्येति किमर्थम् । परमसर्पिःकुण्डिका । अथेदानीमनेन मुक्ते पूर्वेण षत्वं

कृत्वसुच् प्रत्ययाचा अर्थ असताना जें हे षत्व सांगितलें आहे तें कशाकरितां ? चतुष्कपालः या उदाहरणांध्यें विकल्पानें षत्व होऊं नये म्हणून. पण तेथें पूर्वसूत्राने नित्य षत्व होईलच. ॥ १ ॥ पूर्व सूत्रानें नित्यषत्व प्राप्त झालें असतां हें मुद्दाम त्याचा बाध करून विकल्पानें षत्व सांगितलें आहे तेव्हां तें चतुष्कपालः येथेंही विकल्पानें होऊं लागेलच. चतुः करोति या उदाहरणामध्यें कृत्वोर्थी सुच् प्रत्यय केला आहे, तरी देखील तो कृत्वोर्थाला दाखविणारा सुच् प्रत्यय लुप्त झाला असल्यामुळें तेथेंही चतुर् शब्दांतील रेफाचाच विसर्ग झाला आहे तेव्हां तेथेंही तो प्रत्ययाचा विसर्ग नव्हे. ॥ २ ॥ तर मग आतां सूत्रामध्यें 'द्विस्त्रिश्चतुः' असें विशेषतः तीनच शब्द उच्चारण्याचें कारण काय ? कारण या तीन शब्दांशिवाय दुसऱ्या कोणत्याही कृत्वोर्थाला दाखविणाऱ्या शब्दामध्यें विसर्गाच्या मागें ऱ्हस्व इकार व उकार संभवत नाहींत. ॥ ३॥ 'द्विस्त्रिश्चतुः' हे शब्द घातले नाहींत तर कृत्वोर्थें हें विशेषण विसर्गाला लागेल आणि चतुष्करोति येथें चतुर् शब्दामधील रेफाचा विसर्ग असल्यामुळें तेथें षत्व सिद्ध होणार नाहीं. ॥ ४ ॥ आता सूत्रामध्यें 'द्विस्त्रिश्चतुः' हे शब्द घातले म्हणजे 'कृत्वोर्थें' हें विशेषण लागतें. पण हाही उपयोग नाहीं. कारण 'पदस्य' असा अधिकार असल्यामुळें कृत्वोर्थें हें पदाला विशेषण देणें न्याय्य होणार आहे. ॥ ५ ॥

( सू. ४५ ) या सूत्रामध्यें अनुत्तरपदस्थस्य असें कशाकरितां म्हटलें आहे ?

परमसर्पिःकुण्डिका येथें विसर्गाला षकार न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

---

१. ( सू. ४४ ) इस् व उस् यांच्या विसर्गाला विकल्पानें षकार आदेश होतो, कवर्ग किंवा पवर्ग पुढें असतांना. मात्र ते निमित्त आणि निमित्ती हे उभयतां परस्परान्वित अशा पदांमध्यें सांपडले असावे.

१. ( सू. ४५ ) समासांत उत्तरपदामध्यें न सांपडलेला असा जो इस् किंवा उस् त्याच्या विसर्गाला नित्य षकार होतो कवर्ग किंवा पवर्ग पुढें असतांना.

विभाषा कस्मान्न भवतीसुसोः सामर्थ्ये [४४] इति ।

नानापदार्थयोर्वर्तमानयोः ख्यायते यदा योगः ।

तस्मिन्षत्वं कार्यं तद्युक्तं तच्च मे नेह ॥१॥

व्यपेक्षासामर्थ्ये पूर्वयोगो न चात्र व्यपेक्षासामर्थ्यम् ॥ किं पुनः कारणं व्यपेक्षासामर्थ्यमाश्रीयते न पुनरेकार्थीभावो यथान्यत्र ।

ऐकार्थ्ये सामर्थ्ये वाक्ये षत्वं न मे प्रसज्येत ।

ऐकार्थ्ये सामर्थ्ये सति वाक्ये षत्वं न स्यात् । सर्पिष्करोति । सर्पिः करोतीति ॥

तस्मादिह व्यपेक्षां सामर्थ्यं साधु मन्यन्ते ॥ २ ॥

अथ चेत्कृदन्तमेतत्ततोऽधिके नैव मे भवेत्प्राप्तिः ।

यदि कृदन्तमेतत्ततोऽधिकस्य षत्वं न प्राप्नोति । किं कारणम् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति ॥ वाक्येऽपि

---

आतां येथें ह्या सूत्रामध्यें उत्तरपदामधील विसर्गाला षत्व होत नाहीं असें म्हटलें असल्यामुळें ह्या सूत्रानें षत्व न होऊ दे. परंतु 'इसुसोः सामर्थ्ये ' या पूर्व सूत्रानें येथें विसर्गाला षकार आदेश विकल्पानें कां होत नाहीं ?

( वा. १) निरनिराळ्या पदांपासून उपस्थित होणाऱ्या अर्थांचा जेव्हां वाक्यामध्यें संबंध प्रतीत होतो तेव्हांच पूर्व सूत्रानें षकार आदेश होत असतो. हा जो वाक्यामध्यें पदार्थांचा संबंध होतो याला व्यपेक्षासामर्थ्य[2] असें म्हणतात. तशा प्रकारचें व्यपेक्षासामर्थ्य ' परमसर्पिःकुण्डिका ' हा समास असल्यामुळें येथें संभवत नाहीं. कारण सामासिक पदापासून सर्वंच एक अर्थ एका रूपानेंच मनांत येतो[3]. त्यामध्यें एका पदार्थाचा दुसऱ्या पदार्थावर अन्वय होतो असें समजतां येत नाहीं.

पण अशा प्रकारचें व्यपेक्षासामर्थ्यच पूर्व सूत्रामध्यें घेतलें आहे याचें कारण काय ? जसें इतर ठिकाणीं म्ह० समास वगैरे सांगणाऱ्या शास्त्रामध्यें एकार्थीभावरूपीं सामर्थ्य घेतलें जातें तसें येथें कां घेऊ नये ?

( वा.२ ) एकार्थीभावरूप सामर्थ्य पूर्व सूत्रामध्ये घेतलें तर तसें सामर्थ्य वाक्यामध्यें संभवत नसल्यामुळें सर्पिष्करोति सर्पिः करोति असें वाक्यामध्यें पूर्व सूत्रानें विकल्पानें षत्व होणार नाहीं. म्हणून पूर्व सूत्रामध्यें व्यपेक्षारूपीं सामर्थ्यच घेणें चांगलें असें तज्ज्ञ लोक मानतात.

(वा. ३) आतां, सर्पिस् वगैरे शब्द इस् उस् असे कृत् प्रत्यय लागून तयार होतात[4] असें गृहीत धरलें तर सर्पिस् शब्दाच्या मागें परम वगैरेंसारखा एकादा अधिक शब्द लावला असतांना मुळींच षकार आदेश प्राप्त होणार नाहीं.

कां बरें ?

ज्या ठिकाणीं प्रत्ययाचा उच्चार केला असेल त्या ठिकाणीं तो प्रत्यय ज्याहून केला असेल

---

२. ' स्वतन्त्र रीतीनें आपला अर्थ मनांत आणून देणाऱ्या पदाचा तसल्याच दुसऱ्या पदाशीं संबंध असणें ' याला व्यपेक्षारूप सामर्थ्य असें म्हणतात. आणि तें व्यपेक्षासामर्थ्य वाक्यामध्यें प्रतीत होतें.

३. दुसऱ्याशीं संबद्ध असाच आपला अर्थ मनांत आणून देणाऱ्या अशा अनेक पदांपासून जो एकवटलेला अर्थ मनांत येतो त्याला एकार्थीभावरूप सामर्थ्य म्हणतात. तें समासादिवृत्तींमध्येंच असूं शकतें.

४. शब्दामध्यें अमुक प्रकृति व अमुक प्रत्यय असा विभाग जेव्हां कल्पिला जातो तेव्हां त्याला व्युत्पत्तिपक्ष म्हणतात. ' अर्चिशुचि० ' ( उणादि. २।१०८ ) आणि ' अर्तिपृ० ' ( उणा० २।११७ ) या दोन सूत्रांनी इस् व उस् प्रत्यय लागून सर्पिस् आणि धनुस् हे शब्द तयार झाले आहेत.

तर्हि न प्राप्नोति । परमसर्पिष्करोति । परमसर्पिः करोतीति ।

वाक्ये च मे विभाषा प्रतिषेधो न प्रकल्पेत ॥ ३ ॥

यदयमनुत्तरपदस्थस्येति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवति वाक्ये विभाषेति ॥

अथ चेत्संविज्ञानं नित्ये षत्वे ततो विभाषेयम् ।

अथाव्युत्पन्नं प्रातिपदिकं ततो नित्ये षत्वे प्राप्त इयं विभाषारभ्यते ॥

सिद्धं च मे समासे

षत्वम् । किमर्थं तर्हीदमुच्यते ।

प्रतिषेधार्थस्तु यत्नोऽयम् ॥ ४ ॥

अनुत्तरपदस्थस्येति प्रतिषेधं वक्ष्यामीति ॥

नानापदार्थयोर्वर्तमानयोः ख्यायते यदा योगः ।

तस्मिन्षत्वं कार्यं तदुक्तं तच्च मे नेह ॥ १ ॥

ऐकार्थ्ये सामर्थ्ये वाक्ये षत्वं न मे प्रसज्येत ।

तस्मादिह व्यपेक्षां सामर्थ्यं साधु मन्यन्ते ॥ २ ॥

अथ चेत्कृदन्तमेतत्ततोऽधिके नैव मे भवेत्प्राप्तिः ।

वाक्ये च मे विभाषा प्रतिषेधो न प्रकल्पेत ॥ ३ ॥

अथ चेत्संविज्ञानं नित्ये षत्वे ततो विभाषेयम् ।

सिद्धं च मे समासे प्रतिषेधार्थस्तु यत्नोऽयम् ॥ ४ ॥

---

त्याला आरंभ करूनच जो पुढील भाग त्याचेंच तेथें ग्रहण होतें अशी परिभाषा आहे. तेव्हां परमसर्पिस् हा शब्द इस् प्रत्ययान्त आहे असें म्हणतां येत नाहीं.

असें असेल तर परमसर्पिष्करोति येथें वाक्यामध्यें देखील पूर्व सूत्रानें षत्व होणार नाहीं.

वाक्यामध्यें पूर्वसूत्रानें विकल्पानें षकार आदेश होतो असें मला म्हणता येतें. कारण तसें मानलें नाहीं तर प्रकृत सूत्रामध्यें अनुत्तरपदस्थस्य हा निषेध व्यर्थ होईल. तेव्हां ज्या अर्थीं हा आचार्य पाणिनि उत्तर पदामधील विसर्गाला षकार आदेश होत नाहीं असें सांगतो त्यावरून तो असें सुचवितो कीं वाक्यामध्यें पूर्व सूत्रानें विकल्पानें षत्व होतें.

(वा.४) आतां सर्पिस् वगैरे शब्द हे अखंड[६] आहेत म्हणजे त्यांमध्यें अमुक धातु व अमुक प्रत्यय अशी कांहीं एक कल्पना करावयाची नाहीं असें गृहीत धरलें तर सर्पिष्करोति वगैरे उदाहरणांमध्यें 'इदुदुपधस्य०' ( ८।३।४१ ) या सूत्रानें जो षकार आदेश नित्य प्राप्त होतो तो न होतां तेथें षकार आदेश विकल्पानें झाला पाहिजे याकरितां 'इसुसोः सामर्थ्ये' हें सूत्र केलें आहे असें म्हणतां येतें.

तर मग हें प्रकृत सूत्र कशाकरितां केलें आहे ? कारण समासामध्यें व्यपेक्षारूप सामर्थ्य नसल्यामुळें पूर्व सूत्राची प्राप्ति येत नाहीं म्हणून तेथें 'इदुदुपधस्य०' या सूत्रानें नित्य षकार आदेश आपोआपच होईल.

परमसर्पिःकुण्डिका वगैरे उदाहरणांमध्यें उत्तरपदामधील विसर्गाला देखील 'इदुदुपधस्य०' या सूत्रानें नित्य षकार आदेश होऊं लागेल, त्याचा निषेध करण्याकरितां हें सूत्र केलें पाहिजे.

---

५. तेव्हां पूर्व सूत्रानें ' परमसर्पिःकुण्डिका ' येथें षत्व होणार नाहीं.

६. जेथें प्रकृति आणि प्रत्यय यांची विभागणी कल्पिली जात नाहीं तें अखंड होय. शब्दामधील अशा प्रकारच्या कल्पनेला अव्युत्पत्तिपक्ष म्हणतात.

[ अतः कृकमिकंसकुम्भपात्रकुशाकर्णीष्वनव्ययस्य ॥ ८ । ३ । ४६ ॥

अधःशिरसी पदे ॥ ८ । ३ । ४७ ॥

कस्कादिषु च ॥ ८ । ३ । ४८ ॥

छन्दसि वाऽप्राम्रेडितयोः ॥ ८ । ३ । ४९ ॥

कःकरत्करतिकृधिकृतेष्वनदितेः ॥ ८ । ३ । ५० ॥

पञ्चम्याः परावध्यर्थे ॥ ८ । ३ । ५१ ॥

पातौ च बहुलम् ॥ ८ । ३ । ५२ ॥

षष्ठ्याः पतिपुत्रपृष्ठपारपदपयस्पोषेषु ॥ ८ । ३ । ५३ ॥

इडाया वा ॥ ८ । ३ । ५४ ॥ ]

अपदान्तस्य मूर्धन्यः ॥ ८ । ३ । ५५ ॥

अथ मूर्धन्यग्रहणं किमर्थं नापदान्तस्य षो भवतीत्येवोच्येत । तत्रायमप्यर्थः षकारग्रहणं न कर्तव्यं भवति प्रकृतमनु-

---

(सू. ५५) या सूत्रामध्यें मूर्धन्यः असें कशाकरितां म्हटलें आहे ? तसें म्हणावयास नको. 'अपदान्तस्य षः' असेंच म्हणावें. तसें म्हणण्यांत आणखी एक गोष्ट साधते ती ही कीं षः असेंही येथें म्हणावयास नको. कारण मागून षः या पदाची अनुवृत्ति येत आहे.

---

१. (सू. ४६) अव्ययाशिवाय इतर ठिकाणीं समासामध्यें ऱ्हस्व अकाराच्या पुढील विसर्गाला कृ, कमि, कंस, कुम्भ, पात्र, कुशा, आणि कर्णी, हे शब्द पुढें असतांना सकार आदेश नित्य होतो; मात्र तो विसर्ग उत्तरपदांतील नसावा.

१. (सू. ४७) अधस् व शिरस् यांच्या विसर्गाला पद शब्द पुढें असतांना सकार आदेश होतो; मात्र तो विसर्ग उत्तरपदांतील नसावा.

१. (सू. ४८) कस्कादिगणांतील शब्दामध्यें इण् वर्णाच्या पुढील विसर्गाला षकार आदेश करावा; आणि इण्-व्यतिरिक्त वर्णाच्या पुढील विसर्गाला सकार करावा.

१. (सू. ४९) वैदिक प्रयोगामध्यें विसर्गाला विकल्पानें सकार आदेश होतो कवर्ग किंवा पवर्ग पुढें असतांना; मात्र तो कवर्ग किंवा पवर्ग प्र अथवा आम्रेडित या शब्दांतील नसावा.

१. (सू. ५०) कः, करत्, करति, कृधि, आणि कृत हे शब्द पुढें असतांना विसर्गाला सकार आदेश वेदामध्यें होतो; पण तो विसर्ग अदिति या शब्दाच्या पुढील नसावा.

१. (सू. ५१) वेदामध्यें पञ्चमी विभक्तीच्या विसर्गाला सकार आदेश होतो, उपरि (वर) या अर्थाला दाखविणारा परि शब्द पुढें असतांना.

१. (सू. ५२) वेदामध्यें पा धातु पुढें असतांना पञ्चमीच्या विसर्गाला बहुतकरून सकार आदेश होतो.

१. (सू. ५३) वेदामध्यें षष्ठी विभक्तीच्या विसर्गाला सकार आदेश होतो पति, पुत्र, पृष्ठ, पार, पद, पयस्, आणि पोष यांपैकी कोणताही शब्द पुढें असतांना.

१. (सू. ५४) वेदामध्यें इडा शब्दाच्या पुढील षष्ठीच्या विसर्गाला विकल्पानें सकार आदेश होतो पति, पुत्र वगैरे वरील सात शब्दांपैकीं कोणताही शब्द पुढें असतांना.

१. (सू. ५५) हें अधिकार सूत्र आहे. येथून पुढें अध्याय संपेपर्यंत अपदान्तस्य व मूर्धन्यः हीं दोन पदें चालू आहेत असें समजावें. अर्थात् पदस्य हा अधिकार येथून बंद झाला.

वर्तते । क प्रकृतम् । इणः षः [ ८. ३. ३९ ] इति ॥ नैवं शक्यम् । अवश्यं मूर्धन्यग्रहणं कर्तव्यमिहार्थमुत्तरार्थं च । इहार्थं तावत् । इणः षीध्वंलुङ्लिटां धोऽङ्गात् [ ८. ३. ७८ ] इत्यत्र मूर्धन्यग्रहणं न कर्तव्यं भवति । उत्तरार्थं च । रषाभ्यां नो णः समानपदे [ ८. ४. १ ] इत्यत्र णकारग्रहणं न कर्तव्यं भवति । तत्रायमप्यर्थः पदान्तस्य नेति प्रतिषेधो न वक्तव्यो भवति । अपदान्ताभिसंबद्धं मूर्धन्यग्रहणमनुवर्तते ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्येऽष्टमस्याध्यायस्य तृतीये पादे प्रथममाह्निकम् ॥

षः असें मागें पद कोठें आहे ?

'इणः षः' या सूत्रामध्यें षः असें पद आहे.

असें करणें शक्य नाहीं. या सूत्रामध्यें मूर्धन्यः असें पद अवश्य घातलेंच पाहिजे. कारण त्याचा ह्या प्रकरणांतही उपयोग आहे, आणि पुढील प्रकरणांतही उपयोग आहे. त्यांपैकीं ह्या प्रकरणात उपयोग आहे तो असा— येथें मूर्धन्यः असें म्हटलें म्हणजे 'इणः षीध्वंलुङ्लिटां धोऽङ्गात्' ( ८।३।७८ ) या सूत्रामध्यें मूर्धन्यः असें म्हणावयास नको; नाहीं तर तेथें मूर्धन्यः असें म्हणावें लागेल. तसेंच पुढील प्रकरणातही त्याचा उपयोग आहे तो असा— 'रषाभ्यां नो णः समानपदे' (८।४।१) या सूत्रामध्यें मूर्धन्यः या पदाच्या अनुवृत्तीनें काम भागत असल्यामुळें तेथें णः असें जें म्हटलें आहे तें म्हणावयास नको. शिवाय, असें करण्यांत आणखीही एक गोष्ट साधते, ती ही कीं—'पदान्तस्य' ( ८।४।३७ ) या सूत्रानें पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराला जो णत्वाचा निषेध सांगितला आहे तो सांगावयास नको. कारण येथून जें मूर्धन्यः असें पद अनुवृत्त होत आहे तें अपदान्तस्य या पदानें संबद्ध[२] असेंच अनुवृत्त होत आहे. तेव्हां अर्थातच पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराला णत्वाची प्राप्तीच येत नाहीं.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील आठव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाचें पहिलें आह्निक समाप्त झालें.

२. तेव्हां रेफ अथवा षकाराच्या पुढें असलेल्या व पदाच्या शेवटीं नसलेल्या नकाराला मूर्धन्य आदेश होतो, असा 'रषाभ्यां नो णः' (८।४।१) याचा अर्थ झाल्यानें अर्थातच पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराला णत्वाची प्राप्तीच येत नाहीं; व त्यामुळें 'पदान्तस्य' हें सूत्रही करावयास लागत नसल्यानें लाघव होतें.

अध्याय ८ पाद ३ आह्निक १ समाप्त.

**सहेः साडः सः ॥ ८ । ३ । ५६ ॥**

सग्रहणं किमर्थं न सहेः साडो मूर्धन्यो भवतीत्येवोच्येत । सहेः साडो मूर्धन्यो भवतीत्युच्यमानेऽन्त्यस्य प्रसज्येत । ननु चान्त्यस्य मूर्धन्यवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वा सकारस्य भविष्यति । कुतो नु खल्वेतदनन्त्यार्थ आरम्भे सकारस्य भविष्यति न पुनराकारस्य स्यात् । स्थानेऽन्तरतमो भवतीति सकारस्य भविष्यति । भवेत्प्रकृतितोऽन्तरतमनिर्वृत्तौ सत्यां सिद्धं स्यात् । आदेशतस्त्वन्तरतमनिर्वृत्तौ सत्यामाकारस्य प्रसज्येत । तस्मात्सकारग्रहणं

( सू. ५६ ) या सूत्रामध्यें सकाराला असें कशाकरितां म्हटलें आहे ? तसें म्हणावयास नको. सह् धातूचें जें साड् असें रूप त्याला मूर्धन्य आदेश होतो इतकेंच म्हणावें.

सह् धातूचें जें साड् रूप त्याला मूर्धन्य आदेश होतो असें म्हटलें असतां त्याच्या अन्त्याला म्हणजे डकाराला हा मूर्धन्य आदेश होऊं लागेल.

पण हा दोष येत नाहीं. कारण अन्त्याला म्हणजे डकाराला मूर्धन्य होतो असें म्हटलें असतां डकारच आदेश होईल. तेव्हां अर्थातच डकाराला डकारच आदेश करण्याचा कांहीं उपयोग नाहीं म्हणून तो मूर्धन्य आदेश सकाराला होईल.

पण असें कशावरून समजावें ? कारण अन्त्याला म्ह० डकाराला डकार करण्याचा कांहीं उपयोग नाहीं म्हणून अर्थात् अन्त्याशिवाय मागील वर्णाला हा मूर्धन्य आदेश होईल. पण तो मूर्धन्य आदेश सकारालाच होईल आणि आकाराला न होईल असे कशावरून समजावें ?

' स्थानेऽन्तरतमः ' ( १।१।५० ) या परिभाषेनें हा मूर्धन्य आदेश आकाराला न होतां सकारालाच होईल.

हें म्हणणें बरोबर नाहीं. ' कारण स्थानेऽन्तरतमः या परिभाषेनें एका आदेशाला उपस्थित झालेल्या अनेक स्थानींपैकीं योग्य स्थानी निवडून त्यालाच तो आदेश करावा ' असा पक्ष[2] घेतला असतां हें सिद्ध होईल. परंतु ' एका स्थानीला अनेक आदेश उपस्थित होतील तेव्हां त्यांपैकीं आपल्याला कोण योग्य आहे अशा एका आदेशाची निवड करून तोच तेथें आदेश करावा[3] ' असा त्या परिभाषेचा अर्थ

---

१. ( सू. ५६ ) सह् धातूपासून बनलेला जो साड् हा शब्द त्याच्या सकाराला मूर्धन्य आदेश होतो.

२. ' स्थानेऽन्तरतम उरण् रपरः ' अशा रीतीनें सर्व अष्टाध्यायीचा मूळचा संहिता ( जोडून ) पाठ आहे. असें असतां अन्तरतम या शब्दावर सूत्र तोडावयाचें असतां हा सांधा दोन तऱ्हेनें उकलतां येतो. तो असा- एक ' अन्तरतमे उरण् ' असा, व दुसरा ' अन्तरतमः उरण् ' असा. म्हणजे सप्तम्यन्त किंवा प्रथमान्त अशा अन्तरतम शब्दावर सूत्र तुटतें. तेथें सप्तम्यन्त पक्षीं ' षष्ठी स्थाने० ' या सूत्रांतून षष्ठी या पदाची येथें अनुवृत्ति करावयाची. तिष्ठन्ति अस्मिन् अशा अधिकरण-व्युत्पत्तीनें स्थानशब्द स्थानी या अर्थाला दाखवितो. तेव्हां अन्तरतम अशा स्थानीचे ठिकाणीं षष्ठीचा संबंध करावा. अर्थात् होणाऱ्या आदेशाला अनुरूप असा जो स्थानी तेथेंच आदेश करावा असा या परिभाषेचा अर्थ झाल्यानें हा पक्ष संभवतो. यालाच ' प्रकृतितोऽन्तरतमनिर्वृत्ति ' पक्ष म्हणतात.

३. प्रथमान्तपाठपक्षीं स्थाने या शब्दाचा प्रसंग असा अर्थ. प्रसंग म्हणजे एकाचे ठिकाणीं अनेकांची प्राप्ति असणें. तेव्हां एका स्थानीचें ठिकाणीं अनेक आदेश प्राप्त झाले असतां त्या आदेशांपैकीं स्थानीला अनुरूप जो आदेश तोच करावा असा या परिभाषेचा अर्थ होत असल्यामुळें हा पक्ष संभवतो. यालाच ' आदेशतोऽन्तरतमनिर्वृत्ति ' पक्ष म्हणतात.

कर्तव्यम् ॥ उत्तरार्थं च सकारग्रहणं क्रियते । आदेशप्रत्ययथोः [ ५९ ] सकारस्य यथा स्यात् । इह मा भूत् । चितम् स्तुतम् ॥

अथ सहिग्रहणं किमर्थं न साडः सो भवतीत्येवोच्येत । सहेरेव साड्रूपं भवति नान्यस्य । यद्येवं

**साडः षत्वे समानशब्दप्रतिषेधः ॥१॥**

साडः षत्वे समानशब्दानां प्रतिषेधो वक्तव्यः । साडो दण्डः । साडो वृश्चिक इति ॥ अर्थवद्ग्रहणात्सिद्धम् । अर्थवतः साड्शब्दस्य ग्रहणं न चैषोऽर्थवान् ।

**अर्थवद्ग्रहणात्सिद्धमिति चेत्तद्धितलोपेऽर्थवत्त्वात्प्रतिषेधः ॥ २ ॥**

अर्थवद्ग्रहणात्सिद्धमिति चेत्तद्धितलोपेऽर्थवत्त्वात्प्रतिषेधो वक्तव्यः । सहाडेन साडः साडस्यापत्यं साडिः अत्र प्राप्नोति ॥ न

---

मानला असतां साड् येथें आकाराला मूर्धन्य आदेश होऊं लागेल; तो न व्हावा याकरितां सकाराला असें म्हटलें पाहिजे.

शिवाय पुढें अनुवृत्ति होण्याकरितांही येथें सकाराला असें म्हटलें पाहिजे. ' आदेशप्रत्ययो: ' ( ८।३।५९ ) या सूत्रानें सांगितलेला मूर्धन्य आदेश सकारालाच झाला पाहिजे. चितम् स्तुतम् या उदाहरणांमध्यें तकाराला होऊं नये.

आता या सूत्रामध्यें ' सह् धातूचें ' असें कशाकरितां म्हटले आहे ? तसें म्हणावयास नको. साड् याच्या सकाराला मूर्धन्य आदेश होतो इतकेंच म्हणावें. कारण साड् असें रूप सह् धातूपासूनच होतें. इतरापासून होत नाहीं.

(वा.१) जर साड् याच्या सकाराला सत्व होतें असें म्हटलें तर याच्या सारखाच जो साड् असा दुसऱ्या एकाद्या शब्दाचा भाग त्याच्या सकाराला मूर्धन्य आदेश होत नाहीं असें म्हटलें पाहिजे. उदा०—साडो दण्डः, साडो वृश्चिकः.

(वा.२) अर्थयुक्त असें जें साड् असें रूप तेंच येथें घेतलें जातें आणि साडो दण्डः, साडो वृश्चिकः या उदाहरणांमध्यें साड हा अकारान्त शब्द अर्थवान् आहे. अकार सोडून त्याच्या मागील जो साड् हा भाग त्याला तेथे कांहीं अर्थ नाहीं; म्हणून प्रकृत सूत्राने तेथे सकाराला मूर्धन्य आदेश होणार नाहीं.

अशा रीतीनें तें उदाहरण साधतें असें म्हणाल तर तद्धित प्रत्यय पुढे असताना त्या अकाराचा लोप झाला म्हणजे साड् हा भाग अर्थवान् होतो. तेव्हा तेथें सकाराला मूर्धन्य आदेश होत नाहीं असें म्हणावें लागेल. उदा०-अडेन सह इति साडः, साडस्यापत्यं साडिः; या ठिकाणीं सह शब्दाचा अड शब्दाबरोबर समास करून सहशब्दाला स आदेश केल्यानंतर एकादेश करून साड असा शब्द सिद्ध होतो. त्याच्या पुढें अपत्यार्थी ' अत इञ् ' ( ४।१।९५ ) या सूत्रानें इञ् प्रत्यय केला असतां मागच्या अकाराचा ' यस्येति च ' ( ६।४।१४८ ) या सूत्रानें लोप झालेला आहे. तेव्हां इञ् प्रत्ययाच्या मागील साड् या शब्दांतील सकाराला मूर्धन्य आदेश होऊं लागेल. त्याचा निषेध सांगितला पाहिजे.

तसा निषेध सांगावयास नको. कारण 'षत्वतुकोरसिद्धः ' ( ६।१।८६ ) या सूत्रानें षत्व

---

४. ' इण् किंवा कवर्ग यांच्या पुढील आदेशरूप किंवा प्रत्ययाचा अवयव अशा वर्णाला मूर्धन्य आदेश होतो असा ' आदेशप्रत्यययोः '. या सूत्राचा अर्थ झाल्यामुळें चितम् स्तुतम् वगैरे उदाहरणांमध्यें तकाराला टकार आदेश होऊं लागेल असा दोष येईल.

५. अडेन सहितः साडः वृश्चिकः. विंचवाच्या नांगीला ' अड ' असें नांव आहे.

वक्तव्यः । षत्वतुकोरेकादेशस्यासिद्धत्वान्नैष साङ्शब्दः ॥ एवमपि सह डेन सडः सडस्यापत्यं साडिः अत्र प्राप्नोति । तस्मात्सहिग्रहणं कर्तव्यम् ॥

इण्कोः ॥ ८ । ३ । ५७ ॥

नुम्विसर्जनीयशर्व्यवायेऽपि ॥ ८ । ३ । ५८ ॥

नुम्विसर्जनीयशर्व्यवाये निंसेः प्रतिषेधः ॥ १ ॥

नुम्विसर्जनीयशर्व्यवाये निंसेः प्रतिषेधो वक्तव्यः निंस्से निंस्स्वेति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नुमैव व्यवाये विसर्जनीयेनैव व्यवाये शरैव व्यवाय इति । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिर्दृष्टेति । तद्यथा । गुणवृद्धिसंज्ञे प्रत्येकं भवतः ।

---

किंवा तुगागम कर्तव्य असतांना एकादेश असिद्ध होतो, असें सागितलें आहे. तेव्हां स आणि अड या दोहोंचा संधि होऊन झालेला जो आ हा दीर्घ एकादेश तो असिद्ध असल्यामुळें षत्वाच्या दृष्टीनें स अड असें रूप दिसतें साङ् असें रूप दिसत नाहीं. त्यामुळें हा दोष येत नाहीं.

तरी पण दुसरीकडे दोष येतोच. उदा०— सह डेन सडः, सडस्यापत्यं साडिः. येथें सह शब्दाचा अड शब्दाबरोबर समास न करतां ड शब्दाबरोबर समास केला आहे. त्यामुळें येथें एकादेश झालेलाच नाहीं. तेव्हां येथें साड् यांतील सकाराला प्रकृत सूत्रानें मूर्धन्य आदेश प्राप्त होतो तो न होण्याकरिता प्रकृत सूत्रामध्यें सहेः असें म्हटलें पाहिजे.

(सू.५८ वा. १ ) नुम् विसर्ग आणि शर् यांनीं व्यवधान असतांना जें हें सकाराला षत्व सांगितलें आहे तें निंस् धातुच्या पुढील सकाराला होत नाहीं असें म्हणावें. उदा०— निंस्से, निंस्स्व.

तर मग या उदाहरणांकरितां तसा निषेध सांगावयास पाहिजे.

तसा निषेध सांगावयास नको. कारण एकट्या नुमानेंच व्यवधान असतांना किंवा एकट्या विसर्गानेंच व्यवधान असतांना अथवा एकट्या शरानेंच व्यवधान असतांना यानें षत्व होत असतें. आणि वरील उदाहरणांमध्यें नुम् आणि शर् अशा दोहोंनीं व्यवधान आहे.

हें असें कसें म्हणतां येतें ? असें म्हणू नये. कारण सूत्रामध्यें तशा अर्थाचा कांहीं शब्द नसतांना तसा विशेष अर्थ येथें कसा घेतां येईल ?

अशावरून घेतां येईल कीं वाक्यामध्यें अधिकांना उद्देशून जी एकादी गोष्ट सांगितलेली असते तिचें पर्यवसान त्यांतील प्रत्येकाचे ठिकाणीं झालेलें दृष्टीस पडतें. उदा०— गुण संज्ञा अ ए ओ या तीन वर्णांना पाणिनीनें सांगितली आहे ( १।१।२ ). ती संज्ञा प्रत्येकाला होते. तसेंच

---

१. ( सू. ५७ ) हें अधिकार सूत्र आहे म्हणून येथून पुढील दरषक सूत्रामध्यें ‘ इण्कोः ’ हें पद उपस्थित होतें.

१. ( सू. ५८ ) नुम् आणि शर् यांपैकीं प्रत्येकानें व्यवधान असतांनाही इण् किंवा कवर्ग यांच्या पुढील सकाराला मूर्धन्य आदेश होतो.

ननु चायमप्यस्ति दृष्टान्तः समुदाये वाक्यपरिसमाप्तिः । तद्यथा । गर्गाः शतं दण्ड्यन्ताम् । अर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति न च प्रत्येकं दण्डयन्ति ॥ एवं तर्हि

**योगविभागात्सिद्धम् ॥ २ ॥**

योगविभागः करिष्यते । नुम्व्यवाये । ततो विसर्जनीयव्यवाये । ततः शर्व्यवाये ॥ स तर्हि योगविभागः कर्तव्यः । न कर्तव्यः । प्रत्येकं व्यवायशब्दः परिसमाप्यते ॥

## आदेशप्रत्यययोः ॥ ८।३।५९ ॥

**आदेशप्रत्यययोः षत्वे सरकः प्रतिषेधः ॥ १ ॥**

वृद्धि संज्ञा ( १।१।१ ) आ ऐ आणि औ या तीन वर्णांना सांगितलेली प्रत्येकाला होत असते.

पण याच्या उलट दुसऱ्या तऱ्हेचाही दृष्टान्त सापडतो कीं वाक्यामध्यें जी गोष्ट अनेकांना सांगितलेली असते तिचें पर्यवसान त्या सर्व अनेकांचे ठिकाणीं मिळून झालेलें दृष्टीस पडतें. उदा०- गर्गांच्या कडून १०० रुपये दंड घ्यावा असें म्हटलें असता त्या सर्व गर्गांच्या कडून मिळून १०० रु दंड घेतला जातो राजेलोक द्रव्याविषयीं फार लोभी असतात तरी पण त्या प्रत्येक गर्गांकडून शंभर रुपये दंड घेतला जात नाहीं.[3]

(वा.२) तर मग आतां या सूत्राचा निराळ्या तऱ्हेचा विभाग करून हे काम भागवितों. तो सूत्राचा विभाग असा: – नुमानें व्यवधान असतांना षत्व होतें. त्यानतर दुसरें सूत्रः– विसर्गानें व्यवधान असतांना षत्व होतें. त्यानतर तिसरें सूत्रः– शरानें व्यवधान असतांना षत्व होतें[4]

तर मग अशा तऱ्हेचा सूत्राचा विभाग म्ह० तीन सूत्रें केलीं पाहिजेत. तशीं निराळीं तीन सूत्रें करावयास नकोत. कारण सूत्रामध्यें जो व्यवाय शब्द आहे म्ह० व्यवधान असा शब्द आहे त्याच्याशीं नुम् विसर्ग आणि शर् या प्रत्येकाचा संबंध करतों. म्हणजे इच्छितार्थ साधेल.

(वा.१) आदेश आणि प्रत्यय यांच्या सकाराला जें हें षत्व सांगितलें आहे तें सरक् प्रत्ययाच्या प्रसक्त होत आहे.

२. तेव्हां सूत्रामध्यें नुम् विसर्ग आणि शर् यांनीं व्यवधान असतांना असें म्हटलें असलें तरी प्रत्येकानेंच व्यवधान असतांना षत्व होतें असें समजल्यामुळें नुम् आणि शर् या उभयतांनीं व्यवधान असल्यामुळें निंस् धातूच्या पुढील सकाराला षत्व होणार नाहीं. ' णिसि चुम्बने ' ' णो नः ' यानें णकाराला नकार. इदित्त्वास्तव नुम् आगम. ' अनुदात्तङित: ' यानें आत्मनेपद. लोण्मध्यमपुरुषैकवचन थास् . थासाला से. ' सवाभ्यां वामौ ' यानें एकाराला वकार. निन्स्स्व असें असतां ' नश्चापदान्तस्य० ' यानें नकाराला अनुस्वार केला असतां निंस्स्व असें रूप होतें.

३. नुम् विसर्ग आणि शर् या सर्व वर्णांनीं एकदम व्यवधान संभवत नसल्यामुळें क्वचित् स्थलीं एकानें व क्वचित् स्थलीं दोन तीन वगैरेंनीं व्यवधान असतांना—गर्गशतदंडनन्यायाला अनुसरून निंस्स्व येथें षत्व

४. योगविभाग केला असतां दोन तीन वगैरेंनीं व्यवधान असतां षत्व होणार नाहीं असें समजलें जातें. नाहीं तर योगविभागानें निरनिराळीं तीन सूत्रें करून एका एकानें व्यवधान सांगण्यांत कांहीं अर्थ रहात नाहीं.

५. लक्ष्यानुरोधानें सूत्राचा अर्थ नक्की ठरवावयाचा असल्यामुळें आणि एकेकानेंच व्यवहित असें लक्ष्य दृष्टीस पडत असल्यामुळें या सामुदायिक वाक्यावरून लक्ष्यसंस्कारक अशीं तीन वाक्यें कल्पावयाचीं. म्हणजे ' प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः ' हाच न्याय येथें लागू करावयाचा.

१. ( सू. ५९ ) इण् किंवा कवर्ग यांच्या पुढें असलेला आणि पदाच्या शेवटीं नसलेला आदेशरूप किंवा प्रत्ययाचा अवयव असा जो सकार त्याला मूर्धन्य आदेश होतो.

आदेशप्रत्यययोः षत्वे सरकः प्रतिषेधो वक्तव्यः । कुसरः धूसरः ॥ अत्यल्पमिदमुच्यते सरक इति । सरगादीनामिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । वर्सम् तर्समिति ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि । न वा एतत्षत्वे शक्यं विज्ञातुमुणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानीति । इह हि न स्यात् । सर्पिषः यजुष इति ॥ एवं तर्हि

**बहुलवचनात्सिद्धम् ॥ २ ॥**

बहुलं प्रत्ययसंज्ञा भवति ॥

किं पुनरियमवयवषष्ठी । आदेशस्य यः सकारः प्रत्ययस्य यः सकार इति । आहोस्वित्समानाधिकरणा । आदेशो यः सकारः प्रत्ययो यः सकार इति । कश्चात्र विशेषः ।

**आदेशप्रत्यययोरित्यवयवषष्ठी चेद् द्विर्वचने प्रतिषेधः ॥ ३ ॥**

आदेशप्रत्यययोरित्यवयवषष्ठी चेद् द्विर्वचने प्रतिषेधो वक्तव्यः । बिसं बिसम् मुसलं मुसलम् ॥

---

सकाराला होत नाहीं असें म्हणावें. उ. कुसरः[२], धूसरः. सरक् प्रत्ययाच्या सकाराला निषेध सांगावा म्हणून हे जें म्हणत आहां तें फारच थोडें आहे. कारण सरक् वगैरे बऱ्याच प्रत्ययाच्या सकाराला षत्व होत नाहीं असें म्हटलें पाहिजे. वर्सम्[३] तर्सम् या ठिकाणीं देखील सकाराला षत्वाचा निषेध झाला पाहिजे.

तर मग तशा तऱ्हेचें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. उणादि प्रत्यय लागून सिद्ध होणारे असे गृहीत धरलेले जे शब्द ते अखंडच आहेत. म्हणजे त्यांमध्यें अमुक धातु आणि अमुक प्रत्यय अशी कल्पना करण्याचें कारण नाहीं.

उणादि प्रत्यय लागून सिद्ध होणारे असे गृहीत धरलेले जे शब्द ते अखंडच आहेत म्ह० त्यांमध्यें अमुक धातु आणि अमुक प्रत्यय अशी कल्पना करण्याचें कारण नाहीं ही गोष्ट षत्व कर्तव्य असतांना गृहीत धरणें शक्य नाहीं. कारण तसें मानलें तर सर्पिषः[४] यजुषः या उदाहरणांमध्यें सकाराला षत्व होणार नाहीं.

(वा. २) तर मग हें सर्व बहुलम् म्हणण्यानें सिद्ध होतें. प्रत्यय ही संज्ञा बाहुल्येकरून होते. म्हणजे जेथें षत्व पाहिजे असेल तेथें ती संज्ञा आहे, असें गृहीत धरावें. आणि जेथें षत्व नको असेल तेथें ती संज्ञा नाहीं असें समजावें.

आतां या सूत्रामध्यें आदेशप्रत्यय या शब्दाच्या पुढें जी षष्ठी विभक्ति लावली आहे ती अवयव या अर्थाला दाखविणारी आहे म्हणजे आदेशाचा अवयव जो सकार आणि प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याला षत्व होतें असा अर्थ होतो, किंवा ती षष्ठी अभेद या अर्थाला दाखविणारी आहे अशी ती षष्ठी समजावी म्हणजे आदेशरूप आणि प्रत्ययरूप जो सकार त्याला षत्व होतें असा वाक्यार्थ होतो ?

या दोन अर्थांमध्यें काय बरें फरक आहे ?

(वा. ३) आदेशप्रत्यय या शब्दाच्या पुढील षष्ठी अवयव या अर्थाला दाखविणारी आहे असें म्हटलें तर द्वित्वानें एका शब्दाला दोन शब्द अशा तऱ्हेचा आदेश केला असतांना तेथें

---

२. कृधूमदिभ्यः कित् ( उ. ३।७३ ) यानें कृ व धू या धातूंपुढें सर प्रत्यय.

३. वृतॄवदिहनिकमिकषिभ्यः सः ( उ. ३।६२ ) यानें स प्रत्यय.

४. 'अर्चिशुचिहुसृपि०' ( उ. २।१०८ ) 'अर्तिपृवपियजि०' ( उ. २।११७ ) या सूत्रांनीं क्रमानें इस् व उस् प्रत्यय.

**समानाधिकरणानां चाप्राप्तिः ॥ ४ ॥**

समानाधिकरणानां च षत्वस्याप्राप्तिः। एषः अकार्षीत् ॥

अस्तु तर्हि समानाधिकरणा। यदि समानाधिकरणा सिषेच सुष्वाप अत्र न प्राप्नोति। न धातुद्विर्वचने स्थानेद्विर्वचनं शक्यमास्थातुम्। इहापि तर्हि प्रसज्येत सरीसृप्यत इति। तस्मात्तत्र द्विःप्रयोगो द्विर्वचनम्। इह तर्हि करिष्यति हरिष्यति प्रत्ययो यः सकार इति षत्वं न प्राप्नोति ॥

अस्तु तर्ह्यादेशो यः सकारः प्रत्ययस्य यः

---

सकाराला षत्व होत नाहीं असें म्हणावें लागेल. उदा० बिसं बिसम्; मुसलं मुसलम्.

(वा.४) आणि जेथें आदेशरूप आणि प्रत्ययरूप सकार असेल त्या ठिकाणीं सकाराला षत्व होणार नाहीं. उदा०–एषः, अकार्षीत्.

आदेशप्रत्यय या पदापुढील षष्ठी समानाधिकरण म्हणजे अभेद दाखविणारीच असूं दे.

पण तशी अभेद दाखविणारी षष्ठी घेतली असतां सिषेच व सुष्वाप या ठिकाणीं षत्व होणार नाहीं. कारण सिच् व स्वप् यांना सिच् सिच् व स्वप् स्वप् असे द्वित्वानें आदेश होत असल्यामुळे त्यांतील सकाराला आदेशाचा अवयव असें म्हणतां येईल. आदेशरूप असें म्हणतां येणार नाहीं.

पण धातूला जें द्वित्व सांगितलें आहे त्या ठिकाणीं स्थानेद्विर्वचन म्हणजे एकाचे स्थानीं दोन मिळून आदेश होतो असें मानणें शक्य नाहीं. कारण तसें घेतलें असता कदाचित् अवयवार्थाला षष्ठी दाखविणारी आहे असें समजून सिषेच व सुष्वाप हीं उदाहरणें साधलीं तर त्या प्रमाणेंच सरीसृप्यते या उदाहरणामध्यें देखील सकाराला षत्व होऊं लागेल. तेव्हां धातूला जें द्वित्व सांगितलें आहे तें स्थानेद्विर्वचन नव्हे, तर त्या ठिकाणीं पूर्वी जें सिच् असें एकदां उच्चारलें असेल त्याच्या पुढें तसेंच दुसऱ्यानदां सिच् असें उच्चारावयाचें, अशा प्रकारचेंच तें द्वित्व आहे.

तर मग अभेद या अर्थाला दाखविणारी षष्ठी मानली असतां प्रत्ययरूप जो सकार त्याला षत्व होतें असा अर्थ होत असल्यामुळें करिष्यति हरिष्यति या उदाहरणांमध्यें षत्व होणार नाहीं.

तर मग आतां एकीकडे अवयवार्थाला दाखविणारी षष्ठी आणि दुसरीकडे अभेद या

---

५. आष्टमिक द्विर्वचनाविषयीं स्थानेद्विर्वचन-(आदेश–) पक्षही सांगितला असल्यामुळें 'नित्यवीप्सयोः' (८।१।४) या सूत्रानें बिसं या पदाचे स्थानीं बिसं बिसं असा समुदाय आदेश केला असल्यामुळें सकार हा आदेशाचा अवयव होत आहे. तेव्हां त्याला षत्वाचा प्रसंग येतो.

६. एतद्–स् असें असतां अत्व. 'तदोः सः सौ०' (७।२।१०६) यानें सकार आदेश केला आहे. तो आदेशरूप आहे; आदेशाचा अवयव नव्हे. तसेंच अकार्षीत् येथें च्लि प्रत्ययाचे स्थानीं सिच् केला असतां तो सकार प्रत्ययरूप किंवा आदेशरूप आहे; आदेशाचा किंवा प्रत्ययाचा अवयव नव्हे.

७. स्थानेद्विर्वचन पक्ष घेतला असतां सिषेच वगैरे स्थलीचा इणाच्या पुढील सकार आदेशाचा अवयव होत आहे; आदेशरूप नव्हे. म्हणून षत्व होणार नाहीं.

८. 'सृप्लृ गतौ,' 'धातोरेकाचो हलादेः०' (३।१।२२) या सूत्रानें यङ्. 'सन्यङोः' (६।१।९) यानें द्वित्व. 'रीगृदुपधस्य च' (७।४।९०) यानें अभ्यासाला रीक् आगम झाला आहे.

९. तेव्हां सिषेच इत्यादि स्थलीं 'धात्वादेः षः सः' (६।१।६४) यानें झालेल्या आदेशरूपी सकाराला षत्व साधतें. पण सरीसृप्यते येथें सृप् धातूचा मूळचाच तो सकार आहे; तो आदेशरूप नाहीं; त्यामुळें समानाधिकरणषष्ठीपक्षीं तेथें षत्व होत नाहीं.

सकार इति । इह तर्हि अकार्षीत् प्रत्ययस्य यः सकार इति षत्वं न प्राप्नोति । मा भूदेवमादेशो यः सकार इत्येवं भविष्यति ॥ इह तर्हि जोषिषत् (ऋ.सं. २.३५.१) मन्दिषदिति प्रत्ययस्य यः सकार इति षत्वं न प्राप्नोति । एषोऽपीटि कृते प्रत्ययस्य सकारः ॥ इह तर्हि इन्द्रो मा वक्षत् स देवान्यक्षत् ॥

**नानाविभक्तीनां च समासानुपपत्तिः ॥ ५ ॥**

नानाविभक्तीनां च समासो नोपपद्यत आदेशप्रत्यययोरिति ॥

**योगविभागात्सिद्धम् ॥ ६ ॥**

योगविभागः करिष्यते । आदेशस्य षो भवतीति । ततः प्रत्ययसकारस्य षो भवतीति ॥

---

अर्थाला दाखविणारी षष्ठी घेऊन आदेशरूप जो सकार आणि प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याला षत्व होतें असा वाक्यार्थ होऊं दे, म्हणजे कांहीं दोष येणार नाहीं.

असें केलें तर अकार्षीत् या उदाहरणामध्यें प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याला सांगितलेलें षत्व प्राप्त होणार नाहीं; कारण हा सकार प्रत्ययरूप आहे.

येथें प्रत्ययाचा अवयव सकार नाहीं म्हणून षत्व नाहीं झालें तरी हरकत नाहीं. कारण सिच् हा प्रत्यय च्लि प्रत्ययाचे स्थानीं आदेश होत असल्यामुळें तो आदेशरूपी सकार आहे असें समजून त्याला षत्व करतां येईल.

तर मग जोषिषत्[10] मन्दिषत् या उदाहरणांमध्यें प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याला सांगितलेलें षत्व प्राप्त होत नाहीं. कारण येथे मध्यें सिप् हा विकरण प्रत्यय केला असल्यामुळें हा सकार प्रत्ययरूप आहे. प्रत्ययाचा अवयव होत नाहीं.

परंतु येथें त्या सिप् प्रत्ययाला इट् आगम केल्यानंतर इस् एवढा प्रत्यय होतो. आणि त्यामुळें त्या सकाराला प्रत्ययाचा अवयव असें म्हणतां येतें.

तर मग जेथें इट् आगम होत नाहीं अशा म्हणजे इन्द्रो मा वक्षत्[11], स देवान् यक्षत् या उदाहरणांमध्यें प्रत्ययाचा अवयव सकार नसल्यामुळें त्याला षत्व होणार नाहीं असा दोष येतो.

(वा.५) शिवाय षष्ठी विभक्ति ही आदेश या पदाकडे अभेद या अर्थाला दाखविणारी आहे. आणि प्रत्ययाकडे अवयव या अर्थाला दाखणारी आहे. अशा रीतीनें येथें षष्ठी विभक्ति निरनिराळी होत असल्यामुळें 'आदेशप्रत्यययोः' असा द्वंद्व समास होणार[12] नाहीं.

(वा. ६) हे दोष जाण्याकरितां सूत्राचा विभाग करतों. तो असा कीं—'आदेशस्य' हें एक सूत्र समजावें. 'आदेशरूपी जो सकार त्याला षत्व होतें' असा त्याचा अर्थ समजावा. त्यानंतर 'प्रत्ययस्य' असें दुसरें सूत्र समजावें. 'प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याला षत्व होतें' असा त्याचा अर्थ समजावा.

---

१०. 'जुषी प्रीतिसेवनयोः.' याहून लेट् प्रत्यय. व्यत्ययानें परस्मैपद. तिप्. 'इतश्च लोपः०' (३।४।९७) यानें इकारलोप. 'लेटोऽडाटौ' (३।४।९४) यानें अट् आगम. 'सिब्बहुलम्०' (३।१।३४) यानें सिप्. त्याला इट् आगम. लघूपधगुण. प्रकृत सूत्रानें सकाराला षत्व. अशा रीतीनें जोषिषत् असें रूप तयार होतें.

११. वच् आणि यज्. धातू. त्यांहून लेट्. तिप्. इकाराचा लोप. 'लेटोऽडाटौ' (३।४।९४) यानें अडागम. सिप्. प्रकृत सूत्रानें षत्व. अशा रीतीनें वक्षत् व यक्षत् अशीं रूपें होतात

१२. कारण अनेक सुबन्तांचा एका रूपानें एकावर अन्वय असतां त्याला सहविवक्षा म्हणतात. आणि ती सहविवक्षा असतांनाच त्या अनेक सुबन्तांचा द्वंद्व समास होतो. त्याला इतरेतरयोग द्वंद्व असें म्हणतात.

स तर्हि योगविभागः कर्तव्यः । न कर्तव्यः । कथम् । अस्तु तावदवयवषष्ठी । ननु चोक्तमादेशप्रत्यययोरित्यवयवषष्ठी चेद् द्विर्वचने प्रतिषेध इति । नैष दोषः । द्विःप्रयोगो द्विर्वचनम् ॥ यदप्युच्यते समानाधिकरणानां चाप्राप्तिरिति व्यपदेशिवद्भावेन भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु समानाधिकरणा । कथं करिष्यति हरिष्यति । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येवंजातीयकानां षत्वमिति यदयं सात्पदाद्योः [ ८.३.१११ ] इति सात्प्रतिषेधं शास्ति ॥ अथवा पुनरस्त्वादेशो यः सकारः प्रत्ययस्य यः सकार इति । कथमिन्द्रो मा वक्षत् स देवान्यक्षत् । व्यपदेशिवद्भावेन भविष्यति ॥ स तर्हि व्यपदेशिवद्भावो वक्तव्यः । न वक्तव्यः ।

उक्तं वा ॥ ७ ॥

---

तर मग अशा तऱ्हेचीं दोन सूत्र करावयाचीं कीं काय ?

तशीं करावयास नकोत.

पण एक सूत्र केलें तर पूर्वी सांगितलेले दोष येतात त्याची वाट काय ?

त्याची वाट अशी कीं– आदेश आणि प्रत्यय या दोहोंकडेही अवयव या अर्थाला दाखविणारी षष्ठी असूं दे.

पण आदेशप्रत्यययोः ही अवयव या अर्थाला दाखविणारी षष्ठी घेतली तर सरीसृप्यते वगैरे उदाहरणांमध्यें प्राप्त झालेल्या षत्वाचा निषेध केला पाहिजे असें आतांच सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण धातूला होणारें द्वित्व द्विःप्रयोगरूप आहे. आदेशरूप नव्हे असेंही वर सांगितलेंच आहे. तसेंच अवयव या अर्थाला दाखविणारी षष्ठी घेतली असता आदेशरूप आणि प्रत्ययरूप जो सकार त्याला षत्व होणार नाहीं असा जो आतांच दोष दिला आहे तोही दोष येत नाहीं. कारण व्यपदेशिवद्भावानें[१३] तेथें काम भागेल म्ह० प्रत्ययरूप जरी सकार असेल तरी त्याला प्रत्ययाचा अवयव असें समजतां येईल.

अथवा आदेश आणि प्रत्यय या दोन्हीकडे ही अभेद दाखविणारी षष्ठी असूं दे.

तशी घेतली असतां करिष्यति हरिष्यति या उदाहरणांमध्यें षत्व कसें साधावें ?

असें साधावें कीं–हा आचार्य पाणिनि 'सात्पदाद्योः' ( ८।३।१११ ) या सूत्रानें सात् या प्रत्ययाच्या अवयव सकाराला षत्वाचा निषेध सांगतो त्यावरून तो असें सुचवितो कीं अशा तऱ्हेच्या म्ह० सात् प्रत्यायासारख्या प्रत्ययाच्या अवयव अशा सकारांना प्रत्ययरूप सकार आहे असें समजून षत्व होतें.

अथवा आदेशरूप जो सकार आणि प्रत्ययाचा अवयव जो सकार त्याला षत्व होतें असा अर्थ घेतला तरी हरकत नाहीं.

तसा अर्थ घेतला असतां इन्द्रो मा वक्षत्, स देवान् यक्षत् या उदाहरणांमध्यें प्रत्ययरूप सकाराला षत्व कसें होईल ?

प्रत्ययरूप सकाराला व्यपदेशिवद्भावानें प्रत्ययाचा अवयव समजून षत्व करतां येईल.

तर मग तसा व्यपदेशिवद्भाव होतो असें सांगितलें पाहिजे.

तसें सांगावयास नको.

(वा. ७) पूर्वी हें सांगितलेंच आहे.

---

१३. एकट्यालाही मुख्य व्यवहाराचा अतिदेश 'व्यपदेशिवदेकस्मिन्' या परिभाषेनें सांगितला आहे. तेव्हां एकवर्णात्मक प्रत्ययाला व आदेशालाही प्रत्ययाचा व आदेशाचा अवयव असें म्हणतां येत असल्यामुळें एषः, वक्षत् इत्यादि स्थलीं आदेश आणि प्रत्यय या उभयतांकडेही अवयवषष्ठी मानली असतां षत्व करतां येईल.

किमुक्तम् । तत्र व्यपदेशिवद्वचनमेकाचो द्वे प्रथमार्थं षत्वे चादेशसंप्रत्ययार्थम् । अवचनाल्लोकविज्ञानात्सिद्धमिति ॥ यदपि नानाविभक्तीनां च समासानुपपत्तिरित्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानाविभक्त्योरेष समास इति यदयं शासिवसिघसीनां च [८.३.६०] इति घसिग्रहणं करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । यदि ह्यादेशस्य यः सकार इत्येवं स्याद् घसिग्रहणमनर्थकं स्यात् । पश्यति त्वाचार्य आदेशो यः सकारस्तस्य षत्वमिति ततो घसिग्रहणं करोति ॥

## [ शासिवसिघसीनां च ॥ ८ । ३ । ६० ॥ ]

## स्तौतिण्योरेव षण्यभ्यासात् ॥ ८ । ३ । ६१ ॥

स्तौतिणिग्रहणं किमर्थम् । अस्तौतिण्यन्तानां मा भूत् । सिसिक्षति ॥ अथैवकारः किमर्थः । नियमार्थः । स्तौतिण्यन्तानामेव

तें काय सांगितलें आहे ?

तें असें सांगितलें आहे कीं—धातूच्या एकाच् प्रथम भागाला सांगितलेलें द्वित्व फक्त इ या धातूला म्हणजे नुसत्या एक अचालाच द्वित्व झालें पाहिजे. तसेंच आदेशरूप सकाराला आदेशाचा अवयव समजून षत्व झालें पाहिजे. याकरितां व्यपदेशिवद्भाव सांगितला पाहिजे. परंतु तसा सांगितला नाहीं तरी काम भागेल. कारण लोक तसें आपोआपच समजतात[१४].

आतां भिन्न भिन्न अर्थांची दोन ठिकाणीं षष्ठी विभक्ति निरनिराळी होत असल्यामुळें द्वंद्व समास होणार नाहीं असा जो पूर्वी दोष दिला आहे तोही येत नाहीं. कारण हा आचार्य पाणिनि ' शासिवसिघसीनां च ' ( ८।३।६० ) या सूत्रामध्यें अद् धातूला आदेश झालेल्या घस् यांतील सकाराला षत्व करावें म्हणून मुद्दाम सांगतो त्यावरून तो असें सुचवितो कीं—येथें हा द्वंद्व समास निरनिराळ्या अर्थांची षष्ठी असतांनाही केला आहे.

हें ज्ञापक कसें जमतें ?

असे जमवावें कीं—आदेशाचा अवयव जो सकार त्याला षत्व होतें असा जर येथें पाणिनीच्या मनात अर्थ असता तर घस् या आदेशाच्या सकाराला प्रकृत सूत्रानें षत्व सिद्ध होत असल्यामुळें ' शासिवसिघसीनां च ' ( ८।३।६० ) या सूत्रामध्यें घस् हा शब्द फुकट उच्चारला असें होतें. तेव्हा आदेशरूप जो सकार त्याला षत्व होतें असा येथें अर्थ आहे अशा नजरेनेंच आचार्य पाणिनीनें घस् असा शब्द घातला आहे.

( सू. ६१ ) या सूत्रामध्यें स्तौतिण्योः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

स्तु धातु आणि ण्यन्त धातु यांशिवाय इतर धातूच्या सकाराला सन् प्रत्यय पुढें असतांना षत्व होऊं नये म्हणून तसें म्हटलें आहे. उदा०—सिसिक्षति.

आतां या सूत्रामध्यें एव हा शब्द कशाकरितां घातला आहे ? नियम होण्याकरितां एव

---

१४. तीन मुलगे असतां क्रमानें ज्येष्ठ मध्यम व कनिष्ठ असा सरळ होणारा व्यवहार एकच मुलगा असतांही हाच थोरला हाच मधला व हाच धाकटा अशा रीतीनें केल्याबद्दलचा प्रघात लोकांमध्यें दृष्टीस पडतो.

१. ( सू. ६० ) इण् किंवा कवर्ग यांच्या पुढील जो शास्, वस् आणि घस् यांचा सकार त्याला षकार आदेश होतो.

१. ( सू. ६१ ) अभ्यासांतील इणाच्या पुढील सकाराला मूर्धन्य आदेश होतो सकाराचे स्थानीं षकार झालेला सन् प्रत्यय पुढें असतांना. मात्र तो सकार स्तु किंवा ण्यन्त या धातूचाच असला पाहिजे.

२. ' षिच क्षरणे .' धात्वादेः षः सः. सन्. ' सन्यङोः ' यानें द्वित्व. चोः कुः यानें कुत्व. आदेशप्रत्यययोः यानें षत्व. सिसिक्षति.

नान्येषामिति । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धे विधिरारभ्यमाणोऽन्तरेणैवकारकरणं नियमार्थो भविष्यति । इष्टतोऽवधारणार्थस्तर्हि । यथैवं विज्ञायेत स्तौतिण्योरेव षणीति । मैवं विज्ञायि स्तौतिण्योः षण्येवेति । इह न स्यात् तुष्टाव ॥ अथ षणीति किमर्थम् । सेषीव्यते ॥ को विनतेऽनुरोधः । अविनते नियमो मा भूत् । सुषुप्सतीति ॥ कः सानुबन्धेऽनुरोधः । षशब्दमात्रे नियमो मा भूत् । सुषुपिष इन्द्रम् । सुषुपिष इहेति ॥

शब्द घातला आहे. तो नियम असा कीं– धातूहून सन् प्रत्यय केला असतांना त्या धातूच्या सकाराला जर षत्व होईल तर फक्त स्तु धातु आणि ण्यन्त धातु यांच्याच सकाराला षत्व होतें;[३] इतर धातूच्या सकाराला षत्व होत नाहीं.

एव शब्दाचा असा उपयोग सांगणें बरोबर नाहीं. कारण एकादी गोष्ट सिद्ध असतांना जर मुद्दाम पुनः त्या गोष्टीचा विधि केला असेल तर त्या ठिकाणीं अर्थातच तो विधि नियम दाखविण्याकरतां केला असें एव शब्दावांचूनच गृहीत धरतां येतें.

तर मग येथें एव शब्दाचा उपयोग असा कीं–जो नियम होईल तो इष्ट नियम झाला पाहिजे; विपरीत नियम होऊं नये. म्हणजे या सूत्रामध्यें षण् म्हणजे षत्व केलेला सन् प्रत्यय पुढें असतांना स्तु धातु आणि ण्यन्त धातु यांच्याच फक्त सकाराला षत्व होतें असा नियम झाला पाहिजे. विपरीत नियम म्हणजे– स्तु धातु आणि ण्यन्त धातु यांच्या सकाराला जर षत्व कर्तव्य असेल तर षण् पुढें असतांनाच करावें तुष्टाव वगैरे ठिकाणीं करूं नये असा नियम येथें न झाला पाहिजे. कारण तसा विपरीत नियम केला असतां तुष्टाव[४] वगैरे उदाहरणांमध्यें षत्व होणार नाहीं.

आतां या सूत्रामध्यें षणि असें कशाकरितां म्हटलें आहे ?

सन् प्रत्ययाशिवाय यङ् वगैरे इतर प्रत्यय केले असतां तेथें या नियमानें षत्वाचा प्रतिषेध होऊं नये म्हणून षणि असें म्हटलें आहे. उदा०– सेषीव्यते.[५]

पण येथें सूत्रकारांनीं षणि असें उच्चारून षत्व केलेल्या षणापर्यंत जी धाव मारली आहे ती कशाकरितां ?

षत्व न झालेला सन् प्रत्यय पुढें असतांना हा नियम लागू होऊं नये म्हणून षणि असें म्हटलें आहे. उदा०– सुषुप्सति.[६]

तरी पण पुनः येथें सूत्रकारांनीं षण् असें णकारासकट उच्चारण करून त्या इत्संज्ञक वर्णापर्यंत जी धाव मारली आहे ती कशाकरितां ?

नुसता षशब्द पुढें असताना हा नियम लागू होऊं नये म्हणून सूत्रकारांनीं येथें इत्संज्ञक नकार उच्चारला आहे. उदा०– सुषुपिष इन्द्रम्

३. जसें-'ष्टुञ् स्तुतौ.' सन्. द्वित्व. 'अज्झन०' (६।४।१६) यानें दीर्घ. सन् प्रत्ययाच्या सकाराला षत्व. प्रकृत सूत्रानें अभ्यासोत्तरखंडांतील सकाराला षत्व. ष्टुत्व. तुष्टूषति. 'ञिष्वप् शये'. धात्वादेः षः सः यानें स. णिच्. णिजन्ताहून सन्. त्याला इडागम. द्वित्व. 'स्रुतिस्वाप्योः०' (७।४।६७) यानें अभ्यासाला संप्रसारण. सन् प्रत्ययाच्या सकाराला षत्व. प्रकृत सूत्रानें अभ्यासोत्तरखंडांतील सकाराला षत्व. सुष्वापयिषति.

४. 'ष्टुञ् स्तुतौ' लिट्. तिप्. णल्. द्वित्व. वृद्धि. आव् आदेश. 'आदेशप्रत्यययोः' यानें षत्व. तुष्टाव.

५. 'षिवु तन्तुसंताने.' धात्वादेः षः सः. 'धातोरेकाचो०' यङ्. द्वित्व. 'गुणो यङ्लुकोः' (७।४।८२) यानें अभ्यासाला गुण. सेषीव्यते.

६. 'ञिष्वप् शये.' धात्वादेः षः सः. सन्. 'रुदविदमुष०' (१।२।८) यानें सन् प्रत्ययाला कित्व. 'वचिस्वपि०' (६।१।१५) यानें संप्रसारण. द्वित्व. षत्व. सुषुप्सति.

अभ्यासादिति किमर्थम् । अभ्यासाद्या प्राप्तिस्तस्या नियमो यथा स्यादुपसर्गाद्या प्राप्तिस्तस्या नियमो मा भूत् । अभिषिषिक्षति । नैतदस्ति । असिद्धमुपसर्गात्षत्वं तस्यासिद्धत्वान्नियमो न भविष्यति । इदं तर्हि प्रयोजनम् । सनि योऽभ्यासस्तस्माद्या प्राप्तिस्तस्या नियमो यथा स्याद्यङि योऽभ्यासस्तस्माद्या प्राप्तिस्तत्र नियमो मा भूदिति । सोषुप्यते: सन् सोषुपिषते । अथवाभ्यासाद्या प्राप्तिस्तस्या नियमो यथा स्याद्धातोर्या प्राप्तिस्तस्या नियमो मा भूत् । अधीषिषति । ननु च षणीत्युच्यते । षणीति

---

सुषुपिष इंद्र.[7]

आतां या सूत्रामध्यें अभ्यासात् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

अशाकरितां म्हटलें आहे कीं अभ्यासाच्या पुढील म्हणजे उत्तर खंडामधील सकाराला जें षत्व प्राप्त होतें त्याच्याच संबंधानें हा नियम लागू झाला पाहिजे. उपसर्गाच्या निमित्तानें जें धातूच्या आरंभींच्या सकाराला षत्व प्राप्त होतें त्याच्या संबंधानें हा नियम लागू पडूं नये म्हणून. उदा०-- अभिषिषिक्षति.[8]

अशा तऱ्हेचा उपयोग संभवत नाहीं. कारण अभिषिषिक्षति या उदाहरणामध्यें 'उपसर्गात्सुनोति०' ( ८।३।६५ ) या सूत्रानें उपसर्गाच्या निमित्तानें प्राप्त झालेलें जें षत्व तें प्रकृत सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध आहे. तेव्हां अर्थातच तें असिद्ध असल्यामुळें प्रकृत नियमानें तें दूर सारलें जाणार नाहीं.

तर मग अभ्यासात् याचा उपयोग आम्ही असा सांगतों कीं--सन् प्रत्ययामुळें झालेल्या द्वित्वाचा जो अभ्यास त्या अभ्यासाच्या पुढें जें उत्तर खंडांतील सकाराचा षत्व प्राप्त होतें त्याच षत्वासंबंधीं हा नियम झाला पाहिजे, त्याशिवाय इतर ठिकाणीं म्हणजे यङ् प्रत्ययाच्या निमित्तानें द्वित्व केलें असतां तेथें जो अभ्यास त्याच्या पुढें उत्तर खंडामधील सकाराला जें षत्व प्राप्त होतें त्याच्या संबंधानें हा प्रकृत नियम लागू पडूं नये अशाकरितां या सूत्रामध्यें अभ्यासात् असें म्हटलें आहे. उदा०— सोषुपिषते.[9] येथें सोषुप्य या यङन्त धातूहून पुढें सन् प्रत्यय केला आहे.

अथवा अभ्यासाच्या पुढील सकाराला जें षत्व प्राप्त होतें त्याच्याच संबंधानें हा नियम झाला पाहिजे. अभ्यासाशिवाय नुसत्या धातूच्या पुढील सकाराला जें षत्व प्राप्त होतें त्याच्या संबंधानें हा नियम न झाला पाहिजे. उदा०— अधीषिषति.[10]

---

७. स्वप्. लिट्. छान्दसत्वास्तत्व 'व्यत्ययो बहुलम्' ( ३।१।८५ ) यानें थास्. थासः से. 'असंयोगाल्लिट्०' ( १।२।५ ) यानें लिटाला कित्त्व. 'वचिस्वपि०' ( ६।१।१५ ) यानें संप्रसारण. द्वित्व. क्रादिनियमानें इट् आगम. सुषुपिषे. इन्द्र शब्दांतील अच् पुढें असतां अय् आदेश. यकारलोप. सुषुपिष इन्द्रम्. ष शब्द बनविण्याकरतां अयादेशाचा प्रसंग दाखविला आहे.

८. अभिषिषिक्षति. येथें 'उपसर्गात्सुनोति०' ( ८।३।५ ) यानें अभ्यासांतील सकाराला षत्व झालें आहे.

९. स्वप्. यङ्. 'स्वपिस्यमि०' ( ६।१।१९ ) यानें संप्रसारण. द्वित्व. अभ्यासाला गुण. सोषुप्य हा यङन्त धातु. त्याहून सन्. इडागम. अतो लोपः. यस्य हलः. सोषुपिषते.

१०. अधि उपसर्ग मागें लावलेल्या इण् धातूहून सन्. येथें इण् धातुला बोधनार्थकत्व असल्यामुळें 'णौ गमि०' ( २।४।४६ ) यानें गम् आदेश होत नाहीं. 'अजादेर्द्वितीयस्य' ( ६।१।२ ) यानें स शब्दाला द्वित्व. 'सन्यतः' ( ७।४।७९ ) यानें इत्त्व. अभ्यासामुळें सन् प्रत्ययाला षत्व. आणि धातुमुळें अभ्यासाला षत्व. अधीषिषति.

नैषा परसप्तमी शक्या विज्ञातुं सन्यङन्तं हि द्विरुच्यते । तस्मादेषा सत्सप्तमी षणि सतीति । सत्सप्तमी चेत्प्राप्नोति ॥

[ सः स्विदिस्वदिसहीनां च ॥ ८ । ३ । ६२ ॥

प्राक्सितादड्व्यवायेऽपि ॥ ८ । ३ । ६३ ॥ ]

स्थादिष्वभ्यासेन चाभ्यासस्य ॥ ८ । ३ । ६४ ॥

किमर्थमिदमुच्यते ।

स्थादिष्वभ्यासवचनं नियमार्थम् ॥ १ ॥

नियमार्थोऽयमारम्भः । स्थादिष्वेवाभ्यासस्य यथा स्यात् । इह मा भूत् । अभिसुसूषति ॥

---

पण हें उदाहरण बरोबर नाहीं. कारण सूत्रामध्यें षणि असें म्हटलें आहे. तेव्हा अर्थातच षण् प्रत्यय पुढें असताना त्याच्या मागील जो धातु त्याच्याच सकाराला षत्व कर्तव्य असतांना हा नियम लागू पडेल. अधीषिषति या उदाहरणामध्यें सन् प्रत्ययाच्याच सकाराला षत्व होत आहे; तो सकार सन् प्रत्ययाच्या मागील धातूपैकीं नव्हे.

सूत्रामध्यें षणि अशी जी सप्तमी उच्चारली आहे ती परसप्तमी म्हणजे षण् पुढें असतांना अशा अर्थाची घेणें शक्य नाहीं. कारण सन् व यङ् हे प्रत्यय केले असतांना जे ' सन्यङोः ' ( ६।१।९ ) या सूत्रानें द्वित्व सांगितलें आहे तें सन्प्रत्ययान्त किंवा यङ्प्रत्ययान्त अशा शब्दस्वरूपाला सांगितलें आहे. सन् किंवा यङ् प्रत्यय पुढें असतांना मागील धातूला द्वित्व होतें असा तेथें अर्थ नाहीं. तेव्हां त्या धोरणानें येथें षण् पुढें असतांना त्याच्या मागील द्वित्वाचा अभ्यास असा अर्थ न करतां षणि ही सतिसप्तमी घेऊन षण् असतांना त्याच्या निमित्तानें झालेल्या द्वित्वापैकीं जो अभ्यास असाच येथें अर्थ करणें बरोबर आहे. आणि अशा रीतीनें षणि ही सतिसप्तमी मानली असतां अधीषिषति या उदाहणामध्यें दोष येईल. तो दूर करण्याकरितां प्रकृत सूत्रामध्यें अभ्यासात् असें म्हटलें आहे असें समजावें.

(सू . ६४) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

(वा.१) हें सूत्र नियम दाखविण्याकरितां केलें आहे. तो नियम असा कीं- 'उपसर्गात्सुनोति०' ( ८।३।६५ ) या पुढील सूत्रामध्यें स्था पासून पुढील जे धातू त्यांच्याच अभ्यासाला षत्व झाले पाहिजे. स्थाच्या मागील धातूंच्या अभ्यासाला षत्व न झालें पाहिजे. उदा०— अभिसुसूषति.

---

१. (सू. ६२) णिच् प्रत्ययाच्या मागें असलेल्या स्विद् स्वद् आणि सह या धातूंच्या अभ्यासापुढील सकाराला सकारच होतो; म्हणजे षत्व होत नाहीं, षकार झालेला सन् प्रत्यय पुढें असतांना.

१. ( सू. ६३ ) ' उपसर्गात्सुनोति० ' या सूत्रांतील सुनोति शब्दापासून ' परिनिविभ्यः० ' या सूत्रांतील सित शब्दाच्या पूर्वी सेव शब्दापर्यंत त्या त्या सूत्रानें त्या त्या निमित्ताहून पुढच्या त्या त्या शब्दाला सांगितलेलें जें कार्य तें अडागमानें व्यवधान असतांनाही करावें. असतांनाही असें म्हटल्यावरून व्यवधान नसतांनाही करावें.

१. ( सू. ६४ ) उपसर्गात्सुनोति या सूत्रांतील स्था शब्दाला आरंभ करून 'परिनिविभ्यः०' या सूत्रांतील सितशब्दाच्या पूर्वी त्या त्या सूत्रानें त्या त्या निमित्ताहून पुढच्या त्या त्या शब्दाला सांगितलेलें जें कार्य तें अभ्यासानें व्यवधान असतांनाही करावें. आणि त्यांच्याच अभ्यासालाही करावें.

२. 'षू प्रेरणे' तुदादि. सन् . ' सनिग्रहगुहोश्च' ( ७।२।१२ ) यानें इडागमाचा निषेध. द्वित्व वगैरे. अभिसुसूषति. ' यांच्याच अभ्यासाला ' असा नियम

अथ किमर्थमभ्यासेन चेत्युच्यते ।

**तद्व्यवाये चाषोपदेशार्थम् ॥ २ ॥**

तद्व्यवायेऽभ्यासव्यवाये चाषोपदेशस्यापि यथा स्यात् । अभिषिषेणयिषति ॥

**अवर्णार्थं षणि प्रतिषेधार्थं च ॥ ३ ॥**

अवर्णार्थं तावत् । अभितष्ठौ । षणि प्रतिषेधार्थम् । अभिषिषिक्षति ॥

**उपसर्गात्सुनोतिसुवतिस्यतिस्तौतिस्तोभतिस्थासेनयसेधसिचसञ्जस्वञ्जाम् ॥ ८ । ३ । ६५ ॥**

**उपसर्गात्षत्वे निस उपसंख्यानमनिणन्तत्वात् ॥ १ ॥**

उपसर्गात्षत्वे निस उपसंख्यानं कर्तव्यम् । निःषुणोति निःषिञ्चति । किं पुनः कारणं न

---

आतां या सूत्रामध्यें ' अभ्यासेन च ' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा. २) जो धातु उपदेशकालीं षकारवान् नव्हे अशाही धातूच्या सकाराला अभ्यासानें व्यवधान असतांना षत्व व्हावें म्हणून 'अभ्यासेन च' असें म्हटलें आहे. उदा०--अभिषिषेणयिषति.

(वा. ३) अवर्णान्त अभ्यासाच्या पुढील सकाराला षत्व व्हावें म्हणून, आणि षकार ज्याला झाला आहे असा सन् पुढें असतांना प्राप्त होणाऱ्या ' स्तौतिण्योरेव ' या नियमाचा प्रतिषेध व्हावा म्हणूनही ' अभ्यासेन च ' असें म्हटलें आहे. उदा०-- अभितष्ठौ, अभिषिषिक्षति.

(सू. ६५ वा. १) उपसर्गातील इणाच्या पुढील सुनोत्यादिक धातूंच्या सकाराला ह्या सूत्रानें जें हें षत्व सांगितलें जात आहे तेथें निस् या उपसर्गाच्या पुढील सुनोत्यादिक धातूंच्या सकाराला षत्व होतें असें वचन करावें. उदा०-- निःषुणोति निःषिञ्चति.

पण निस् उपसर्गाच्या पुढील सुनोत्यादिक धातूंच्या सकाराला 'उपसर्गात्०' या सूत्रानें

---

केल्यामुळें अभ्यासाला षत्व होत नाहीं. आणि ' स्तौतिण्योरेव० ' ( ८।३।६१ ) या नियमामुळें उत्तरखंडांत षत्व होत नाहीं.

३. सेनया अभियातुमिच्छति असा विग्रह केला असतां ' सत्यापपाश० ' ( ३।१।२५ ) या सूत्रानें सेना शब्दाहून णिच् प्रत्यय. टिलोप. त्यानंतर सन्. द्विर्वचन. अभ्यासाला ऱ्हस्व. ' एच इग् ह्रस्वादेशे ' ( १।१।४८ ). अभिषिषेणयिषति. सेनाशब्द हा अव्युत्पन्न आहे. तेव्हां येथें उपदेशकाली षकार नाहीं. अर्थात् आदेश सकार नाहीं, तरीही प्रकृत सूत्रानें उत्तरखंडामध्यें षत्व होतें. षकारोपदेशस्थलीं परितिष्ठासति वगैरे ठिकाणीं ' आदेशप्रत्यययोः ' यानेंच षत्व साधतें.

४. ष्ठा गतिनिवृत्तौ. धात्वादेः षः सः. लिट्. लिटाला णल्. ' आत औ णलः' (७।१।३४) यानें 'औ' आदेश. द्वित्व. शर्पूर्वाः खयः'. अभितष्ठौ. येथें आदेश सकार आहे. पण तो इणाच्या पुढें नाही. तेव्हां सामान्य शास्त्रानें येथें षत्व प्राप्त होत नसल्यामुळें अभ्यासानें व्यवधान असतांना षत्वाचें विधान केलें आहे.

५. षिच क्षरणे. सन्. अभिषिषिक्षति. येथें आदेश सकार आहे आणि तो इणाच्या पुढेंही आहे. तरी पण ' स्तौतिण्योः ' या नियमानें निवृत्त असलेल्या षत्वाच्या प्रतिप्रसवाकरितां अभ्यासानें व्यवधान असतांना षत्वविधान केलें आहे. तेव्हां 'स्थादिष्वभ्यासेन० ' येथें दोन वाक्यें ठरतात. एक ' स्थादिष्वभ्यासेन च ' हें; आणि दुसरें ' अभ्यासस्य' हें. त्यांपैकीं पहिलें अप्राप्तविधानाकरितां. आणि दुसरें नियम दाखविण्याकरितां.

१. ( सू. ६५ ) उपसर्गामधील जें निमित्त म्हणजे इण् त्याच्या पुढील सुनोत्यादिक धातूंच्या सकाराला षकार आदेश होतो.

२. अनुवृत्त असलेलें इण्-ग्रहण हें उपसर्गाचें विशेषण केल्यानें तदन्तविधि झाल्यामुळें इणन्त उपसर्गाच्या पुढील सुनोत्यादिकांच्या सकाराला षत्व व्हावें या आशयानें हें वार्तिक प्रवृत्त झालें आहे.

सिध्यति । अनिणन्तत्वात् । इणन्तादुपसर्गात्षत्वमुच्यते न च निसिणन्तः ॥

**न वा वर्णाश्रयत्वात्षत्वस्य तद्विशेषक उपसर्गो धातुश्च ॥ २ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । वर्णाश्रयत्वात्षत्वस्य । वर्णाश्रयं षत्वम् । तद्विशेषक उपसर्गो धातुश्च । नैवं विज्ञायत इणन्तादुपसर्गादिति । कथं तर्हि । इण उत्तरस्य सकारस्य स चेदिणुपसर्गस्य स चेत्सकारः सुनोत्यादीनामिति । तत्र शर्व्यवाय इत्येव सिद्धम् ॥ यद्येवं धातूपसर्गयोरभिसंबन्धोऽकृतो भवति । तत्र को दोषः । इहापि प्राप्नोति । विगताः सेचका अस्माद् ग्रामाद्विसेचको ग्रामः । धातूपसर्गयोश्चाभि-

---

षत्व होत नाहीं याचें काय बरें कारण ?

इण् शेवटीं असलेल्या उपसर्गाच्या पुढील सुनोत्यादिक धातूंच्या सकाराला प्रकृत सूत्रानें षत्व सांगितलें आहे. आणि निस् हा उपसर्ग तर इण् शेवटीं असलेला असा नाहीं. म्हणून प्रकृत सूत्रानें येथें षत्व सिद्ध होणें शक्य नाहीं.

(वा.२) निस् उपसर्गाच्या पुढील सुनोत्यादिक धातूंच्या सकाराला षत्व सांगावयास नको.

याचें काय बरें कारण ?

इण् आणि त्याच्या पुढील सकार या दोन वर्णांवर अवलंबून षत्व सांगितलें आहे. आणि उपसर्ग हें त्या इणाचें विशेषण आहे. आणि सुनोति वगैरे धातू त्या सकाराचें विशेषण आहेत. तेव्हां येथे इण् अन्तीं असलेल्याहून पर जे हे सुनोति वगैरे धातू असा अर्थ समजूं नये.

तर मग या सूत्राचा कसा अर्थ समजावा ?

असा अर्थ समजावा कीं—इणाच्या पुढील सकाराला षत्व होतें; तो इण् उपसर्गापैकीं पाहिजे आणि तो सकार सुनोति वगैरे धातूं-संबंधीं असला पाहिजे. असा अर्थ केला असतां उपसर्गाचा इण् आणि धातूचा सकार यांमध्यें निस् ह्या उपसर्गाच्या शेवटीं असलेल्या सकारानें व्यवधान येत असलें तरी हरकत नाहीं. कारण शरानें व्यवधान असतांना षत्व करावें ( ८।३।३८ ) असें सांगितलें असल्यामुळें षत्व होईल.

पण असा अर्थ केला असतां धातू आणि उपसर्ग यांचा जो होत असलेला ठराविक संबंध तो येथें केला नाहीं असें होत आहे.

मग असें झालें असतां काय दोष येईल ?

तसें झालें असतां विसेचको ग्रामः या उदाहरणामध्यें देखील सिच् धातूच्या सकाराला षत्व होईल. विगत म्हणजे निघून गेले आहेत सेचक म्हणजे पाणी घालणारे लोक ज्या गावांतून असा विसेचक या शब्दाचा अर्थ आहे. या ठिकाणीं वि हा उपसर्ग गम् धातूचा आहे; सिच् धातूचा नव्हे.

---

३. उपसर्गात् हें इणाचें विशेषण केल्यामुळें तदन्तविधि होत नाहीं. तेव्हां अर्थातच षत्वाला वर्णाश्रयत्व येतें. आणि षत्वाविषयीं शरानें व्यवधान पतकरलें असल्यामुळें वचन करावयास नको.

४. क्रियेच्या योगा(-संबंधा-)मुळें प्रादिकांना उपसर्ग हें नांव प्राप्त होत असल्यामुळें धातु आणि उपसर्ग यांचा निमित्तनिमित्तिभावसंबंध आहे. त्या संबंधाच्या आश्रयांपैकीं उपसर्गाचा अन्वय कोठें करावयाचा अशी आकांक्षा प्राप्त झाली असतां ' संबंधपूर्वक एका संबंधीचें नांव काढलें असतां तादृशसंबंधविशिष्ट असा जो दुसरा संबंधी त्याची तो आठवण करून देतो ' या युक्तिसिद्ध न्यायानें उपसर्गाचें नांव काढल्याबरोबर दुसरा संबंधी धातूच नियमानें मनांत येतो. व जो झटकून मनांत येतो त्यावरच पहिल्या संबंधीचा अन्वय करावयाचा असें युक्तीनें ठरत असल्यामुळें धातु आणि उपसर्ग या उभयतांचा ठराविक संबंध आहे; व म्हणूनच तो मोडतां येत नाहीं.

संबन्धः कृतः । कथम् । सुनोत्यादिभिरत्रोपसर्गं विशेषयिष्यामः । सुनोत्यादीनां य उपसर्गस्तस्य य इणिति ॥

**सुनोत्यादीनां षत्वे ण्यन्तस्योपसंख्यानमधिकत्वात् ॥ ३ ॥**

सुनोत्यादीनां षत्वे ण्यन्तस्योपसंख्यानं कर्तव्यम् । अभिषावयति । किं कारणम् । अधिकत्वात् । व्यतिरिक्तः सुनोत्यादिरिति कृत्वोपसर्गात्सुनोत्यादीनामिति षत्वं न प्राप्नोति ॥

**न वावयवस्यानन्यत्वात् ॥ ४ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । अवयवस्यानन्यत्वात् । अवयवोऽत्रानन्यः ॥

**नामधातोस्तु प्रतिषेधः ॥ ५ ॥**

नामधातोस्तु प्रतिषेधो वक्तव्यः । सावकमिच्छत्यभिसावकीयति परिसावकीयति ॥

**न वानुपसर्गत्वात् ॥ ६ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । अनुपसर्गत्वात् । यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतो न चात्र सुनोतिं प्रति क्रियायोगः । किं तर्हि । सावकीयतिं प्रति ॥

---

हें षत्व वर्णावर अवलंबून सांगितलें आहे असें मानलें तरी येथें धातु आणि उपसर्ग यांचा संबंध कायम ठेवतां येतो.

तो कसा ?

सुनोति वगैरे धातू हें उपसर्गांचें विशेषण करीत आहों. तेव्हां सूत्राचा अर्थ असा समजावा कीं-सुनोति वगैरे धातूंचा जो उपसर्ग त्या उपसर्गांतील जो इण् त्याच्या पुढील सकाराला म्हणजे अर्थात् सुनोति वगैरे धातूंच्या सकाराला षत्व होतें.

(वा.३) सुनोति वगैरे धातूंच्या सकाराला जें या सूत्रानें षत्व सांगितलें आहे तें षत्व त्या सुनोति वगैरे धातूंहून णिच् प्रत्यय केला असतांना होतें असें म्हणावे. उदा०— अभिषावयति.

पण येथें या सूत्रानें कां बरें षत्व होणार नाहीं ?

अधिक आहे म्हणून. म्हणजे णिच् प्रत्यय केला असतां धातू निराळा होतो. तेव्हां णिच् शेवटीं असलेला धातू सुनोति नव्हे म्हणून 'उपसर्गात्सुनोति०' या प्रकृत सूत्रानें येथें षत्व प्राप्त होत नाहीं.

( वा.४ ) णिच् प्रत्यय केला असतांना तेथें निराळें षत्व सांगावयास नको.

कां बरें ?

अवयव निराळा होत नाहीं म्हणून. म्हणजे सु धातूहून णिच् प्रत्यय केला असतांना जरी सावि हा धातु निराळा झाला तरी तेथें णिच् प्रत्ययाच्या मागील जो भाग तो सु धातु नव्हे असें म्हणतां येत नाहीं.

(वा.५)शब्दाला प्रत्यय लागून जे धातू होतात तेथें सकाराला षत्व होत नाहीं असें म्हणावें. उदा० अभिसावकीयति; परिसावकीयति. येथें अभिसावक आणि परिसावक या शब्दांना त्यांची इच्छा करणारा या अर्थी ' सुप आत्मनः क्यच् ' ( ३।१।८ ) या सूत्रानें क्यच् प्रत्यय लागून अभिसावकीय अथवा परिसावकीय एवढा धातु झाला आहे.

(वा. ६) अभिसावकीयति वगैरे नामधातूंच्या उदाहरणांमध्ये षत्वाचा निषेध सांगावयास नको.

कां बरें ?

तेथें अभि हा उपसर्ग नाहीं म्हणून. ज्या उपसर्गांचा ज्या क्रियेशीं योग असतो त्या क्रियावाचक धातूचेच ते गति किंवा उपसर्ग समजले जातात; आणि अभिसावकीयति या उदाहरणामध्यें तर सु धातूनें दाखविलेली जी क्रिया तिच्याशीं अभि याचा योग नाहीं.

तर मग येथें अभि याचा कोणाशीं योग आहे?

इहापि तर्हि न प्राप्नोति । अभिषावयति । अत्रापि न सुनोतिं प्रति क्रियायोगः । किं तर्हि । सावयतिं प्रति । सुनोतिं प्रत्यत्र क्रियायोगः । कथम् । नासावेवं प्रेष्यते सुन्वभीति । किं तर्हि । उपसर्गविशिष्टामसौ क्रियां प्रेष्यतेऽभिषुण्विति ॥

[ सदिरप्रतेः ॥ ८ । ३ । ६६ ॥ ]

स्तम्भेः ॥ ८ । ३ । ६७ ॥

अप्रतेरिति वर्तत उताहो निवृत्तम् । निवृत्तमित्याह । कथं ज्ञायते । योगविभागकरणसामर्थ्यात् । इतरथा हि सदिस्तम्भ्योरप्रतेरित्येव ब्रूयात् ॥ अस्त्यन्यद्योगविभागकरणे प्रयोजनम् । किम् । अवाच्चालम्बनाविदूर्ययोः [६८] इति वक्ष्यति तत्स्तम्भेरेव यथा स्यात्सदेर्मा भूदिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । एकयोगेऽपि सति यस्यालम्बनाविदूर्ये स्तस्तस्य भविष्यति । कस्य चालम्बनाविदूर्ये स्तः । स्तम्भेरेव ॥

---

सावकीय या क्यच्प्रत्ययान्त धातूनें दाखविलेली जी सावकाची इच्छा करणें ही क्रिया तिच्याशीं अभि याचा योग आहे.

असें असेल तर मग अभिषावयति येथें षत्व होणार नाहीं. कारण येथेंही सु धातूनें दाखविलेली जी क्रिया तिच्याशीं अभि याचा योग नाहीं. सावि या णिच्प्रत्ययान्त धातूनें दाखविलेली जी स्नान करणाऱ्याला प्रेरणा करण ही क्रिया तिच्याशीं अभि याचा योग आहे.

अभिषावयति येथें सु धातूनें दाखविलेली जी स्नान करणें ही क्रिया तिच्याशींच अभि याचा योग आहे असें आम्ही समजत आहोंत.

तसें कसें समजलें जाईल ?

अशा रीतीनें समजतां येईल कीं—अभि या उपसर्गानें दाखविलेलें जें आभिमुख्य म्ह० संमुखपणा तें प्रेरणा करणाऱ्याचें नव्हे.

तर मग तें कोणाचें आहे ?

अभिमुख स्नान करणाऱ्याला प्रेरणा करतो अशा अर्थीं येथें अभिषावयति हा प्रयोग आम्हीं गृहीत धरला आहे.

(सू. ६७) या सूत्रामध्यें पूर्व सूत्रांतून अप्रतेः या पदाची अनुवृत्ति होत आहे किंवा नाहीं ?

अनुवृत्ति होत नाहीं असें आम्ही म्हणतों.

असें कशावरून समजावें ?

सूत्राचा विभाग केला आहे यावरूनच तसें समजता येतें. नाहीं तर म्हणजे स्तम्भेः या प्रकृत सूत्रामध्यें पूर्व सूत्रांतून अप्रतेः या पदाचा संबंध असेल तर 'सदिस्तम्भ्योरप्रतेः' असें पाणिनीनें एकच सूत्र केलें असतें.

पण सूत्राचा विभाग करण्याचा उपयोग दुसरा संभवत आहे ना ?

तो कोणता ?

'अवाच्चालम्बनाविदूर्ययोः' असें पुढें सूत्र आहे. त्या सूत्रानें सांगितलेलें जे षत्व तें स्तम्भ् या एकट्याच धातूला झालें पाहिजे. सद् धातूला न झालें पाहिजे.

हा उपयोग बरोबर नाहीं. कारण 'सदिस्तम्भ्योरप्रतेः' असें एक सूत्र केलें तरी देखील ज्या धातूला आलम्बन म्हणजे आश्रय करणें आणि आविदूर्य म्हणजे समीप असणें हे अर्थ संभवतात त्यालाच त्या सूत्रानें षत्व होईल.

ते आलम्बन आणि सामीप्य हे अर्थ कोणत्या धातूला संभवतात ? स्तम्भ धातूलाच ते अर्थ संभवतात; सद् धातूला संभवत नाहींत.

---

१. (सू. ६६) प्रति सोडून इतर उपसर्गांतील निमित्ताच्या म्हणजे इणाच्या पुढील सद् धातूच्या सकाराला षत्व होतें.

१. (सू. ६७) उपसर्गांतील निमित्ताच्या म्हणजे इणाच्या पुढील स्तम्भ धातूच्या सकाराला षकार आदेश होतो. मूळ धातु स्तम्भ् असा नकारोपध आहे. पण मूळ संस्कृत भाष्यांत परसवर्ण करून स्तम्भ असा पाठ दिला आहे. जृस्तम्भु० ( ३।१।५८ ) येथेंही नकारोपध स्तम्भ् धातूच उच्चारला आहे. ष्टभि प्रतिबन्धे हा स्तम्भ धातू जरी नुमागमामुळें नकारोपध असला तरी तो नकार सूत्रानें (लक्षणानें) झाला असल्यामुळें त्याला अङ् व षत्व होत नाहींत.

[अवाच्चालम्बनाविदूर्ययोः ॥८।३।६८॥
वेश्च स्वनो भोजने ॥८।३।६९॥
परिनिविभ्यः सेवसितसयसिवुसहसुट्स्तुस्वञ्जाम् ॥८।३।७०॥
सिवादीनां वाऽड्व्यवायेऽपि ॥८।३।७१॥]
अनुविपर्यभिनिभ्यः स्यन्दतेरप्राणिषु ॥८।३।७२॥
अथ यः प्राण्यप्राणी च कथं तत्र भवितव्यम्। अनुष्यन्देते मत्स्योदके इति। आहोस्विदनुस्यन्देते मत्स्योदके इति। यदि तावदप्राणी विधिनाश्रीयतेऽस्त्यत्राप्राणीति कृत्वा भवितव्यं षत्वेन। अथ प्राणी प्रतिषेधेनाश्रीयतेऽस्त्यत्र प्राणीति कृत्वा भवितव्यं प्रतिषेधेन। किं पुनरत्रार्थसतत्त्वम्। देवा ज्ञातुमर्हन्ति॥

[वेः स्कन्देरनिष्ठायाम् ॥८।३।७३॥]
परेश्च ॥८।३।७४॥

(सू. ७२) आतां ज्या वाक्यामध्ये प्राणी आणि त्याशिवाय दुसरा कोणी तरी असे दोन्ही मिळून कर्ते ठेवले असतील त्या वाक्यामध्यें स्यन्द् धातूच्या सकाराला प्रकृत सूत्रानें षत्व करावें किंवा नाहीं? म्हणजे मत्स्योदके अनुष्यन्देते असें होतें किंवा मत्स्योदके अनुस्यन्देते असें होतें?

जर या सूत्रामध्यें प्राण्याशिवाय दुसरा कोणी तरी कर्ता असल्यास तेथें त्याच्या निमित्तानें प्रकृत सूत्रानें षत्व होतें असा विधि गृहीत धरला तर प्रकृत उदाहरणामध्यें प्राण्याशिवाय दुसरा उदक हा कर्ता असल्यामुळें येथें षत्व झालें पाहिजे. आतां जर प्राणी कर्ता असतांना षत्वां होत नाहीं असा प्रकृत सूत्रानें प्राण्याच्या निमित्तानें षत्वाचा निषेध सांगितला[3] आहे असें गृहीत धरलें तर प्रकृत उदाहरणामध्यें मत्स्य हा प्राणी कर्ता आहे म्हणून षत्वाचा निषेध झाला पाहिजे. या दोहोंपैकीं खरें काय आहे तें तत्त्व परमेश्वरच जाणण्याला समर्थ आहे.

१. (सू. ६८) अव या उपसर्गापुढील स्तम्भ धातूच्या सकाराला षकार होतो, आश्रय किंवा सामीप्य हे अर्थ असतांना.

१. (सू. ६९) वि आणि अव या उपसर्गांच्या पुढील भोजन या अर्थाला दाखविणाऱ्या स्वन धातूच्या सकाराला षकार आदेश होतो.

१. (सू. ७०) परि नि, अथवा वि या उपसर्गांच्या पुढील सेव, सित, सय, सिवु, सह, सुट् स्तु, आणि स्वञ्ज यांच्या सकाराला षकार आदेश होतो.

१. (सू. ७१) परि, नि, वि, हे उपसर्ग व यांच्या पुढील सिव्, सह सुट्, स्तु, स्वञ्ज यांचा सकार या उभयतांमध्यें अडागमानें व्यवधान असतांनाही त्या सकाराला विकल्पानें षकार आदेश होतो.

१. (सू. ७२) अनु, वि, परि, अभि, आणि नि, या उपसर्गांपुढील स्यन्द् धातूच्या सकाराला विकल्पानें षकार आदेश होतो, पण त्या स्यन्द् धातूचा कर्ता प्राणिभिन्न असेल तर.

२. अप्राणिषु हा पर्युदास होय.

३. अप्राणिषु हा प्रसज्यप्रतिषेध होय असा भाव.

४. पंडितांचें या बाबतीत असें म्हणणें आहे कीं-एकवाक्यता संभवत असतां वाक्यभेद करणें अयोग्य आहे. तेव्हां प्रसज्यप्रतिषेधामध्यें वाक्यभेद होत असल्यामुळें पर्युदास मानणेंच योग्य होय.

१. (सू. ७३) वि या उपसर्गाच्या पुढील स्कन्द धातूच्या सकारला विकल्पानें षकार होतो निष्ठेशिवाय इतर प्रत्यय पुढें असतांना.

१. (सू. ७४) परि या उपसर्गांच्या पुढील स्कन्द् धातूच्या सकाराला विकल्पानें षकार आदेश होतो.

अनिष्ठायामिति वर्तत उताहो निवृत्तम् । निवृत्तमित्याह । कथं ज्ञायते । योगविभागकरणसामर्थ्यात् । इतरथा हि विपरिभ्यां च स्कन्देरनिष्ठायामित्येव ब्रूयात् ॥

[ परिस्कन्दः प्राच्यभरतेषु ॥ ८ । ३ । ७५ ॥

स्फुरतिस्फुलत्योर्निर्निविभ्यः ॥ ८ । ३ । ७६ ॥

वेः स्कभ्नातेर्नित्यम् ॥ ८ । ३ । ७७ ॥ ]

इणः षीध्वंलुङ्लिटां धोऽङ्गात् ॥ ८ । ३ । ७८ ॥

विभाषेटः ॥ ८ । ३ । ७९ ॥

इण्ग्रहणं किमर्थम् ॥

इण्ग्रहणं ढत्वे कवर्गनिवृत्त्यर्थम् ॥१॥

इण्ग्रहणं क्रियते कवर्गाड्ढत्वं मा भूदिति । पक्षीध्वम् यक्षीध्वम् ॥

किं पुनरिदमिण्ग्रहणं प्रत्ययविशेषणम् । इण उत्तरेषां षीध्वंलुङ्लिटां यो धकार इति । आहोस्विद्धकारविशेषणम् । इण उत्तरस्य धकारस्य स चेत्षीध्वंलुङ्लिटां धकार इति । कश्चात्र विशेषः ॥

(सू. ७४) या सूत्रामध्यें पूर्व सूत्रांतून अनिष्ठायाम् हें पद अनुवृत्त होत आहे किंवा नाहीं ?

अनुवृत्त होत नाहीं असें आम्ही म्हणतों.

असें कसें समजतां येतें ?

ज्या अर्थी पाणिनीनें सूत्राचा विभाग केला आहे म्हणजे 'वेः स्कन्देरनिष्ठायाम्' असें सूत्र करून 'परेश्च' असें निराळें सूत्र केलें आहे त्यावरूनच हें समजतें. नाहीं तर 'विपरिभ्यां च स्कन्देरनिष्ठायाम्' असें पाणिनीनें एकच सूत्र केलें असतें.

(सू. ७८) येथें इणः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

(वा. १) जर 'इण्कोः' (८।३।५७) या सूत्रांतून इण् पदाचा संबंध करावा तर त्याच्या बरोबर कवर्गाचाही संबंध होऊन यक्षीध्वम् पक्षीध्वम् या उदाहरणांमध्यें कवर्गाच्या पुढील धकाराला ढत्व होऊं लागेल. तें न व्हावें याकरितां मुद्दाम येथे इणः असें निराळें म्हटलें आहे.

आतां इणः हें प्रत्ययाचें विशेषण आहे असें समजावें कीं, ज्याच्यामुळें इणाहून पर जे षीध्वम् लुङ् आणि लिट् प्रत्यय त्यांच्या धकाराला ढत्व होतें असा वाक्यार्थ होईल, किंवा इणः हें धकाराचें विशेषण समजावें कीं ज्याच्या योगानें इणाच्या पुढील जो धकार त्याला ढत्व होतें परंतु तो धकार षीध्वम् लुङ् आणि लिट् या प्रत्ययांपैकीं असेल तर असा वाक्यार्थ होईल ?

मग यांत काय बरें फरक आहे ?

---

१. (सू. ७५) परिस्कन्द या शब्दामध्यें 'परेश्च' (सू. ७४) या सूत्रानें प्राप्त असलेलें षत्व होत नाहीं. पूर्वेकडील भरतवंशीय लोकांकडून हा शब्द वापरला जातो.

१. (सू. ७६) निस्, नि आणि वि या उपसर्गाच्या पुढील स्फुर आणि स्फुल् या धातूंच्या सकाराला विकल्पानें षकार आदेश होतो.

१. (सू. ७७) वि या उपसर्गाच्या पुढील स्कभ्नाति या धातूच्या सकाराला नित्य षकार आदेश होतो.

१. (सू. ७८) इण् शेवटीं असलेल्या अङ्गाच्या पुढील षीध्वम्, लुङ् आणि लिट् यांच्या धकाराला मूर्धन्य आदेश होतो.

१. (सू. ७९) इणाच्या पुढील जो इट् आगम त्याच्या पुढील षीध्वम्, लुङ् आणि लिट् यांच्या धकाराला विकल्पानें मूर्धन्य आदेश होतो.

२. यज्. आशीर्लिङ्. ध्वम्. सीयुट्. 'षढाच उपदेशे०' यानें इण्-निषेध. कुत्व. षत्व. यक्षीध्वम्. याप्रमाणेंच पक्षीध्वम् येथेंही समजावें. यज् ऐवजीं पच् धातु एवढाच विशेष.

**तत्र प्रत्ययपरत्व इटो लिटि ढत्वं परादित्वात् ॥ २ ॥**

तत्र प्रत्ययपरत्व इटो लिटि ढत्वं न प्राप्नोति । लुलुविढ्वे लुलुविध्व इति । किं कारणम् । परादित्वात् । इट् परादिः ॥ वचनाद्भविष्यति । अस्ति वचने प्रयोजनम् । किम् । अलविढ्वम् अलविध्वम् ॥ अस्तु तर्हि धकारविशेषणम् ।

**धकारपरत्वे षीध्वम्यननन्तरत्वादिटो विभाषाभावः ॥ ३ ॥**

धकारपरत्वे षीध्वम्यननन्तरत्वादिटो विभाषा न प्राप्नोति । लविषीढ्वम् लवि-

---

(वा. २ ) षीध्वम् वगैरे प्रत्यय इणाहून पर पाहिजेत असें म्हटलें तर लुलुविढ्वे लुलुविध्वे या उदाहरणामध्यें लिट् प्रत्ययाला इट् आगम् झाला असतां तेथें ढत्व प्राप्त होणार नाहीं.

कां बरें ?

इट् आगम हा पुढील प्रत्ययाचा आद्याव यव झाला असल्यामुळें येथें विभाषेटः या सूत्राची प्राप्ति येत नाहीं.

परंतु ज्या अर्थी विभाषेटः या सूत्रानें मुद्दाम लिट् प्रत्ययाच्या धकाराला ढत्व सांगितलें आहे त्याअर्थी त्याच्या जोरावर येथें ढत्व करतां येईल.

विभाषेटः या सूत्राचा उपयोग दुसरा संभवत आहे तो कोणता ?

अलॅविढ्वम् अलविध्वम् येथें लुङ् प्रत्यया-संबंधी धकाराला ढत्व करतां येईल.

तर मग इणः हें धकाराचेंच विशेषण असूं दे.

(वा. ३) इणः हें धकाराचें विशेषण केलें तर षीध्वम् प्रत्ययाचा धकार इणाच्या जवळ नसल्या-मुळें लविषीढ्वम्॑ लविषीध्वम् या उदाहरणामध्यें 'विभाषेटः' ( ८।३।७९ ) या सूत्रानें विकल्पानें ढत्व होणार नाहीं.

पण षीध्वम् प्रत्ययाच्या धकाराला विभाषेटः या सूत्रानें मुद्दाम निराळें ढत्व सांगितलें असल्या-मुळें त्याच्या जोरावर तेथें ढत्व करतां येईल.

---

३. लूञ् छेदने. लिट्. ध्वम्. टेरेत्व. इडागम. द्वित्व गुण. अवादेश. 'विभाषेटः' ( ८।३।७९ ) यानें धकाराला विकल्पानें ढत्व. लुलुविध्वे, लुलुविढ्वे. षीध्वम् लुङ् आणि लिट् हे प्रत्यय इणाच्या पुढें पाहिजेत हा पक्ष गृहीत धरला असतां म्हणजे इणः या पञ्चम्यन्ताचा धकाराकडे संबंध न करतां षीध्वम् वगैरे प्रत्ययांकडे संबंध केला असतां इणाच्या पुढें असलेले जे षीध्वम् वगैरे प्रत्यय असा अर्थ होतो. त्याप्रमाणें 'विभाषेटः' येथेंही इटः या पञ्चम्यन्ताचा षीध्वम् वगैरे प्रत्ययांकडे संबंध केला असतां इडागमाच्या पुढील जे षीध्वम् वगैरे प्रत्यय, असा अर्थ झाल्यामुळें लुलुविध्वे येथें इट् आगम हा लिट् प्रत्ययाचा आद्यावयव झाला असल्यामुळें इध्वे एवढा इकारासकट समुदाय लिट् म्हटला जातो. तेव्हां जो ध्वे शब्द इडागमाच्या पुढें आहे तो लिट् नव्हे. आणि जो इध्वे हा समुदाय लिट् शब्दानें ओळ-खिला जातो तो इडागमाच्या पुढें नाहीं. व इडागमाच्या पुढील जो षीध्वम् वगैरे प्रत्यय त्याच्या धकाराला असा तर तूं सूत्राचा अर्थ गृहीत धरला आहेस. तेव्हां अर्थातच लुलुविढ्वे लुलुविध्वे येथें 'विभाषेटः' यानें सांगितलेल्या ढत्वाची प्राप्ति येऊं शकत नाहीं.

४. लू धातु. त्याहून लुङ्. सिच्. इट्. अट आगम. 'धि च' ( ८।२।२५ ) यानें सकारलोप. 'विभाषेटः' यानें धकाराला विकल्पानें ढत्व. अलविढ्वम् अलविध्वम्. येथें इट् हा लुङाचा अवयव नाहीं.

५. लूञ् धातु. आशीर्लिङ्. ध्वम्. सीयुट्. इडागम. गुण अव् आदेश. 'विभाषेटः' यानें विकल्पानें ढत्व. लविषीध्वम् लविषीढ्वम्.

६. इट् आगमाच्या पुढील जो धकार असा अर्थ केला असतां लविषीध्वम् येथें षीशब्दानें व्यवधान असल्यामुळें ढत्व येऊं शकत नाहीं.

७. 'विभाषेटः' येथें षीध्वम् शब्दाची अनुवृत्ति करून इट् आगमाच्या पुढील षीध्वम्-संबंधी धकाराच्या

षीध्वमिति ॥ वचनाद्भविष्यति । अस्ति वचने प्रयोजनम् । किम् । लुलुविढ्वे लुलुविध्व इति ॥

**इण्ग्रहणस्य चाविशेषणत्वात्ष्यादिमात्रे ढत्वप्रसङ्गः ॥ ४ ॥**

इण्ग्रहणस्य चाविशेषणत्वात्ष्यादिमात्रे ढत्वं प्राप्नोति । पक्षीध्वम् यक्षीध्वमिति ॥ नैष दोषः । अङ्गादिति वक्ष्यामि । अङ्गग्रहणाच्च दोषः । इह न प्राप्नोति । उपदिदीयिध्वे उपदिदीयिढ्वे । यो ह्यत्राङ्गान्त्य इण्न तस्मादुत्तर इट् । यस्माच्चोत्तर इण्नासावङ्गान्त्य इणिति ॥

यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावत्प्रत्ययविशेषणम् । ननु चोक्तं तत्र प्रत्ययपरत्व इटो लिटि ढत्वं परादित्वात् लुविलुढ्वे लुलुविध्व इति । वचनाद्भविष्यति । ननु चोक्तमस्ति वचने प्रयोजनम् किम् अलविढ्वम् अलविध्वमिति । यदेतस्मिन्योगे लिङ्ग्रहणं तदनवकाशं तस्यानवकाशत्वाद्वचनाद्भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु धकारविशेषण-

---

पण 'विभाषेटः' या सूत्राचा उपयोग निराळा संभवत आहे.

तो कोणता ?

लुलुविढ्वे लुलुविध्वे.

( वा. ४ ) शिवाय इण् हा अमुक प्रकारचा पाहिजे असें त्या इणाला कांहींएक विशेषण दिलें नसल्यामुळें षीध्वम् यामध्यें सर्व ठिकाणीं म्हणजे पक्षीध्वम् यक्षीध्वम् वगैरे सर्व उदाहरणांमध्यें देखील ढत्व होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण अङ्गात् असें म्हटलें आहे. तेव्हां इण् अन्तीं असलेलें अङ्ग पाहिजे आणि षी यांतील ईकार हा इण् अङ्गाच्या शेवटीं नाहीं.

परंतु अङ्गात् असें म्हटलें तर उपदिदीयिढ्वे उपदिदीयिध्वे या उदाहरणामध्यें ढत्व होणार नाहीं. कारण येथें अङ्गाच्या शेवटीं असलेला जो इण् म्हणजे ईकार त्याच्या पुढें इट् आगम नाहीं कारण मध्यें यकार आहे; व हा इट् आगम ज्याच्या पुढे म्हणजे यकाराच्या पुढें आहे, तो यकार हा इण् अङ्गाच्या शेवटीं नाहीं.

तर मग आतां आम्ही असें म्हणतों कीं इणः हें विशेषण प्रत्ययाला किंवा धकाराला कोणाजाही दिलें तरी चालेल.

तुला वाटेल तसें कर. इणः हें प्रत्ययाचें विशेषण असूं दे.

पण आतांच म्हटलें आहे ना कीं षीध्वम् वगैरे प्रत्यय इणाहून पर पाहिजेत असें म्हटलें तर लुलुविढ्वे लुलुविध्वे या उदाहरणामध्यें इट् हा आगम पुढील लिट् प्रत्ययाचा आद्यावयव झाला असल्यामुळें तेथें ढत्व होणार नाहीं ?

पण तेथें 'विभाषेटः' या सूत्रानें मुद्दाम लिट् प्रत्ययाच्या धकाराला ढत्व सांगितलें आहे त्याच्या जोरावर तेथें ढत्व करतां येईल.

पण यासंबंधानेंही पूर्वी सांगितलें आहे कीं, 'विभाषेटः' या सूत्राचा उपयोग दुसरा संभवत आहे. अलविढ्वम् अलविध्वम् या ठिकाणीं लुङ् प्रत्ययाच्या धकाराला 'विभाषेटः' या सूत्रानें विकल्पानें ढत्व होत आहे.

परंतु 'विभाषेटः' या सूत्रामध्यें पूर्व सूत्रांतून अनुवृत्त झालेलें जें लिट् हें पद त्याचा उपयोग पुढें होत नसल्यानें त्याच्या जोरावर लुलुविढ्वे लुलुविध्वे या उदाहरणामध्यें विकल्पानें ढत्व करतां येईल.

अथवा इणः हें विशेषण धकाराचें केलें तरी चालेल.

---

ढत्व सांगणें अनर्थक होत असल्यामुळें त्या जोरावर येननाव्यवधानन्यायानें ढत्व करतां येईल.

मिति । ननु चोक्तं धकारपरत्वे षीध्वम्यनन्तरत्वादिटो विभाषाभावः लविषीढ्वम् लविषीध्वमिति । वचनाद्भविष्यति । ननु चोक्तं अस्ति वचने प्रयोजनम् किम् लुलुविढ्वे लुलुविध्वे इति । यदेतस्मिन्योगे षीध्वंग्रहणं तदनवकाशं तस्यानवकाशत्वाद्वचनाद्भविष्यति ॥ यदप्युच्यते इण्ग्रहणस्य चाविशेषणत्वात्ष्यादिमात्रे ढत्वप्रसङ्ग इत्यङ्गादिति वक्ष्यामि । ननु चोक्तमङ्गग्रहणाच्च दोष इति । पूर्वस्मिन्योगे यदङ्गग्रहणं तदुत्तरत्र निवृत्तम् । अथवा पूर्वस्मिन्योग इण्ग्रहणं प्रत्ययविशेषणमुत्तरत्र धकारविशेषणम् ॥

[ [१]समासेऽङ्गुलेः सङ्गः ॥ ८ । ३ । ८० ॥

[१]भीरोः स्थानम् ॥ ८ । ३ । ८१ ॥]

[१]अग्नेः स्तुत्स्तोमसोमाः ॥ ८ । ३ । ८२ ॥

अग्नेर्दीर्घात्सोमस्य ॥ १ ॥

अग्नेर्दीर्घात्सोमस्येति वक्तव्यम् । अग्नीषोमौ ॥

---

पण आतांच म्हटलें आहे कीं, इणः हें धकाराचें विशेषण केलें तर षीध्वम् प्रत्ययाचा धकार इणाच्या जवळ नसल्यामुळें लविषीढ्वम् लविषीध्वम् या उदाहरणामध्यें ‘ विभाषेटः ’ या प्रकृत सूत्रानें ढत्व होणार नाहीं.

परंतु ज्याअर्थी षीध्वम् प्रत्ययाच्या धकाराला ‘ विभाषेटः ’ या सूत्रानें मुद्दाम ढत्व सांगितलें आहे त्या अर्थी तेथें ढत्व करता येईल.

पण या संबंधानेंसुद्धां आताच सांगितलें आहे कीं ‘विभाषेटः’ या सूत्राचा उपयोग दुसरा संभवत आहे. तो असा कीं–लुलुविढ्वे लुलुविध्वे या उदाहरणामध्यें ‘ विभाषेटः ’ या सूत्रानें विकल्पानें ढत्व होत आहे.

तसें असलेंतरी ‘ विभाषेटः ’ या सूत्रामध्यें पूर्व सूत्रांतून षीध्वम् हें पद जें अनुवृत्त होत आहे त्याचा उपयोग कोठें होत नाहीं; तेव्हां त्याच्या जोरावर लविषीढ्वम् लविषीध्वम् या उदाहरणामध्यें विकल्पानें ढत्व करतां येईल.

तसेंच आणखी जें म्हटलें आहे कीं इणाला कांहीं एक विशेषण दिलें नसल्यामुळे पक्षीध्वम् वगैरे सर्व उदाहरणांमध्यें षीध्वम् प्रत्ययाच्या धकाराला ढत्व होऊं लागेल तेंहीं म्हणणें बरोबर नाहीं. कारण सूत्रामध्यें अङ्गात् असें म्हटलें आहे.

पण यासंबंधानेंहीं आतांच म्हटलें आहे कीं अङ्गात् असें म्हटलें तर उपदिदीयिढ्वे उपदिदीयिध्वे या ठिकाणीं दोष येतो.

परंतु हा दोष येत नाहीं. कारण ‘ इणः षीध्वम्० ’ या पूर्व सूत्रामध्यें असलेलें जें अङ्गात् हें पद त्याचा पुढील म्ह० ‘विभाषेटः ’ या सूत्रामध्यें संबंध होत नाहीं.

अथवा इणः षीध्वम् या पूर्व सूत्रामध्यें इणः हें प्रत्ययाचें विशेषण करावें आणि ‘ विभाषेटः ’ या पुढील सूत्रामध्यें ‘ इणः ’ हें धकाराचें विशेषण करावें म्हणजे कांहीं दोष येणार नाहीं.

(सू. ८२ वा. १) अग्नि या शब्दाच्या पुढील सोम शब्दाच्या सकाराला जें या सूत्रानें षत्व सांगितलें आहे तें षत्व अग्नि शब्दाला दीर्घ केला असतानाच होतें असें म्हणावें. उदा० अग्नीषोमौ.

---

१. ( सू. ८० ) अङ्गुलि शब्दाच्या पुढील जो सङ्गशब्द त्याच्या सकाराला समासामध्यें षत्व होतें.

१. ( सू. ८१ ) भीरु शब्दाच्या पुढील जो स्थानशब्द त्याच्या सकाराला षकार आदेश समासामध्यें होतो.

१. ( सू. ८२ ) अग्नि शब्दाच्या पुढील जे स्तुत्, स्तोम, आणि सोम शब्द त्यांच्या सकाराला षकार आदेश समासामध्यें होतो.

**इतरथा ह्यनिष्टप्रसङ्गः ॥ २ ॥**

इतरथा ह्यनिष्टं प्रसज्येत । अग्निसोमौ माणवकाविति ॥

तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । गौणमुख्ययोर्मुख्ये संप्रतिपत्तिः । तद्यथा । गौरनुबन्ध्योऽजोऽग्नीषोमीय इति न वाहीकोऽनुबध्यते । कथं तर्हि वाहीके वृद्ध्यात्वे भवतः । गौस्तिष्ठति । गामानयेति । अर्थाश्रय एतदेवं भवति । यद्धि शब्दाश्रयं शब्दमात्रे तद्भवति । शब्दाश्रये च वृद्ध्यात्वे ॥

**[ ज्योतिरायुषः स्तोमः ॥ ८ । ३ । ८३ ॥**

**मातृपितृभ्यां स्वसा ॥ ८ । ३ । ८४ ॥ ]**

**मातुःपितुर्भ्यामन्यतरस्याम् ॥ ८ । ३ । ८५ ॥**

सान्ताभ्यां चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । मातुःष्वसा मातुःस्वसा । पितुःष्वसा

---

(वा. २) असे म्हटलें नाहीं तर अनिष्ट होऊं लागेल. अग्निसोमौ माणवकौ या उदाहरणामध्यें देखील षत्व होऊं लागेल. तेथें अग्नि आणि सोम हे शब्द मनुष्याला उद्देशून उच्चारले आहेत.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण एकाद्या शब्दाला उद्देशून जें कार्य सांगितलें असेल तें कार्य तो शब्द गौण अर्थाचा आणि मुख्य अर्थाचा असा दोन्ही प्रकारचा संभवत असल्यास मुख्य अर्थाचा असेल तेथेंच करावें. कारण मुख्य अर्थच प्रथमतः मनांत येत असतो. जसें—गो- ( बैला- ) चें अनुबंधन करावें, अग्नि आणि सोम या देवतांना उद्देशून अजाचें आलंभन करावें असें म्हटलें असतां तेथें गो आणि अज या पदांचे मुख्य अर्थ जे बैल आणि बोकड त्यांचाच त्या शब्दांपासून बोध होतो. एकादा माणूस बुद्धीनें मंद असल्यास त्याला बैल किंवा बोकड असें जरी गौण रीतीनें म्हणतात तरी तशा मनुष्याचें गो किंवा अज शब्दानें वरील वाक्यामध्यें ग्रहण होत नाहीं.

असें असेल तर ज्या वेळीं गो शब्द गौण अर्थानें मनुष्याला बोलतो त्या वेळीं गौस्तिष्ठति गामानय या प्रयोगांमध्यें गोशब्दाला वृद्धि आणि आत्व हीं कशीं होतात ?

अर्थावर अवलंबून एखाद्या शब्दाला सांगितलेलें जें कार्य तें तो शब्द गौण अर्थाचा असल्यास होत नाहीं परंतु जें नुसत्या शब्दाला म्ह० वर्णाला उद्देशून सांगितलेलें कार्य तें तो वर्ण असला म्हणजे त्या ठिकाणीं करतां येतें. आणि वृद्धि व आत्व हे विधी तर नुसत्या शब्दाला म्हणजे केवळ ओकार या शब्दाला उद्देशून सांगितले आहेत तेव्हां अर्थातच ते सर्व ठिकाणीं करतां येतात.

(सू. ८५) या सूत्रानें मातुर् आणि पितुर् या रेफान्ताच्या पुढील स्वसृ शब्दाच्या सकाराला जें षत्व सांगितलें आहे तें मातुस् आणि पितुस् असे सकारान्त शब्द असतांनाही होतें असें म्हणावें. कारण मातुःष्वसा मातुःस्वसा, पितुःष्वसा पितुःस्वसा या उदाहरणांमध्यें प्रकृत सूत्रानें विकल्पानें षत्व झालें पाहिजे.

---

१. ( सू. ८३ ) ज्योतिस् किंवा आयुस् या शब्दांच्या पुढील स्तोम शब्दाच्या सकाराला षकार आदेश समासामध्यें होतो.

१. ( सू. ८४ ) मातृ किंवा पितृ या शब्दांच्या पुढील स्वसृ शब्दाच्या सकाराला षकार आदेश समासामध्यें होतो.

१. ( सू. ८५ ) मातुर् किंवा पितुर् यांच्या पुढील स्वसृ शब्दाच्या सकाराला विकल्पानें षकार आदेश समासामध्यें होतो.

पितुःष्वसेति ।

**मातुः पितुरिति सान्तग्रहणानर्थक्यमेकदेशविकृतस्यानन्यत्वात् ॥ १ ॥**

मातुः पितुरिति सान्तग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । एकदेशविकृतस्यानन्यत्वात् । एकदेशविकृतमनन्यवद्भवतीति सान्तस्यापि भविष्यति ॥

**[ [1]अभिनिसः स्तनः शब्दसंज्ञायाम् ॥ ८ । ३ । ८६ ॥ ]**

**[1]उपसर्गप्रादुर्भ्यामस्तिर्यच्परः ॥ ८ । ३ । ८७ ॥**

अस्तिग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । अनुसृतम् विसृतमिति । नैतदस्ति प्रयोजनम् । यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतो न चैतं सकारं प्रति क्रियायोगः । इहापि तर्हि न प्राप्नोति [2]अभिषन्ति विषन्तीति न ह्यस्तिः क्रियावचनः । कः पुनराह नास्तिः क्रियावचन इति । क्रियावचनोऽस्तिः । आतश्च क्रियावचनो व्यत्यनुषते कर्तरि कर्मव्यतिहारे [ १. ३. १४ ] इत्यनेनात्मने-

( वा. १ ) मातुस् आणि पितुस् असे सकारान्त शब्द असतांनाही षत्व होते असें निराळें सांगावयास नको.

कां बरें ?

शब्दाच्या एकाद्या भागाला कांहीं विकार झाला म्हणून तेवढ्यानें कांहीं तो शब्द निराळा होत नाहीं. तेव्हां येथें मातुर् किंवा पितुर् यांच्या एका भागाला म्हणजे रेफाला विसर्ग होऊन सकार झाला तरी तो मातुर् किंवा पितुर् शब्द नव्हे असें म्हणतां येत नाहीं. तेव्हां अर्थातच मातुस् व पितुस् असे सकारान्त शब्द असतांनाही प्रकृत सूत्रानेंच षत्व होईल.

( सू. ८७ ) या सूत्रामध्यें अस् धातूच्या सकाराला षत्व होतें असें जें म्हटलें आहे तें कशाकरितां ?

अनुसृतं विसृतम् या उदाहरणांमध्यें सृ धातूच्या सकाराला षत्व होऊं नये म्हणून तसें म्हटलें आहे.

हा उपयोग बरोबर नाहीं. कारण गति आणि उपसर्ग यांचा ज्या क्रियेशीं संबंध असतो त्या क्रियेला दाखविणाऱ्या शब्दाचेच ते गति आणि उपसर्ग समजले जातात. अनुसृतम् वगैरे उदाहरणांमध्यें अनु वगैरे उपसर्ग सृ धातूचे समजले जातात त्यांतील सकाराचे ते उपसर्ग नव्हेत. कारण तेथें सकार हा क्रियेला दाखविणारा नाहीं.

तर मग [2]अभिषन्ति विषन्ति या उदाहरणांमध्येंही षत्व होणार नाहीं. कारण तेथें जरी अस् धातूपैकीं नुसता सकारच उरला असल्यामुळें तेवढा फक्त सकारच तेथें धातू आहे तरी पण अस् धातु हा क्रियावाचक नव्हे.

अस् धातु हा क्रियावाचक नव्हे असें कोण म्हणेल ? विचार केला असतां अस् हा जर धातु आहे तर तो क्रियावाचक आहेच. आणखीही पुढील कारणानें तो क्रियावाचक आहे असें म्हणतां येते. कारण [3]व्यत्यनुषते या उदाहरणामध्यें 'कर्तरि कर्मव्यतिहारे' ( १।३।१४ ) या सूत्रानें आत्मनेपद झालेलें आहे.

---

१. ( सू. ८६ ) अभिनिस् या उपसर्ग समुदायाच्या पुढील स्तन् धातूच्या सकाराला विकल्पानें षकार आदेश होतो तें शब्दाचें नांव असतांना.

१. ( सू. ८७ ) उपसर्गांतील इणाच्या किंवा प्रादुस् शब्दाच्या पुढील अस् धातूच्या सकाराला षकार होतो, त्या सकाराच्या पुढें यकार किंवा अच् असेल तर.

२. अस् भुवि. लट्. झि. अन्ति. शपाचा लुक्. श्नसोरल्लोपः यानें अकाराचा लोप. सन्ति. अभि या उपसर्गांचा योग केला असतां प्रकृत सूत्रानें षत्व. अभिषन्ति. त्याप्रमाणेंच विषन्ति वगैरे.

३. वि अति अनु हे उपसर्ग मागें असलेला अस् धातु. कर्तरि 'कर्मव्यतिहारे '( १।३।१४ ) यानें आत्मनेपद. शब्-लुक् वगैरे. व्यत्यनुषते.

पदं भवति । कर्मव्यतिहारश्च कः । क्रियाव्यतिहारः ॥ प्रादुःशब्दात्तर्हि मा भूत् । प्रादुःशब्दश्च नियतविषयः कृभ्वस्तियोग एव वर्तते ॥ उपसर्गात्तर्हि स्यतेर्मा भूदिति । इष्यत उपसर्गात्स्यतेः षत्वम् । आतश्चेष्यत एवं ह्याहोपसर्गात्सुनोतिसुवतिस्यतिस्तौतिस्तोभतिस्थासेनयसेधसिचसञ्जस्वञ्जाम् [ ८. ३. ६५ ] इति ॥ प्रादुःशब्दात्तर्हि स्यतेर्मा भूदिति । प्रादुःशब्दश्च नियतविषयः कृभ्वस्तियोग एव वर्तते ॥ इदं तर्हि प्रयोजनमिह मा भूत् अनुसूतेरपत्यमनुसूः अनुस्वोऽपत्यमानुसेयः ॥

## सुविनिर्दुर्भ्यः सुपिसूतिसमाः ॥ ८ । ३ । ८८ ॥

किमर्थं स्वपेः सुपिभूतस्य ग्रहणं क्रियते । **सुपेः षत्वं स्वपेर्मा भूत्**

---

त्या सूत्रामध्यें कर्मव्यतिहार म्हणजे काय ?

क्रियांचा जो विनिमय तोच कर्मव्यतिहार होय. तेव्हां असणें हीच क्रिया गृहीत धरावी लागत असल्यामुळें अभिषन्ति वगैरे उदाहरणांमध्यें अस् धातूपैकीं उरलेला सकार क्रियावाचक आहे असें सिद्ध होत आहे.

तर मग सूत्रामध्यें अस् धातूच्या सकाराला असें जें म्हटलें आहे त्याचा उपयोग प्रादुस् या अव्ययाच्या पुढें इतर धातूच्या सकाराला षत्व होऊं नये.

हाही उपयोग बरोबर नाहीं. कारण प्रादुस् या शब्दाचा प्रयोग काहीं विशेष ठिकाणींच होतो. म्हणजे कृ, भू, किंवा अस् यांचा योग असतांनाच प्रादुस् या शब्दाचा प्रयोग होतो. सु वगैरे धातु असतांना त्या शब्दाचा प्रयोगच होत नाहीं.

तर मग सूत्रामध्यें अस् धातूच्या सकाराला असें म्हणण्याचा उपयोग आम्ही असा सांगतों कीं उपसर्गाच्या पुढील 'सो' धातूच्या सकाराला षत्व होऊं नये.

पण त्या सो धातूच्या सकाराला षत्व होणें इष्टच आहे. आणि तें इष्ट आहे असें म्हणण्याचें कारण दुसरें असें कीं हा पाणिनि आचार्य 'उपसर्गात्सुनोतिसुवतिस्यति० ' ( ८।३।६५ ) या सूत्रामध्यें स्यति या शब्दानें दिवादि गणांतील सो धातूचा निर्देश करून उपसर्गाच्या पुढील त्या सो धातूच्या सकाराला षत्व सांगतच आहे.

तर मग प्रादुस् शब्दाच्या पुढील सो धातूच्या सकाराला षत्व होऊं नये म्हणून प्रकृत सूत्रामध्यें अस् धातूच्या सकाराला असें म्हटलें पाहिजे.

हें देखील म्हणणें संभवत नाहीं. कारण प्रादुस् शब्दाचा प्रयोग ठरलेला आहे. म्ह० कृ, भू, आणि अस् या धातूंचा योग असतांनाच त्याचा प्रयोग होत आहे असें आतांच सांगितलें आहे ना ?

तर मग प्रकृत सूत्रामध्यें अस् धातूच्या सकाराला असें जें म्हटलें आहे त्याचा उपयोग आम्ही असा सांगतों कीं आनुसेयः या उदाहरणामध्यें सू धातूपैकीं फक्त उरलेल्या सकाराला प्रकृत सूत्रानें षत्व होऊं नये. अनु या उपसर्गापुढें सू धातूला क्विप् प्रत्यय लागून अनुसू असा शब्द सिद्ध होतो. त्या अनुसूचें अपत्य अशा अर्थी अनुसू शब्दाला ढञ् प्रत्यय लागून सू यांतील ऊकाराचा लोप होऊन 'आनुसेय' असा शब्द सिद्ध होतो.

( सू. ८८ ) या सूत्रामध्यें स्वप् धातुला संप्रसारण होऊन जें त्याचें सुप् असें स्वरूप होतें तें मुद्दाम येथें कशाकरितां उच्चारलें आहे ?

---

१. ( सू. ८८ ) सु, वि, निर् आणि दुर् या शब्दांच्या पुढील सुप् सूति व सम या शब्दांच्या सकाराला षकार होतो.

सुपेः षत्वमुच्यते तत्स्वपेर्मा भूदिति । सुष्वप्तः विस्वप्नगिति ॥

**विसुष्वापेति केन न ।**

विसुष्वापेत्यत्र कस्मान्न भवति ।

**हलादिशेषान्न सुपिः**

हलादिशेषे कृते नैष सुपिर्भवति ॥ इदमिह संप्रधार्यम् । हलादिशेषः क्रियतां संप्रसारणमिति । किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्धलादिशेषः ।

**इष्टं पूर्वं प्रसारणम् ॥ १ ॥**

इष्यते हलादिशेषात्पूर्वं संप्रसारणम् । आतश्चेष्यत एवं ह्याहाभ्याससंप्रसारणं हलादिशेषाद्विप्रतिषेधेनेति ॥ एवं तर्हि स्थादिष्वभ्यासस्येत्येतस्मान्नियमान्न भविष्यति ।

**स्थादीनां नियमो नात्र प्राक्सितादुत्तरः सुपिः ।**

प्राक्सितसंशब्दनात्स नियम उत्तरश्च सुपिः पठ्यते ॥ एवं तर्ह्यर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्येवमेतस्य न भविष्यति ।

**अनर्थके विषुषुपुः**

यद्यर्थवतो ग्रहणं विषुषुपुरिति न

---

(वा. १) सुप् अशा स्वरूपाला षत्व सांगितलें आहे तें ज्या उदाहरणामध्यें स्वप् असेंच रूप कायम रहातें तेथें त्याच्या सकाराला षत्व होऊं नये म्हणून तसें म्हटलें आहे. उदा०— विस्वप्नः, विस्वप्नकः.

विसुष्वाप या उदाहरणामध्यें स्वप् धातूचें सुप् असें स्वरूप अभ्यासामध्यें होत असल्यानें तेथें प्रकृत सूत्रानें षत्व कां होत नाहीं ?

'हलादिः शेषः' ( ७।४।६० ) या सूत्रानें षकाराचा लोप होत असल्यामुळें तेथें सुप् असें स्वरूप तयार होत नाहीं.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो कीं 'हलादिः शेषः' ( ७।४।६० ) या सूत्रानें पकाराचा लोप अगोदर करावा किंवा 'लिट्यभ्यास०' ( ६।१।१७ ) या सूत्रानें वकाराला संप्रसारण अगोदर करावें.

मग यांत काय बरें अगोदर करावें ?

'हलादिः शेषः' या सूत्रानें स्वप् यांतील पकाराचा लोप संप्रसारणाचा परत्वास्तव बाध करून अगोदर प्राप्त होतो.

पण 'हलादिः शेषः' याच्यापेक्षां पूर्वी संप्रसारण करणें इष्ट आहे. आणखीही ते इष्ट आहे याचें कारण असें कीं—अभ्यासाला प्राप्त झालेलें संप्रसारण हें 'हलादिः शेषः' याचा विप्रतिषेधानें बाध करून अगोदर होते असें ( ६।१।१७ वा. १ ) वार्तिककारांनी सागितलें आहे.

तर मग विसुष्वाप या उदाहरणामध्यें प्रकृत सूत्रानें अभ्यासाला प्राप्त झालेलें षत्व 'स्थादिष्वभ्यासेन' ( ८।३।६४ ) या नियमामुळें होणार नाहीं असें आम्ही म्हणतों.

(वा.२) तो नियम परिनिविभ्यः० (८।३।७०) या सूत्रांतील सित शब्दाच्या पूर्वी उच्चारलेले जे धातु त्यांच्या संबंधानें लागू होतो, आणि सुप् धातु, त्या सित शब्दाच्या पुढें प्रकृत सूत्रामध्यें उच्चारला आहे.

तर मग विसुष्वाप या उदाहरणामध्यें सुप् हें स्वरूप अभ्यासामध्यें तयार होत आहे, आणि अभ्यास तर अनर्थक आहे. तेव्हां अर्थवानाचें ग्रहण संभवतांना अनर्थकाचें[२] ग्रहण करूं नये या परिभाषेनें येथें संप्रसारण होत नाहीं.

जर अर्थवानाचेंच ग्रहण होतें असें म्हणावें तर विषुषुपुः या उदाहरणामध्यें देखील अभ्या-

---

२. द्वित्व झालें तरी अर्थाची आवृत्ति प्रतीत होत नसल्यामुळें अभ्यासाला आनर्थक्य ठरत आहे.

सिध्यति । नैष दोषः । कथम् ।

सुपिभूतो द्विरुच्यते ॥ २ ॥

सुपिभूतस्य द्विर्वचनम् ॥

सुपेः षत्वं स्वपेर्मा भूद्विसुष्वापेति केन न ।

हलादिशेषान्न सुपिरिष्टं पूर्वं प्रसारणम् ॥ १ ॥

स्थादीनां नियमो नात्र प्राक्सितादुत्तरः सुपिः ।

अनर्थके विषुषुपुः सुपिभूतो द्विरुच्यते ॥ २ ॥

[ निनदीभ्यां स्नातेः कौशले ॥ ८ । ३ । ८९ ॥

सूत्रं प्रतिष्णातम् ॥८।३।९०॥ ]

कपिष्ठलो गोत्रे ॥ ८ । ३ । ९१ ॥

कपिष्ठलो गोत्रप्रकृतौ ॥ १ ॥

कपिष्ठलो गोत्रप्रकृताविति वक्तव्यम् । गोत्र इत्युच्यमान इहैव स्यात् । कापिष्ठलिः । इह न स्यात् । कपिष्ठलः कापिष्ठलायनः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नैवं विज्ञायते कपिष्ठल इति गोत्रे निपात्यत इति । कथं तर्हि । गोत्रे यः कपिष्ठलशब्दस्तस्य षत्वं निपात्यते यत्र वा तत्र वेति ॥

[ प्रष्ठोऽग्रगामिनि ॥ ८ ।३। ९२ ॥

वृक्षासनयोर्विष्टरः ॥ ८ ।३। ९३ ॥

---

साला षत्व होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

विषुषुपुः या उदाहरणामध्यें द्वित्वाच्या पूर्वीच संप्रसारण होऊन सुप् असें स्वरूप तयार होऊन नंतर त्याला द्वित्व होतें. म्हणून तेथें कांहीं दोष येत नाहीं.

(सू. ९१ वा. १) हें जें प्रकृत सूत्रानें कपिष्ठल शब्दामध्यें सकाराला षत्व सागतांना गोत्रे असें म्हटलें आहे तेथें गोत्रप्रकृतौ असें म्हटलें पाहिजे. कारण नुसतें गोत्रे असें म्हटलें असतां कापिष्ठलिः याच उदाहरणामध्यें फक्त षत्व होईल आणि कपिष्ठलः कापिष्ठालायनः या उदाहरणांमध्यें षत्व होणार नाहीं.

तर मग तसें म्हटले पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण गोत्र अर्थ गम्यमान असताना कपिष्ठल शब्दामध्यें सकाराला षत्व होतें असा प्रकृत सूत्राचा अर्थ समजूं नये.

तर मग त्याचा अर्थ कसा समजावा ?

असा समजावा कीं–गोत्र म्हणजे वंशप्रवर्तक मूळ पुरुष या अर्थाच्या कपिष्ठल शब्दामध्यें वाटेल त्या ठिकाणीं षत्व होतें, असा अर्थ समजावा.

---

१. (सू. ८९) नि आणि नदी यांच्या पुढील स्ना धातच्या सकाराला षकार होतो कौशल हा अर्थ गम्यमान होत असतांना.

१. ( सू. ९० ) प्रति उपसर्गांच्या पुढील स्नात शब्दाच्या सकाराला षकार होतो त्याचा सूत्र हा अर्थ असेल तर.

१. ( सू. ९१ ) कपि शब्दाच्या पुढील स्थल शब्दाच्या सकाराला षकार होतो वंशप्रवतक मूळ पुरुष असा त्याचा अर्थ असेल तर.

२. कपिष्ठलस्य गोत्रापत्यं पुमान् कापिष्ठलिः येथेंच षत्व होईल. आणि परम-प्रकृति कपिष्ठल येथे व युवप्रत्ययान्त कापिष्ठलायनः येथें होणार नाहीं.

१. (सू. ९२) प्रष्ठ शब्दामध्यें प्र शब्दाच्या पुढील स्थ शब्दाच्या सकाराला षकार होतो, अग्रेसर (पुढारी) हा अर्थ असेल तर.

१. ( सू. ९३ ) विष्टर या शब्दामध्यें वि उपसर्गाच्या पुढील स्तॄ धातूच्या सकाराला षकार आदेशाचें निपातन केलें जात आहे वृक्ष किंवा आसन हा विष्टर शब्दाचा अर्थ असेल तर.

छन्दोनाम्नि च ॥ ८ । ३ । ९४ ॥

गवियुधिभ्यां स्थिरः ॥ ८ । ३ । ९५ ॥

विकुशमिपरिभ्यः स्थलम् ॥ ८ । ३ । ९६ ॥ ]

अम्बाम्बगोभूमिसव्यापद्वित्रिकुशेकुशङ्क्वङ्गुमञ्जिपुञ्जिपरमेबर्हिर्दिव्यग्निभ्यः स्थः ॥ ८ । ३ । ९७ ॥

स्थ इति किमिदं धातुग्रहणमाहोस्विद्रूपग्रहणम् । किं चातः । यदि धातुग्रहणं गोस्थानमित्यत्र प्राप्नोति । अथ रूपग्रहणं सव्येष्ठाः परमेष्ठी सव्येष्ठा सारथिरित्यत्र न प्राप्नोति । यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावद्धातुग्रहणम् । कथं गोस्थानमिति । सवनादिषु पाठः करिष्यते । अथवा पुनरस्तु रूपग्रहणम् । कथं सव्येष्ठाः परमेष्ठी सव्येष्ठा सारथिरिति । स्थस्थास्थिन्स्थॄणामिति वक्तव्यम् ॥

सुषामादिषु च ॥ ८ । ३ । ९८ ॥

---

(सू. ९७) या सूत्रामध्ये स्थः असें जें म्हटलें आहे त्यानें स्था धातूचें ग्रहण करावें किंवा स्था धातूचें कांहीं उदाहरणांमध्यें तयार होत असलेलें जें 'स्थ' असें स्वरूप त्याचें ग्रहण करावें ?

यांत काय फरक होतो ?

फरक असा होतो कीं जर स्था धातूचें ग्रहण केलें तर गोस्थानम् येथें देखील सकाराला षत्व होऊं लागेल.

बरें; आता जर स्थ अशा स्वरूपाचें ग्रहण करावें तर सव्येष्ठाः परमेष्ठी सव्येष्ठा सारथिः या उदाहरणांमध्यें स्था धातूचें स्थ असें रूप तयार होत नसल्यामुळें षत्व होणार नाहीं.

यापैकीं तुला वाटेल तें असू दे. स्थः हें स्था धातूचें ग्रहण कां होईना ? होऊं दे.

तर मग गोस्थानम् या उदाहरणामध्यें षत्व कां होत नाहीं ?

गोस्थानम् येथें षत्व न होण्याकरितां त्या शब्दाचा सवनादिगणामध्ये ( ८।३।११० ) पाठ करतां येईल.

किंवा स्थः हें स्थ अशा स्वरूपाचें ग्रहण असलें तरी हरकत नाहीं. तसें केलें असतां सव्येष्ठाः परमेष्ठी सव्येष्ठा सारथिः या उदाहणांमध्यें प्रकृत सूत्रानें षत्व कसें करतां येईल ?

सूत्रामध्यें स्थः याच्या ऐवजीं स्थ:स्थास्थिस्थॄणाम् असें म्हणावें म्हणजे झालें.

---

१. ( सू. ९४ ) छन्द-म्ह० वृत्ताचें नांव असतांनाही वि उपसर्गाच्या पुढील स्तॄ धातूच्या सकाराला षत्वाचें निपातन केलें जात आहे.

१. (सू. ९५) गवि आणि युधि यांच्या पुढील स्थिर शब्दाच्या सकाराला षकार आदेश होतो.

१. ( सू. ९६ ) वि, कु, शमि आणि परि यांच्या पुढील स्थल शब्दाच्या सकाराला षकार आदेश होतो.

१. ( सू. ९७ ) अम्ब आम्ब गो भूमि सव्य अप द्वि त्रि कु शेकु शङ्कु अङ्गु मञ्जि पुञ्जि परमे बर्हिस् दिवि आणि अग्नि यांच्या पुढील स्थ शब्दाच्या सकाराला षकार आदेश होतो.

२. ष्ठा गतिनिवृत्तौ. धात्वादेः षःसः. क्विप्. 'ईत्वमवकारादौ' या वार्तिकानें ईत्वाचा निषेध होऊन स्था शब्द आकारान्त बनतो 'परमे कित्' ( उ. ४।१० ) या उणादि सूत्रानें परमशब्द उपपद असतां स्था धातूहून इन् प्रत्यय. कित्वास्तव आकार लोप होऊन स्थिन् शब्द बनतो. 'सव्ये स्थश्छन्दसि' ( उ. २।१०१ ) या उणादि सूत्रानें सव्य शब्द उपपद असतां स्था धातूहून ऋ प्रत्यय. त्याला ङित्वाचा अतिदेश असल्यामुळें टि संज्ञक भागाचा लोप. स्थृ असा ऋकारान्त शब्द बनतो. सव्य आणि परम या शब्दांच्या पुढील सप्तमीचा अलुक् ( ६।३।१४ ) झाला आहे.

१. ( सू. ९८ ) सुषामा वगैरे गणपठित शब्दांमध्यें इणाच्या किंवा कवर्गाच्या पुढील सकाराला षकार आदेश होतो.

अविहितलक्षणो मूर्धन्यः सुषामादिषु द्रष्टव्यः ॥

[एति संज्ञायामगात् ॥ ८ । ३ । ९९ ॥

नक्षत्राद्वा ॥ ८ । ३ । १०० ॥]

ह्रस्वात्तादौ तद्धिते ॥ ८ । ३ । १०१ ॥

ह्रस्वात्तादौ तिङि प्रतिषेधः ॥ १ ॥

ह्रस्वात्तादौ तिङि प्रतिषेधो वक्तव्यः । भिन्द्युस्तराम् छिन्द्युस्तरामिति ॥

[निसस्तपतावनासेवने ॥ ८ । ३ । १०२ ॥

युष्मत्तत्ततक्षुःष्वन्तःपादम् ॥ ८ । ३ । १०३ ॥

यजुष्येकेषाम् ॥ ८ । ३ । १०४ ॥]

स्तुतस्तोमयोश्छन्दसि ॥ ८ । ३ । १०५ ॥

स्तुतस्तोमयोश्छन्दस्यनर्थकं वचनं पूर्वपदादिति सिद्धत्वात् ॥ १ ॥

स्तुतस्तोमयोश्छन्दसि वचनमनर्थकम् । किं कारणम् । पूर्वपदादिति सिद्धत्वात् । पूर्वपदात् [ ८. ३. १०६ ] इत्येव सिद्धम् ॥

[पूर्वपदात् ॥ ८ । ३ । १०६ ॥

(सू. ९८) ज्या कोणत्याही शब्दामध्यें सकाराला षत्व झालेलें दृष्टीस पडत असेल आणि तें षत्व कोणत्याही सूत्रानें होण्याचा संभव नसेल तर तो शब्द सुषामादि गणामध्यें आहे असें समजावें.

(सू. १०१ वा. १) तकारादि तद्धित प्रत्यय पुढें असतांना ह्रस्व इणाच्या पुढील सकाराला हें जें प्रकृत सूत्रानें षत्व सांगितलें आहे तें तिङन्तामधील म्हणजे क्रियापदामधील सकाराला होत नाहीं असें म्हणावें उदा०—भिन्द्युस्तराम् छिन्द्युस्तराम्.

(सू. १०५ वा. १) स्तुत आणि स्तोम या शब्दांतील सकाराला जें हें प्रकृत सूत्रानें वेदामध्यें षत्व सांगितलें आहे तें निरर्थक आहे.

कां बरें ?

'पूर्वपदात्' (८।३।१०६) या पुढील सूत्रानें तें सिद्ध होत आहे.

---

१. (सू. ९९) गकाराशिवाय कवर्ग किंवा इण् याच्या पुढें असून षकाराच्या मागें असलेल्या सकाराला षकार आदेश होतो, तो शब्द कोणाचें तरी रूढ नांव असेल तर.

१. (सू. १००) नक्षत्रवाचक शब्दांतील जो गकाराशिवाय कवर्ग किंवा इण् यांच्या पुढील आणि षकाराच्या मागील सकार त्याला विकल्पानें षकार आदेश होतो तो शब्द रूढ नांव असेल तर.

१. (सू. १०१) ह्रस्व अशा इणाच्या पुढील सकाराला षकार आदेश होतो, आरंभी तकार असलेला तद्धित प्रत्यय पुढें असतांना.

१. (सू. १०२) निस् शब्दाच्या सकाराला षकार आदेश होतो तप् धातु पुढें असतांना, वारंवार हा अर्थ मनांत येत नसेल तर.

१. (सू. १०३) त्वं त्वा, ते, तव, तत् आणि ततक्षुस् या शब्दांच्या मागें असून इणाच्या पुढें असलेल्या सकाराला षकार आदेश होतो, पण तो सकार पादाच्या शेवटीं नसेल तर.

१. (सू. १०४) यजुर्वेदामध्यें त्वं, त्वा, ते, तव, तत्, ततक्षुस् यांच्या मागील असून इणाच्या पुढें असलेल्या सकाराला विकल्पानें षकार आदेश होतो.

१. (सू. १०५) वेदामध्यें इणाच्या पुढील स्तुत किंवा स्तोम शब्दाच्या सकाराला षकार आदेश विकल्पानें होतो.

२. पूर्वींचे जें पद तें पूर्वपद असा तेथें पूर्वपद शब्दाचा अर्थ आहे. तें समासांतीलच पाहिजे असा आग्रह नाहीं.

१. (सू. १०६) पूर्वपदांतील निमित्त म्ह. अर्थात् इण् किंवा कवर्ग, त्यांच्या पुढील सकाराला विकल्पानें षकार आदेश वेदामध्यें होतो.

सुञः ॥ ८ । ३ । १०७ ॥ ]

सनोतेरनः ॥ ८ । ३ । १०८ ॥

सनोतेरन इति च ॥ १ ॥

किम् । वचनमनर्थकमित्येव । किं कारणम् । पूर्वपदादिति सिद्धत्वात् ॥ नियमार्थं तर्हीदं वक्तव्यम् । सनोतेरनकारस्यैव यथा स्यात् । इह मा भूत् । गोसनिमिति ।

सनोतेरन इति नियमार्थमिति चेत्सवनादिकृतत्वात्सिद्धम् ॥ २ ॥

सनोतेरन इति नियमार्थमिति चेत्सवनादिषु पाठः करिष्यते ॥

सनर्थं तु ॥ ३ ॥

सनर्थं त्विदं वक्तव्यम् । सिसनिषति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । स्तौतिण्योरेव षण्यभ्यासात् [ ८. ३. ६१ ] इत्येतस्मान्नियमान्न भविष्यति ॥ ण्यर्थं तर्हीदं वक्तव्यम् । सिसानयिषति । कथं पुनरण्यन्तस्य प्रतिषेधे

---

( सू. १०८ वा. १ ) सनोतेरनः हें सूत्र देखील—

देखील म्हणजे काय ?

हें सूत्र देखील निरर्थक आहे असें समजावें.

का बरें ?

'पूर्वपदात्' ( ८।३।१०६ ) या सूत्रानेंच सिद्ध होत आहे म्हणून.

तर मग 'सनोतेरनः' हें प्रकृत सूत्र नियमाकरितां केलें पाहिजे. तो नियम असा कीं सन् धातूच्या सकाराला जर षत्व होईल तर तो सन् धातु जेथें नकारान्त नसेल तेथेंच करावें. इतर ठिकाणीं म्हणजे जेथें सन् धातूचा नकार कायम रहात असेल तेथें त्याच्या सकाराला षत्व न झालें पाहिजे. उदा०—गोसनिम्.

(वा.२) 'सनोतेरनः' हें प्रकृत सूत्र नियमाकरितां पाहिजे म्हणजे सन् धातु जेथें नकारान्त कायम रहात असेल तेथें षत्व न झालें पाहिजे असें म्हणाल तर तसें म्हणतां येत नाहीं; सवनादिगणामध्यें त्याचा पाठ केला असतां काम भागेल. तात्पर्य असें कीं, गोसनिम्[2] या शब्दाचा सवनादि गणामध्यें पाठ करतां येईल.

(वा. ३) सन्प्रत्ययान्त उदाहरणांमध्यें नकारान्त सन् धातूला षत्व न होण्याकरितां नियमार्थ प्रकृत सूत्र केले पाहिजे. उदा०— सिसनिषति.

हा देखील प्रकृत सूत्राचा उपयोग संभवत नाहीं. कारण 'स्तौतिण्योरेव षण्यभ्यासात्' ( ८।३।६१ ) या सूत्रानें स्तु धातु आणि ण्यन्त धातू यांनाच षत्व होतें, असा नियम केला असल्यामुळें सिसनिषति येथें षत्व होणार नाहीं.

तर मग ण्यन्त सन् धातूच्या उदाहरणांमध्यें नकारान्त सन् धातूच्या सकाराला षत्व न होण्याकरितां प्रकृत सूत्र केलें पाहिजे. उदा०— सिसानयिषति.

पण प्रकृत सूत्रामध्यें सनोतेः असें णिच् प्रत्यय केल्याशिवाय नुसत्या सन् धातूचा उच्चार करून त्याला षत्वाचा निषेध सांगितला आहे. तेव्हां तो निषेध सन् धातूहून णिच् प्रत्यय केला असतांना त्या ण्यन्त सन् धातूला कसा

---

१. ( सू. १०७ ) पूर्वीच्या पदांतील इणाच्या किंवा कवर्गाच्या पुढील सुञ् या निपाताच्या सकाराला षकार वेदामध्यें होतो.

१. (सू. १०८) पूर्वपदांतील इण् किंवा कवर्ग यांच्या पुढील सनोति धातूच्या सकाराला षत्व करणें झाल्यास त्या सनोति धातूच्या शेवटी नकार नसतांनाच करावें.

२. कर्म उपपद असतांना सन् धातूहून 'छन्दसि वनसनरक्षि०' ( ३।२।२७ ) या सूत्रानें इन् प्रत्यय. उपपद समास. गोसनिम्.

ण्यन्तः शक्यो विज्ञातुम् । सामर्थ्यात् । अण्यन्तस्य प्रतिषेधवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वा ण्यन्ते विज्ञास्यते ॥ अथवायमस्त्यण्यन्तः । सिसनिषतेरप्रत्ययः सिसनीः ॥

[ सहेः पृतनर्ताभ्यां च ॥ ८ । ३ । १०९ ॥ ]

## न रपरसृपिसृजिस्पृशिस्पृहिसवनादीनाम् ॥ ८ । ३ । ११० ॥

किमर्थं सवनादिष्वश्वसनिशब्दः पठ्यते । पूर्वपदात् [ ८. ३. १०६ ] इति षत्वं प्राप्नोति तद्बाधनार्थम् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । इणन्तादिति तत्रानुवर्ततेऽनिणन्तश्चायम् । नैव प्राप्नोति नार्थः प्रतिषेधेन ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्सवनादिष्वश्वसनिशब्दं पठति तज्ज्ञापयत्याचार्योऽनिणन्तादपि षत्वं भवतीति । किमेतस्य ज्ञापने

---

लागू पडेल ?

प्रकृत सूत्रामध्यें जरी सनोतेः असें णिचाशिवाय साधेंच उच्चारून निषेध सांगितला आहे तरी त्या निषेधाचा उपयोग णिच् न करतां साध्या सन् धातूला होत नाहीं; म्हणून त्याच्या जोरावर ण्यन्त सन् धातू असतांना त्या निषेधाचा म्हणजे नकारान्त सन् धातूला षत्व होत नाहीं याचा उपयोग करतां येईल. किंवा णिच् प्रत्यय केल्याशिवाय नुसत्या सन् धातूचें प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या निषेधाला उदाहरण संभवतें. तें असें:-सिसनिष् या सन्नन्त धातूहून क्विप् प्रत्यय करून त्या सिसनिस् शब्दाचें प्रथमेचें एकवचन सिसनीः[3] असे होतें. तेथें षत्व झालेला सन् प्रत्यय नसल्यामुळें 'स्तौतिण्योः०' ( ८।३।६३ ) हा नियम लागू पडत नाहीं. तेव्हां तेथें नकारान्त सन् धातूला षत्व न होण्याकरितां सनोतेरनः हें प्रकृत सूत्र नियमार्थ केलें पाहिजे.

(सू. ११०) सवनादि गणामध्यें पाणिनीनें अश्वसनि हा जो शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

अशाकरितां कीं, अश्वसनि शब्दामध्यें 'पूर्वपदात्' ( ८।३।१०६ ) या सूत्रानें षत्व प्राप्त होतें त्याचा बाध होण्याकरितां.

हा उपयोग संभवत नाहीं. कारण 'पूर्वपदात्' या सूत्रामध्यें इणः याची अनुवृत्ति होत असल्यामुळें इणन्त पूर्वपद असेल त्या ठिकाणीं त्यानें षत्व प्राप्त होईल. आणि अश्व हा शब्द तर इणन्त नाहीं. तेव्हां तेथें षत्वाची प्राप्तीच येत नाहीं. मग निषेध कशाकरितां ?

अशा रीतीनें अश्वसनि हें उदाहरण आपोआपच सिद्ध होत असतांना ज्या अर्थी हा पाणिनि सवनादि गणामध्यें मुद्दाम हा अश्वसनि शब्द घालतो त्यावरून तो असें सुचवितो कीं—इणन्त पूर्वपद नसतांही 'पूर्वपदात्' या सूत्रानें षत्व होतें.

या ज्ञापकाचा उपयोग काय ?

---

३. सिसनिस या सन्नत धातूहून क्विप्. अतो लोपः. सु प्रत्यय. त्याचा हल्ङ्यादिलोप. सन् प्रत्ययाच्या सकाराला षत्व प्राप्त होतें. परंतु त्याला असिद्धत्व असल्यामुळें रुत्व केलें जातें. 'वोरुपधाया०' (८।२।७६) यानें दीर्घ. विसर्ग. सिसनीः.

१. ( सू. १०९ ) पृतना आणि ऋत या शब्दांपुढील सह धातूच्या सकाराला षकार आदेश होतो.

१. ( सू. ११० ) रेफाच्या मागील सकाराला आणि सृप्, सृज्, स्पृश्, स्पृह् व सवनादिगणांतील शब्द यांच्या सकाराला षकार होत नाहीं.

प्रयोजनम् । जलाषाहं माष इत्येतत्सिद्धं भवति । अथवैकदेशविकृतार्थोऽयमारम्भः । अश्वषा इति ॥

[ सात्पदाद्योः ॥८।३।१११ ॥ ]

सिचो यङि ॥ ८ । ३ । ११२ ॥

उपसर्गादिति या प्राप्तिर्भवितव्यं तस्याः प्रतिषेधेनोताहो न । न भवितव्यम् । किं कारणम् । उपसर्गात्षत्वं प्रतिषेधविषय आरभ्यते तद्यथैव पदादिलक्षणं प्रतिषेधं बाधत एवं सिचो यङीत्येतमपि बाधते ॥ न बाधते । किं कारणम् । येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्ते पदादिलक्षणे प्रतिषेध उपसर्गात्षत्वमारभ्यते सिचो यङीत्येतस्मिन्पुनः प्राप्ते चाप्राप्ते च ।

---

या ज्ञापकानें जलाषाह[2], माषः या उदाहरणांमध्यें षत्व होतें हा त्या ज्ञापकाचा उपयोग आहे. अथवा अश्वसनि हा शब्द अशाकरितां घातला आहे कीं, जेथें अश्वसनि हे शब्दाचें स्वरूप कायम रहात असेल तेथेंच हा निषेध व्हावा; ज्या ठिकाणीं त्यातील कांहीं भागाला विकार होत असेल त्या ठिकाणीं हा निषेध होऊं नये[3]. उदा०—अश्वषाः.

(सू. ११२) आतां या सिच् धातुला यङ् पुढें असतांना 'उपसर्गात्सुनोति' या सूत्रानें जें षत्व प्राप्त होतें त्याचा प्रकृत सूत्रानें निषेध होतो किंवा नाहीं ?

त्याचा प्रकृत सूत्रानें निषेध होत नाहीं.

कां बरें ?

'उपसर्गात्सुनोति' या सूत्रानें जें षत्व सांगितलें आहे तें निषेध दूर करून षत्व होण्याकरितांच मुद्दाम सांगितलें आहे ना ? तेव्हां जसें 'सात्पदाद्योः' (८।३।१११) या सूत्रानें सांगितलेला जो पदाच्या आरंभींच्या सकाराला षत्वाचा निषेध त्याचा जसा 'उपसर्गात्सुनोति' हा विधि बाध करतो तसा प्रकृत 'सिचो यङि' या सूत्रानें सांगितलेल्या निषेधाचा देखील बाध करील.

प्रकृत 'सिचो यङि' या सूत्रानें सांगितलेल्या निषेधाचा 'उपसर्गात्सुनोति' हा विधी बाध करीत नाहीं.

कां बरें ?

ज्या निषेधाची सर्व उदाहरणांमध्यें प्राप्ति येत असेल त्या निषेधाचाच त्या विधीनें बाध होतो. आणि त्याप्रमाणें 'उपसर्गात्सुनोति०' या षत्वाच्या सर्व उदाहरणामध्यें 'सात्पदाद्योः' हा निषेध कोठें येत नाहीं असें नाहीं. तेव्हां अर्थातच त्या निषेधाला दूर करण्याकरितांच 'उपसर्गात्सुनोति' या सूत्रानें षत्वाचा विधि केला आहे. प्रकृत 'सिचो यङि' या सूत्रानें सांगितलेला निषेध तर 'उपसर्गात्सुनोति' याच्या

---

२. जलाषाहम् येथें जल शब्द उपपद असतांना सह् धातूहून क्विप्. दीर्घ (६।३।११६) आणि षत्व झालें आहे. मा धातूहून भावी क्विप् प्रत्यय करून मान या अर्थाचा मा शब्द सिद्ध होतो. तो मा शब्द उपपद असतांना सन् धातूहून विट् प्रत्यय (३।२।६७) नकाराला आकार आदेश (६।४।४१) षत्व होऊन माषा असा शब्द सिद्ध होतो. त्याचें षष्ठीचें एकवचन माषः असें आकाराचा लोप होऊन (६।४।१४०) झालें आहे.

३. ह्या पक्षीं जलाषाहम्, माषः या शब्दांची सुषामादिगणामध्यें कल्पना करून सिद्धि करावी.

१. (सू. १११) साति प्रत्ययाच्या सकाराला आणि पदाच्या आरंभीच्या सकाराला षकार आदेश होत नाहीं.

१. (सू. ११२) सिच् धातूच्या सकाराला यङ् प्रत्यय पुढें असतांना षकार आदेश होत नाहीं.

अथवा पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इत्येवमुपसर्गात्षत्वं पदादिलक्षणं प्रतिषेधं बाधिष्यते सिचो यङीत्येतं न बाधिष्यते । तस्मादभिसेसिष्यत इति भवितव्यम् ॥

[ सेधतेर्गतौ[1] ॥ ८ । ३ । ११३ ॥

प्रतिस्तब्धनिस्तब्धौ[1] च ॥ ८ । ३ । ११४ ॥ ]

सोढः[1] ॥ ८ । ३ । ११५ ॥

किमर्थं सहिः सोढभूतो गृह्यते । यत्रास्यैतद्रूपं तत्र यथा स्यात् । इह मा भूत् । परिषहत इति ॥

स्तम्भुसिवुसहां चङि[1] ॥ ८ । ३ । ११६ ॥

स्तम्भुसिवुसहां चङ्युपसर्गात् ॥ १ ॥

स्तम्भुसिवुसहां चङ्युपसर्गादिति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । उपसर्गाद्या प्राप्तिस्तस्याः प्रतिषेधो यथा स्यात् । अभ्यासाद्या प्राप्तिस्तस्याः प्रतिषेधो मा भूदिति । पर्यसीषहत् ॥

सुनोतेः स्यसनोः[1] ॥ ८ । ३ । ११७ ॥

---

उदाहरणांपैकीं कांहीं ठिकाणीं प्राप्त होतो आणि कांहीं ठिकाणीं प्राप्त होत नाहीं. तेव्हां अर्थातच ‘उपसर्गात्सुनोति०’ या सूत्रानें सांगितलेल्या षत्वाचा विधि हा प्रकृत ‘सिचो यङि’ यानें सांगितलेल्या निषेधाचा बाध करावा या उद्देशानें केलेला नाहीं.

अथवा अपवादशास्त्र पाणिनीनें जर पूर्वी उच्चारलें असेल तर तें आपल्या जवळच्याच विधीचा बाध करतें, दूर असलेल्या विधीचा बाध करीत नाहीं, या न्यायानें ‘उपसर्गात्सुनोति’ (८।३।६५ ) या सूत्रानें सांगितलेलें षत्व त्याच्या जवळ असलेल्या ‘ सात्पदाद्योः ’ या निषेधाचा बाध करील. ‘सिचो यङि ’ हा निषेध त्यापेक्षां दूर असल्यामुळें त्याचा बाध करणार नाहीं. तेव्हां एकंदरींत अभिसेसिष्यते असेंच रूप होतें.

(सू. ११५) सह् धातूचें जेथें सोढ् असें स्वरूप होत असेल तेथें या सूत्रानें मुद्दाम जो षत्वाचा निषेध सांगितला आहे तो कशाकरितां ?

अशाकरितां कीं या सह् धातूचें सोढ् हें स्वरूप जेथें होत असेल तेथेंच हा निषेध झाला पाहिजे. इतर ठिकाणीं हा निषेध न झाला पाहिजे. उदा०—परिषहते.

(सू. ११६ वा. १) स्तम्भ् सिव् आणि सह् या धातूंच्या सकाराला चङ् प्रत्यय पुढें असतांना जो हा षत्वाचा निषेध सांगितला आहे तो उपसर्गाला मानून आलेल्या षत्वाचाच होतो असें समजावें.

असें म्हणण्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं, उपसर्गाला मानून जी षत्वाची प्राप्ति येते तिचाच हा निषेध झाला पाहिजे. अभ्यासाच्या निमित्तानें जी प्राप्ति येते तिचा हा निषेध न झाला पाहिजे. उदा०पर्यसीषहत्.

---

१. ( सू. ११३ ) गमन या अर्थाला दाखविणाऱ्या सेधति धातूच्या सकाराला षकार आदेश होत नाहीं.

१. ( सू. ११४ ) प्रतिस्तब्ध आणि निस्तब्ध या शब्दांमध्यें सकाराला षकार आदेश होत नाहीं.

१. ( सू. ११५ ) सोढ् या स्वरूपांत आलेल्या सह धातूच्या सकाराला षत्व होत नाहीं.

१. ( सू. ११६ ) स्तम्भु सिवु आणि सह् या धातूंच्या सकाराला चङ् प्रत्यय पुढें असतांना षकार आदेश करूं नये.

१. ( सू. ११७ ) स्य किंवा सन् प्रत्यय पुढें असतांना सुनोति धातूच्या सकाराला षकार आदेश होत नाहीं.

सनि किमुदाहरणम् । सुसूषति । नैतदस्ति प्रयोजनम् । स्तौतिण्योरेव षणीत्येतस्मान्नियमान्न भविष्यति ॥ इदं तर्हि । अभिसुसूषति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । स्थादिष्वभ्यासेन चाभ्यासस्य [ ८. ३. ६४ ] इत्येतस्मान्नियमान्न भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । अभिसुसूषतेरप्रत्ययोऽभिसुसूः ॥

**सदेः परस्य लिटि ॥ ८ । ३ । ११८ ॥**

**सदो लिटि प्रतिषेधे स्वञ्जेरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

सदो लिटि प्रतिषेधे स्वञ्जेरुपसंख्यानं कर्तव्यम् । परिषस्वजे ॥

**[ निव्यभिभ्योऽड्व्यवाये वा छन्दसि ॥ ८ । ३ । ११९ ॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्येऽष्टमस्याध्यायस्य तृतीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

( सू. ११७ ) सन् प्रत्यय पुढें असतांना सु धातूच्या सकाराला जो हा प्रकृत सूत्रानें षत्वाचा निषेध सांगितला आहे त्याचें उदाहरण कोणतें ?

सुसूषति. या ठिकाणीं षत्व होणें हें त्याचें उदाहरण होय.

हें उदाहरण संभवत नाहीं. कारण ' स्तौतिण्योरेव० ' ( ८।३।६१ ) या सूत्रानें नियम केला असल्यानें सुसूषति या उदाहरणामध्यें षत्व होणार नाहीं.

तर मग अभिसुसूषति हें उदाहरण घ्या. या ठिकाणीं अभ्यासांतील सकाराला षत्व न व्हावें असा प्रकृत सूत्रानें केलेल्या निषेधाचा उपयोग सांगतां येईल.

हें देखील उदाहरण संभवत नाहीं. कारण ' स्थादिष्वभ्यासेन० ' ( ८।३।६४ ) या सूत्रानें नियम केला असल्यामुळें येथें षत्व होणार नाहीं.

तर मग अभिसुसूः निसुसूः हीं उदाहरणें घ्या. या ठिकाणीं अभि उपसर्गपूर्वक सुसूष या सन् प्रत्ययान्त धातूहून क्विप् प्रत्यय करून जो अभिसुसूस् असा शब्द सिद्ध होतो त्याचें अभिसुसूः हें प्रथमेचें एकवचन आहे. या ठिकाणीं सन् प्रत्यय षत्व झालेला नसल्यामुळें ' स्तौतिण्योरेव० ' या नियमानें काम भागणार नाहीं.

( सू. ११८ वा. १ ) सद् धातूला द्वित्व केलें असतांना त्यांतील पुढील भागामध्यें असलेल्या सकाराला जो हा प्रकृत सूत्रानें लिट् प्रत्यय पुढें असतांना निषेध सांगितला आहे तसाच निषेध स्वञ्ज् धातूसंबंधीं देखील सांगितला पाहिजे. उदा.—परि षस्वजे.

याप्रमाणें भगवान् पतञ्जलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील आठव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें; व तिसरा पादही समाप्त झाला.

---

१. ( सू. ११८ ) लिट् प्रत्यय पुढें असतांना अभ्यासाच्या पुढील जो सद् धातूचा सकार त्याला षकार आदेश होत नाहीं.

१. ( सू. ११९ ) नि वि आणि अभि या उपसर्गांच्या पुढील जो अडागम त्याच्या पुढील सकाराला षकार आदेश वेदामध्यें विकल्पेंकरून होत नाहीं.

## रषाभ्यां नो णः समानपदे ॥ ८ । ४ । १ ॥

**रषाभ्यां णत्व ऋकारग्रहणम् ॥ १ ॥**

रषाभ्यां णत्व ऋकारग्रहणं कर्तव्यम् । रषाभ्यां नो णः समानपद ऋकाराच्चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । मातृणाम् पितृणामिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । योऽसावृकारे रेफस्तदाश्रयं णत्वं भविष्यति । न सिध्यति । किं कारणम् । न हि वर्णैकदेशा वर्णग्रहणेन गृह्यन्ते ॥

**एकदेशे नुडादिषु चोक्तम् ॥ २ ॥**

किमुक्तम् । अग्रहणं चेन्नुड्विधिलादेशविनामेष्वृकारग्रहणमिति । तस्माद् गृह्यन्ते ॥ एवमपि न सिध्यति । किं कारणम् । अनन्तरत्वात् । यत्तद्रेफात्परं भक्तेस्तेन व्यवहितत्वान्न प्राप्नोति । अड्व्यवाय इत्येवं भविष्यति । न सिध्यति । किं कारणम् । वर्णैकदेशाः के वर्णग्रहणेन गृह्यन्ते ये

---

( सू. १ वा. १ ) या सूत्रामध्यें ऋकार ग्रहण करावें. एका पदामध्यें जसें हें प्रकृत सूत्रानें रेफ आणि षकार यांच्या पुढील नकाराला णत्व सांगितलें आहे तसें ऋकाराच्या पुढील नकाराला णत्व होतें असें सांगावें. कारण मातृणा पितृणाम् या उदाहरणांमध्यें देखील नकाराला णत्व झालें पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण ऋ या वर्णामध्यें रेफ असून त्याच्या सभोंवतीं अज्भक्ति म्हणजे स्वराचा भाग आहे. तेव्हां तो जो ऋकारामध्यें असणारा रेफ त्याच्या निमित्तानें मातृणां पितृणाम् येथें णत्व करतां येईल.

अशा रीतीनें रूपसिद्धि होणार नाहीं.

कां बरें ?

वर्णांचा एक भाग हा स्वतंत्र वर्णासारखा गृहीत धरतां येत नाहीं म्हणून.

( वा. २ ) वर्णाच्या एका भागाचें स्वतंत्र वर्णासारखें ग्रहण करावें किंवा न करावें याबद्दल पूर्वी नुट् वगैरेंविषयीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

असें सांगितलें आहे कीं– वर्णांचा भाग स्वतन्त्र वर्णासारखा गृहीत धरला नाहीं तर नुट् आगम, लकार आदेश, आणि विनाम म्हणजे दन्त्य वर्णाला मूर्धन्य वर्ण आदेश या तीन ठिकाणीं ऋकार हे स्वतंत्र निमित्त धरावें लागेल ( १।१ ऐ औच्. वा. ११ ). तेव्हां अर्थातच वर्णांचा भाग सुद्धां स्वतंत्र वर्णासारखा गृहीत धरावा लागतो. तेव्हां ऋकारामध्यें असलेला जो रेफ त्याच्या निमित्तानें णत्व करतां येईल.

असें मानलें तरी सिद्ध होत नाहीं.

कां बरें ?

समीप नाहीं म्हणून. म्हणजे ऋकारामधील रेफाच्या पुढें जें कांहीं अज्भक्तीपैकीं आलेलें आहे त्यानें व्यवधान होत असल्यामुळें मातृणाम् वगैरे उदाहरणांमध्यें णत्व प्राप्त होत नाहीं.

मातृणाम् या उदाहरणामध्यें रेफ आणि नकार यांमध्यें रेफाच्या पुढें जें कांहीं अज्भक्तीपैकीं आलेलें आहे तें अट् आहे असें समजून अटानें व्यवधान असतांना पुढील सूत्रानें णत्व तेथें करतां येईल.

अशा रीतीने मातृणाम् या उदाहरणाची सिद्धि होणार नाहीं.

का बरें ?

वर्णांचा एक भाग जो स्वतंत्र वर्णासारखा गृहीत धरावा म्हणून म्हटलें आहे तो एक भाग अशा तऱ्हेचा पाहिजे कीं जो एक स्वतंत्र रीतीनें

---

१. ( सू. १ ) रेफ किंवा षकार याच्या पुढील नकाराला णकार आदेश निमित्त आणि निमित्ती हे उभयतां एकाच पदामध्यें असतील तर होतो.

व्यपवृक्ता अपि वर्णा भवन्ति । यत्त्वत्र रेफात्परं भक्तेन तत्कचिदपि व्यपवृक्तं दृश्यते । एवं तर्हि योगविभागः करिष्यते । रषाभ्यां नो णः समानपदे । ततो व्यवाये । व्यवाये च रषाभ्यां नो णो भवतीति । ततो ऽट्कुप्वाङ्नुम्भिरिति । इदमिदानीं किमर्थम् । नियमार्थम् । एतैरेवाक्षरसमाम्नायिकैर्व्यवाये नान्यैरिति ॥ अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्यृकाराण्णत्वमिति यदयं क्षुभ्नादिषु नृनमनशब्दं पठति । नैतदस्ति ज्ञापकम् । वृद्ध्यर्थमेतत्स्यात् । नार्नमनिरिति । यत्तर्हि तत्रैव तृप्नोतिशब्दं पठति । यच्चापि नृनमनशब्दं पठति । ननु चोक्तं वृद्ध्यर्थमेतत्स्यादिति । बहिरङ्गा वृद्धिः । अन्तरङ्गं

---

वर्ण असा इतर ठिकाणीं समजण्यांत येतो. आणि येथें ऋकारामध्यें तर जें कांहीं रेफाच्या पुढें अज्-भक्तीपैकीं आलेलें आहे तशा तऱ्हेचा स्वतंत्र वर्ण इतर ठिकाणीं कोठेंहीं असलेला दृष्टीस पडत नाहीं.

तर मग आम्ही आता सूत्राचा असा विभाग करतों कीं– ' रषाभ्यां नो णः समानपदे ' या सूत्राच्या पुढें ' व्यवाये ' एवढेंच सूत्र करतों. रेफ किंवा षकार आणि यांच्यामध्यें कोणीही व्यवधान असतांना णत्व होतें, असा त्याचा अर्थ होय. त्यानतर ' अट्कुप्वाङ्नुम्भिः ' असें दुसरें सूत्र समजावें. आतां हें दुसरें सूत्र कशाकरितां म्हणाल तर नियमाकरतां केलें आहे असें समजावें. तो नियम असा कीं–अक्षर-समाम्नायापैकीं जे वर्ण त्यांनीं व्यवधान असतांना जर णत्व होईल तर अट् कवर्ग पवर्ग आङ् आणि नुम् यांनींच व्यवधान असतांना णत्व होईल. याशिवाय अक्षरसमाम्नायांतील इतर वर्णांनीं व्यवधान असतांना णत्व होत नाहीं.

अथवा हा आचार्य पाणिनि नृनमन या शब्दामध्यें नकाराला णत्व न होण्याकरितां त्या शब्दाचा क्षुभ्नादि गणामध्यें पाठ करतो. त्यावरून तो असें सुचवितो कीं ऋकारच्या पुढील नकाराला णत्व होतें.

हें ज्ञापक बरोबर नाहीं. कारण नृनमन शब्दामधील ऋकाराला वृद्धि होऊन नार्नमनिः असा शब्द होतो तेथें रेफाच्या पुढील नकाराला णत्व न होण्याकरितां नृनमन शब्दाचा पाठ त्या गणामध्यें केलाच पाहिजे.

तर मग त्याच क्षुभ्नादि गणामध्यें तृप्नोति असा जो शब्द पाणिनीनें घातला आहे त्यावरून ऋकाराच्या पुढील नकाराला णत्व होतें असें सूचित होईल.

तसेंच त्या क्षुभ्नादि गणामध्यें जो नृनमन शब्द घातला आहे त्यावरून देखील वरील गोष्ट सूचित होतें.

पण नृनमन शब्दामधील ऋकाराला वृद्धि झाली असतां तेथें म्हणजे नार्नमनिः या शब्दामध्यें णत्व न होण्याकरितां त्या गणामध्यें नृनमन या शब्दाचा पाठ केला पाहिजे असें आतांच सांगितलें आहे ना ?

जरी तसें सांगितलें आहे तरी नार्नमनिः या उदाहरणामध्यें नृनमनाचें अपत्य या अर्थी नृनमन शब्दाच्या पुढें केलेला जो इञ् प्रत्यय

---

२. अज्–भक्ति म्हणून कांहीं अक्षर-समाम्नायामध्यें स्वतन्त्र वर्ण नाहीं. तेव्हां नियमानें त्याची व्यावृत्ति होत नसल्यामुळें मातृणाम् येथें ' व्यवाये ' या सूत्रानें णत्व सिद्ध होईल.

३. नृनमनस्य अपत्यं नार्नमनिः येथें नृनमन शब्दाहून अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ) करून व ऋकाराला वृद्धि (७।२।११७) आणि अकाराचा लोप ( ६।४।१४८ ) करून नार्नमनि हा शब्द सिद्ध होतो.

णत्वम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ अथवोपरिष्टाद्योगविभागः करिष्यते । ऋतो नो णो भवति । ततश्छन्दस्यवग्रहात् । ऋत इत्येव ॥

## अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि ॥ ८ । ४ । २ ॥

### अड्व्यवाये णत्वे ऽन्यव्यवाये प्रतिषेधः ॥ १ ॥

अड्व्यवाये णत्वे ऽन्यव्यवाये प्रतिषेधो वक्तव्यः । आदर्शेन अक्षदर्शेन ॥

### न वान्येन व्यपेतत्वात् ॥ २ ॥

न वा वक्तव्यः । किं कारणम् । अन्येन व्यपेतत्वात् । अन्येनात्र व्यवायः ॥ यद्यप्यत्रान्येन व्यवायो ऽटापि तु व्यवायो ऽस्ति तत्रास्त्यड्व्यवाय इति प्राप्नोति । अटैव व्यवाये भवति । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । अड्ग्रहणसामर्थ्यात् । यदि हि यत्राटा चान्येन च

---

( ४।१।९५ ) त्याच्या निमित्तानें ती वृद्धि ( ७।२।११७ ) होत असल्यामुळें ती वृद्धि बहिरंग आहे. आणि णत्व अंतरंग आहे. आणि अंतरंग शास्त्र कर्तव्य असतांना बहिरंग शास्त्र असिद्ध होतें अशी तर परिभाषा आहे. तेव्हां णत्वाच्या दृष्टीनें वृद्धि दिसत नाहीं.

अथवा मातॄणां वगैरे उदाहरणें साधण्याकरितां पुढें सूत्राचा विभाग असा करतों. ' छन्दस्यृदवग्रहात् ' ( ८।४।२६ ) असें पुढें सूत्र आहे. त्याचीं दोन सूत्रें करितों. त्यांपैकीं ' ऋतः ' असें प्रथम सूत्र होय. ऋकाराच्या पुढील नकाराला णत्व होतें असा त्याचा अर्थ आहे. त्यानंतर ' छन्दस्यवग्रहात् ' असें दुसरें सूत्र होय. त्या दुसऱ्या सूत्रामध्यें पूर्वसूत्रातून ऋतः हें पद अनुवृत्त होईलच. त्यामुळें त्याचा पूर्वीप्रमाणें वाक्यार्थ होईल.

(सू. २ वा. १) रेफ आणि नकार यांमध्यें अट् वगैरेंनीं व्यवधान असतांना नकाराला णत्व होतें असें सांगितलें आहे खरें. परंतु अट् वगैरेंशिवाय इतर वर्णांनीं व्यवधान असतांना णत्व होत नाहीं असा निषेध सांगितला पाहिजे. उदा०—आदर्शेन अक्षदर्शेन.

(वा. २) हा निषेध सांगावयास नको.

कां बरें ?

इतरांनीं व्यवधान आहे म्हणून. म्हणजे आदर्शेन या उदाहरणामध्यें अट् कवर्ग वगैरें-शिवाय इतर वर्ण जो शकार त्याने व्यवधान आहे. जरी आदर्शेन या उदाहरणामध्यें इतर वर्णानें म्हणजे शकारानें व्यवधान होत आहे तरी पण णत्व होण्याला निमित्त म्हणून जें अट् वगैरेंनीं व्यवधान असणें हें गृहीत धरलें आहे तसें येथें अटानें व्यवधान होत आहेच ना ? तेव्हां अटानें व्यवधान असतांना णत्व होतें असें सांगितलेलें णत्व येथें प्राप्त होत आहेच.

रेफ किंवा षकार आणि नकार यांमध्यें अट् वगैरेंनींच फक्त व्यवधान पाहिजे असा त्याचा अर्थ आम्ही समजतों.

हें काय म्हणत आहांत ? असें म्हणूं नका. कारण तशा अर्थाचा स्पष्ट शब्द सूत्रामध्यें नाहीं तेव्हां तसा कसा अर्थ घेतां येईल ?

सूत्रामध्यें अट् वगैरे जे शब्द उच्चारले आहेत त्यांच्या जोरावरच तसा अर्थ घेतां येईल. कारण अट् वगैरे वर्णांनीं आणि इतर वर्णांनींही व्यवधान असतांना जर णत्व होईल तर अट्

---

१. ( सू. २ ) अट् कवर्ग पवर्ग आङ् आणि नुम् यांपैकीं कोणीही व्यवधान असतांना रेफ किंवा षकार याच्या पुढील नकाराला णत्व होतें.

व्यवायस्तत्र स्यादड्ग्रहणमनर्थकं स्यात् । व्यवाये नो णो भवतीत्येव ब्रूयात् । अस्त्यन्यदड्ग्रहणस्य प्रयोजनम् । किम् । योऽनिर्दिष्टैरेव व्यवायस्तत्र मा भूत् । कृत्स्नम् मृत्स्नेति । यद्येतावत्प्रयोजनं स्याच्छर्व्यवाये नेत्येव ब्रूयात् ॥

तत्समुदाये णत्वाप्रसिद्धिर्यथान्यत्र ॥ ३ ॥

तत्समुदाये व्यवायसमुदाये णत्वस्याप्रसिद्धिः । अर्केण अर्घेण । यथान्यत्रापि व्यवायसमुदाये कार्यं न भवति । क्वान्यत्र । नुम्विसर्जनीयशर्व्यवायेऽपि [ ८. ३. ५८ ] निंस्से निंस्स्वेति ॥ किं पुनः कारणमन्यत्रापि व्यवायसमुदाये कार्यं न भवति । प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिर्दृष्टेति । तद्यथा । गुणवृद्धिसंज्ञे प्रत्येकं भवतः । ननु चायमप्यस्ति

---

वगैरे जे शब्द सूत्रामध्यें उच्चारले आहेत ते निरर्थक उच्चारले आहेत असें होईल. रेफ किंवा षकार आणि नकार यांमध्यें कोणीही व्यवधान असतांना णत्व होतें इतकेंच म्हटलें तरी चालेल.

परंतु सूत्रामध्यें अट् वगैरे शब्द उच्चारले आहेत त्याचा उपयोग निराळाच संभवतो.

तो कोणता ?

तो असा कीं–ज्या उदाहरणामध्यें रेफ किंवा षकार आणि नकार यांमध्यें अट् कवर्ग वगैरें-पैकीं कोणीही नसून फक्त इतर वर्णच आहेत त्या ठिकाणीं णत्व होऊं नये. उदा० कृत्स्नम् मृत्स्ना. पण जर अशा तऱ्हेचींच उदाहरणें सिद्ध करणें एवढाच उपयोग अट् कवर्ग वगैरे उच्चारण्याचा होत असेल तर अट् कवर्ग वगैरे न उच्चारतां फक्त शरानें व्यवधान असतांना णत्व होत नाहीं इतकेंच म्हटलें तरी चालेल. तेव्हां ज्या अर्थी पाणिनि आचार्य अट् कवर्ग वगैरे शब्द सूत्रांमध्यें उच्चारतो त्या अर्थीं अट् वगैरेंनींच व्यवधान पाहिजे इतरांनीं नसावें असा त्याच्या मनामध्यें अर्थ आहे असें समजावें.

(वा. ३) रेफ किंवा षकार आणि नकार यांमध्यें ज्या अट् कवर्ग वगैरेंनीं व्यवधान असतांना णत्व होतें असें सांगितलें आहे तेथें त्या अट् कवर्गांच्या समुदायानें एकदम एका उदाहरणामध्यें व्यवधान होत असतांना णत्व होणार नाहीं. उदा०–अर्केण अर्घेण. जसें अन्य ठिकाणीं देखील अनेकांनीं एकदम व्यवधान असतांना तेथें सांगितलेलें कार्य होत नसतें त्याप्रमाणेंच येथें होईल.

अन्य ठिकाणीं असें कोठें बरें कार्य झालेलें नाहीं ?

निंस्से निंस्स्व. या उदाहरणांमध्यें नुम् म्ह० अनुस्वार आणि शर् या दोहोंनीं एकदम व्यवधान होत असल्यामुळें 'नुम्विसर्जनीयशर्०' (८।३।५८) या सूत्रानें षत्व होत नाहीं.

तेथें तरी अनेकांनीं एकदम व्यवधान असतांना षत्व होत नाहीं याचें काय बरें कारण असावें ?

कारण असें कीं वाक्यामध्यें अनेकाला उद्देशून जी एखादी गोष्ट सांगितलेली असते तिचें पर्यवसान त्यांतील प्रत्येकाचें ठिकाणीं झालेलें दृष्टीस पडतें. उदा०–गुण ही संज्ञा अ ए व ओ या तीन वर्णांना पाणिनीनें सांगितली आहे. ती संज्ञा त्या तिन्ही वर्णांपैकीं प्रत्येकाला होते. तसेंच वृद्धि ही संज्ञा आ ऐ आणि औ या तीन वर्णांना सांगितलेली प्रत्येकाला होत असते.

पण याच्या उलट दुसऱ्या तऱ्हेचाही दृष्टांत सांपडतो. तो असा कीं – वाक्यामध्यें जी गोष्ट अनेकांना उद्देशून सांगितली असते तिचें पर्यवसान त्या सर्व अनेकांचें ठिकाणीं मिळून

दृष्टान्तः समुदाये वाक्यपरिसमाप्तिरिति । तद्यथा । गर्गाः शतं दण्ड्यन्तामिति । अर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति न च प्रत्येकं दण्डयन्ति । यद्येवमेकेन व्यवाये न प्राप्नोति । किरिणा गिरिणेति । उभयथापि वाक्यपरिसमाप्तिर्दृश्यते । तद्यथा । गर्गैः सह न भोक्तव्यमिति प्रत्येकं च न संभुज्यते समुदितैश्च ॥

**कुव्यवाये हादेशेषु प्रतिषेधः ॥ ४ ॥**

कुव्यवाये हादेशेषु प्रतिषेधो वक्तव्यः । किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं वृत्रघ्नः प्राघानीति ॥ ५ ॥**

हन्तेरत्पूर्वस्य [ ८. ४. २२ ] इत्यत्पूर्वग्रहणं न कर्तव्यं भवति ॥

**नुम्व्यवाये णत्वे ऽनुस्वाराभावे प्रतिषेधः ॥ ६ ॥**

नुम्व्यवाये णत्वे ऽनुस्वाराभावे प्रतिषेधो वक्तव्यः । प्रेन्वनम् प्रेन्वनीयम् ॥

---

झालेलें दृष्टीस पडतें. उदा०–गर्गांच्या कडून १०० रु. दंड घ्यावा असें म्हटलें असतां त्या सर्व गर्गांच्या कडून मिळून १०० रुपये दंड घेतला जातो. राजे लोक द्रव्याविषयीं फार लोभी असतात तरी पण त्या प्रत्येक गर्गांकडून १०० रु. दंड घेतला जात नाहीं.

असेंच जर येथें गृहीत धरलें तर अट् कवर्ग वगैरेंपैकीं एकट्यानेंच व्यवधान जेथें असेल तेथें णत्व होणार नाहीं उदा०–किरिणा गिरिणा. येथें फक्त एकट्या इकारानें व्यवधान होत आहे.

परंतु कांहीं ठिकाणीं वाक्यामध्यें अनेकांना उद्देशून जी एखादी गोष्ट सांगितलेली असते तिचें पर्यवसान त्यांतील प्रत्येकाचे ठिकाणीं झालेलें आणि सर्वांना मिळून झालेलें असें दोन्ही प्रकारचें दृष्टीस पडतें. उदा०–गर्गांच्या बरोबर भोजन करूं नये असें म्हटलें असतां एकएकट्या गर्गांच्या बरोबरही भोजन केलें जात नाहीं आणि सर्वांच्या बरोबर देखील भोजन केलें जात नाहीं.[2]

( वा. ४ ) हन् धातूच्या हकाराचें स्थानीं आदेश झालेला जो कवर्ग त्यानें व्यवधान असतांना णत्व होत नाहीं, असें म्हणावें.

याचा उपयोग काय ?

( वा. ५ ) उपयोग असा कीं–वृत्रघ्नः[3] सुघ्नः प्राघानि या उदाहरणांमध्यें हकाराचे स्थानीं झालेला जो घकार आदेश त्यानें व्यवधान होत आहे म्हणून णत्व होत नाहीं. तेव्हां 'हन्तेरत्पूर्वस्य' (८।४।२२) या पुढील सूत्रामध्यें हन् धातूच्या नकाराला णत्व सांगतांना त्या नकाराच्या मागें ह्रस्व अकार पाहिजे असें जें वृत्रघ्नः वगैरे उदाहरणें साधण्याकरितां म्हटलें आहे तें म्हणावयास नको.

( वा. ६ ) नुमानें व्यवधान असतांना णत्व होतें असें जें येथें म्हटलें आहे तेथें त्या नुमाला अनुस्वार आदेश झाला नसेल तर णत्व होत नाहीं असें म्हणावें. उदा०–[4] प्रेन्वनम् प्रेन्वनीयम्.

---

२. या न्यायाला अनुसरून अडादिकांपैकीं प्रत्येकानें किंवा अट् कवर्ग वगैरे दोन तीन इत्यादिकांनीं व्यवधान असतां णत्व होतें. सर्व अडादिकांनीं एकदम व्यवधान असें कोठेंच संभवत नाहीं असें तात्पर्य.

३. वृत्रं हतवान् असा अर्थ विवक्षित असतां वृत्र-उपपदपूर्वक हन् धातूहून 'ब्रह्मभ्रूणवृत्रेषु०' (३।२।८७) यानें भूतार्थी क्विप्, त्याहून द्वितीयाबहुवचन-प्रत्यय, अल्लोप वगैरे होऊन वृत्रघ्नः असें रूप होतें. सुचो हन्यन्ते अस्मिन् असा अर्थ विवक्षित असतां हन् धातूहून 'घञर्थे कविधानम्' (सू. ३।३।५८ वा.४) या वार्तिकानें क प्रत्यय केल्यानें सुघ्न असा अकारान्त शब्द तयार झाला आहे. प्राघानि येथें हन् धातूहून कर्मणि लुङ्. च्लि. चिण्. चिणो लुक्. उपधावृद्धि. अट्. कुत्व हीं कार्यें झालीं आहेत.

४. इवि व्याप्तौ. नुम्. ल्युट्. अनीयर्. 'इजादेः सनुमः' (८।४।३२) यानें णत्व प्राप्त होत आहे.

## अनागमे च णत्वम् ॥ ७ ॥

अनागमे च णत्वं वक्तव्यम् । तृम्पणम् तृम्पणीयम् ॥

## अनुस्वारव्यवायवचनात्तु सिद्धम् ॥ ८ ॥

अनुस्वारव्यवाये नो णो भवतीति वक्तव्यम् ॥ तदनुस्वारग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । क्रियते न्यास एव । नकारेऽनुस्वारः परसवर्णीभूतो निर्दिश्यते । इहापि तर्हि प्राप्नोति । प्रेन्वनम् प्रेन्वनीयम् । अनुस्वारविशेषणं नुम्ग्रहणम् । नुमो योऽनुस्वार इति । इहापि तर्हि न प्राप्नोति । तृम्पणम् तृम्पणीयम् । एवं तर्ह्ययोगवाहानामविशेषेणोपदेशश्चोदितस्तत्रानुस्वारे कृते ऽड्व्यवाय इत्येव सिद्धम् । यद्येवं नार्थो नुम्ग्रहणेन । अनुस्वारे कृतेऽड्व्यवाय इत्येव सिद्धम् ॥

## पूर्वपदात्संज्ञायामगः ॥ ८ । ४ । ३ ॥

## पूर्वपदात्संज्ञायामुत्तरपदग्रहणम् ॥ १ ॥

पूर्वपदात्संज्ञायामुत्तरपदग्रहणं कर्तव्यम् ।

---

(वा. ७) ज्या ठिकाणीं नुमागम झालेला नाहीं अशा ठिकाणीं अनुस्वारानें व्यवधान असतांना णत्व होतें असें म्हणावें. उदा०–तृम्पणम् तृम्पणीयम्.[५]

( वा. ८ ) अनुस्वारानें व्यवधान असतांना णत्व होतें असें म्हणावें.

मग त्याकरितां अनुस्वार शब्द सूत्रामध्यें घातला पाहिजे.

तो शब्द घालावयास नको. कारण पाणिणीनें सूत्रामध्यें तो उच्चारलाच आहे. म्हणजे नुम् या नकाराच्या मागें दुसरा एक नकार अनुस्वाराला परसवर्ण झालेला असा पाणिनीनें उच्चारलाच आहे.

असें असेल तर मग प्रेन्वनम् प्रेन्वनीयम् या उदाहरणांमध्यें देखील नुमानें व्यवधान होत असल्यामुळें णत्व करावें लागेल.

सूत्रात जो हा नुम् शब्द आहे तो नुम् शब्द अनुस्वाराचें विशेषण आहे म्हणजे नुमाचे स्थानीं झालेला जो अनुस्वार त्यानें व्यवधान असतांना णत्व होतें असा अर्थ होतो.

तर मग तृम्पणं तृम्पणीयम् या उदाहरणांमधील अनुस्वार नुमाचे स्थानीं झालेला नसल्यामुळें णत्व होणार नाहीं.

तर मग अयोगवाह म्हणजे अनुस्वार विसर्ग वगैरे यांचा अ इ उण् वगैरे अक्षरसमाम्नायामध्यें उपदेश करावा असें मागें ( १।१इयवरट् वा. ६ ) सांगितलें आहे. तेव्हां तृम्पणम् तृम्पणीयम् या उदाहरणांमध्यें असलेला अनुस्वार अट् आहे असें समजून अटानें व्यवधान होत असल्यामुळें णत्व करतां येईल.

मग असें असेल तर सूत्रामध्यें नुम् हा शब्द घालण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण नुमाला देखील अनुस्वार केल्यानंतर अटानें व्यवधान असतांना णत्व होतें या म्हणण्यानेंच तेथें णत्व होऊन काम भागेल.

( सू. ३ वा. १ ) पूर्व पदांतील रेफ किंवा षकार याच्या पुढील नकाराला णत्व करणें झाल्यास तें संज्ञा असतांनाच करावें अन्यत्र करू नये असा जो या सूत्रानें नियम केला आहे तो नियम उत्तर पदामधील नकार असेल तरच लागू होतो असें म्हणावें.

---

५. येथें परसवर्णानें ( ८।४।५८ ) झालेला मकार असिद्ध असल्यामुळें णत्व-शास्त्राच्या दृष्टीनें अनुस्वारच आहे.

१. (सू. ३) पूर्वपदांतील जो रेफ किंवा षकार त्याच्या पुढील नकाराला णकार आदेश होतो. मात्र त्यांमध्यें गकार नसावा आणि तें कोणाचें तरी नांव असावें.

किं प्रयोजनम् ।

**तद्धितपूर्वपदस्थाप्रतिषेधार्थम् ॥ २ ॥**

तद्धितस्थस्य पूर्वपदस्थस्य च प्रतिषेधो मा भूत् । खारपायणः करणप्रियः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । पूर्वपदमुत्तरपदमिति संबन्धिशब्दावेतौ । सति पूर्वपद उत्तरपदं भवति सति चोत्तरपदे पूर्वपदं भवति । तत्र संबन्धादेतद्गन्तव्यं यत्प्रति पूर्वपदमित्येतद्भवति तत्स्थस्य नियम इति । किं च प्रत्येतद्भवति । उत्तरपदं प्रति ॥

**संज्ञायां नियमवचने गप्रतिषेधान्नियमप्रतिषेधः ॥ ३ ॥**

संज्ञायां नियमवचने गप्रतिषेधान्नियमस्यायं प्रतिषेधो विज्ञायतेऽग इति ॥ तत्र को दोषः ।

**तत्र नित्यं णत्वप्रसङ्गः ॥ ४ ॥**

तत्र पूर्वेण संज्ञायां चासंज्ञायां च नित्यं णत्वं प्राप्नोति ॥

**योगविभागात्सिद्धम् ॥ ५ ॥**

योगविभागः करिष्यते । पूर्वपदात्संज्ञायाम् । ततोऽगः । गान्तात्पूर्वपदाद्या च यावती णत्वप्राप्तिस्तस्याः सर्वस्याः प्रतिषेधः ॥

**अप्रतिषेधो वा यथा सर्वनामसंज्ञायाम् ॥ ६ ॥**

---

असें म्हणण्याचा उपयोग कोणता ?

( वा. २ ) उपयोग असा कीं तद्धित प्रत्ययामधील नकाराला आणि पूर्व पदामधील नकाराला या नियमानें णत्वाचा निषेध होऊं नये. उदा० खारपायणः करणप्रियः

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण पूर्वपद आणि उत्तरपद हे दोन शब्द परस्परसंबंधी आहेत; म्हणजे पूर्वपद असेल तरच त्याच्यामुळें पुढील पदाला उत्तरपद असें म्हणतां येतें व उत्तरपद असेल तरच त्याच्यामुळें मागील पदाला पूर्वपद असें म्हणतां येतें. अशाप्रकारें असलेल्या त्यांच्या परस्पर संबंधावरून असें समजतें कीं या पूर्वीच्या पदाला ज्याच्यामुळें पूर्वपद असें म्हणतां येतें त्यामधील म्हणजे अर्थात् उत्तर पदामध्यें असलेल्या नकारासंबंधानेंच हा नियम लागू पडतो. पूर्वपद हें कोणामुळें होत असतें असें म्हटलें असतां अर्थातच तें उत्तरपदामुळें होतें असेंच म्हणावें लागतें.

( वा. ३ ) संज्ञा असतांनाच णत्व होतें असा या सूत्रानें नियम केला आहे आणि या सूत्रामध्यें अगः असा निषेध केला आहे. तेव्हां अर्थातच अगः हा निषेध त्या नियमाचा आहे असें म्हणावें लागतें.

तसें म्हटलें असतां कोणता दोष येतो ?

( वा. ४ ) अगः हा निषेध नियमाचा आहे असें मानलें तर ज्या समासामध्यें गकारान्त पूर्वपद आहे तेथें तो नियम लागू होणार नाहीं. आणि अर्थातच तेथें संज्ञा असो किंवा नसो पूर्व सूत्रानें नित्य णत्व होऊं लागेल.

( वा. ५ ) या सूत्राचा असा विभाग करतों कीं–' पूर्वपदात्संज्ञायाम् ' एवढेंच प्रथम सूत्र समजावें. त्यानंतर 'अगः' असें दुसरें सूत्र होय. गकारान्त पूर्वपद असेल तर त्या ठिकाणीं कोणत्याही सूत्रानें प्राप्त झालेल्या णत्वाचा यानें प्रतिषेध होतो असा त्या दुसऱ्या सूत्राचा अर्थ होय.

---

२. खरप शब्दाहून त्याचें गोत्रापत्य या अर्थी फक् प्रत्यय ( ४।१।९९ ). करणं प्रियमस्य करणप्रियः येथें करण शब्दाचा प्रिय शब्दावरोबर बहुव्रीहि समास झाला आहे.

न वार्थः प्रतिषेधेन । णत्वं कस्मान्न भवति । यथा सर्वनामसंज्ञायाम् । उक्तं च सर्वनामसंज्ञायां सर्वनामसंज्ञायां निपातनाण्णत्वाभाव इति । यथा पुनस्तत्र निपातनं क्रियते सर्वादीनि सर्वनामानि [ १. १. २७ ] इतीहेदानीं किं निपातनम् । इहापि निपातनमस्ति । किम् । अणृगयनादिभ्यः [ ४. ३. ७३ ] इति ॥

नैव वा पुनरत्र पूर्वेण णत्वं प्राप्नोति । किं कारणम् । समानपद इत्युच्यते न चैतत्समानपदम् । समासे कृते समानपदम् । समानमेव यन्नित्यं न चैतन्नित्यं समानपदमेव । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । समानग्रहणसामर्थ्यात् । यदि हि यत्समानं चासमानं च तत्र स्यात्समानग्रहणमनर्थकं स्यात् ॥

---

(वा. ६) किंवा या सूत्रामध्यें अगः असा निषेध मुळींच करूं नये.

मग ऋगयनम् या उदाहरणामध्यें णत्व कां होत नाहीं ?

जसें सर्वनाम या संज्ञा-शब्दामध्यें णत्व होत नाहीं तसेंच ऋगयनम् येथें णत्व होणार नाहीं. सर्वनाम या संज्ञेमध्यें निपातनास्तव णत्व होत नाहीं असें मागें सांगितलेंच आहे.

पण तेथें जसें निपातन केलें आहे म्हणजे 'सर्वादीनि सर्वनामानि' (१।१।२७) या सूत्रामध्यें पाणिनीनें सर्वनाम हा शब्द णत्व न करतांना उच्चारला आहे तसें येथें पाणिनीनें निपातन कोठें केलें आहे कीं, ज्याच्या जोरावर सर्वनाम या शब्दाप्रमाणें ऋगयन या शब्दामध्यें णत्व होत नाहीं अशी कल्पना करतां येईल ?

येथेंही निपातन आहे. कोणतें म्हणाल तर 'अणृगयनादिभ्यः' ( ४।३।७३ ) या सूत्रामध्यें पाणिनीनें ऋगयन असा शब्द णत्व न करतांनाच उच्चारला आहे. तेव्हां त्याच्या जोरावर काम भागेल.

अथवा हें प्रकृत सूत्र नियमार्थ नव्हेच. णत्वाचा विधि करण्याकरतांच हें केलें आहे. कारण द्रुणसः[३] वगैरे उदाहरणांमध्यें पूर्वसूत्रानें णत्वाची प्राप्तीच येत नाहीं.

कां बरें ?

पूर्वसूत्रामध्यें समानपदे असें म्हटलें आहे. आणि द्रुणसः हें तर समानपद नव्हे.

समास केल्यानंतर द्रुणस हें समानपद म्ह० एकपद होत आहे.

असलें एकपद णत्वाच्या उपयोगीं पडत नाहीं. कारण समानपदे याचा अर्थ जें नेहमींचेंच एक पद आहे म्हणजे अर्थात् समासानें अनेक पदाचें एकपद झालेलें नव्हे. अशाच समानपदाचे ठिकाणीं पूर्वसूत्रानें णत्व होतें.

हें असें निराळेंच कांहीं तरी काय बोलत आहांत ?

असें बोलूं नये. कारण तशा अर्थाचा स्पष्ट शब्द पाणिनीनें सूत्रामध्यें उच्चारला नसतांना तसें कसें येथें समजतां येईल ?

समान या शब्दाच्या जोरावर तसें समजतां येईल. कारण जर जें मूळचेंच एकपद आहे किंवा जें समासानें एकपद झालेलें आहे तीं दोन्ही समानपदेंच आहेत असें समजून जर तेथें पूर्व सूत्रानें णत्व होईल तर सूत्रांतील समान हा शब्द निरर्थक होईल; नुसतें पदे एवढें म्हणण्यानेंच काम भागेल.

---

३. द्रुरिव नासिका यस्य अशा अर्थी बहुव्रीहि समास. 'अच् नासिकायाः' (५।४।११८) या सूत्रानें नासिकाशब्दान्त बहुव्रीहीहून अच् प्रत्यय. आणि नासिका शब्दाला नस् आदेश होऊन द्रुणसः असें रूप झालें आहे.

[ वनं पुरगामिश्रकासिध्रकासारिकाकोटराग्रेभ्यः ॥ ८ । ४ । ४ ॥
प्रनिरन्तःशरेक्षुप्लक्षाम्रकार्ष्यखदिरपीयूक्षाभ्योऽसंज्ञायामपि ॥ ८ । ४ । ५ ॥ ]

विभाषौषधिवनस्पतिभ्यः ॥ ८ । ४ । ६ ॥

द्व्यक्षरत्र्यक्षरेभ्य इति वक्तव्यम् । इह मा भूत् । देवदारुवनम् ॥

इरिकादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । इरिकावनम् तिमिरवनम् ॥

अह्नोऽदन्तात् ॥ ८ । ४ । ७ ॥

अदन्तादन्तस्येति वक्तव्यम् । इह मा भूत् । दीर्घाह्नी शरदिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नैषाहन्शब्दात्षष्ठी । का तर्हि । अह्नशब्दात्प्रथमा पूर्वसूत्रनि-

---

( सू. ६ ) ओषधिवाचक आणि वनस्पतिवाचक शब्द जर दोन अक्षराचे किंवा तीन अक्षरांचे असतील तरच त्यांच्या पुढील वन शब्दामध्यें असलेल्या नकाराला प्रकृत सूत्रानें विकल्पानें णत्व होतें असें म्हणावें. कारण देवदारुवनम् येथें णत्व न झालें पाहिजे.

इरिकादिगणपठित शब्दाच्या पुढें असलेल्या वन शब्दामधील नकाराला णत्व होत नाहीं असें म्हणावें. उदा०—इरिकावनम् तिमिरकावनम्.

( सू. ७ ) ह्रस्व अकारान्त पूर्व पदाच्या पुढें असलेला जो अहन् शब्द तो अह्न असा अकारान्त ज्या ठिकाणीं होत असेल त्या ठिकाणींच प्रकृत सूत्रानें णत्व होतें असें म्हणावें. कारण दीर्घाह्नी शरत् या उदाहरणामध्यें णत्व न झालें पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण सूत्रामध्यें अह्नः असें जें पाणिनीनें उच्चारलें आहे ती अहन् शब्दाची षष्ठी उच्चारली आहे आहे असें समजूं नये.

तर मग ती विभक्ति कोणती आहे ?

अह्न या शब्दाच्या पुढें प्रथमा विभक्ति केलेली आहे. ज्याला कार्य सांगावयाचें असेल त्या शब्दाचें उच्चारण प्रथमा विभक्तीमध्येंच करण्याची पूर्वाचार्यांची वहिवाट आहे. त्याला अनुसरून या सूत्रामध्यें अह्नस्य असें न म्हणतां

---

१. ( सू. ४ ) पुरगा, मिश्रका, सिध्रका, शारिका, कोटरा आणि अग्रे या पूर्वपदांच्या पुढील वन शब्दाच्या नकाराला णकार आदेश होतो. पण तें कोणाचें तरी नांव असेल तर.

१. ( सू. ५ ) प्र, निर्, अन्तर्, शर, इक्षु, प्लक्ष, आम्र, कार्ष्य, खदिर, पीयूक्षा या पूर्वपदांच्या पुढील वन शब्दाच्या नकाराला णत्व होतें. मग तें नांव असो किंवा नसो.

१. (सू.६) ओषधिवाचक किंवा वनस्पतिवाचक जें शब्द त्यांतील रेफ किंवा षकाराच्या पुढील वन शब्दाच्या नकाराला णकार आदेश विकल्पानें होतो. ओषधि म्हणजे फलपाकानें नाश पावणारे शालि वगैरे, लता, गुल्म, आणि वीरुत् हें सर्व घ्यावयाचे व वनस्पति शब्दानें फुलें न येतां ज्यांना केवळ फळें येतात असे म्ह० उंबर वगैरे, ज्यांना फळे येत नसून केवळ फुलेंच येतात असे म्ह० वेतस वगैरे, ज्यांना फुलें व फळेंही दोन्हीही येत असतात असे म्ह० आम्र वगैरे हे सर्व घ्यावयाचे.

१. ( सू. ७ ) ऱ्हस्व अकार ज्याच्या शेवटीं आहे अशा पूर्वपदांतील रेफ किंवा षकाराच्या पुढील अह्न आदेशांतील नकाराला णकार आदेश होतो.

२. दीर्घाणि अहानि यस्याम् असा सप्तम्यर्थी बहुव्रीहि समास. ' अन उपधालोपिनो० ' ( ४।१।२८ ) या सूत्रानें ङीप्. ' अल्लोपोऽनः ' ( ६।४।१३४ ) यानें अल्लोप होऊन दीर्घाह्नी प्रावृट् असें होतें.

देशश्च ॥ अथवा युवादिषु पाठः करिष्यते ॥

**वाहनमाहितात् ॥ ८ । ४ । ८ ॥**

आहितोपस्थितयोरिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । इक्षुवाहणम् शरवाहणम् ॥

अपर आह । वाहनं वाह्यादिति वक्तव्यम् । यदा हि गर्गाणां वाहनमपविद्धं तिष्ठति तदा मा भूत् । गर्गवाहनमिति ॥

**[ पानं देशे ॥ ८ । ४ । ९ ॥ ]**

**वा भावकरणयोः ॥ ८ । ४ । १० ॥**

वाप्रकरणे गिरिनद्यादीनामुपसंख्यानम् ॥ १ ॥

वाप्रकरणे गिरिनद्यादीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । गिरिणदी गिरिनदी । चक्रणितम्बा चक्रनितम्बा ॥

**प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च ॥ ८ । ४ । ११ ॥**

प्रातिपदिकान्तस्य णत्वे समासान्तग्रहणमसमासान्तप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥

प्रातिपदिकान्तस्य णत्वे समासान्तग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । असमासान्तप्र-

---

अह असें पाणिनीनें उच्चारलें आहे.

अथवा दीर्घाह्नी या शब्दाचा युवादि गणामध्यें ( ८।४।११ वा. ३ ) पाठ करतों, म्हणजे तेथें णत्व होणार नाहीं.

( सू. ८ ) या सूत्रामध्यें आहित म्हणजे पूर्वी वाहिलेले असें जें म्हटलें आहे तेथें आहित आणि उपस्थित म्हणजे पूर्वी वाहिलेले आणि हल्लीं वाहण्याकरितां आणलेले जे पदार्थ तद्वाचक शब्दाच्या पुढील वाहन शब्दाच्या नकाराला णत्व होतें असें म्हणावें. कारण इक्षुवाहणम् शरवाहणम् या ठिकाणीं देखील णत्व झालें पाहिजे.

येथें कोणी असें म्हणतो कीं वाहनं वाह्यात् असें सूत्र करावें. वाह्य शब्दाचा वाहण्याला योग्य असा अर्थ समजावा. जेव्हां गर्गांचें एखादें वाहन गर्गांच्या मालकीचें पण मोडून पडलेलें असेल त्या वेळेला त्या वाहनाचे ते गर्ग वाह्य होत नाहींत. तेव्हां तशा अर्थाची विवक्षा असतांना गर्गवाहनं येथें णत्व न झालें पाहिजे.

( सू. १० वा. १ ) या वैकल्पिक णत्वाच्या प्रकरणामध्यें गिरिनदी वगैरे शब्दांमधील नकाराला विकल्पानें णत्व होतें असें म्हणावें उदा०— गिरिणदी गिरिनदी, चक्रनितम्बा चक्रणितम्बा.

( सू. ११ वा. १ ) प्रतिपदिकाच्या शेवटीं असलेल्या नकाराला जें या प्रकृत सूत्रानें विकल्पानें णत्व सांगितलें आहे तें णत्व तो नकार समासाच्या शेवटीं असेल तरच होतें असें म्हणावें.

---

१. ( सू० ८ ) गाडी वगैरेमध्यें घालून वाहून नेले जाणारे जे इक्षु वगैरे पदार्थ तद्वाचक पूर्वपदांतील रेफ किंवा षकाराच्या पुढील वाहन शब्दातील नकाराला णकार आदेश होतो.

२. आहित म्हणजे गाडीमध्यें भरलेले ऊस वगैरे पदार्थ. ते जेव्हां गाडींत भरण्याकरितां फक्त जवळ आणून ठेवले आहेत अशा स्थितींत त्या गाडीला इक्षुवाहण असा णकारविशिष्ट शब्द लागू करतां येणार नाहीं. तेव्हां तशा स्थितींतही त्या गाडीला इक्षुवाहण हा शब्द लागू करतां यावा म्हणून 'आहितोपस्थितयोः' असें म्हटलें आहे. उपस्थित म्हणजे गाडी वगैरेमध्यें रचून ठेवण्याकरितां जवळ आणून ठेवलेले वाह्य पदार्थ ऊस वगैरे होत असा आशय.

१. ( सू. ९ ) पूर्वपदामधील रेफ किंवा षकार याच्या पुढील पान शब्दाच्या नकाराला णकार आदेश होतो, पण तें देशाचें नांव असेल तर.

१. ( सू. १० ) भाव किंवा करण या अर्थाला दाखविणारा जो पान शब्द त्यांतील नकाराला विकल्पानें णत्व होतें, पण तो पान शब्द पूर्वपदांतील रेफ किंवा षकार याच्या पुढें असेल तर.

१. ( सू. ११ ) पूर्वपदांतील रेफाच्या किंवा षकाराच्या पुढील प्रातिपदिकाच्या शेवटीं असलेल्या नकाराला अथवा नुम् आगमांतील किंवा विभक्तींतील नकाराला विकल्पानें णत्व होतें.

तिषेधार्थम् । असमासान्तस्य मा भूत् । गर्गभगिनी दक्षभगिनीति ॥ न वा भवति गर्गभगिणीति । भवति यदैतद्वाक्यं गर्गाणां भगो गर्गभगः गर्गभगोऽस्या अस्तीति । यदा त्वेतद्वाक्यं भवति गर्गाणां भगिनी गर्गभगिनीति तदा न भवितव्यम् । तदा मा भूदिति ॥ यदि समासान्तग्रहणं क्रियते माषवापिणी व्रीहिवापिणी अत्र न प्राप्नोति ।

लिङ्गविशिष्टग्रहणे चोक्तम् ॥ २ ॥

किमुक्तम् । गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक्सुबुत्पत्तेरिति ॥

तत्र युवादिप्रतिषेधः ॥ ३ ॥

तत्र युवादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । आर्ययूना क्षत्रिययूना प्रपक्वानि परिपक्वानि दीर्घाह्नी शरदिति ॥

---

कशाकरितां ?

असमासान्तप्रतिषेधार्थम् म्हणजे जो नकार प्रातिपदिकाच्या शेवटीं आहे पण समासाच्या शेवटीं नाहीं त्याला णत्व होऊं नये याकरितां तसें म्हटलें पाहिजे उदा०—गर्गभगिनी[२] दक्ष-भगिनी.

तर मग गर्गभगिणी असें रूप होतच नाहीं काय ?

गर्गभगिणी असें रूप होतें. जेव्हां त्या शब्दाचा अर्थ ' गर्गांचा जो भग तो गर्गभग, गर्गभग जिला आहे ती ' असा असेल तेव्हां णत्व होतें. आणि ज्या वेळेला त्या सामासिक शब्दाचा अर्थ ' गर्गांची जी भगिनी ती गर्ग-भगिनी ' असा असेल तेव्हां णत्व न झालें पाहिजे. तेव्हां अर्थातच तशा अर्थाचें गर्ग-भगिनी असेंच रूप होतें. तेथें णत्व होत नाहीं.

जर नकार हा समासाच्या शेवटीं पाहिजे असें म्हटलें तर माषवापिणी[३] या ठिकाणीं णत्व होणार नाहीं.

( वा. २ ) ज्या ठिकाणीं स्त्रीलिंगबोधक प्रत्यय केला असेल त्या संबंधानें पूर्वी सांगित-लेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

गति कारक आणि उपपद यांचा जो कृत्-प्रत्ययान्त शब्दाबरोबर समास होतो तो त्या कृत्-प्रत्ययान्त शब्दाच्या पुढें विभक्तिप्रत्यय किंवा स्त्रीप्रत्यय करण्याच्या पूर्वीच होतो असें मागें सांगितलें आहे[४] (४।१।४८ वा. ४ )

( वा. ३ ) युवादिगणपठित जे शब्द म्हणजे युवन् वगैरे शब्द त्यांमधील नकाराला णत्व होत नाहीं असें म्हणावें. उदा०—आर्ययूना[५] क्षत्रिय-यूना प्रपक्वानि परिपक्वानि दीर्घाह्नी शरत्.

---

२. भगिन् शब्दाहून ' ऋन्नेभ्यो० ' ( ४।१।५ ) यानें स्त्रीलिंगी ङीप् प्रत्यय. गर्गाणां भगिनी गर्गभगिनी असा षष्ठीतत्पुरुष समास.

३. माषान् वपतीति माषवापिणी. 'बहुलमाभीक्ष्ण्ये ' ( ३।२।८१ ) या सूत्रानें णिनि प्रत्यय. 'उपपदमतिङ् ' ( २।२।१९ ) यानें समास. असा क्रम शंककानें मनांत धरला आहे. तेव्हां ङीप् केल्यानंतर समास केला असल्यामुळें समासरूप प्रातिपदिकाच्या शेवटीं नकार पडत नसल्यामुळें णत्व होणार नाहीं.

४. तेव्हां ङीप् करण्याचे पूर्वी वापिन् या नका-रान्ताबरोबर समास करून नंतरच ङीप् केला असल्या-मुळें शेवटी नकार पडत आहे. सबब हें वैकल्पिक णत्व होण्यास कांहीं हरकत नाही.

५. आर्ययूना क्षत्रिययूना. येथें 'विशेषणं विशेष्येण०' ( २।१।५७ ) यानें समास. ' श्वयुवमघोना० ' ( ६। ४।१३३ ) यानें संप्रसारण. प्रपक्वानि येथें ' कुगति-प्रादयः' ( २।२।१८ ) यानें गतिसमास. ' कुमति च ' ( ८।४।१३ ) या सूत्रानें नित्य णत्व प्राप्त होत आहे.

## [ एकाजुत्तरपदे णः ॥ ८ । ४ । १२ ॥ ]

## कुमति च ॥ ८ । ४ । १३ ॥

अथेह कथं भवितव्यम् । माषकुम्भवापेण व्रीहिकुम्भवापेणेति । किं नित्यं णत्वेन भवितव्यमाहोस्विद्विभाषया । यदा तावदेतद्वाक्यं भवति कुम्भस्य वापः कुम्भवापः माषाणां कुम्भवापो माषकुम्भवाप इति तदा नित्यं णत्वेन भवितव्यम् । यदा त्वेतद्वाक्यं भवति माषाणां कुम्भो माषकुम्भः माषकुम्भस्य वापो माषकुम्भवाप इति तदा विभाषया भवितव्यम् ॥

## उपसर्गादसमासेऽपि णोपदेशस्य ॥ ८ । ४ । १४ ॥

असमासग्रहणं किमर्थम् । समास इति वर्ततेऽसमासेऽपि यथा स्यात् । प्रणमति परिणमति । क्व पुनः समासग्रहणं प्रकृतम् । पूर्वपदात्संज्ञायामगः [ ८. ४. ३ ] इति । कथं पुनस्तेन समासग्रहणं शक्यं विज्ञातुम् । पूर्वपदग्रहणसामर्थ्यात् । समास एवैतद्भवति पूर्वपदमुत्तरपदमिति ॥

अथापिग्रहणं किमर्थम् । समासेऽपि यथा

---

( सू. १३ ) आतां माषकुम्भवापेण व्रीहिकुम्भवापेण या ठिकाणीं रूप कसें व्हावें ? णत्व नित्य व्हावें किंवा विकल्पानें व्हावें ?

जेव्हां त्या शब्दाच्या अर्थाला दाखविणारें वाक्य 'कुम्भाचा जो वाप तो कुम्भवाप, माषांचा जो कुम्भवाप तो माषकुम्भवाप' असें असेल त्या वेळेला प्रकृत सूत्रानें नित्य णत्व होतें[2]. पण जेव्हां त्या माषकुम्भवाप शब्दाच्या अर्थाला दाखविणारें वाक्य 'माषांचा जो कुम्भ तो माषकुम्भ आणि माषकुम्भाचा जो वाप तो माषकुम्भवाप' असें असेल तेव्हां णत्व[3] विकल्पानें होते.

( सू. १४ ) या सूत्रामध्यें असमासे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

अशाकरितां म्हटलें आहे कीं मागून समासे याचा येथें संबंध होत आहे; आणि या प्रकृत सूत्रानें सांगितलेलें णत्व तर समास नसताना देखील झालें पाहिजे. उदा०—प्रणमति, परिणमति.

मागें समासे असें कोठून बरें चालू झालेलें आहे ?

'पूर्वपदात्संज्ञायामगः' (८।४।३) या सूत्रांतून.

त्या सूत्रानें समासामध्येंच णत्व सांगितलें आहे असें कसें बरें समजतां येईल ?

त्या सूत्रामध्यें पूर्वपदात् असें म्हटलें आहे त्याच्या जोरावर तसें समजतां येईल. कारण पूर्वपद आणि उत्तरपद हे शब्द समासामध्येंच असू शकतात.

आतां या सूत्रामध्यें अपि असें कशाकरितां म्हटलें आहे ?

समासामध्यें देखील प्रकृत सूत्रानें णत्व झालें

---

१. ( सू. १२ ) ज्या समासाचें उत्तरपद एकाच् आहे अशा समासामध्यें पूर्वपदांतील रेफ किंवा षकाराच्या पुढील प्रातिपदिकांतील शेवटच्या नकाराला किंवा नुम् व विभक्ति यांतील नकाराला नित्य णकार आदेश होतो.

१. ( सू. १३ ) कवर्गयुक्त आहे उत्तरपद ज्याचें अशा समासांतील जें पूर्वपद त्यांतील रेफ किंवा षकार यांच्या पुढील प्रातिपदिकाच्या शेवटच्या नकाराला किंवा नुम् आणि विभक्ति यांतील नकाराला नित्य णकार आदेश होतो.

२. कारण कुम्भवाप या उत्तरपदामध्यें कवर्ग आहे.

३. येथें नित्य णत्व प्राप्त होतें, आणि विकल्पानें प्राप्त होतें एवढाच अर्थ समजावा. कारण 'पदव्यवायेऽपि' ( ८।४।३८ ) यानें निषेध प्रवृत्त होत आहे आणि तो मागें सारण्याचें कांहींएक योग्य कारण दिसत नाही.

स्यात् । प्रणामकः परिणामकः ॥ यदि तर्हि समासे चासमासे चेष्यते नार्थोऽसमासेऽपिग्रहणेन । निवृत्तं पूर्वपदादिति । अविशेषेणोपसर्गाण्णत्वं वक्ष्यामि । समासे नियमान्न प्राप्नोति । असिद्धमुपसर्गाण्णत्वं तस्यासिद्धत्वान्नियमो न भविष्यति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यदसमासेऽपिग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न योगे योगोऽसिद्धः । किं तर्हि । प्रकरणे प्रकरणमसिद्धमिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । यत्तदुक्तं निष्कृतम् निष्पीतमित्यत्र सत्वस्यासिद्धत्वात्षत्वं न प्राप्नोतीति स न दोषो भवति ॥

**णोपदेशं प्रत्युपसर्गाभावादनिर्देशः ॥१॥**

अगमको निर्देशोऽनिर्देशः । यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतो न च

---

पाहिजे म्हणून तसें म्हटलें आहे उदा०—प्रणामकः, परिणामकः.

जर समास असतांना आणि समास नसतांना देखील या प्रकृत सूत्रानें णत्व होणें इष्ट असेल तर असमासे आणि अपि या दोन्ही शब्दांचा कांहीं उपयोग नाहीं. फक्त मागून पूर्वपदात् असे जें चालूं झालेलें आहे त्याचा येथे संबंध केला नाहीं म्हणजे झाले. तेव्हां या सूत्राने मोघमच उपसर्गाच्या पुढील नकाराला णत्व सांगितलें जाईल.

पण समासामध्यें णत्व करणें झालें तर संज्ञा असतांनाच होतें असा मागें ( ८।४।३ ) नियम केला असल्यामुळें संज्ञा नसताना समासामध्यें प्रकृत सूत्रानें णत्व करतां येणार नाहीं, असा दोष येईल.

हा दोष येत नाहीं. कारण प्रकृत सूत्रानें उपसर्गाच्या पुढील नकाराला जें णत्व सांगितलें आहे ते णत्व त्या नियमाच्या दृष्टीनें असिद्ध आहे. तेव्हां अर्थातच प्रस्तुत सूत्र हें असिद्ध असल्यामुळे येथे नियम लागू होणार नाहीं. तर मग अशा रीतीनें सर्व काम भागत असताना जे पाणिनीनें असमासेऽपि असे शब्द या सूत्रामध्यें घातले आहेत त्यावरून तो असें सुचवितो कीं एका प्रकरणांतील एका शास्त्राच्या दृष्टीने दुसरें शास्त्र असिद्ध होत नाहीं. फक्त निराळया प्रकरणाच्या शास्त्राच्या दृष्टीनें निराळया प्रकरणातील शास्त्र असिद्ध होतें.

हें जे ज्ञापक केलें आहे त्याचा उपयोग काय ?

उपयोग असा कीं निष्कृतं निष्पीतम् या या उदाहरणामध्यें सत्व असिद्ध असल्यामुळें षत्व होणार नाहीं असा जो दोष मागें ( ८।३।३९ पृ. ४३३ पं. १७ ) दिला आहे तो दोष या ज्ञापकामुळें येत नाहीं.

( वा. १ ) उपदेशीं जो णकार त्यामुळें उपसर्गपणा येत नसल्यामुळें सूत्रकारानीं प्रकृत सूत्रामध्यें केलेला निर्देश हा अनिर्देशच होत आहे. जीं उच्चारलेलीं पदें आपल्या अर्थाचा बोध करून देत नाहींत त्याना अनिर्देश असे म्हणतात. तात्पर्य असें कीं प्रकृत सूत्रापासून बरोबर अर्थबोध होत नाहीं. कारण गति आणि उपसर्ग याचा ज्या क्रियेशी संबध असतो त्या क्रियेला दाखविणाऱ्याचेच ते गति आणि उपसर्ग सम-

---

१. ( सू. १४ ) उपदेशकालीं ज्यामध्यें णकार आहे अशा धातूच्या नकाराला णकार आदेश होतो पण तो नकार उपसर्गातील रेफ किंवा षकार यांच्या पुढें असेल तर. मग तो उपसर्ग त्या धातूबरोबर समासांत सांपडलेला असो किंवा नसो.

२. उपदिश्यते स उपदेशः म्हणजे आद्योच्चारणविषय असा उपदेश शब्दाचा अर्थ आहे. 'णोपदेशस्य' याचा णश्चासौ उपदेशश्च असा कर्मधारय समास येथें गृहीत धरला आहे.

णोपदेशं प्रति क्रियायोगः ॥ एवं तर्ह्याहाय सुपसर्गादसमासेऽपि णोपदेशस्येति न च णोपदेशं प्रत्युपसर्गोऽस्ति तत्र वचनाद्भविष्यति ।

**वचनप्रामाण्यादिति चेत्पदलोपे प्रतिषेधः॥ २ ॥**

वचनप्रामाण्यादिति चेत्पदलोपे प्रतिषेधो वक्तव्यः । प्रगता नायका अस्माद् ग्रामात्प्रनायको ग्राम इति ॥

**सिद्धं तु यं प्रत्युपसर्गस्तत्स्थस्येति वचनात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यं प्रत्युपसर्गस्तत्स्थस्य णो भवतीति वक्तव्यम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं णोपदेशं प्रत्युपसर्गाभावादनिर्देश इति । नैष दोषः । णोपदेश इति नैवं विज्ञायते ण उपदेशो णोपदेशः णोपदेशस्येति । कथं तर्हि । ण उपदेशोऽस्य सोऽयं

---

चले जातात आणि येथें तर धातूमध्यें उपदेशीं असलेला जो णकार त्याच्यामुळ उपसर्गाला क्रियेचा योग होतच नाहीं. कारण क्रिया हा अर्थ णकाराचा नाहीं. तो धातूचा अर्थ आहे.

तर आम्ही असें म्हणतो कीं ज्याअर्थी पाणिनि उपसर्ग पाहिजे असेंही म्हणतो आणि उपदेशीं णकार पाहिज असेंही म्हणतो आणि उपसर्ग तर त्या औपदेशिक णकारामुळें होतच नाहीं तेव्हा या सूत्राचा काहीं उपयोगच होणार नाहीं. एवढ्याकरिता त्याच्या जोरावर णकारामुळें उपसर्ग[1] झाला नसला तरी णत्व करता येईल.

( वा. २ ) णकारामुळें उपसर्ग होत नसताही या सूत्राच्या जोरावर णत्व होतें असे म्हणाल तर जेथें पदाचा लोप होतो तेथें णत्व होत नाहीं असें म्हणावें लागेल. उदा०— प्रगता नायका अस्मात् प्रनायको ग्रामः. येथें गत या पदाचा लोप झाला आहे. त्यातील गम् धातूमुळेंच प्र याला उपसर्गपणा आलेला आहे. प्रकर्षानें म्ह० जोरानें ज्या गावातून नायक निघून गेले आहेत असा गांव हा प्रनायक शब्दाचा अर्थ आहे.

( वा. ३ ) प्रनायको ग्रामः हें उदाहरण सिद्ध होत आहे.

तें कसे ?

उपसर्गाला उपसर्गपणा ज्याच्यामुळें येतो त्यामध्यें असलेला जो नकार असें म्हणावें म्हणजे झालें.

तसे म्हटलें असता साधेल हें खरें पण सूत्रातील शब्द फिरवावे लागतील.

तर मग जसें मूळचें पाणिनीनें सूत्र केलें आहे तसेंच असू दे. पण औपदेशिक णकारामुळें उपसर्गाला उपसर्गपणा येत नसल्यामुळें सूत्रापासून काहीं अर्थबोध होत नाहीं असें आताच सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण ण जो उपदेश तो णोपदेश त्या णोपदेशाला, असा सूत्रांतील णोपदेशस्य याचा अर्थ समजूं नये.

तर मग त्याचा अर्थ कसा समजावा ?

असा समजावा कीं ज्या धातूच्या उपदेशीं णकार आहे तो धातू णोपदेश होय. त्या धातूच्या नकाराला णत्व होतें. अशा रीतीनें बहुव्रीहि समास करून णोपदश या पदाचा अर्थ णकारादि धातू असा होतो. अर्थातच त्या धातूमुळें उपसर्गाला उपसर्गपणा येतोच. तेव्हां प्रनायको ग्रामः येथें दोष येत नाहीं. कारण प्र हा गम् धातूचा उपसर्ग आहे; णोपदेश जो णी धातू त्याचा उपसर्ग नव्हे.

---

१. दुसऱ्या कोणामुळें कां होईना त्याला उपसर्ग हें नांव मिळालें असलें म्हणजे झालें.

णोपदेशः णोपदेशस्येति ॥

## हिनु मीना ॥ ८ । ४ । १५ ॥

**हिनुमीनाग्रहणे विकृतस्योपसंख्यानम् ॥ १ ॥**

हिनुमीनाग्रहणे विकृतस्योपसंख्यानं कर्तव्यम् । प्रहिणोति प्रमीणीते ॥ वचनाद्भविष्यति । अस्ति वचने प्रयोजनम् । किम् । प्रहिणुतः प्रमीणाति ॥

**सिद्धमचः स्थानिवत्त्वात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । अचः स्थानिवत्त्वात् । स्थानिवद्भावादत्र णत्वं भविष्यति ॥ प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावः पूर्वत्रासिद्धे न स्थानिवदिति । दोषा एवैते तस्याः परिभाषायास्तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेष्विति ॥

## आनि लोट् ॥ ८ । ४ । १६ ॥

---

( सू. १५ वा. १ ) हिनु आणि मीना यांतील नकाराला जें प्रकृत सूत्रानें णत्व सांगितलें आहे तें हिनु आणि मीना या स्वरूपामध्यें कांहीं विकार झाला तरी देखील होतें असें म्हणावें. उदा०- प्रहिणोति प्रमीणीते.

पण या सूत्राचा उपयोग कोठेंतरी अवश्य झाला पाहिजे म्हणून प्रहिणोति वगैरे उदाहरणामध्यें णत्व होतें असें म्हणतां येईल.

या सूत्राचा उपयोग अन्य ठिकाणीं चांगला संभवत आहे. तो कोणता म्हणाल तर प्रहिणुतः प्रमीणाति या उदाहरणामध्यें हिनु आणि मीना या स्वरूपाला कांहीं विकार झाला नाहीं. तेव्हां सूत्राला तेथें चारितार्थ्य आहे.

( वा. २ ) प्रहिणोति वगैरे उदाहरणांमध्यें णत्व सिद्ध होत आहे.

ते कसें ?

अचाचें स्थानीं झालेल्या गण वगैरे आदेशांना स्थानिवद्भाव ( १।१।५७ ) होत आहे म्हणून. तेव्हा प्रहिणोति प्रमीणीते या उदाहरणांमध्यें हिनु आणि मीना या स्वरूपामध्यें विकार जरी झालेला आहे तरी तें स्थानिवद्भावानें हिनु आणि मीना असें स्वरूप आहे असें समजून णत्व करतां येईल.

पण त्रिपादीमधील कार्य कर्तव्य असताना स्थानिवद्भाव होत नाहीं असा स्थानिवद्भावाचा निषेध केला आहे त्याची वाट काय ?

त्रिपादीमधील कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं अशी जी परिभाषा आहे त्या परिभाषेचे हे दोषच आहेत. संयोगादिलोप, लत्व आणि णत्व या तीन ठिकाणीं त्या परिभाषेला दोष येतो म्हणून ती परिभाषा या तीन कार्योविषयीं येत नाहीं

---

१. ( सू. १५ ) उपसर्गांतील निमित्त रेफ किंवा षकार यांच्या पुढील हिनु अथवा मीना यां शब्दांतील नकाराला णकार आदेश होतो. उदा०-प्रहिणोति, प्रमीणाति.

२. चक्र्यत्र येथें चक्री-अत्र या स्थितींत यण् केला असतां ' स्कोः संयोगा० ' ( ८।२।२९ ) यानें ककाराचा लोप प्राप्त होतो. पण ' अचः परस्मिन्० ' ( १।१।५७ ) या सूत्रानें स्थानिवद्भाव झाल्यामुळें पदान्तीं संयोग पडत नाहीं म्हणून ककाराचा लोप होत नाहीं. निगाल्यते येथें णिलोपाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें 'अचि विभाषा' ( ८।२।२१ ) यानें रेफाला लत्व विकल्पानें होतें. माषवपनी येथें डीपाच्या निमित्तानें झालेल्या अल्लोपाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें ' प्रातिपदिकान्तनुम्० ' ( ८।४।११ ) यानें णत्व होत नाहीं.

१. ( सू. १६ ) उपसर्गांतील निमित्त जो रेफ किंवा षकार त्याच्या पुढील लोटाचे ठिकाणीं झालेल्या आनि या शब्दांतील नकाराला णकार आदेश होतो.

लोडिति किमर्थम् । प्रहिमानि कुलानि । प्रवपानि मांसानि ।

**आनि लोड्ग्रहणानर्थक्यमर्थवद्ग्रहणात् ॥ १ ॥**

आनिलोड्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अर्थवद्ग्रहणात् । अर्थवत आनिशब्दस्य ग्रहणं नैषोऽर्थवान् ॥

**अनुपसर्गाद्वा ॥ २ ॥**

अथवा यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतो न चैतमानिशब्दं प्रति क्रियायोगः ॥ इहापि तर्हि न प्राप्नोति । प्रयाणि परियाणीति । अत्रापि नानिशब्दं प्रति क्रियायोगः ॥ आनिशब्दं प्रत्यत्र क्रियायोगः । कथम् । यत्क्रियायुक्ता इति नैवं विज्ञायते यस्य क्रिया यत्क्रिया यत्क्रियायुक्तास्त प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवत इति । कथं तर्हि । या क्रिया यत्क्रिया यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवत इति ॥

---

( सू. १६ ) या सूत्रामध्यें लोट् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

प्रहिमानि कुलानि, प्रवपानि मांसानि या उदाहरणामध्यें णत्व न व्हावें याकरितां लोट् असें म्हटलें आहे.

( वा. १ ) आनि लोट् या सूत्रामध्यें जें लोट् असें म्हटलें आहे तें निरर्थक होय.

कां बरें ?

अर्थवानाचें ग्रहण होत आहे म्हणून. अर्थवान् जो 'आनि' हा शब्द त्याचेंच येथें ग्रहण होत आहे. आणि प्रहिमानि कुलानि या उदाहरणामध्यें असलेला जो आनि हा शब्द त्याला कांहींच अर्थ नाहीं.

( वा. २ ) अथवा प्रहिमानि येथें कांहीं दोष येत नाहीं. कारण गति आणि उपसर्ग यांचा ज्या शब्दानें दाखविलेल्या क्रियेशीं योग असतो त्याच शब्दाचे ते गति आणि उपसर्ग समजले जातात[१]. आणि प्रहिमानि या उदाहरणामध्यें प्र या उपसर्गाचा जो क्रियेशीं योग झालेला आहे ती क्रिया आनि या शब्दानें दाखविलेली नाहीं.

अने असेल तर मग प्रयाणि परियाणि या क्रियापदांमध्यें देखील प्रकृत सूत्रानें णत्व होणार नाहीं. कारण या ठिकाणीं प्र या उपसर्गाला ज्या क्रियेशीं योग झालेला आहे ती क्रिया आनि या शब्दानें दाखविलेली नाहीं.

प्रयाणि वगैरे उदाहरणांमध्यें प्र या उपसर्गाचा जो क्रियेशीं योग झालेला आहे तो आनि शब्दामुळे झालेला आहे असें म्हणता येतें.

तें कसें ?

तें असें कीं ज्या शब्दानें दाखविलेली जी क्रिया ती यत्क्रिया आणि त्या यत्क्रियेनें युक्त जे प्र वगैरे शब्द हे त्याच क्रियावाचक शब्दामुळ गति आणि उपसर्ग समजले जातात असा आम्ही याचा याचा अर्थ समजत नाहीं.

तर मग यत्क्रियायुक्त याचा अर्थ कसा समजावा ?

त्याचा अर्थ असा समजावा कीं जी क्रिया ती यत्क्रिया असा कर्मधारय समास करावा. आणि त्या यत्क्रियेनें युक्त जे प्र वगैरे ते त्याच क्रियेमुळें गति आणि उपसर्ग समजले जातात.

---

१. तेव्हा प्रयाणि येथें प्र हा गमनक्रियेचा उपसर्ग आहे एवढेंच या नियमानें सिद्ध होतें. तेथें त्याच गमनक्रियेच्या कर्त्याला आनि हा शब्द दाखवितो म्हणून तेथे णत्व होतें. प्रहिमानि कुलानि येथें आनि याला कांहीं अर्थच नाहीं त्यामुळ तसें कांहींच सांगतां येत नाहीं.

[१]नेर्गदनदपतपदघुमास्यतिहन्तियातिवातिद्रातिप्सातिवपतिवहतिशाम्यतिचिनोतिदेग्धिषु च ॥ ८।४।१७॥

नेर्गदादिष्वड्व्यवाय उपसंख्यानम् ॥ १ ॥

नेर्गदादिष्वड्व्यवाय उपसंख्यानं कर्तव्यम् । प्रण्यगदत् परिण्यगदत् ॥

आङा चेति वक्तव्यम् । प्रण्यागदत् ॥

ननु चायमड्गदादिभक्तो गदादिग्रहणेन ग्रहिष्यते । न सिध्यति । अङ्गस्याडुच्यते विकरणान्तं चाङ्गं सोऽसौ संघातभक्तोऽशक्यो गदादिग्रहणेन ग्रहीतुम् ॥ एवं तर्ह्यड्व्यवाय इति वर्तते । क प्रकृतम् । अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि [ ८. ४. २ ] इति । तद्वै कार्यिविशेषणं निमित्तविशेषणेन चेहार्थः । तत्रापि निमित्तविशेषणमेव ॥

---

( सू. १७ वा. १ ) गद् वगैरे धातू पुढे असताना नि या उपसर्गाच्या नकाराला जे हें प्रकृत सूत्रानें णत्व सांगितले आहे ते णत्व नि उपसर्ग आणि गद् वगैरे धातू यांमध्यें अट् आगमानें व्यवधान असतांनाही होते असें म्हणावें. उदा०—प्रण्यगदत्.

( वा. २ ) तसेच त्या दोहोंमध्यें आङ् या उपसर्गानें व्यवधान असलें तरी देखील णत्व होतें असें म्हणावें उदा. – प्रण्यागदत्.

पण अट् हा आगम गद् वगैरे धातूंचा अवयव असल्यामुळें त्या अडागमासकटच तो धातू समजला जाईल; तेव्हां कांहीं दोष येत नाहीं.

अशा रीतीनें हें उदाहरण सिद्ध होणार नाहीं. कारण अट् हा आगम अंगाचा अवयव आहे. आणि अगसंज्ञा तर गद् धातूच्या पुढें केलेला जो शप् हा विकरण प्रत्यय त्यासकट सबंध शब्दस्वरूपाला होते. तेव्हां अट् हा आगम त्या विकरण प्रत्ययान्त समुदायाचा अवयव होत असल्यामुळे गद् धातूचा तो अवयव समजणें अशक्य आहे. तेव्हां अगद् याचें गद या शब्दानें ग्रहण केलें जाणार नाहीं.

तर मग येथे अटानें व्यवधान असतांना अशी पूर्वसूत्रांतून अनुवृत्ति करतो.

अटानें व्यवधान चालतें असें पूर्वसूत्रात कोठें म्हटलें आहे ?

अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि ( ८।४।२ ) या सूत्रामध्ये अटानें व्यवधान चालते असें सांगितलें आहे.

पण तेथें तें उद्देश्याचें म्हणजे नकाराचें विशेषण[२] आहे. आणि येथे तर ते निमित्ताचें[३] विशेषण केल पाहिजे.

अट्कुप्वाङ्० या सूत्रामध्यें देखील अट् वगैरेंनीं व्यवहित हें निमित्ताचेंच[४] विशेषण आहे असें म्हणता येईल.

---

१. ( सू. १७ ) उपसर्गांतील निमित्त म्हणजे रेफ किंवा षकार, त्याच्या पुढील नि शब्दाच्या नकाराला णकार आदेश होतो, गद, नद, पत, पद घुसंज्ञक धातु मा, स्यति, हन्ति, याति, वाति, द्राति प्साति, वपति, वहति, शाम्यति, चिनोति अथवा देग्धि हे धातू पुढें असतांना.

२. रेफ किंवा षकाराहून पर अट् वगैरेंनीं व्यवहित जो नकार त्याला णत्व होतें असा तेथें अर्थ आहे.

३. अट् वगैरेंनी व्यवहित असे जे गद वगैरे धातू ते पुढें असताना असा तेथें अर्थ आहे.

४. अट् वगैरेंनीं व्यवहित असे जे रेफ आणि षकार त्यांच्या पुढील नकाराला णत्व होतें असाच तेथें अर्थ आहे. अव्यवहित हें ज्याला विशेषण सर्वत्र होतें त्यालाच कांहीं ठिकाणीं ' अमुकानें व्यवहित ' असें विशेषण

[ शेषे विभाषाऽकखादावषान्त उपदेशे ॥ ८।४।१८ ॥ ]

अनितेः ॥ ८।४।१९ ॥

अन्तः ॥ ८।४।२० ॥

अन्तग्रहणं किमर्थम् ।

अनितेरन्तग्रहणं संबुद्ध्यर्थम् ॥ १ ॥

अनितेरन्तग्रहणं क्रियते संबुद्ध्यर्थम् । हे प्राण् ॥

अपर आह । अनितेरन्तः पदान्तस्य । अनितेरन्तग्रहणं क्रियते पदान्तस्य नेति प्रतिषेधः प्राप्नोति तद्बाधनार्थम् ॥

योवा तस्मादनन्तरः ।

अथवायमन्तशब्दोऽस्त्येवावयववाची । तद्यथा । वस्त्रान्तः वसनान्त इति । अस्ति सामीप्ये वर्तते । तद्यथा । उदकान्तं गतः । उदकसमीपं गत इति गम्यते । तद्यः सामीप्ये वर्तते तस्य ग्रहणं विज्ञायते । अनितेः समीपे यो रेफस्तस्मान्नस्य यथा स्यात् । प्राणिति । इह मा भूत् । पर्यनिति ॥

---

( सू. १९,२० वा. १ ) अनितेः अन्तः असें जे येथें म्हटलें आहे तें संबुद्धीमध्यें णत्व होण्याकरितां म्हटलें आहे. उदा० हे प्राण्.

याचेंच स्पष्टीकरण येथे कांहीं लोक असें करतात—

पदान्तस्य या सूत्रानें सांगितलेला पदाच्या शेवटीं असलेल्या नकाराला जो णत्वाचा निषेध त्या निषेधाचा बाध होऊन णत्व होण्याकरितां अनितेः याच्या पुढें अन्तः असें म्हटलें आहे.

अथवा अन् धातूच्या जवळचा जो रेफ असा येथें अर्थ आहे. अन्त हा शब्द अवयव या अर्थाचा आहे. उदा० वस्त्रान्तः, वसनान्तः. वस्त्राचा शेवटचा अवयव म्हणजे पदर असा येथें अर्थ आहे. तसाच अन्त हा शब्द सामीप्य या अर्थाचाही आहे. उदा०—उदकान्त गतः; उदकाच्या समीप गेला आहे असा येथें अर्थ गम्यमान होतो. तेव्हां सामीप्य या अर्थाचा जो अन्त हा शब्द तो येथे प्रकृत सूत्रामध्यें पाणिनीनें उच्चारला आहे असें समजावें. त्यामुळें असा अर्थ होतो कीं, अन् धातूच्या समीप असणारा जो रेफ त्या रेफाच्या पुढील नकाराला णत्व होतें. उदा०-प्राणिति. आता अन् धातूच्या जवळ ज्या ठिकाणीं रेफ नसतो त्या ठिकाणीं णत्व होत नाहीं. उदा० पर्यनिति.

---

द्यावें लागतें. ' तस्मिन्निति० ' ( १।१।६६ ) या परिभाषेमध्यें निर्दिष्टे याचा अर्थ आहे. तेव्हां तें अर्थातच सप्तम्यन्ताचेंच विशेषण होतें. तसेंच ' तस्मादित्युत्तरस्य ' ( १।१।६७ ) या परिभाषेमध्यें अनुवृत्त झालेलें निर्दिष्टे हें पद निर्दिष्टात् अशा अर्थाचें पंचम्यन्ताचेंच विशेषण होतें.

१. ( सू. १८ ) पूर्वसूत्रांत सांगितलेले गद नद वगैरे जे धातू त्यांशिवाय इतर ज्या धातूच्या आरंभीं उपदेशकालीं ककार किंवा खकार नाही आणि शेवटी षकार नाहीं असा जो धातु तो पुढें असतांना उपसर्गांतील रेफ किंवा षकार याच्या पुढील नि उपसर्गाच्या नकाराला विकल्पानें णकार आदेश होतो

१. ( सू. १९ ) उपसर्गांतील निमित्त- म्हणजे रेफ किंवा षकार- त्याच्या पुढील अनिति धातूच्या नकाराला णकार आदेश होतो.

१. ( सू. २० ) उपसर्गांतील रेफ किंवा षकार याच्या पुढील पदाच्या शेवटीं असलेल्या अन् धातूच्या नकाराला णकार आदेश होतो

२. या पक्षीं अन्तः याची आवृत्ति करून पूर्वीचा अर्थ करावा म्हणजे ' पदान्तस्य ' ( ८।४।३७ ) याचा बाध होईल.

**उभौ साभ्यासस्य ॥८।४।२१॥**

**साभ्यासस्य द्वयोरिष्टम् ।**

साभ्यासस्य द्वयोर्णत्वमिष्यते । प्राणिणिषति ॥

**हन्तेरत्पूर्वस्य ॥ ८ । ४ । २२ ॥**

अत्पूर्वस्येति किमर्थम् । प्रघ्नन्ति परिघ्नन्ति ।

**हन्तेरत्पूर्वस्य वचन उक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । कुव्यवाये हादेशेषु प्रतिषेध इति ॥

**[ वमोर्वा ॥ ८ । ४ । २३ ॥**

**अन्तरदेशे ॥ ८ । ४ । २४ ॥**

**अयनं च ॥ ८ । ४ । २५ ॥**

**छन्दस्यृदवग्रहात् ॥ ८।४।२६ ॥**

**नश्च धातुस्थोरुषुभ्यः ॥ ८ । ४ । २७ ॥ ]**

---

( स. २१ ) अभ्यासासहित जो अन् धातु म्हणजे द्वित्व केलेला जो अन् धातु त्या ठिकाणीं अभ्यास आणि उत्तरखंड या दोन्ही ठिकाणीं नकाराला णत्व इष्ट आहे. उदा० प्राणिणिषति.

( सू. २२ ) हन्तेरत्पूर्वस्य या प्रकृत सूत्रामध्यें अत्पूर्वस्य असें कशाकरितां म्हटलें आहे ?

प्रघ्नन्ति परिघ्नन्ति या उदाहरणामध्यें णत्व न होण्याकरितां तसें म्हटलें आहे.

( वा. १ ) हन् धातूच्या नकाराला जें हें णत्व त्या नकाराच्या मागें ऱ्हस्व अकार असतांना सांगितलें आहे त्या संबंधानें पूर्वीच सांगितलें आहे.

तें काय सांगितलें आहे ?

असें सांगितलें आहे कीं अन् धातूच्या हकाराला कवर्ग आदेश केला असताना तेथें णत्व होत नाहीं ( ८।४।१ वा. ४ ). तेव्हां त्या निषेधानेंच प्रघ्नन्ति हें उदाहरण सिद्ध होतें.

---

१. ( सू. २१ ) अभ्या [illegible]ट जो अनिति धातु त्याच्या दोन्ही नकारांना णत्व होतें उपसर्गांतील निमित्त जो रेफ त्याच्यापुढें असतांना. ‘पूर्वत्रासिद्धीयमद्विर्वचने’ या परिभाषेनें द्वित्व कर्तव्य असतां पराला असिद्धत्व नसल्यामुळें ‘अनितेः’ या सूत्रानें पूर्वी णत्व करून णत्वविशिष्टाला द्वित्व केलें असतां अन्यायामानेंच प्राणिणिषति हें उदाहरण साधन आहे तेव्हां ‘उभौ साभ्यासस्य’ हें सूत्र निरर्थक होत अ त्यामुळे त्यानें असें सुचविलें जातें कीं ‘पूर्वत्रासिद्धीयमद्विर्वचने’ ही परिभाषा अनित्य आहे. त्यामुळें ऊर्णुनाव येथें द्वित्वाच्या अगोदर णत्व होत नाहीं.

१. ( सू. २२ ) उपसर्गांतील जो रेफ त्याच्या पुढील हन् धातूच्या नकाराला णत्व करणें झाल्यास त्या नकाराच्या मागें ऱ्हस्व अकार असतांनाच करावें; नाहींतर करूं नये

१. ( सू. २३ ) उपसर्गांतील रेफाच्या पुढील हन् धातूच्या ऱ्हस्व अकाराच्या पुढील नकाराला वकार किंवा मकार पुढें असतांना विकल्पानें णकार आदेश होतो.

१. ( सू. २४ ) अन्तर् शब्दाच्या पुढील जो हन् धातु त्याच्या ऱ्हस्व अकाराच्या पुढील नकाराला णकार आदेश होतो; मात्र तो शब्द देश या अर्थाला दाखविणारा नसावा

१. ( सू. २५ ) अन्तर् शब्दाच्या पुढील अयन शब्दाच्या नकाराला णत्व होतें; पण तो शब्द देश या अर्थाला दाखवीत नसावा.

१. ( सू. २६ ) पदपाठकालीं ज्याच्या पुढें अवग्रह ( पदविच्छेददर्शक उच्चारणविशेष ) केला जाईल अशा ऋकारान्त पूर्वपदाच्या पुढील अर्थात् उत्तरपदांतील नकाराला णकार आदेश वेदामध्यें होतो.

१. ( सू. २७ ) धातूंतील रेफाच्या किंवा षकाराच्या पुढील तसेंच उरु शब्दाच्या पुढील किंवा षु शब्दाच्या पुढील नस् शब्दांतील नकाराला णकार आदेश वेदामध्यें होतो.

**उपसर्गादनोत्परः ॥ ८।४।२८ ॥**[1]

कथमिदं विज्ञायते । ओकारात्पर ओत्परः न ओत्परोऽनोत्पर इति । आहोस्विदोकारः परोऽस्मात्सोऽयमोत्परः न ओत्परोऽनोत्पर इति । किं चातः । यदि विज्ञायत ओकारात्पर ओत्परः न ओत्परोऽनोत्पर इति प्र नो मुञ्चतम् अत्रापि प्राप्नोति । अथ विज्ञायत ओकारः परोऽस्मात्सोऽयमोत्परः न ओत्परोऽनोत्पर इति प्र णो वनिर्देवकृता अत्र न प्राप्नोति । उभयथा च प्रक्रमे दोषो भवति । प्र नः मुञ्चतम् प्र नो मुञ्चतम् । प्र उ नः प्रो नः ।

**भाविन्यप्योति नेष्यते ।**

भाविन्यप्योकारे णत्वं नेष्यते ॥ एवं तर्ह्युपसर्गाद्बहुलमिति वक्तव्यम् ॥[2]

**कृत्यचः ॥ ८ । ४ । २९ ॥**[1]

**कृत्स्थस्य णत्वे निर्विण्णस्योपसंख्यानम् ॥ १ ॥**

कृत्स्थस्य णत्वे निर्विण्णस्योपसंख्यानं कर्तव्यम् । निर्विण्णो ऽहमनेन वासेन ॥[2]

---

( सू. २८ ) या सूत्रांतील अनोत्परः याचा अर्थ कसा समजावा ?

ओकाराहून पर तो ओत्पर; तसा जो ओत्पर नव्हे तो अनोत्पर असा समजावा किंवा ज्याच्या पुढें ओकार आहे तो ओत्पर आणि तसा जो ओत्पर नव्हे तो अनोत्पर असा समजावा?

यांत काय फरक होतो ?

फरक असा होतो कीं, ओकाराहून पर तो ओत्पर, आणि तसा जो ओत्पर नव्हे तो अनोत्पर असा जर अर्थ समजला तर प्र नो मुञ्चतम् या उदाहरणामध्यें देखील नकार हा तसा अनोत्पर होत असल्यामुळें णत्व होऊं लागेल. आतां जर ओकार आहे पुढें ज्याच्या तो ओत्पर तसा जो ओत्पर नव्हे तो अनोत्पर असाच अर्थ समजला तर प्र णो वनिर्देवकृता या ठिकाणीं देखील नकाराच्या पुढें ओकार असल्यामुळें णत्वाचा निषेध होऊं लागेल.

दोन्ही तऱ्हेचे अर्थ घतले तरी प्र णो मुञ्चतम्‌. प्र णो वनिः या ठिकाणीं क्रमपाठामध्यें दोष येत आहे. कारण क्रमपाठामध्ये प्र नः मुञ्चतम् व प्र उ नः या ठिकाणीं नकाराच्या मागेही ओकार नाहीं आणि पुढेंही ओकार नाहीं.

आणि वरील उदाहरणामध्यें संधि होऊन पुढें ओकार येणार आहे अशा ठिकाणींही णत्व इष्ट नाहींच.

तर मग अनोत्परः या पदाच्या ऐवजीं बहुलम् असें पद घालून ' उपसर्गाद् बहुलम् ' असें सूत्र करावे म्हणजे सर्व साधेल.

(सू. २९ वा.१) प्रकृत सूत्रानें अचाच्या पुढें असलेल्या कृत् प्रत्ययांतील नकाराला जें णत्व सांगितलें आहे तें णत्व निर्विण्ण या शब्दातील कृत् प्रत्ययामधील नकाराला होतें असें म्हणावें. उदा०-निर्विण्णोऽहमनेन वासेन.

---

१. ( सू. २८ ) उपसर्गांतील रेफाच्या किंवा षकाराच्या पुढील नस् शब्दांतील नकाराला णकार आदेश बाहुल्येकरून होतो.

२. कोठे प्रवृत्ति, कोठें अप्रवृत्ति आणि कोठें विकल्प इत्यादि बहुल ग्रहणाचे अर्थ आहेत. तेव्हां जेथें जसें णत्व इष्ट आहे तसें होतें, असा अर्थ झाल्यामुळें कोठेंही दोष येत नाहीं.

१. ( सू. २९ ) उपसर्गांतील जो रेफ किंवा षकार त्याच्या पुढील कृत् प्रत्ययामधील नकाराला णकार आदेश होतो, मात्र त्या नकाराच्या मागें अच् असला पाहिजे.

२. कारण निर्विण्ण शब्दांतील नकाराच्या मागें अच् नाहीं.

**'णेर्विभाषा ॥ ८ । ४ । ३० ॥**

**णेर्विभाषायां साधनव्यवाय उपसंख्यानम् ॥ १ ॥**

णेर्विभाषायां साधनव्यवाय उपसंख्यानं कर्तव्यम् । प्राप्यमाणम् प्राप्यमानम् ॥

**तद्विधानात्सिद्धम् ॥ २ ॥**

विहितविशेषणं णिग्रहणम् । ण्यन्ताद्यो विहित इति ॥

**अड्धिकाराद्वा ॥ ३ ॥**

अथवाड्व्यवाय इति वर्तते ॥

**[ हलश्चेजुपधात् ॥८।४।३१ ॥ ]**

**इजादेः सनुमः ॥ ८ । ४ । ३२ ॥**

किमर्थमिदमुच्यते न कृत्यचः [ २९ ] इत्येव सिद्धम् । नियमार्थोऽयमारम्भः । इजादेरेव च सनुम्कान्नान्यस्मात्सनुम्कादिति । क मा भूत । प्रमङ्कनम् परिमङ्कनम् ॥

---

( सू. ३० वा. १ ) णिप्रत्ययान्त धातूच्या पुढें कृत् प्रत्ययांतील नकाराला जे हें प्रकृत सूत्रानें विकल्पानें णत्व सांगितलें आहे तें णत्व ण्यन्त धातु आणि कृत् प्रत्यय यांमध्यें साधन अर्थाला दाखविणाऱ्या प्रत्ययानें[२] व्यवधान होत असलें तरी होतें असें म्हणावें. उदा० प्राप्यमाणं प्राप्यमानम्.

( वा. २ ) ण्यन्त धातु हें कृत् प्रत्ययाचें विहित-विशेषण केलें आहे म्हणजे णिप्रत्ययान्त धातूहून पर जो कृत् प्रत्यय असा अर्थ न होतां णिप्रत्ययान्त धातूहून केलेला जो कृत् प्रत्यय असा अर्थ होईल; आणि तसा अर्थ झाला म्हणजे व्यवधान असलें तरी चालेल.

( वा. ३ ) अथवा अट् कवर्ग वगैरेंनीं व्यवधान असतांना असें येथें मागून अनुवृत्त करावें. तेव्हा प्रयाप्यमाणम् या उदाहरणामध्यें जे यकार अकार वगैरे वर्ण ते अट् कवर्ग वगैरें- पैकींच असल्यामुळे त्यांनीं व्यवधान असले तरी चालेल.

( सू. ३२ ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

करावयास नको. याचीं उदाहरणें 'कृत्यचः' यानेच सिद्ध होतील.

हें सूत्र नियमार्थ केलें आहे. तो नियम असा कीं-नुमागम झालेल्या धातूच्या पुढें असलेल्या कृत् प्रत्ययांतील नकाराला जर पूर्व सूत्रानें णत्व होईल तर तो धातु इजादि असेल तरच होतें.

या नियमानें णत्व होत नाहीं असें उदाहरण कोणतें ?

प्रमङ्कनम् परिमङ्कनम् हीं तशीं उदाहरणें होत.

---

१. ( सू. ३० ) उपसर्गांतील जो रेफ किंवा षकार त्याच्या पुढील जो ण्यन्त धातु त्याहून केलेल्या कृत् प्रत्ययांतील नकाराला णकार आदेश विकल्पानें होतो.

२. सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना सांगितलेले जे यक् शप् श्यन् वगैरे विकरण प्रत्यय ते त्या सार्व- धातुक प्रत्ययाच्या अर्थींच होत असतात. कर्ता कर्म हीं जीं साधनें म्ह० कारकें त्या अर्थी सार्वधातुक प्रत्यय होत असतात.

१. ( सू. ३१ ) इच् प्रत्याहारांतील वर्ण ज्याच्या उपधेला आहे अशा हलादि धातूच्या पुढील कृत् प्रत्ययांतील अचाच्या पुढील नकाराला णकार आदेश विकल्पानें होतो, तो नकार उपसर्गांतील रेफ किंवा षकार याच्या पुढे असेल तर.

१. ( सू. ३२ ) नुमागमासहित अशा धातूच्या पुढील कृत् प्रत्ययांतील असून उपसर्गांतील रेफाच्या किंवा षकाराच्या पुढें असलेल्या नकाराला णत्व करणें झाल्यास ज्याच्या आरंभीं इच् आहे आणि शेवटीं हल् आहे अशा नुमागमासकट धातूहून केलेल्या कृत् प्रत्ययांतील नकारालाच तें णत्व करावें; भलत्याला करूं नयें.

**सनुमो णत्वे ऽवधारणाप्रसिद्धिर्विधेयभावात् ॥ १ ॥**

सनुमो णत्वे ऽवधारणस्याप्राप्तिः । किं कारणम् । विधेयभावात् । कैमर्थक्यान्नियमो भवति । विधेयं नास्तीति कृत्वा । इह चास्ति विधेयम् । किम् । ण्यन्ताद्विभाषा प्राप्ता तत्र नित्यं णत्वं विधेयम् । तत्रापूर्वो विधिरस्तु नियमोऽस्त्वित्यपूर्वो विधिर्भविष्यति न नियमः ॥

**सिद्धं तु प्रतिषेधाधिकारे सनुम्ग्रहणात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रतिषेधाधिकारे सनुम्ग्रहणात् । प्रतिषेधाधिकारे सनुम्ग्रहणं कर्तव्यम् । न भाभूपूकमिगमिप्यायिवेपिसनुमामिति ॥ इहापि तर्हि न प्राप्नोति । प्रेङ्गणम् प्रेङ्गणीयम् ।

**कृत्स्थस्य च णत्व इजादेः सनुमो ग्रहणम् ॥ ३ ॥**

कृत्स्थस्य च णत्व इजादेः सनुमो ग्रहणं कर्तव्यम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥

---

( वा. १ ) जें हें नुमागम झालेल्या धातूच्या संबंधानें णत्व सांगितलें आहे तेथें तो धातु इजादि असेल तरच होते, असा जो नियम दाखविला आहे तो करतां येणार नाहीं.

कां बरें ?

विधेय आहे म्हणून. ज्या ठिकाणीं पूर्व सूत्रानेंच कार्य सिद्ध होत असल्यामुळें नवीन विधेय कांहीं सांगतां येत नाहीं, त्या ठिकाणीं तें सूत्र कशाकरिता असा प्रश्न उत्पन्न होतो. आणि त्यामुळेंच तें सूत्र नियमार्थ आहे असें म्हणता येतें. प्रकृत सूत्रामध्यें पाहिले तर येथें विधेय संभवत आहे.

तें विधेय कोणतें ?

ण्यन्त धातु असेल त्या ठिकाणीं 'णेर्विभाषा' या पूर्वसूत्रानें विकल्पानें णत्व प्राप्त होत आहे तेव्हां तेथें तो धातु नुमागम झालेला आणि इजादि असा असेल तर त्या ठिकाणीं त्या विकल्पाचा बाध करून नित्य णत्व सांगणें हें येथें विधेय संभवत आहे.

अशा रीतीनें या प्रकृत सूत्रामध्यें विधि मानावा किंवा नियम मानावा असा प्रश्न उत्पन्न होतो खरा. परंतु अशा ठिकाणीं अपूर्व विधीच मानणें बरोबर होईल. सूत्राला वैयर्थ्य येत नसल्यामुळें नियमार्थ सूत्र मानणे बरोबर होणार नाहीं. तेव्हा प्रमङ्कनम् या ठिकाणीं दोष येतो.

( वा. २ ) प्रमङ्कनम् वगैरे उदाहरणें सिद्ध होत आहेत.

ती कशीं ?

निषेध प्रकरणामध्यें सनुम् असें पद उच्चारावें म्हणजे झालें. म्हणजे पुढें जें या णत्वाचें निषेध-प्रकरण सांगितलें आहे तेथें सनुम् असें पद घातलें असतां मङ्क् वगैरे नुमागम झालेले धातू जेथें असतील तेथें णत्व होणार नाहीं. तेव्हां पुढील निषेध दाखविणारें सूत्र 'नभाभूपूकमिगमिप्यायीवेपिसनुमाम्' असें करावें.

तर मग तसा निषेध केला तर प्रेङ्गणम् प्रेङ्गणीयम् या ठिकाणीं देखील णत्व होणार नाहीं.

( वा. ३ ) कृत् प्रत्ययांतील नकाराला णत्व सांगणाऱ्या अशा या विधि–प्रकरणामध्यें 'इजादेः सनुमः' असें सूत्र करावें.

असें केलें असतां उदाहरणें सिद्ध होतात. परंतु 'नभाभू०' हें पुढील सूत्र थोडें फिरवावें लागतें.

यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं सनुमो णत्वे ऽवधारणाप्रसिद्धिर्विधेयभावादिति । नैष दोषः । हल इति वर्तते । क्व प्रकृतम् । हलश्चेजुपधात् [ ३१ ] इति । तद्वै तत्रादिविशेषणमन्तविशेषणेन चेहार्थः । कथं पुनर्ज्ञायते तत्रादिविशेषणमिति । इजुपधादित्युच्यते तत्र नार्थोऽन्तविशेषणेन । तत्रादिविशेषणं संदिहान्तविशेषणं भविष्यति । कथम् । इजादेरित्युच्यते तत्र नार्थ आदिविशेषणेन ॥ अथवेजादेः सनुम इत्यत्र णेर्विभाषा [ ३० ] इत्येतदनुवर्तिष्यते ॥

## [ वा निंसनिक्षनिन्दाम् ॥८।४।३३॥ ]

## न भाभूपूकमिगमिप्यायिवेपाम् ॥८।४।३४॥

तर मग पाणिनीनें मूळचें जसें सूत्र केलें आहे तसेंच असूं दे

पण आताच सांगितलें आहे ना कीं, हें जें नुमागम झालेल्या धातूच्या संबंधानें णत्व सांगितलें आहे तें तो धातु इजादि असेल तरच होतें असा जो नियम दाखविला आहे तो करतां येणार नाहीं. कारण तेथ विधेय संभवत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण, हलः असें पद मागून येथें अनुवृत्त होतें आहे.

हलः हें पद कोणत्या मागील सूत्रांतून चालू झालें आहे ?

हलश्चेजुपधात् ( ८।४।३१ ) या मागच्याच सूत्रांत हलः असें म्हटलें आहे. आतां तेथें हल् हें आदीचें विशेषण आहे म्हणजे हलादि धातु असा तेथें अर्थ होतो आणि प्रकृत सूत्रामध्यें हलः हें अन्ताचें विशेषण करून हलन्त असा अर्थ करण्यात फायदा आहे.

पण पूर्व सूत्रामध्यें हलः हें आदीचें विशेषण आहे असें कशावरून समजतें ?

त्या सूत्रामध्यें इजुपधात असें म्हटलें आहे. म्हणजे ज्याच्या उपधला इच् आहे असा धातु असा त्याचा अर्थ आहे. तेव्हां अर्थातच तशा प्रकारचा धातु हलन्त असणारच. तेव्हां तेथें हलः हें अन्ताचें विशेषण करून हलन्त धातु असें म्हणण्यात कांहींच अर्थ नाहीं. म्हणून तेथें हलः हें आदीचें विशेषण झालें तरी येथें तें अन्ताचें विशेषण करतां येईल.

ते कसें ?

या सूत्रांत इजादेः म्हणजे इच् आहे आदि ज्याच्या असा धातु असें म्हटलें आहे. तेव्हां अर्थातच तो हलादि असणार नाहीं. तेव्हां प्रकृत सूत्रामध्यें हल् हें आदीचें विशेषण करून कांहीं उपयोग होणार नाहीं.

अथवा इजादेः सनुमः या प्रकृत सूत्रामध्यें णेर्विभाषा याची अनुवृत्ति करून स्वतन्त्र वाक्यार्थ करावा म्हणजे इजादेः सनुमः हें सूत्र विध्यर्थ न होतां नियमार्थच होईल.

२. णि प्रत्ययान्त धातु हा हलन्त नसतो. तेव्हां अर्थातच तेथें नित्य णत्व होण्याकरितां हें सूत्र आहे असें म्हणतां येत नाहीं.

३. इजादेः सनुमः, येथें 'णेर्विभाषा' येथून णेः या पदाची अनुवृत्ति करावयाची. आणि इजादेः सनुमः या सूत्राची आवृत्ति करून ण्यन्त धातुस्थलीं नित्य णत्व होण्याकरितां स्वतंत्र वाक्यार्थ करावा व दुसरें इजादेः सनुमः हें सूत्र कायम आहेच. तें अर्थातच नियमार्थ होईल.

१. ( सू. ३३ ) उपसर्गातील रेफाच्या पुढील निस् निक्ष् आणि निन्द्, या धातूंच्या नकाराला विकल्पानें णकार आदेश होतो कृत् प्रत्यय पुढें असतांना.

१. ( सू. ३४ ) उपसर्गातील रेफ व षकार यांहून पर व भा भू पू कम् गम् प्याय् आणि वेप् या धातूंच्या पुढील कृत्प्रत्ययांतील जो नकार त्याला णत्व होत नाहीं.

भादिषु पूञ्ग्रहणम् ॥ १ ॥

भादिषु पूञ्ग्रहणं कर्तव्यम्। इह मा भूत्। प्रपवणं सोमस्येति ॥

ण्यन्तस्य चोपसंख्यानम् ॥ २ ॥

ण्यन्तस्य चोपसंख्यानं कर्तव्यम्। किं पूञ एव। नेत्याह। अविशेषेण। प्रभापनम् परिभापनम् ॥

षात्पदान्तात् ॥ ८ । ४ । ३५ ॥

षात्पदादिपरवचनम् ॥ १ ॥

षात्पदादिपरग्रहणं कर्तव्यम्। इहैव यथा स्यात्। निष्पानम् दुष्पानम्। इह मा भूत्। सर्पिष्केण सयजुष्केण ॥ तत्तर्हि वक्तव्यम्। न वक्तव्यम्। नैवं विज्ञायते पदस्यान्तः पदान्तः पदान्तादिति। कथं तर्हि। पदेऽन्तः पदान्तः पदान्तादिति ॥

नशेः षान्तस्य ॥ ८ । ४ । ३६ ॥

नशेरशः ॥ १ ॥

नशेरश इति वक्तव्यम्। इहापि यथा

---

(सू. ३४ वा. १) या सूत्रामध्यें भा वगैरे जे धातु उच्चारले आहेत त्यांतील पू शब्दानें पूञ् धातूचेंच ग्रहण होतें म्हणजे पूङ् याचें ग्रहण होत नाहीं असें म्हणावें. कारण प्रपवणं सोमस्य या उदाहरणामध्यें या सूत्रानें णत्वाचा निषेध न झाला पाहिजे.

(वा. २) तसेंच णि–प्रत्ययान्त धातु असतांनाही हा निषेध होतो असें म्हणावें. णि प्रत्यय केला असतांनाही हा निषेध होतो असें जें म्हटलें आहे तें काय एकट्या पू धातूसंबंधानेंच म्हटलें आहे काय?

तस नाहीं असें आम्ही म्हणतों. म्हणजे तें या प्रकृत सूत्रामध्यें उच्चारलेल्या भा भू वगैरे सर्वच धातूसंबधानें आहे असें समजावें उदा० प्रभापनम् परिभापनम्.

(सू ३५ वा. १) पदाच्या अंतीं असलेला जो षकार त्याच्या संबंधानें हा जो णत्वाचा निषेध सांगितला आहे तेथें त्या षकाराचा पुढील वर्ण पदाचा आदि असेल तरच तो निषेध होतो असें म्हणावें. कारण निष्पानम् दुष्पानम् अशा तऱ्हेच्याच उदाहरणांमध्यें हा णत्वाचा निषेध झाला पाहिजे. आणि सर्पिष्केण सयजुष्केण अशा तऱ्हेच्या उदाहरणांमध्यें हा णत्वाचा निषेध न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण सूत्रामधील पदान्तात् या पदाचा अर्थ पदाचा जो अन्त तो पदान्त असा समजू नये.

तर मग कसा समजावा?

असा समजावा कीं पद पुढें असतांना जो अन्त तो पदान्त, तसा पदान्त जो षकार त्याच्या निमित्तानें नकाराला णत्व होत नाहीं. असा प्रकृत सूत्राचा अर्थ केला म्हणजे कांहीं दोष येत नाहीं.

(सू. ३६ वा. १) हें सूत्र नशेरशः असें करावें. म्हणजे षकारान्त जो नश् धातु त्याच्या नकाराला णत्व होत नाहीं असें न म्हणता नश् धातु जेव्हां शकारान्त नसेल तेव्हां त्याच्या नकाराला हा णत्वाचा निषेध होतो असें म्हणावें. कारण प्रनङ्क्ष्यति[२] व परिनङ्क्ष्यति

---

१. (सू. ३५) पदाच्या शेवटीं असलेल्या षकाराच्या पुढील नकाराला णकार आदेश होत नाहीं.

१. (सू. ३६) षकार शेवटीं असलेल्या नश् धातूच्या नकाराला णत्व होत नाहीं.

२. येथें 'षढोः कः सि' (८।२।४१) या सूत्रानें षकाराला ककार झाला आहे.

स्यात् । प्रनङ्क्ष्यति परिनङ्क्ष्यति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इह नशेः ष इतीयता सिद्धम् । सोऽयमेवं सिद्धे सति यदन्तग्रहणं करोति तस्यैतत्प्रयोजनं षान्तभूतपूर्वस्यापि यथा स्यात् ॥

[ पदान्तस्य ॥ ८ । ४ । ३७ ॥ ]

पदव्यवायेऽपि ॥ ८ । ४ । ३८ ॥

पदव्यवायेऽतद्धिते ॥ १ ॥

पदव्यवायेऽतद्धित इति वक्तव्यम् । इह मा भूत् । आर्द्रगोमयेण शुष्कगोमयेणेति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नैवं विज्ञायते पदेन व्यवाये पदव्यवाय इति । कथं तर्हि । पदे व्यवायः पदव्यवायः पदव्यवाय इति ॥

क्षुभ्नादिषु च ॥ ८ । ४ । ३९ ॥

अविहितलक्षणो णत्वप्रतिषेधः क्षुभ्नादिषु

---

या उदाहरणांमध्यें नश् धातु ककारान्त झाला असतांही प्रकृत सूत्रानें निषेध झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण सूत्रामध्यें अन्त हा शब्द न घालतां ' नशेः षः ' इतकेंच सूत्र केलें तरी तदन्तविधि होऊन षकारान्त नश् धातु असा अर्थ होईल. अशा रीतीनें काम भागत असतानाही जो मुद्दाम पाणिनीनें अन्त हा शब्द या सूत्रामध्यें घातला आहे त्याचा उपयोग आम्ही असा समजू कीं नश् धातूच्या शकाराला एकदां षकार झाला म्हणजे त्या उदाहरणामध्यें हा निषेध होतो; त्या षकाराला पुढें कांहीं ककार वगैरे आदेश होऊन शेवटपर्यंत तो षकार टिकला नाहीं तरी हरकत नाहीं. अशा रीतीनें प्रनङ्क्ष्यति या उदाहरणाची सिद्धि होईल.

( सू. ३८ ) रेफ षकार आणि नकार यांमध्यें पदानें व्यवधान असताना णत्व होत नाहीं असा जो प्रकृत सूत्रानें निषेध सांगितला आहे तेथें त्या पदाच्या पुढें तद्धित प्रत्यय नसावा असें म्हणावें. कारण आर्द्रगोमयेण व शुष्कगोमयेण या उदाहरणामध्यें हा णत्वाचा निषेध न झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण सूत्रांतील पदव्यवाये या पदाचा अर्थ पदानें झालेलें व्यवधान असे समजू नये.

तर मग त्याचा अर्थ कसा समजावा ?

असा समजावा कीं पद पुढें असतांना त्याच्या मागील अर्थात् पदसंज्ञक असा जो कांहीं भाग त्या भागानें व्यवधान असतांना णत्व होत नाहीं.[3] तेव्हां आर्द्रगोमयेण व शुष्कगोमयेण या उदाहरणांमध्यें दोष येत नाहीं.

( सू. ३९ ) ज्या शब्दामध्यें णत्व झालेलें दृष्टीस पडत नाहीं परंतु जेथें णत्वाचा निषेध सांगणारें कोणतेंही सूत्र लागू पडत नाहीं अशा

---

१. ( सू. ३७ ) पदाच्या शेवटी असलेल्या नकाराला णत्व करूं नये.

१ ( सू. ३८ ) रेफ किंवा षकार आणि नकार या उभयतां निमित्तनिमित्तींमध्यें पदानें व्यवधान असतांना नकाराला णकार आदेश करूं नये.

२. गो शब्दाहून सुप् प्रत्यय करून त्याच्या पुढें मयट् ( ४।३।१४५ ) हा तद्धित प्रत्यय झाला आहे.

३. माषकुम्भवापेन येथें पूर्वान्तवद्भावानें ' वापेन ' हें पद पुढें असतांना त्याच्या मागील कुम्भ या भागानें व्यवधान असल्यामुळें णत्व होत नाहीं. आर्द्रगोमयेण येथें मय हें पद पुढें नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें णत्वनिषेध होऊं शकत नाहीं.

१. ( सू. ३९ ) क्षुभ्नादि गणामधील शब्दांमध्यें नकाराला णकार आदेश करूं नये.

द्रष्टव्यः ॥

**स्तोः श्चुना श्चुः ॥ ८।४।४० ॥**

किमर्थं तृतीयानिर्देशः क्रियते न श्चावित्येवोच्येत । आनन्तर्यमात्रे श्चुत्वं यथा स्यात् । यज्ञः राज्ञः याच्ञा ॥ अथ संख्यातानुदेशः कस्मान्न भवति । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति संख्यातानुदेशो नेहेति यदयं शात्प्रतिषेधं शास्ति ॥

**ष्टुना ष्टुः ॥ ८ । ४ । ४१ ॥**

किमर्थं तृतीयानिर्देशः क्रियते न ष्टाविति त्येवोच्येत । आनन्तर्यमात्रे ष्टुत्वं यथा स्यात् । पेष्टा लेढा ॥ अथ संख्यातानुदेशः कस्मान्न भवति । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नेह संख्यातानुदेशो भवतीति यदयं तोः षि

---

तऱ्हेचे जे जे शब्द दृष्टीस पडतील ते ते सर्व शब्द या क्षुभ्नादिगणामध्यें आहेत असें समजावें.

( सू. ४० ) या सूत्रामध्यें श्चुना असा जो तृतीया विभक्तीचा निर्देश केला आहे तो कशाकरितां केला आहे ? तसा न करतां सप्तमी विभक्ति करून श्चौ असेंच म्हणावें.

श्चुना अशी तृतीया विभक्ति घालण्याचें कारण असें आहे कीं सकार व तवर्ग यांना शकार व चवर्ग यांचा फक्त योग असताना श्चुत्व झालें पाहिजे. उदा०-यज्ञः[2] याच्ञा. श्चौ अशी सप्तमी विभक्ति उच्चारली तर शकार व चवर्ग पुढें असतांनाच त्याच्या मागील सकार व तवर्गांना श्चुत्व होईल; आणि शकार व चवर्गाच्या पुढील सकार व तवर्गांना हें श्चुत्व होणार नाहीं.

आतां या सूत्रामध्यें क्रमानें संबंध म्हणजे सकाराचा शकाराशीं आणि तवर्गाचा चवर्गाशीं असा कां होत नाहीं ?

हा आचार्य पाणिनि ज्या अर्थी 'शात्' (८।४।४४) या सूत्रानें शकाराच्या पुढील तवर्गाला श्चुत्वाचा निषेध सांगतो त्यावरून तो असें सुचवितो कीं येथें क्रमानें संबंध होत नाहीं. तेव्हां शकाराचाही सकार व तवर्ग या दोघांशीं आणि चवर्गाचाही सकार व तवर्ग या दोघांशीं संबंध होतो.

( सू. ४१ ) या सूत्रामध्यें ष्टुना असा जो तृतीया विभक्तीचा निर्देश केला आहे तो कशाकरिता ? तसा न करतां सप्तमी विभक्ति करून ष्टौ असेंच म्हणावें.

ष्टुना अशी तृतीया विभक्ति घालण्याचें कारण असें कीं सकार व तवर्ग यांना शकार व टवर्ग यांचा फक्त योग असतांना ष्टुत्व झालें पाहिजे. उदा०-पेष्टा लेढा. ष्टौ अशी सप्तमी विभक्ति घातली तर षकार व टवर्ग पुढें असतांना त्याच्या मागील सकार व तवर्ग यांना ष्टुत्व होईल. आणि षकार व टवर्ग यांच्या पुढील सकार व तवर्गांना ष्टुत्व होणार नाहीं.

आतां या सूत्रामध्यें क्रमानें संबंध म्हणजे सकाराचा षकाराशीं आणि तवर्गाचा टवर्गाशीं असा कां होत नाहीं ?

तसा न होण्याचें कारण असें कीं हा आचार्य पाणिनि ज्या अर्थी 'तोः षि' ( ८।४।४३ ) या सूत्रानें षकार पुढें असतांना तवर्गाला ष्टुत्वाचा निषेध सांगतो त्यावरून तो असें सुचवितो कीं

---

१. ( सू. ४० ) सकार किंवा तवर्ग यांच्या जवळ शकार किंवा चवर्ग असतांना त्या सकाराला शकार आणि तवर्गाला चवर्ग आदेश होतो.

२. यज् आणि याच् या धातूंहून नङ् प्रत्यय ( ३।३।९० ) झाला आहे. त्या प्रत्ययाच्या नकारालाच प्रकृत सूत्रानें ञकार आदेश झाला आहे.

१. ( सू. ४१ ) सकार किंवा तवर्ग यांच्या जवळ षकार किंवा टवर्ग असताना त्या सकाराला षकार आणि तवर्गाला टवर्ग असे आदेश होतात.

[ ८. ४. ४२ ] इति प्रतिषेधं शास्ति ॥

**न पदान्ताट्टोरनाम् ॥८।४।४२ ॥**

अनामिति किम् । षण्णां भवति काश्यपः ॥ अत्यल्पमिदमुच्यतेऽनामिति । अनांनवतिनगरीणां चेति वक्तव्यम् । षण्णाम् षण्णवतिः षण्णगरी ॥

**[ तोः षि ॥ ८ । ४ । ४३ ॥**

**शात् ॥ ८ । ४ । ४४ ॥ ]**

**यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा ॥ ८ । ४ । ४५ ॥**

**यरोऽनुनासिके प्रत्यये भाषायां नित्यवचनम् ॥ १ ॥**

यरोऽनुनासिके प्रत्यये भाषायां नित्यमिति च वक्तव्यम् । वाङ्मयम् त्वङ्मयमिति ॥

**[ अचो रहाभ्यां द्वे ॥८।४।४६॥]**

**अनचि च ॥ ८ । ४ । ४७ ॥**

**द्विर्वचने यणो मयः ॥ १ ॥**

द्विर्वचने यणो मय इति वक्तव्यम् । किमुदाहरणम् । यदि यण इति पञ्चमी मय

---

येथें क्रमानें संबंध होत नाहीं. तेव्हां येथे षकाराचाही सकार व तवर्ग या दोघांशीं आणि टवर्गाचाही सकार व तवर्ग या दोघांशीं संबंध होतो.

( सू. ४२ ) या सूत्रामध्यें अनाम् असें कशाकरिता म्हटलें आहे ?

षण्णां भवति काश्यपः या ठिकाणीं षण्णाम् या षष्ठी बहुवचनाच्या रूपामध्ये नाम् प्रत्याच्या नकाराला ष्टुत्वाचा निषेध न झाला पाहिजे याकरिता अनाम् असें म्हटलें आहे.

पण अनाम् असें जें सूत्रामध्यें म्हटलें आहे तें फारच थोडें आहे. आणखीही कांहीं ठिकाणीं ष्टुत्वाचा निषेध न झाला पाहिजे. तो असा—

षष्ठी बहुवचनाचा नाम् हा प्रत्यय आणि नवति व नगरी हे दोन शब्द या तीन ठिकाणीं नकाराला ष्टुत्वाचा निषेध होत नाहीं असें म्हणावें. उदा०—षण्णाम् षण्णवतिः षण्णगर्यः.

( सू. ४५ वा. १ ) हा जो प्रकृत सूत्रानें अनुनासिक वर्ण पुढें असताना पदाच्या शेवटीं असलेल्या यराला विकल्पानें अनुनासिक आदेश सांगितला आहे तो अनुनासिक लौकिक प्रयोगामध्यें प्रत्यय पुढें असतांना नित्य होतो असें म्हणावें. उदा०—वाङ्मयम्, त्वङ्मयम्.

( सू ४७ वा. १ ) हें जें वर्णाला द्वित्व सांगितलें आहे तेथें यणो मयः असें म्हणावें.

याचें उदाहरण काय ?

या वार्तिकाचें उदाहरण दोन तऱ्हेनें संभवतें तें असें कीं—यणः ही पञ्चमी विभक्ति आहे आणि मयः ही षष्ठी विभक्ति आहे असें गृहीत धरलें तर यणाहून पर असलेल्या मयाला द्वित्व होतें असा वार्तिकाचा अर्थ होतो; उदाह-

---

१. ( सू. ४२ ) पदाच्या शेवटी असलेल्या टवर्गाच्या पुढील नाम् नवति आणि नगरी हे शब्द खेरीज करून सकार किंवा तवर्ग यांना षकार किंवा टवर्ग होत नाहींत.

१. ( सू. ४३ ) षकार पुढें असतांना त्याच्या मागील तवर्गाला ष्टुत्व करूं नये.

१. ( सू. ४४ ) शकाराच्या पुढील तवर्गाला श्चुत्व करूं नये.

१. ( सू. ४५ ) अनुनासिक वर्ण पुढें असताना त्याच्या मागील पदाच्या शेवटी असलेल्या यराला विकल्पानें अनुनासिक वर्ण आदेश होतो.

१. ( सू. ४६ ) अचाच्या पुढील जो रेफ किंवा हकार त्याच्या पुढील यराला विकल्पानें द्वित्व होतें.

१. ( सू. ४७ ) अचाच्या पुढील यराला द्वित्व होतें; मात्र त्या यराच्या पुढें अच् नसेल तर.

इति षष्ठी उल्का वल्म्मीकमित्युदाहरणम् । अथ मय इति पञ्चमी यण इति षष्ठी दध्य्यत्र मध्व्वत्रेत्युदाहरणम् ॥

## शरः खयः ॥ २ ॥

शरः खय इति वक्तव्यम् । किमुदाहरणम् । यदि शर इति पञ्चमी खय इति षष्ठी स्थ्थाली स्थ्थातेत्युदाहरणम् । अथ खय इति पञ्चमी शर इति षष्ठी वत्स्सः क्ष्षीरम् अप्प्सरा इत्युदाहरणम् ॥

## अवसाने च ॥ ३ ॥

अवसाने च द्वे भवत इति वक्तव्यम् । वाक्क वाक् । त्वक्क् त्वक् । स्रुक्क् स्रुक् ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न[२] वक्तव्यम् । नायं प्रसज्यप्रतिषेधः । अचि नेति । किं तर्हि । पर्युदासोऽयम् । यदन्यदच इति ॥

---

रणार्थ-उल्क्का, व वल्म्मीकम्. येथें लकाराच्या पुढील ककाराला आणि मकाराला द्वित्व होतें. आता त्या वार्तिकामध्यें मयः ही पञ्चमी धरली आणि यण: ही षष्ठी आहे असें गृहीत धरले तर मयाच्या पुढें असलेल्या यणाला द्वित्व होते असा अर्थ होतो. याचीं उदाहरणें दध्य्यत्र व मध्व्वत्र. या ठिकाणीं धकाराच्या पुढे असलेल्या यकाराला आणि वकाराला द्वित्व होतें.

( वा. २ ) या द्वित्वप्रकरणामध्यें शरः खयः असें म्हणावें.

त्याचें उदाहरण काय ?

या वार्तिकाचें उदाहरण दोन तऱ्हेनें संभवतें. तें असें कीं—शरः ही पंचमी आहे व खयः ही षष्ठी विभक्ति आहे असें गृहीत धरलें तर शराहून पर असलेल्या खयाला द्वित्व होतें असा वार्तिकाचा अर्थ होतो; व त्याचें उदाहरण स्थ्थाली स्थ्थाता; येथें सकाराच्या पुढील थकाराला द्वित्व होतें. आतां या वार्तिकामध्यें खय: ही पंचमी विभक्ति आहे व शरः ही षष्ठी आहे असें गृहीत धरलें तर खयाच्या पुढील शराला द्वित्व होतें असा अर्थ होतो; व त्याचें उदाहरण वत्स्सः क्ष्षीरम् अप्प्सराः. येथें तकाराच्या पुढील सकाराला, ककाराच्या पुढील षकाराला आणि पकाराच्या पुढील सकाराला द्वित्व होतें.

( वा. ३ ) अवसान म्हणजे पुढे काहीं नसतांना शेवटच्या यराला द्वित्व होते असें म्हणावें. उदा०—वाक्क् वाक्, त्वक्क् त्वक्, स्रुक्क् स्रुक्.

तर मग अवसान असताना शेवटच्या यराला द्वित्व होतें असें म्हटलें पाहिजे.

तसें[२] म्हणावयास नको. ( कारण या सूत्रानेंच अवसानीं हें द्वित्व सिद्ध होतें. ) पण सूत्रामध्यें अनचि हा पर्युदास नव्हे कीं ज्यामुळें अचाशिवाय जो इतर कोणी वर्ण तो पुढें असतांना द्वित्व होतें असा अर्थ होईल; येथें प्रसज्यप्रतिषेध आहे. म्हणजे सामान्यतः अचाच्या पुढील यराला द्वित्व होतें असें एक विधिवाक्य, आणि यराच्या पुढें अच् असेल तर त्या यराला द्वित्व होत नाहीं असें दुसरें निषेधवाक्य. अशीं दोन वाक्यें करण्यांत गौरव जरी होत आहे तरी तें कबूल केलें तर वरील वार्तिक करावयास नको.

---

२. या ठिकाणीं " न वक्तव्यम् " म्हणजे " अवसाने च हें वार्तिक करावयास नको " याच्याशीं " नायं प्रसज्यप्रतिषेधः । अचि नेति । किं तर्हि । पर्युदासोयम् । यदन्यदच इति " हें पुढील भाष्य विसंगत दिसतें. (अयं पाठो लेखकप्रमादात्तेष्टः । ...) असें म्हणून कैयटानें " नायं पर्युदासः । यदन्यदच इति । कि तर्हि । प्रसज्यप्रतिषेधः । अचि नेति । " असा मूळचा पाठ असावा असें म्हटलें आहे व त्याचें स्पष्टीकरणही केलें आहे. याच कैयटकल्पित पाठास अनुसरून भाषांतर दिलें आहे. हा कैयटकल्पित पाठ कोणत्याही मुद्रित अथवा हस्तलिखित प्रतींत सांपडत नाहीं. कैयटाचें म्हणणें उद्योतकारांना जरी पटलें असलें तरी भाष्यांत सर्व

नादिन्याक्रोशे पुत्रस्य ॥ ८ । ४ । ४८ ॥

नादिन्याक्रोशे पुत्रस्येति तत्परे च ॥ १ ॥

नादिन्याक्रोशे पुत्रस्येत्यत्र तत्परे चेति वक्तव्यम् । पुत्रपुत्रादिनि ॥

वा हतजग्धपरे च ॥ २ ॥

वा हतजग्धपर इति वक्तव्यम् । पुत्रहती पुत्त्रहती । पुत्रजग्धी पुत्त्रजग्धी ॥

चयो द्वितीयाः शरि पौष्करसादेः ॥ ३ ॥

चयो द्वितीया भवन्ति शरि परतः पौष्करसादेराचार्यस्य मतेन । वथ्सः ख्षीरम् अफ्सराः ॥

[ शरोऽचि ॥ ८ । ४ । ४९ ॥

त्रिप्रभृतिषु शाकटायनस्य ॥ ८ । ४ । ५० ॥

सर्वत्र शाकल्यस्य ॥ ८।४।५१ ॥

दीर्घादाचार्याणाम् ॥ ८।४।५२ ॥

झलां जश् झशि ॥८।४।५३॥ ]

अभ्यासे चर्च ॥ ८ । ४ । ५४ ॥

प्रकृतिचरां प्रकृतिचरो भवन्ति ।

---

( सू. ४८ वा. १ ) हा जो प्रकृत सूत्रानें आदिनी शब्दाच्या मागील पुत्र शब्दामध्ये तकाराला द्वित्व होत नाहीं असा निषेध सांगितला आहे तो निषेध आदिनी शब्दाच्या मागील जो पुत्र शब्द त्या पुत्र शब्दाच्या मागील पुनः दुसरा जो पुत्र शब्द त्यांतील तकारालाही द्वित्व होत नाहीं असें म्हणावें. उदा०— पुत्रपुत्रादिनि.

( वा. २ ) हत आणि जग्ध हे शब्द पुढें असतांना त्यांच्या मागें असलेल्या पुत्र शब्दामध्यें तकाराला द्वित्व विकल्पानें होतें असें म्हणावें- उदा० पुत्रहती पुत्त्रहती. पुत्रजग्धी पुत्त्रजग्धी.

( वा० ३ ) पौष्करसादि नामक आचार्यांच्या मतानें शर् पुढें असतांना त्याच्यामागील चयाला त्याच वर्गांतील द्वितीय आदेश होतात. उदा० वथ्सः, ख्षीरम्, अफ्सराः.

( सू० ५४ ) अभ्यासामध्यें जेथें मूळचाच

---

ठिकाणीं आढळणारा पाठही शुद्ध असूं शकेल असें त्यांनीं सुचविलें आहे. तसें समजल्यास पुढीलप्रमाणें अर्थ करावाः--

तर मग अवसान ... द्वित्व होतें असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. ( कारण प्रसज्यप्रतिषेध मानला असतां या सूत्रानेंच अवसानीं द्वित्व सिद्ध होत आहे ).

द्वित्व सिद्ध होणार नाहीं. कारण गौरव होत असल्यामुळें येथें ' अचि न ' असा प्रसज्यप्रतिषेध घेतां येणार नाहीं.

तर मग सूत्राचा अर्थ कसा करावा ?

येथें लाघवास्तव पर्युदासच घ्यावा; व अचापेक्षां निराळा पण अच्सदृश वर्ण पुढें असतांना द्वित्व होतें असा अर्थ करावा. ( असें केल्यास वार्तिककारांचें " अवसाने च " हें वचन योग्यच आहे ).

१. ( सू. ४८ ) आदिनी शब्द पुढें असतांना पुत्र शब्दांतील अचाच्या पुढील यराला द्वित्व होत नाहीं, पण त्या दोन्हीं शब्दांपासून आक्रोश प्रतीत होत असेल तर.

१. ( सू. ४९ ) अच् पुढें असतांना त्याच्या मागील शराला द्वित्व होत नाहीं.

१. ( सू. ५० ) तीन चार किंवा त्यांहून ज्यास्त वर्णांचा संयोग असतां त्या संयोगांतील यराला शाकटायन आचार्यांच्या मतानें द्वित्व होत नाहीं.

१. ( सू. ५१ ) शाकल्य आचार्यांच्या मतानें कोठेंही द्वित्व करूं नये.

१. ( सू. ५२ ) आचार्यांच्या मतानें दीर्घ वर्णाच्या पुढील यराला द्वित्व होत नाहीं.

१. ( सू. ५३ ) झलांचे स्थानीं जश् आदेश होतात झश् वर्ण पुढें असेल तर.

१. ( सू. ५४ ) अभ्यासांतील झलाचें स्थानीं चर् आणि जश् आदेश होतात. हें सूत्र व यावरील भाष्य डॉ. कीलहॉर्न यांनीं मुद्रित केलेल्या प्रतींत

चिचीषति । प्रकृतिजशां प्रकृतिजशश्च भवन्ति । जिजनिषति । बुबुधे । ददौ ॥

[ खरि च ॥ ८ । ४ । ५५ ॥

वाऽवसाने ॥ ८ । ४ । ५६ ॥

अणोऽप्रगृह्यस्यानुनासिकः ॥ ८ ४ । ५७ ॥

अनुस्वारस्य ययि परसवर्णः ॥ ८ । ४ । ५८ ॥

वा पदान्तस्य ॥ ८।४।५९ ॥

तोर्लि ॥ ८ । ४ । ६० ॥ ]

उदः स्थास्तम्भोः पूर्वस्य ॥ ८ । ४ । ६१ ॥

उदः पूर्वत्वे स्कन्दश्छन्दस्युपसंख्यानम् ॥ १ ॥

उदः पूर्वत्वे स्कन्देश्छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । अघ्न्ये दूरमुत्कन्द ॥

रोगे चेति वक्तव्यम् । उत्कन्दको रोगः ॥

[ झयो होऽन्यतरस्याम् ॥ ८।४। ६२ ]

शश्छोऽटि ॥ ८ । ४ । ६३ ॥

छत्वममि तच्छ्लोकेन तच्छ्मश्रुणेति प्रयोजनम् ॥ १ ॥

---

वर्ण चर् असेल तेथें त्याला तसाच चर् आदेश होतो. उदा० चिचीषति. तसेंच अभ्यासामध्यें जेथें मूळचाच जश् असेल तेथें त्याला तसाच जश् आदेश होतो. उदा० जिजनिषति, बुबुधे, ददौ.

( सू० ६१ वा० १ ) उद् या उपसर्गाच्या पुढील स्था आणि स्तम्भ् या धातूंच्या सकाराला जसा हा प्रकृत सूत्रानें पूर्वसवर्ण आदेश सांगितला आहे तसाच स्कन्द् धातूच्या सकाराला वैदिक प्रयोगामध्यें पूर्वसवर्ण आदेश होतो असें म्हणावे. उदा० अघ्न्ये दूरमुत्कन्द.

रोग अर्थ गम्यमान असतांनाही उद् या उपसर्गापुढील स्कन्द् धातूच्या सकाराला पूर्वसवर्ण आदेश होतो असें म्हणावे. उदा०—उत्कन्दको रोगः.

( सू० ६३ वा० १ ) पदाच्या शेवटीं असलेल्या झयाच्या पुढील शकाराला जो हा छकार आदेश अट् पुढें असताना प्रकृत सूत्रानें सांगितला आहे तो अम् पुढें असतांना होतो असें म्हणावें.

---

मुळींच दिलें नाहीं. परंतु काशी येथील मुद्रित प्रतींत व पुष्कळ हस्तलिखित प्रतींत तें आढळतें म्हणून येथें दिलें आहे.

१. ( सू. ५५ ) खर् पुढें असतांना मागील झलांचे स्थानीं चर् आदेश होतात.

१. ( सू. ५६ ) पुढें कांहीएक वर्ण नसतां शेवटच्या झलाला चर् आदेश विकल्पानें होतो.

१. ( सू. ५७ ) पुढें कांहीएक वर्ण नसतां शेवटच्या प्रगृह्याखेरीज अणाला अनुनासिक आदेश विकल्पानें होतो.

१. ( सू. ५८ ) यय् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असतांना त्याच्या मागील अनुस्वाराला परसवर्ण आदेश होतो.

१. ( सू. ५९ ) पदाच्या शेवटीं असलेल्या अनुस्वाराला यय् पुढें असतांना विकल्पानें परसवर्ण आदेश होतो.

१. ( सू. ६० ) लकार पुढें असतांना मागील तवर्गाला परसवर्ण अर्थात् ल् किंवा लँ् असा आदेश होतो.

१. ( स. ६१ ) उद् या उपसर्गाच्या पुढील स्था किंवा स्तम्भ् धातु यांच्या सकाराला पूर्वसवर्ण म्हणजे अर्थात् दकाराचा सवर्ण आदेश होतो.

१. ( सू. ६२ ) झय् प्रत्याहारांतील वर्णांच्या पुढील हकाराला विकल्पानें पूर्वसवर्ण आदेश होतो.

१. ( सू. ६३ ) पदाच्या शेवटीं असलेल्या झयाच्या पुढील शकाराला छकार आदेश विकल्पानें होतो, अट् प्रत्याहारांतील वर्ण पुढें असेल तर.

छत्वममीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । तच्छ्लोकेन । तच्छ्मश्रुणेति ॥

[ हलो यमां यमि लोपः ॥ ८ । ४ । ६४ ॥ ]

झरो झरि सवर्णे ॥ ८ । ४ । ६५ ॥

सवर्णग्रहणं किमर्थम् ।

**झरो झरि सवर्णग्रहणं समसंख्यप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

झरो झरि सवर्णग्रहणं क्रियते समसंख्यप्रतिषेधार्थम् । संख्यातानुदेशो मा भूदिति । किं च स्यात । इह न स्यात् । शिण्ढि पिण्ढीति ॥

[ उदात्तादनुदात्तस्य स्वरितः ॥ ८ । ४ । ६६ ॥

नोदात्तस्वरितोदयमगार्ग्यकाश्यपगालवानाम् ॥ ८ । ४ । ६७ ]

अ अ ॥ ८ । ४ । ६८ ॥

किमर्थमिदमुच्यते । अकारोऽयमक्षरसमाम्नाये विवृत उपदिष्टस्तस्य संवृतताप्रत्यापत्तिः क्रियते ॥ किं पुनः कारणं विवृत उपदिश्यते ।

**आदेशार्थं सवर्णार्थमकारो विवृतः**

---

याचें उदाहरण काय ?

तच्छ्लोकेन, तच्छमश्रुणा हीं उदाहरणें होत.

( सू. ६५ ) या सूत्रामध्यें सवर्णे असें कशाकरितां म्हटलें आहे ?

झरो झरि० या प्रकृत सूत्रामध्यें जें सवर्णे असें म्हटलें आहे तें अशाकरितां म्हटलें आहे कीं झरांचा झरांबरोबर जो येथें अन्वय झालेला आहे तो पहिल्या झराचा पहिल्या झराशीं दुसऱ्या झराचा दुसऱ्या झराशीं असा क्रमानें अन्वय होऊं नये म्हणून.

तसा क्रमानें अन्वय झाला असतां काय होईल ?

तसा अन्वय झाला असतां शिण्ढि पिण्ढि या उदाहरणामध्यें ढकार हा झर् पुढें असतांना त्याच्या मागील झर् जो डकार त्याचा प्रकृत सूत्रानें लोप होणार नाहीं.

(सू० ६८) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

अइउण् वगैरे अक्षरसमाम्नायामध्यें वर्णांचा उपदेश करतांना जो अकार उच्चारला आहे तो विवृत प्रयत्नाचा उच्चारला आहे. त्या विवृत अकाराला सर्व ठिकाणीं प्रकृत सूत्रानें संवृत अकार व्हावा याकरितां हें सूत्र केलें आहे.

पण अक्षरसमाम्नायामध्यें अ हा विवृत प्रयत्नाचा जो उच्चारला आहे त्याचें काय बरें कारण ?

विवृत आदेश होण्याकरितां आणि दीर्घ आकाराबरोबर ह्रस्व अकाराला सवर्णसंज्ञा

---

१. (सू. ६४) हलाच्या पुढील यम् प्रत्याहारांतील वर्णाचा लोप होतो तमलाच यम् वर्ण पुढें असेल तर.

१. ( ६५ ) हलाच्या पुढील झराचा लोप होतो सवर्ण झर् पुढें असतांना.

१. ( सू ६६ ) उदात्त स्वराच्या पुढील अनुदात्त स्वराचें स्थानीं स्वरित स्वर आदेश होतो

१. ( सू. ६७ ) गार्ग्य काश्यप आणि गालव या तिघांखेरीज अन्य आचार्यांच्या मतानें उदात्ताच्या किंवा स्वरिताच्या मागील अनुदात्ताला तो उदात्ताच्या पुढें असला तरी स्वरित होत नाहीं.

१ ( सू. ६८ ) विवृतप्रयत्नवान् अशा ह्रस्व अकाराला संवृत प्रयत्नाचा अकार आदेश होतो.

२. ह्रस्व अकार हा विवृत प्रयत्नाचा दुष्ट समजला जातो. तसा दीर्घ आकार आणि प्लुत आकार हा संवृत प्रयत्नाचा दुष्ट समजला जातो. तेव्हां अक्षरसमाम्नायामध्यें आणि पच् वगैरे धातूमध्यें जर निर्दुष्ट म्हणजे संवृत आकार उच्चारला, आणि दा वगैरे धातूंमध्यें जर निर्दुष्ट म्हणजे विवृत आकार उच्चारला तर तेवढ्यानें काम भागत नाहीं. कारण अकाराला जे दीर्घ, व प्लुत आदेश होतील ते अकारामारखें संवृत होतील आणि ते तर दुष्टच आहेत. शिवाय अइउण् येथें उच्चारलेल्या

स्मृतः। आकारस्य तथा ह्रस्वस्तदर्थं पाणिनेर अ॥ आदेशार्थं तावत्। वृक्षाभ्याम् देवदत्ता३। आन्तर्यतो विवृतस्य विवृतौ दीर्घप्लुतौ यथा स्याताम्। सवर्णार्थं च। अकारः सवर्णग्रहणेनाकारमपि यथा गृह्णीयात्। आकारस्य तथा ह्रस्वः। तथा च अतिखट्वः अतिमाल इत्यत्राकारस्य ह्रस्व उच्यमानो विवृतः स्यादित्येवमर्थो प्रत्यापत्तिः॥ अस्ति प्रयोजनमेतत्। किं तर्हीति।

**अकारस्य प्रत्यापत्तौ दीर्घप्रतिषेधः॥ १॥**

अकारस्य प्रत्यापत्तौ दीर्घस्य प्रतिषेधो वक्तव्यः। खट्वा माला॥ नैष दोषः। यथैव प्रकृतितः सवर्णग्रहणमेवमादेशतोऽपि भवितव्यं तत्रान्तर्यतो ह्रस्वस्य ह्रस्वो दीर्घस्य दीर्घो भविष्यति॥

**आदेशस्य चानण्त्वान्न सवर्णग्रहणम्॥ २॥**

---

होण्याकरितां अक्षरसमाम्नायामध्यें अकार हा विवृत प्रयत्नाचा उच्चारला आहे. तेव्हां त्या विवृत अकाराला संवृत अकार आदेश व्हावा याकरितां पाणिनीनें प्रकृत सूत्र केलें आहे. तसेंच विवृत अशा दीर्घ आकाराला जेथें ह्रस्व होऊन विवृत अ होतो त्या ठिकाणींही त्याला संवृत अ करण्याकरितां प्रकृत सूत्र केलें आहे.

विवृत आदेश होण्याकरितां याचीं उदाहरणें वृक्षाभ्याम्, देवदत्ता ३ वगैरे. या ठिकाणीं मूळचा ह्रस्व अकार विवृत मानला म्हणून त्याला त्याच्या सारखे म्हणजे विवृत प्रयत्नाचे दीर्घ आणि प्लुत होत असतात. याकरितां मूळचा ह्रस्व अकार विवृत उच्चारला आहे. तसेंच सवर्ण संज्ञेकरितांही मूळचा अकार विवृत उच्चारला आहे, कीं ज्याच्या योगानें विवृत अकार हा आपले सवर्ण जे विवृत प्रयत्नाचे दीर्घ आणि प्लुत त्यांचेंही ग्रहण करतो. तसेंच आकाराला ह्रस्व झालेल्याचें उदा०—अतिखट्वः, अतिमालः वगैरे. या ठिकाणीं आकाराला जो ऱ्हस्व अकार आदेश होतो तो आकारासारखा विवृत प्रयत्नाचा होतो. तेव्हां त्या विवृत अकाराला संवृत अकार होण्याकरितां हें प्रकृत सूत्र केलें आहे.

असा हा प्रकृत सूत्राचा उपयोग आहे खरा. पण—

पण काय?

(वा० १) विवृत अकाराला प्रकृत सूत्रानें जो संवृत अकार सांगितला आहे तो आदेश दीर्घ आकाराला होत नाहीं असें म्हणावें. उदा०—खट्वा, माला.

हा दोष येत नाहीं. कारण अकार या स्थानीला सांगितलेला आदेश जसा सवर्णग्रहणानें दीर्घ आकाराला प्राप्त होतो तसाच आदेश सांगितलेला जो अ त्यानेंही सवर्णग्रहण होईल आणि सादृश्यामुळें ह्रस्व अला ह्रस्व अ आदेश आणि दीर्घ आला दीर्घ आ आदेश करतां येतील.

---

संवृत अकारानें विवृत अकाराचें सावर्ण्य नसल्यामुळें दा वगैरे धातूंमधील दीर्घ, प्लुत अशा विवृत आकाराला अच् म्हणतां येणार नाहीं. याकरितां असें मानलें आहे कीं ऱ्हस्व असो किंवा दीर्घ वगैरे असो सर्व ठिकाणीं अ हा मूळचा विवृतच उच्चारला आहे. फक्त ऱ्हस्व अकार हा सिद्ध प्रयोगामध्यें निर्दुष्ट म्हणजे संवृत पाहिजे म्हणून हें सूत्र केलें आहे.

१. जसा अस्य च्वौ (७।४।३२) यानें ऱ्हस्व अकाराला सांगितलेला ईकार आदेश सवर्णग्रहणामुळें दीर्घ आकारालाही होतो तसा येथेंही दीर्घ आकाराला ऱ्हस्व अकार आदेश होईल.

आदेशस्य चानण्त्वात्सवर्णानां ग्रहणं न प्राप्नोति। केषाम्। उदात्तानुदात्तस्वरितानुनासिकानाम् ॥

**सिद्धं तु तपरनिर्देशात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत्। कथम्। तपरनिर्देशात्। तपरनिर्देशः कर्तव्यः। अद् इति ॥

अपर आह। अकारस्य प्रत्यापत्तौ दीर्घप्रतिषेधः। अकारस्य प्रत्यापत्तौ दीर्घस्य प्रतिषेधो वक्तव्यः। खट्वा माला। नैष दोषः। दीर्घोच्चारणसामर्थ्यान्न भविष्यति। इदं तर्हि प्रयोजनम्। वृक्षाभ्याम् प्लक्षाभ्याम्। अत्रापि दीर्घवचनसामर्थ्यान्न भविष्यति। इदं तर्हि। अपि काकः श्येनायते। ननु चात्रापि दीर्घवचनसामर्थ्यादेव न भविष्यति। अस्त्यन्य-

---

( वा. २ ) या सूत्रानें आदेश सांगितलेला जो अकार तो संवृत प्रयत्नाचा असल्यामुळें अइउण् या अक्षरसमाम्नायामध्यें तो उच्चारला आहे असें म्हणतां येत नाहीं; तेव्हां अर्थातच तो अण् नसल्यामुळें त्यानें सवर्णांचें ग्रहण होणार नाहीं.

ते सवर्ण कोणते ?

उदात्त, अनुदात्त, स्वरित आणि अनुनासिक हे सवर्ण होत. सर्वच प्रकारचा आदेश तेथें झाला पाहिजे.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तपराचें उच्चारण करावें म्हणजे सूत्रामध्यें अत् अ असा तकार घालून निर्देश करावा.

या तीन वार्तिकांच्या संबंधानें व्याख्या करतांना कांहीं लोक अशा तऱ्हेची व्याख्या करतात.—

विवृत अकाराला प्रकृत सूत्रानें जो संवृत अकार सांगितला आहे तो आदेश दीर्घ अकाराला होत नाहीं असें म्हणावें. उदा० खट्वा, माला.

हा दोष येत नाहीं. कारण, खट्वा माला या उदाहरणांमध्यें जो स्त्रीलिंगाला दाखविणारा टाप् हा प्रत्यय केला आहे तो ज्या अर्थीं पाणिनीनें दीर्घ उच्चारला आहे त्या अर्थीं त्याला जर ऱ्हस्व अकार आदेश व्हावयाचा असेल तर तें दीर्घोच्चारण व्यर्थ होईल. तेव्हां दीर्घ अकाराला ऱ्हस्व अकार आदेश होणार नाहीं.

तर मग वृक्षाभ्यां प्लक्षाभ्याम् या उदाहरणामध्यें दीर्घ आकाराला प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व अकार आदेश होईल असा दोष येतो.

येथें देखील ' सुपि च ' ( ७।३।१०२ ) या सूत्रानें जो दीर्घ केला आहे तो व्यर्थ होईल म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव तेथें त्याला प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व अकार आदेश होणार नाहीं.

तर मग अपि काकः श्येनायते या वाक्यामध्यें श्येन शब्दाच्या अकाराला जो ' अकृत्सार्व० ' ( ७।४।२५ ) या सूत्रानें दीर्घ झालेला आहे त्याला प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व अकार आदेश होईल असा दोष येतो.

हाही दोष येत नाहीं. कारण तेथेंही ' अकृत्सार्व० ' (७।४।२५) या सूत्रानें केलेला जो दीर्घ तो व्यर्थ होईल म्हणून त्याच्या सामर्थ्यास्तव त्याला ऱ्हस्व अकार आदेश होणार नाहीं.

पण असें मात्र येथें म्हणतां येणार नाहीं. कारण ' अकृत्सार्व० ' या सूत्रानें जो दीर्घ

---

४. तेव्हां स्थानीं जो ऱ्हस्व अ त्यानें दीर्घांचें ग्रहणच होणार नाहीं.

५. येथें मूळ संस्कृत भाष्यांत काशी येथील मुद्रित प्रतींत व कांहीं हस्तलिखित प्रतींत ' इदं तर्हि प्रयोजनम् ' याचे ऐवजी ' इदं तर्हि ' येवढेंच आढळतें व त्यास अनुलक्षून भाषांतर केलें आहे. प्रयोजनम् शब्द मूळांत आहे असें समजलें तर पुढील प्रमाणें भाषांतर होईल:– तर मग वृक्षाभ्याम्.......आदेश होईल तो होऊं नये हें प्रस्तुत वार्तिकाचें प्रयोजन आहे. येथें देखील......

दीर्घवचने प्रयोजनम् । किम् । दधीयति मधूयति ॥ अत्रैव[६] चैष दोष आदेशस्य चानण्त्वात्सवर्णानां ग्रहणं न प्राप्नोति । केषाम् । उदात्तानुदात्तस्वरितानुनासिकानाम् ॥ सिद्धं तु तपरनिर्देशात् । सिद्धमेतत् । कथम् । तपरनिर्देशात् । तपरनिर्देशः कर्तव्यः । अदिति ॥

**एकशेषनिर्देशाद्वा स्वरभिन्नानां भगवतः पाणिनेः सिद्धम् ॥ ४ ॥**

एकशेषनिर्देशाद्वा स्वरभिन्नानां भगवतः पाणिनेराचार्यस्य सिद्धम् । एकशेषनिर्देशोऽयम् । अ अ अ इति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्येऽष्टमस्याध्यायस्य चतुर्थे पादे प्रथममाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

**॥ अष्टमोऽध्यायः समाप्तः ॥**

॥ इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचितं व्याकरणमहाभाष्यं सम्पूर्णम् ॥

**॥ शुभं भूयात् ॥**

---

सांगितला आहे त्याचा उपयोग अकाराशिवाय इतर ठिकाणीं होतो.

तो कोठें ?

दधीयति मधूयति या उदाहरणांमध्यें दीर्घ ईकार आणि ऊकार आदेश होतात तेथें अकार नसल्यामुळें प्रकृत सूत्राची प्राप्ति येत नाहीं.

ह्या सूत्रानें आदेश सांगितलेला जो अकार तो संवृत प्रयत्नाचा असल्यामुळें अइउण् या अक्षरसमाम्नायामध्यें तो उच्चारला आहे असें म्हणतां येत नाहीं. तेव्हा अर्थातच तो अण् नसल्यामुळें त्यानें सवर्णाचें ग्रहण होणार नाहीं.

ते सवर्ण कोणते ?

उदात्त, अनुदात्त, स्वरित आणि अनुनासिक या सर्वच प्रकारचा आदेश तेथें झाला पाहिजे.

उदात्त अनुदात्त वगैरे सर्व प्रकारचे आदेश करतां येतील.

ते कसे ?

तपराचें उच्चारण करावें. म्हणजे सूत्रामध्यें अत् अत् असे दोन तकार घालून निर्देश करावा.

अथवा या प्रकृत सूत्रामध्यें जें अ असें उच्चारण केलें आहे तें एकाच प्रकारच्या अकाराचें नव्हे तर उदात्त अनुदात्त, वगैरे अनेक प्रकारच्या ऱ्हस्व अकारांचे अ असें एकदमच एकशेष करून उच्चारण केलें आहे. अ आणि अ हे स्थानी व आदेश या दोन्ही ठिकाणीं एकशेष करूनच उच्चारण केलें आहे असें गृहीत धरलें म्हणजे भगवान् आचार्य पाणिनीच्या मनांतील इच्छित गोष्ट सर्व सिद्ध होते.

याप्रमाणें भगवान् पतञ्जलि ऋषींनीं रचलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील आठव्या अध्यायाच्या चौथ्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें व पाद आणि अध्यायही समाप्त झाले.

याप्रमाणें भगवान पतंजलि ऋषींनीं रचिलेलें व्याकरणमहाभाष्य संपूर्ण झालें.

सर्वांचें कल्याण होवो.

---

६ '' अत्रैव चैष दोषः '' हें वाक्य काशी येथील मुद्रित प्रतींमध्यें व कांहीं हस्तलिखित प्रतींमध्यें सांपडत नाहीं म्हणून त्याचें भाषांतर केलें नाहीं. तें मूळांत आहे असें समजल्यास मूळ भाष्यवचन ज्यास्त जोरदार होईल. भाष्याचें थोडक्यांत तात्पर्य पुढीलप्रमाणें होईलः ' अकारस्य प्रत्यापत्तौ० ' या वार्तिकाचा वर दाखविल्याप्रमाणे थोडा उपयोग आहे हें खरेंच. पण त्याशिवाय प्रस्तुतही एक दोष राहतोच. तो कोणता तर ' ह्या सूत्रानें आदेश सांगितलेला जो अकार.......त्यानें सवर्णाचें ग्रहण होणार नाहीं. ' हा होय.